# निवेदन



काले मार्क्सचा 'कॅपिट्ल' हा ग्रंथ मूळ जर्मन भाषेंत त्रिखंडात्मक असून इंग्रजी भाषेंत त्याचें समग्र त्रिखंडात्मक भाषांतर झालें आहे. हें भाषांतर डेमी-अष्टपत्री आकाराच्या बावीसशें पृष्ठांहून अधिक भरतें. मराठींत त्याचें समग्र भाषांतर केल्यास तें त्याच आकाराच्या तीन हजार पृष्ठांपर्यंत जाईल. एवढें भाषांतर करणें, तें छापून काढणें, तें विकणें व वाचकांनीं तें सर्व वाचणें हें सर्वच सद्यःस्थितींत अव्यवहार्य आहे. पण मार्क्सवादाच्या मराठी अभ्यासकांस मराठींतून या कॅपिट्ल ग्रंथाचा अभ्यास करायला मिळणें हेंहि अत्यवश्य आहे. म्हणून समग्र 'कॅपिट्ल' देतां येत नसलें तरी त्याचा 'सारग्रंथ' तयार करावा ही कल्पना निघाली व ती आज यथाशक्ति मीं तडीस नेली आहे. हा सारग्रंथ म्हणजे मार्क्सच्या कॅपिट्लच्या प्रकरणांचा माझ्या शब्दांत मीं सांगितलेला सारांश नव्हे, तर मूळ कॅपिट्लमधील महत्त्वाचे सिद्धांत संगतवार समजतील असे कॅपिट्ल-मधील उतारे घेऊन हा सारग्रंथ बनविला आहे. त्यामुळें मार्क्सच्याच शब्दांत हा सारग्रंथ वाचायला मिळतो. हे उतारे निवडण्याची जबाबदारी ही केवळ माझी नाहीं. ज्यूलियन बुर्खार्ड्ट् या जर्मन कम्युनिस्ट पंडितानें कॅपिट्लमधील महत्त्वाचीं प्रकरणें व त्यांतील महत्त्वाचे परिच्छेद वेगळे काढून आणि त्यांची मांडणी बदलून 'पीपल्स मार्क्स' नांवाचा कॅपिट्ल–सार-ग्रंथ तयार केला. तो मॅक्स ईस्टमननें संपादून इंग्रजींत प्रसिद्ध केला. तो 'पीपल्स मार्क्स' बहुतेक सर्व या मराठी सारग्रंथांत भाषांतरिला आहे. जॉन् स्ट्राचीनें कॅपिट्लच्या पहिल्या खंडाची अशीच एक संक्षिप्त आवृत्ति काढली असून बुर्खार्ड्टनें गाळलेलीं कांहीं प्रकरणें स्ट्राचीनें घेतलीं आहेत तींहि बहुतेक मीं या सारग्रंथांत अंतर्भूत केलीं आहेत. 'हँडबुक ऑफ मार्क्सिझम्' या ग्रंथांत इमाइल बर्न्स यानें कॅपिट्लच्या तिन्ही खंडांचा सारग्रंथ तयार करून दिला आहे. त्यांतलाहि कांहीं भाग महत्त्वाचा वाटल्यावरून दिला आहे. यामुळें मार्क्सच्याच शब्दांत कॅपिट्लमधील

महत्त्वाच्या सिद्धांतांचा जास्तींत जास्त मोठा सारांश मी देत आहे असें म्हणतां येईल. मार्क्सनें कॅपिट्लच्या पहिल्या खंडास ज्या दोन प्रस्तावना लिहिल्या आहेत त्या सारग्रन्थाच्या परिशिष्टांत दिल्या आहेत.

कॅपिट्लमधील सिद्धांत व विचारसरणी यांचें अभ्यासकांना आकलन करतां यावें यासाठीं विवेचनात्मक अशा दोन विभागांत युरोपियन आर्थिक सामाजिक विचारांची माहिती अनेक अधिकारी ग्रंथांच्या आधारें दिली असून कॅपिट्लमधील विचारांचा विशेष खुलासा करण्यासाठींही कांहीं प्रकरणें लिहिलीं आहेत. तसेंच कॅपिट्लमध्यें मार्क्सनें वापरलेली विचार-पद्धति तो हिंदुस्थानास कशी लावतो हें अभ्यासकास कळावें म्हणून मार्क्सच्या हिंदुस्थानविषयक लेखांतले दोन उतारे परिशिष्टांत दिले आहेत. आणि ऐतिहासिक विरोधविकासक्रमासंबंधाचा मार्क्सचा जो महत्वाचा सिद्धांत तो त्यानें 'पॉव्हर्टी ऑफ् फिलॉसफी' या ग्रंथांत अगदीं समर्पक शब्दांत मांडलेला आहे. त्याचे कांहीं उतारे परिशिष्टांत दिले आहेत.

हे विवेचनात्मक विभाग] लिहिण्याला साधनग्रंथांची बहुमोल मदत केसरी–मराठा ग्रंथशाळेनें केली. शिवाय कित्येक दुर्मिळ पुस्तकें ना. ग. गोरे, वसंत जाखडे, कमल तुळपुळे या मित्रांनीं दिली. माझे चुलत बंधु शाम गाडगीळ यांनीं भाषांतर लिहून घेण्याचें काम केलें. तें करतांना विषयाची चर्चा करून भाषांतर चांगलें करण्यास मला त्यांनीं बहुमोल साहाय्य केलें. शाम गाडगीळांच्या या साहाय्यावांचून हें सर्व लेखन झालें आहे इतपत चांगलें झालेंच नसतें. जनार्दन सदाशिव प्रेसचे मॅनेजर श्री. लक्ष्मणराव केळकर यांनींही प्रुफें मजकूर समजून घेऊन वाचलीं यामुळें माझें काम फार हलकें झालें. कंपॉझिटरवर्गानेंहि अतिशय मेहनत घेतली. य. गो. जोशी यांनीं प्रकाशनाची जड जबाबदारी पत्करली नसती तर मी हें पुस्तक इतक्यांत लिहिलेंहि नसतें. किर्लोस्कर मासिकांत मी लिहिलेला एक लेख या पुस्तकांत थोड्या फरकानें उध्दृत केला असून संपादकांनीं तशी परवानगी दिली आहे. या सर्वांचा मी अत्यंत ऋणी आहें. मला हें सर्व काम उरकतांना शारीरिक, मानसिक व बौद्धिक दगदग अतिशय पडली.

अडचणी इतक्या आल्या कीं हें काम पूर्ण होईल असें अखेरपर्यंत केव्हांही खात्रीचें वाटलें नाहीं. पण हें काम हौसेचें व भक्तीचें असल्यानें काम करतांना मला आनंदही होत गेला. आज हें काम पूर्ण करून वाचकांच्या हातीं देतांना माझा सर्व शीण नाहींसा झाला आहे.

मुंबई
३१ मार्च १९४१

पां. वा. गाडगीळ

---

## द्वितीय मुद्रणासंबंधीं चार शब्द

कॅपिटल् सारग्रंथाचें हें द्वितीय मुद्रण वाचकांचे हातीं देतांना माझ्या भावना संमिश्र आहेत. पहिल्या आवृत्तीचें स्वागत महाराष्ट्रजनतेनें चांगलें केलें याबद्दल आनंद होतो. आणि प्रथमावृत्ति पुन्हा नीट वाचून सुधारावी असें मी ठरविलें होतें, पण फुरसतच मिळाली नाहीं म्हणून तें मुळींच होऊं शकलें नाहीं याबद्दल खेद होतो. पुस्तकाची किंमत आजच्या महागाईत वाढूं नये म्हणून विवेचनाच्या विभागाचा टाईप बारीक ठेवला व त्यामुळें एकूण पानें कमी झालीं आहेत. विवेचनाचा भाग प्रथममुद्रणांत भाषांतर विभागानंतर घातला होता. पण यावेळीं तो आधीं घेतला आहे. त्याचेहि मार्क्सपूर्व विचारपरंपरा व सारग्रंथाचें विवरण असे दोन भाग पाडले आहेत. वाचकांनीं सारग्रंथ-भाषांतर वाचण्यापूर्वीं विवेचनाचे हे दोन भाग आधीं वाचावे म्हणजे सारग्रंथ-भाषांतर समजण्यास साहाय्य होईल.

मुंबई
ता. ३१-७-४९

पां. वा. गाडगीळ

---

# वाद-विवेचन-माला

या मालेची कल्पना माझे स्नेही श्री. पां वा. गाडगीळ यांच्यांशीं सहज गप्पा मारतां मारतां निघाली. श्री. पां. वा. गाडगीळ यानींच मालेचें संपादकत्व पत्करलें. त्यांच्या आणि माझ्या सहकार्यानेंच मालेचें कार्य आतापर्यंत झालें आहे. या मालेंत एकंदर या सारग्रंथासुद्धां तेरा पुस्तकें प्रसिद्ध करावयाचें ठरलें. कॅपिट्ल सारग्रंथ मालेच्या "कळसा-ध्याया" सारखा शेवटीं काढायचें ठरलें होतें पण तोच अगोदर तयार झाल्यामुळें आज विक्रीकरितां बाहेर पडत आहे.

सांपत्तिक दृष्ट्या श्री. पां. वा. गाडगीळ आणि मी दरिद्रीच आहोंत. ललित वाङ्मयालाही कांहीं विशेष धंदेवाईक रूप आहे असा माझा इतर प्रकाशनाचे बाबतींत अनुभव नाहीं तेव्हां निदान मराठींत चार चांगली पुस्तकें टाकतां आलीं तर पहावीं या कल्पनेनें ह्या मालेच्या प्रकाशनास आरंभ केला. कांहीं लोकांनीं "यांत तुम्हाला स्वार्थत्याग करावा लागेल" वगैरे मोठेपणाचे शब्द मला ऐकविले. पण मी आतांपर्यंत केलेला धंदा केवळ पतीवरच करीत आलेला असल्यामुळें या मालेंत शेवटीं स्वार्थत्याग ठरल्यास मी नामपात्र जरी 'स्वार्थत्यागी' ठरलों तरी खरा स्वार्थत्याग छापखानेवाल्यांचाच ठरणार आहे !

—पण मालेंत स्वार्थत्याग घडेल असें वाटत नाहीं. ग्राहक बरे मिळत आहेत आणि मालेचा गांवोगांव प्रचार केल्यास या मालेंतून चांगुल-पणानें मी बाहेर पडेन अशी मला उमेद आहे.

—पण ही माला काढून पुरी केल्याबद्दल मला आनंद वाटेलच पण आणखी एक आनंदाचा क्षण यावा अशी माझी इच्छा आहे. मालेच्या संपादकलेखकांना मी आता फक्त नाममात्रच मोबदला दिला आहे. 'आतां व्यावहारिक दृष्ट्या मी त्यांचें देणें लागत नाहीं.' पण मालेचा

खप चांगला झाल्यास त्यांस आणखीही कांहीं पोचवावे अशी इच्छा आहे. तो आनंदाचा क्षण मला लाभो अशी एक मनाची तळमळ आहे.

श्री. पां. वा. गाडगीळ यांनीं 'कॅपिटल सारग्रंथा' चें काम आपला नेहमींचा वृत्तपत्रव्यवसाय सांभाळून केवळ साडेतीन महिन्यांत पुरें केले. आणि तेंहि इतक्या कर्तव्यबुद्धीनें कीं त्यांचें लेखन चालू असतांना मी एकदां त्यांच्याकडे गेलों होतों तेव्हां "जोशी बुवा, आतां जा तुम्हीं. माझी लेखनाची वेळ झाली!" असें सांगून त्यांनीं मला वाटेला लावलें एकाद्या कर्मनिष्ठ माणसानें अगत्यपूर्वक स्नानसंध्येची वेळ सांभाळावी अगदीं त्याप्रमाणें!

मालेचीं आतापर्यंत १ सुलभ समाजवाद २ फॅसीझम् ३ साम्राज्यशाही ४ अराज्यवाद ५ लोकशाही ६ मार्क्सचा भौतिकवाद हीं सहा पुस्तकें प्रसिद्ध झाली आहेत आणि या कॅपिटल **सारग्रंथा** बरोबर ७ ईश्वरवाद ८ गांधीवाद आणि ९ विश्वकुटुंबवाद हीं पुस्तकें प्रसिद्ध होत आहेत.

म्हणजे मालेंत संकल्पिलेल्या १३ पुस्तकांपैकीं दहा पुस्तकें प्रसिद्ध झालीं असून १ जडवाद (अनीश्वरवाद) २ राष्ट्रवाद आणि ३ हिंदुत्व-वाद हीं फक्त तीन पुस्तकें प्रसिद्ध व्हायचीं राहिली आहेत. ती जुलै १९४१ अखेरपर्यंत प्रसिद्ध होतील.

मालेला लेखकवर्गही चांगला मिळाला श्री. ज. स. करंदीकर संपादक केसरी, आचार्य जावडेकर, श्री. ना. ग. गोरे, प्रो. सोनोपंत दांडेकर, प्रो. कोल्हटकर, तर्कतीर्थ जोशी इत्यादींनीं आपला बिनमोल वेळ खर्च करून (मोबदल्याच्याहि दृष्टीनें) माला नांवारूपास आणली. मालेच्या कार्यास वेळोवेळीं प्रसिद्धी देऊन वर्तमान पत्रांनींही सहकार्य दिलें.

एकाच वाक्यांत सांगतों मालेच्या बाबतींत मला आतापर्यंत अडचणी आल्याच नाहींत!

**पुणें**
ता. १५ मे १९४१

सर्वांचा कृपाभिलाषी
**यशवंत गोपाळ जोशी**

---

# अनुक्रमणिका

## मार्क्सपूर्व विचारपरंपरा

### भाग १ ला



## कॅपिट्ल सारग्रंथ विवरण

### भाग २ रा



## कॅपिट्ल ग्रंथाची पार्श्वभूमि

### परिशिष्ट



## कॅपिट्ल सारग्रंथ

# कांहीं साधनग्रंथ


| | |
|---|---|
| Capital Vol. I, II, III (Kerr Edition) | Karl Marx |
| Capital (abridged) | John Strachy |
| Nature of Capitalist Crisis | John Strachy |
| History of Socialism | Markham |
| Marxian Economics | Untermann |
| Freedom and organisation | Bertrand Russel |
| Towards understanding of Karl Marx | Sydney Hook |
| Capital and other writings of Marx | Max Eastman |
| Communist-manifesto | Ryazanoff |
| Philosophy and Political Economy | Bonar |
| Critique of Political Economy | Karl Marx |
| Marx's Capital | A. D. Lindsay |
| Political Economy and Capitalism | Maurice Dobb |
| K. Marx and F. Engels | Ryazanoff |
| Life of Karl Marx | Franz Mehring |
| Man's worldly goods | Leo Huberman |
| A History of Economic Thought | Erich Roll |
| Karl Marx-Man, thinker & Revolutionary | Ryazanoff |
| Handbook of Marxism | Emil Burns |
| Imperialism | Lenin |
| Fundamentals of Marxism | Plekhanov |
| What Karl Marx really meant | G. D. H. Cole |
| Basic Principles of Scientific Socialism | Sachs |
| Political Economy | Leontiv |

# उपोद्घात : : : १

" अहो, जें काय बोलायचें असेल तें येथलें बोला, पाश्चात्यांचें सांगूं नका; तेथलें येथें कांहीं उपयोगी पडायचें नाहीं; आमच्या येथली सारी परिस्थिति वेगळी आहे; हजारों वर्षांच्या इतिहासाची आणि प्राचीन संस्कृतीची परंपरा येथें आहे, यामुळें हिंदुस्तानास पाश्चिमात्यांचे सिद्धांत लागू पडावयाचे नाहींत."

× × × × ×

## पाश्चात्य म्हणजे काय ?

वरील आशयाचा इषारा सनातनी विचाराचे कार्यकर्ते नवमतवाद्यांना नेहमीं देत असतात. हा इषारा सर्वथैव अस्थानीं असतो असेंही नाहीं. कारण पाश्चिमात्य देशांतलीं कोणचीं तरी उदाहरणें आणि कसली तरी आंकडेमोड घेऊन ती येथें जशीच्या तशीं लावून पाहणें आणि त्यापासून येथील परिस्थिती-संबंधानें अनुमानें काढणें खास धोक्याचें ठरेल. अमेरिकेंतल्या घटस्फोटाच्या कोर्टांतल्या जबान्या वाचून व मनुष्यस्वभाव जगभर सारखाच असतो या भोंगळ सिद्धांताचा आधार घेऊन हिंदुस्तानांतील कौटुंबिक परिस्थितीसंबंधानें अनुमानें काढलीं तर तें खात्रीनें चुकीचें होईल. कारण एक तर अमेरिकेंतल्या केवळ घटस्फोटाच्या कोर्टांतल्या जबान्यांवरून अमेरिकेंतल्या कुटुंबसंस्थेसंबंधींचीं अनुमानें काढणें हें चुकीचें ठरेल. शिवाय 'पाश्चात्य' या शब्दानें जेवढ्या भूप्रदेशाचा उल्लेख आपण करतों तो सगळाच्या सगळा एक व एकसारखा आहे असेंही नाहीं. अमेरिका व युरोप यांचा समावेश आपण पाश्चात्य या शब्दांत करीत असतों. पण युरोपांतही अनेक संस्कृति व चालीरीति यांची भेसळ झालेली असून

आर्थिक व राजकीय परिस्थितींत अत्यंत सुधारलेल्यापासून अत्यंत मागसलेल्या-पर्यंत सर्व प्रकारचीं राष्ट्रें युरोपांत आहेत. आणि या सर्वांहून अमेरिकेची परि-स्थिति सर्वच बाबतींत भिन्न आहे. खुद्द अमेरिकेंतही विविधता कमी नाहीं. अमेरिकेंतल्या प्राचीन रहिवाशांच्या चालीरीतींचा व संस्कृतींचा विचार सोडून दिला तरी पूर्णपणें आधुनिक असलेल्या निरनिराळ्या अमेरिकन संस्थानांत संस्कृति, समाजजीवन, राष्ट्रीय आकांक्षा या सर्व बाबतींत मतवैचित्र्य, आचार-वैचित्र्य व परिस्थितिवैचित्र्य इतकें भरपूर आहे कीं सर्व अमेरिकन राष्ट्रासंबंधानें कोणत्याही बाबतींत एकच एक अनुमान आपणाला काढताच येणार नाहीं.

## पौर्वात्यांतील भिन्नता

"पाश्चात्य' म्हणून जें कांहीं आपण बोलतों त्यांत जशी ही विविधता आहे तशी 'पौर्वात्य' म्हणून जें कांहीं आपण बोलतों त्यांतही अशी विविधता आहे. ईजिप्तपासून जपानपर्यंत अनेक संस्कृति गेल्या हजारों वर्षांत या 'पौर्वात्य' प्रदेशांत नांदून अस्तास गेल्या. ज्या प्राचीन संस्कृतींची परंपरा पौर्वात्य राष्ट्रां-मागें आहे असें आपण म्हणतों ती प्राचीन संस्कृति एकस्वरूप कधींच नव्हती. आणि ज्या चीन व जपान या राष्ट्रांची प्राचीन संस्कृति जास्तींत जास्त एकस्वरूप होती असें म्हणतां येतें त्यांचे आधुनिक इतिहास, त्या एकस्वरूप प्राचीन संस्कृ-तीची मुळींच पर्वा न करतां, अगदीं भिन्न इतकेच नव्हे तर परस्परविरोधी झाले आहेत. हिंदुस्तान हें एकराष्ट्र आहे असें आपण म्हणतो व बहुसंख्य समाजाच्या दृष्टीनें पाहिलें तर या देशाची शकलें पाडून येथें अनेक राष्ट्रें निर्माण करूं पहाणाऱ्यांना कधींच यश येणार नाहीं. तरीपण येथें इतिहासकालांत भिन्न-भिन्न व परस्परविरोधी संस्कृति नांदल्या, परस्परापासून अत्यंत भिन्न असे अनेक मानववंश येथें नांदले आणि त्यांचे इतिहासही भिन्न भिन्न झाले असून आजतागायतही हे इतिहाससिद्ध परंपराभेद टिकून राहिले आहेत.

## आद्य सुधारकांच्या चुका

सारांश, 'जें काय बोलायचें तें येथलें बोला, पाश्चात्यांचें सांगू नका, तेथलें येथें कांहीं लागू पडायचें नाहीं', असा इषारा देणारांचा हेतु परदेशांतील वस्तुस्थिति नीटशी कळणें शक्य नसल्यानें तीपासून काढलेलीं अनुमानें चुकीचीं असण्याचा संभव आहे असें सुचविणें हा असेल, अथवा कोणत्याहि दोन

परिस्थितींत असणाऱ्या साम्यापेक्षां भेद महत्त्वाचे असून एका परिस्थितीपासून निघणारीं अनुमानें दुसऱ्या परिस्थितीस तशींचीं तशीं लागू पडणें अशक्य आहेत, या हेतूनें हा इषारा देण्यांत येत असेल तर तो इषारा रास्त व त्याचा हेतुही योग्य आहे असें म्हणतां येईल. या इषाऱ्यांत सूचित असणाऱ्या चुका नवमतवाद्यांनीं अनेकवार केल्या आहेत. हिंदुस्थानांत ब्रिटिश अमल सुरू झाल्यानंतर नवीन मिळालेल्या शिक्षणानें ज्याचे मेंदू 'तर' झालें त्यांनीं इंग्रजांचें जें जे दिसलें तें तें सर्व चांगलें व हिंदी समाज नासून कुजून गेला असून जुनें तेवढें सगळें उध्वस्त झाले पाहिजे, आपण सर्वजण, पोषाखापासून खाणें-पिणें, आचार, समाजरचना, धर्म वगैरे सर्व बाबतींत 'अप-टु-डेट-साहेब' झाल्यावांचून आपली हीनता नाहींशी होणार नाहीं असा स्वतःबद्दल व स्वकीयांबद्दल न्यूनभाव धारण केला. यामुळें अव्वल इंग्रजींतल्या सुधारकांच्या पहिल्या पिढीच्या हातून बऱ्याच चुका घडल्या.

## नवमतवाद्यांची दृष्टि

पाश्चात्यांच्या ज्या गुणांत, आचारविचारांत, आपणांस चांगुलपणा दिसतो तें सगळेंच कांहीं चांगलें नाहीं आणि पाश्चात्य साहेबांतही त्याबाबत तीव्र मतभेद व रणें माजलेलीं असून साहेबाच्या साहेबपणाचेंही रूप वरचेवर पालटत गेलें आहे ही गोष्ट आधुनिक सुधारकांना कळली आहे. यामुळें पाश्चात्य तेवढें सगळेंच चांगलें आणि पौर्वात्य तेवढें सगळें वाईट ही मूळची अविवेकी वृत्ति आधुनिक सुधारकांनीं ऊर्फ नवमतवाद्यांनीं सोडली असून बरें काय वाईट काय याचा निर्णय ते आतां ऐतिहासिक आधार, सारासार विवेक व शक्य तेथें प्रत्यक्ष प्रयोग यांच्या साहाय्यानें करूं लागले आहेत.

## सनातन्यांचा मागसलेपणा

पण नवमतवाद्यांच्या विचारसरणींत व कार्यपद्धतींत जी ही सुधारणा झाली तशी ती सनातन्यांच्या बाबतींत मात्र झालेली नाहीं. जुनें कांहीं टिकाऊ नाहीं, तें प्रतिक्षणीं उध्वस्त होत आहे आणि इंग्रजांच्या अमलाबरोबर आलेल्या पाश्चात्य गोष्टींचा पगडा आपणावर बसला हें त्यांना दिसत आहे, तरीही जुन्याला म्हणजे बुडत्याला कवटाळण्याचा त्यांचा मोह सुटत नाहीं. या दुराग्रही सनातनीपणांतही आतां एक 'सुधारणा' होऊं लागली आहे. ती म्हणजे

'पाश्चात्य' व 'पौर्वात्य' या दोन्हींत जें 'चांगलें' आहे तेवढें स्वीकारावें आणि वाईट असेल तेवढें टाकून द्यावें ही 'विवेकी' वृत्ति सनातनीवर्गात बळावूं पहात आहे. पण सकृद्दर्शनीं सोज्ज्वळ वाटणाऱ्या या 'विवेकीपणां'त विवेक मुळींच नसतो. आजच्या जगांतल्या वस्तुस्थितीचें 'पाश्चात्य' आणि 'पौर्वात्य' असें वर्गीकरण करणें हेंच चूक आहे ही आतां नवमतवाद्यांना आलेली दृष्टि अजून सनातन्यांना अथवा जुन्या सुधारकांना मुळींच आलेली नाहीं. आगगाडीचा रूळ जेथें जेथें जातो तेथल्या तेथल्या समाजाचें राजकीय, सामाजिक, आर्थिक, सांस्कृतिक स्वरूप तो बदलून टाकतो; आगगाडी नव्हती त्या काळच्या पाश्चात्य व पौर्वात्य समाजाचें स्वरूप पुष्कळसें सारखें होतें आणि आगगाडी आल्यानंतर पाश्चात्य व पौर्वात्य सर्वच समाजांचें स्वरूप पालटून चाललें आहे. दुसऱ्याचें 'चांगलें' तेवढें घ्यावें आणि 'वाईट' तेवढें टाकावें हा गोंडस सिद्धांत मांडतांना 'चांगल्या'शीं अभेद्यपणें निगडित असलेलें कांहीं 'वाईट' ही स्वीकारावें लागतें याचें अवधान सनातन्यांना आलेलें नाहीं. यामुळें अपरिहार्य व 'चांगलें' म्हणून आगगाडींत बसावें, पण तेथें मात्र विटाळचंडाळ होवूं नये म्हणून दशमी खातांना धाबळी नेसावी असली आत्म-वंचक व नेभळी वृत्ति सनातनी समाजानें (व नव्या सुधारकांनींही) नव्या जगाशीं वागतांना पत्करलेली आहे.

## सनातनी समाजाचें वर्तन

प्रस्तुत पुस्तकाचा विषय मुख्यतः आर्थिक व पर्यायानें राजकीय असल्यानें धार्मिक, सामाजिक वगैरे क्षेत्रांतलें सनातनी समाजाचें वर्तन न पाहतां आर्थिक क्षेत्रांतलींच उदाहरणें घेऊं. चातुर्वर्ण्य ही प्राचीन आर्यांची समाजव्यवस्था मानली गेली असून ब्राह्मण वर्ण हा त्यावेळचा सर्व वर्णांचा गुरु होय. अध्ययन-अध्यापन, यजन-याजन, दानप्रतिग्रह हीं ब्राह्मणाचीं नियत षट्कर्में. क्षत्रिय राजाच्या अमलाखालीं हें चातुर्वर्ण्य नांदलें पाहिजे. यांपैकीं कोणतीही गोष्ट गेलीं शेंकडो वर्षें अखिल भरतखंडांत नांदत असलेली दिसून येत नाहीं. चातुर्वर्ण्य नाही, क्षत्रिय राजा नाहीं, ब्राह्मण नियतकर्म पाळीत नाहींत. आर्यवंश फार तर शिल्लक राहिला आहे असें वाटल्यास म्हणावें; पण ज्यांना 'हिंदु' म्हणतात ते कांहीं सगळे आर्य नव्हेत. आणि सगळे आर्य कांहीं हिंदु नाहींत. हिंदुधर्म म्हणजे काय आणि हिंदु कोणाला म्हणावें याचा कोठेंही खुलासा नाहीं. अशा गोंधळाच्या

परिस्थितींतही 'प्राचीन हिंदुधर्मा' चा वारसा म्हणून उच्चवर्णीयांना जे आर्थिक व व्यावहारिक हक्क आहेत त्यांची जोपासना अगदीं कसोशीने केली जाते. सहा, सात कोटि अस्पृश्य समाजास स्पृश्य समाजाच्या वस्तींत राहायला जागा मिळूं शकत नाहीं. खानावळी, फराळाचीं दुकानें इतकेंच काय पण भुसारमालासारख्या कोरड्या मालाचीं दुकानेंही स्पृश्यांच्या वस्तींत अस्पृश्यांना घालणें अशक्य होते. स्पृश्यांच्या वस्तींत नुसतें घरदार करण्यालाही त्यांना परवानगी मिळूं शकत नाहीं. स्पृश्य हिंदूंच्या हॉटेलांत बसून चहा घेणें अस्पृश्यांना अशक्य आहे.

## स्वतांला मात्र पाश्चात्य हवें

प्राचीन आर्य अथवा हिंदुधर्माचीं बंधनें जो हिंदुसमाज इतक्या कसोशीनें पाळतो त्यांतल्या सर्व वर्णांनीं—विशेषतः ब्राह्मणांनीं व्यवसायस्वातंत्र्याचें पाश्चात्य तत्त्व मात्र हिंदुधर्मास धाब्यावर बसवून अगदीं स्वैरपणे अमलांत आणलें आहे. परीट हा प्राचीन हिंदुधर्मात अस्पृश्य गणला गेला आहे तरीपण आज ब्राह्मणांनीं राजरोस परटाचीं दुकानें घातलीं आहेत. ब्राह्मणांनीं गाय आणि गोरस विकूं नये हा नियम ब्राह्मण आज पाळीत नसून 'खात्रीचीं गाईच्या दुधाचीं ब्राह्मणांचीं दुकानें' आतां सर्वत्र झालीं आहेत. षट्कर्मे इमानें इतबारें करणारा ब्राह्मण आज समाजांत तुच्छ गणला जात असून डॉक्टरी, वकिली, सावकारी, दूधविक्री करणारा ब्राह्मण गोमांस खात असला तरी ब्राह्मणांनीं अपंक्त मानलेला अलीकडे ऐकिवांत नाहीं. आतां चांभाराच्या मालाचीं दुकानेंहीं ब्राह्मणांनीं घातलीं असून अमुक एक धंदा आतां ब्राह्मणांनीं करायचा ठेवला आहे असें नाहीं. 'पाश्चात्य' समाजशास्त्रानें व कायद्यानें दिलेलें व्यवसायस्वातंत्र्य वर्णश्रेष्ठ अशा ब्राह्मणाला जो हिंदुसमाज अनिर्बंधपणें उपभोगूं देतो तोच प्राचीन धर्माज्ञेच्या जोरावर अस्पृश्यांना व्यवसायस्वातंत्र्य वापरून स्वदेशांत व स्वसमाजांत वैभवास चढूं देत नाहीं.

## कौटिल्य उपयोगी पडला नाहीं

मुंबई इलाख्यांत कॉंग्रेसमंत्रिमंडळानें शेतकऱ्यांना कर्जाची अंशतः माफी देण्यासाठीं आणि जमिनकुळांना वहिवाटीची शाश्वती देण्यासाठीं कायदे केले. त्या कायद्यांना प्राचीन हिंदुधर्माचा अभिमान बाळगणाऱ्या सर्व सनातन्यांनीं एकजात विरोध केला. कुळांना जमीन वहिवाटीचे हक्क देणें म्हणजे कांहीं मालकी हक्क

देणें नव्हतें. पण 'कॉंग्रेस हा मालकी हक्क हिरावून घेत आहे' 'कॉंग्रेस बोल्शेव्हिक झाली' अशी ओरड या सनातन्यांनीं केली. पण अस्पृश्यांना दडपण्यासाठीं जसा प्राचीन हिंदुधर्म उपयोगी पडला तसा यावेळीं मनु अथवा कौटिल्य उपयोगी पडला नसावा असें वाटतें. शेतीपासून हजारों मैल दूर राहून बिगरशेती व्यवसायानें कुबेर बनलेल्यांना त्यांच्या शेतजमिनीवर मालकी हक्क असावा आणि शेंकडों वर्षे निदान कित्येक पिढ्या ज्यांनीं जमिनीची मशागत करून स्वतांचें व जमिनमालकाचें पोषण केलें त्यांना जमिनवहिवाटीचीही शाश्वती असूं नये असें मनु, कौटिल्य अथवा आणखी कोणाही प्राचीन आर्यांच्या शास्त्रकारांनीं सांगितलेलें आढळत नाहीं व तसें सांगितलें असणें शक्यही नाहीं. निदान कूळवहिवाटकायद्याच्या वादांत एकाही सनातन्यानें प्राचीन शास्त्राचा आधार घेतला नाहीं. यावेळीं या हिंदु-सनातन्यांनीं एकुणिसाव्या शतकांतील ब्रिटिश लिबरल तत्त्वज्ञांच्या मालकीहक्काच्या तत्त्वाचा आधार घेण्याची बतावणी केली. 'कोणताही सरकारी कायदा कांहीं विशिष्ट मर्यादेपलीकडे मिळकतीवरील मालकी हक्कावर गदा आणील तर तो कायदा सनदशीर नव्हे' असें एकुणिसाव्या शतकांतील ब्रिटिश लोकशाहीचें एक प्रमुख तत्त्व आहे. त्याचा आधार या हिंदु सनातन्यांनीं यावेळीं घेऊन कॉंग्रेस-मंत्र्यांच्या कुळवहिवाट बिलास निकराचा विरोध केला. वास्तविक इंग्लंडांतलें हें तत्त्वही येथें लागू पडण्यासारखें नव्हतें. कारण इंग्लंडांतल्या या मालकीहक्काच्या पुरस्कर्त्यांनीं स्वतांच्या श्रमानें उत्पन्न केलेल्या धनावर श्रम करणाराची मालकी असली पाहिजे' असें मत प्रतिपादलें होतें. आणि याच धोरणास अनुसरून 'श्रम न करतां स्वस्थ बसून जमीनमालकी उपभोगणारांचा मालकीहक्क हा अनैतिक आहे' असें त्यांचें मत होतें. पण येथल्या कॉंग्रेसविरोधकांनीं इतक्या खोल पाण्यांत न जातां 'मालकीहक्काचें पावित्र्य' हें ब्रिटिशतत्त्वज्ञांचें सामान्य तत्त्वच कॉंग्रेस-विरोधासाठीं वापरलें.

## संकुचित वर्गीय दृष्टि

वरीलसारखीं अनेक उदाहरणें विद्यमान हिंदी समाजाकडे थोडीशी नजर टाकली असतां लक्षांत येतील. त्या सर्वांचा मथितार्थ इतकाच आहे कीं, 'पाश्चात्यांचें व पौर्वात्यांचें जेवढें चांगलें असेल तेवढें घ्यावें आणि वाईट असेल तेवढें टाकून द्यावें' या गोंडस व ऐसपैस दिसणाऱ्या तत्त्वाचा पुरस्कार जे

सनातनी करीत असतात, त्यांनीं आर्थिक व व्यावहारिक बाबतींत अखिल समाजाच्या दृष्टीनें विचार करण्याचें सोडून दिलें असून ते आतां फक्त संकुचित वर्गीय स्वार्थाच्या दृष्टीनें विचार करूं लागले आहेत. आणि त्या स्वार्थासाठीं जेव्हां पाश्चात्य तत्त्व उपयोगी पडेल तेव्हां पाश्चात्य तत्त्व वापरावें, पौर्वात्य तत्त्व उपयोगी पडेल तेव्हां पौर्वात्य तत्त्व वापरावें आणि जेव्हां दोहोंचाही आसरा मिळत नसेल तेव्हां विद्यमान कायद्याचा आधार घ्यावा असें या सनातन्यांचें धोरण आहे. बंगाल प्रांतांतल्या जमिनदारांच्या जमिनी या इंग्रजांपूर्वी त्यांच्या मालकीच्या नव्हत्या. मोगल अमलांत हे ' जामिनदार ' जमीनमहसूलअधिकारी होते. इंग्रजांनीं बंगाल जिंकला तेव्हां जमिनमहसुलाची शाश्वती मिळावी यासाठीं जमिनीवरील रयतांचा आरंभीं विचारही न करतां सरकारनें या महसूल-अधिकाऱ्यांना जमीनदार म्हणून मान्यता दिली. एवढ्यामुळें बंगालची जमिनदारी आतां कायदेशीर झाली असून ही जमिनदारी खालसा करणें म्हणजे 'बोल्शेव्हिझम्' होय, प्रस्थापित कायद्याची ही पायमल्ली असून त्यामुळें बेबंदशाही माजेल व जमिनदारांनीं बंडें करणें हेंही न्याय्य ठरेल, अशा धमक्या देण्यांत येत आहेत. पण पाश्चात्य आणि पौर्वात्य राज्यशास्त्राचीं अथवा धर्मशास्त्रांचीं तत्त्वें सांगून व कायद्याच्या दंडुक्याचा आधार घेऊन दौलती व आर्थिक हक्क रक्षण करता येण्याचे दिवस आतां भराभर संपत चालले असें दिसून येत आहे.

## ब्रिटिश अंमलाची पहिली धुंदी

ब्रिटिश अंमल हिंदुस्तानांत येण्यापूर्वी येथल्या सर्व राज्यसंस्था मोडकळीस येऊन जीवित, वित्त व अब्रू यांची शाश्वती अगदींच नाहींशी झाली होती. चोहोंकडे लहानमोठ्या प्रमाणांत पेंढार व ठकबाजी माजून देशांत अंदाधुंदी सुरू झाली. इंग्रजांच्या करोल व शिस्तशीर अमलानें या अंदाधुंदीचा शेवट होवून जीवित, वित्त व अब्रू यांस पूर्वीच्या हजारों वर्षांतल्या कोणत्याही राज्यसंस्थेनें दिली नव्हती इतकी शाश्वती या ब्रिटिश अमलानें दिली. त्यामुळें मध्यम वर्गाला धनसंचय करण्याला अनुकूल परिस्थिति उत्पन्न झाली. या परिस्थितीनें मध्यम वर्गाचे मनांत धनसंचयाचा अनावर लोभ उत्पन्न केला. सावकारांना अडलेल्या शेतकऱ्याला नाडून व कफल्लक करून स्वतः कुबेर होता येवूं लागलें. हळूं हळूं कारखानदारी उत्पादनाची वाढ होऊं लागली. आणि संयुक्त भांडवली कंपनींत अथवा बँकेंत पैसा टाकला कीं, झाडाला फळेंफुलें आपोआप येऊन झाड सफळ

होतें व वाढत जातें आणि त्याच्या बियांपासून अनेक झाडें व त्यापासून पुन्हा अनेकानेक झाडें होत जातात त्याप्रमाणें, कंपनींत अथवा बँकेंत टाकलेल्या पैशाची वाढ होवूं लागते असा अनुभव येवूं लागला. धान्य अथवा इतर अनेक प्रकारचा जो विनाशी धनप्रकार त्यांत धनसंचय केला तर तो टिकाऊ स्वरूपाचा अथवा सुरक्षित नसे. पण बँकेंत अथवा कंपनींत गुंतविलेला पैसा टिकाऊ, सुरक्षित व कामधेनूप्रमाणें पिढ्यानुपिढ्या इच्छित मनोरथ पूर्ण करणारा आहे असें दिसूं लागलें. यामुळें ब्रिटिश राज्य म्हणजे कल्पतरूची छाया आहे अशी बुद्धिजीवी मध्यम वर्गाची खात्री होऊन धन व ऐहिक जीवन हें नाशिवंत, क्षणभंगुर आहे, त्यांत गुंतून न राहतां शाश्वत सुखाच्या मागें मनुष्यमात्रानें लागावें हा वेदांताचा सिद्धांत बुद्धिजीवि मध्यम वर्गानें अगदीं अडगळींत काढून ठेवला.

## शाश्वतीचें बर्फ वितळलें

पण आतां गेल्या वर्षांपासून शाश्वतीच्या बर्फाचे हे खडक अतिशय वेगानें वितळूं लागल्याचा अनुभव येत आहे. पोलीस, लष्कर, चोख हिशेबाचा राज्य-कारभार, कराराच्या कायद्याची निष्ठुर अमलबजावणी या ज्या ब्रिटिश राजवटीच्या अपूर्व देणग्या त्यांच्या बळावर सुशिक्षित व धनिक वर्गांनीं गरीबांना नाडून आपल्या दौलती वाढविल्या, देशाचे एकूण धनोत्पादनही वाढलें. पण पोलीस, लष्कर वगैरे या सर्व तरतुदी शाबूत असूनही आतां दौलतींची वाढ खुंटूं लागली आहे, धनोत्पादन कमी होऊं लागलें आहे, कोणीही चोरलें नाहीं तरी बँकेंतल्या बँकेंत, इतकेंच काय पण खिशांतल्या खिशांत आपोआप धन कमी होत आहे. सरकारी हुंडणावळीचा भाव बदलला कीं, तळहातावरील स्पिरिट पाहतां पाहतां हवेंत नाहींसें व्हावें त्याप्रमाणें बँकेंतले आणि खिशांतले पैसेही मूल्यांत कमी होत आहेत. झोपेंत दाढी वाढावी त्याप्रमाणें कंपन्यांत गुंतविलेले पैसे झोपा घेणाऱ्या मालकांना अधिकाधिक श्रीमान बनवीत होते. पण झोपेंत केस गळून गेल्यानें निजण्यापूर्वी सुंदर दिसणाऱ्या केशकलापाखालचा गुळगुळित गोटा जागृति येतांच हातीं लागावा अशी कंपन्यांच्या झोपाळू भागीदारांची अवस्था होऊं लागली आहे. कष्ट करूनही खायला पुरेसें मिळत नाहीं, पोट भरतां येईल इतके कष्ट करायला मिळत नाहींत, धान्याचे आणि इतर भोग्य मालाचे ढिगाचे ढीग डोळ्या-समोर किडून, सडून, नासून चालले असतां त्यांचा उपभोग मिळूं शकत नाहीं, माणसें तडफडून मरत आहेत आणि असें हताश मरण पत्करण्यापेक्षां संपत्तीचा

व जीविताचा अत्यंत क्रूरपणें विध्वंस करण्यांतच शौर्य मानीत आहेत. कुणालाही हा अनर्थ हवासा वाटत नाहीं, पण तो कां होतो हें बुद्धिजीवी म्हणून गर्व बाळगणाऱ्यांनाही कळत नाहीं. सर्व हिंदु विचारसरणी सोडून अप्–टु–डेट–साहेब बनलें पाहिजे म्हणणाऱ्यांना आतां युरोपांतला साहेबच गोत्यांत पडलेला पाहून अचंबा वाटत आहे. पाश्चात्य व पौर्वात्य तत्त्वांतलें 'चांगलें' तेवढें घ्यावें म्हणणाऱ्या स्वार्थी समन्वयवाद्यांना दोन नाठाळ घोड्यावर मांड टाकून धांवताना होणारी तिरपीट व फेसाटी अनुभवावी लागत आहे, आणि बँकेंतल्या पैशाचा हिशेब ठेवून पुनःपुनः पुंजी मोजण्यापलीकडे आधुनिक जगासंबंधानें कांहींही अक्कल नसलेले लाल शालजोडीवाले 'पहा पहा, ऐहिक धन क्षणभंगुर आहे हा वेदान्ताचा अनुभव पटला कीं नाहीं !' असें म्हणून आधुनिकांना हिणवून स्वतः मात्र मिळेल तेवढी 'क्षणभंगुर' दौलत आपल्या आसनाखालीं नारीत आहेत.

तथापि कोणी कोणास हिणविलें, लुबाडलें, ठार केलें अथवा शरण गेले तरी जगांतील या धनदौलतीवर आणि माणसाच्या धनोत्पादनसामर्थ्यावर कोणतें संकट उद्भवलें आहे याचा कोणासच उलगडा होत नाहीं. जो तो स्वतः बुचकळ्यांत पडला आहे आणि गटंगळ्या खाणारा माणूस दुसऱ्या पोहोणाऱ्याच्या गळ्यांत मिठी मारून त्याला बुडवितो त्याप्रमाणें हे आपापल्यापरीं बुचकळ्यांत पडलेले लोक इतरांना बुडवीत आहेत. पृथ्वीचा घेर लक्षावधी वर्षांपूर्वीपासून आहे असाच प्रचंड आहे. त्यावर सर्वत्र पसरलेल्या मानवजातीस या पृथ्वीच्या प्रचंडत्वाची जाणीव नव्हती अथवा एकेका ठिकाणच्या मानवगटास दूरदूरच्या गटांची ओळखही नव्हती. यामुळें मानवी जीवन लक्षावधि वर्षें विहिरींतल्या बेडकासारखें संकुचित होतें. त्या त्या मानवी गटांचीं सुखदुःखें त्या त्या गटा-पुरतींच आहेतशीं वाटत. गेल्या तीनचारशें वर्षांत, लक्षावधि वर्षांचें हें मानवी-जीवन पालटलें. जणूं कांहीं सर्व बेडकांना सृष्टिदेवीनें विहिरींतून बाहेर काढून वर अंतरिक्षांत नेलें आणि आपण एका प्रचंड भूगोलावर किती अगणित भावंडें आहोंत हें दाखविलें, त्यांना आपलीं सर्वांचीं सुखदुःखें एक आहेत हा अनुभव आणून दिला; पण अचानक सृष्टिदेवीनें अंतरिक्षांतच या बेडकांना सोडून दिलें असून गुरुत्वाकर्षणाच्या वेगवान ओढीनें हे कोट्यवधि बेडूक आतां पृथ्वीकडे धावत आहेत व जगभर पसरलेल्या प्रचंड शिलाखंडावर आपटून आपले

राईराईएवढे तुकडे होणार असें भवितव्य त्या बेडकांना भेडसावीत आहे असा अखिल मानवजातीस आज अनुभव येतो आहे.

अशा प्रकारें हताश झालेल्या मानवजातीस, आपणा सर्वांवर कोणतें संकट ओढवणार आहे हें विशद करून सांगून त्याचा इशारा कार्ल मार्क्स या जर्मन शास्त्रज्ञानें पाऊणशें वर्षांपूर्वीच दिला आणि त्या संकटाच्या निवारणाचा उपायही सांगितला. आपल्या विशाल व सूक्ष्म बुद्धिमत्तेनें त्यानें त्या वेळच्या बुद्धिमंतांना दिसत असलेल्या क्षितिजापलीकडे दृष्टि फेकून या संकटाचें स्वरूप हेरलें. या संकटाचें स्वरूप समजून घेणें, तें इतरास समजून देणें व तें मानवी जगाच्या डोक्यावर येवून कोसळण्यापूर्वीच त्याच्या निवारणाची तजवीज करणें या कामीं त्यानें आपल्या आयुष्यांतील उमेदीचीं व कर्तृत्वाचीं सगळीं चाळीस वर्षे घालवून आपण आरंभिलेलें कार्य पुरें करणाऱ्यांचा जगद्व्यापी संप्रदायही मागें ठेवला आहे. सुमारें नव्वद वर्षांपूर्वी 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो' या आपल्या छोट्या ग्रंथांत भावी संकटाचें स्वरूप त्यानें संक्षिप्तपणें सांगितलें होतें. पुढे सतत वीस वर्षे व्यासंग, अवलोकन व विचार करून त्यानें या संकटाची विस्तृत मीमांसा केली. तोच 'कॅपिटल' ग्रंथ होय. मूळच्या अडीच हजार पृष्ठाहून अधिक अशा या प्रचंड ग्रंथाचा सारांश 'सार-ग्रंथ' या नांवानें या ग्रंथांत पुढें दिला आहे. वाचकांना त्यांतील विचारांचें आकलन करतां यावें यासाठीं पुढील विभागांत संक्षेपानें त्या सारग्रंथाचें विवेचन करावयाचें आहे. मार्क्सचे कॅपिट्लमधील विचारही आपल्यापरी पूर्ण स्वतंत्र नसून त्याच्या पूर्वीच्या दोनशें वर्षांतल्या युरोपखंडांतील आर्थिक विचारांची परंपरा मार्क्सच्या विचारांमागें आहे. म्हणून मार्क्सपूर्व विचारपरंपरा मार्क्सची विचारसरणी व मार्क्सच्या 'कॅपिट्ल' मधील विचारांचें विवरण हें या दोन विभागांत येईल. हे विचार पाश्चात्य आहेत एवढ्याचसाठीं त्यांची अवहेलना करणें योग्य होणार नाहीं. आगगाडी आणि कोयनेल हीं दोन्ही पाश्चात्य असूनही त्यांचा आपण स्वीकार केला. एतद्देशीय परिस्थितींत व नित्य बदलणाऱ्या कालांत अवश्य असे संस्कार त्यांच्यावर केले म्हणजे त्यांचा आपल्या कल्याणार्थ उपयोग होवूं शकतो हें आपण ओळखलें व तसा तो करून घेतला. मग 'कॅपिटल' मधील सिद्धांता-संबंधानें आपणांस असेंच वागतां येणार नाहीं काय?

---

# मर्कंटाइल पंथ व क्लासिकल पंथ : : : २

## मालकीहक्कासंबंधानें रूढ कल्पना

शरीरावरील अवयवासंबंधानें आपणास जशी आपुलकीची म्हणजे मालकीची भावना असते तशा अहंकारानें व ममत्वानें धनावरील मालकीहक्कासंबंधानें आपण बोलत असतों. कोणाच्याहि हाताच्या पंजावर उगवलेलीं बोटें हीं जशीं निसर्गत: त्याच्याच मालकीचीं असतात, जगांतल्या कोणत्याही राज्यकर्त्याच्या कायद्यानें हीं बोटें त्याच्या मालकापासून हिरावून घेतलीं जाऊं शकत नाहींत, अथवा त्यांच्या मालकीवर नियंत्रण येऊं शकत नाहीं, त्याप्रमाणें एकाद्याच्या मालकीची जमीन कायदा हिरावून घेऊं शकत नाहीं अथवा तिच्या वापरावर नियंत्रण घालूं शकत नाहीं असेंच आपण कमीअधिक प्रमाणांत मानीत असतों. राज्यक्रांतीसारख्या प्रसंगीं जुन्या मालकीहक्कांची धूळधाण होत असते खरी, पण राज्यक्रांत्या या राज्यकर्त्यांनाच उलथून पाडतात यामुळें तक्रार कोणाकडे करायची? युद्ध सुरू असलें म्हणजे त्यांत हातपाय तुटतात, डोकीं उडतात म्हणून मामुली समाजव्यवहारांतल्या कलहांत अशा गोष्टी घडल्या तर त्या गुन्हा ठरून शिक्षेस पात्र ठरतातच. त्याचप्रमाणें राज्यकर्त्यांनीं मालमत्तेचें व मालकीहक्काचेंही रक्षण केलें पाहिजे, कायदेशीरपणें वागणाऱ्या नागरिकाचा धनावरील मालकीहक्क कोणत्याही कारणानें राज्यकर्त्यांनीं हिरावून घेता कामा नये अथवा त्यावर गैरवाजवी नियंत्रण घालता कामा नये असें सामान्यत: लोकांना वाटत असतें. मागें उल्लेखिलेल्या कुळवहिवाट बिलाचे वादांत कुळांना वहिवाटीच्या शाश्वतीची हमी देण्याची कॉंग्रेस सरकारची योजना हाणून पाडूं

पाहणारांनीं सरकारवर बोल्शेव्हिझमूचा आरोप केला त्यावेळीं या जमीन-मालकांची आपल्या मालकी हक्कासंबंधानें हीच मनोभूमिका होती.

## मालकीहक्क मनुष्यनिर्मित

पण माणसाच्या शरीरावरील बोटें जशीं निसर्गतः त्याच्या मालकीचीं असतात अशी कांहीं जमीन, गिरणी वगैरेवरील व्यक्तीची मालकी निसर्गतः स्थापित झालेली नसते. प्रत्येक माकडाची शेपटी ही निसर्गतःच त्याची त्याच्या मालकीची आहे खरी, पण त्याचप्रमाणें अमुक एक झाड अमक्या माकडाच्या मालकीचें अशी वाटणी निसर्गानें मुळींच करून दिलेली नाहीं. मनुष्य-समाजांत मनुष्यानें व्यक्तीच्या व समाजाच्या सुखासाठीं, सोयीसाठीं, संरक्षणासाठी व उत्कर्षासाठीं हा मालकीहक्क निर्माण केलेला आहे. व्यक्तिमात्रास संपत्तीचा उपभोग घेता येऊन संपत्तीच्या उत्पादनासाठीं श्रम करण्यास त्याला उत्तेजन वाटावे आणि त्यायोगें एकंदर व्यक्तीची व समाजाची संपत्ति वाढावी हा या मालकीहक्काचा हेतु आहे. हा हेतु सिद्ध करण्यासाठीं या मालकीहक्काचें स्वरूप वेळोवेळीं पालटण्यांत आलें आहे व तसें तें पुढेंही पालटत जाऊं शकेल. तात्पर्य प्रस्तुत म्हणजे आर्थिक मुद्द्याच्या चर्चेच्या दृष्टीनें लक्षांत घेण्याची महत्त्वाची बाब ही आहे कीं मालकीहक्क ही समाजाच्या आर्थिक संघटनेंत माणसानें निर्माण केलेली एक व्यवस्था आहे. आणि समाजाचा योगक्षेम व्यवस्थित व्हावा यासाठीं अशा अनेक बाबी आर्थिक संघटनेंत माणसानें आपल्या कर्तृत्वानें निर्माण केल्या आहेत.

## ‘सोनें-रुपें हीच संपत्ति’

माणसाचें सर्वच जीवन असें कृत्रिम म्हणजे माणसानें आपल्या कर्तृत्वानें बनविलेलें आहे. या जीवनांतील निरनिराळ्या हेतूंच्या सिद्धीसाठीं निरनिराळ्या तजविजी माणसाला अवलंबाव्या लागतात. आर्थिक जीवनाचे बाबतींत धनाचें उत्पादन व वाटणी व्यवस्थित होणें हें अत्यवश्य असतें. यासाठीं तजविजी काय असाव्या यासंबंधानें युरोपच्या गेल्या तीन चारशें वर्षांच्या इतिहासांत अनेक वाद उपस्थित झाले असून निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या तजविजीही अमलांत आल्या आहेत. कांहीं धन हें जसें नित्य उपभोगून संपवून टाकावें लागावें लागतें तसें कांहीं धन नित्य उपभोगून पण दीर्घकालानें संपवायचें असतें. अन्न हें रोजच्या रोज खाऊन संपतें. पण घर हें रोज उपभोगलें तरी

पिढ्यानुपिढ्या तसें उपभोगता येतें. सोनें–रुपें व त्यांचीं नाणीं हा धनप्रकार. त्याच्या विनिमयानें इतर कोणतेंही भोग्य धन केव्हांही खरेदी करता येत असल्यानें संचय करण्याचें धन म्हणून फार उपयुक्त गणला जातो. सोळाव्या शतकांत स्पेन हें राष्ट्र साऱ्या जगांत 'श्रीमान' होतें. याचें कारण स्पेनच्या अमेरिकेंतील वसाहतींतून स्पेनमध्यें सोन्यारुप्याचा पूर वहात होता हें होय. " व्यक्तीजवळ सोन्यारुप्याचें नाणें असलें म्हणजे ती व्यक्ति जशी धनवान गणली जाते तसेंच ज्या राष्ट्रांत सोन्यारुप्याचें नाणें भरपूर असेल तें राष्ट्रही धनवान होय " असें तत्कालीन तत्त्वज्ञ मानीत. या तत्त्वज्ञांच्या मतास 'मर्केंटाईल पंथ' असें नांव मिळालें होतें. व्यक्तीला असणाऱ्या अन्नवस्त्रआश्रयाच्या गरजा जशा सोन्यारुप्याच्या नाण्यानें भागविता येतात त्याचप्रमाणें राष्ट्रांतील जनतेला व राज्यकर्त्यांना लागणाऱ्या वस्तुही सोन्यारुप्याच्या जोरावर मिळूं शकतात ही गोष्ट या तत्त्वज्ञांना फार महत्त्वाची वाटे.

## मालाच्या निर्यातीस उत्तेजन

त्याकाळीं देशांत सोनें रुपें जास्त प्रमाणांत यावें यासाठीं निरनिराळ्या राष्ट्राच्या सरकारांनीं कायद्यानें तजविजी केलेल्या असत. स्वदेशांतला माल परदेशी बाजारांत विकून परदेशचा माल मात्र कमी प्रमाणांत खरेदी करावा म्हणजे आपोआपच सोनें रुपें अधिक प्रमाणांत आपल्या देशांत येईल असें त्या त्या राज्यकर्त्यांना आणि तत्त्वज्ञांना वाटे. स्वदेशांतून अमुक प्रमाणापेक्षां अधिक सोनें विदेशीं नेण्यांत येवूं नये, परवान्यावांचून विदेशीं सोनेंरुपें नेऊं नये वगैरे स्वरूपाचे प्रतिबंधक कायदे इंग्लंड, स्पेन, इटाली वगैरे देशांत त्यावेळीं असल्याचे दिसून येतात. पण परदेशीं माल पुष्कळ पाठवून स्वदेशांत परदेशचा माल कमी आणायचा हें घडावें कसें? परदेशचा कच्चा माल स्वदेशांत आणून त्याचा पक्का माल करावा म्हणजे तो सहजच अधिक महाग किंमतीला विकतां येईल ही यावर अगदीं साधी युक्ति होती. यामुळें युरोपांतील सर्व देशांत त्यावेळीं शेतीच्या कच्च्या मालापेक्षां उद्योगधंदे म्हणजे त्यावेळचे हस्तव्यवसाय हे श्रेष्ठ होत असें मत प्रभावी झालें. आणि म्हणून निर्यात होणाऱ्या पक्क्या मालाच्या धंद्यांना देणग्या वगैरे देवून त्यावेळीं उत्तेजन देण्यांत येवूं लागलें. तसेंच आयात होणाऱ्या पक्क्या मालावर जकाती बसवून अथवा कांहीं मालास अजीबात प्रतिबंध करून स्वदेशी मालास होणारी चढाओढ हाणून पाडण्यांत येवूं लागली.

पाहणारांनीं सरकारवर बोल्शेव्हिझमूचा आरोप केला त्यावेळीं या जमिन-मालकांची आपल्या मालकी हक्कासंबंधानें हीच मनोभूमिका होती.

## मालकीहक्क मनुष्यनिर्मित

पण माणसाच्या शरीरावरील बोटें जशीं निसर्गतः त्याच्या मालकीचीं असतात अशी कांहीं जमीन, गिरणी वगैरेवरील व्यक्तीची मालकी निसर्गत: स्थापित झालेली नसते. प्रत्येक माकडाची शेपटी ही निसर्गतःच त्याची त्याच्या मालकीची आहे खरी, पण त्याचप्रमाणें अमुक एक झाड अमक्या माकडाच्या मालकीचें अशी वाटणी निसर्गानें मुळीच करून दिलेली नाहीं. मनुष्य-समाजांत मनुष्यानें व्यक्तीच्या व समाजाच्या सुखासाठीं, सोयीसाठीं, संरक्षणासाठीं व उत्कर्षासाठीं हा मालकीहक्क निर्माण केलेला आहे. व्यक्तिमात्रास संपत्तीचा उपभोग घेता येऊन संपत्तीच्या उत्पादनासाठीं श्रम करण्यास त्याला उत्तेजन वाटावें आणि त्यायोगें एकंदर व्यक्तीची व समाजाची संपत्ति वाढावी हा या मालकीहक्काचा हेतु आहे. हा हेतु सिद्ध करण्यासाठीं या मालकीहक्काचें स्वरूप वेळोवेळीं पालटण्यांत आलें आहे व तसें तें पुढेंही पालटत जाऊं शकेल. तात्पर्य प्रस्तुत म्हणजे आर्थिक मुद्द्याच्या चर्चेच्या दृष्टीनें लक्षांत घेण्याची महत्त्वाची बाब ही आहे कीं मालकीहक्क ही समाजाच्या आर्थिक संघटनेंत माणसानें निर्माण केलेली एक व्यवस्था आहे. आणि समाजाचा योगक्षेम व्यवस्थित व्हावा यासाठीं अशा अनेक बाबी आर्थिक संघटनेंत माणसानें आपल्या कर्तृत्वानें निर्माण केल्या आहेत.

## 'सोनें-रुपें हीच संपत्ति'

माणसाचें सर्वच जीवन असें कृत्रिम म्हणजे माणसानें आपल्या कर्तृत्वानें बनविलेलें आहे. या जीवनांतील निरनिराळ्या हेतूंच्या सिद्धीसाठीं निरनिराळ्या तजविजी माणसाला अवलंबाव्या लागतात. आर्थिक जीवनाचे बाबतींत धनाचें उत्पादन व वाटणी व्यवस्थित होणें हें अत्यवश्य असतें. यासाठीं तजविजी काय असाव्या यासंबंधानें युरोपच्या गेल्या तीन चारशें वर्षांच्या इतिहासांत अनेक वाद उपस्थित झाले असून निरनिराळ्या वेळीं निरनिराळ्या तजविजीही अमलांत आल्या आहेत. कांहीं धन हें जसें नित्य उपभोगून संपवून टाकावें लागावें लागतें तसें कांहीं धन नित्य उपभोगून पण दीर्घकालानें संपवायचें असतें. अन्न हें रोजच्या रोज खाऊन संपतें. पण घर हें रोज उपभोगलें तरी

पिढ्यानुपिढ्या तसें उपभोगता येतें. सोनें–रुपें व त्यांचीं नाणीं हा धनप्रकार, त्याच्या विनिमयानें इतर कोणतेंही भोग्य धन केव्हांही खरेदी करता येत असल्यानें संचय करण्याचें धन म्हणून फार उपयुक्त गणला जातो. सोळाव्या शतकांत स्पेन हें राष्ट्र साऱ्या जगांत 'श्रीमान' होतें. याचें कारण स्पेनच्या अमेरिकेंतील वसाहतींतून स्पेनमध्यें सोन्यारुप्याचा पूर वहात होता हें होय. " व्यक्तीजवळ सोन्यारुप्याचें नाणें असलें म्हणजे ती व्यक्ति जशी धनवान गणली जाते तसेंच ज्या राष्ट्रांत सोन्यारुप्याचें नाणें भरपूर असेल तें राष्ट्रही धनवान होय " असें तत्कालीन तत्त्वज्ञ मानीत. या तत्त्वज्ञांच्या मतास 'मर्कंटाइल पंथ' असें नांव मिळालें होतें. व्यक्तीला असणाऱ्या अन्नवस्त्रआश्रयाच्या गरजा जशा सोन्यारुप्याच्या नाण्यानें भागविता येतात त्याचप्रमाणें राष्ट्रांतील जनतेला व राज्यकर्त्यांना लागणाऱ्या वस्तुही सोन्यारुप्याच्या जोरावर मिळूं शकतात ही गोष्ट या तत्त्वज्ञांना फार महत्त्वाची वाटे.

## मालाच्या निर्यातीस उत्तेजन

त्याकाळीं देशांत सोनें रुपें जास्त प्रमाणांत यावें यासाठीं निरनिराळ्या राष्ट्राच्या सरकारांनीं कायद्यानें तजविजी केलेल्या असत. स्वदेशांतला माल परदेशी बाजारांत विकून परदेशचा माल मात्र कमी प्रमाणांत खरेदी करावा म्हणजे आपोआपच सोनें रुपें अधिक प्रमाणांत आपल्या देशांत येईल असें त्या त्या राज्यकर्त्यांना आणि तत्त्वज्ञांना वाटे. स्वदेशांतून अमुक प्रमाणापेक्षां अधिक सोनें विदेशीं नेण्यांत येवूं नये, परवान्यावांचून विदेशीं सोनेंरुपें नेऊं नये वगैरे स्वरूपाचे प्रतिबंधक कायदे इंग्लंड, स्पेन, इटाली वगैरे देशांत त्यावेळीं असल्याचे दिसून येतात. पण परदेशीं माल पुष्कळ पाठवून स्वदेशांत परदेशचा माल कमी आणायचा हें घडावें कसें? परदेशचा कच्चा माल स्वदेशांत आणून त्याचा पक्का माल करावा म्हणजे तो सहजच अधिक महाग किंमतीला विकतां येईल ही यावर अगदीं साधी युक्ति होती. यामुळें युरोपांतील सर्व देशांत त्यावेळीं शेतीच्या कच्च्या मालापेक्षां उद्योगधंदे म्हणजे त्यावेळचे हस्तव्यवसाय हे श्रेष्ठ होत असें मत प्रभावी झालें. आणि म्हणून निर्यात होणाऱ्या पक्क्या मालाच्या धंद्यांना देणग्या वगैरे देवून त्यावेळीं उत्तेजन देण्यांत येवूं लागलें. तसेंच आयात होणाऱ्या पक्क्या मालावर जकाती बसवून अथवा कांहीं मालास अजीबात प्रतिबंध करून स्वदेशी मालास होणारी चढाओढ हाणून पाडण्यांत येवूं लागली.

## स्वदेशी धंदे वाढविण्याचे प्रयत्न

विदेशांतून निरनिराळ्या धंद्यांचे कारागीर स्वदेशांत आणून त्यांच्या करवीं नव्या धंद्यांची राज्यकर्ते उभारणी करीत. हे कारागीर खुषीनें, लाचलुचपतीनें अथवा सक्तीनें येण्यास तयार नसत तेव्हां त्यांना पळवून नेण्यांत येई. अशा गुन्ह्यांकडे राज्यकर्ते दुर्लक्ष करीत इतकेंच नव्हे तर १७ व्या शतकांतील प्रसिद्ध फ्रेंच मुत्सद्दी कोल्बर्ट यांसारखे अधिकारी या गुन्हेगारीस उत्तेजन देत. अशा कारागिरांना वागणूक उत्तम मिळे. पण परत स्वदेशीं जाण्यास अनेक प्रकारें अशक्य करून टाकलें जाई. स्वदेशांत असे धंदे वाढले म्हणजे लोकांना रोजगारी अधिक मिळते हेंही मत अर्थशास्त्रज्ञांना पटलें होतें. मॅन्ले हा लेखक १६७७ मध्यें लिहितो, " एक पौंड लोकरीचा पक्का माल करून परदेशांत पाठविला तर ही गोष्ट त्याच्या दुप्पट किंमतीला १० पौंड कच्ची लोकर परदेशांत पाठविण्यापेक्षां अधिक फायदेशीर होय." कारण लोकरीचा पक्का माल स्वदेशांत करण्यानें स्वदेशांतील कारागिरास रोजगार मिळतो. कारागिरांना पुष्टिदायक अन्न मिळावें म्हणून धान्याच्या निपजेचीही काळजी घेतली जाई. इंग्लंडांत धान्याच्या निपजेसाठीं सरकारांतून देणग्या देण्यांत येत. तसेंच स्वदेशाचा माल परदेशांत नेता यावा यासाठीं जहाजें वाढविण्याचीही चढाओढ युरोपांत सुरू झाली. पण अखेर एकादा परराष्ट्राचा धंदा सक्तीनें बुडविल्यावांचून स्वदेशी धंद्यास बरकत येणें अशक्य होई. अशा परिस्थितींत धर्माच्या अथवा कोणत्याही सबबीवर परराष्ट्राशीं युद्धें पुकारलीं जात. आर्च बिशप ऑफ् कँटरबरी हा १६९० सालीं लिहितो, " अलीकडे जगाच्या या आमच्या भागावर जीं युद्धें ओढवलीं आहेत त्यांचीं वरकरणीं सांगितलेलीं कारणें कितीही सुंदर व आध्यात्मिक असोत त्यांचा खरा व अंतिम हेतु सुवर्ण, मोठेपण व ऐहिक वैभव हाच होता." एकंदरीनें, मानवी जीवन निसर्गदत्त नसून कृत्रिम आहे ही गोष्ट युरोपच्या तत्कालीन जीवनांत पावलोपावलीं प्रत्ययास येत होती.

## ' लेसेझ् फेअर '

जीवनांतील या बंदिस्तपणावर युरोपांत सतराव्या व अठराव्या शतकांत तत्त्वज्ञाकडून हल्ले होवूं लागले. मानवी जीवन एकंदरीनें कृत्रिम आहे हें खरें असलें तरी आर्थिक जीवनावर घालण्यांत आलेलीं नियंत्रणें व प्रतिबंध यांचा

अतिरेक होत असून धनोत्पादनकार्यास व व्यापारास त्यांनीं विघ्नें येत आहेत आणि अशा आर्थिक बंधनांनीं युद्धें उद्‌भवून मानवी जीवनाचा व वित्ताचा संहार होत आहे अशा तक्रारी अर्थव्यवस्था–सुधारकांकडून येऊं लागल्या. आर्थिक-व्यवहारांत प्रतिबंध नसावा हें जें नवें तत्त्व विशेष प्रामुख्यानें अठराव्या शतकांत पुढें येवूं लागलें तें ' लेसेझ् फेअर ' ( Laisses-Faire = व्यक्तिस्वातंत्र्य ) या नांवानें इतिहासांत प्रसिद्ध आहे. याच मतपंथास क्लासिकलपंथ असेंही म्हणतात.

## स्मिथची तत्त्वभूमिका

ॲडॅम स्मिथ् हा अठराव्या शतकांतला ब्रिटिश तत्त्वज्ञ या व्यक्ति-स्वातंत्र्यतत्त्वाचा प्रमुख पुरस्कर्ता होय. १७७६ सालीं 'राष्ट्रीय संपत्ति' ( वेल्थ ऑफ नेशन्स ) या नांवाचा ग्रंथ त्यानें लिहिला, त्यांत व्यक्तिस्वातंत्र्यासंबंधाचे महत्त्वाचे सिद्धांत त्यानें मांडले आहेत. आर्थिक क्षेत्रांतील या व्यक्तिस्वातंत्र्य-वादाची स्मिथनें मांडलेली राजकीय तत्त्वभूमिका फार महत्त्वाची आहे. त्याच्या ' थिअरी ऑफ् मॉरल सेंटिमेंट्स् ' ( नैतिक भावनांचा सिद्धांत ) या नांवाच्या दुसऱ्या ग्रंथांत त्यानें हे राजकीय विचार प्रदर्शित केले आहेत. स्मिथच्या मतें अनेक बंधनांनीं जखडलेली व गिचमीड झालेली समाजव्यवस्था मानवसमा-जाच्या आर्थिक व नैतिक उत्कर्षास विघ्न करणारी आहे. मनुष्याच्या नैसर्गिक प्रवृत्तींनीं निर्माण होणारी समाजव्यवस्था हीच मनुष्याच्या गुणांचा यथायोग्य विकास करून त्याच्या ऐहिक उत्कर्षास कारण होतें. सहा हेतूंची प्रेरणा माणसाच्या कोणत्याही स्वेच्छ वर्तनामागें असते असें स्मिथ म्हणतो. (१) स्वतांवरील प्रीति, (२) दुसऱ्याबद्दल वाटणारी सहानुभूति (३) स्वतंत्र होण्याची इच्छा (४) औचित्याची आवड (५) शरीरकष्टाची संवय आणि (६) मालाच्या देवघेवीकडे असणारी माणसाची प्रवृत्ति, हे ते सहा हेतु होत. एवढ्या सहा प्रेरणा कोणाही सामान्य माणसास असतातच. त्यांच्या प्रेरणेनें वागणाऱ्या माणसास आपलें हित काय तें कळत असतें. म्हणून त्यास अमुक कर अथवा अमुक करूं नको असे विधिनिषेध राज्यसंस्थेनें घालूं नयेत. प्रत्येक व्यक्तीस तिच्या तिच्या इच्छेप्रमाणें वागूं दिल्यास ती ती व्यक्ति स्वतांचें हित तर साधीलच, पण त्यामुळें एकंदर समाजाचेंही हित साधेल. प्रत्येक व्यक्ति पृथक्पृथक्पणें आपलें हित साधत असतां त्यापासून सर्व समाजाचें हित आपो-आप कसें साधणार ? जगत्कर्त्यानें मानवसमाज निसर्गतःच असा घडविला असून

स्वतांचा स्वार्थ साधणाऱ्या प्रत्येक व्यक्तीच्या हातून त्या त्या व्यक्तीच्या मनांत नसलेलें समाजकल्याण हें सृष्टिकर्त्याचा 'अदृश्य हात' घडवून आणतो असें ॲडॅमस्मिथचें वरील प्रश्नास उत्तर आहे. राज्यसस्था ॲडॅमस्मिथला मुळींच नको होती असें नव्हे. पण तिनें तटस्थ राहून प्रत्येक व्यक्तीला जास्तींत जास्त आपलें हित साधूं द्यावें म्हणजे निसर्गनियमानेंच एकंदर समाजाचें सुख साधलें जाईल असें त्याचें मत होतें.

## राज्यसंस्थेचीं कर्तव्यें

या निसर्गपद्धतीअनुसार राज्यसंस्थेला तीन प्रकारचीं कर्तव्यें सांगितलेलीं होतीं. (१) परचक्रापासून राष्ट्रसंरक्षण, (२) न्यायाची सक्त अमलबजावणी आणि (३) सार्वजनिक हिताच्या पण खासगी नफा मिळूं न शकल्यानें खासगी व्यक्तीकडून न केल्या जाणाऱ्या सुखसोई. हीं तीन कर्तव्यें पार पाडलीं कीं इतर सर्व बाबतींत राज्यसंस्थेनें तटस्थ राहिलें पाहिजे. 'स्वदेशांत व परदेशांत शांतता, न्याय, शिक्षण तसेंच रस्ते, कालवे, पूल, बंदरें सार्वजनिक हिताचीं साहसें या गोष्टी सरकारनें केल्या कीं, सरकारचें कर्तव्य संपलें. यापलीकडे सृष्टिनिर्मात्याचा 'अदृश्य हात' सर्व कांहीं घडवून आणील.' स्मिथनें आपला व्यक्तिस्वातंत्र्याचा हा राजकीय सिद्धांत समाजाच्या आर्थिक जीवनास पूर्णपणें लागू केला आहे. प्रत्येक व्यक्ति जरी फक्त स्वार्थासाठींच झटत असली तरी ती समाजाचा घटक असल्यानें समाजाचें हित होईल अशा प्रकारेंच प्रत्येक व्यक्तीस आपापल्या स्वार्थाचे उपाय चोखाळावे लागतात. यामुळें निरनिराळ्या व्यक्तींच्या भिन्न भिन्न इतकेंच काय पण, परस्परविरोधी अशा स्वार्थांचाही सामाजिक व्यवहारांत समतोल साधत असतो. स्वार्थ साधता साधता इतरांस साहाय्य करण्याचे प्रसंग व्यक्तिमात्रास येतातच आणि स्वार्थसंपादनासाठींही इतरास साहाय्य करण्याची गरज व्यक्तिमात्रास पडत असते. परोपकार कर म्हटल्यानें कोणीही तो करणार नाहीं. दुसऱ्यास स्वार्थसंपादनासाठीं यत्न करण्यास उत्तेजन देऊन त्याबरोबरच सहानुभूति-गुणास आळवलें तर व्यक्तिमात्र दुसऱ्याच्या हितार्थ झटतील. 'खाटीक दारूवाला अथवा खानावळवाला आपणांस जें अन्न देतो तें परोपकार बुद्धीनें देत नसून स्वतःच्या हितसंपादनासाठींच देत असतो.'

## समाजाचें परस्परावलंबित्व

व्यक्तिस्वार्थ आणि समाजहित यांचा अन्वय घडवून आणण्याचें हें कार्य मुख्यतः विनिमयानें होत असतें. स्वतःच्या स्वार्थासाठीं धनोत्पादन करणारा

मनुष्य स्वतःला उपयोगी असें धन निर्माण करीत नसून समाजसंघटनेअनुसार त्याच्या वांट्यास आलेलें धनोत्पादनाचें कार्य करीत असतो. त्यानें स्वतः उत्पन्न केलेलें धन दुसऱ्या कोणाच्या तरी उपयोगी पडते आणि दुसऱ्या कोणीतरी उत्पन्न केलेलें धन विनिमयद्वारां याला स्वतःच्या उपयोगासाठीं मिळवितां येते. परस्परांसाठीं श्रम करण्याची व्यक्तिमात्राची इच्छा असो अथवा नसो, समाजव्यवस्थेचा घटक या नात्यानें प्रत्येकास इतरासाठीं राबावें लागतें व इतरांच्या राबणुकीचें फल उपभोगावें लागतें. आपल्या आपल्या श्रमाचें फल प्रत्येकाला सर्व समाजाच्या श्रमफलाच्या साठ्यांत आणून टाकावें लागतें आणि इतराच्या कर्तृत्वाचें फल त्यांतून स्वतःच्या उपभोगासाठीं घ्यावें लागतें. व्यापार आणि उद्योगधंदे यांचे जे जगड्व्याळ व किचकट व्यवहार चालतात त्यांच्या बुडाशीं मालांची ऐनजिनसी देवघेव हीच प्रेरकशक्ति असते. ज्याला जेथें जें बनविणें अतिशय सोईस्कर असतें तो तें तेथें बनवितो आणि त्याचा विनिमय करून इतरांपासून आपणाला सोईस्करपणें करता न येणाऱ्या गोष्टी खरेदी करीत असतो. जी वस्तु स्वतःच्या कुटुंबांत बनविण्यापेक्षां खरेदी करणें कमी खर्चाचें असेल, ती वस्तु स्वतःचे घरीं बनवूं नये हा कोणाही कुटुंबनायकाचा सिद्धांत आहे... प्रत्येक कुटुंबाच्या बाबतीत शहाणपणाचें म्हणून गणलें जाणारें हें जें वर्तन तेंच मोठ्या राज्याच्या बाबतीतही तितकेंच शहाणपणाचें असतें.'

## अप्रतिबंध व्यापाराचें तत्त्व

या सामाजिक शहाणपणाच्या तत्त्वाअनुसार आयात मालावर जकाती, व्यापार अथवा धंदे या बाबतची मक्तेदारी, धंद्यांना सरकारी मदत, स्वदेशांत सक्तीनें परठिकाणचे कारागीर आणणें वगैरे सर्व कृत्रिम आर्थिक उपाय राज्यकर्त्यांनीं बंद केले पाहिजेत असें अॅडॅम स्मिथचें म्हणणें आहे. हेंच त्याचें प्रसिद्ध 'अप्रतिबंध व्यापाराचें तत्त्व' होय. स्वदेशांत एकादा माल तयार करण्यापेक्षां तो परदेशांत खरेदी करणें हेंच कमी खर्चाचें ठरेल तर तो परदेशांतून आणणें हेंच व्यक्तीच्या व समाजाच्या हिताचें होय. यामुळें जेथें जे धंदे अधिक किफायतशीरपणें चालतील तेथें तेच धंदे वाढूं लागून एकंदर धंद्याची भरभराट चांगल्या प्रकारें होवूं शकेल. सरंजामशाही समाजव्यवस्थेनें जे कृत्रिम उच्चनीच भाव उत्पन्न केले होते त्यास स्मिथचा विरोध होता. त्यांतच आर्थिक निर्बंधांनीं भर घालून हा उच्चनीच भाव अधिकच असह्य केला होता. समाजव्यवस्था पूर्ण

व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारली गेली आणि आर्थिक निर्बंध नाहींसे झाले म्हणजे उच्चनीच भाव नाहींसा होऊन व्यक्तींचा सांस्कृतिक विकास व समाजाचें आर्थिक वैभव वाढेल असें स्मिथ म्हणतो. धंद्यावरील सर्व निर्बंध काढल्यानंतर व मक्तेदारी नष्ट केल्यानंतर धंदेवाले हक्कदारी निर्माण करण्याचा प्रयत्न करतात व पुन्हां विषमता उत्पन्न होते खरी, पण त्यासाठीं सुद्धां त्यांना राज्यकर्त्यांचा आश्रय मिळवावा लागतो. ईस्ट इंडिया कंपनीस एलिझाबेथ राणीनें मक्तेदारी दिली नसती तर ती इतर धंदेवाल्यांपेक्षां एकदम फार बलाढ्य झाली नसती व इतर धंदेवाल्यांची तिच्यापुढें कुचंबणा झाली नसती. सरकारनें पूर्ण तटस्थ राहून चढाओढीचें तत्त्व पूर्णपणें अमलांत राहूं दिल्यास विषमता असेल ती मोडेल व नवीन निर्माण होणार नाहीं हा, स्मिथच्या मतें, निसर्गनियमच आहे.

## फिजिओक्रॅट् पंथ

धन कशापासून निर्माण होतें, धनाचें मूळ उगमस्थान कोणतें याची चर्चा स्मिथच्या पूर्वी दोनशें वर्षांपासून अर्थशास्त्रज्ञांनीं केली होती. सोनें-चांदी हाच खराखुरा धनप्रकार होय हें 'मर्कंटाइल' पंथाचें मत मागें सांगितलें आहेच. या पंथाच्या तत्त्वज्ञांना अर्थातच विदेशी व्यापारापासून धन प्राप्त होतें असें वाटे. मर्कंटाईलपंथानंतर फ्रान्समध्यें 'फिजिओक्रॅट्स' नामक जे मतपंथी निघाले त्यांनीं शेतीचें धन हेंच श्रेष्ठ धन आहे असें मत प्रतिपादिलें आणि शेतीचे श्रम हे खरे 'धनो'त्पादक श्रम होत असें मानिलें. यांतील धन हा शब्द फिजिओक्रॅट्पंथाचे तत्त्वज्ञ विशेष अर्थानें वापरीत. शेतींत होणारें धन हें श्रम करणारा शेतकरी आणि घरीं बसून खाणारा जमिनीचा मालक या दोघांचेंही पोषण करून शिवाय 'अधिक उरतें' व हेंच 'निवळ उत्पन्न' ( नेट प्रॉडक्ट ) होय. शेतीखेरीज, फिजिओक्रॅट्सच्या मतें, इतर कोणत्याही धंद्यांत हें 'निवळ उत्पन्न' मिळूं शकत नाहीं. सुतार, लोहार, चांभार, कोष्टी हे सर्वजण आपापल्या मालांत जे श्रम ओततात तेवढीच त्या मालाची किंमत वाढते. त्या मालांत 'निवळ उत्पन्न' म्हणून श्रममूल्याहून अधिक कांहीं निर्माण होत नाहीं. शेतीच्या श्रमापासूनच श्रममूल्याहून अधिक असें मूल्य निर्माण होतें. अॅडम स्मिथला शेतीचे श्रम व इतर श्रम यांमध्यें फिजिओक्रॅट्स यांनीं केलेला भेद मान्य नाहीं. मर्कंटाइलपंथानें व्यापार हेंच धनप्राप्तीचें साधन आहे असें म्हटलें तें चूक असून फिजिओक्रॅट्पंथानें उत्पादक श्रमास धनोत्पादनाचें उगमस्थान

मानलें ही स्मिथच्या मतें फार मोठी प्रगति होय. पण केवळ शेतीचे श्रम हेच तेवढे धनोत्पादक न मानतां व शेतीचें धन हेंच तेवढे धन न मानता सर्व उपयुक्त वस्तु या धनच आहेत हें लक्षांत घेऊन सर्व उपयुक्त वस्तु निर्माण करण्यासाठीं केले जाणारे श्रम हे धनोत्पादक श्रमच आहेत असें मत स्मिथनें प्रतिपादिलें. हाच ' मूल्य हें श्रमापासून निर्माण होतें ' हा स्मिथचा महत्त्वाचा सिद्धांत होय.

## श्रमविभागाचें उदाहरण

धनाची जी वाढ व्हावयाची ती दोन गोष्टींवर अवलंबून असते. (१) श्रमाची उत्पादनशक्ति किती आहे आणि (२) धनाच्या उत्पादनाचे कामीं देशांतील माणसांचे किती श्रम खर्ची पडतात, यांवरून त्या देशाचें धन किती वाढणार हें ठरूं शकतें. श्रमाची उत्पादनशक्ति वाढविण्याचा प्रमुख उपाय श्रमविभागपद्धति हा होय. श्रमविभागपद्धतीनें माणसाचें उत्पादनसामर्थ्य कसें वाढतें हें दाखविण्यासाठीं स्मिथनें टांचण्याच्या धंद्याचें उदाहरण दिलें आहे. लोखंडाचा तुकडा हातांत घेऊन त्यापासून टाचणी तयार होईपर्यंत ज्या अनेक प्रक्रिया कराव्या लागतात त्या सर्व एकाच माणसानें करायच्या म्हटलें तर त्या माणसाला एका दिवसांत बहुधा एक टाचणीही करतां येणार नाहीं आणि वीस टाचण्या करणें तर पूर्णपणेच अशक्य आहे. पण टाचण्यांच्या धंद्यांत एकच माणूस सर्व प्रक्रिया कोठेंही करीत नाहीं. टाचण्यांच्या एका कारखान्यांत एक माणूस तार काढतो, दुसरा ती तार ताणून बारीक बारीक करीत नेतो, तिसरा एकजण ती तार तोडतो, चौथा तारेच्या तुकड्याला टोक करतो, पांचवा दुसरें टोक घासून त्यास डोकें आणतो; हें डोकें आणण्याच्या दोन तीन भिन्न भिन्न प्रक्रिया असतात, तितकीं वेगळालीं माणसें त्यास लागतात. टाचण्यांना पांढरी चकाकी देणें हेंही एक स्वतंत्र काम असतें. टाचण्या कागदास नीट ओळीनें टोचून त्या कागदाच्या पड्या दुकानांत ठेवण्यसाठीं तयार करणें हा तर एक स्वतंत्र धंदाच आहे. अशा प्रकारें जवळ जवळ अठरा निरनिराळ्या प्रक्रियांतून टाचण्या तयार होतात आणि यांतल्या दोन अथवा तीन प्रक्रिया कांहीं ठिकाणीं एकेका माणसाकडून करून घेता येत असल्या तरी एकंदर सर्व प्रक्रियांस मिळून सुमारें दहा माणसें श्रमविभागतत्त्वानुसार लावावीं लागतात. हीं सर्व माणसें मिळून दरदिवशीं सुमारें १२ पौंड टाचण्या तयार करतात. मध्यम आकाराच्या

सुमारें चार हजाराहून अधिक टाचण्या एका पौंडांत भरतात. म्हणजे एकेकटा माणूस जेथें वीस टाचण्याही करूं शकणार नाहीं तेथें श्रमविभाग तत्त्वांनुसार दहा माणसें टाचण्या करूं लागलीं म्हणजे दररोज दर-माणशीं सुमारें आठशें टाचण्या होवूं शकतात. श्रमविभागपद्धति हा खरोखर व्यक्तीचें श्रमसामर्थ्य वाढविणारा एक चमत्कारच आहे असें म्हणता येईल. मूल्य हें श्रमापासून निर्माण होत असून श्रमविभागपद्धतीनें मूल्य निर्माण करण्याची माणसाची शक्ति अधिकाधिक वाढत जाते.

## मूल्याचे दोन प्रकार

मूल्याचें उपयोगमूल्य ( यूसव्हॅल्यू ) व विनिमयमूल्य ( एक्स्चेंजव्हॅल्यू ) असे दोन भाग ॲडम स्मिथनें केले आहेत. मूल्य शब्दानें ॲडम स्मिथला काय अभिप्रेत आहे हें त्याने दिलेल्या उदाहरणावरून लक्षांत येते. तो म्हणतो, पाण्यासारख्या ज्या अत्युपयोगी वस्तु आहेत त्यांना विनिमयमूल्य म्हणून जवळ जवळ कांहींच किंमत नाहीं. उलट हिरे फारसे उपयोगी नव्हेत म्हणजे उपयोग-मूल्य त्यांना जवळ जवळ मुळींच नाहीं. पण त्यांचें विनिमयमूल्य फार मोठें असतें. यावरून श्रमापासून मूल्य निर्माण होतें असें म्हणतांना विनिमयमूल्य श्रमापासून निर्माण होतें असें ॲडम स्मिथला म्हणायचें होतें हें उघड दिसतें. पण मूल्य हें श्रमापासून निर्माण होतें हा सिद्धांत स्मिथनें पहिल्यापहिल्यानें जोरदारपणें मांडला. तथापि त्यानें तो पुढेंपुढें मर्यादित केला आहे.

मूल्य जर केवळ श्रमापासूनच निघतें तर मजुराला त्यानें केलेल्या श्रमाचा रोजगार दिल्यानंतर जें मूल्य शिल्लक राहतें व भांडवलदाराला नफा म्हणून मिळतें तें कशापासून उत्पन्न होतें हें कोडें स्मिथला सुटेना. तेव्हां त्यानें 'श्रमा-पासून मूल्य निर्माण होते' हा सिद्धांत मानवसमाजाच्या अगदीं प्राथमिक अवस्थेंत जेव्हां भांडवल मुळींच नव्हतें व मनुष्य हा केवळ शिकारी होता त्यावेळेपुरताच मर्यादित केला. पुढें खानगी माणसांच्या हातीं धनसंचय आल्यावर त्यांनीं 'उद्योगी माणसांना जीवनसाधनें आणि धनोत्पादनसाहित्य देऊन विक्रीसाठीं व नफ्यासाठीं' माल निर्माण करण्यास सुरवात केली. तेव्हां मूल्य हे श्रम, जमीन व भांडवल या तिहींपासूनही निर्माण होवूं लागलें. म्हणून उत्पादनक्रियेंत निर्माण झालेल्या मूल्यांतून मजुरांची मजुरी, भांडवलदाराचा नफा आणि जमीनमालकाचा खंड असे तिन्ही वाटे भागले पाहिजेत असें स्मिथनें सांगितलें आहे.

## डेव्हिड रिकार्डो

अर्थशास्त्रज्ञांच्या या क्लासिकल पंथांतील ॲडम स्मिथनंतरचा प्रमुख तत्त्वज्ञ डेव्हिड रिकार्डो (१७७२-१८२३) हा होय. 'श्रमापासून मूल्य निर्माण होतें' या स्मिथच्या सिद्धांताचें रिकार्डोनें आणखी खोल संशोधन केलें. 'श्रमापासून मूल्य निर्माण होतें' हा सिद्धांत स्मिथ म्हणतो त्याप्रमाणें फक्त प्राचीन प्राथमिक समाजापुरताच खरा आहे असें रिकार्डो मानीत नाहीं तर तत्कालीन भांडवलशाही समाजासही तो लागू करतो. मूल्य हें मजुराच्या श्रमापासून निर्माण होतें त्याप्रमाणें मजूर जीं हत्यारें, कच्चा माल, इमारती वगैरे श्रमसाहित्य वापरतो तेंही मूल्यनिर्मितींत भागीदार आहे हें रिकार्डोला मान्य आहे. हें जें श्रमसाहित्य तेंही पूर्वी केलेल्या श्रमाचेंच फल असल्यानें आधुनिक समाजांतही 'श्रमानें मूल्य निर्माण होतें' हा सिद्धांत खराच आहे असें रिकार्डो सांगतो. अर्थात् भांडवलरूपी साहित्य भांडवलदाराच्या श्रमाचें फल असल्यानें भांडवलदाराचा नफा मिळणें हें रिकार्डोच्या मतानें रास्तच होय. 'श्रमानें मूल्य निर्माण होतें' हें सांगण्यांत ॲडम स्मिथचा विशेष हेतु होता. आर्थिक जीवनांत सरकारनें जीं शेकडों बंधनें घातलीं होतीं, हक्कदाऱ्या निर्माण झाल्या होत्या त्यामुळें व्यापाराचें म्हणजे खरेदीविक्रीचें क्षेत्र संकुचित झालें होतें आणि अर्थात् धनोत्पादक श्रम करण्यास व्यक्तिमात्रास मुळींच उत्तेजन न राहिल्यानें जनता दरिद्री होई; पण उलट आर्थिक नियंत्रणांच्या उलाढालीसाठीं पैसा पुष्कळ लागे त्यामुळें गरीब प्रजेवर करवाढ फार होई आणि प्रजेचा असंतोष देशाबाहेर ढकलून लूटमारीनें पैसा आणण्यासाठीं राज्यकर्ते युद्धें माजवीत. अशा प्रकारें आर्थिक बंधनांनीं दारिद्र्य व कलह यांचेंच पीक वाढून आर्थिक नियंत्रणवाल्या फुकटखाऊ अधिकाऱ्यांचीच गर्दी चोहोकडे झाली होती.

## जमीनमालक हा फुकटखाऊ

हा सर्व उपद्रवी उकिरडा उध्वस्त करण्यास 'धन हें सरकारच्या नियंत्रणामुळें उत्पन्न न होतां नफा मिळविण्याच्या प्रेरणेनें केलेल्या श्रमामुळें होतें आणि बाजारावर नियंत्रण घालण्यापेक्षां सगळे बाजार खुले केले तर श्रमविभागाचा अवलंब करून माणसें आपल्या श्रमानें अफाट संपत्ति निर्माण करतील' हें तत्त्व प्रस्थापित करणें ॲडम स्मिथला साधायचें होतें. स्मिथचें हें

मत पुढें चालवून रिकार्डोनें जमीनमालकांना केवळ सरकारी कायद्यामुळें द्याव्या लागणाऱ्या खंडास अनैतिक ठरविण्याचे कामीं या मूल्यसिद्धांताचा उपयोग केला. रिकार्डोच्या मतें मूल्य हें श्रमजन्य असून जमीन ही निसर्गदत्त आहे. यामुळें जमीनमालकांना वास्तविक खंड मिळूंच नये. पण खंड मिळतो तो विशिष्ट कारणांनीं मिळतो. कांहीं जमिनी कमी सुपीक तर कांहीं अधिक सुपीक असा फरक असतो. अगदीं कमी सुपीक म्हणजे शेतकऱ्याला त्याच्या कष्टाचें जेमतेम फळ देणाऱ्या जमिनीवर मुळींच खंड असत नाहीं. पण त्याहून थोड्या अधिक सुपीक जमिनीवरील शेतकऱ्याला अगदीं कनिष्ठ जमिनीवरील शेतकऱ्याला मिळणाऱ्या उत्पन्नाइतक्या उत्पन्नाहून जें अधिक मिळेल तें जमीन–मालकास जातें. जमीन ही अमर्याद नसून मर्यादित असते आणि तिच्या सुपीकपणांत कमीअधिकपणा असतो. शेतकऱ्यांना कष्टाला जमीन हवी असल्यानें त्यांचेमध्यें साहाजिकच जमीन मिळविण्यास चढाओढ लागते आणि सगळ्यांत कमी मगदुराच्या जमिनीचें जें उत्पन्न असेल तेवढेंच सगळ्या शेतकऱ्यांना मिळून अधिक मगदुराच्या जमिनींतून अधिक उत्पन्न येईल तें खंडरूपानें मालकाला देण्याच्या करारावरच शेतकऱ्याला जमीन मिळवावी लागते. खंड ही जमिनीच्या निसर्गदत्त मगदुराची देणगी आहे, ती जमीनमालक फुकट खातो असें रिकार्डो सुचवीत होता.

## मजुरीचा पोलादी सिद्धांत

'मूल्य श्रमानें निर्माण होतें' असें म्हणून रिकार्डोनें श्रमाचें खूप महत्त्व गायिलें असलें तरी मजूरवर्गाविषयी रिकार्डोची विचारसरणी फारशी चांगली नव्हती. मजुरांची मजूरी त्यांना चरितार्थास कमींत कमी हवी तेवढीच मिळूं शकेल असें त्याचें मत असून याला 'मजुरीचा पोलादी सिद्धांत' (आयर्न लॉ ऑफ् वेजिस्) असें अर्थशास्त्राच्या इतिहासांत नांव आहे. प्रथम टर्गो या फ्रेंच मुत्सद्दी–अर्थज्ञानें हा पोलादी सिद्धांत १७६६ त पुढीलप्रमाणें मांडला होता. "आपले हात आणि उद्योग यांवरच चरितार्थासाटीं अवलंबून राहणारा जो सामान्य मजूर त्याला स्वतांच्या पोटासाठीं आपले श्रम विकावेच लागतात. त्याला त्या श्रमाबद्दल मजूरी किती मिळायची हें त्याच्याशीं त्याचा मालक जो करार करील त्यावर अवलंबून असते. मालकाकडे अनेक मजूर नोकरी मागण्यास येत असल्यानें जो जास्तींत जास्त स्वस्त असेल त्यालाच मालक नोकरीवर नेमतो.

म्हणून मजुरांना परस्पर चढाओढींत आपापली किंमत कमी कमी करावी लागते. आणि म्हणून निरनिराळ्या प्रकारच्या मजुरांना चरितार्थ भागविण्यास पुरेल इतकीच मजूरी मिळते." टर्गोच्या या सिद्धांतास पाठिंबा देऊन रिकार्डोनें त्यांत महत्त्वाची भरही घातली. रिकार्डो सांगतो, " मजुरांच्या श्रमाची एक नैसर्गिक किंमत आहे. स्वतांच्या आणि कुटुंबाच्या पोषणासाठीं अन्न, सुखसोई व इतर जीवनावश्यक गोष्टी ज्या लागतात त्यांची किंमत वाढली कीं मजुरांच्या श्रमाची किंमत म्हणजे मजुरी वाढते आणि यांची किंमत कमी झाली कीं मजुरी उतरते." पण केव्हां केव्हां मजुरांना जगण्याला आवश्यक असेल त्याहून अधिक मजुरी मिळते व कित्येक वेळीं त्यांना मिळणारी मजुरी जीवनासाठीं पुरी पडण्याइतकी असतही नाहीं हें कसें ! रिकार्डो सांगतो, " मजुरीचा बाजारभाव आणि नैसर्गिक किंमत यांत फरक असूं शकतो. मजुरांचा पुरवठा मागणीहून अधिक असला तर मजुरीचा भाव नैसर्गिक किंमतीखालीं उतरतो. आणि पुरवठा मागणीहून कमी असला तर नैसर्गिक किंमतीहून मजुरीचा भाव वर जातो. पण मजुरीच्या बाजारभावांत असा चढउतार होत असला तरी सामान्यतः नैसर्गिक किंमतीच्या फार वर अथवा फार खालीं हा मजुरीचा भाव जाऊं शकत नाहीं."

हाच सिद्धांत माल्थस् या आकडेशास्त्रज्ञाच्या लोकसंख्येच्या सिद्धांताशीं जोडून रिकार्डोनें अधिक विशद करण्याचा प्रयत्न केला आहे. रिकार्डो म्हणतो " मजुरांचा पुरवठा मागणीपेक्षां कमी असला म्हणजे मजुरीचा बाजारभाव वाढतो. पण त्यामुळें चरितार्थसंपत्ति मजुरांना गरजेहून अधिक मिळूं लागते व त्याबरोबरच मजुरांचीं कुटुंबें मोठीं मोठीं होवूं लागतात. अर्थात् थोड्याच काळांत मजुरांचा पुरवठा मागणीहून अधिक होऊं लागतो यामुळें मजुरीचा बाजारभाव पुन्हा उतरूं लागतो आणि अर्थात् पुन्हा मजुरांचीं कुटुंबें लहान लहान होवूं लागतात."

## माल्थसचा लोकसंख्यासिद्धांत

थॉमस माल्थस या आकडेशास्त्रज्ञाचा क्लासिकल पंथांत समावेश करण्याचा प्रघात आहे. क्लासिकल पंथाच्या मूलतत्त्वाशीं माल्थसचा तीव्र मतभेद होता. राज्यसंस्थेनें मानवी व्यवहारांत हस्तक्षेप केल्यामुळें माणसांवर संकटें येतात हें क्लासिकल पंथाचें मत त्यास मान्य नसून माणसाचीं दुःखें लोकसंख्यावाढीमुळें

त्याजवर कोसळतात असें मत त्यानें प्रतिपादिलें आहे. माणसाच्या दारिद्र्यदुःखाचें कारण त्याच्या चरितार्थासाठीं अवश्य असें जें धन त्यापेक्षां माणसाची लोकसंख्या अधिक वाढतें हें होय. चरितार्थधनाची वाढ १, २, ३, ४, अशा गणिती क्रमानें होत असते तर लोकसंख्येची वाढ १, २, ४, ८, १६ अशी भूमिति-क्रमानें होत असते. अर्थात् हे आंकडे पक्क्या हिशेबाचे नव्हेत! चरितार्थ-धनापेक्षां लोकसंख्या अधिक वेगानें वाढते एवढें सुचविणें एवढाच या आकड्यांचा हेतु आहे. पण अशी लोकसंख्या वाढत गेली तरी चरितार्थधनावांचून ती जगणार कशी? अर्थात् ती उपासमारीनें मरते व तेंच स्वाभाविक आहे. पण प्रत्यक्ष उपासमारीनें मरण्यापूर्वीच व्यसनें, रोगराई, महापूर, धरणीकंप, वगैरे सर्व प्रकारच्या दैवी संकटांनाही लोकसंख्या बळी पडत असते. यामुळें, माल्थसच्या मतें, जनतेवरील दुःखांचें कारण राज्यसंस्था हें नसून निसर्ग हाच मानवाचा शत्रु आहे. तसेंच धंदेवाल्यांना मिळणारा कमी अधिक नफा हा मजुरांच्या संकटाचें खरें कारण नसून त्यांचें अमर्याद प्रजोत्पादन हेंच त्यांजवर दुःख ओढवून आणतें. मजुरांना जर दुःखें नको असतील तर त्यांनीं प्रजो-त्पादनाचे कामीं नैतिक संयम पाळला पाहिजे असें माल्थसचें म्हणणें आहे.

## विनिमयानें आपोआप होणारा समतोल

रिकार्डोच्या दुसऱ्या एकदोन सिद्धांतासंबंधानेंही माल्थसचा तीव्र मतभेद आहे. फुकटखाऊ असे जे जमीनमालक त्यांचें जिणें अनैतिक आहे असें रिकार्डो म्हणतो असें मागें सांगितलेंच आहे. बाकीचे सर्व वर्ग परस्परावलंबी व परस्परसेवक असतात. 'व्यापारांत गिऱ्हाईक आणि विक्रेता हे जे दोन वर्ग समोरासमोर देवघेवीस येत असतात त्या दोघांचाही देवघेवीनंतर कांहींतरी फायदा होत असतो. पण जमीनमालक आणि जनता यांचे दरम्यान असें घडत नाहीं. यांत एका पक्षाचा नफा तो दुसऱ्या पक्षाचा तोटा असतो.' जमीनमालकाखेरीज सर्व वर्ग श्रमजीवी असतात आणि विनिमयव्यवहारांत एकमेकांच्या श्रमफलाची देवघेव करतातच असा रिकार्डोचा आशय आहे. आजच्या जगांत मालाचे ढिगाचे ढीग न खपता पडून राहिल्यानें समाजावर संकट ओढवत आहे हें आपण पाहतो. पण समाजांत फुकटखाऊ असा जमिनमालकवर्ग नसेल तर असे अत्युत्पादनाचें संकट उद्भवण्याचें मुळींच कारण नाहीं असें रिकार्डोचें मत आहे. तो सांगतो "कोणीही माणूस धन जें निर्माण करतो तें उपभोगासाठीं

अथवा विनिमयासाठींच निर्माण करतो. आपला माल विकतांना तो दुसऱ्याकडून स्वतांच्या चालू अथवा भावी उपभोगाची वस्तु खरेदी करतो. म्हणून धनाचा उत्पादक असणारा प्रत्येक माणूस एक तर स्वतांच्या धनाचा उपभोक्ता तरी असतो अथवा दुसऱ्या एकाद्या माणसाच्या मालाचा खरेदीदार व उपभोक्ता असतो.' म्हणून सर्व व्यक्तींच्या मागण्या व त्यांनीं केलेला मालाचा पुरवठा यांचा जर समतोल होतो, तर अर्थात् समाजांतील एकंदर मालाच्या मागणीचा व पुरवठ्याचा समतोलही झालाच पाहिजे. पण एकाद्या व्यक्तीच्या बाबतींत पुरवठाच जास्त झाला, समजा, मागणी कायम असता त्याचें कापड मात्र जास्त झालें, तर? तशा परिस्थितींत दुसऱ्या कोठल्या तरी मालाचा पुरवठा मागणीहून कमी आहे असें त्यामुळें सिद्ध होतें. कारण जें फालतू कापड निर्माण झालें तें दुसऱ्या कोठल्या तरी धंद्यांतलें भांडवल कमी करून कापडधंद्यांत घातलें गेलें म्हणून निर्माण झालेलें असतें.' अर्थात् कापडाचें अत्युत्पादन हें अल्पकालीनच रहाणार. त्या धंद्यांतील भांडवल लवकरच कमी होऊन इतर कमी पुरवठा असणाऱ्या मालाच्या धंद्यांत जाईल व पुन्हा ताजवा उलट दिशेनें झुकूं लागेल.

## फुकटखाऊ वर्गाचें समर्थन

गिऱ्हाईक आणि विक्रेता यांचें दरम्यान देवघेवीचा समतोल होतो हा सिद्धांत भांडवलदार आणि मजूर यांचे दरम्यानच्या देवघेवींत खरा ठरत नाहीं असें माल्थसचें म्हणणें आहे. कारण मजुरांना मजुरी जी मिळते ती कोणत्याही परिस्थितींत जेमतेम जगण्यापुरतीच मिळणार हें रिकार्डोला मान्यच आहे. पण मजुराकडून मालकाला जें श्रमफल मिळतें तें मात्र या मजुरीच्या कितीतरी पट अधिक असतें. मजूर हे आपणाला मिळालेली मजुरी घेऊन माल खरेदीसाठीं बाजारांत गेले म्हणजे त्या मजुरीइतकाच माल खरेदी करतात. पण त्यांच्या मजुरीहून कितीतरी पट अधिक असा माल मालकांनीं बाजारांत आणून रचलेला असतो, तो सगळा मजूराकडून खरेदी केला जाऊं न शकल्यानें गिऱ्हाईक नाहीं म्हणून तो बाजारांत तुंबून राहणें अपरिहार्य आहे. म्हणजे जमीनमालक हा फुकटखाऊवर्ग वगळल्यास बाकीच्या समाजांत देवघेव ही परस्परसमान असते हा रिकार्डोचा सिद्धांत चुकीचा असून त्यामुळेंच बाजारांत माल तुंबून राहणेंही अपरिहार्य ठरतें. माल तुंबून राहिला म्हणजे धंदेवाल्यांचा नफा कमी होणार. आणि अर्थात् उत्पादनकार्य खंडित होणार. म्हणून तुंबून राहिलेला माल खरेदी

करण्यासाठीं जमीनमालकासारखा फुकटखाऊवर्ग समाजांत असणें अवश्य आहे असें माल्थस सांगतो. जमीन–मालकांचें फुकटखाऊ जिणें अनैतिक आहे हें रिकार्डोचें म्हणणें आपण अशा प्रकारें खोडून काढलें असें माल्थसचें मत आहे.

## तीन तत्त्वज्ञांतील बारीक फरक

ॲडॅम स्मिथ, रिकार्डो व माल्थस हे अर्थशास्त्रांतील क्लासिकल पंथाचे प्रतिनिधि गणले जातात. अर्थात् त्यांच्या प्रतिपादनांत सूक्ष्म असा मतभेद आहेच. ॲडॅम स्मिथचा कटाक्ष मुख्यतः कोणत्याही प्रकारच्या सरकारी नियंत्रणाविरुद्ध होता. पावलोपावलीं सरकारी नियंत्रणांनीं माणसांचें आर्थिक जीवन जखडलेलें होतें, तें आर्थिक उन्नतीस अवश्य आहे अशी जी समजूत होती ती खोडून काढून त्यानें धनाचें उत्पादन मुख्यतः मानवी श्रमानें होतें असें मत मांडलें. स्वतःच्या श्रमानें उत्पन्न केलेल्या धनावर ते श्रम करणाऱ्याची मालकी आहे असें सरकारनें मान्य केलें म्हणजे श्रम करून धनोत्पादन करण्यास उत्तेजन राहतें या लॉक या तत्त्वज्ञाच्या मताचा स्मिथनें पुरस्कार केला. शेतकऱ्याच्या श्रमानें उत्पन्न झालेल्या धनावर सरंजामदार फुकटचा हक्क सांगत, त्याविरुद्ध या मताचा रोख होता. स्मिथच्या या प्रतिपादनामुळें मानवी श्रमाला धनोत्पादनाच्या कार्यात मानाचें स्थान मिळून धनोत्पादकाच्या मालकी हक्काला समाजाच्या दृष्टीनें मोठें पवित्र स्थान प्राप्त झालें. तसेंच मालाच्या निर्यातीस प्रतिबंध न ठेवता राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय बाजार खुले करण्यानें मालाच्या उत्पादनासाठीं श्रम करण्यास व धनवान होण्याच्या खटाटोपास भरपूर वाव मिळणें शक्य झालें. व्यक्तीचें धनोत्पादनसामर्थ्य वाढण्यास श्रमविभाग पद्धतीचा अवलंब हें साधन महत्त्वाचें आहे या गोष्टीकडे प्रथम स्मिथनेंच जनतेचें लक्ष वेधलें. तथापि 'श्रम हेच मूल्याचे उत्पादक होत' हें मत त्यानें पूर्णपणें तार्किक कसोटीवर न घासता जमिनदारांना खंड देणें न्याय्य कीं अन्याय्य या प्रश्नावर स्मिथनें मूग गिळले आणि प्राचीन समाजांत मूल्य श्रमानेंच निर्माण होत असलें तरी आधुनिक समाजांत संचित धन म्हणजे भांडवल हेंही मूल्याचें उगमस्थान आहे असें सांगून भांडवलदारास पळवाट काढून दिली. रिकार्डोनें 'श्रम हेच मूल्याचे उत्पादक' हा सिद्धांत आधुनिक समाजासही लागू आहे असें कबूल करून जमिनमालकवर्ग हा स्वतः श्रम करीत नाहीं, जमिनींत धन उत्पन्न होतें तें शेतकऱ्याचे श्रम व निसर्ग यांच्या संयोगानें होतें, जमीन–मालक

वर्ग हा केवळ बांडगुळासारखा असून तो लाटतो तो खंड फुकटखाऊपणानें लाटतो हा सिद्धांत रिकार्डोनें ठाशीवपणें मांडला. पण भांडवलदारवर्गही श्रम न करतां नफा लाटूं लागला होता. त्याविरुद्ध रिकार्डोला आपली लेखणी उचलविली नाहीं. माल्थसनें तर फुकटखाऊ जमीन–मालकांचा वर्ग बाजारांत शिल्लक पडून राहिलेल्या धनाचें हक्काचें गिऱ्हाईक असतो या नात्यानें समाजावर येणाऱ्या आर्थिक अनर्थास निवारण्यासाठीं तो आवश्यक असा वर्गच आहे असें सांगितलें.

## आधिभौतिक दृष्टिकोन

या तीन क्लासिकल शास्त्रज्ञांत जे हे व इतर सूक्ष्म मतभेद होते त्यापेक्षां त्यांचें मतैक्य असलेल्या बाबी महत्त्वाच्या होत्या. सोळाव्या शतकापासून युरोपांत धर्मसुधारणेची जी लाट उसळली तीमुळें धर्माज्ञा व धार्मिक समजुती यांचें लोकमतावरचें प्राबल्य कमी होऊन आधिभौतिक दृष्टिकोणाचें प्राबल्य माजलें. जो तो भौतिक दृष्टीनें जगाकडे पाहूं लागला. झाडावरून फळ सुटलें तर तें गुरुत्वाकर्षणाच्या नियमानुसार खालींच पडलें पाहिजे हा सिद्धांत न्यूटननें शोधून काढून ग्रहमालेसंबंधीं महत्त्वाचे नियम शोधून काढले. न्यूटनच्या पूर्वी कोपर्निकसनें पृथ्वी ही सूर्याभोंवतीं फिरते असें ठरविलें होतें. गॅलिलिओनें कोपर्निकसच्या या सिद्धांताचें विशेष संशोधन केलें आणि वस्तुमात्राच्या गती-संबंधानें कांहीं महत्त्वाचे सिद्धांत बांधले. या शास्त्रज्ञांना तत्कालीन धर्मगुरूं-कडून पुष्कळच त्रास सोसावा लागला. सूर्य हा पृथ्वीपेक्षां मोठा असून पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरते हा सिद्धांत खरा मानल्यास ख्रिस्तीधर्म व पोप यांचें महत्त्व कमी होतें म्हणून गॅलिलिओकडून या सिद्धांताविरुद्ध जबाब लिहून घेऊन तो प्रसिद्ध करण्याचा धर्मगुरूंनीं निश्चय केला. त्याप्रमाणें 'पृथ्वी सूर्याभोंवतीं फिरत नाहीं ती स्थिर आहे असें विधान करावें, नाहींतर त्यास कडक शासन करण्यांत येईल' असें गॅलिलिओस फर्मावण्यांत आलें. तेव्हां शेंदरी वस्त्रें परिधान केलेल्या दहा धर्मगुरूंपुढें गुडघे टेकून व मान लववून 'पृथ्वी फिरते असें नाहीं' हें वाक्य त्यानें पुन्हा पुन्हा धर्मगुरूला ऐकूं जाईल असें मोठ्यानें उच्चारलें. धर्मगुरूचें समाधान झाल्यावर मान वर करून गॅलिलिओ उभा राहिला आणि उभा राहता राहता 'मी प्रतिज्ञेवर कांहींही सांगितलें तरी पण पृथ्वी फिरतेंच आहे.' (It moves nevertheless) असें वाक्य तो स्वतांशी पुटपुटला अशी एक दंतकथा आहे अधिभौतिक दृष्टिकोण म्हणजे काय तें या कथेंत फार बोधप्रदपणें

सांगितलें आहे. सृष्टि ही कांहीं निश्चित गुणधर्मांनीं निर्बद्ध आहे. या गुणधर्मांकडे डोळेझांक करून मनुष्य वाटेल तसें वागूं म्हणेल तर त्यांत त्यास यश येणार नाहीं आणि माणसानें डोळे झांकले म्हणून सृष्टीचे गुणधर्म आपलें कार्य थांबवणार नाहींत. कॅन्यूट राजाच्या खुषमस्कऱ्यांनीं 'महाराज, आपली शक्ति अमर्याद आहे' अशी त्याची खुशामत केली. राजा शहाणा होता. तो खुशामतीनें हुरळला नाहीं. समुद्राच्या भरतीचें वेळीं तो समुद्रतीरावर खुर्ची टाकून बसला व 'माझे पाय भिजवूं नको' असें त्यानें समुद्राला फर्माविलें. पण भरतीच्या समुद्राला राजाची आज्ञा न समजून समुद्राच्या लाटांनीं राजाच्या पायावर उडी घेतलीच. निसर्गगुणधर्मांपुढें राजाचा हुकुम हा कःपदार्थ आहे हाच याही कथेचा अर्थ होता.

## मानवी जीवनांतही भौतिक दृष्टि

या निसर्गगुणांचा अभ्यास केला पाहिजे आणि मानवी जीवन सुखी करण्यासाठीं पदार्थांचे प्रत्यक्ष प्रयोग करून व त्यांचे गुणधर्म समजून घेऊन मानवी जीवन सुखी केलें पाहिजे असें फ्रॅन्सिस बेकन या तत्त्वज्ञानें शिकविलें होतें. ॲडम् स्मिथनें हा भौतिक दृष्टिकोण राजकीय व धार्मिक जीवनांत आणला पाहिजे असा आग्रह धरला. कॅन्यूट राजानें समुद्राला मागें हट म्हटल्यानें जसा समुद्र मागें हटत नाहीं त्याप्रमाणें राजा हा आपल्या हुकुमांनीं, कायद्यांनीं, बंधनांनीं, परवान्यांनीं धन वाढवूं शकत नाहीं असें स्मिथचें म्हणणें होतें. जड-सृष्टिव्यवहार जसे विशिष्ट गुणधर्मांनींच होणार अगदीं तसेंच जडधर्मांनीं मानवी व्यवहार होतील असें स्मिथला म्हणतां आलें नसतें व त्यानें म्हटलेलेंही नाहीं. पण मानवी व्यवहार पूर्ण नाहीं तरी बऱ्याच अंशीं विशिष्ट नियमांनीं चालतो या गोष्टीकडे स्मिथनें माणसांचें लक्ष वेधलें. अग्नीचा धर्म उष्णता, पाण्याचा धर्म प्रवाहीपणा हे जसे अढळ गुणधर्म आहेत तसेंच मागें सांगितलेलें (१) स्वतांवर प्रीति, (२) सहानुभूति (३) स्वातंत्र्येच्छा (४) औचित्यभावना (५) श्रमाची संवय (६) आणि देवघेवींची प्रवृत्ति हे माणसाचे षड्गुणही अढळ गुणधर्म आहेत असें स्मिथ सुचवितो. हें षड्गुणैश्वर्य योग्य वाव मिळाल्यास मानवी वैभव वाढवील असें स्मिथला वाटे. अग्नीपासून अनर्थ होतात तसेच या माणसाच्या गुणापासूनही होऊं शकतील; अग्नीवर योग्य नियंत्रण घातलें आणि त्यास पुरेसा ऑक्सिजन वगैरे घेऊं देऊन मोकळेपणें पेटूं दिलें तर अग्नि माण-

साचीं अनेक कामें करूं शकतो. त्याप्रमाणें राज्यसंस्थेनें (१) राष्ट्रसंरक्षण (२) न्यायदान व (३) सार्वजनिक सुखसोयी एवढी तीन कर्तव्यें व्यक्ति व समाज यांच्या जीवनाला अत्यवश्य म्हणून करावी आणि बाकी व्यक्तिमात्रास पूर्ण स्वातंत्र्य द्यावें म्हणजे तें स्वातंत्र्य वरील षड्गुणांचा विकास करून व्यक्तिमात्रास व समाजास समृद्धि, शांति व सौख्य देईल असें स्मिथचें म्हणणें आहे.

## विनिमयविषयक सिद्धांत

सरकारनें आयात-निर्यात कर बसवूं नये, कोणासही धंद्याचे मक्ते देऊं नये, धंद्यांना सवलती अथवा मदत देऊं नये वगैरे ॲडॅम स्मिथचें जें मत होतें, तसेंच रिकार्डो आणि माल्थस यांचेंही होतें. मग माणसांचे आर्थिक व्यवहार चालणार कसे? याचें उत्तर देण्यासाठीं, कोपर्निकस, न्यूटन यांनीं जसे सूर्यमंडळाच्या गतीचे नियम शोधले, गॅलीलिओनें पृथ्वीकडे येणारा पदार्थ कोणत्या वेगानें येतो याचा जसा सिद्धांत सांगितला त्याचप्रमाणें क्लासिकल अर्थशास्त्रज्ञांनींही कांहीं सिद्धांत सांगितले. पैसा हा धन हें जें स्वरूप धारण करतो तें त्याचें स्वरूप कायम टिकण्यासाठीं राज्यसंस्था मजबूत असून तिची जेथें तेथें पैशाच्या वतीनें मध्यस्थी व पैशाला तिचें पाठबळ हवें असतें. राज्यसंस्थेची ही लुडबूड थांबविण्यासाठीं सोनें, रुपें व त्यांचें नाणें ही स्वतां धन नव्हत हा सिद्धांत क्लासिकल अर्थशास्त्रज्ञांनीं सांगितला. माल विकणारा मालाबद्दल पैसा घेतो पण लगेच तो पैसा खर्चून दुसरा कांहीं माल तो खरेदी करतो. अर्थात् पैसा हा येथें नुसता मध्यस्थ होत असून एका मालाचा विनिमय दुसऱ्या मालांत होत असतो. बाजारव्यवहारांत पैसाच एकसारखा दिसत असला तरी पैशाच्या पडद्याआड ऐनजिनशीं मालाची देवघेवच चालली असते. मालाला उपयोगमूल्य असतें. त्यासाठीं माल सर्वांना हवा असतो. आणि दुसऱ्याच्या श्रमापासून झालेला माल आपणांस मिळावा यासाठीं स्वतांच्या श्रमांनीं झालेला माल बदली देण्यास माणूस तयार होतो. यामुळें मालास विनिमयमूल्य निर्माण होतें. याप्रमाणें अखेर मालच दिला-घेतला जातो. समाजांत पैशाचें परिमाण कमी असेल तर माल थोड्या पैशास पुष्कळ मिळतो. उलट पैशाचें परिमाण पुष्कळ असेल तर पुष्कळ पैशास माल थोडा मिळतो. कोणत्याही राष्ट्रानें पैसा साठविणें हे अडाणीपणाचें आहे. दुसऱ्या एकाद्या देशाचा माल आपल्या देशास हवा असल्यास त्या दुसऱ्या देशाला उपयुक्त असा माल आपण तयार करणें हाच

दोन्हीं देशांचें वैभव वाढविण्याचा उपाय होय असें पैशासंबंधींचें क्लासिकल अर्थशास्त्रज्ञांचें मत आहे. ज्या गांवांत अथवा देशांत जो माल करण्यास विशेष अनुकूलता असेल तेथें तो माल करावा व मालाच्या आयातीनिर्यातीवर निर्बंध नसावा हें क्लासिकल पंथाचें खुल्या व्यापाराचें तत्त्व असल्याचें मागें सांगितलें आहे.

## उत्पादननियंत्रण कसें होतें

अशा प्रकारें एका गांवानें, देशानें अथवा जगांतल्या अनेक जवळच्या अथवा दूरच्या देशांनीं आपणांस अज्ञात अशा कोणत्या गिऱ्हाइकांसाठीं किती व कसा माल तयार करायचा? परस्परांच्या हिताचा विचार न करतां स्वतांच्या हितासाठींच झटणाऱ्या भिन्न भिन्न व्यक्तींनीं व समाजांनीं स्वार्थबुद्धीनेंच चालविलेल्या प्रयत्नावर जगाचा योगक्षेम कसा चालणार? आणि प्रत्येकाला आपण जगासाठीं काय केलें असतां आपला स्वार्थ साधेल हें कसें कळणार? या जगड्व्याळ प्रश्नास 'मागणी व पुरवठा यांचा सिद्धांत' हें सुटसुटीत उत्तर क्लासिकल पंथीयांनीं दिलें आहे. गांवांत, देशांत, परदेशांत माल करण्याचे जसे लहान मोठे कारखाने असतात त्याचप्रमाणें त्या त्या मालांच्या विक्रीच्या बाजारपेठाही असतात. तेथें त्या त्या मालांचे देवारी आणि घेवारीही येत असतात. मालाच्या उत्पादनास खर्च किती झालेला आहे हें माल निर्माण करणारास माहीत असते. मालविक्रेत्यांत व गिऱ्हाइकांतही मालविक्रीची चढा-ओढ चाललेली असते. अशा स्थितींत उत्पादनाच्या किंमतीहून पुष्कळच अधिक किंमत मालाला बाजारांत आली तर पुरवठ्यापेक्षां मागणी जास्त आहे हें सहज लक्षांत येऊन नफ्याच्या लोभानें त्या मालाच्या उत्पादनाकडे भांडवलाचा वेग अधिक प्रमाणांत वळतो. हळूहळू त्या मालाचा पुरवठा वाढूं लागतो, यामुळें मागणीच्या प्रमाणांत पुरवठा अधिक होवून मालाच्या किंमती उतरूं लागतात, नफ्याचें मार्जिन कमी कमी होत जातें आणि साहजिकच त्या प्रकारच्या मालाच्या धंद्यांत भांडवल घालणें किफायतीचें नाहीं असें वाटून त्यांतून भांडवल बाहेर निघतें व परत मागणीच्या प्रमाणांत पुरवठा कमी होऊन पुन्हा मालाच्या किंमती वाढूं लागतात. याप्रमाणें मालनिर्मितीचे बाबतींत मक्तेदारी नसून मालाच्या किंमतीवरही नियंत्रण नसल्यास, पाणी जसें समपातळींत येण्याचा नेहमीं प्रयत्न करतें त्याप्रमाणें मागणी व पुरवठा हे एकमेकांच्या

पातळींत येण्याचा नेहमीं प्रयत्न करतात आणि किंमतींत चढउतार होत असतात. त्यावरून कोणता माल निर्माण करावा व कोणता करूं नये अथवा कोणता कमीअधिक करावा हें आपोआप कळूं शकतें असें या मागणी—पुरवठा सिद्धांताचें माहात्म्य क्लासिकल तत्त्वज्ञांनीं वर्णिलें आहे. कोणत्या धंद्यांत मजूर किती असावे आणि मजुरांची मजूरी किती असावी याबाबतही 'मागणी व पुरवठा' यांचा ताजवा हा उत्तम मापक आहे. कारण अमुक एका वेळीं मजुरांना त्यांच्या चरितार्थास अवश्य असेल त्याहून अधिक मजुरी मिळाल्यास त्यावेळीं त्या धंद्यांत येण्यासाठीं मजुरांची गर्दी होईल. यामुळें मजुरांचा पुरवठा मागणीहून अधिक होऊन त्यांचे मजुरीचे दर उतरतात व अर्थात् पुन्हा त्या धंद्यांतली मजुरांची संख्याही कमी होवूं लागते.

## सांपत्तिक विषमताही नष्ट होईल

कोणाचाही कृत्रिम हस्तक्षेप आर्थिक व्यवहारांत होवूं न देतां मागणी व पुरवठा यांच्या ताजव्यावरच समाजाचें आर्थिक जीवन तोलून धरण्याचें कार्य सोपविलें तर संपत्तीच्या वाटणींतील विषमताही नाहींशी होईल असें क्लासिकल पंथीयांना म्हणावयाचें आहे. कोणीही संपत्ति निर्माण करतो ती उपभोगाकरितां अथवा विनिमयाकरितांच निर्माण करतो या रिकार्डोच्या वर सांगितलेल्या सिद्धांतावरून अनुमानानेंच हें सिद्ध होतें. कारण प्रत्येकजण उपभोगायचें जें धन असेल तें उपभोगून संपवील आणि उरेल तें विनिमयासाठीं बाजारांत मांडील. विनिमय अथवा खरेदीविक्रीव्यवहार करणाऱ्या प्रत्येकाची इच्छा कमींत कमी द्यावें आणि जास्तींत जास्त परत मिळवावें अशीच असणार. पण बाजारांत अथवा धंद्यांत हक्कदारी अथवा इतर कोणतेंही कृत्रिम नियंत्रण नसलें म्हणजे देवारी-घेवारी यांमध्यें चढाओढ अनिर्बंधपणें चालते. यामुळें कमींत कमी द्यावें व जास्तींत जास्त घ्यावें या प्रत्येकाच्या इच्छेचा सामुदायिक परिणाम सारख्याची सारख्याशीं देवघेव होण्यांतच होत असतो. अशा वेळीं कांहीं विक्रेत्यांच्या जवळ कांहीं माल फाजील उरला तर? त्या मालाच्या विनिमयासाठीं दुसऱ्या एकाद्या मालाच्या उत्पादनास त्यामुळें मागणी निर्माण होते. इतकेंही करून, मजुरांच्या गरीबीमुळें, बाजारांत माल उरलाच तर माल्थसच्या वर सांगितलेल्या सिद्धांताप्रमाणें फुकटखाऊ असा जो जमीनमालकवर्ग तो उरलासुरला माल खरेदी करतो. समाजांत पूर्ण विनिमयस्वातंत्र्य असलें म्हणजे याप्रमाणें

मागणी व पुरवठा यांच्या ताजव्यानें आर्थिक समताही जास्तींत जास्त प्रमाणांत निर्माण होते. पाण्याची प्रवृत्ति समपातळींत राहणें ही असते, हा जो निसर्गाचा नियम तोच येथेंही पुन्हा लागू होतो. जलपृष्ठ अगदीं पूर्णपणें सपाट कधींच राहूं शकत नाहीं. एका बाजूस लाट उसळून जलपृष्ठ थोडें वर गेलें कीं लगेच दुसऱ्या बाजूस खोलगट निर्माण होऊन लाट तिकडे खेंचली जाते आणि पुन्हा समपातळी साधते. त्याचप्रमाणें थोडीफार विषमता समाजांत नेहमींच निर्माण होत असली तरी पुन्हा लाट मागें उलटून आर्थिक समतेची पातळी निर्माण झाल्यावांचून राहत नाहीं.

## युद्धेंही थांबतील

या विनिमयस्वातंत्र्यामुळें म्हणजेच अनिर्बंध व्यापारामुळें आंतरराष्ट्रीय शांतता निर्माण होवून युद्धें हीं जवळजवळ कायमचीं बंद होतील असें कॉब्डेन या क्लासिकल पंथाच्या पुढाऱ्याचें म्हणणें आहे. कॉब्डेन लिहितो, " इंग्लंडांतील मध्यम व औद्योगिक वर्गांना जगांत शांतता राखूनच आपला स्वार्थ साधता येणार आहे. युद्धापासून मिळणारे मानसन्मान आणि कीर्ति ही सरदारवर्गांना हवी असतात. जनतेच्या रक्तानें न्हालेल्या रणांगणावरील लूट सरदारवर्गास हवी असते....पुढें एकाद्या निवडणुकींत आम्ही परराष्ट्रीय राजकारणच नको या मुद्द्यावर निवडणुकी जिंकूं. ... आंतरराष्ट्रीय खुला व्यापार हा सर्व रोगांवरील एकच एक रामबाण उपाय आहे. एकाद्या उपयुक्त वैद्यकीय शोधाप्रमाणें, जगांतील सर्व राष्ट्रांत सुसंस्कृतीबद्दल प्रेम उत्पन्न करण्यास हा व्यापार कारणीभूत होईल. ब्रिटिश मालाची प्रत्येक गाठ जी या किनाऱ्यापासून परदेशीं जाण्यासाठीं निघते, तिच्यांत एकाद्या मागासलेल्या राष्ट्रांतील जनतेला ज्ञान आणि सुविचार शिकविणारीं बीजें असतात. आमच्या कारखान्यांना भेट देणारा प्रत्येक विदेशी व्यापारी स्वदेशास परत जाऊन स्वातंत्र्य, शांतता आणि सुराज्य यांचा पुरस्कर्ता बनतो. जगाच्या प्रत्येक बंदरास जाणाऱ्या आमच्या वाफेच्या आगबोटी आणि साऱ्या जगांत बोलबाला पावलेली रेल्वेरूपी जादू ही आतां आमच्या सुसंस्कृत संस्थांच्या उपयुक्ततेचीं सर्टिफिकिटें झालीं आहेत."

## जागतिक समृद्धीचें स्वप्न

कॉब्डेनचें हें मत वर सांगितलेल्या एकंदर विचारसरणीवरून सहज अनुमानिता येण्यासारखें आहे. राष्ट्राराष्ट्रांत युद्धें कां होतात ? एका राष्ट्रास दुसऱ्या

राष्ट्राचें धन मोफत लुटायचें असतें अथवा एका राष्ट्रास दुसऱ्याचा धंदा बुडवायचा असतो म्हणून. अशामुळें संपत्तीचा विध्वंस होतो आणि माणसाचे धनोत्पादनाचे कामीं वापरता येण्यासारखे जे श्रम ते युद्धाचे कामीं वापरण्यांत आल्यामुळें धनोत्पादनकार्याची हानि होते. म्हणजे दोन्ही राष्ट्रांतील श्रम धनोत्पादनाचे कामीं लावले असतां जितकें धन निर्माण होईल त्यापेक्षां, कांहीं माणसांचे श्रम युद्धांत खर्च झाल्यास, कमी धन निर्माण होईल इतकेंच नव्हे तर युद्धामुळें धनाचा विध्वंस होवून धनाचा फारच तुटवडा पडेल हें अगदीं साधें गणित कोणाही समंजस माणसास पटण्यासारखें आहे. त्यापेक्षां ज्या देशांत जो माल निर्माण होण्यास विशेष अनुकूलता असेल त्या देशानें तो माल निर्माण करावा, दुसऱ्या देशानें आपल्या येथें ज्यास अनुकूलता असेल तो माल निर्माण करावा आणि उभयतांनीं आपापल्या मालाची इतराच्या मालाशीं देवघेव करून उभयतांची समृद्धि करावी अशी ही अगदीं साधी व सोज्ज्वल विचारसरणी आहे. एका कारखान्यांत श्रमविभाग कसा होतो याचें उदाहरण वर दिलें आहे. एकेका गांवांत सोनार, सुतार, लोहार, कुंभार, शेतकरी हे आपापल्या मालाचा इतरांच्या मालाशीं विनिमय करून परस्परावलंबनानें गांवोगांव हजारों वर्षें राहात आले आहेत. हाही एक प्रकारचा श्रमविभाग अथवा श्रम-संयोग म्हणता येईल. याच पद्धतीनें जगांतील राष्ट्रांनीं आपल्या परिस्थितींत विशेष अनुकूलतेमुळें शक्य तो माल उत्पन्न करून परराष्ट्रांच्या मालाशीं त्याचा विनिमय केला तर एका खेड्यांत झाला तसा श्रमविभाग अथवा श्रमसंयोग आंतरराष्ट्रीय प्रमाणावर होवूं लागून जागतिक प्रमाणावर सहकार्य, समृद्धि व सौख्य नांदूं लागेल असें अगदीं तर्कशुद्धपणें म्हणतां येते.

## राज्यसंस्था हेंच संकट

सारांश मत्सर, द्वेष, कलह, विध्वंस यांनीं जेरीस आलेल्या या जगास राज्यसंस्थेचा आर्थिक जीवनांत फाजील हस्तक्षेप हाच संकटांत घालीत आहे. राज्यसंस्था थोडी दूर राहून व्यक्तिमात्रास स्वातंत्र्य देईल तर गुरुत्वाकर्षणाचा सिद्धांत, समपातळींत राहणें हा पाण्याचा धर्म, इत्यादि नैसर्गिक नियमाप्रमाणेंच खरा व परिणामकारक असणारा 'मागणी व पुरवठा' हा सिद्धांत साऱ्या जगांत समता, समृद्धि, स्नेह व सौख्य निर्माण करण्यास समर्थ आहे असें क्लासिकल पंथ सुचवीत होता.

बेंथॅम या तत्त्वज्ञानें या व्यक्तिस्वातंत्र्याचा महिमा मोठ्या उठावदारपणें वर्णिला आहे. तो सांगतो " सामान्य नियम असा कीं, सरकारनें समाजाच्या जीवनांत ढवळाढवळ करूं नये. डायोजेनिस या बैराग्यानें अलेक्झांडरला सांगितलें कीं ' माझें उन्ह सोड, मला तुझें कांहींही नको, ' तसेंच शेतकरी, व्यापारी, धंदेवाला हे सर्व राज्यकर्त्यांस एकच विनंति करतात कीं ' स्वस्थ राहा, कांहींही करूं नका. " त्यामुळेंच जग आपोआप सुखी होईल. ही जी व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारलेली समाजव्यवस्था हीच खरी नैसर्गिक समाजव्यवस्था असून माणसाचा खरा इतिहास येथपासूनच सुरू होतो. आजवर समाजांत जीं कृत्रिम बंधनें होतीं तीं अनैसर्गिक व आगंतुक होतीं, समाजास त्यांची केव्हांही जरूरी नव्हती. हीं बंधनें तुटलीं आणि व्यक्तिस्वातंत्र्याचे आधारावर निसर्गसिद्धपणें समाज नांदूं लागला म्हणजे तो अनंतकालपर्यंतही तसाच समतेंत, समृद्धींत व सुखांत नांदूं लागेल असा या क्लासिकल पंथाच्या शिकवणुकीचा एकंदर निष्कर्ष होता.

## तत्त्वें आणि व्यवहार यांची फारकत

पण क्लासिकलपंथीयांच्या ग्रंथांत व्यक्तिमात्रास व अखिल मानवजातीस सुखसमृद्धीचे डोहाळे लागल्याचा जो हा देखावा रेखाटण्यांत आला होता तशी वस्तुस्थिति मुळींच नव्हती. वास्तव परिस्थितीविरुद्ध डोळयास ढापणें लावून तर्कबुद्धीच्या उबदार पांघरुणाखालीं हे शास्त्रज्ञ ग्रंथलेखन करीत असतां त्यांच्या भोवतालची बहुसंख्य मानवजात रोज नव्या दुःखानें होरपळत होती. आणि क्लासिकलपंथीयांना दिसलेलें सुख फक्त एका विशिष्ट व मूठभर वर्गालाच मिळत होतें. तत्त्वज्ञांनीं अखिल मानवजातीच्या हिताचा अमुक एक उपाय सांगावा आणि त्याचा फायदा फक्त एका विशिष्ट वर्गालाच मिळून बहुसंख्य समाजाचें दुःख त्यामुळें वाढत राहावें हा सनातन प्रकारच यावेळींही घडला.

## मर्कंटाईल पंथ कां पुढें आला

युरोपांत रोमन साम्राज्याचा पाडाव झाल्यानंतर मध्ययुगाचा म्हणून जो सुमारें एक हजार वर्षांचा काळ मानला जातो, त्या काळांत खेड्यापाड्यांतून शेती व अगदीं लहान लहान प्रमाणावर हस्तव्यवसाय झाले. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, इटाली अशीं मोठीं राष्ट्रें केवळ नांवापुरतीं होतीं. त्या त्या राष्ट्रांत एकछत्री अम्मल नव्हता. लहान लहान सरदारांचे परगणे हींच छोटीं छोटीं

राज्यें होतीं. हेच सरदार सरंजामदार म्हणून जमीनमालकही होते. जमीन कसणारे शेतकरी हे परंपरागत भूदास म्हणजे 'सर्फ' असत. त्यांच्या घरोघर लहान लहान धंदे चालत. सरंजामदारांजवळ त्यांच्या गरजा भागविणारे विविध कारागीर असत. परगण्या-परगण्यांतून व देशादेशांतून व्यापारीवर्ग मालाची नेआण करीत. ते लहान हस्तव्यवसायिकांना भांडवल पुरवीत व त्यांच्यापासून व्यापारासाठीं माल घेत. या व्यापाऱ्यांच्या मालाची लूटमार सरंजामदार ऊर्फ सरदारवर्ग व त्यांचीं सैन्यें करीत असत. म्हणून सर्व सरदारांचा प्रमुख असा जो देशांतील राजा त्याची सत्ता बलवान करून त्याच्यामार्फत सरदारांना दुर्बल करण्याचा व देशांत सुव्यवस्था स्थापण्याचा चंग युरोपांतील व्यापाऱ्यांनीं बांधला. सरदारांच्या जुलमास कंटाळून व्यापाऱ्यांच्या शहरांत पळून आलेल्या कारागिरांनीं व्यापाऱ्यांच्या या प्रयत्नास पाठिंबा दिला. हळू हळू शहरांत नवीन नवीन येणाऱ्या कारागिरांची पूर्वी आलेल्या कारागिराशीं चुरस होवूं लागून शहरांतले कारागीरसंघ निर्माण झाले व नवीन कारागिरांना धंद्यांत शिरकाव करून घेण्यास कडक बंधनें घातलीं गेलीं. व्यापाऱ्यांचें मालांची दूरवर ने-आण करण्याचें कार्य शहरांत कारागिरी वाढल्यानें अधिकच भरभराटलें. व्यापारांतील नफ्याच्या लोभानें युरोपीय साहसी माणसें नवे मुलूख शोधूं लागलीं. कोलंबसास अमेरिकेचा शोध लागल्यावर अमेरिकेंतील सोनें स्पेनमध्यें येवूं लागलें. व्यापाराच्या भरभराटीमुळें सरंजामदारांना ऐनजिनशी देवघेवीपेक्षां पैशानें करावयाच्या देवघेवीचें महत्त्व पटूं लागलें. राज्यकर्त्यांना आपली कदर बसविण्यासाठीं भारी कर लागत. शहरांच्या भरभराटीमुळें पैशाच्या स्वरूपांत राज्यकर्त्यांना कर मिळूं लागले. त्यांच्या साह्यानें सरदारांचें प्राबल्य मोडून काढून राजांनीं आपली मध्यसत्ता प्रबळ केली. उद्योगधंद्यांच्या वाढीमुळें मध्यसत्तेला कर भरपूर मिळतात हें ओळखून राज्यकर्त्यांनीं उद्योगधंद्यांना संरक्षण व मदत देणें, परदेशांतील कारागीर स्वदेशांत आणणें वगैरे राष्ट्रीय आर्थिक उन्नतीचे प्रघात सुरू केले. यासाठीं परदेशावर स्वाऱ्या करण्याचा व दुसऱ्या राष्ट्रांचे उद्योगधंदे बुडविण्याचाही इलाज राज्यकर्त्यांनीं अवलंबिला. हें सर्व करण्यास देशांत सोनेंरुपें खूप असण्याची साहजिक आवश्यकता होती. म्हणून आर्थिक जीवनाच्या वाढीस सरकारी बंधनें हवींत आणि सोनें रुपें यांचें नाणें हाच श्रेष्ठ धनप्रकार होय असें सांगणारा मागें उल्लेखिलेला मर्कंटाइलिस्ट हा मतपंथ पुढें आला.

## व्यापारी कारखानदार झाला

या पंथाचीं मतें सर्व समाजाचें हित करणारीं आहेत असें या पंथाचे पुरस्कर्ते म्हणत, पण वास्तविक व्यापारी आणि राजे यांचाच त्या मतांनीं फायदा झाला. बहुसंख्यसमाज हा सरंजामदारांच्या, राजांच्या आणि व्यापाऱ्यांच्या जुलमाखालीं आणि पिळणुकीखालीं चेंगरलेलाच होता. या मर्कंटाइलपंथास अखिल मानवजातीच्या हिताच्या नांवानें विरोध करण्यासाठीं ॲडॅम स्मिथचा क्लासिकल पंथ पुढें आला. पण तोही सर्व जगाच्या नांवानें बोलत असला तरी मर्कंटाइलपंथाचीं मतें ज्या व्यापारी व राज्यकर्त्यावर्गास हिताचीं होतीं त्यांचेंच हित क्लासिकलपंथाच्या मतांनीं साधणार होतें. सरकारनें घातलेलीं व्यापारावरील बंधनें, सोन्यारुप्याचें फाजील स्तोम वगैरे मर्कंटाईल विचारसरणीच्या तत्त्वास स्मिथच्यापूर्वी ह्यूम वगैरे तत्त्वज्ञांनीं विरोध केलाच होता. याचें कारण व्यापारीवर्गाची भरभराट ज्या सरकारी बंधनांनीं व सोन्यारुप्याच्या संचयांनीं बराच काळपर्यंत होत होती त्यांनाच आतां हीं बंधनें व हे संचय जाचक होऊं लागले होते. राजांची मध्यवर्ती सत्ता प्रबळ होऊन सरदारांचा पाडाव झाल्यामुळें व्यापारधंद्यास तेजी येऊं लागली. यामुळें एकएका देशाच्या मर्यादाही संकुचित वाटूं लागल्या. शहरांतून जे कारागीर-संघ ( गिल्ड्स् ) असत त्यांत कारागिरांची संख्या थोडी असे व ती वाढूं नये अशीं बंधनें संघांनीं घातलेलीं असत. अशा संघांतील कारागिराकडून अगदीं स्थानिक मागणीपुरता माल निर्माण होई. पण राजांची मध्यसत्ता मजबूत झाल्यानें सर्व देशभर मालाची वाहतूक बिनधोक होवूं लागली. यामुळें मालाच्या मागण्या दूरदुरून आणाव्या, परत माल दूर अंतरावर पोचवून त्या भागवाव्या आणि नफा मिळवावा, हें नवें व वाढतें आकर्षण व्यापाऱ्यांना उत्पन्न झालें. एका देशांतून दुसऱ्या देशांत माल नेण्याआणण्यास बंधनें नसावीं असेंही त्यास वाटून व्यापाऱ्यांना आंतरराष्ट्रीय दृष्टि आली. सोन्याचें नुसतें साठवण करीत राहण्यापेक्षां माल अधिकाधिक निर्माण झाल्यास सोनें कोठेंही असलें तरी मालविक्रीनें खेंचून आणता येतें हें व्यापाऱ्यांना दिसून आलें. पण धनोत्पादनाची वाढ करण्यास शहरांतील कारागीरसंघांचीं बंधनें आड येत होतीं. यासाठीं धंद्याचे बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य असावें, मालाचे आयातनिर्यातीवर बंधनें नसावीं, सोनें, रुपें हेंच श्रेष्ठ धन होय असें मानलें जाऊं नये वगैरे विचार

व्यापारीवर्गांतच बळावूं लागले. हळू हळू व्यापाऱ्यांनीं कारागिरीचीं हत्यारें व कच्चा माल वगैरे खरेदी करून व स्वतःच्या श्रमगृहांत कारागिरांना फक्त मजूरीवर माल तयार करण्यास लावून माल निर्माण करण्याची कारखानदारी सुरू केली. या कारागिराकडून मागें सांगितल्याप्रमाणें श्रमविभागपद्धतीनें धनोत्पादन करून घेतलें जाई. अशा प्रकारें व्यापारी हा हळूहळू कारखानदार झाला.

## भांडवलशाहीची जन्मकथा

अठराव्या शतकाच्या जवळजवळ अखेरपर्यंत यांत्रिक उत्पादन सुरू झालेलें नव्हतें. जुने कारागीर जे हस्तव्यवसाय शहरांत अथवा खेड्यांत आपआपल्या घरोघर करीत तेच हस्तव्यवसाय कारखानदाराच्या श्रमगृहांत हे कारागीर मजुराची भूमिका घेऊन कारखानदारानें आंखून दिलेल्या श्रम-विभाग पद्धतीनें करूं लागले. याच प्रकारास त्यावेळीं ‘ मॅन्युफॅक्चर ’ असें म्हणत असून ‘ हस्तव्यवसायात्मक व श्रमविभागात्मक कारखानदारी ’ असा या प्रकाराचा उल्लेख पुढें ‘ कॅपिटल-सारग्रंथांत ’ केला आहे. अशा कारखान-दारीस अर्थातच मजुरांची वाढती संख्या लागत असे. पण सरंजामदारी पद्धतींतला शेतकरी हा जमिनीस वंशपरंपरा जखडलेला असल्यानें कारखान-दारीस मजूर पुरेसे मिळूं शकत नसत. मजुरांची संख्या कारखानदारांच्या गरजेपेक्षां बरीच मोठी असली म्हणजेच मजुरामजुरांत चढाओढ होवून मजुरीचे दर कारखानदारास ऊर्फ भांडवलदारास अनुकूल अशा प्रकारें कमी कमी होत. म्हणून चोहोंकडून व्यापारीवर्गानें व्यक्तिस्वातंत्र्य व व्यवसाय-स्वातंत्र्य याची मागणी सुरू केली. वर अॅडॅम स्मिथचीं मतें म्हणून जीं सांगितलीं तीं त्याच्या काळीं या व्यापाऱ्यांच्या हिताचींच होतीं हें कसें, हें यावरून आतां सहज लक्षांत येईल. या कारखानदारीपद्धतीमुळें मालाचें उत्पादन वाढून माल अधिकाधिक स्वस्त होत गेला व त्याशीं चढाओढ करण्यांत जुन्या हस्तव्यवसायिकांचा माल मागें पडून वैयक्तिक हस्तव्यवसाय ठार झाले. या जुन्या हस्तव्यवसायिकांना आतां रोजगारीसाठीं कारखानदाराच्या दाराशीं येणें अवश्य झालें. तेथें त्यांच्याचसारख्या कफल्लकांची गर्दी असल्यानें त्यांच्यांत मजुरीच्या दराविषयीं चढाओढ लागली. आणि अर्थात् ज्यांना रोजगारी मिळाली त्यांना कमींत कमी मजूरीवर राबावें लागू लागलें. उलट ज्यांना मुळीं रोजगारी मिळूंच शकली नाहीं ते बेकार झाले. कांहीं मजूर असे बेकार राहणें

हे मजुरीचा दर कमींत कमी राहण्याला अवश्य असल्यानें या कारखानदारी जीवनांत मजुरांची बेकारी ही एक अंगभूत बाब होवून बसली. श्रमजीवीवर्गास रोजगारी मिळणें अथवा न मिळणें ही गोष्ट पूर्णपणें कारखानदारांच्या हातीं गेली. म्हणजे कारखानदार हाच समाजांतला प्रमुख सत्ताधीश झाला. आणि ज्याचेजवळ कारागिरीचीं पुष्कळ हत्यारें व पुष्कळ कच्चा माल एकदम खरेदी करून पुष्कळ मजुरांना एकदम मजुरी देण्याइतकें भांडवल असेल त्यालाच कारखानदार होणें शक्य असल्यानें या उत्पादनपद्धतीस पुढें भांडवलशाही उत्पादनपद्धति असें नांव कार्लमार्क्सनें दिलें. ही भांडवलशाही दोन अडीचशें वर्षे कशी क्रमाक्रमानें विकसत होती, तिच्या विकासास असा आवश्यक प्राथमिक धनसंचय बहुसंख्य जनतेच्या लुबाडणुकींतूनच कसा निर्माण झाला, बहुसंख्य श्रमजीवीवर्गास नाना प्रकारचे अन्याय व आपत्ति कशा भोगाव्या लागल्या, आणि उत्तरोत्तर बहुसंख्य जनतेच्या नशीबीं कफल्लकत्व कसें आलें याचा मार्क्सनें सांगितलेला इतिहास पुढें कॅपिटल-सारग्रंथांत दिलाच आहे.

## यंत्रयुग आलें

अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत जी ही हस्तव्यवसायी कारखानदारी जोमानें भरभराटत गेली तिला अठराव्या शतकाचे अखेरीस यांत्रिक व शास्त्रीय शोधांची मदत मिळून कारखानदारीस यांत्रिक स्वरूप आलें. या यांत्रिक व शास्त्रीय उत्पादनामुळें, कित्येक हजार वर्षांत माणसाची उत्पादनशक्ति वाढली नव्हती इतकी एका पंचवीस तीस वर्षांत वाढली. या यांत्रिक उत्पादनानें यंत्रयुग हा एक नवा कालखंडच सुरू केला. जुने हस्तव्यवसाययुग व हें नवें यंत्रयुग या दोहोंत मानवी सामर्थ्याचे बाबतींत जमीन—अस्मानाचा फरक पडला. या फरकाचें स्वरूप कळून येण्यास अगदीं एक प्रसिद्ध उदाहरणही पुरेसें होईल. १८१२ सालीं नेपोलियन बादशहा, रशियावरील स्वारींत माघार घ्यावी लागल्यामुळें, घोड्यावर बसून पॅरिसला पळून आला. तो ३१२ तासांत १४०० मैल अंतर तोडून पॅरिसला आला. वाटचालीच्या त्या वेळच्या वेगांत नेपोलिअनचा हा विक्रम जगप्रसिद्ध आहे. कुणाही तत्कालीन घोडेस्वारास याच्या दुप्पट वेळ हें अंतर तोडण्यास लागला असता. त्यानंतर १३ वर्षांनीं म्हणजे १८२५ सालीं आगगाडी सुरू होऊन कोणाही सामान्य माणसास अगदीं झोप

घेत घेत ४९ तासांत १४०० मैल अंतर तोडणें शक्य होऊं लागलें. मानवजातीच्या इतिहासांत यंत्रानें माणसाचे अंगीं आणलेलें हें कर्तृत्व अगदीं अपूर्व असेंच होतें. पण त्यानें बहुसंख्य मानवजातीचें सुख वाढविलें असें कोणास वाटेल तर तें मात्र साफ खोटें होतें.

## बळी तो कानपिळी

क्लासिकल अर्थशास्त्रज्ञ व्यक्तिस्वातंत्र्याचा व सरकारच्या तटस्थतेचा पुरस्कार करीत होते. फ्रान्समध्यें १८ व्या शतकाच्या अखेरीस या क्लासिकल तत्त्वज्ञांच्या मताअनुसार राज्यक्रांति व समाजक्रांति होवून स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या तत्त्वांचा पुरस्कार करण्यांत आला. पण त्यामुळें स्वातंत्र्य, समता अथवा बंधुभाव यांपैकीं कशाचाच लाभ सामान्य जनतेला झाला नाहीं. सरंजामशाहीची व कारागीरसंघांचीं बंधनें नव्या फ्रेंच सरकारनें उध्वस्त केलीं खरीं, पण श्रमजीवी बहुसंख्य वर्गास चरितार्थास स्वतंत्र साधन कांहींच न उरल्यामुळें कारखानदाराच्या कैचींत श्रमजीवी वर्गाचें जिणें सांपडून स्वातंत्र्य सर्वस्वी लोपलें. एका बाजूस भांडवलदार धनिकवर्ग जणू कांहीं मजूरांची शिकार करण्यासाठीं कारखानदारीरूपी सापळा मांडून बसला आहे आणि श्रमजीवी वर्ग नाइलाज होवून त्या सापळ्याच्या दाराशीं धडपडत आहे अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें समता नष्ट झाली. एक वर्ग पिळणारा व दुसरा पिळणूक होवूं देणारा अशी समाजाची वाटणी झाल्यामुळें बंधुभाव निर्माण होणेंच अशक्य झालें. श्रमानेंच मूल्य निर्माण होत असल्यानें श्रमावरून धनाची मालकी ठरावी हें जें क्लासिकल तत्त्वज्ञांचें मत त्या मताचा फायदा श्रमजीवी वर्गास स्वतंत्र श्रमानें धनोत्पादन करणेंच अशक्य झाल्यानें त्याला मिळूं शकला नाहीं. सारांश स्वातंत्र्य, समता, बंधुभाव व मालकी हक्क हीं जीं क्लासिकल तत्त्वांचीं श्रेष्ठ मतें त्यांचा फायदा बहुजनसमाजास न मिळतां मोठ्या माशानें लहान माशास खावें हा मात्स्यन्याय बहुसंख्य समाजाच्या पदरांत पडला. समाजव्यवस्था कृत्रिम नसावी, नैसर्गिक असावी असें क्लासिकल तत्त्वज्ञ म्हणत होते. पण निसर्गास मान्य असलेला 'बळी तो कान पिळी' हा दुष्ट न्याय मात्र बहुसंख्य समाजाच्या भोगवट्यास आला.

## रिकार्डोच्या सिद्धांताची उपपत्ति

क्लासिकल पंथाचे पुरस्कर्ते आपण समाजाच्या हिताच्या दृष्टीनें बोलतों असें म्हणत होते, तथापि धनिक वर्गाचें हितच त्यांच्या डोळ्यापुढें कसें होतें याचें एक ठळक उदाहरण रिकार्डोच्या शिकवणुकींत पाहावयास मिळते. गव्हाच्या जमीन-मालकांना खूप फायदा मिळावा या दृष्टीनें इंग्लंडांत विदेशी गव्हाच्या आयातीवर जबर कर बसविण्यांत आलेला होता. यामुळें इंग्लंडांत गव्हाच्या उत्पादनास खूप उत्तेजन मिळालें. पण अठराव्या शतकाच्या अखेरापासून गव्हाचें वाढतें उत्पादन वाढत्या लोकसंख्येस अपुरें पडूं लागलें. नेपोलिअनशीं इंग्लंडच्या चाललेल्या युद्धामुळें गव्हाची किंमत सारखी वाढत गेली. नवीन नवीन जमीन गव्हाच्या शेतीखालीं आली तरी गहूं पुरा पडेना. गव्हाच्या वाढत्या भावामुळें जमीन-मालकांची चंगळ झाली. पण कारखानदारांच्या मजूरांचा चरितार्थखर्च त्यामुळें वाढला आणि म्हणून कारखानदारांना मजूरांस जास्त जास्त मजूरी देणें भाग पडूं लागलें. मजुरांना ही मजूरीहि अपुरी पडूं लागल्यानें त्यांच्यांत असंतोष वाढून संपासारखे मार्ग मजूरवर्ग अवलंबूं लागला. याला परदेशी गहूं अनिर्बंधपणें स्वदेशांत येवूं देणें एवढाच उपाय होता. त्याच्या पुरस्कारासाठीं रिकार्डोचा 'जमीन-खंडाचा सिद्धांत' पुढें आला. जमीन खंड हा जमीन मालकांना फुकटखाऊपणानें मिळतो, कोणत्याही देशांत शेतजमीन ही मर्यादित असल्यानें जमीनीचा खंड वाढत जातो. गव्हाचा भाव वाढला कीं कमी कमी कसाची जमीन लागवडीस येऊन अधिकाधिक खंड जमिनमालकास मिळतो. ही वाढ श्रमार्जित नसते. तसेंच जमीनमालकाचा खंड वाढत चालला असतां धान्याच्या वाढत्या महागाईमुळें मजूर वर्गाचें व एकंदर समाजाचें जिणें महागाईचें होत जातें. मजूरांचें जिणें महागाईचें झालें म्हणजे कारखान-दारांना मजूरीचें दर वाढवावे लागून त्यांचेहि नुकसान होतें. सारांश जमीन-मालक व एकंदर समाज यांचेमध्यें तीव्र हितविरोध आहे. एकंदर समाजाचें जें अहित तेंच या फुकटखाऊ वर्गाचें हित ठरत असतें. पण या फुकटखाऊ वर्गाच्या स्वार्थाकडे न पाहतां एकंदर समाजाच्या हिताच्या दृष्टीनें सरकारनें गव्हाच्या आयातीवरील कर रद्द केला पाहिजे असें रिकार्डोचें म्हणणें होतें. परदेशी गहूं स्वदेशांत भरपूर आल्यास धान्याचे भाव उतरतील,

लोकांच्या राहणीचा खर्च कमी होईल, मजूरीचे दर उतरूं शकतील आणि स्वदेशांत येणाऱ्या धान्याच्या मोबदल्यांत स्वदेशांतल्या कारखानदारी मालाला परदेशांत गिऱ्हाईक मिळेल असें रिकार्डो प्रतिपादीत होता.

## क्लासिकल ध्येय लटकें ठरलें

ही विचारसरणी एकंदर समाजाच्या हिताची होती असें सकृद्दर्शनीं वाटतें. श्रमावांचून फुकटखाऊपणानें जगणारे जे जमीनमालक त्यांचेविरुद्ध रिकार्डोचा कटाक्ष असल्यामुळें श्रमजीवी असा जो बहुसंख्य मजूरवर्ग त्याचें हित रिकार्डो साधूं पहात असेल असें वरवर पाहता वाटतें. पण वस्तुस्थिति मुळींच अशी नव्हती. जमीनखंड जास्ती असो, कमी असो, कारखानदारीला तेजी असो, मंदी असो, व्यापार अनिर्बंध असो, अथवा कायद्यांनीं जखडलेला असो, श्रमजीवी मजूरवर्गास जी मजूरी मिळणार ती त्याच्या चरितार्थास कमींत कमी हवी तेवढीच मिळणार, कधीं थोडी अधिक मिळाली तर पुन्हा कधीं चरितार्था-हूनही कमी मिळणार आणि मधून मधून बेकारीचेहि चटके सोसावे लागून मजूरांच्या दारिद्र्यनिवारणास रोगराई व नैसर्गिक आपत्ति यांनीं येणारें मरण हाच एक उपाय होय असा क्रूर शाप माल्थसनें देऊन ठेवला होता. आणि रिकार्डोनें त्याचीच सांथ केली होती. मजुरांची मजुरी वाढली कीं त्यांची लोकसंख्या वाढणार, त्यामुळें पुन्हा मजुरांतील चढाओढीमुळें त्यांची मजुरी कमी होणार यामुळें चरितार्थास कमींत कमी अवश्य त्याहून अधिक मजुरी मजुरास कधींच मिळूं शकणार नाहीं असा निसर्गनियम असल्याचें हे क्लासिकल पंडित सांगत होते. सारांश व्यक्तिस्वातंत्र्य व यांत्रिक शोध यांनीं मानवजातीस दिलेलें वरदान अखेर मूठभर भांडवलदारांच्या पदरांत पडून बहुसंख्य मानव जातीस दारिद्र्य, रोगराई वगैरे परंपरागत दुःखाबरोबर यांत्रिक उत्पादनांनीं उत्पन्न केलेलीं दुःखें मात्र, या क्लासिकल मताप्रमाणें भोगावीं लागणार होतीं. मानवजातीचें सुख हें जें क्लासिकल पंथाचें ध्येय तें अखेर असें लटकेंच ठरलें.

## तागडी व तरवार विजयी झाली

ॲडॅम स्मिथच्या लेखनांत मानव जातीच्या सुखाची जी आस्था दिसते आणि रिकार्डोच्या लिहिण्यांत श्रमानेंच मूल्य निर्माण होत असून ज्याचे श्रम

त्याची मालकी हें तत्त्व मान्य झालें पाहिजे हा आग्रह दिसतो तो पुढेंपुढें क्लासिकल पंथाच्या लेखांत दिसून येईना. आणि भांडवलदारांचें धन हें त्यांच्या श्रमानें उत्पन्न होतें या युक्तिवादानें भांडवलदारांच्या धनाच्या मालकीचें जोरदार समर्थन करण्यांत येऊं लागले. भांडवलशाहीचा माल खपविण्यासाठीं परदेशाशीं लढाया करणें हें कर्तव्य मानण्यांत येऊं लागलें आणि खुल्या व्यापारानें आंतरराष्ट्रीय शांतता निर्माण होईल हें तत्त्व प्रतिपादणारा कॉब्डेन हा पुढें क्रिमीयन युद्धास विरोध केल्यामुळें पार्लमेंटच्या निवडणुकींत पराभूत झाला. आणि ब्रिटिश कारखानदारीचा माल खपविण्यासाठीं हक्काचे बाजार मिळविण्याकरितां एका हातांत 'तागडी' व दुसऱ्या हातांत 'तरवार' घेऊन परदेशचीं 'तख्तें' काबीज करीत सुटणें हें ब्रिटिश भांडवलशाही नीतीचें प्रमुख तत्त्वच होवून बसलें.

---

# भांडवलशाही जुलूमाचा प्राथमिक प्रतिकार : ३

## मजूरांची भयंकर पिळवणूक

हस्तव्यवसायात्मक भांडवलशाहीचा विकास इंग्लंडांत बहुसंख्य जनतेच्या लुबाडणुकींतून व पिळवणुकींतून झाला तसेंच १८ व्या शतकाच्या अखेरीस यांत्रिक उत्पादन सुरू झाल्यापासून मजूर वर्गाच्या पिळवणुकीचें स्वरूपही फार भयंकर झालें. " हुषार, कल्पनाचतुर आणि स्वार्थनिष्ट असे जे धंदेवाले होते त्यांना पैशाचे डोंगर रचण्यास ही अपूर्व संधि आली असें वाटून त्यांनीं एकुणिसाव्या शतकाच्या पहिल्या कांहीं थोड्या वर्षांत इंग्लंड, स्कॉटलंड व वेल्स यांताल कारखानदारीचीं शहरें गचाळपणा आणि मजूरांची दुःसह परिस्थिति यांनीं भरून टाकलीं. यांत्रिक ( म्हणजेच औद्योगिक ) भांडवलशाहीनें इंग्लंडचें वैभव वाढत असतां मजूराला या वैभवाचा फारच थोडा वाटा मिळत होता. मजूरांना मताधिकार नव्हता, मजूरवर्ग अज्ञ होता आणि अत्यंत क्रूरपणें त्याजकडून काम पिळून घेतलें जात असे. शेतकऱ्यांची परिस्थितिही अतिशय वाईट होती. त्याची मजूरी अगदीं क्षुद्र असे. त्यांना मालकीची जमीन नसून ते केवळ शेतींतले गुलाम होते. नेपोलियनच्या युद्धांनीं ही परिस्थिति अधिकच बिकट केली." यांत्रिक कारखान्यांत पुरुष मजूरांची स्थिति तर वाईट होतीच. पण स्त्रिया व मुलें यांची परिस्थिति किती भयंकर होती याची मार्क्सनें सांगितलेली हृदयद्रावक हकीकत पुढें कॅपिटल-सारग्रंथांत आली आहे. त्याची येथें पुनरुक्ति करीत नाहीं.

## दुःखाची अपरिहार्यता

यांत्रिक भांडवलशाहीमुळें मजूरवर्गास जो हा जुलूम सहन करावा लागे तो जुलूम असह्य तर होताच, पण त्याचें स्वरूप काय आणि तो नाहींसा कसा करावा याबद्दल सदर मजूरवर्गाची अक्कल चालत नव्हती. भांडवलदारांना यंत्रापासून उघड फायदाच होत असल्यानें तें यन्त्राचें समर्थन करींतच होते. तत्त्वज्ञांच्या टोळयास, सरकार तटस्थ असून कारखानदार व मजूर यांचे दरम्यान मजुरीचे करार होतात ते उभयपक्षीं पूर्ण राजीखुषीनें व समतेच्या भूमिकेवर होतात असें दृश्य दिसत होतें. यामुळें औद्योगिक उत्पादनापासून माणसांना दुःख भोगावे लागलें तरी एकंदरीनें यंत्रांनीं माणसाची संपत्ति वाढणार असल्यामुळे प्रथम होणारें थोडेफार दुःख सोसलें पाहिजे असें मानून तत्त्वज्ञ स्वतःच्या मनाचें समाधान करून घेत. गरीब लोकांची लोकसंख्या अनावर आहे तोंवर त्यांचे दारिद्र्य नष्ट होणारच नाहीं असें माल्थस सांगत होता. लोकांना बौद्धिक व नैतिक शिक्षण दिलें म्हणजे ते संयम करतील असें माल्थसचें मत होतें. त्याला स्वतःला लग्न झाल्यापासून पहिल्या चार वर्षांत तीन मुलें झालीं आणि पुढें मात्र मुळींच झालीं नाहींत; तेव्हां तो 'नैतिक नियमन' करीत होता असें वाटल्यास समजावें. पण स्वतः भांडवलदारांना माल्थसचें मत पटत असलें तरी मजूरांनीं नैतिक संततिनियमन करावें हें मत त्यांना मान्य असणें शक्य वाटत नाहीं. कारण मजूरांची संख्या धंद्याच्या वाढत्या गरजेपेक्षां नेहमीं अधिक असली तरच मजूरामजूरांत चढाओढ लागून मजूरीचे दर कमींत कमी प्रमाणावर येणें शक्य होतें. एवंच भांडवलशाही तत्त्वज्ञ अथवा कारखानदार या दोघांच्याही दृष्टीनें मजूरांची दुःखें कमी होणारीं नव्हतीं.

## प्रतिकारास गुन्हेगारीचें स्वरूप

ज्या मजूरवर्गास हीं दुःखें भोगावीं लागलीं त्यांनीं प्रतिकारास ताबडतोब प्रारंभ केला. या प्रतिकाराचें प्रथम स्वरूप अगदींच रानटी, क्रूर व विध्वंसक होतें. यावेळच्या कामगारांच्या प्रतिकार पद्धतीचें वर्णन करतांना फ्रेडरिक एन्जल्स लिहितो "आधुनिक उद्योगधंदे प्राथमिक विकासावस्थेंतून पार पडल्यानंतर लवकरच कामगारांचा भांडवलदारास प्रतिकार सुरू झाला.....आरंभीं आरंभीं कामगारांचें हें बंड रानटी, निष्फळ आणि गुन्ह्याच्या स्वरूपाचें होतें. दारिद्र्य आणि उपासमार

यांत कामगारांना राहावें लागे. पण आपल्याभोंवतीं इतर लोक अधिक सुखी परिस्थितींत राहात आहेत हें कामगारास दिसत होतें. समाजासाठीं आपण जास्तींत जास्त राबत असतां आळशी धनिक हे चैनींत असावे आणि आपण मात्र दुःखांत असावें असें कां, हें त्यास समजेना. दुसऱ्याच्या मालकीच्या वस्तूस हात लावूं नये अशी त्याची परंपरागत भावना होती. पण पोटाच्या भुकेनें ही भावना नष्ट झाली व मजूर चोऱ्या करूं लागला. एका बाजूनें कारखानदारी वाढत असतां त्याच वेळीं दुसऱ्या बाजूनें गुन्हेगारी वाढत होती. आणि दरसाल कापूसमालाच्या गठ्ठयांचा खप ज्या प्रमाणांत वाढत होता त्याच प्रमाणांत गुन्हेगारांची धरपकडहि वाढत होती. लवकरच अशा गुन्हेगारीनें आपलीं दुःखें दूर होणार नाहींत हें कामगारांना कळून आलें. कारण गुन्हेगार हा एक व्यक्ति या नात्यानें एकट्यानें समाजव्यवस्थेस हा विरोध दर्शवीत होता, आणि त्याचा मार्ग गुन्हेगारीचा असल्यानें सगळ्या समाजाचें नैतिक वजन त्यावर उलटून पडून त्याच्या भाराखालीं तो साफ चिरडला जाई. समाजव्यवस्थेस विरोध दर्शविण्यासाठीं चोरीचा मार्ग अवलंबणें हें अगदीं रानटीपणाचें होतें. कामगार मनांतल्या मनांत अशा गुन्हेगारास क्षमा करीत. तरी पण चोरी हा समाजव्यवस्थेच्या विरोधाचा उपाय म्हणून त्यांस सार्वत्रिक स्वरूप कधींच येऊं शकलें नाहीं. कांहीं असंतुष्ट कामगार कारखानदारांचे अथवा देखरेख अधिकाऱ्यांचे खूनहि पाडीत. पण अशा प्रकारासही सार्वत्रिक स्वरूप प्राप्त होणें शक्य नव्हतें."

## गुन्हेगारीवर दडपशाही

भांडवलशाही कारखानदारीस मजूरांचा सामुदायिक विरोध झाला तो कारखान्यांतील दंग्याच्या रूपानें झाला. कामगार हा अडाणी होता. यंत्र हें आपलें श्रम करण्याचें हत्यार आहे हें त्यास प्रथम कळून आलें नाहीं, तर यंत्र आलें कीं माणसांची रोजगारी कमी होते, बायका व मुलें यांना कमी पगारावर राबवून मोठ्या बाप्यांना यंत्र हें बेकार करतें असें प्रत्यक्ष अनुभवाला आल्यानें कामगारांनीं कारखान्यांतलीं यंत्रें फोडण्याचा उपक्रम केला. 'लड्डाइट' हें नांव धारण करणाऱ्या कामगारांच्या टोळ्यांनीं नॉटिंगहॅम, यॉर्कशायर आणि लँकाशायर या शहरांत कारखान्यांतील यंत्रें फोडलीं. कारखानदारांची मालमत्ता त्यांनीं उध्वस्त केली. १८११ च्या अखेरीस इंग्लंडांत हे अत्याचार झाले. पोलिसांना मामुली कायद्यांनी हे दंगे आटोपेनात. म्हणून यंत्रें फोडणाऱ्या गुन्हेगारांना

मृत्यूची शिक्षा देणारा कायदा मागण्यांत आला. लॉर्ड बायरनें या कायद्याच्या मसूद्यास हौस ऑफ लॉर्डसमध्यें निकरानें विरोध करून मजूरांची परिस्थिति भयंकर असल्याचे चित्र पार्लमेंटपुढें रेखाटलें. १८१२ त दंग्याची लाट उसळली. १८१३ त तीन गुन्हेगार फासावर लटकले. त्याच्या पुढील सालीं आणखी १४ माणसें फांशीं गेली. १८१७ सालीं आणखी माणसें फासावर चढविण्यांत आलीं. अखेरीस सरकारनें दंगेखोरांतच फितुरी माजवून त्यांचा बींमोड केला. कामगारांना असे दंगे हे आपलाच अखेर नाश करतात हे हळूहळू कळूं लागले. कॉबेट या पुढाऱ्यानें कामगारांत सुविचाराचा प्रसार करून दंग्याची प्रवृत्ति नाहींशी केली. शेवटीं हळूहळूं कामगारसंघटनेच्या चळवळीकडे कामगारांचें लक्ष वेधलें जाऊन दंगेखोरीस कायमचा आळा बसला. जर्मनी व रशिया या देशांतही यंत्राविरुद्ध कामगारांनीं प्रथम प्रथम असेंच हत्यार उगारलें होतें.

## कामगारसंघटनांना सुरवात

कामगार संघटनेची चळवळ ही इंग्लंडांत सतराव्या शतकांत म्हणजे यंत्रयुगापूर्वी शंभर वर्षें जन्मास आलेली होती. पण यांत्रिक कारखानदारी सुरू झाल्यावर तिच्या जुलुमाचा प्रतिकार करण्यासाठीं जी कामगार संघटना सुरू झाली तीच सामुदायिक प्रतिकार या नात्यानें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाची होय. " उत्पादनसाधनें ज्यांचीं स्वतांच्या मालकीचीं नाहींत, आपल्या श्रमानें उत्पन्न केलेल्या मालावर ज्यांचा ताबा नाहीं आणि उत्पादन-क्रियेवर ज्यांचें नियंत्रण मुळींच नाहीं अशा निव्वळ भाडोत्री जीवन कंठणाऱ्या कामगारांच्या या संघटना असत " यंत्रयुगाच्या फार पूर्वी शिंप्यासारख्या धंद्यांतील मजुर अशा प्रकारें कफल्लक झाले होते. पण यंत्रयुग अवतरल्यापासून या कफल्लक मजूरांची संख्या खूप वाढली व यांत्रिक कारखानदारीच्या जुलुमापासून आपलें संरक्षण करून घेण्यासाठीं संघटित प्रयत्न म्हणून कामगारसंघटनेचा उपाय कामगारांनीं हातीं घेतला. अठराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत सरकारचें लक्ष कामगार संघटनेकडे फारसें वेधलेंच नव्हतें. पण यांत्रिक उत्पादन सुरू झाल्यापासून सरकारला कामगार-संघटनेचें बळ जाणवूं लागलें. १७९९ पासून १८१३ पर्यंत ब्रिटिश पार्लमेंटच्या कायद्यांनीं व कोर्टाच्या निर्णयांनीं कामगारसंघटनांचा पुष्कळ छळ करण्यांत आला. १७९९ च्या कायद्यानें कामगारसंघटना या बेकायदा ठरविण्यांत आल्या. १८१२ त कोष्ट्यांनीं संघटना करून संप केला. त्याबद्दल

त्यांना गुन्हेगार ठरवून ४ पासून १८ महिन्यापर्यंत शिक्षा देण्यांत आल्या. १८१८ त सूत कांतणाऱ्या कामगारांनीं संप केला असतां त्यांना १३०५ मधील एका जुनाट कायद्याचा आधार घेऊन दोन दोन वर्षांच्या शिक्षा ठोठावण्यांत आल्या. "१९ व्या शतकाच्या पहिल्या वीस वर्षांत कामगारसंघटनांना बंडखोरांच्या व क्रांतिकारकांच्या संघटना लेखून त्यांचा इतका अनान्वित छळ करण्यांत आला कीं-कामगार संघटनांची मजबूत अशा प्रकारें वाढ होण्याऐवजीं अत्याचार व राजद्रोह यांकडेच संघटनेच्या पुढाऱ्यांची प्रवृत्ति वळली." असें सिडने वेब यांनीं लिहिलें आहे. पुढें सुशिक्षितांच्या 'रॅडिकल' पंथाचें लक्ष कामगार संघटनेकडे वळलें. त्यामुळें पार्लमेंटांत हळूहळू कामगार संघटनांना अनुकूलता उत्पन्न होवून १८२४ सालीं या कामगार संघटनेवरील सर्व बंधनें पार्लमेंटनें रद्द केलीं. बर्ट्रंड रसेलच्या मतें पार्लमेंटानें १८२४ सालीं केलेली कामगारसंघटनांचीही मुक्तता गाफीलपणानें केली होती. सरकारचें लक्ष धंद्यांच्या कोणत्याहि परिस्थितीकडे मुळींच नव्हतें. १८२४ चा कामगारसंघटना–स्वातंत्र्याचा कायदा होतांच चोहोंकडे संपाची एकच लाट उसळली आणि मग आपण काय केलें याचा अर्थ सरकारला कळून येऊन १८२५ सालीं संघटनावर बंदी घालण्याचे ११६० सालीं केलेले अनेक कायदे सरकारनें पुन्हां जिवंत केले. पण त्यानंतर अनेक अडथळे आले तरी कामगारसंघटना अजीबात नष्ट केव्हांच होवूं शकल्या नाहींत.

## कामगारसंघांची कामगिरी

ही कामगार संघटनांची वाढ व त्यांचे हेतु यासंबंधानें एन्जल्स लिहितो. "कारखानदारी धंद्याच्या प्रत्येक शाखेंत कामगारसंघटना निर्माण झाल्या. भांडवलदारांकडून कामगारांवर जो जुलूम व अन्याय होई त्यापासून कामगारांचें संरक्षण करण्याचें काम या संघटणा उघडपणें करीत. सामुदायिक करार करून मजूरीचे दर ठरविणें, संघटनेच्या सभासदांतर्फे मालकवर्गाशीं बोलणें करणें, धंदेवाल्यांच्या नफ्याच्या प्रमाणांत मजुरीचे दर ठरवून व जेथें शक्य तेथें ती वाढवून घेणें, कारखान्यांतील प्रत्येक शाखेंत मजूरीचे दर एकाच पातळीवर येतील अशी खटपट करणें इत्यादि हेतूनें या संघटना स्थापल्या जात व कार्य करीत. सर्व कारखानदारांनीं अमुक एका दरानेंच मजूरी द्यावी अशी मागणी कामगारसंघटनांचे प्रतिनिधि कारखानदाराकडे करीत. एकादा कारखानदार ही

मागणी मान्य करीत नसेल तर संपाच्या उपायानें त्यावर सक्ती होई. तसेंच शिकाऊ उमेदवारांची संख्या मर्यादित करून कामगारांचा पुरवठा मागणीपेक्षां अधिक होवूं नये याची काळजी या संघटना घेत. यामुळें मजूरीचे दर खालीं येण्यात आपोआप अटकाव होई. ज्यायोगें मजूरीचे दर खालीं येतील अशीं यंत्रें कारखान्यांत येऊं देण्यावरही कामगारसंघटना नियंत्रण घालीत. बेकारांना पैशाच्या द्वारें मदत करण्याचेंही कामगारसंघटना अंगावर घेत... १८३० त इंग्लंडांतील सर्व कामगारसंघटनांचें एकीकरण करण्याचाही प्रयत्न झाला होता."

## कामगारसंघांचें सामर्थ्य वाढलें

प्रथम प्रथम कामगारांना या संघटनांच्या सामुदायिक सामर्थ्याचें पूर्ण आकलन न झाल्यानें त्यांचीं ध्येयें उच्च व दूरदृष्टीचीं नसत. पण पुढें सुशिक्षितांतील 'रॅडिकल' मताचे तत्त्वज्ञ या चळवळींत लक्ष घालूं लागले तेव्हां कामगारसंघटना सामर्थ्यशाली बनल्या. रॉबर्ट ओवेन नांवाचा एक तत्त्वज्ञ व कारखानदार कामगारसंघटनेंत लक्ष घालूं लागला. थॉमस हॉड्ग्स्किन नामक एका विद्वानानें 'श्रम हेंच मूल्याचें उगमस्थान आहे' हें रिकार्डोचें मत खूप ताणून जमीनमालक व कारखानदार हे दोघेही चोरच आहेत आणि शेती व कारखानदारी या दोहोंचेंही सर्व उत्पन्न श्रमजीवी असा जो मजूरवर्ग त्यालाच मिळालें पाहिजे असा मतप्रचार सुरू केला. हॉड्ग्स्किन हा 'मॉर्निंग क्रॉनिकल' मध्यें कांहींसा उपसंपादकासारखा होता. तो मुख्य संपादक ब्लॅक याला पत्ता लागू न देता आपलीं 'कम्युनिस्ट' मतें 'मॉर्निंग क्रॉनिकल' मध्यें घुसडून देत असे. या सर्व प्रकाराचा जेम्स मिल् या क्लासिकल पंडितास एवढा संताप आला कीं त्यानें आपल्या मित्रास लिहिलेल्या एका पत्रांत ब्लॅकच्या नजरेस हॉड्ग्स्किनचें कारस्थान आणण्याबद्दल त्यास सांगून "अशा कम्युनिस्ट मतांनीं सुसंस्कृत समाजघटना उध्वस्त होईल आणि हूण व तार्तर या रानटी लोकांच्या हल्ल्यापेक्षांही वाईट परिस्थिति त्यामुळें उत्पन्न होईल" असा इषारा दिला होता. जेम्स मिलनंतर शंभर वर्षांनीं कम्युनिझम्नें नव्हे तर भांडवलशाहीकडूनच फॅसिस्टरूप धारण करून युरोपांत रानटी धुमाकूळ माजविला जाणार आहे याची मिल्लला त्यावेळीं कल्पनाही नव्हती. ओवेन हा 'सोशॅलिस्ट' होता. (त्याच्या सोशॅलिझम' चें स्वरूप कसें हें पुढें आपणांस पाहावयाचें आहे.) तो कामगारसंघटनाकडे आपल्या 'सोशॅलिस्ट' दृष्टिकोनांतून पाहात असे.

त्याला हवें असें यश कामगार-संघटनांना कधींच आलें नाहीं. पण १८४० पासून १८८० पर्यंत इंग्लंडांत कारखानदारांस एकसारखा वाढता नफा मिळत गेला, यामुळें कामगारांची परिस्थितिही सुधारत गेली.

## चार्टिस्टांचा उदय

१८४० पासून पुढील दहा वर्षे कामगार व मध्यम वर्ग यांच्या चळवळी इंग्लंडांत मोठ्या चेवानें चालल्या. या काळांत चार्टिस्ट नांवाचा एक मतपंथ उदयास आला होता. कामगारांच्या असंतोषावरच हा पोसला गेला होता. एंजल्स लिहितो, " कामगारास कायद्याबद्दल आदर असा कधींच वाटत नाहीं. कायदा बदलून घेणें शक्य होत नाहीं म्हणून कामगार त्यापुढें नाइलाजानें मान तुकवितो इतकेंच. म्हणून भांडवलशाही कायदा बदलून तेथें कामगारी कायदा आणण्याची खटपट कामगार करतो हें स्वाभाविक होय. या दृष्टीनें ब्रिटिश कामगारांनीं एक ' जनतेचा जाहीरनामा ' म्हणजे ' पीपल्स चार्टर ' जाहीर केला आहे. त्याचा हेतु शुद्ध राजकीय असून, इतर अनेक सुधारणां-बरोबरच, ब्रिटिश पार्लमेंटची संघटना पूर्ण लोकशाही पद्धतीची करावी असाही त्या जाहीरनाम्याचा हेतु आहे. भांडवलशाहीला कामगारांचा जो विरोध होता, त्यांचें संघटित स्वरूप म्हणजेच ही चार्टिस्ट चळवळ होती. कामगारसंघटना व संप यांमध्यें भांडवलदार आणि कामगार यांमधील लढ्याला स्थानिक व तुरळक स्वरूप असे. विशिष्ट भांडवलदारांशीं विशिष्ट कामगारांचा झगडा अशा संपांनीं व संघटनांनीं चालत असे. कामगार–कारखानदारांच्या एखाद्या झगड्यास केव्हां व्यापक स्वरूप आलेंच तर तें कामगारांच्या इच्छेमुळें न येता चार्टिस्ट चळवळीमुळें येत असे. कारण सर्व कामगारांनीं सर्व कारखानदारांच्या राजकीय सत्तेस विरोध करणें हें चार्टिस्ट चळवळीचें ठळक स्वरूप होतें. या राजकीय सत्तेच्या आधारावर कामगारांना कोंडणारी जी कायद्याची तटबंदी करण्यांत आलेली असे तिला खिंडार पाडणें हा या चार्टिस्ट चळवळीचा मुख्य हेतु होता."

## जनतेचा जाहीरनामा

पार्लमेंटचे सहा सभासद आणि लंडन वर्किंग मेन्स असोसिएशन या कामगार संघटनेचे कांहीं प्रतिनिधि यांच्या बैठकींत हा पीपल्स चार्टर तयार

करण्यांत आला होता. १८३२ सालीं ब्रिटिश पार्लमेंटच्या सुधारणेचा जो कायदा झाला त्यामुळें कारखानदार व इतर धनिक मध्यम वर्ग यांना व्यापक मताधिकार मिळाला. पण उलट कामगारांना मात्र वेस्टमिन्स्टर सारख्या कांहीं मतदार-संघांत असलेला मताधिकार काढून घेण्यांत आला, यामुळें कामगारपुढारी व रॅडिकल पंथाचे तत्त्वज्ञ चिडले व त्यांनीं हा जाहीरनामा तयार केला. ( १ ) वयांत आलेल्या सर्व स्त्रीपुरुषांस मताधिकार ( २ ) दरसाल पार्लमेंटची नवी निवडणूक ( ३ ) गुप्तमतदान ( ४ ) मालमत्ता नसणाऱ्यासही मतदानाचा हक्क ( ५ ) पार्लमेंटच्या सभासदांना पगार आणि ( ६ ) सारख्या मापाचे मतदारसंघ, अशा सहा मागण्या या जाहीरनाम्यांत करण्यांत आल्या होत्या. १८४८ सालापर्यंत ही चार्टिस्ट चळवळ कशीबशी टिकून होती. १८४८ मध्यें युरोपांतील अनेक राष्ट्रांत क्रांतिकारक बंडें झालीं त्यांत सर्व कामगारवर्गानें पुढाकार घेतला होता. इंग्लंडांतील चार्टिस्टांनीं आपला जाहीरनामा घेऊन पार्लमेंटच्या दाराशीं एक जंगी मिरवणूक नेली. पण ती पिटाळून लावण्यांत आली. यापुढें चार्टिस्ट चळवळीचा बहुतेक जोम संपला. गव्हांवरील आयात जकात रद्द करून घेण्याकरितां कॉब्डेन व ब्राइट या भांडवलदारांनीं 'ॲन्टी-कॉर्न-लॉ लीग' नांवाची संस्था काढली. परदेशी गव्हास इंग्लंडमध्यें येवूं देऊन गहूं स्वस्त करावा हा या संस्थेच्या चळवळीचा हेतु होता. त्या कामीं कारखानदार व कामगार एक झाले होते. यामुळे चार्टिस्ट चळवळीचें तेज बरेंच कमी झालें. पुढें गव्हाच्या आयातीवरील कर रद्द झाल्यानें जमीनदार वर्गाचें फार नुकसान होवून तो वर्ग कारखानदाराचे विरुद्ध झाला; अर्थात् त्यानें भांडवलदारांच्या नफ्यास यशस्वीपणें कात्री लावण्यासाठीं कामगारांची बाजू घेऊन कारखाना-नियंत्रणाचे अनेक कायदे करून घेतले. १८६७ त डिझरेली या जमीनदार वर्गाच्या म्हणजे त्यावेळच्या कॉंझर्वेटिव्ह मुख्य प्रधानानें पार्लमेंटच्या सुधारणेचें बिल पार्लमेंटांत मंजूर करून घेऊन कामगारवर्गास व्यापक प्रमाणांत मताधिकार मिळवून दिला. शिवाय वर सांगितल्याप्रमाणें १८४० पासून १८८० पर्यंत ब्रिटिश कारखानदारीची भरभराट होत गेल्यामुळें कामगार-संघटनेच्या कोणत्याही चळवळींत जोम अथवा चेव कधीच फारसा येवूं शकला नाहीं.

औद्योगिक ऊर्फ यांत्रिक कारखानदारीपासून कामगारवर्गावर जें संकट ओढवत आहे त्याचा संघटित प्रतिकार करणें हाच कामगार संघटनेचा हेतु असून चार्टिस्ट

चळवळ ही याच हेतूंतून जन्म पावली होती. केवळ कामगारांची स्थिति सुधारण्या-पुरतेंच बोलायचें तर या चळवळींना इंग्लंडांत यश येत आहेसें दिसल्यामुळेंच त्या चळवळींचा जोम उत्तरोत्तर कमी कमी होत गेला. तथापि भांडवली उत्पादनपद्धति ही यांत्रिक स्वरूपांत अवतरून जोमानें वाढूं लागल्यापासून तिच्याकडे अनेक विचारवंतांचें लक्ष मोठ्या तीक्ष्णतेनें वेधलें. ही पद्धति मानवजातीचें हित करण्याऐवजीं मानवजातीस संकटांत लोटीत आहे असा संशय विचारवंतांना येवूं लागून तिच्या अंगभूत गुणदोषांची चर्चा व्यापक व सूक्ष्म बुद्धीनें अनेक विचारवंत करूं लागले. याच विचारक्रमांत मार्क्सचा कॅपिटल ग्रंथ अवतरला असून त्याचें इतरही सर्व लेखन मुख्यतः याच दृष्टीनें त्यानें केलें. मार्क्सनें भांडवलशाहीची केलेली मीमांसा हीच अखेरीस सर्वश्रेष्ठ ठरली असली तरी त्याचेपूर्वी व त्याच्या वेळीं इतर अनेक विचारवंतांनीं भांडवलशाहीची मीमांसा आपापल्यापरीं केली, भांडवलशाहीपासून ओढवणाऱ्या अनेक अनर्थांच्या प्रतिकाराचे उपाय सुचविले आणि त्यांचे प्रत्यक्ष प्रयोगही करून पाहिले. मार्क्सच्या मीमांसेचें वैशिष्ट्य व कॅपिटलमध्यें त्यानें मांडलेल्या सिद्धां-तांचें रहस्य समजून घेण्यास या इतर विचारवंतांचें म्हणणें समजून घेणें अवश्य असल्यानें भांडवलशाहीच्या प्रमुख मीमांसकांच्या विचारांची माहिती पुढें संक्षेपानें देतों.

---

## रॉबर्ट ओवेन : : : ४

### बालवयापासून अधार्मिक

या विचारवंतांत कामगारसंघटनेचा पुरस्कर्ता म्हणून वर उल्लेखिलेला रॉबर्ट ओवेन हा ब्रिटिश कारखानदार व तत्त्वज्ञ अग्रगण्य मानला जातो. रॉबर्ट ओवेन हा एका पोस्टमास्तराचा मुलगा. इंग्लंडांत मॉंटगॉमरी शायरमधील न्यू टाउन येथें तो १७७१ त जन्मला. आयुष्यभर नाना खटाटोप, चळवळी आणि खळबळी त्यानें केल्या, वयाच्या ८७ व्या वर्षी अपयशाचे ओझें पदरांत घेऊन तो स्वग्रामीं परत आला व तेथेंच १८५८ त मरण पावला. त्याच्या आयुष्यांतील कर्तृत्वास अगदीं लहानपणीं आरंभ झाला व अगदीं अखेरपर्यंत अविश्रांतपणें त्याची धडपड चालू राहिली. वयाच्या चवथ्या वर्षी तो शाळेंत गेला. सातव्या वर्षापर्यंत लिहिणें, वाचणें व हिशेब करणें या कर्मीत कमी आवश्यक विद्येचा त्रिफळा त्यानें पोटांत रिचविल्यावर शालेय अभ्यासाकडे त्यानें फारसें लक्षच दिले नाहीं. अगदीं लहान वयांतच तो धर्मगुरूंच्या वाचनमंदिरांत जाऊन धर्म-प्रथांचा अभ्यास करूं लागला. त्यानें धर्मांचा जो जो अधिक अभ्यास केला तों तों तो पाखंडीच बनत गेला. या धर्माभ्यासासंबंधानें ओवेन स्वतःच लिहितो, " सर्व धर्मपंथांची पुस्तकें मी जसजशी वाचूं लागलों तसतसें एकाच ख्रिस्ती धर्मांत अनेक पोटपंथांचा परस्परास असलेला विरोध पाहून मी चकित झालों. नंतर ज्यू, ख्रिस्ती, मुसलमान, हिंदु, चिनी, इत्यादि, तसेंच पेगन व इन्फिडेल म्हणून ज्यांना म्हणतात त्या सर्वांचें वाङ्मय मीं वाचलें. त्यांच्यांत परस्पराबद्दल असलेल्या द्वेषभावनेचेंही मला आश्चर्य वाटलें. यासंबंधीच्या खोल

अभ्यासानें मी या सर्व धर्मपंथांच्या सत्यतेबद्दल शंकित झालों. आणि धर्मांचें आजवर जें शिक्षण दिलें गेलें आहे त्या पद्धतीअनुसार पाहतां सर्वच धर्मांत मूलतःच काहीं तरी चूक असली पाहिजे अशी माझी वयाच्या दहाव्या वर्षींच खात्री झाली." भांडवलशाही पद्धतीस विरोध करण्यांतच ओवेनचें सर्व आयुष्य गेलें. तो कम्युनिस्ट कधींच झाला नाहीं. पण तरीही भांडवलशाहीचें कट्टे विरोधक असे जे कम्युनिस्ट त्यांचे धार्मिक बाबतींतलें 'पाखंड' ओवेनचे अंगीं अगदीं बालवयापासून भिनलें होतें. ही गोष्ट कम्युनिस्टांच्या धर्मपाखंडास नांवें ठेवणाऱ्यांनीं ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. असो.

## धंद्यांत यशस्वी

ओवेननें लंडनला जाऊन एका दुकानांत नोकरी धरली. तो ताबडतोब मालकाचा फार आवडता नोकर झाला. धर्मांचें बाबतींत मात्र तो मालकाशीं नेहमीं भांडत असे. उद्योगधंद्यांत त्यास एकसारखें यशच येत गेलें. वयाच्या विसावे वर्षीं तो एका कारखान्यांत भागीदार झाला. पुढें ही भागीदारी सोडून डेव्हिड डेल नामक एका स्कॉटिश कारखानदाराच्या 'न्यू लानार्क' नांवाच्या गिरणींत त्यानें नोकरी पत्करली. तेथें ओवेन व डेव्हिड डेलची मुलगी यांचें प्रेम जमलें. डेल हा धर्मनिष्ठ असल्यानें ओवेनला जांवई म्हणून पत्करण्याचें त्यानें प्रथम नाकारलें. पण ओवेन हा मॅनेजर असून त्यानें कारखाना इतका चोखपणें चालविला कीं डेव्हिड डेल यानें ओवेनवर खूष होऊन त्याला व भागीदारांना त्यानें आपली गिरणी ६० हजार पौंडांना विकून टाकली. पुढें लवकरच म्हणजे १७९९ चे सप्टेंबरमध्यें ओवेननें डेलच्या मुलीशीं लग्नहि केलें. ती स्वतः बापाप्रमाणें अतिशय धर्मनिष्ठ होती. आणि 'आपला पति पांखंडीपणामुळें नरकांत जाणार अशी तिला खात्री होती,' पण ती १८३१ त मरेपर्यंत तिनें पतीवर अखंड प्रेम केलें. 'ओवेनला आपल्या अनेक खटाटोपांतून फुरसत मिळे तेव्हां तोही तिच्यावर प्रेम करीत असे.' ओवेन कारखाना उत्तम चालवी म्हणून त्याचें सर्व भागीदार त्यावर खूष होते. मानवजातीच्या कल्याणार्थ ओवेनला जें करायचे होतें त्याचा 'न्यू लानार्क' मध्यें त्यानें आरंभ केला.

## सुधारणेचे प्रयोग

कारखान्यांत नवीन यंत्रसामुग्री आणून त्यानें एक चांगला व्यवस्थापकही नेमला. नंतर त्यानें कारखान्यांत व मजूरांच्या बसाहतींत चोरीचे गुन्हे खूप

हात होते ते कोणतीही शिक्षा न करतां बंद केले. दारू पिऊन बेशुद्ध होणाऱ्यांचा पिच्छा त्यानें पुरविला. रात्रीं न्यू लानार्कच्या रस्त्यांत दारू पिऊन बेहोष झालेल्यांना पकडण्यासाठीं त्यानें पहारेकरी नेमले व गुन्हेगारास अल्पशी दंडाची शिक्षा ठेवली. रस्तोरस्तीं स्वच्छता राहावी याची त्यानें दक्षता घेतली. कामगारांत उद्योगीपणा वाढावा यासाठीं त्यानें एक मजेदार युक्ति योजली. त्यानें लाकडाचे चौकोनी ठोकळे घेऊन प्रत्येक बाजूस काळा, निळा, पिवळा व पांढरा असे चार रंग फासले. वाईट, मध्यम, चांगला, उत्तम असा त्या चार रंगांचा अनुक्रमें अर्थ होता. प्रत्येक कामगाराजवळ एकेक ठोकळा ठेवण्यांत येवून उद्योगीपणांत त्याचा जो वर्ग असेल त्या रंगाची त्या ठोकळ्याची बाजू पुढें करून ठेवण्यांत येई. पहिल्या दहा वर्षांत त्याच्या कारखान्याचें उत्पादन इतकें वाढलें कीं भांडवलावर ५ टक्के व्याज सुटून शिवाय एकूण धंद्यावर ६० हजार पौंड नफा उरला. त्यानें न्यू लानार्क हा कारखाना घेतला तेव्हां त्यांत १८०० ते २००० मजूर होते. पैकीं ५०० गरीब मुलें सरकारी श्रमगृहांतून घेण्यांत आली होती. यापुढें त्यानें दरिद्री मुलें घेण्याचें बंद केलें. फक्त १० वर्षें वयावरील मुलें शेजारच्या लानार्क गांवांतून त्यांच्या पालकांच्या संमतीनें आणण्याचा उपक्रम त्यानें सुरू केला. धंद्यांत नफा सुटायला हवा म्हणून या मुलांना तो फार सवलती देऊं शकत नसे, तरी ज्या थोड्या सवलती तो देई त्यामुळेंही त्याचे भागीदार कुरकुरत. अशा चिरचिऱ्या भागीदारांच्या रकमा देऊन टाकून त्यानें नवे उदार भागीदार मिळविले. प्रसिद्ध व्यक्तिस्वातंत्र्यवादी पंडित जेरेमी बेंथॅम यानें ओवेनला ही भागीदारबदली घडवून आणण्याचे कामीं पैशानें मदत केली होती. त्याच्या कामगारांनींही त्यास फार त्रास दिला. पण १८०६सालीं अमेरिकेनें इंग्लंडला कापूस पाठविण्याचें बंद केल्यानें चार महिने न्यू लानार्क कारखाना बंद ठेवावा लागला त्यावेळीं ओवेननें भरपगारांवर कामगारांना कामावर ठेवलें. यामुळें कामगारांचा त्याजवर दृढविश्वास बसला. वसाहतींतल्या मुलांसाठीं ओवेननें शाळा घातली.

## नवमताचा पुरस्कार

माणूस शिक्षणानें शील बनेल तसा बनतो असा त्याचा सिद्धांत होता व शील सुधारणें हें त्याच्या शिक्षणाचें मुख्य ध्येय होतें. न्यू लानार्कची कीर्ति युरोपभर पसरली. वीस हजार लोकांनीं न्यू लानार्कला भेट दिली. पुढें झार

झालेला रशियन राजपुत्र निकोलस ओवेनच्या घरीं एक रात्र राहिला असतां ओवेननें दोन तासपर्यंत आपलें उदात्त विचार या भावी झारला पाजले. झार आपले विचार ऐकत आहे कीं नाहीं याचेंही अवधान ओवेनला नव्हतें. १८१३ त ओवेन लंडनला आला असतां त्यानें अनेक 'रॅडिकल' तत्त्वज्ञांच्या ओळखी करून घेतल्या व तो मुख्य प्रधानालाही भेटला. 'ए न्यू व्ह्यू ऑफ सोसायटी' (समाजव्यवस्थेसंबंधी एक नवें मत) हें पुस्तक त्यानें १८१४ सालीं प्रसिद्ध केलें. त्यांत मनुष्याचें शील त्याच्या परिस्थितीप्रमाणें बनत असून माणसाचें शील सुधारणें हें पुष्कळ अंशीं शक्य आहे हा सिद्धांत त्यानें मांडला. हे पुस्तक त्यानें अनेकांना पाठविलें. नेपोलिअन त्यावेळीं एल्बा बेटांत होता. त्यालाही त्यानें तें पाठविलें होतें. नेपोलिअननें तें वाचून त्यावर अनुकूल अभिप्राय देऊन ओवेनकडे तें परत केलें होतें.

## कारखानदारी काळजाचा नमुना

'१० वर्षांखालील मुलांना कारखान्यांत कामावर लावूं नये आणि १८ वर्षांखालील मुलांना साडेसहा तासाहून अधिक वेळ काम देऊं नये' असें बिल पार्लमेंटांत आणण्याबद्दल ओवेननें १८१५ सालीं खटपट केली. त्यावेळीं कारखानदाराचें काळीज हा काय नमुना आहे याचा ओवेनला अनुभव आला. बिल पार्लमेंटांत आणण्यास कारखानदारांनीं अनंत अड-चणी आणल्या. शेवटीं बिल एकदाचें आलें व त्यावर चौकशी कमिटी बसली. कमिटीसमोर कारखानदारांनीं साक्षी दिल्या त्या मासलेवाईक होत्या. "कारखान्यांत पुष्कळ काळपर्यंत मुलें काम करतील तर त्यांच्या शीलावर त्याचा चांगला परिणाम होतो असें बहुतेक कारखानदारांचें मत पडलें. कारखान्यांत मुलगा चौदा तास काम करीत राहिला तर तो आज्ञाधारक, उद्योगी व वक्तशीर होतो. मुलांचे तास कमी करूं नये हें त्यांच्याच हिताचें आहे. शिवाय कारखान्याच्या व्यवस्थेंत कायद्यानें हस्तक्षेप केल्यास विदेशाशीं होणाऱ्या चढाओढींत कारखाना टिकणार कसा? कारखानदार ठार होतील आणि मग सर्वजणच बेकार होतील." हें बिल पुढें १८१८ पर्यंत असेंच लोंबकळलें. पुढें हौस ऑफ कॉमन्समध्यें तें पास झालें तरी पण हौस ऑफ लॉर्ड्समध्यें त्यास विरोध झाला. मुलांच्या दीर्घश्रमानें त्यांना अपाय होत नाहीं असेंच डॉक्टरांना वाटलें. "दिवसाच्या चोवीस तासांपैकीं २३ तासपर्यंत मुलें काम करीत राहिलीं तरी त्यांना अपाय होईल अशी कबूली

देण्यास एका प्रख्यात डॉक्टरानें साफ नाकारलें." शेवटीं १८१९ त बिलाची खूप छाटाछाट होवून तें मंजूर झालें. तथापि त्याची बजावणी मुळींच होणार नाहीं अशी सर्वांची खात्री होती. अनुभवही तोच आला.

भावी काळांत 'सोशॅलिस्ट' म्हणून जो मतपंथ उदयास आला त्याचा मूळ प्रवर्तक रॉबर्ट ओवेन हाच होय असें मानलें जातें. आरंभीं आरंभीं भावी व्हिक्टोरिआ राणीचा बाप ड्यूक ऑफ् केंट, ड्यूक ऑफ् यॉर्क, आर्च-बिशप ऑफ कँटरबरी वगैरे कित्येक सरदार व धर्मगुरु यांच्या सहानुभूतीचा व स्नेहाचा पाठिंबा ओवेनला मिळाला होता. ओवेन आपले विचार मोठ्या कौशल्यानें मांडी. यामुळें या सर्व बड्या श्रोत्यांना ते ऐकावेसे वाटतच. पण पुढें त्याचा प्रामाणिकपणा हा या श्रोत्यांना जाचक वाटूं लागून त्यांनीं हळूहळूं त्याचा नाद सोडला. १८१७ सालीं जी पुअर लॉ चौकशी समिति नेमलेली होती तिजसमोर ओवेननें आपल्या सूचना मांडल्या. नेपोलिअनशीं चालू असलेलें युद्ध संपून लोकांचा जीव थोडा खालीं पडला होता. पण युद्ध थांबल्यानें मालाची मागणी एकदम कमी होऊन बेकारी वाढली. त्यामुळें जनतेचा जीव पुन्हा अधांत्रीं लटकूं लागला. "युद्ध थांबलें खरें पण त्याच दिवशीं कारखानदारांचें एक मोठें गिऱ्हाईक ठार झालें" असें ओवेननें म्हटलें आहे. शिवाय नवीं नवीं यंत्रें कारखानदार कारखान्यांत आणून कामगारांच्या रोजगारीवर संक्रांत आणीत होते. यंत्रानें माल स्वस्त होईल, त्यामुळें गिऱ्हाईक वाढेल आणि त्यामुळें मजूरांची रोजगारी पुन्हां वाढेल असें आशाळू भाकित केलें जात होतें. पण त्यासाठीं विदेशचे बाजार हवे होते उलट नेपोलिअनचें युद्ध थांबताच युरोपांत संरक्षक जकातींची लाट उसळली व विदेशी बाजार बंद झाले. आणि विदेशी बाजार कांहीं झालें तरी अमर्याद वाढणें शक्य नव्हतें.

## भांडवलशाही अनर्थाची आद्यमीमांसा

यंत्रांनीं माणसाची उत्पादन-शक्ति वाढविली, पण त्यापासून खरोखर कोणते प्रश्न निर्माण झाले यासंबंधानें ओवेन सांगतो, नेपोलिअनचा पराभव झाल्यानंतर "जी शांतता स्थापन झाली त्यावेळीं इंग्लंडमध्यें एक नवी शक्ति निर्माण होऊन ती सतत चालू राहिली होती. अतिशय उद्योगी अशा दहा कोटि माणसांच्या शक्तीहून ही शक्ति मोठी होती. एकच उदाहरण घेऊं. केवळ २५०० माणसांनीं चालविलेला एक कारखाना येथें आहे. त्यांत जेवढें

काम होतें तेवढें करण्यास पन्नास वर्षांमागें स्कॉटलंडची सर्व लोकसंख्या राबवावी लागली असती. आणि ग्रेटब्रिटनमध्यें असे कारखाने कितीतरी आहेत...... म्हणजे युद्धसमाप्तीचे वेळीं गेल्या २५ वर्षांतच आमचें उत्पादन-सामर्थ्य इतकें वाढलें होतें कीं जणूं कांहीं एवढ्या थोड्या काळांत आमची लोकसंख्या पंधरा ते वीसपट वाढली आहे.... पण आतां युद्धकाळची मालाची मागणी बंद झाली आहे. नवीन बाजार मिळूं शकत नाहीं. आणि उत्पादनशक्ति इतकी अफाट वाढली आहे कीं याच प्रमाणांत उत्पादन चालू ठेवायचें म्हटलें तर साऱ्या जगाची मिळकत हा माल खरेदी करायला पुरणार नाहीं. युद्ध थांबतांच मागणी कमी झाली. अर्थात् उत्पादनाचा खर्च कमी करण्याचा उत्तम उपाय अशीं जीं यंत्रें तीं कारखानदारांनीं वाढविलीं. आणि मजूर कमी केले. यामुळें मजूरांत बेकारी व रोजगारीसाठीं चढाओढ वाढून आतां चरितार्थाला कमींत कमी लागते त्याहूनही कमी मजूरीवर नोकरी करण्यास राजी असे अनेक कामगार मिळूं शकत आहेत...या यंत्रशक्तीशीं झगडण्यास पुरेसें सामर्थ्य कामगारांत मुळींच नव्हतें. यंत्रें बंद करणेंही शक्य नव्हतें. तेव्हां लक्षावधि माणसांनीं उपाशी मरावें अशी वेळ आली आहे; नाहींतर दरिद्री आणि बेकार कामगारांना किफायतशीर असा रोजगार देणें अवश्य आहे. त्यासाठीं, आजच्या प्रमाणें माणसांची हकालपट्टी करून तेथें यंत्रें आणणें हा जो प्रकार सुरू आहे त्याऐवजीं कामगारांच्या सेवेस यंत्रें देणें हा उपाय अवलंबणें अवश्य होतें."

ओवेनचे हे विचार इतके खोल होते कीं औद्योगिक भांडवलशाहीनें उत्पन्न केलेल्या प्रश्नांवर प्रथम ओवेननेंच इतका लख्ख प्रकाश पाडला असें बर्ट्रंड रसेलचें मत आहे. रसेल सांगतो, " यंत्रें निरुपयोगी म्हणून नाकें मुरडणें हें निरुपयोगी आहेच, पण जुन्या आर्थिक शक्तींना मोकाटपणें वाटेल तसें वावरूं दिलें तर या यांत्रिक जगांत माणसें दरिद्री आणि गुलाम होतील. हें संकट दूर करण्यास ' चाहे सो करो ' ( लेसेझ फेरे ) हें व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्वज्ञान चूक असून आर्थिक जीवन योजनापूर्वक आंखलें पाहिजे. ओवेनचें हें मत असून आज आम्हांभोवतीं आहे अशी परिस्थितिच लहान प्रमाणांत त्याच्याभोवंतीं होती, तेव्हां तो तें प्रतिपादीत होता. पहिल्यानें परदेशी व्यापाराची वाढ झाली आणि मागाहून आर्थिक साम्राज्यशाही पुढें आली. यामुळें ओवेनचें मत शंभर वर्षें मागें पडलें. पण या दीर्घ कालानंतर आतां ओवेनच्या काळच्या अर्थशास्त्रज्ञांच्या दृष्टींतून सुटलेले आर्थिक विकासाचे सिद्धांत त्याला त्यावेळींच दिसले होते ही

गोष्ट सिद्ध झाली आहे. त्यावेळीं लोकसंख्येचा जो सिद्धांत सर्वसंमत होता त्याच्या आधारें प्लेस या तत्त्वज्ञानें ओवेनचा युक्तिवादांत पराभव केला; पण दीर्घकालानंतर तो लोकसंख्येचा सिद्धांतच खोटा ठरून ओवेनचें मतच खरें ठरलें आहे."

## ओवेनची योजना

"पण ओवेननें या संकटाचें पृथक्करण अगदीं सूक्ष्मपणें केलें तरी त्याचें संकट निवारणाचे उपाय तसे मूलग्राही नव्हते" असें मत रसेलनेंच दिलें आहे. हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे. 'पुअर लॉ कमिटी' पुढें ओवेननें मांडलेली योजना पुढीलप्रमाणें होती. खेड्यांतलें बेकार लोक एकत्र करावें, त्यांनीं सहकार्यानें जमिनीची मशागत करावी, तसेंच कांहीं धंदेही सहकार्यानें करावे. पण एकंदरीनें त्यांनीं सामान्यतः शेतीचेच व्यवसाय करावें. या सर्वांनीं जवळ जवळ बांधलेल्या इमारतींतून राहावें. सर्वांमिळून एक वाचानालय, व एकच सैंपाकघर ठेवून सर्वांनीं एकत्र जेवण करावें. तीन वर्षांवरील मुलांनीं आईबापाजवळ न राहता त्यांना बोर्डिंगांत ठेवावें. लहानपणापासून त्यांच्या शिक्षणाची उत्तम सोय व्हावी. सर्वांनीं गुण्यागोविंदानें एकत्र राहून धनोत्पादन सामुदायिक करावें. शेती शास्त्रशुद्ध व्हावी. यासाठीं रसायनशास्त्राचे अगदीं नवे नवे शोधसुद्धा उपयोगांत आणून थोड्या जागेंत पुष्कळ पीक काढण्यांत यावें, वगैरे. ही योजना त्यानें खेड्यांतील गरीब बेकारापुरतीच आंखली होती. कारखानदारी उत्पादनासाठींही त्यानें स्वतंत्र योजना आंखल्या होत्या. ओवेनच्या या शंभर वर्षांपूर्वींच्या योजना आजच्या कम्युनिस्ट रशियाच्या योजनासारख्या दिसतात. त्या दोहोंत मूलभूत फरक कोणता आहे त्याची चर्चा पुढें करण्यांत येईल. पण आज भांडवलशाही राष्ट्रांत सुद्धां पुष्कळ तत्त्वज्ञ अशी योजना मांडून त्यांची गंभीरपणें चर्चा करीत आहेत. ओवेनच्या काळीं मात्र त्याच्या योजनांची हुर्यो झाली. पीकॉक नामक लेखक ओवेनच्या योजनेसंबंधानें लिहितो, "हे आमचे 'भलेराव' (मि. टू-गुड) सहकारवादी आहेत. त्यांना ईश्वराची प्रार्थनाही नको आणि माणसाशीं लढणेंही नको. बुद्धिबळाच्या पटाप्रमाणें जगाच्या पटावर चौकटी आंखून एकएका चौकटींत एकेक वसाहत वसवावी. तिनें आपलें उत्पादन सामुदायिक करावें. त्या वसाहतींत शिंप्यापासून सैंपाक्यापर्यंत सर्वांना जी निसर्गशक्ति लागेल ती पुरविण्यासाठीं एक सामुदायिक वाफेचें एंजिन असावें." ओवेनच्या या

योजनेचा गंभीरपणें विचार कोणीच करीत नव्हतें. त्या योजनेच्या अमलबजावणीस अडचणी तर अनंत होत्या. पण त्या सर्वांहून मोठी अडचण होती ती भांडवलाची होती. १२०० माणसांच्या एका वसाहतीस ९६ हजार पौंड भांडवल लागेल असा स्वतः ओवेनचाच अंदाज होता. दरमाणशीं ८० पौंड खर्चून सगळ्या मानवजातीला नव्या संसाराला लावण्याचा प्रयत्न करण्यास त्यावेळीं कोणीच धजणार नव्हतें. ओवेननें जाहिरातबाजी खूप केली. निरनिराळ्या वृत्तपत्रांच्या संपादकाकडून त्यानें पाठिंबा मिळविला. 'टाइम्स'नेंही त्याची पाठ थोपटली. ज्या पत्रांत प्रशंसा येई त्याच्या ३० हजार प्रति विकत घेऊन तो मोफत वाटीत असे. वर्तमानपत्रकारांना हें मोहन भरपूर असल्यानें तेही ओवेनला शाबास म्हणून मोकळे होत. आपली योजना सर्वस्वी नवी नसून पूर्वी जॉन बेलर्सनें ती मांडली होती असें ओवेन सांगतो.

## धर्म दुःखाचें मूळ

१४ ऑगस्ट १८१७ रोजीं ओवेननें एक व्याख्यान देऊन आपली योजना मांडली. ही योजना कोणालाही सहज पटेल असें मानण्याइतका तो भोळा होता. कांहीं स्थूलदर्शी लोकांनीं त्याला वाहवा म्हटलेंही. पण लवकरच विरोध सुरू झाला. कॉबेट व इतर 'रॅडिकल' पुढाऱ्यांनीं ही एक कुचेष्टा आहे असें म्हटलें. गरीब लोक सुखी झाले कीं त्यांना खूप मुलें होतात व पुन्हां ते दरिद्री होतात असें सांगून माल्थसनें त्याचा धिःकार केला. रिकार्डो साधारण अनुकूल होता. साउदे कवीनें ओवेन अधार्मिक आहे म्हणून त्याचा धिक्कार केला. पण धर्माच्या बाबतींत ओवेन तडजोडीस मुळींच तयार नव्हता. २१ ऑगस्टला पुन्हां एक व्याख्यान त्यानें दिलें. त्यांत आपण स्वतः तर खिस्ती नाहींच पण धर्म हाच मानवी दुःखाचें सर्व मूळ आहे, असें त्यानें आपलें मत मांडलें. तो म्हणाला, "मित्रहो, मी आपणाला सांगतों कीं, आजवर खरोखर सुख म्हणजे काय हेंच माणसाला कळूं देण्यांत आलें नव्हतें. आणि याचे कारण आजवर मानवजातीला शिकविण्यांत आलेल्या धर्माशीं संबंद्ध अशा ज्या अनेक चुकीच्या समजुती त्या होत. त्यामुळें मानवी जीवन विसंगत व दुःखी झालें आहे. धर्मांतील या चुकीच्या समजुतीमुळें माणूस हा दुर्बल आणि मूर्ख, अथवा भयानक राक्षस व माथेफिरू, अथवा दुर्दैवी आणि ढोंगी झाला आहे या धर्माच्या कल्पना आपण खेड्यांत तर नेऊंच

नयेत पण स्वर्गातल्या नंदनवनांत जरी त्या नेल्या तरी त्याचा त्या उकिरडा करून टाकतील."

## पैशाऐवजीं श्रमचिठ्या

धर्मासंबंधानें कट्टर कम्युनिस्टही याहून अधिक कठोर भाषा वापरत नसतील. धर्मासंबंधानें ओवेननें आपली भूमिका अशी पुन्हां पुन्हां स्पष्ट केल्यानंतर मात्र सरदार, धर्मगुरू, टाइम्स, मॉर्निंग पोस्ट यांनीं ओवेनपासून पळ काढला. आतां कोणी त्याच्या वाऱ्यालाही उभे राहीना. 'कारखान्यांतील मुलांची बाजू घेणारा हा सुधारक नास्तिक राक्षस आहे' याचें ऐकू नका म्हणून कारखानदारांनीं गिल्ला करून मुलांच्या नोकऱ्यासंबंधानें पार्लमेंटांत ओवेनच्या प्रयत्नानें आलेल्या बिलास त्यांनीं विरोध केला. तथापि कोणत्याही विरोधास न जुमानतां एकतरी शेतीची वसाहत करावी असें ठरवून तो भांडवल जमवूं लागला. पण कांहींच साधलें नाहीं. सरकार आपलें म्हणणें ऐकून घेत नाहीं असें पाहून त्यानें स्थानिक स्वराज्य संस्थांकडे दाद मागण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें त्यानें लानार्क कौंटीकडे एक अर्ज केला. त्यांत 'लेबर नोट' म्हणजे 'श्रम-चिठ्या' या पैशाऐवजी वापराव्या असें सुचविलें होतें. अमुक एका मालांत श्रम किती सांठवले आहेत तें पाहून त्या अनुरोधानें त्या मालाची किंमत ठरवावी. आणि पगार हे श्रमाच्या मापानें द्यावे. ओवेन सदर अर्जांत म्हणतो, 'तत्त्वतः मानवी श्रम हेच मूल्याचें निसर्गसिद्ध माप होत.' ही पद्धति उपयोगांत आणल्यास ती खरोखर चमत्कार करून दाखवील असें त्यास वाटे. खरी अडचण भरपूर उत्पादन करण्यांत येणारी नसून बाजार मिळविणें ही आहे. बाजार हे कामगारांच्या गिऱ्हाइकीमुळें निर्माण होतात. त्यांची मजुरी किती त्यावर ही गिऱ्हाइकी अवलंबून असते. म्हणजे बाजार वाढविण्याचा उपाय मजुरी वाढविणें हाच. "पण समाजाची हल्लींची जी मांडणी आहे तीमुळें कामगाराला त्यानें केलेल्या श्रमाबद्दल पुरेसें वेतन मिळणेंच शक्य होत नाहीं. आणि म्हणून बाजारांत नेहमीं मंदी राहते." अतिश्रमविभाग ओवेनला पसंत नव्हता. मुलांना सर्व बाजूंचें शिक्षण मिळावें. उत्पादनांत कारखानदारी आणि शेती यांचा संयोग करण्यांत यावा. शिक्षण हेंच सर्व मानवी भवितव्याचा पाया आहे असें ओवेन मानी. त्यामुळें सर्वांना पुरेसें धन व सुख मिळेल, युद्धें, गुन्हे आणि तुरुंग नाहींसे होतील. जग सारें सुखी होईल. अखेरला लानार्क कौंटीनेंही कांहींच केलें नाहीं.

## न्यू हार्मनीचा प्रयोग

१८२४-१८२८ हा काळ त्यानें पुन्हा नवे प्रयोग करण्यांत घालविला. ओवेनसारखाच एक ध्येयवादी जर्मन सुधारक जॉर्ज रॅप यानें अमेरिकेंत इंडीआना येथें आपल्या अनेक अनुयायांसह 'हार्मनी' नांवाची एक वसाहत स्थापली. त्यांनीं विवाह (!) आणि तंबाकू यांस फाटा दिला होता. त्यांची भरभराटही बरीच झाली. पुढें त्यांनीं ही 'हार्मनी' विकायला काढली. ती ओवेननें खरेदी केली. तिला त्यानें 'न्यू हार्मनी' असें नांव दिलें. आणि अमेरिकन अध्यक्ष व काँग्रेस यांनीं नवीन वसाहतीचा प्रयोग करावा म्हणून त्यांची आराधना केली. पण त्याचें कोणीं ऐकलें नाहीं व या नव्या वसाहतीत ओवेनचे ४० हजार पौंड बुडाले. ओवेनचे मुलगे पुढें या वसाहतींत आले व यशस्वी अमेरिकन नागरिक झाले. ओवेननें स्थापलेलें न्यू हार्मनी हें शहरही पुढें पुष्कळ नांवारूपास आलें. कामगार संघटनांच्या चळवळींत ओवेननें बराच भाग घेतला होता असें मागें सांगितलें आहेच. पण लवकरच नुसत्या कामगार-संघटनांनीं समाजस्थिति सुधारत नाही असें पाहून त्यानें तो नाद सोडला. नास्तिकवाद व क्रांति यांचा प्रसारक म्हणून आतां शिष्ट समाजांत त्याचा धिक्कार होवूं लागला. १८३५ त विवाहसंस्थेविरुद्ध त्यानें अनेक व्याख्यानें दिलीं. यामुळें त्याची फार दुष्कीर्ति झाली. विवाहानें स्त्रियांवर खासगी मालकी स्थापन होते म्हणून विवाहच नको आणि मुलांना कौटुंबिक वातावरण अगदींच अपायकारक असते वगैरे मतें त्यानें जाहीरपणें सांगितलीं. यामुळें या माणसास मोकळा न सोडता तुरुंगांत घातला पाहिजे अशी बिशप ऑफ एक्झिटर या धर्मगुरूनें ओवेनविरुद्ध ओरड केली होती.

## ओवेनचें ऐतिहासिक कार्य

भांडवलशाही पद्धतीची मूलग्राही मीमांसा करून तिच्यांत आमूलाग्र फरक केल्यावाचून मानवजातीचें कल्याण साधणार नाहीं असें मत अभ्यास, अनुभव व प्रयत्न यांचा जोरावर मांडणारा ओवेन हा भांडवलशाहीविरोधक्रांतील पहिला व मोठा थोर पुरुष होय. धनोत्पादनसाधनें सामुदायिकपणें वापरलीं तरच त्यांच्या मानवजातीस उपयोग होवूं शकेल हें त्यानें ताडलें व आपल्या नवीन समाजरचनेच्या कल्पना या भूमिकेवर उभारल्या म्हणूनच त्यास 'सोशॅलिस्ट मताचा मूळ पुरस्कर्ता असें मानलें जातें. ओवेनचें ऐतिहासिक कार्य कोणतें हें सांगतांना राय्झेनॉफ् हा रशियन कम्युनिस्ट लेखक लिहितो, "......ओवेनला कम्युनिस्ट मतें पटूं लागल्यानंतर भांडवलशाही समाजरचनेंचें कम्युनिस्ट समाजरचनेंत रूपांतर करण्यास जे मुख्य अडथळे होते त्यांवर त्यानें हल्ला

चढविला. खाजगी मालकी, धर्म आणि विवाहसंस्था हे त्याच्या मतें प्रमुख अडथळे होत. ओवेन हा खणखणीत भौतिकवादी होता. माणसाच्या ठिकाणीं मूळच्या कल्पना, गुण, नैतिकभावना, विवेकबुद्धी वगैरे कांहींहि नाहीं; अतिमानुषशक्तींनीं माणसाच्या ठिकाणीं यांची प्रेरणा होते हेंही खरें नव्हे. माणसाचें शील बाह्य परिस्थितीमुळें बनत असते. 'कापूस अथवा दुसरा एकादा माल जसा माणसांनीं बनविलेला असतो त्याप्रमाणेंच सदसद्विवेकबुद्धिही बनविलेली असते,' हें विधान, अनैतिहासिक दृष्टीनें बोलणाऱ्या कोणाही भौतिकवाद्याच्या विधानाहून अधिक अर्थपूर्ण आहे. मजूरांची परिस्थिति सुधारण्यासाठीं कायदे करून घेण्याच्या कामांत ओवेननें तात्त्विक व व्यावहारिक दृष्टीनें महत्त्वाची कामगिरी केली. मुलांना कारखान्यांतील कामाबरोबरच बौद्धिक शिक्षण दिलें पाहिजे ही गोष्ट प्रथम ओवेननेंच प्रचारांत आणली. धनाचें उत्पादन आणि वाटणी या बाबतींत सहकार पद्धति अवलंबावी हेंहि ओवेननेंच प्रथम प्रतिपादिलें.......शहरें व खेडीं यांतील विरोध नष्ट करण्यासाठीं ओवेन अतिशय झटला."

## ओवेनचा पुरोगामीपणा

ओवेन हा भांडवलशाहीचा विरोधक होता पण तो पुरोगामी विरोधक होता. विषमता व बहुसंख्य समाजाचें मागसलेपण यावर आधारलेली जुनी सरंजामशाही समाजपद्धति त्यास पसंत नव्हती. भांडवलशाहीनें यंत्रिक व शास्त्रीय शोधांचा उपयोग धनोत्पादनाचे कामीं करून माणसाचे श्रम कमी करण्याची संधि आणून दिली याचें ओवेन हा स्वागत करीत असून समतेच्या, सुसंस्कृतीच्या, सुबत्तेच्या पायावर नवीन समाजरचना केली पाहिजे असेंच त्याचें मत होतें. भांडवलशाहीचा नाश केल्यावांचून नवी समाजरचना करणें शक्य नाहीं, तें कार्य भांडवलशाही ज्या इतिहासक्रमानें उदय व विकास पावली त्याच इतिहासक्रमानें तिचा ऱ्हास होवूं लागला म्हणजे कामागारांनीं स्वतःच तिचा नाश करून उरकलें पाहिजे वगैरे गोष्टी ओवेनच्या लक्षांत आल्या नाहींत, त्या पुढें मार्क्सनें विशद केल्या. भांडवलशाही समाज अस्तित्वांत ठेवूनच केवळ सरकार व धनिक वर्ग यांच्याच प्रेरणेनें नवीन समाजरचना करण्याचा त्यानें प्रयत्न केला व तो अर्थात् फसला. ओवेनचे विचार हे कल्पनेच्या मनोऱ्यासारखे होते म्हणून त्यास 'कल्पनावादी' अथवा 'युरोपिअन' सोशॅलिस्ट असें मानण्यांत येतें. मार्क्स व एन्जल्स यांनीं पुढें पुरस्कारिलेल्या पंथास त्यांनीं 'शास्त्रशुद्ध' म्हणजे 'सायंटिफिक' सोशॅलिझम अथवा कम्युनिझम् असें नांव दिलें.

---

# भांडवलशाहीचें प्रतिगामी विरोधक : : : ५

## 'यंग इंग्लंड' संस्था

भांडवलशाहीच्या विरोधकांत ओवेन हा एक पुरोगामी होता पण जुन्या सरंजामशाही समाजव्यवस्थेचें समर्थन करणारे प्रतिगामी विरोधकही जुन्या सरदारवर्गात अनेक होते. इंग्लंडांत यांची 'यंग इंग्लंड' नांवाची संस्था होती. त्यांत डिझरेली, बोर्थविक, फेरँड, लॉर्ड जॉन मॅनर्स, वगैरे पार्लमेंटचे टोरी सभासद होते. जुन्या 'आनंदी इंग्लंडां'तील सरंजामी वैभव त्यास पुन्हां जगांत आणायचें होतें. "इतिहासक्रमानेंच आतां ती गोष्ट घडणें अशक्य झालें होतें. तथापि या लोकांची परोपकारबुद्धि प्रामाणिक असून भांडवलशाहीच्या जुलुमास त्यांनीं विरोध केला यांत शंका नाहीं." "इंग्लंड व आयर्लंड यांतील परोपकारी व तरुण सरदारांचें या यंग इंग्लंड संस्थेकडे लक्ष वेधलें. औद्योगिक भांडवलशाही व अप्रतिबंध व्यापार यांस त्यांनीं विरोध केला. सरदार वर्गाचें वर्चस्व पुन्हा स्थापावें आणि लोकशाहीच्या पायावर या सरदारी वर्चस्वाची पुनर्घटना करावी असें त्यांचें म्हणणें होतें. डिझरेली या एका धनिकपुत्रानें चार्टिस्ट चळवळीच्या समर्थनार्थ १८३९ त अनेक भाषणें केलीं. त्याला चार्टिस्ट चळवळीचीं ध्येयें पसंत नव्हतीं तरी भावना पटली होती. 'कॉनिंग्ज्बी' व 'सिबिल अथवा टू नेशन्स' या डिसरेलीच्या कादंबऱ्यांत त्यानें चार्टिस्ट चळवळीचें चित्र सहानुभूतिपूर्णतेनें रेखाटलें आणि यांत्रिक उत्पादनानें जी औद्योगिक क्रांति होत आहे तिनें राष्ट्र दुभंगलें जात आहे ही गोष्ट ठळकपणें नजरेस आणली. "या उत्पादनपद्धतीनें एका राष्ट्राचीं दोन राष्ट्रें होत असून या

दोन विभागांचा एकमेकांशीं संबंध येत नाहीं, त्यांना परस्पराबद्दल सहानुभूति राहत नाहीं, एकमेकांच्या संबयी, विचार व भावना यांची परस्परास माहिती नसते. हे दोन वर्ग वेगवेगळ्या खगोलावरच राहात आहेत कीं काय इतके परकेपणानें ते एकमेकांशीं वागतात." असें डिसरेलीनें लिहिलें आहे. डिसरेलीनें लवकरच ही उदारवृत्ति सोडली व तो ब्रिटिश साम्राज्यवाद्यांचा अग्रणी बनला. पण 'यंग इंग्लंड'चे इतर सभासद बॉथविक, फेरँड व लॉर्ड ॲश्ले यांनीं कारखान्यांतील कामागारांची परिस्थिति सुधारण्यासंबंधानें झालेल्या कायद्याबाबत फार महत्त्वाची कामगिरी केली. लॉर्ड ॲश्ले हा कॉंझर्वेटिव्ह पक्षाच्या साम्राज्यवादी धोरणास सामान्यतः पाठिंबा देणाराच होता. तथापि कामगारासंबंधींचे कायदे घडवून आणण्यांत त्यानें इतका पुढाकार घेतला कीं कामगार वर्गांत त्याचें नांव आबालवृद्धांच्या तोंडीं झालें होतें.

## कार्लाइल

भांडवलशाहीचा विरोधक पण विचारानें प्रतिगामी अशा विद्वानांत एन्जल्सनें कार्लाइल या प्रसिद्ध लेखकाचा समावेश केला आहे. यंग इंग्लंडच्या सभासदांपेक्षां कार्लाइल हा थोर होता असें एन्जल्सचें मत आहे. "थॉमस कार्लाइल हा एक सुधारकांचा स्वतंत्र प्रकारच आहे. प्रथम तो टोरी होता. पण पुढें तो सर्व टोरींच्या फारच पुढें गेला. भांडवलशाही समाजांत अराजक माजलें असून कामगारांची संघटना केली पाहिजे याची जाणीव कार्लाइलला इतर कोणाहीपेक्षां अधिक होती. योग्य मार्ग कोणता त्याची एकदां त्याला जाणीव झाली कीं तो त्याच मार्गानें जाण्यास समर्थ होईल" अशी आशा १८४५ सालीं एन्जल्सनें कार्लाइलसंबंधानें व्यक्त केली होती. पण पुढें कार्लाइल पूर्ण प्रतिगामी बनला. त्यासंबंधानें एन्जल्स १८९२ सालीं लिहितो, "फ्रान्समधील फेब्रुवारी क्रांतीनें कार्लाइल प्रतिगामी बनला. प्रथम रानट्यासारख्या व संकुचित दृष्टीनें वागणाऱ्या भांडवलदाराविरुद्ध तो संतापत असे. पण पुढें तो स्वतः संकुचित दृष्टीचा व तिरसट झाला. ज्या इतिहासाच्या लाटेवर तो चिडला होता तिनें त्यास आपल्या सोसाट्यानें दूर किनाऱ्यावर फेकून दिलें होतें." कार्लाइलला आपला धार्मिक दृष्टिकोण सोडता येणें शक्य नाहीं हें एन्जल्सनें फार पूर्वी ओळखलें होतें. १८४४ तच एन्जल्स लिहितो, "म्हणून कार्लाइलला जिव्हाळ्याची सरंजामशाही हवी आहे, त्याला खरे 'वीर' (हीरो) हवे आहेत; जणूं

(हे वीर म्हणजे सामान्य जनांहून कांहीं वेगळीं माणसें असतात. माणसाच्या अपूर्ण अंगांचें बाबतींत माणसाचा स्वभाव काय आहे हें जर त्यानें पाहिलें असतें तर माणसाचें 'मेंढरू आणि बकरा' 'राजा आणि प्रजा' 'सरदार व सामान्य लोक' 'शिष्ट माणूस व मूर्ख' असें वर्गीकरण त्यानें केलें नसतें. बुद्धिमत्तेला जो सामाजिक दर्जा हवा तो सत्तेच्या प्रभुत्वानें मिळणार नसून स्फूर्तिदायकत्वानें व नेतृत्वानेंच तो मिळेल हें त्याला कळलें असतें. लोकशाही ही संक्रमणावस्था आहे हें कार्लाइलचें म्हणणें खरेंच आहे. पण त्याचा अर्थ हें संक्रमण संपलें कीं पुन्हा सरदार वर्गाची सत्ता स्थापन होईल असा नव्हे. तर मागाहून खरेंखुरें मानवी स्वातंत्र्य स्थापन व्हावयाचें आहे. आज धर्मसंबंधानें जी पाखंडी वृत्ति बळावलेली दिसते तिच्यामागून पुन्हां धर्मसंस्थापना होईल असें नव्हे. तर अतिमानुष, आधिदैविक वगैरे सर्व प्रकारच्या धर्मांचा पूर्ण नाश होणार आहे. चढाओढ, मागणी-पुरवठा या तत्त्वांचा अपुरेपणा कार्लाइलला मान्य आहे. तसेंच जमीनमालकीचें समर्थन तो मुळींच करीत नाहीं. अर्थात् याच विचारसरणीपासून सरळ निघणारें अनुमान म्हणजे धनोत्पादनसाधनावरील खासगी मालकी नष्ट झाली पाहिजे हें कार्लाइलला कां पटत नाहीं? चढाओढ, मागणी-पुरवठा हीं तत्त्वें नष्ट झालीं पाहिजेत असें म्हणतांना खासगी मालकी हें जें या सर्व अनर्थांचें मूळ तें मात्र त्यास जतन करून ठेवावेंसें वाटतें हें विसंगत नव्हे काय?"

## भूतकालाचा पुजारी

१८४८ त फ्रान्समध्यें जी राज्यक्रांति झाली तींत कामगारांनीं माजविलेल्या दंगलीमुळें कार्लाइल प्रतिगामी बनला. या संबंधानें मार्क्स-एन्जल्स यांच्या 'न्यू ऱ्हाइनिश झीटंग' या पत्रांत १८५० सालीं संपादक लिहितात, "ज्या काळीं भांडवलदारांची अभिरुचि, मतें व कल्पना यांना ब्रिटिश साहित्यिक जगांत अप्रतिहत प्रभुत्व होतें त्याकाळीं कार्लाइलसारख्या पंडितानें भांडवलदाराविरुद्ध तोडगा उगारला याबद्दल आम्ही थॉमस कार्लाइलचे आभारी आहों. त्यानें हें काम इतक्या त्वेषानें केलें कीं केव्हां केव्हां त्यास क्रांतिकारक म्हणणेंही शोभलें असतें. 'फ्रेंच रेव्होल्यूशन', 'क्रॉमवेल', 'चार्टिझम्' 'पास्ट ॲन्ड प्रेझेंट' वगैरे पुस्तकांत त्यानें खरोखर मोठ्या उच्च दर्जाचें लिखाण लिहिलें आहे. पण विद्यमान समाजरचनेवर या पुस्तकांतून चढविण्यांत आलेला हल्ला

मध्ययुगासंबधानें अत्यंत पूज्य भाव धारण करणाऱ्या दृष्टिकोणांतून केला आहे हें चमत्कारिक वाटतें. भूतकालीन समाजव्यवस्था हा समाजव्यवस्थाविकासाचा उत्तम कालखंड होवून गेला म्हणून कार्लाइल त्याची प्रशंसा करतो, वर्तमान काळाबद्दल तो निराश होतो आणि भविष्य काळाकडे पाहून त्याच्या अंगावर भीतीनें शहारे येतात. क्रांतीला तो वंदन करतो अथवा तिला तो डोकीवर घेऊन नाचूं लागतो तेव्हां त्याचे कारण क्रॉम्वेल, डँटन वगैरे प्रभावी व्यक्तींच्या प्रभावानें त्याला भारलेलें असतें हें होय. 'हीरोज अँड हीरोवर्शिप' या निबंधांत त्यानें या विभूतींची एक जातच कल्पिली असून, वर्तमान काळाच्या पोटांत असलेल्या अनर्थांपासून वांचविण्यास अशा विभूतींचा नवा धर्मच समर्थ होईल असें कार्लाइलनें म्हटलें आहे" कार्लाइल पुढें इतका प्रतिगामी झाला कीं गुलामगिरीचा नाश करण्यासाठीं अमेरिकेंत जें स्वातंत्र्य युद्ध झालें त्यावेळीं त्यानें गुलामगिरी हवी म्हणणाऱ्या पक्षाचा पुरस्कार केला. आणि जमेकाच्या गव्हर्नरानें निग्रोंचें बंड निष्ठुरपणें मोडलें तेव्हां कार्लाइलनें त्या गव्हर्नराची पाठ थोपटली.

## ख्रिश्चन सोशॅलिस्ट

फ्रान्समध्यें भांडवलशाहीचीं दुःखें दूर करूं पाहणारा ख्रिश्चन शोशॅलिस्ट नामक एक पंथ निघाला होता. ख्रिस्ती धर्मास हल्लींहून अधिक लोकशाही स्वरूप द्यावें आणि जनतेच्या दुःखाशीं धर्मपुढाऱ्यांनीं एकजीव होऊन धर्मनिष्ठेच्या आधारावर मानवी दुःखें हलकीं करावीं असें या पंथाचें मत होतें. लॅमेने हा या पंथांतला प्रसिद्ध लेखक होय. १८३७ त त्यानें लिहिलेल्या एका ग्रंथावरून त्याचें सनातनी धर्मगुरूंशीं भांडण झालें. लॅमेनेची लोकशाहीवर खरीखुरी श्रद्धा असून तो कामगार वर्गाची बाजू मोठ्या जिव्हाळ्यानें मांडी. नव्या धनिक वर्गावर तो कडाडून हल्ला चढवी. कामगारांना पूर्ण संघटनास्वातंत्र्य असावें आणि चरितार्थापुरत्या कर्मीत कमी मजूरीची हमी सरकारनें घ्यावी असें त्याचें मत होतें. त्याच्या ग्रंथाची परभाषेंत भाषांतरेंही झालीं.

फिलिप बुचेझ (१७९६-१८६५) हा फ्रेंच लेखक व मुत्सद्दी ख्रिश्चन सोशॅलिस्ट मताचा होता. ख्रिस्ती धर्म आणि ख्रिस्ती नीतितत्त्वें हीं प्रगतीचीं महत्त्वाचीं साधनें होत असें त्याचें मत होतें. कम्युनिझमवर त्यानें आपल्या लेखांत पुष्कळ हल्ले केले. लहान हस्तव्यवसायिकांच्या

गरजा भागविता येऊन त्यांची स्थिति सुधारेल अशा प्रकारें उत्पादक संघटना काढण्याची एक योजना त्यानें तयार केली होती. पॅरिसच्या कामगारांनीं चालविलेल्या 'ली प्रॉडक्टीर' आणि 'ली नॅशनल' या पत्रांशीं त्यानें संगनमत केलें होतें. १८४८ त फ्रान्समध्यें जे क्रांतिकारक दंगे झाले आणि नंतर प्रतिक्रांति झाली तेव्हां जनतेवर भयंकर दडपशाही गाजविण्यांत आली. तेव्हां खिश्चन सोशॅलिस्टांचे कॅथॉलिक सोशॅलिस्ट, प्रॉटेस्टंट सोशॅलिस्ट, अँग्लिकन सोशॅलिस्ट, खिश्चन सोशॅलिस्ट वगैरे अनेक पंथ सरकारी धोरणास प्रतिकार करण्यासाठीं पुढें आले. पण कामगार वर्गावर या धर्मवाद्यांचें वजन कधींच फारसें पडलें नाहीं.

## धर्म आणि समाज

मानव जातीचे प्रश्न सोडविण्यास आधुनिक भांडवलशाही युगांत खिस्ती धर्मतत्त्वांचा कितीसा उपयोग होवूं शकेल या संबंधानें कार्लमार्क्सनें आपल्या प्रखर पण शास्त्रशुद्ध वाणीनें जे विचार प्रगट केले आहेत ते अशा धर्मसुधारकांच्या प्रयत्नांची एकंदर फलश्रुति सांगण्यास समर्पक असे आहेत. मार्क्स लिहितो, " खिस्ती धर्माचीं जीं सामाजिक तत्त्वें आहेत त्यांना आपला विकास करून घेण्यासाठीं १८ शें वर्षांइतका भरपूर काळ मिळाला होता. आणखी अधिक संधि त्यांना देण्याची आतां मुळींच जरूरी नाहीं. पूर्वी याच खिस्ती धर्मानें गुलामगिरीचें समर्थन केलें, मध्य युगांतील भूदास पद्धतीचेंही समर्थन केलें, आणि आजही जरूर तेव्हां थोड्याशा मिनतवारीनें कां होईना पण कामगारावर होणाऱ्या जुलमाचें खिस्तीधर्म समर्थन करूं शकतो. खिस्ती धर्मास एक वरिष्ठ राज्यकर्ता वर्ग व त्यापुढें मान तुकविणारा एक हीन वर्ग हवा असतो, आणि हा राज्यकर्ता वर्ग मान तुकविणाऱ्या वर्गाशीं परोपकार बुद्धीनें वागेल अशी आशा बाळगण्यांत खिस्ती धर्माचें समाधान होतें. इहलोकांत होणाऱ्या सर्व दुष्कृत्यांची भरपाई परलोकांत होत असल्यानें इहलोकांत कोणतींही दुष्कृत्यें झालीं तरी तीं या धर्मास चालतात. जुलमी वर्ग जुलमग्रस्तावर जीं संकटें आणतो तीं खिस्ती माणसाच्या प्राथमिक अथवा दुसऱ्या कुठल्या तरी पापाचें फळ होत; अथवा ईश्वर आपल्या अक्कलहुषारीनें गरीबांची ही कसोटी तरी पाहात असावा. ('कृपाळूपणें अल्पधारिष्ट पाहे!'—रामदास.) खिस्ती धर्माचीं समाजतत्त्वें भेकडपणा, स्व-तिरस्कार,

दीनपणा, हीनपणा, गुलामगिरी हे गुण अंगीं बाणावे असें सांगतात. उलट कामगारांना धैर्य, आत्मविश्वास, गर्व, स्वाभिमान, स्वातंत्र्य या सर्वांची रोजच्या भाकरीपेक्षांहि अधिक गरज आहे. ख्रिस्ती धर्मांचीं समाजतत्त्वें हीं खुशामत करणारीं आहेत तर कामगार हा क्रांतिकारक आहे." धर्माचें स्वरूप याहीपेक्षां अधिक मार्मिकतेनें मार्क्सनें पुढील उताऱ्यांत वर्णिलें आहे. " वस्तुस्थिति अशी आहे कीं आपल्या माणुसकीची जाणीव ज्याला झालेली नाहीं अथवा होवून जो पुन्हां ही जाणीव विसरला अशा माणसाच्या जाणीवेचें व भावनेचें स्वरूप म्हणजे धर्म होय.... म्हणून धर्म हाच ज्या जगाचा आध्यात्मिक सुगंध आहे त्या जगाशीं युद्ध म्हणजे धर्माशीं युद्ध होय. धार्मिक दारिद्र्य हें एका ( म्हणजे धर्मश्रद्धवाल्यांच्या ) जगांत खऱ्याखुऱ्या आर्थिक दारिद्र्याचें प्रतीक असतें, तर दुसऱ्या ( म्हणजे अधार्मिकांच्या ) जगांत धार्मिक दारिद्र्य ( म्हणजे धार्मिक अश्रद्धा ) हें आर्थिक दारिद्र्यास प्रतिकार करण्याचें साधन असतें. धर्म हा संकटाच्या ओझ्याखालीं पिचणाऱ्या प्राण्याचा उसासा आहे, अहृदय अशा जगाचें तें ( मानीव ) हृदय आहे, जड अशा परिस्थितीचा तो ( मानीव ) प्राण आहे. जगांतील लोकांना धर्म ही एक अफूची गोळी आहे. जनतेला खरेखुरें सुख देण्यासाठीं भ्रामक सुख देणाऱ्या धर्मांचा विध्वंस करणें हें अत्यवश्य आहे.... म्हणून आम्ही स्वर्गावर जी टीका करतों तिचें रूपांतर ऐहिक जीवनावरील टीकेंत होतें, धर्मावरील टीकेचें रूपांतर कायद्यावरील टीकेंत होतें आणि धर्मतत्त्वांवरील टीकेचें रूपांतर राजकारणावरील टीकेंत होतें." धर्मश्रद्धेस ओवेनचाही किती तीव्र विरोध होता हें मागें येऊन गेलेंच आहे.

---

# सिसमाँडी व प्रुधाँ : : : ६

## प्रथम स्मिथचा अनुयायी

सिसमाँडी ( १७७३–१८४२ ) हा फ्रेंच विचारवंतांत भांडवलशाहीचा मीमांसक म्हणून प्रसिद्ध आहे. भांडवलशाहीमुळें कामगारवर्गावर जीं दुःखें कोसळतात त्यांचीं कारणें समजून घेण्याचा त्यानें मनापासून प्रयत्न केला. त्यानें इतिहासावर बरीच ग्रंथरचना केली असून फ्रान्स व इटाली यांचे त्यानें लिहिलेले इतिहास त्याच्या कीर्तीस कारणीभूत झाले. अर्थशास्त्रावर त्यानें १८०३ मध्यें एक ग्रंथ लिहिला. त्यांत त्यानें ॲडम स्मिथच्या अप्रतिबंध व्यापार व सरकारची तटस्थता या मतांचा जोरदारपणें पुरस्कार केला. स्मिथचें अर्थशास्त्र, राज्यशास्त्र व त्यांची व्यावहारिक परिणति या सर्वांस त्यानें या ग्रंथांत पूर्ण मान्यता दिली. ' लेझस् फेरे ' म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्य हें आर्थिक धोरण या नात्यानें सर्वश्रेष्ठ आहे असें तो मानी. स्वार्थामागें लागलेल्या अनेक व्यक्तींच्या प्रयत्नांनीं समाजहित साधतें या मतावर त्याचा पूर्ण विश्वास होता. सरकार तटस्थ राहिलें म्हणजे भांडवल हें जिकडे नफा मिळेल त्या धंद्यांत आपोआप जाईल आणि हेंच समाजाच्या हिताचें आहे असें तो मानी. पण अशा व्यवस्थेंत कामगार हा सर्व वस्तूंचा उत्पादक असतां त्याला उपभोग मात्र फार थोड्या वस्तूंचा मिळतो या गोष्टीची चिंता त्यानें व्यक्त केलीच आहे.

## स्मिथच्या मतांचा त्याग

वरील ग्रंथ लिहिल्यावर त्यानें बरेच ऐतिहासिक संशोधन व प्रवासही केला. इटाली, स्वित्सर्लंड व फ्रान्स या देशांत फिरत असतां भांडवलशाहीवर

एकुणिसाव्या शतकांत १८२५ च्या सुमारास जें पहिलें संकट आलें त्याचे परिणाम त्याच्या दृष्टीस पडले. इंग्लंड, जर्मनी, बेल्जम या राष्ट्रांनाही या संकटानें तोशीस लागली. यानंतर जेव्हां तो पुन्हां तात्त्विक विचार करूं लागला तेव्हां स्मिथचे विचार जसेच्या तसे त्याला पटेनात. स्मिथचीं सर्वच मतें सोडण्यास तो तयार नव्हता. पण त्यांचा व्यवहारिक परिणाम त्यास अमान्य वाटूं लागला. तसेंच अर्थशास्त्राचें ध्येय काय यासंबंधानेंही स्मिथशीं त्याचा मतभेद होवूं लागला. अर्थशास्त्राचें ध्येय नैतिक असलें पाहिजे असें तो म्हणूं लागला. नुसत्या धनाचा अर्थशास्त्रानें विचार न करतां माणूस आणि धन यांचें नातें कसें असावें याचाही विचार अर्थशास्त्रानें केला पाहिजे. माणसाचें कल्याण धनानें कसें होईल हा विचार करणें अर्थशास्त्राचें कर्तव्य आहे, अर्थात् वाटणीचा प्रश्न हा अर्थशास्त्रांतला महत्त्वाचा प्रश्न होय. धनाच्या वाटणींत न्याय असला पाहिजे ही गोष्ट माल्थसला फारशी पटली नव्हती. सिसमॉंडी ती जोरानें मांडूं लागला. या दृष्टीनें सिसमॉंडीचें ध्येय क्रांतिकारक झालें. अर्थशास्त्रा-वरील वर उल्लेखिलेला त्याचा पहिला ग्रंथ १८०३ मध्यें लिहिल्यानंतर सोळा वर्षांनीं म्हणजे १८१९ मध्यें त्यानें दुसरा ग्रंथ लिहिला व त्यांत ही क्रांतिकारक मतें त्यानें मांडलीं. यांत त्यानें ॲडॅमस्मिथच्या क्लासिकल पद्धतीचा जवळजवळ त्यागच केला भांडवलशाही पद्धतींत प्रत्येक व्यक्ति स्वार्थपरायणतेनें झटत असतां सामाजिक हिताचा ताजवा आपोआप समतोल होतो. हें मत त्यानें आतां साफ सोडून दिलें.

## श्रम व मालकी यांची फारकत

चोहोंकडे संपत्तीचे ढीगचे ढीग वाढत आहेत. मग लोकांचें हितही त्या प्रमाणांत कां वाढत नाहीं? आर्थिक जग जसें असेल तसें त्याचें वर्णन करून आरामशीरपणें स्वस्थ बसावें एवढेंच अर्थशास्त्राचें काम नव्हे. मानवजातीचें भवितव्य भयाण दिसतें आहे. कांहींतरी इलाज वेळींच केला पाहिजे. समाजांत श्रीमंत आणि गरीब, कामगार आणि कारखानदार अशा फळ्या पडून समाज दुभंगला आहे. प्रचंड भांडवलशाहीच्या रगाड्यांत लहान शेतकरी आणि लहान हस्तव्यवसायी यांचा चुराडा झाला असून जगांत धनाचे मालक व धनहीन कफल्लक असे दोनच वर्ग उरत आहेत. जो श्रम करतो त्याला धनाची मालकी नाहीं आणि धनाच्या मालकांना श्रम करावे लागत नाहींत, याप्रमाणें श्रम व

मालकी यांची कायमची फारकत झाली आहे, ही गोष्ट सिसमाँडीनें आपल्या दुसऱ्या ग्रंथांत प्रखरपणें मांडली. याचें कारण काय, याची चर्चा करतांना भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या अंगभूत असेच कांहीं दोष असले पाहिजेत असें तो म्हणतो. माणसाची धनोत्पादनशक्ति वाढते, धनाचे ढीगचे ढीग उत्पन्न होतात, पण ज्या सामाजिक संबंधांनीं हें धन वाटलें जातें त्या संबंधा-मुळेंच धनाच्या वाढीस अटकाव होतो. मजूरांचें धनोत्पादनसामर्थ्य जसें अधिक वाढेल तसा भांडवल व श्रम यांतील विरोध, उत्पादन व विक्री यांतील फारकत, तीव्रतर होत जाते. भांडवलशाहींत उत्पादनाची वाढ होणें हें मजूरांनीं धनाचा कमींतकमी उपभोग घेण्यावरच अवलंबून आहे ही गोष्ट सिसमाँडीच्या लक्षांत आली. माल्थसच्याही हें लक्षांत आलें होतें व म्हणूनच जमीन–मालकासारखा फुकटखाऊ वर्ग असला पाहिजे तरच बाजारांतला सर्व माल खपून नवीन उत्पादन शक्य होईल असें माल्थसचें मत असल्याचें मागें सांगितलेंच आहे. पण सिसमाँडीस हें पटेना. त्यानें असें स्पष्ट म्हटलेलें नाहीं अथवा त्यावर इलाजही सुचविला नाहीं. पण चढाओढ, व श्रम आणि मालकी यांतील वियोग यांनीं आर्थिक संकटें येतात, मालकी पद्धतीमुळें मजूर भांडवलाचा गुलाम होतो, त्यांना भांडवलदार जी कमींत कमी मजूरी देईल त्या कमींत कमी मजूरीवर राबावें लागतें इत्यादि मतावर त्यानें जोर दिला आहे.

## माल्थसला उत्तर

माल्थसच्या लोकसंख्येच्या मुद्द्याला सिसमाँडीनें दिलेलें उत्तर सकृद्दर्शनीं तरी अगदीं बिनतोड असून मोठें मासलेवाईक आहे. तो म्हणतो, चरितार्थधन जेवढें असेल त्यापेक्षां मजूरांची लोकसंख्या नेहमीं वाढणारच हें माल्थसचें मत साफ चूक आहे. मजूरांना मिळकत किती असेल त्यावर त्यांची लोकसंख्या अवलंबून आहे. कामगार स्वतंत्र असेल तर त्याला त्याच्या-मिळकतीवर ताबा ठेवता येतो. आपली मिळकत आज अमुक इतकी आहे आणि पुढें अमुक इतकी होईल असा कांहीं तरी अंदाजी हिशेब तो करतो, आणि त्याप्रमाणें लग्न केव्हां करावें मुलें किती करावीं हेंहीं तो ठरवितो; पण भांडवलशाहीच्या हल्लींच्या पद्धतींत श्रम आणि मालकी यांचा वियोग झालेला असल्यानें मजूराला मिळकत किती व्हावी हे भांडवलदार ठरवितो. भांडवल-

दारालाही मजूर हवेत किती हें माहीत नसतें. त्याची गरज नेहमीं कमी अधिक होत असते. कारण ती मालाचा उपभोग घेणाऱ्यांच्या गरजेवर अवलंबून नसून भांडवलाला नफा कसा मिळेल यावर अवलंबून असते. लोकसंख्ये-संबंधींच्या माल्थसच्या मतास मार्क्सनें दिलेलें उत्तर सारग्रंथांत पुढें दिलेलें *असून त्याची चर्चा पुढें येईलच. पण मजूरांना आपल्या रोजगारीची निश्चिती असेल तर विवाह व संतति याबाबत ते योजना आंखून वागतील हें सिसमाँडीचें मत आजच्या सुशिक्षित मध्यम वर्गाच्या प्रवृत्तीवरून कोणासही सहज पटणारें आहे.*

## आर्थिक संकटाचीं कारणें

भांडवलशाहीला उत्पादन अधिकाधिक करणें अपरिहार्य होतें. ही गोष्ट क्लासिकल पंडितांना मोठी अभिमानास्पद वाटे. पण यांतच खरें संकट आहे हें सिसमाँडीनें ताडलें होतें. उत्पादन वाढलें तरी मजूरीचे दर वाढलेले नसल्यानें कामगारांना माल खरेदी करणें शक्य होत नाहीं. यामुळें माल पडून राहतो, यामुळें बेकारी वाढते. उत्पादनखर्च कमी करण्यासाठीं कामाचे तास वाढविण्यांत येतात. भांडवल आणि मजूर नफ्याचे दृष्टीनें एका धंद्यांतून दुसऱ्या धंद्यांत सहजासहजीं जाऊं शकतील हेंही खोटें आहे. एकंदरींत सर्व संकटाचें मूळ जें चढाओढीचें तत्त्व तेंच वाईट आहे असें सिसमाँडी म्हणतो. आर्थिक संकटें सिसमाँडीच्या मतें तीन कारणांनीं येतात. (१) उत्पादकांतच चढाओढ असते आणि प्रत्येक उत्पादकाला बाजारची परिस्थिति पूर्णपणें माहीत नसते. (२) उत्पादन किती करायचें हें गिऱ्हाइकाच्या गरजेवरून न ठरतां भांडवलाच्या गरजेवरून ठरतें. (३) मालकी आणि श्रम यांची फारकत झाल्यामुळें भांडवलदाराचा नफा वाढत असतो. पण बहुसंख्य गिऱ्हाइक असा जो मजूरवर्ग त्याची मिळकत मात्र मुळींच वाढत नाहीं. या तीन कारणांनीं आर्थिक जीवनांतला समतोल बिघडतो. मालाची मागणी वाढली तरी तीसुद्धां बेतालपणें वाढेल. कारण मजूरांची उत्पादनशक्ति वाढेल तशी त्यांची मिळकत कांहीं वाढणार नाहीं. अर्थात मजूरांच्या गरजांमुळें मालाची मागणी वाढणार नाहीं तर भांडवलदारांची मिळकत वाढल्यामुळें त्यांना हव्या अशा चैनीच्या वस्तूंची मागणी वाढेल. पण उपभोग्य वस्तूंची मागणी जितकी व्हावी तितकी होत नाहीं, व तिची वाण चैनीच्या वस्तूंच्या मागणीनें

भरून निघत नाहीं. म्हणून भांडवलशाही समाजव्यवस्थेंत उत्पादन व उपभोग यांमध्यें फारकत पडत जावी असा दोष अंगभूतच आहे असें सिसमाँडी म्हणतो.

## प्रतिगामी तत्त्वज्ञ

*सिसमाँडीनें याप्रमाणें भांडवलशाहीचे दोष मोठ्या त्वेषानें मांडले तरी* त्यांत शास्त्रीयता कमी असून हे दोष नाहींसे करण्याचे उपाय त्यास सुचवितां आले नाहींत. राज्यसंस्थेनें तटस्थ राहावें हें चूक आहे, एवढाच उंदीर सगळा तत्त्वचर्चेचा डोंगर पोखरून त्यानें काढला. पण सरकारनें तरी दोष नाहींसे करावे हें त्यास सांगतां आलें नाहीं. कम्युनिझमला त्याचा विरोध होता, कारण स्वार्थबुद्धि हा फार महत्त्वाचा सामाजिक गुण आहे असें त्यास वाटे. सरंजामशाहीनें माणसाची उत्पादनशक्ति आडवली जाते म्हणून त्यानें सरंजामशाहीलाहि विरोध केला आहे. पण अखेर सिसमाँडीच्या मतांचा निष्कर्ष काढला तर 'प्राचीन समाजपद्धतीची स्थापना' हाच होऊं शकतो असें मत एरिच रोल यानें दिलें आहे. श्रम व मालकी यांचा संधि करावा आणि उत्पादन व उपभोग यांचा समतोल करावा असा त्याचा हेतु होता. रोल लिहितो, "हें ध्येय सोशॅलिझमचें आहे असेंही म्हणतां येईल. पण तेंहि प्राप्त करून घेण्याचा सोशॅलिस्टांचा मार्ग धनोत्पादनसाधनावरील खासगी मिळकत रद्द करावी हा होता, तर सिसमाँडीला स्वतंत्र उत्पादक म्हणजे लहान शेतकरी आणि लहान कारागीर यांची प्रतिष्ठापना करायची होती. असें सुवर्णयुग येईपर्यंत सरकारनें समाजाचा समतोल सांभाळावा असें सिसमाँडीचें मत होतें. औद्योगिक प्रगतीस आळा घातल्यानेंच हें घडून येईल, म्हणून सरकारनें नवीन शोध थांबवावे, आणि अत्युत्पादन व दारिद्र्यदुःख या दोहोंसही आळा बसेल अशा प्रकारें प्रगतीचा वेग नियंत्रित करावा असें तो सांगतो. परिणामतः हें धोरण प्रतिगामी आहे असेंच म्हणावें लागतें."

× × × ×

## तत्त्वज्ञ नसलेला पंडित

प्रुधाँ (१८०९-१८६५) प्रुधाँ हा फ्रेंच तत्त्वज्ञ सिसमाँडीपेक्षां प्रसिद्ध असून सोशॅलिस्ट विचारसरणीवर त्याची छाया बरीच अधिक पडली आहे. तो

एका दारूकारखानदाराचा मुलगा. त्याच्याभोंवतीं लहान शेतकऱ्यांचें वातावरण होतें. त्यानें छापखान्यांत नोकरी धरली होती. स्वतःला तो कामगाराचा मुलगा म्हणवीत असे. तथापि त्याची मनोभूमिका गरीब मध्यम वर्गाची होती असें मार्क्स म्हणतो व तेंच खरें दिसतें. त्याला वाचनाची खूप आवड होती. आधाशासारखें जें जें मिळालें तें त्यानें वाचलें. त्याला आपल्या पांडित्याचा गर्वेही वाटूं लागला. आपल्याहून कमी विद्वान असतील त्यांच्यासंबंधानें तो तुच्छतेनें लिही. लहानपणापासून सामाजिक प्रश्नांकडे त्याचें लक्ष वेधलें. त्याची दृष्टि मोठी चिकित्सक असून जुन्या रूढ कल्पनावर निर्भयपणें तो हल्ला करी. मार्क्सची व त्याची प्रथम मैत्री जमली होती. त्यानें 'फिलॉसफी ऑफ् पॉव्हर्टी' (दारिद्र्याचें तत्त्वज्ञान) हा ग्रंथ १८४६ सालीं लिहिला. त्यावर मार्क्सनें 'पॉव्हर्टी ऑफ फिलॉसफी' (तत्त्वज्ञानाचें दारिद्र्य) नांवाचा ग्रंथ लिहून टीका केली. यामुळें प्रुधाँचा गर्व दुखावला जाऊन मार्क्सचा स्नेह त्यानें कायमचा सोडून दिला. मार्क्सच्या सल्ल्यावरूनच त्यानें हेगेलच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला होता. पण त्या तत्त्वज्ञानांतील फक्त शब्दांचें व मांडणीच्या पद्धतीचें वेड त्याच्या डोक्यांत घट्ट बसलें. हेगेलच्या विचाराचा गाभा त्यास कधींच उकलला नाहीं. हेगेलच्या विरोधविकासात्मक पद्धतीनें तो अर्थशास्त्राचे प्रश्न मांडण्याच्या प्रयत्न 'फिलॉसफी ऑफ पॉव्हर्टी' या ग्रंथांत करतो. पण त्यामुळें त्याला अर्थशास्त्र व तत्त्वज्ञान दोन्हीही कळलीं नव्हतीं हें दिसून येतें.

## बऱ्यावाइटाची तागडी

न्यायप्रस्थापनेची भावना ही प्रुधाँच्या सर्व विचारसरणीचा आधार आहे. न्याय हें जीवनांतील मुख्य तत्त्व आहे असें तो पुनः पुनः सांगतो. पण न्याय स्थापन करायचा कसा? न्याय म्हणजे जशास तसें, समता, समतोल. सामाजिक जीवनांतच काय, पण निसर्गांतही अभेद्य असे अनेक अंतर्विरोध आहेत. विरोध हाच जीवनांतील मोठा व अमर सिद्धांत होय असें त्याचें कँट व हेगेल यांच्या ग्रंथाच्या वाचनानें ठाम मत बनलें. अर्थात् सामाजिक प्रश्नांत विरोध हे अमर आहेत असें मानल्यामुळें क्रांतिकारक पद्धतीनें हे प्रश्न सोडविणें त्यास् अशक्य होतें. कोणतीहि समाजव्यवस्था अजीबात बदलल्यानें हे विरोध नष्ट होणार नसून तत्त्वतः अमर असलेले हे विरोध व्यवहारांत निर्मूल करण्याची युक्ति योजणें हाच सामाजिक प्रश्न सोडविण्याचा उपाय होय असें त्याचें मत होतें.

परस्परविरुद्ध तत्त्वांचा समतोल राखणें हाच न्याय होय. प्रत्येक गोष्टीची एक चांगली बाजू असते व एक बाजू वाईट असते. चांगल्या बाजूचा उपयोग करून वाईट बाजूस फाटा दिला असता सर्व सामाजिक प्रश्न आपोआप सुटूं शकतील. परस्परविरुद्ध शक्तींचा अन्वय बसविणें हें त्याच्या तात्त्विक विचारसरणीचें व व्यावहारिक उपायांचें बीज आहे. मालकी हक्कासंबंधींच्या त्याच्या कल्पनेंत हें प्रामुख्यानें दिसून येतें.

## मालकी हक्काचा पुरस्कार

धनोत्पादनसाधनावर खासगी मालकी असणें हेंच वाईट आहे. असें त्याचें म्हणणें नव्हतें. उलट व्यक्तिस्वातंत्र्यास अशा मालकीची आवश्यकता विशेष आहे असें तो म्हणे. मूल्य हें श्रमापासूनच होतें हा सिद्धांत प्रुधाँला पूर्णपणें मान्य होता. मालकी हक्काचें समर्थन या एकाच सिद्धांतानुसार होत असल्यामुळें प्रत्येकाला स्वतःच्या श्रमाचें फळ चाखता आलें पाहिजे असा त्याचा आग्रह होता. पण भांडवलशाहींत मालकी हक्कांचा दुरुपयोग होत असून फुकटखाऊंना श्रमोत्पन्न धनाचा वाटा पुष्कळ मिळतो. श्रम करणारांना मात्र कांहीं मिळत नाहीं अशी त्याची तक्रार होती. खंड, व्याज आणि नफा हे तिन्ही अनुपार्जित धनप्रकार रद्द झाले पाहिजेत असें प्रुधाँचें मत आहे. पण हीं अनुपार्जित धनें धनोत्पादनसाधनांवरील खासगी मालकीमुळेंच निर्माण होतात तर मग ती नाहींशीं करावीं कशीं ? हीं तीन उत्पन्नें नष्ट करण्यासाठीं त्यानें अनेक उपाय सुचविले. खंडासंबंधीं त्यानें विशेषच विचार केला. पण अखेर धनोत्पादन-साधनांच्या खाजगी मालकीसच फाटा द्यावा एवढी गोष्ट कबूल करण्याचें मात्र त्यानें साफ नाकारलें. ओवेनप्रभृति कल्पनावाद्यांच्या काल्पनिक समाजरचनेच्या योजनेस त्याचा विरोधच होता. त्यांना आर्थिक प्रक्रियेचे सिद्धांत कळत नाहींत असें तो म्हणे. पण उलट कम्युनिस्टांना मालकी हक्कांचें शास्त्रशुद्ध पृथक्करण करता येत नाहीं असेंही त्यानें म्हटलें आहे. 'मालकी हक्कांचे सिद्धांत' या त्याच्या ग्रंथांत त्यानें विद्यमान मालकी हक्क शाबूत ठेवावे असें म्हटलें असून त्यापासून होणारे अनर्थ नाहींसे करण्यासाठीं त्यांच्या गुणदोषाचा यथायोग्य ताजवा करवा असें तो म्हणतो. प्रुधाँचें ध्येय कांहींसें सिसमाँडीसारखें आहे. मालकी हक्क सर्वांसच मिळावें यासाठीं शेती व उद्योगधंदे अगदीं लहान प्रमाणा-वर करावे असें त्याचें म्हणणे आहे.

## यंत्रास विरोध

यंत्राविषयीं प्रुधाँला तिटकारा आहे. यंत्र हें लहान उत्पादकांचें अधिराज्य निर्माण करण्यास विघ्न आणतें हा त्याचा मुख्य आक्षेप होय. या आर्थिक संघटनेस अनुरूप अशी राजकीय संघटना परस्परसहकार्य हीच होय. राज्य हें यासाठीं नष्टच झालें पाहिजे. ' अराज्य ' हें सामाजिक जीवनाचें परमोच्च स्वरूप होय. दंडशक्तीची समाजास गरज मुळींच नाहीं. प्रुधाँनें आपल्या या मताअनुसार तपशीलवार योजना अशी कधींच आंखली नव्हती. उलट तत्कालीन राज्यसंस्थेनें केलेल्या अनेक जुलुमीं कायद्यांना त्यानें पाठिंबा दिला. पण सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट हे राज्यसंस्था हवी म्हणत, त्यांना मात्र तेवढ्या कारणांसाठीं प्रुधाँ कसून विरोध करीत होता. प्रचंड उद्योगधंदे अजीबात नष्ट करणें हें अशक्य आहे असें त्यास दिसलें होतें. त्यांचा लहान शेती व लहान कारागिरी याशीं अन्वय कसा बसवावा एवढाच काय तो प्रश्न त्याचे पुढें होता. राज्यसंस्था नष्ट झाली कीं कामगार परस्परसहकार्यानें भांडवलदारासारख्या कंपन्या स्थापून कारखाने चालवितील असें त्यांचें मत होतें.

## व्याज बंद करा

कामगारांनीं कारखान्यांची मालकी घेऊन ते सामुदायिक मालकीनें चालवावेत म्हणणारा सिंडिकॅलिस्ट नांवाचा एक पंथ युरोपांत गेल्या शतकापासून आहे. त्यास अनुकूल असें हें मत होतें. पण ही सिंडिकॅलिस्ट कंपनी काढण्याला भांडवल कोठून आणावें ? भांडवलशाहींतला व्याज हा जो प्रकार आहे तोच मुख्यतः फुकटखाऊपणाचें अस्तित्व शक्य करीत असल्यानें तो नष्ट करावा, पैसा हा एकदां भाड्यानें दिल्यानंतर पुनः अनेकदां भाड्यानें देतां येतो, त्या ऐवजीं तो इतर सर्व मालाप्रमाणें विकता यावा म्हणजे मजूरांच्या सिंडिकेट्सना बँकामार्फत खूप भांडवल मिळेल असें प्रुधाँ म्हणतो. जी व्याज देत नाहीं अशी बँक उघडावी. तिजजवळ भांडवलही नसावें. या बँकेनें नोटा काढाव्या. त्या नोटांचें सोन्यांत परिवर्तन होवूं नये. विकण्याच्या ठरलेल्या अथवा विकून टाकलेल्या मालाच्या किंमतीदाखल या नोटा देण्यांत याव्या. प्रत्येकानें पैसा म्हणून या नोटा स्वीकारण्याचें कबूल केलें म्हणजे पैशासारखें त्यांचें चलन सुरू होईल. प्रत्यक्ष मालाचीच देव आणि घेव बँकेमार्फत होत असल्यानें बँकेला

कोणताही धोका आहे असें म्हणण्याचें कारण नाहीं. आणि व्याज अजिबात रद्द झाल्यामुळें हा देवघेवीचा व्यवहार अगदीं फुकट होईल. तसेंच सर्व कामगारांना बँकेच्या पतीवर धनोत्पादनसाधनें मिळणार असल्यानें समाजाची वर्गीय विभागणी रद्दच होईल. श्रम आणि मालकी यांची फारकत होते ही सिसमाँडीची जी तक्रार तीही नाहींशी होईल. जुलुमी सरकारचा नाश, व्यक्तिस्वातंत्र्य व न्यायप्रस्थापना या गोष्टींचा स्वर्ग यामुळें आपोआप हातार्शी येईल. भांडवलशाहींत व्याज नसावें ही कल्पनाच चमत्कारिक होती. पण फ्रान्समध्यें पिळणुकीचें कार्य मुख्यतः बँकामुळें चालत असल्यामुळें व्याज हेंच सर्व आपत्तीचें कारण आहे असें प्रुधाँला वाटलें असणें शक्य आहे. त्यानें सुचविलेले उपाय प्रतिगामी होते. भांडवलशाहीचे खरे दोष त्याच्या लक्षांत आले नाहींत.

---

# सेंट सायमन आणि फोरीअर : : : ७

इंग्लंडांत 'युटोपियन' (कल्पनावादी) सोशॅलिस्ट म्हणून ओवेनला जसें फार महत्त्वाचें स्थान आहे तसेंच सेंट सायमन (१७६०–१८२५) व फोरीअर (१७७२ ते १८३२) हे दोन तत्वज्ञ फ्रान्समध्यें 'युटोपीअन सोशॅलिस्ट' म्हणून फार योग्यतेचे गणले जातात.

## स्वप्नाळू तत्त्वज्ञ

कौंट हेन्री डी सेन्ट सायमन पॅरिसमध्यें १७३० सालीं सरदार कुलांत जन्मला. लहानपणापासून तो अतिशय भावनाप्रधान व श्रद्धाळू होता. त्यास स्वप्नात असा भास झाला कीं त्याचा पूर्वज शार्लमेन हा त्याच्याकडे येऊन त्याला म्हणाला, 'बाळ तुझें चरित्र विशेष प्रकारचें होणार आहे.' तेव्हांपासून 'साहेब, आपणांस थोर कृत्यें करायचीं आहेत' अशी रोज सकाळीं आपणांस आठवण करण्यास त्यानें आपल्या नोकरास सांगून ठेवलें होतें, फ्रान्सनें अमेरिकेस स्वातंत्र्ययुद्धांत इंग्लंडविरुद्ध मदत केली त्यावेळीं सेंट सायमन अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धांत सामील होवून अमेरिकेच्या स्वातंत्र्यार्थ इंग्लंडशीं लढला. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं तो फ्रान्सला परत आला. क्रांतीच्या घालमेलींत त्याला बरीच जमीन मिळाली, तेव्हां त्या धनावर चरितार्थ चालवून त्यानें पुढें विद्याभ्यास केला व शास्त्रीय प्रयोग केले. पण त्याच्या सर्व जिंदगीची त्या प्रयोगांत वाट लागून अखेर दारिद्र्यांत त्याचा शेवट झाला. भौतिक शास्त्रांचा त्यास फार नाद होता. एंजीनिअरिंगच्या अनेक योजना त्यानें पूर्ववयांत आंखल्या. त्यांतली एक योजना आटलांटिक आणि पासिफिक यांना जोडणारा कालवा काढणें ही होती.

तसेंच माद्रिदपासून समुद्रापर्यंत कालवा काढणें अशी आणखी एक योजना त्यानें आंखलेली होती. अगदीं प्रथम प्रथम त्यानें भौतिक शास्त्रें व राज्यशास्त्र यांवर बरेंच लेखन केलें. पुढें १८१७ पासून तो सोशॅलिझमकडे वळला. शास्त्रीय विचाराचे दृष्टीनें सेंट सायमनच्या विवेचनांत स्पष्टपणा व सुसंगतता कमी आहे.

## मार्क्सच्या तत्त्वाचा पूर्वद्रष्टा

पण त्याच्या ठिकाणीं कल्पनासामर्थ्य मोठें होतें. क्रांति ही एकंदरींत विध्वंसक असते असें त्याचें फ्रेंच राज्यक्रांतीच्या अनुभवावरून मत झालें व म्हणून समाजाची नवी पुनर्घटना केली पाहिजे असें तो प्रतिपादूं लागला. औद्योगिक कारखानदारीच्या भूमिकेवर राज्यसंस्था स्थापावी. उत्पादक श्रम करूं शकणाऱ्या मजूरांची उत्तम संघटना करण्याचें कौशल्य ज्या शास्त्रज्ञांच्या अंगीं असेल त्यांना समाजाचे धुरीण व राज्यकर्ते म्हणून नेमले पाहिजे. समाजांतील अगदीं गरीब वर्गाचें नैतिक व भौतिक कल्याण करणें हेंच सर्व समाजाच्या प्रयत्नाचें ध्येय असलें पाहिजे. हें ध्येय साध्य करण्यासाठीं समाजाची जी संघटना करावी लागेल तीच सर्वोत्कृष्ट संघटना होय. पूर्वी ख्रिस्ती पुरोहित हा धनगर व जनता हीं त्याचीं मेंढरें असा संबंध श्रद्धावान लोक मानीत. यापुढें ही धनगराची घोंगडी समाजघटना करूं शकणाऱ्या शास्त्रज्ञांना देऊन सर्व मजूर वर्ग त्यांचे स्वाधीन करावा आणि ख्रिस्ती मताप्रमाणें सर्वांनीं बंधुभावानें वागावें असें सेंट सायमननें प्रतिपादिलें. भावी समाजघटनेचीं कल्पना त्यावेळीं कोणास अंधुकपणेंही येणें शक्य नव्हतें. पण सेंट सायमन यांस मात्र ती आश्चर्य वाटण्याइतकी स्पष्टपणें आली होती असें दिसतें. राज्यसंस्था नष्ट करून दंडहीन कारभार पद्धति स्थापावी ही मार्क्सनें मागाहून मांडलेली कल्पना शास्त्रीय शोधांच्या साह्यानें मूर्त रूप पावेल हें सेंट सायमन यास फार पूर्वी दिसलें होतें. एंजल्स म्हणतो, " १८१६ सालीं सेंट सायमननें लिहिलें कीं, राज्यशास्त्र हें एक अर्थोत्पादन शास्त्रच असून पुढें हीं दोन्ही शास्त्रें एकरूपच होतील. या विधानांत ' आर्थिक परिस्थिति ही राजकीय संस्थांचा साचा असतो,' या ( पुढें मार्क्स व एंजल्स यांनीं मांडलेल्या ) तत्त्वाचें फक्त बीजच दिसून येतें. तरी पण राज्यकारभाराचें रूपांतर अखेर उत्पादनाची व्यवस्था व जड वस्तूंचें नियंत्रण यांत होईल असें स्पष्ट विधान येथें केलें आहे. आज राज्यसंस्था नष्ट करून टाकण्याच्या

तत्त्वाचा पुकारा जाहीरपणें होत असतो. पण तें तत्त्व बीजतः सेंट सायमननें १८१६ सालींच सांगून ठेवलें आहे."

## सेंट सायमनचा संप्रदाय

सेंट सायमनमागून बॅझार्ड, एन्फॅन्टिन वगैरेंनीं त्याचा संप्रदाय चालू ठेविला होता. १८२५ मध्यें सेंट सायमन मेला. १८३० मध्यें फ्रान्समध्यें पुन्हा क्रांति झाली त्यावेळीं सेंट सायमनचे अनुयायी प्रामुख्यानें जनतेसमोर आले. 'माणसानें माणसाची पिळणूक करण्याची पद्धत बंद करून सर्व माणसांनीं संघटितपणें भूगोलांतील धनशक्ति उपयोगांत आणावी असें त्यांचें प्रतिपादन होतें. त्यांच्या मतें भांडवलशाही पद्धतींत मजूर हे नाममात्र स्वतंत्र असतात पण कारखानामालकांच्या इच्छेनें मान न तुकविली तर उपाशी मरण्याचा प्रसंग त्यांच्यावर येतो. ही परिस्थिति मिळकतीसंबंधीच्या वारसाहक्काच्या कायद्यानें वज्रलेप केलेली आहे. यामुळें धनोत्पादनसाधनें खासगी मालकींत राहून त्यापासून मिळणारे सर्व फायदे या मालकांनाच मिळतात. त्यासाठीं त्यांना कोणत्याही गुणाची लायकी असावी लागत नाहीं. उलट बहुसंख्य समाजाचीं दुःखें हीं त्यांना जणूं कांहीं अगदीं वारसाहक्कानें मिळतात. म्हणून वारसा हक्क रद्द करून सर्व धनोत्पादनसाधनें सार्वजनिक फंडांत जमा करावी व त्यांचा सामुदायिकपणें उपयोग करण्यांत यावा. अशा प्रकारें सर्व सामाजिक धनाची मालकी समाजाकडे येते आणि समाजांतील निरनिराळ्या गटाकडून निरनिराळ्या मिळकतींची व्यवस्था ठेवली जाते. वारसा हक्क नष्ट होत नाहीं तर तो कुटुंबाकडून राष्ट्राकडे जातो, अशीं मतें सेंट सायमन संप्रदायामार्फत प्रतिपादिलीं जात. माणसाच्या गुणाप्रमाणें व लायकीप्रमाणें त्याला बक्षिस मिळालें पाहिजे हें सेंट सायमन संप्रदायाचें विशिष्ट मत आहे. स्त्रियांची गुलामगिरी पूर्णपणें नष्ट करून त्यांना पुरुषाबरोबरीचा दर्जा द्यावा असें या संप्रदायाचें मत होतें. १८४० नंतर सेंट सायमन संप्रदाय बहुतेक लुप्तच झाला.

× × × ×

चार्ल्स फोरिअर हा सेंट सायमनपेक्षां बराच थोर पुरुष होय. त्याला लहानपणीं शिक्षण उत्तम मिळालें. पुढें तो व्यापारधंद्यांत शिरला. त्या निमित्तानें हॉलंड, जर्मनी वगैरे देशांत खूप प्रवास करून त्यानें जगाचा अनुभव

पुष्कळ साठविला. बाप मेला व त्याची तीन हजार पौंडांची जिंदगी त्याला मिळाली. तीवर त्यानें लिऑन्स येथें धंदा सुरू केला. पण फ्रेंच क्रांतीच्या दंगलींत लिऑन्सला जॅकोबिन पक्षानें वेढा घातला तेव्हां फोरिअरची सर्व जिंदगी उध्वस्त झाली व तो तुरुंगांत पडला. त्यावेळीं झालेल्या हत्याकांडांतून केवळ दैवबलानें तो सुटला. तुरुंगवास संपल्यावर दोन वर्षें त्यानें सैन्यांत नोकरी केली व पुन्हां तो आपल्या व्यापारधंद्याकडे वळला.

## उत्पादनव्यवस्थेंतील अनीति

अगदीं पूर्ववयांतच व्यापारी पद्धतींतले दोष त्याच्या ध्यानांत आले होते. वयाचा पांच वर्षांचा असतां बापाच्या दुकानांतल्या कांहीं वस्तूसंबंधानें तो खरें बोलला म्हणून त्यास कडक शिक्षा करण्यांत आली होती. या शिक्षेचा खोल ठसा त्याच्या मनावर बसला होता. वयाच्या २७ व्या वर्षी मार्सेल्स येथें त्याला एक भयंकर चमत्कारिक अनुभव आला. बाजारांत धान्याची अतीशय चणचण होती तरी एका तांदुळाच्या दुकानदारानें भारी किंमत यावी म्हणून तांदूळ अडवून ठेवलें होतें. शेवटीं जे तांदूळ खपायचे उरले ते नासले व खाण्यास अयोग्य झाले. तेव्हां फोरिअरला स्वतःच्या देखरेखीखालीं त्यांचा नाश करण्याचें काम दुकानदाराच्या सांगण्यावरून करावें लागलें होतें. ज्या उत्पादन-व्यवस्थेंत असे दोष व अनीति आहे ती व्यवस्थाच सदोष असली पाहिजे अशी त्याची खात्री झाली. या अव्यवस्थेवर उपाय योजणें हें आपलें जीवितकार्य आहे असें त्यानें ठरवून अधिक उच्च समाजव्यवस्था शोधण्यांत व आपले विचार लोकांना समजावून सांगण्यांत त्यानें आपलें आयुष्य घालविलें. त्याची कार्यनिष्ठा व त्यागबुद्धि अप्रतीम होती. त्याची 'सोशॅलिझम्' ची कल्पना त्यानें सेंट सायमन व ओवेन यांचे पूर्वीच म्हणजे १८०८ सालींच मांडली होती. सेंट सायमनच्या योजनेहून फोरिअरची योजना मूलतःच वेगळी आहे.

## 'फॅलँग' संघटना

सेंट सायमनला केंद्रीकृत अशी जबरदस्त मध्यसत्ता हवी होती तर फोरिअरला वैयक्तिक व प्रादेशिक स्वातंत्र्य हवें होतें, मध्यवर्ती राज्यसंस्था हा सेंट सायमनचा केंन्द्रबिंदू आहे. पण फोरियरच्या मतें सत्तेची प्रादेशिक विभागणी होणें इष्ट असून एकेक प्रादेशिक सत्तेस 'फॅलँग' असें तो नांव देतो.

अशा अनेक फॅलँगचें फेडरेशन असावें असें फोरिअरचें म्हणणें दिसतें. प्रत्येक व्यक्तीस तिच्या नैसर्गिक विकासास पूर्ण वाव दिल्यास आजच्या सामाजिक अराजकतेंतून जागतिक सौख्य आपोआप निर्माण होईल असें त्यास वाटत होतें. म्हणून आजच्या संस्कृतीपासून आपण एकदम फारकत करून घेऊन मनुष्यस्वभाव व ईश्वराचे हेतु यांस अनुरूप अशी व्यवस्था ताबडतोब निर्माण केली पाहिजे. 'फॅलँग' मध्यें अशी व्यवस्था करता येईल. एकेका फॅलँगमध्यें चारशें कुटुंबें म्हणजें १८ शें माणसें असावीं. एक चौरस लीग जागा एकेका फॅलँगला देण्यांत यावी. प्रत्येक फॅलँग बऱ्हंशीं स्वयंपूर्ण असावा. प्रत्येक व्यक्तीच्या आवडीप्रमाणें व लायकीप्रमाणें त्याच्या त्याच्या विकासास पूर्ण वाव देण्यांत यावा. संस्कृति, उद्योगधंदे, शेती, सुखोपभोगास पूर्ण संधि, व्यक्तिस्वातंत्र्य व सामुदायिक हित यांचा पूर्ण समन्वय या सर्व गोष्टी आजवर कधींही न साधल्या इतक्या पूर्णतेनें साधतील असें फोरिअरला वाटत होतें. अशा परिस्थितींत दंड व सक्ति यावर आधारलेली राज्यसंस्था जवळ जवळ नामशेष होईल. फॅलँगचे अधिकारी लोकनियुक्त असतील. अशा सर्व फॅलँगमधील अध्यक्षांचीहि एक संघटना होवून जगांतल्या सर्व फॅलँगचें फेडरेशन होईल. त्याची राजधानी कॉन्स्टँटिनोपल येथें असेल. फॅलँगमधील सर्व काम अगदीं शास्त्रीय पद्धतीनें चालेल. प्रत्येकाची आवड व लायकी पाहून त्याला आवडेल असें काम त्याला देता येईल. प्रत्येकाचें काम वरचेवर बदललें जाईल. व्यक्तीव्यक्तींमध्यें श्रेष्ठगुणप्राप्तीसाठीं चुरस लावली जाईल. माणसांना आवडेल असें काम मिळेल तर जिवापाड मेहनत करण्याची हौस व्यक्तिमात्रांत असतें. प्रत्येक व्यक्तीला कोणतें काम करण्याला उत्साह वाटतो याचा विचार करून त्यास तसें काम दिलें तर कोणासही आपलें काम कंटाळवाणें वाटणार नाहीं. शिवाय आज कंटाळवाणें अथवा घाणेरडें वाटणारें काम यंत्रानें करणेंहि सहज शक्य होईल.

## धनाची वाटणी कशी करावी

श्रमापासून उत्पन्न होणाऱ्या धनाची वाटणी पुढीलप्रमाणें करावी अशी फोरिअरची योजना आहे. फॅलँगच्या सगळ्या उत्पन्नांपैकीं प्रत्येक व्यक्तीला पूर्णपणें सुखी होण्यास हवें इतकें कमींत कमी मिळावें. उरलेल्यांपैकीं पांच–बारांश श्रमजीवी वर्गास, चार-बारांश भांडवलदारास आणि तीन-बारांश बुद्धिमानवर्गास द्यावें. फॅलँगमध्यें खासगी भांडवल व बौद्धिक कमी-अधिकपणावरून येणारी

चेतनाची विषमताही राहीलच. फॅलँगची सेवा जो जेवढ्या मोठ्या योग्यतेची करील त्यास तशी मिळकतही दिली जाईल. पण श्रमास मजूरी देण्याची आज जी पद्धति आहे ती बदलेल. कठिण अथवा मामुली कामास उत्तम पगार दिला जाईल. श्रम करणाऱ्याला स्वतःच्या कामापासून उपयोग होत असेल तेथें मध्यम पगार दिला जाईल आणि ज्या कामापासून माणसाला आनंद होतो त्या कामाबद्दल शक्य इतका कमी पगार दिला जाईल. प्रत्येकाला त्यांच्या श्रमादाखल इतका पगार मिळेल कीं प्रत्येकाला भांडवलदार बनण्याची संधि दिली जाईल. फॅलँगकडून प्रत्येक व्यक्तीला स्वतंत्र पगार अथवा निर्वाहाचें साधन मिळेल. स्त्रिया पूर्णपणें स्वतंत्र होतील. पांच वर्षांच्या मुलाचा फॅलँगच्या उत्पन्नांत विशिष्ट वाटा असेल. मार्खामच्या मतें " फोरिअरचें समाजविषयक कल्पनाचित्र हें माणसाच्या मेंदूतून आजवर निघालेल्या कोणत्याहि चित्रापेक्षा अधिक बुद्धिमत्तेचें व तपशीलवार आंखलेलें आहे. पण माणसाच्या स्वभावासंबधानें, समाजविकासासंबंधानें अनुभव व शास्त्र यावरून जें जें समजलेलें आहे त्या सर्वांशीं फोरिअरची विचारसरणी विरोधी अशी आहे." मार्खामचें हें मत खरें अथवा खोटें असो, फोरिअरच्या मतांवर शास्त्रीय दृष्टीनें आक्षेप घेतां येईल हें खोटें नाहीं. पण भांडवलशाही समाजांतील बेबंदशाहीवर, अनीतीवर वगैरे जी टीका त्यानें केली आहे ती अतिशय मार्मिक आहे. त्याचा संप्रदाय असा फारसा टिकला नाहीं. त्याच्या कल्पनेप्रमाणें पहिली फॅलँग निर्माण करण्यांचा प्रयत्न व्हर्साय शहराजवळ करण्यांत आला. पण तो पूर्णपणें फसला. १८३७ त फोरिअर मेला, त्यावेळीं त्याच्या कल्पनेचा पुरस्कर्ता कोणीही उरला नव्हता.

## परिस्थितीचा तत्त्वज्ञानावर परिणाम

ओवेन हा इंग्लंडांतील कल्पनावादी सोशॅलिस्ट प्रचंड यांत्रिक सामर्थ्य धनोत्पादनाचे कार्मी वापरण्यावर मुख्य भर देत होता. तर प्रुधाँ, सिसमाँडी वगैरे फ्रेंच सुधारक लहान हस्तव्यवसायावर भर देणारे होते. हा फरक असण्याचें कारण या दोन देशांच्या आर्थिक उत्पादनाच्या परिस्थितींतील फरक हें होतें. इंग्लंडात जितक्या झपाट्यानें यांत्रिक उत्पादन सुरू झालें व वाढलें तितक्या झपाट्यानें फ्रान्समध्यें सुरू झालें नाहीं. फ्रेंच क्रांतीनंतर जुनी सरंजामशाही मोडून पडली आणि शेतकरी स्वतंत्र जमीनमालक बनले. नेपोलिअननें केलेल्या युद्धामुळें धान्याची मागणी फार वाढली आणि युद्ध चालविण्यासाठीं

पैसाही फार लागूं लागला. यामुळें स्वतंत्र लहान शेतकऱ्यांची शेती आणि धनिकांनीं चालविलेल्या बँका या दोन धंद्यांना महत्त्व आलें व त्यांचीच विशेष भरभराट झाली. यामुळें ओवेननें इंग्लंडांत प्रचंड यांत्रिक उत्पादनावर धनोत्पादन करून नवी समाजरचना कशी करावी याचा विशेष विचार केला तर प्रुधाँ, सिसमाँडी वगैरे फ्रेंच तत्त्वज्ञांनीं लहान शेती, लहान हस्तव्यवसाय व बँका यांच्या आधारावर नवीन समाजव्यवस्था कशी करावी याचा विचार केला.

सेंट सायमनला केन्द्रीभूत मध्यसत्तेचें महत्त्व अधिक वाटतें, तर फोरिअरला स्थानिक स्वायत्तता असलेल्या अगणित घटकांचें जागतिक फेडरेशन हवें आहे. याचें कारणहि फ्रान्सच्या विशिष्ट परिस्थितींत आहे. फ्रान्स हे अनेक परगण्यांचें बनलेलें असून तेथें प्रांतिक अभिमान व राष्ट्रीय अभिमान यांमध्यें बराच काळ चुरस होती. लहान शेती हा ज्या देशांत मुख्य व्यवसाय असेल तेथें ही चुरस लवकर नाहींशी होत नाहीं. इंग्लंडांत भांडवलशाहीला व प्रचंड उद्योगधंद्यांना लवकर महत्त्व आल्यामुळें इंग्लंड, स्कॉटलंड, वेल्स हा पृथक्‌भाव जितका लवकर लोपला तितका लवकर तो फ्रान्समध्यें लोपला नाहीं. शिवाय ग्रेटब्रिटन हें युरोपबाहेरचें एक बेट असल्यानें त्यांत जितक्या लवकर राष्ट्रीय एकजूट झाली तितक्या लवकर युरोपांतच असलेल्या फ्रान्समध्यें होवूं शकली नाहीं. या भिन्न भिन्न परिस्थितींचीं प्रतिबिंबें अर्थात् तत्त्वज्ञांच्या विचारसरणींतही पडलीं. युरोपीय आर्थिक विचारांच्या विकासांत ब्रिटिश व फ्रेंच तत्त्वज्ञांना जसें महत्त्वाचें स्थान आहे. तसेंच जर्मन तत्त्वज्ञांनाहि महत्त्वाचें स्थान आहे. विशेषतः मार्क्स हा स्वतः जर्मन असून त्याच्या विचारसरणीवर इंग्लंड, फ्रान्स व जर्मनी या तीन देशांतील तत्त्वज्ञांच्या विचारसरणीची छाया पडलेली असल्यानें मार्क्सच्या विचारसरणीची पार्श्वभूमि समजून घेण्यासाठीं प्रमुख जर्मन अर्थपंडितांच्या विचारांची माहिती येथें संक्षेपानें देणें अवश्य वाटतें.

---

# जर्मन तत्त्वज्ञ : : : ८

## जर्मनीची विशिष्ट परिस्थिति

इंग्लंड व फ्रान्स या दोन देशांच्या एकुणिसाव्या शतकांतील आर्थिक परिस्थितीशीं जर्मनीची तुलना केली असतां जर्मनी उत्पादनांत फारच मागसलेला होता हें दिसून येतें. त्याचें प्रतिबिंब जर्मन विचारवंतांच्या विचारसरणीवर पडलें आहेच. एकुणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत व पुढेंही जर्मनीच्या आर्थिक जीवनाचा पाया सरंजामी शेती हाच होता. उद्योगधंदे होते ते जुन्या हस्तव्यवसायांतले असून मध्ययुगीन कारागीरसंघांच्या हातीं होते. राजकीय दृष्ट्या जर्मनी हें एक राष्ट्र नसून कित्येक लहान लहान राज्यांची तेथें गर्दी होती. या अनेक संस्थानांत आनुवंशिक राजे गादीवर असून त्यांची सत्ता आपापल्या मुलुखापुरती पूर्ण अनियंत्रित होती. हे सर्व राजे मूळचे सरंजामदार असून एका मध्यवर्ती सत्तेचे वास्तवीक मांडलिक होते. पण मध्यसत्ता दुर्बल झाल्यामुळें या सर्व जहागिरी स्वतंत्र झाल्या. पुढें एकुणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत बिस्मार्क या प्रशियाच्या प्रसिद्ध पंतप्रधानानें या सर्व सरंजामदारांना प्रशियाच्या एकछत्राखालीं आणलें. पुढें चालू शतकांत सर्व सरंजामदार व मध्यवर्ती राजघराणेंही पदच्युत होऊन जर्मनी पूर्णपणें एकसंघ असें एकराष्ट्र बनलें आहे. असो.

## तत्त्वज्ञांची बचावाची भूमिका

एकुणिसाव्या शतकांतील वर सांगितलेल्या राजकीय फुटीरपणाचा परिणाम राष्ट्रीय जीवनावर फार वाईट झाला होता. यामुळें सर्व तत्त्वज्ञांच्या विचारांत

याच दु:स्थितीच्या काळजीची छटा सतत दिसून येते. या निरनिराळ्या छोट्या छोट्या स्वतंत्र राष्ट्रांच्या अनेक सरहद्दीवरून मालाच्या व माणसांच्या रहदारीस असंख्य अडथळे असल्यानें व्यापारधंद्याची वाढ होणें अशक्य झालें होतें. या छोट्या छोट्या राज्यांचें चलनसुद्धां पृथक पृथक असून जागोजाग संरक्षक जकातींच्या तटबंदींनीं देश बेजार झालेला होता. व्यापाऱ्यांना व धंदेवाल्यांना धनोत्पादनाच्या काळजीपेक्षां जकातींच्या जुलुमाची काळजी करण्यांतच अधिक वेळ व पैसा खर्चावा लागे. उलट जर्मनीबाहेरच्या देशांनीं मात्र आपापले वशीले या छोट्या छोट्या राष्ट्रांत बांधून आपापल्या मालाला रस्ता मोकळा करून घेतला होता. सर्व जर्मनीचीं केन्द्रीभूत अशी सत्ता कांहींच नसल्यानें इंग्लंड–फ्रान्सचा विविध पक्का माल साऱ्या लहान लहान जर्मन राज्यांत मोकाटपणें शिरून जर्मनीच्या आर्थिक प्रगतीच्या वाटेवर बांध घालून बसला होता. धंदेवाले आणि राजकीय तत्त्वज्ञ या दोघांचेंही लक्ष इंग्लंड–फ्रान्सचें हें दडपण कसें उखडून काढावें इकडे लागलें होतें. जर्मनी मागासलेला कां, याचा विचार सर्वत्र काळजीपूर्वक होवूं लागला. इंग्लंड–फ्रान्सच्या प्रगति–साधनांपैकीं कोणत्या साधनांचा अवलंब आपणांस करतां येईल याचा विचार तत्त्वज्ञ करीत होते. स्मिथ व रिकार्डो या इंग्लिश तत्त्वज्ञांची शिकवण व फ्रेंच क्रांतीचीं तत्त्वें यांची छाप जर्मन विचारवंतांचें मनावर पडून जर्मनीचें राष्ट्रीय ऐक्य व आर्थिक स्वातंत्र्य यांचा प्रसार जर्मनींत होवूं लागला. अर्थात् या तत्त्वांचा जर्मनींत अवलंब करतांना जर्मनीच्या भिन्न परिस्थितिअनुरूप मूळच्या तत्त्वांना योग्य मुरड घातली पाहिजे इकडेही तत्त्वज्ञांनीं दुर्लक्ष केलें नव्हतें. यामुळें जर्मन आर्थिक व राजकीय तत्त्वज्ञांच्या विचारांना परिस्थितिविशिष्ट स्वरूप आलें होतें.

× × × ×

## राज्यसंस्थेचा बडेजाव

फिच्टे हा एकुणिसाव्या शतकांतील प्रमुख जर्मन तत्त्वज्ञ होय. केन्द्रीभूत व सर्वजीवनव्यापी राज्यसंस्था हें फिच्टेचें मुख्य तत्त्व आहे. प्राणिशरीरांत अवयव भिन्न असूनहि शरीर जसें सर्व एकजीव असतें त्याप्रमाणें सर्व जर्मनीचें एक राज्य असावें व तें सर्व जनतेच्या जीवनांत सर्वांगांनीं भरून राहिलेलें असावें असें तो म्हणे. ॲडॅम स्मिथच्या विचारसरणींत व्यक्तीला विशेष महत्त्व देण्यांत आलें असून राज्यसत्तेचें महत्त्व अगदीं कमी करण्यांत आलें आहे.

उलट फिच्टे व्यक्तीला महत्त्व देत असला तरी अनेक व्यक्तींनीं बनलेली राज्यसंस्था ही केवळ अनेक व्यक्तींचा अव्यवस्थित घोळका नव्हे तर ती एक स्वतंत्र शक्ति आहे असें मानीत असे. व्यक्तिहित व समाजहित या दोघांनाही स्वतंत्र अस्तित्व आहे, अनेकांच्या व्यक्तिहितास मोकाट सोडल्यास त्यामुळें समाजहित आपोआप होईल हें ॲडॅम स्मिथचें मत चूक असून व्यक्तिहित व समाजहित या दोघांचें पृथक अस्तित्व मान्य करावें व दोघांचा अन्वय बसेल असा त्यांचा समेट करावा हे फिच्टेचें जर्मन आर्थिक जीवनाबद्दलचें मत आहे. म्हणून ॲडॅम स्मिथचें 'चाहे सो करो' (लेझेम फेरे) हें व्यक्तिस्वातंत्र्याचें तत्त्व तो अमान्य करतो. प्रत्येक नागरिकाच्या मालकीच्या धनाचें रक्षण करणें एवढेंच राज्यसंस्थेचें कर्तव्य नसून प्रत्येकाच्या श्रमानें जें सामुदायिक धन निर्माण होईल त्या धनांतील प्रत्येकाच्या श्रमाच्या प्रमाणांत यथायोग्य वाटणीची मालकी प्रत्येकाला मिळवून देणें हेंही राज्यसंस्थेचें कर्तव्य आहे. समाजव्यवहारासंबंधानें राज्यसंस्थेनें नुसतें तटस्थ राहावयाचें नसून व्यक्तिमात्राला त्याच्या गरजा भागविण्यासाठीं राज्यसंस्थेनें मदतही केली पाहिजे.

## राज्यसंस्थेचा आराखडा

अशी राज्यसंस्था कशी असावी याचा आराखडाही फिच्टेनें तयार केला होता. राज्यंस्था एकजूट असून परराज्यापासून ती अगदीं अलग व कपाटबंद हवी असें फिच्टेचें मत असल्यामुळें ॲडॅम स्मिथच्या अप्रतिबंध व्यापारास त्याचा विरोध आहे. परराष्ट्रीय व्यापार राष्ट्रीय जीवनास आवश्यक झाला कीं परराष्ट्रांतील वरचेवर बदलणाऱ्या परिस्थितीचे चटके व झटके आपणांस बसणारच. ते चुकवायचे असतील तर आर्थिक दृष्ट्या स्वदेश हा पूर्णपणें स्वायत्त असला पाहिजे. परराष्ट्रीय व्यापारामुळेंच राष्ट्राराष्ट्रांत स्पर्धा माजून युद्धें अपरिहार्य होतात. युद्धें थांबवायचीं असतील तर त्यासाठींही परराष्ट्रीय व्यापार बंद केला पाहिजे. एकेक राष्ट्र असें कपाटबंद करण्याचा मुख्य उपाय म्हणजे जर्मन राष्ट्रांतलीं लहान लहान स्वतंत्र राष्ट्रें प्रथम मोडून सर्व राष्ट्र प्रथम एकछत्री आणि एकजूट करणें आणि मग सोन्याचांदीचें म्हणजे धातूचें चलन अजिबात बंद करून कागदी चलन सुरू करणें हा होय.

## चलननियंत्रणाचें तत्त्व

पैसा याला स्वतंत्र उपयुक्तता कांहींहि नसून तो फक्त देवघेव होणाऱ्या मालाचें प्रतीक असतो. अर्थात् तो कशाचा बनविला आहे याला कांहीं अर्थ

नाहीं. राष्ट्रीय पैशाचें प्रतिनिधित्व हें स्वयंभू नसून राज्यसंस्थेनें तें त्याला द्यावें लागतें. पैसा हा दोन प्रकारचा असतो. आंतरराष्ट्रीय पैसा हा एक प्रकार. हा सोन्यारुप्यासारख्या मूल्यवान धातूचाच असतो. आणि दुसरा प्रकार राष्ट्रीय पैशाचा. याला सरकारच्या हुकमतीचें पाठबळ असतें. पैसा व मालांचे बाजार-भाव यांचा संबंध फिच्टेला कळला होता. पैशाचे परिमाण सारखेच राहिले तर मालांचे बाजारभाव अनुक्रमें वाढतात अथवा कमी होतात हे तो जाणून होता. आणि भावी नमुनेदार राज्यघटनेंत प्रत्येक मालाला न्याय्य किंमत यावी यासाठीं चलनाचें परिमाण ठरविणें राज्यसंस्थेच्या हातीं असावें असें तो म्हणतो.

× × × ×

## स्मिथ, फिच्टे व मुल्लर

अॅडम मुल्लर (१७८९-१८२९) हा फिच्टेच्या खालोखाल मोठा जर्मन तत्त्वज्ञ होय. फिच्टेचीं मतें अॅडम स्मिथच्या मताविरुद्ध होतीं. याबद्दल मुल्लरनें फिच्टेविरुद्ध पुष्कळ टीका केली आहे. पण त्याची स्वतःचीं मतें फारशीं फिच्टेहून भिन्न नाहींत. मुल्लर हा स्वतःला अॅडम स्मिथचा अनुयायी समजतो. पण स्मिथच्या जर्मन अनुयायांना जर्मनीच्या परिस्थितींत स्मिथच्या मतांचा उपयोग कसा करावा हें कळत नाहीं व तो आपणांस मात्र कळला असें सांगून मग स्मिथच्या मतांची वाटेल तशी लांडगेतोड तो करतो व फिच्टेसारखींच तत्त्वें अखेर अखेर मांडतो. स्मिथ हा व्यक्तिस्वातंत्र्य व भौतिकवाद यांचा पुरस्कर्ता आहे, तर मुल्लर धर्म व पारलौकिक दृष्टिकोण यांचा पुरस्कर्ता आहे. फिच्टेप्रमाणेंच मुल्लरच्या मतेंही 'राज्यसंस्था ही एकजीव व एकसंध शरीर असून तिचे भिन्न भिन्न घटक हे एकाच शरीरांतल्या पेशी आहेत.' शरीर जिवंत राहिल्यावांचून त्या पेशी जिवंत राहणार नाहींत. राज्यसंस्थेचें स्वरूप बदलत जाणारच. प्रत्येक पिढींतला मोठा माणूस राज्यसंस्थेला नवें स्वरूप देणारच. यामुळें राज्यसंस्था ही कांहींशी शब्दातीत आणि व्याख्यातीत आहे. राज्यसंस्थेसंबंधीची एक अमूर्त कल्पना तेवढी त्रिकालाबाधित असेल. पण तिचीं प्रत्यक्ष स्वरूपें वेळोवेळीं बदलत जाणारच.

## राज्य हेंच नागरिकजीवन

मुल्लरनें बहुधा स्वतःच्या काळापुरती राज्यसंस्थेची एक व्याख्या दिली आहेच. तो लिहितो, "व्यक्तिमात्र ही नागरिकत्वाच्या जीवनाचें केन्द्र असतें.

त्या व्यक्तीच्या मागें असलेल्या भूतकालाचा सन्मान राखून भविष्य काळाची काळजी केली पाहिजे. या कालशृंखलेच्या बंधनांतून कोणीही सुटूं शकत नाहीं. राज्यसंस्था ही कांहीं एक कृत्रिम वस्तु नव्हे. नागरिकजीवनांत ज्या शेंकडों, हजारों सुखदायक वस्तु आपण घडवितों व मोडतों तशी कांहीं राज्यसंस्था ही वस्तु नाहीं. नागरिक-जीवनाचे राज्य हें संबंध स्वरूप आहे. माणसें अस्तित्वांत आलीं कीं, त्याबरोबरच हें स्वरूप अस्तित्वांत आलें पाहिजे." व्यक्ति व राजसंस्था यांचा संबंध या सिद्धान्तानुसारच कळूं शकतो. 'राज्यसंस्थेवांचून माणसाला ऐकणें, पाहाणे, विचार करणें, भावना येणें, प्रेम करणें वगैरे कांहींही शक्य नाहीं. थोडक्यांत म्हणजे राज्यसंस्थेवांचून मानवी व्यक्तीचें अस्तित्व कल्पिताच येत नाहीं.' कायदा आणि शहाणपण हीं दोन प्रमुख समाजशास्त्रें होत. त्यांतच राजकारण आणि अर्थशास्त्र यांचा अंतर्भाव होतो. धर्म या दोन्ही अंगांचा संधि व समन्वय करतो. ईश्वर हा जगताचा सरन्यायाधीश व कौटुंबिक शास्ता होय. धर्मावांचून आर्थिक व्यवहाराला अंतिम साध्य असे कांहींही राहात नाहीं. धनोत्पादनाचें कार्य अंगिकारावयाचें तें ईश्वरासाठींच अंगीकारावयाचें, कोणत्याही भौतिक फलाची अपेक्षा ठेवायची नाहीं. माणसांना ईश्वराच्या शक्तीचा विसर पडतो म्हणून सगळ्या आर्थिक अडचणी उद्भवतात.

## सरंजामशाहीचा पुरस्कार

धन हें सर्वस्वी श्रमानेंच निर्माण होतें असें मानणें बरोबर नाहीं. श्रम हें केवळ एक हत्यार आहे. त्याला ईश्वरानें माणसास दिलेल्या बुद्धिसामर्थ्याची, जमीनीची व भांडवलाची जोड दिली पाहिजे म्हणजेच धनोत्पादन होतें. मुल्लरच्या या आर्थिक सिद्धांतांना मध्ययुगीन राज्यसंस्थेची पार्श्वभूमि आहे. जुनी सरंजामीपद्धतिच त्यास मान्य आहे. धर्मगुरु, सरदार आणि धंदेवाले हे आपापला दर्जा ओळखून व तो संभाळून परस्परांशीं सलोख्यानें राहतात ती मध्ययुगीन समाजव्यवस्थाच चांगली असें तो म्हणतो. समाजांतील या सन्माननीय वर्गाच्या यादींत तो शेतकऱ्यांचा मुळींच समावेश करीत नाहीं.

मालकी हक्क, धन, धनोत्पादन, भांडवल वगैरे सर्व बाबतींतील मुल्लरचीं मतें गुळमुळीत आहेत. व्यक्ति आणि संपत्ति यांमध्यें फारकत व मालकीहक्काची व्यवस्था झाली पाहिजे. व्यक्ति आणि संपत्ति यांचा संयोग

मुल्लरच्या मतें फक्त सरंजामी समाजांतच सांपडतो. तेथें प्रत्येक व्यक्ति ही स्वतःच व्यक्तिही असते व धनहि असते. व्यक्ति या नात्यानें ती धनाची मालक असते. धन या नात्यानें प्रत्येक व्यक्तीला एक मालक असतो. प्रत्येक व्यक्तीचा हा मालक म्हणजे राज्यसंस्था होय. रोमन कायद्याप्रमाणें मालकीहक्कांची कल्पना बाळगणें म्हणजे मालकीहक्काचा विध्वंस करणेंच होय. सरंजामीपद्धतींत धनाचा मालकीहक्क अमर्याद अथवा निरंकुश नाहीं. धनाच्या वापराचा हक्क तेवढा व्यक्तीस मिळतो. मालकीहक्काचें राज्यसंस्थेनें संरक्षावयाचें स्वरूप तें हें. मालकीहक्कासंबंधीचा रोमन-ब्रिटिश कायदा आणि सरंजामी कायदा यांचा संयोग साधला पाहिजे. ' शेती, जमीनमालकी आणि युद्ध यांच्या दृष्टीने सरंजामी संबंध अवश्य वाटतात, तर उद्योगधंदे, व्यापार, जंगम-मिळकत या दृष्टीनें अगदीं कडक स्वरूपाची खासगी मालकी हवीशी वाटते.'

## राज्यसंस्थेचें व्यापक कर्तव्य

विशेषतः असा संयोग युद्धांच्या दृष्टीनें अवश्य आहे. सरंजामी संस्थांमुळें व्यापार व उद्योगधंदे यांस अडथळा होतो. राज्यसंस्थेचें अस्तित्व हें युद्धावांचून राहणें अशक्यच आहे. अर्थात् त्यासाठीं अवश्य असणाऱ्या सरंजामी संस्थांमुळें धनाच्या मालकीहक्कांवर थोडेंफार नियंत्रण आलें तर समाजांत युद्धासाठीं अवश्य असणारें जें शौर्य तें सरजामी संस्थांमार्फत निर्माण होऊन मालकी हक्कांवरील नियंत्रणाची भरपाई होतें. उलट रोमन-ब्रिटिश खासगी मालकी हक्कांनीं सरंजामशाही मालकी हक्कास अडथळा होतो खरा, पण रोमन-ब्रिटिश मालकीहक्कामुळें पैशाचे हितसंबंध निर्माण होऊन युद्धकार्य सुकर होतें. सारांश राज्यसंस्थेंत रोमन-ब्रिटिश मालकीपद्धति आणि सरंजामी मालकीपद्धति यांचा संयोग झाला पाहिजे तरच ती राज्यसंस्था स्थिर स्वरूपाची होईल. राज्यसंस्था ही अखंड, एकजिनसी ( टोटॅलिटेरिअन ) आहे या दृष्टीनेंही धनाची व्याख्या मुल्लरनें केली आहे. प्रत्येक वस्तु व व्यक्ति यांना जसें एक खासगी स्वतंत्र स्वरूप आहे तसेंच एक राज्यसंस्थेच्या नात्यांतलें स्वरूपही आहे. धन हें खासगी मिळकतही आहे आणि राष्ट्रीय मिळकतही आहे. 'अमुक वस्तु अमक्याच्या मालकीचीं आहे एवढेंच लक्षांत घेऊन भागत नाहीं. ती वस्तु माणसाच्या उपयोगाची असून कोणीतरी तिचा उपयोग केला पाहिजे हाही मुद्दा विचारांत घ्यावा लागतो.' राष्ट्राच्या संपत्तीचें

मोजमाप केवळ वजन आणि संख्या यावरूनच ठरविता येत नाहीं. यामुळें फार तर संपत्तीच्या उत्पादनाची शक्यता कळेल. पण तिचें खरें अस्तित्व उपयोगावरून कळून येणार आहे. उपयोगांत येवूं न शकणारी वस्तु असून नसून सारखी आहे. राज्यसंस्थेनें फक्त गोचर अशा धनाचा विचार करून भागत नाहीं. सर्व वास्तव धन तसेंच भावनात्मक धन, व्यक्ति आणि त्यांचे परस्पर संबंध या सर्वांचा विचार केला पाहिजे. धन हें या सर्वांनीं बनलेलें आहे.

## अर्थशास्त्राचा दुहेरी हेतु

क्लासिकल अर्थशास्त्रज्ञांच्या मतें धनोत्पादन म्हणजे भौतिकधन व खासगी संपत्ति यांची वाढ एवढेंच होय. जणूंकांहीं सर्व खासगी व्यक्तींच्या धनांची बेरीज म्हणजेच राष्ट्रीय धन होय अशी ॲडॅम स्मिथची विचारसरणी दिसते. म्हणून त्यानें समाजांत प्रत्येकास व्यक्तिस्वातंत्र्य देऊन स्वार्थसाधन करूं द्यावें असें प्रतिपादन केलें. पण ॲडॅम स्मिथचें हें म्हणणें, मुल्लरच्या मतें, बरेंच एकांगी आहे. मुल्लरच्या दृष्टीनें अर्थशास्त्राचा खरा हेतु दुहेरी आहे. ( १ ) माणसाच्या उपयोगी अशा सर्व भौतिक व भावनात्मक वस्तु जास्तींत जास्त उत्पन्न करणें, ( २ ) पण त्याबरोबरच सर्व धनांत श्रेष्ठ धन जें राष्ट्रकुटुंबाचें आर्थिक व सामाजिक ऐक्य, तें साधणें, असे हे दोन हेतु होत. मुल्लर वैयक्तिक उत्पादनावर भर देत नसून राष्ट्रीय उत्पादनावर भर देतो, तसेंच व्यक्तीच्या इच्छेवर राज्यसंस्था अवलंबून ठेवीत नसून सामुदायिक इच्छा हा राज्यसंस्थेचा आधार आहे असें सांगतो. जमीन, श्रम आणि भांडवल हे धनोत्पादनाचे घटक नसून निसर्ग, माणूस आणि भूतकाल हे धनोत्पादन कार्याचे घटक होत. भूत काळांमध्यें माणसानें आजवर निर्मिलेल्या व सध्यां उत्पादनास उपयोगी पडणाऱ्या भौतिक व आत्मिक भांडवलाचा समावेश होतो. अर्थशास्त्रज्ञांनीं आत्मिक धनाची आजवर उपेक्षा केली. भूतकालांतील मानवी श्रमांनीं जमविलेला अनुभवाचा खजीना भाषा, भाषण आणि लेखन यांनीं माणसाला वर्तमान उपयोगासाठीं उपलब्ध होत असतो. पंडितांनीं हा साठा वाढवीत राहणें हें त्यांचें कर्तव्य आहे. धनोत्पादनास या सर्वांचा उपयोग आहे व त्यांचें त्या कामीं सहकार्य होत असतें. निरनिराळ्या क्षेत्रांत निरनिराळ्या बाबींस महत्त्व दिलें जात असतें एवढेंच. उदाहरणार्थ शेतीचे क्षेत्रांत जमीनमालकीवर भर दिला जातो तर कारखानदारींत श्रमावर दिला जातो. व्यापारांत भांडवलावर, विशेषतःपैशावर

भर दिला जातो आणि शास्त्रीय संशोधनांत कल्पनांवर भर दिला जातो. या प्रत्येकांत बाकीचे घटक कार्यभाग उरकीत असतातच.

## सरंजामशाहींत सर्व सद्गुण

मुल्लरच्या मतें 'सरंजामशाहींत या सर्व घटकांचा समावेश झाला आहे. जमीनीमुळें सरदार वर्ग उत्पन्न होतो, श्रमामुळें शहरी कारागीर होतो. आध्यात्मिक भांडवलामुळें धर्मगुरुवर्ग प्रतिष्ठा पावतो. धर्मगुरूंना भौतिक भांडवलही दिलेलें असे. पण सरंजामी पद्धती मोडून गेल्यामुळें भौतिक आणि आत्मिक धनाची फारकत करावी लागली. हळू हळू भौतिक भांडवलानें इतर सर्व क्षेत्रावर आक्रमण सुरू केलं आणि सामुदायिक जीवनाच्या सर्वांगावर प्रभुत्व स्थापण्याचा प्रयत्न केला. उत्पादनाच्या सर्व क्षेत्रावर या भौतिक भांडवलानें प्रभुत्व स्थापल्यामुळें अर्थशास्त्रज्ञ हे जमीन, श्रम व भांडवल एवढ्यांचेंच पृथक्करण करूं लागले. मुल्लरच्या कल्पनेंतील राज्यसंस्था ही अर्थातच व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारलेली राज्यसंस्था नसून संघटित आणि स्वयंपूर्ण अशी फिच्टेची राज्यसंस्थाच मुल्लरनें सुचविली आहे. आर्थिक स्वदेशाभिमान हा अगदीं स्वार्थी हिशोबाचा नसावा अथवा सामुदायिक हुकमबाजीचाही नसावा, परदेशाहून येणारा पैसा किती आणि जाणारा पैसा किती यांचा ताजवा तोलीत राहाणारा नसावा अथवा परदेशी मालाला केवळ मज्जाव करणाराही नसावा, स्वदेशांत तयार होणाऱ्या वस्तूबद्दल लोकांत प्रेम उत्पन्न केलें पाहिजे, राज्यसंस्थेचें कर्तव्य राष्ट्रीय स्वाभिमान, आणि आर्थिक बाबींत राज्यसंस्थेशीं नागरिकांचें ऐक्य या भावना व्यक्तिमात्राच्या अंतःकरणांत बिंबविणें हें आहे. वस्तूचा उपयोग निरानिराळ्या राष्ट्रांत निरानिराळा असूं शकेल. आपल्या राष्ट्राच्या गरजा काय असाव्या हें त्या त्या सरकारनें ठरविलें पाहिजे. राष्ट्रीय धनोत्पादन व राष्ट्रीय धनोपभोग यांमध्यें अन्वय राखणें हें शहाण्या सरकारचें कर्तव्य असतें. प्रत्येक व्यक्तिमात्राच्या अंतःकरणांत राष्ट्रीय सामर्थ्याची भावना दृढ करून उत्पादन व उपयोग यांच्यांत समतोल राखण्याचा प्रयत्न राज्यसंस्था करते. अप्रतिबंध व्यापारानें राष्ट्रीय एकजूट नष्ट होते. प्रत्येक व्यक्ति राष्ट्राचा नागरिक न राहतां जगाचा नागरिक होते. फिच्टेच्या मतें स्वदेशाच्या बाहेरच्या घडामोडींचें धक्केचपेटे स्वदेशास बसूं नयेत यासाठीं राष्ट्र सर्वस्वी स्वयंपूर्ण असावें. मुल्लरला राष्ट्र स्वयंपूर्ण व एकजूट हवें होतें यांचें कारण डोळे मिटून सरकारची आज्ञा पाळणें हा गुण एरवी नागरिकांत येणार नाहीं असें त्याला वाटलें.

## मुल्लरचा पैशाचा सिद्धांत

मुल्लरनें आपली ही सर्व विचारसरणी मुख्यतः आपल्या पैशाच्या सिद्धांतांत उपयोगांत आणली आहे. मुल्लरचा हा सिद्धांत स्पष्ट व तर्कशुद्ध नाहीं. पण स्थूल मानानें बोलायचें तर फिच्टेची राष्ट्रीय पैसा व जागतिक पैसा असा भेद मानण्याची कल्पनाच मुल्लरनें मांडली आहे. त्यानें ही कल्पना थोडी गूढ केल्याचें दिसतें. माणसें आणि राज्यसंस्था यांचा जो अपरिहार्य संयोग त्याचें स्वरूप म्हणजेच पैसा होय. राज्यसंस्थेप्रमाणेंच माणसांना पैसा एकत्र बांधतो. व्यक्ति आणि वस्तु यांना जे खाजगी व सार्वजनिक स्वरूप आहे त्यांमधील सांधा म्हणजेच पैसा होय. पैशाच्या अंगचे 'पैसापण' हें स्वयंभू नसून समाजाकडून त्याला तें मिळावें लागतें. राज्यांतील कोणतीही वस्तु मग ती माणूस असो वा जड वस्तु असो ती पैसा होवूं शकते. एकादें राष्ट्र सामर्थ्य-संपन्न आहे याचें लक्षण जास्तींत जास्ती माणसे व वस्तु सामाजिक संबंधांत शिरून 'पैसा' स्वरूप पावतात हेंच होय. मुल्लरनें या तत्त्वानुसार ऑस्ट्रियांत जें कागदी चलन होतें व ज्याचें सोनें देण्याचें सरकारनें नाकारलें होतें त्याचें समर्थन केलें. 'आस्ट्रियांतला पैसा म्हणजे काय असें मला कोणीं विचारलें तर बादशहाचा शब्द, राष्ट्राचा शब्द—म्हणजे पैसा असें उत्तर मी देईन' असें मुल्लर म्हणतो. धातूचा पैसा हा जागतिक असतो. तो आंतरराष्ट्रीय व्यापाराच्याच उपयोगी आहे. पण राष्ट्रीय सरकारशीं व्यक्तीला बांधून टाकणारें जें बंधन आहे तें हा धातूचा आंतरराष्ट्रीय पैसा तोडून टाकीत असतो. उलट कागदी पैसा हा राष्ट्रीय आहे, तो स्वदेशाभिमानाचा द्योतक आहे, तो मध्ययुगीन आहे. हा राष्ट्रीय पैसा एकजूट व सामर्थ्य यांचा निदर्शक आहे. राष्ट्रीय पत हीसुद्धां राष्ट्रीय धनाचा एक महत्त्वाचा भाग आहे. राष्ट्रीय पत ही राष्ट्रीय भांडवल उत्पादनाचे कामीं लावण्याची शक्ति आहे.

मुल्लरनें मांडलेल्या विचारसरणीअनुसार राज्यसंस्थेचें स्वरूप व अंगें कशीं असतील हें स्पष्टपणें कळूं शकणार नाहीं. कागदी पैसा असावा, धंदे संरक्षित असावे, आणि जमीनीवर कर नसावा अशा कांहीं गोष्टी त्यानें स्पष्टपणें सांगितलेल्या दिसतात. मुल्लरच्या राज्यसंस्थेचें स्वरूप म्हणजे जमिनदारी, भांडवलदारी आणि अनियंत्रित राज्यसत्ता यांचा कांहींतरी सांधा असूं शकेल.

आहे-अथवा नाहीं हें समजून घेतों. एकादी गैरसोय असली तर ती 'आहे' हें आपणांस प्रत्यक्ष अनुभवानें कळतें. पण ती गैरसोय दूर कशी करावी, त्यासाठीं घराची रचना बदलावी कीं काय आणि ती कशी बदलावी हें समजण्यास स्थापत्य म्हणजे एंजिनियरिंगचा अभ्यास करावा लागतो. इंग्लंडांत मार्क्सच्या काळीं व पूर्वी अर्थशास्त्राचा विशेष अभ्यास झाला होता. फ्रान्समध्यें भौतिकवादास महत्त्व आलें होतें आणि जर्मनींत हेगेल या तत्त्वज्ञाचा भाववाद प्रभावी झाला होता. जगाच्या रचनेबद्दलच्या कल्पना या निरनिराळ्या पंथांनीं वेगवेगळ्या मांडल्या होत्या. त्या सर्व कल्पना खऱ्या, खोट्या अथवा मिश्र कशाही असल्या तरी जग असें असें आहे अथवा नाहीं, एवढेंच सांगत होत्या. पण यांत्रिक भांडवलशाहीनें मानव जातीचीं धनोत्पादन शक्ति अफाट वाढविली असूनही माणूस दुःखांत जो खितपत पडला आहे तो कसा बाहेर निघेल याचें शास्त्र कोणींच सांगितलें नव्हतें. मागें सांगितल्याप्रमाणें कल्पनावादी सोशॅलिस्टांनीं नैतिक दृष्टीनें परिस्थितीकडे पाहून परिस्थितींतील अन्यायाबद्दल संताप व्यक्त केला. पण प्रचलित दुःख व अन्याय नाहींसा करण्यासाठीं त्यांनीं सुचविलेले उपाय हवेंत काल्पनिक मनोरे बांधण्यासारखे होते. व्यावहारिक बाबतींत वस्तुस्थितीकडे दीनवाणे पहात राहण्याहून त्यांना कांहींच करतां येईना.

## क्लासिकल पंथाची सोइस्कर भूमिका

या क्लासिकल ( म्हणजेच व्यक्तिवादी ) विचारवंतांची भूमिका कांहींशी सोइस्कर होती. सरंजामी समाजांतील बंधनें नाहींशीं करून व व्यक्तिस्वातंत्र्य व व्यवसायस्वातंत्र्य दिलें कीं माणसाची धनोत्पादनशक्ति वाढीस लागते, धन भरपूर उत्पन्न झालें कीं अर्थात् तें माणसाच्या उपयोगास येणारच. कारण रिकार्डोच्या मतें 'माणूस जें धन निर्माण करतो तें उपभोगाकरितां अथवा विनिमयाकरितां निर्माण करतो." पण सरंजामशाही व तत्पूर्वीच्या गुलामगिरी वगैरे समाजव्यवस्था कृत्रिम असून व्यक्तिस्वातंत्र्य व व्यवसायस्वातंत्र्य यावर आधारलेली समाजव्यवस्था हीच नैसर्गिक आहे. ज्यानें त्यानें आपला स्वार्थ साधला म्हणजे समाजाचा स्वार्थ आपोआप साधतो असें या व्यक्तिवाद्यांचें मत होतें. व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारलेल्या समाजांत बहुसंख्य कष्टजीवी वर्ग दुःखी आहे हें माल्थसला व रिकार्डोला दिसलेंही. पण गरीबांच्या दुःखाला कारण

गरीबच आहेत, धन जास्त मिळालें कीं ते मुलें जास्त करतात यामुळें त्यांच्या दुःखास तेच कारण आहेत असें माल्थस आपलें समाधान करून घेत होता.

रॉबर्ट ओवेननें धनिक वर्गाचें हृदय परिवर्तन आणि गरीबांचें संस्कृतिवर्धन करण्याचा निकरानें प्रयत्न केला. पण त्यांत त्यास इतकें अपयश आलें कीं त्याचे मार्ग निरुपयोगी आहेत अशी मार्क्सची खात्री झाली.

## फ्रेंच जडवाद्यांचा अपुरेपणा

इंग्लंडांतील व्यक्तिस्वातंत्र्यवाद्यासारखाच फ्रान्समध्येंही व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या वास्तववाद्यांचा एक पंथ फ्रेंच क्रांतीच्या आधींपासून उदयास आला होता. इंग्लंडांत रोजर बेकन व फ्रॅन्सिस बेकन या विचारवंतांनीं धर्मश्रद्धेचा त्याग करून माणसांनीं भौतिकशास्त्राचे शोध लावावे आणि आपली सुखाभिवृद्धि करून घ्यावी अशी जी विचारसरणी पूर्वी मांडली होती तिचा फ्रेंच भौतिकवाद हा एकप्रकारें विकास होता. 'ईश्वरानें प्रकाश होऊं दे, असें म्हटलें आणि प्रकाश झाला' असल्या बायबलांतल्या कल्पनांनीं माणसांचें बुद्धिसामर्थ्य नष्ट झालें असून बहुसंख्य मानवसमाज या मूढतेमुळें धर्मगुरु, राजे व सरदार यांच्या जुलुमाखालीं व सांस्कृतिक दडपणाखालीं पिचला जात होता. ही परिस्थिति पालटून टाकण्यासाठीं धर्मगुरु आणि धर्म यांचें प्राबल्य नष्ट करावें आणि भौतिक सृष्टीचे नियम समजून घेऊन माणसानें त्या नियमांच्या अवलंबानें सुखी व्हावें अशी ही फ्रेंच आधिभौतिकवाद्यांची विचारसरणी होती. यांत बौद्धिक गुलामगिरीचा नाश होत होता, तरी पण दुसऱ्या एका प्रकारची व्यावहारिक अगतिकता या भौतिकवादाच्या पोटाशीं होती. सृष्टिधर्म समजून घेतले तरी मानवी सुखवर्धनाची व प्रगतीची शक्यता कितपत होती? 'फारशी नाहीं' असेंच उत्तर या भौतिकवादापासून मिळत होतें. कारण सृष्टीचे आज माहीत नसलेले गुणधर्म माणसाला समजले तरी त्यानें माणसाचें सुख कसें वाढणार? विस्तवानें कुत्र्याचें अंग भाजलें तर विस्तवाचा गुणधर्म अमुक आहे असें सविकल्पकज्ञान कुत्र्याला नाहीं, पण माणसाचें अंग भाजलें तर अमुक कारणानें आपलें अंग भाजलें हें त्यास कळूं शकतें. पण कुत्र्याचें अज्ञान व माणसाचें ज्ञान या दोन भूमिकांचा परिणाम अंग भाजण्याच्या व दुःख होण्याच्या दृष्टीनें वेगवेगळा कोणता होतो? सुखदुःखाच्या हिशेबानें पाहिलें तर अज्ञानांतच एकप्रकारें सुख असतें. ज्ञानानें

दुःखनिवारण न होतां त्या दुःखाची अपरिहार्यता तेवढी पटते. पण मग भौतिक-शास्त्रांच्या शोधांचा आणि ज्ञानाचा उपयोग काय? एकदां सृष्टीचें माहीत नसलेले गुणधर्म कळले म्हणजे सृष्टिचक्र कळून चुकल्यासारखें होईल. मग अंतरिक्षांतील गोलांचे जसे तेच तेच पालट पुनःपुनः होत असतात आणि या पृथ्वीवरही उन्हाळा, पावसाळा, हिंवाळा, आणि पुन्हा फिरून उन्हाळा, पावसाळ, हिंवाळा येत असतो त्याप्रमाणें मानवव्यवहाराचेंही होणार असें या भौतिकवादाचें पर्यवसान होतें. दगड हा मढ्यासारखा जड आहेच, पण जिवंत माणूसही जड सृष्टिधर्मापुढें हतबल ठरला असला तर तो जिवंत असून मढ्यासारखा ठरणार होता. हा भौतिकवाद उर्फ जडवाद जिवंत माणसालाच जड करीत होता. माणसाला होणारीं दुःखें भौतिक कारणांनीं होतात. पण भौतिक सृष्टीचे गुणधर्म जर निश्चित असले तर त्यांनीं मर्यादित असे मानवी व्यवहारही निश्चित असणार, आणि म्हणून सुखदुःखाचें चक्रही उन्हाळा–पावसाळा–हिंवाळा याप्रमाणें मर्यादित असणार हें स्पष्ट होतें. सारांश ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांची व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारलेली 'नैसर्गिक' समाजरचना ही मानवी दुःख आहे हें अपरिहार्य आहे असें सांगत होती, तर फ्रेंच भौतिक-वाद्यांचा संदेश सृष्टीचे सर्व गुणधर्म निश्चित असल्यामुळें तज्जन्य सुखदुःखें व मानवव्यवहार ओतीव चित्राप्रमाणें एकसाची व चक्राकारपणें फिरून पुनः पुनः त्याचप्रमाणें चालणारे आहेत असें सांगत होता. मानवदुःख नाहींसें करण्यासाठीं माणसाभोवतालचें हें जग कसें पालटावें याची तीव्र जिज्ञासा मार्क्सच्या मनांत जागृत झाली असून तिचें समाधान इंग्लंड व फ्रान्स या देशांतील जडवादी विचारवंतांच्या संदेशानें मार्क्सला झालें नाहीं.

वरील दोनही विचारसरणीनुसार माणसाच्या कर्तृत्वास जो हा घट्ट खोडा बसत होता तो जर्मन भाववादी तत्त्वज्ञ हेगेल याच्या विचारसरणीमुळेंही सुटत नव्हता.

## हेगेलचा भाववाद

हेगेल हा भौतिकवादी नसून भाववादी होता. जड सृष्टि हाच जगाचा आधार असून धान्यांत जशी कीड पडते तसेंच माणसासुद्धां सर्व जीव ऊर्फ किडे या सृष्टींत उत्पन्न झाले आणि तेही जडधर्मांनींच नियंत्रित आहेत हें वर सांगितलेल्या

फ्रेंच जडवादाचें मुख्य सूत्र होतें. म्हणूनच त्यास भौतिकवाद अथवा जडवाद म्हणण्यांत येई. हेगेलला हें मत अमान्य होतें. जडापासून जीवाची असणारी भिन्नता त्याच्या मनावर इतकी खोल ठसली होती, दगडाचें अनंत कालपर्यंत निश्चेष्ट पडून राहणें आणि जड माणसाचें सृष्टीशीं हेतुपूर्वक अहर्निश झगडणें या दोन घटनांतील फरक त्याला इतका मूलग्राही वाटत होता, स्वतःच्या कल्पनाशक्तीच्या स्वतंत्र व सामर्थ्यशालि अस्तित्वाची त्यास एवढी तीव्र जाणीव होत होती, मनुष्येतर सृष्टींतही कोळी, किडे, मुंग्या, पक्षी, जनावरें वगैरे जीवांचें हेतुपूर्वक कर्तृत्व त्यास इतकें सत्यपूर्ण वाटत होतें कीं जडाच्या ठिकाणीं ही स्वतंत्र कल्पनाशक्ति मुळचीं असणेंच अशक्य आहे असें हेगेलला वाटलें; आणि म्हणून जडापासून जीव झालेला नसून स्वयंभू अशी जी कल्पनाशक्ति ( आयडिआ=भाव ) प्रत्येक प्राणिमात्राच्या अंतःकरणांत प्रतीत होत असते व त्यास कार्यप्रवृत्त करते तीच कल्पनाशक्ति म्हणजे भाव जगाचा आधार आहे असें मत हेगेलनें पुरस्कारिलें. या हेगेलच्या मतासच भाववाद अथवा आयडिॲलिझम् असें नांव मिळालें आहे. हेगेलचा हा ' भाव ' ( आयडिआ ) स्वयंविकासी आहे असें तो सांगतो. सृष्टीच्या आरंभीं ( अथवा अनारंभीं ) हा भाव नुसता अमूर्तपणें सर्व विश्व व्यापून अस्तित्वांत होता. पुढें कोळ्याच्या शरीरांतून धागा निघतो त्याप्रमाणें या ' भावां ' तून व्यक्त व अव्यक्त सृष्टि उदय पावली. ती फ्रेंच भौतिकवाद्यांच्या मताप्रमाणें पुनः पुनः त्याच क्रिया चक्रक्रमानें करणारी नसून बीजापासून अंकुर, अंकुराचें झाड, झाडास फुलें त्याला पुढें फळ या क्रमानें एकसारखी विकासी आहे असें हेगेलला वाटलें. प्राचीन काळीं माणूस रानटी होता, तो पुढें कृत्रिम उपायांनीं धनोत्पादन करूं लागला. गुलामगिरी, राज्य वगैरे समाजसंस्था त्यानें निर्माण केल्या, वाढविल्या, बुडविल्या, सरंजामशाही राज्यें व अनेक समाजप्रकार निर्माण केले, हे सर्व प्रकार हेगेलच्या मतानें पुनः पुनः तसेच्या तसेच चक्राकार गतींतून निर्माण झालेले नसून त्यांत सतत विकास आहे व तो भावजन्य आहे.

## विरोधविकास पद्धति

हा विकासही एका विशिष्ट प्रकारच्या विरोधपद्धतीनें होतो असें हेगेलचें मत आहे. बीजाच्या पोटांत असणारा अंकुर बीजावरील कठीण कवचीमुळें

जिवंत राहतो. पण आंतल्याआंत त्या अंकुराची वाढ होत राहण्यास हेंच कठीण कवच पुढें विरोध करूं लागतें. जमिनींत बीज पेरलें कीं तेथल्या उबदार ओला-व्यानें अंकुराला विरोध करणारें बीजाचें कवच फुटतें व अंकुर वाढीस लागून जमीनीबाहेर येतो. कोंबडीच्या अंड्यांतील जीवाच्या पोषणास व वाढीस अंड्या-वरील कवचाच्या रक्षणाची अतिशय गरज असते. पण जीवाची वाढ कांहीं एका मर्यादेपर्यंत झाली म्हणजे हेंच कवच त्या जीवाच्या विकासास अडथळा करूं लागतें. मग तो जीव त्याच कवचांत अधिक काळ राहिला तर मरून जातो. त्याला जगविण्यासाठीं व त्याचा विकास करण्यासाठीं कवचाचा विरोध काढून म्हणजे कवच फोडून त्या जीवास वाट द्यावी लागते.

## भाववादांतील क्रांतिवाद

हेगेलच्या या एकंदर विचारसरणीस 'विरोध विकासात्मक भाववाद' ( डायलेक्टिकल आयडिआलिझम् ) असें नांव आहे. यांतील विरोधविकासाचें तत्त्व मार्क्सला पटलें होतें. व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारलेली समाजरचना हीच खरी नैसर्गिक असून खासगी मालकीचें तत्त्व हें त्रिकालाबाधित व एकस्वरूपी तत्त्व होय, असें ब्रिटिश क्लासिकल अर्थशास्त्रज्ञ म्हणत, यामुळें बहुसंख्य समाजास होणारीं दुःखें हींही नैसर्गिक व चिरंजीव म्हणून निमूटपणें सोसावीं लागणार होतीं. फ्रेंच वास्तववाद्यांच्या भौतिक नियतिवादानें त्याच त्याच सुखदुःखात्मक घटनेंत माणसांना चक्रा घालाव्या लागणार होत्या. हेगेलचा भाववाद असा खुरटलेला व घाण्याच्या बैलाप्रमाणें आंधळेपणानें फिरणारा नसून मानवजातीचा व अखिल विश्वाचा विकास होत आला आहे असें मानणारा होता. त्यामुळें मानव-जातीचीं दुःखें नाहींशीं होण्याचा संभव आहे असा बळकट आशावाद त्यांत होता. तसेंच आज जी परिस्थिति सुखप्रद वाटतें तीच उद्यां दुःखप्रद वाटते ही परिस्थिति धीर खचविणारी असली तरी हाच इतिहासाचा क्रम असून ही दुःख-दायी परिस्थिति नष्ट होण्याच्या पोटींच पुढील प्रगति व सुख आहे असें आश्वासन या भाववादांत होतें. झगडा, क्रांति आणि प्रगति असें या भाववादाचें स्वरूप होतें. समाजरचना बदलत जातें, दुःखपरिहार होऊं शकतो असें हें तत्त्वज्ञान सांगत होतें म्हणून हें तत्वज्ञान मार्क्सला फार आवडलें आणि इतिहासाच्या वाचनानें हेगेलला दिसलेली विरोधविकासात्मक प्रगति अथवा क्रांति खरी आहे अशी मार्क्सची खात्री झाली.

## भाववादांतील अपुरेपणा

पण हेगेलच्या या भाववादांतही मानवी जीवनाची पराधीनता सुटत नाहीं. ब्रिटिश व फ्रेंच तत्त्वज्ञांनीं मानवी जीवनांत दुःख असलें तर तें अपरिहार्य आहे असें सांगितलें, उलट हेगेलनें मानवी जीवनाचा व अखिल विश्वाचा इतिहास-कालांत विकास होत आला असून दुःखनाशाचें व प्रगतीचें आश्वासन दिलें. पण ही प्रगति माणसानें कशी घ्यावी याचा कांहींच मार्ग हेगेल सांगत नव्हता. हें सर्व 'आयडिआ'चें म्हणजे 'भाव'चें कर्तृत्व आहे असें म्हणणें म्हणजे शेतकऱ्यानें पावसासाठीं आभाळाकडे डोळे लावून स्वस्थ बसण्यासारखेंच होतें. अखेर हेगेलनें तरी जग आहे कसें एवढेंच सांगितलें, तें बदलावें कसें हें सांगितलें नाहीं ही मार्क्सची तक्रार शिल्लक राहिलीच. शिवाय सर्व गोचर भवितव्य स्वतः अव्यक्त अशी ही 'आयडिआ' घडवून आणतें आणि भौतिक सृष्टीचे दृढ गुणधर्म उपेक्षणीय आहेत हें भाववादाचें तात्पर्य मार्क्सला पटणें शक्य नव्हतें. आधिभौतिक शास्त्रांचा मानवी प्रगतीस होत असणारा उपयोग त्यास पूर्णपणें पटला असून धर्मश्रद्धा नष्ट होऊन त्या जागीं हेगेलची ही भावश्रद्धा आली तरी माणसाची मूढता त्यानें कमी होणार नाहीं हें त्यास दिसत होतें. अर्थात् ज्यांत ( १ ) माणसाच्या धनोत्पादनसामर्थ्याची म्हणजे कर्तृत्वाची वाढ करण्याचें ब्रिटिश तत्त्वज्ञांचें ध्येय, ( २ ) फ्रेंचांचा बुद्धिनिष्ठ वास्तववाद आणि ( ३ ) हेगेलचा ऐतिहासिक क्रांतिवाद या तिहींचा समवाय होवून त्यांत मनुष्यकर्तृत्वास वाव मिळेल असें समाजविकासाचें कांहीं मर्म आहे कीं काय याचा मार्क्सनें विचार केला. असा विचार करतांना त्याला मानवी व्यवहाराचें व इतिहासाचें स्वरूप पुढील प्रकारचें आहे असें दिसून आलें.

## इतिहासाचें स्वरूप

'राज्यसंस्थेचे अनेक प्रकार' आणि मालकी हक्काचे वगैरे 'कायदेशीर संबंध' हे माणसाच्या जीवनाला अवश्य अशी जी भौतिक परिस्थिति तींतून जन्मलेले असतात; माणसाचें अंतिम ध्येय खाणें, पिणें आणि पुष्ट होणें एवढेंच नाहीं हें खरें; आध्यात्मिक, सांस्कृतिक वगैरे अनेक ध्येयें माणसाच्या दृक्क्षेत्रांत येतात. तरी पण अन्न, वस्त्र, आश्रय, आरोग्य या गोष्टी आभाळांतून तयार होऊन पडत नाहींत, त्यासाठीं माणसास कष्ट करावे लागतात; हे कष्ट

ज्या शरीरांनीं करावयाचे त्याच शरीरांत आत्मा, मन, बुद्धि, अहंकार वगैरे सर्व आध्यात्मिक जिनसा साठविलेल्या असून शरीरांनीं होणाऱ्या हालचालींचे व अनुभवांचे संस्कारच या आध्यात्मिक दौलतीवर होतात, उलट या आध्यामिक प्रेरणांच्या प्रतिक्रिया चरितार्थसंपादनाच्या मानवी व्यवहारावरही होत असतात. जगाच्या आरंभापासून आज तागायत चरितार्थसंपादनाचें कार्य अल्पायासानें, हौसेनें, प्रेमानें कसें करावयाचें आणि सुखी जीवनास कमींत कमी अवश्य इतकें धन सहज लीलेनें कसें मिळवावयाचें याचा उपाय माणसास सापडलेला नाहीं. बुद्धि हें मानवी जीवाचें जें विशेष इंद्रिय त्यायोगें त्यानें धनोत्पादनाचीं साधनें एकसारखीं वाढविलीं आहेत. फिरून फिरून उन्हाळा, पावसाळा, हिवाळा असा चक्रक्रम जड सृष्टींत असेल. पण सृष्टींत माणसानें धनोत्पादनसाधनें सुधारून आपलें धनोत्पादनसामर्थ्य उत्तरोत्तर वाढविलें आहे. एकदां गेलेली अवस्था तशीच्या तशी प्राप्त न होता त्यापेक्षां अधिक उन्नत अवस्था माणसास प्राप्त झाली आहे. ही धनोत्पादनसाधनें वापरण्यासाठीं माणसास आपल्या समाजाची विशिष्ट रचना करावी लागली, आणि धनोत्पादनसाधनें बदललीं तसतशी ही रचनाही बदलावी लागली आहे. शस्त्रास्त्रांचा प्रकार बदलला, उदाहरणार्थ तरवारी व भाले जाऊन बंदुका आल्या, आणि साध्या बंदुका मागें पडून यांत्रिक बंदुका व तोफा आल्या कीं सैन्यरचना बदलावी लागते त्याप्रमाणें धनोत्पादनसाधनें बदललीं कीं समाजरचनाही बदलावी लागते असें मार्क्सचें मत आहे.

## भांडवलशाही समाजक्रांति

एन्जलस लिहितो, "मध्ययुगांतील सरंजामशाही समाजरचनेचा आधार आर्थिक दृष्टया स्वयंपूर्ण अशा लहान शेतकऱ्यांच्या वसाहती हा होय. त्यांना जरूर लागेल ते सर्व धनप्रकार त्यांचे तेच निर्माण करीत असत. सरदारवर्ग हे लढाऊ जातीचे असून शेतकऱ्यांचें परचक्रापासून रक्षण करीत, आणि शेतकऱ्यांना राष्ट्रीय-निदान कसली तरी राजकीय संघटना निर्माण करून देत; पण व्यापारी शहरें वाढलीं त्याबरोबरच शहरांत हस्तव्यवसायिकांचाही एक वर्ग उत्पन्न झाला. व्यापार प्रथम राष्ट्रीय झाला व पुढें वाढतां वाढतां आंतरराष्ट्रीय झाला. आणि या व्यापारांतूनच शहरी भांडवलदारवर्ग जन्मास आला. मध्य-

युगाच्या अंतापूर्वीच सरंजामदाराशीं झगडून या भांडवलदारवर्गानें सरंजामी समाजव्यवस्थेंत आपणास मानाचें स्थान मिळविलें. नंतर पंधराव्या शतकाच्या मध्यापासून, व विशेषतः युरोपबाहेर नवीन प्रदेश सापडल्यानंतर, भांडवलदारवर्गाला व्यापारव्यवहाराला नवें क्षेत्र मिळालें आणि त्यामुळें उद्योगधंद्याला नवी प्रेरणा मिळाली. उत्पादनाच्या अनेक क्षेत्रांतून वैयक्तिक हस्तव्यवसाय नष्ट होऊन तेथें श्रमविभागात्मक हस्तव्यवसायास स्थान मिळालें. पुढें अठराव्या शतकांतल्या भौतिक शोधांनीं (विशेषतः वाफेच्या एंजिनानें) प्रचंड यांत्रिक उद्योगधंद्यांची वाढ शक्य झाली. याचा उलट व्यापारावरही परिणाम झाला. कारण मागसलेल्या राष्ट्रांत हा उद्योगधंद्यांचा माल जाऊन त्यानें तेथले जुने हस्तव्यवसाय उखडून टाकले, अधिक सुधारलेल्या देशांत रेल्वे, तारायंत्र वगैरे दळणवळणाचीं व वाहतुकीचीं साधनें याच धंद्यांनीं निर्माण केलीं. यामुळें सामाजिक संपत्ति व सामाजिक सत्ता भांडवलदारवर्गाच्या हातीं वाढत्या प्रमाणांत येवूं लागली. राजकीय सत्ता राजे व सरदार यांच्याच हातीं अजून एकवटलेली होती. पण भांडवलदारांच्या प्रगतीच्या पुढील अवस्थेंत भांडवलदारांनीं राज्यसत्ता जिंकून घेतली. तेव्हांपासून ते राज्यकर्ते वर्ग झाले व त्यांनीं मजूर आणि शेतकरी यांवर आपलें वर्चस्व स्थापलें."

## कामगारवर्गाचें ऐतिहासिक कार्य

सरंजामदार व भांडवलदार यांच्या लढ्याचा जो वर उल्लेख केला तसा वर्गलढा इतिहासांत फार प्राचीन काळापासून चालत आला आहे असें मार्क्स सांगतो. पिळणारे आणि पिळणुकीस बळी पडणारे अनेक वर्ग प्राचीन काळापासून होते. पण भांडवलशाही समाजांत मात्र उत्तरोत्तर अनेक वर्ग नाहींसे होऊन पिळणारे भांडवलदार व पिळले जाणारे मजूर अशा दोनच वर्गांत समाजाची विभागणी झाली आहे. आणि ही भांडवलशाही पिळणूक बंद पाडण्यासाठीं भांडवलशाही समाजरचना मोडून समाजवादी समाजरचना स्थापली पाहिजे असें मार्क्सचें मत आहे. मार्क्सच्या मतें ही भांडवलशाही उलथून पाडण्याचें मुख्य कार्य मजूरवर्गाकडूनच व्हावयाचें आहे. कारण या भांडवलदार वर्गाकडून होणाऱ्या पिळणुकीचा खरा भार मजूर वर्गावरच पडत असून मजूरवर्गाची संघटना ही वर्गजागृति, युद्धसामर्थ्य वगैरे दृष्टीनें परिणामकारक अशी होत असल्यानें हा मजूरवर्गच भांडवलशाही समाजरचना उलथून पाडावयास समर्थ आहे.

एकंदरीनें माणूस हा नुसता प्रेक्षक अथवा कैदी नसून इतिहासक्रमास आपल्या कर्तृत्वानें कलाटणी देणारा प्राणी आहे असें मार्क्सनें दाखविलें आहे. ही कलाटणी देतांना इतिहासाचा कल मूळचा कसा आहे आणि माणसाच्या भौतिक जीवनाच्या गरजा भागविण्याच्या क्रियेनें व परिस्थितीनें मानवी जीवनाला विशिष्ट आकार आला असून याच क्रमानें भांडवलदारसमाज कसा उलथून पाडावा हें एंजिनियरिंगचें शास्त्र मार्क्सनें मांडलें आहे.

## भांडवलशाही शाश्वत नव्हे

सगळ्या प्राचीन इतिहासांत वर्गलढा व उत्पादनसाधनानुसार समाजघटनेचा बदल या गोष्टी कशा घडून आल्या हें मार्क्स-एन्जल्स यांनीं कम्युनिस्ट मॅनिफेस्टोंत अतिसंक्षिप्त रूपांत दिलें आहे. खुद्द भांडवलशाही समाजाचा विकास, त्यांतील वर्गलढा, भांडवलशाही समाजाच्या विकासाचीं आणि त्यांतील लढयाचीं वरचेवर बदलणारीं स्वरूपें आणि इतिहासक्रमांत भांडवलशाही समाज जसा एकदां उत्पन्न झाला तसाच तो नाश पावणेंही कसें अपरिहार्य आहे याचें तर्कशुद्ध विवेचन ' कॅपिट्ल ' ग्रंथांत आलें आहे. भांडवलशाही समाजरचना हीच काय ती निसर्गसिद्ध असून यापुढें चिरंजीव होण्यास लायक अशी समाजरचना आहे असें जें ब्रिटिश क्लासिकल तत्त्वज्ञांचें म्हणणें होतें तें खोटें असून भांडवलशाही ही इतिहासक्रमांत निर्माण झालेली एक अवस्था आहे. मानवजातीच्या प्रगतीला तिनें एकदां मदत केली असली तरी आतां त्या प्रगतीस तीच अडथळाही करूं लागली असून भांडवलशाहीची वाढही लवकरच खुंटूं लागेल. भांडवलशाहीचा पाडाव केल्यानेंच मानवी प्रगति होणार असून कामगारवर्ग या भांडवलशाहीचा पाडाव केल्यावांचून राहाणार नाहीं हें सांगणें हाच ' कॅपिट्ल ' ग्रंथाचा इत्यर्थ आहे.

---

# कॅपिटल सारग्रंथाचें संक्षिप्त विवरण : : : २

## अर्थशास्त्राचें कार्यक्षेत्र

कॅपिटल-सारग्रंथांत आलेल्या विषयांचें संक्षिप्त पण संगतवार विवरण या प्रकरणांत करूं. ( पुढील मजकुरांतले प्रकरणांक सारग्रंथ संहितेचे प्रकरणांक आहेत. )

( प्रकरण १ लें ) माणसाला जीवनासाठीं जो विक्रीमाल ( कमॉडिटी ) लागतो तो त्याला मिळण्याच्या ज्या आर्थिकपद्धति व तरतुदी असतील त्यांचा विचार करणें हें अर्थशास्त्राचें कार्यक्षेत्र आहे असें मार्क्स म्हणतो. यांत दोनतीन महत्त्वाचे मुद्दे ध्यानांत ठेवले पाहिजेत. माणसाला लागणाऱ्या पण मोफत मिळणाऱ्या हवा पाणी, बायकोचें, आईबापांचें प्रेम यांसारख्या ज्या अनेक 'वस्तु' आहेत त्यांच्या पुरवठ्याचा प्रश्न अर्थशास्त्रांत् येत नाहीं; फक्त 'विक्रीमाला'च्या पुरवठ्याचा प्रश्न तेवढा येतो. अर्थात् मोठमोठ्या शहरीं हवा व पाणी या वस्तुही विक्रीमाल झाल्या असून त्यामुळें त्यांचा समावेश अर्थशास्त्रीय चौकशींत होवूं शकेल. तसेंच विक्रीमालाच्या पुरवठ्याच्या ज्या आर्थिकपद्धति अथवा तरतुदी असतील त्यांचाच विचार अर्थशास्त्रांत येईल. उदाहरणार्थ धर्मादाय, देणगी, चोरी वगैरे प्रकारांनीं होणाऱ्या धनाच्या पुरवठ्याचा प्रश्न अर्थशास्त्रांत येणार नाहीं. पण खरेदीविक्री, नोकरी वगैरे प्रकारांनीं होणारा विक्रीमालाचा पुरवठा हा अर्थशास्त्राचा विषय होवूं शकेल. धनावरचा मालकी हक्क हा धनोत्पादनपरिश्रमास फार मोठी प्रेरणा देणारा असल्यानें त्याचीही

चर्चा अर्थशास्त्रांत येईलच. धर्मादाय, देणगी, मोफत मिळणाऱ्या वस्तु वगैरे-संबंधींचा विचार आर्थिक कक्षेबाहेर असला तरी आर्थिक व्यवहाराला त्यामुळें अपाय होईल तर त्या प्रमाणांत त्यांचाही विचार करावा लागतो.

## उत्पादन व व्यय

धनाचें उत्पादन, उपभोग [ व व्यय ] वाटणी व विनिमय ही आर्थिक व्यवहाराची चार खातीं आहेत. भिकाऱ्याला आणि राजाला भोग्य धन मोफत म्हणजे अनायासें मिळत असेल. पण असे फुकटखाऊ वगळले तर सर्वसामान्य लोकांना धन हे श्रम केल्यावांचून उपलब्ध होत नाहीं. म्हणून धनोत्पादन हें आर्थिक व्यवहाराचें पहिलें खातें होय. ज्यांनीं धनोत्पादनाचे श्रम करायचे त्यांनीं प्रथम धनाचा उपभोग घेऊन श्रमाचें सामर्थ्य अंगीं आणावें लागतें. तसेंच धन उत्पन्न करण्यासाठीं कच्चा माल व इतर साहाय्यक साहित्य यांचा व्यय करावा लागतो. म्हणून उपभोग—व्यय [ कंझम्शन ] हें आर्थिक व्यवहाराचें दुसरें महत्त्वाचें खातें होय.

## वाटणी व विनिमय

या दोन खात्यांचें दरम्यान वाटणी व विनिमय हीं दोन खातीं येतात. वाटणी ( डिस्ट्रिब्यूशन ) व विनिमय ( एक्स्चेंज ) या दोन शब्दांच्या अर्थांतला फरकही ध्यानांत ठेवला पाहिजे. नोकरीबद्दल मिळणारा पगार अथवा मजूरी, जमीनमालकीबद्दल मिळणारा खण्ड अथवा घरभाडें, कारखानदारीचा नफा, भांडवलावरचें व्याज हे सर्व धनाच्या वाटणीचे प्रकार होत. धन उत्पन्न झाल्या-नंतर वरीलपैकीं कोणत्याना कोणत्या स्वरूपांत तें व्यक्तीच्या अथवा समुदायाच्या मालकींत जात असतें, म्हणजेच त्याची वाटणी होते. या वाटणीस मुख्यतः कायदा, रूढि अथवा करार यांचा आधार असतो. विनिमय म्हणजे देवघेव; एक वस्तु देऊन त्याबद्दल तितक्याच मूल्याची दुसरी वस्तु घेणें. सर्व रोखीचे अथवा उधारीचे खरेदीविक्री व्यवहार या सदरांत येतात. वाटणी व विनिमय या दोहोंत वाटणी हें खातें विशेष महत्त्वाचें आहे. किंबहुना आर्थिक उत्पाद-नाच्या परिश्रमाला खरें उत्तेजन या वाटणीनेंच मिळत असल्यानें रिकार्डोनें उत्पादनापेक्षांही वाटणीच्या पद्धतीस अधिक महत्त्व दिलें आहे. पण, रिकार्डोची मोठी चूक झाली ती ही कीं, वाटणीच्या पद्धति नैसर्गिक व त्रिकालाबाधित

आहेत असें तो मानीत होता. तें खरें नसून वाटणीच्या पद्धति या ऐतिहासिक क्रमानें पालटत आल्या आहेत ही गोष्ट मार्क्सनें 'क्रिटिक ऑफ् पोलिटिकल इकॉनमी' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत स्पष्ट केली आहे.

## वाटणीचे प्रकार

सरंजामशाही समाजरचनेपूर्वीं गुलामगिरी होती. त्यावेळीं गुलाम हे मालकाचे शरीरानें ताबेदार असत. त्यांना धनोत्पादनाचे सारे कष्ट करावे लागत. पण धनाचा वाटा हक्कानें असा त्यांना कोणताच मिळत नसून त्यांच्या पोषणाची सर्व जबाबदारी मालकांवर असे. मालक हे सर्व उत्पन्न होणाऱ्या धनाचे धनी असत. पुढें सरंजामशाही समाजरचना अमलांत आली त्यावेळीं भूदास-शेतकऱ्यांना सरंजामदारांच्या जमिनीवर खपून मिळालेलें उत्पन्न ते सरंजामदारांस देऊन टाकीत. त्यामोबदला त्यांना सरंजामदारांकडून वेगळी जमीन मिळे. या जमिनींत खपून मिळालेलें उत्पन्न तेवढें ते स्वतःसाठीं घेऊं शकत असत. आज भांडवल-शाही समाजांत धनाच्या वाटणीचा हा प्रकार आणखी बदलला आहे. हल्लीं जमिनमालकाला मालकीहक्काबद्दल जमिनीवरचा खंड शेतकऱ्यांकडून मिळतो. शेती, कारखाने वगैरेंत भांडवल घालून धंदा करणारांना भांडवलावर नफा व व्याज मिळतें आणि शेती, कारखाने, कचेऱ्या वगैरेंत शारीरिक व मानसिक श्रम करणाऱ्यांना मजूरी, पगार वगैरे मिळतो.

## वाटणीवर विनिमय अवलंबून

धनाच्या वाटणीचा प्रकार कसा असेल त्यावर धनाच्या विनिमयाची पद्धति अवलंबून असते. लहान शेती व लहान हस्तव्यवसाय रूढ असतील तेथें त्या काळीं शेतकरी व हस्तव्यवसायी कारागीर आपला माल आपणच बाजारांत विक्रीस आणतो. उलट प्रचंड भांडवलशाहीच्या काळांत कष्ट करणारे शेतीमजूर व कारखानी-मजूर आपण उत्पन्न केलेलें धन भांडवलदारांच्या हवालीं करून नक्त मजूरी घेतात व घरीं जातात. मग मजूराकरवीं उत्पन्न झालेलें धन भांड-वलदार बाजारांत विक्रीस आणतात. उद्यां जमिनी, कारखाने वगैरे धनोत्पादन-साधनें सार्वजनिक मालकीचीं झाल्यास म्हणजे समाजवादी समाजघटना झाल्यास सगळींच माणसें पगारी मजूर होतील व मालविक्रीचा व्यवहार सार्वजनिक सरकारलाच करावा लागेल. त्याच्याहीपुढें कदाचित् पगार, मजूरी वगैरे प्रकार

अजीबात बंद होऊन ज्याला जेवढं सामर्थ्य असेल तेवढें धनोत्पादनकार्य त्यानें करावें आणि ज्याला जेवढी व जशी गरज असेल तसा धनाचा वाटा त्याला मिळावा असें ठरून वाटणी व विनिमय यांतील फरक अजीबात नाहींसा होईल.

सध्यां भांडवलशाही समाजव्यवस्थेंत खंड, नफा व मजूरी या तीनपैकीं कोणत्याना कोणत्या स्वरूपांत धनाचा वाटा व्यक्तिमात्रास मिळत असतो. हा वाटा पैशाच्या अथवा मालाच्या स्वरूपांत मिळाल्यावर त्याला बाजारांत आणून विनिमयाच्या म्हणजे खरेदीविक्रीच्याद्वारां ज्याला त्याला स्वतःला उपभोग्य असें असलेलें धन मिळवावें लागतें. यामुळें भोग्य धनाचा पुरवठा व्यक्तिमात्रास होण्याचे कामीं बाजारभावास म्हणजे मालांच्या किंमतीस सहजच फार महत्त्व येतें. बाजारभाव अथवा किंमत ठरते कशी हा प्रश्न अर्थशास्त्रांत फार महत्त्वाचा मानला जातो. म्हणून किमतीच्या प्रश्नाची चर्चा मूळ 'कॅपिट्ल' ग्रंथाच्या तिसऱ्या खंडांत असली तरी ज्यूलिअन बूर्खार्ड्ट् यानें आपल्या 'संक्षिप्त कॅपिट्ल' ('पीपल्स मार्क्स') मध्यें ही किंमतींची चर्चा पहिल्या प्रकरणांतच घेतली असून कॅपिट्ल सारग्रंथाच्या संहितेंतहि ती पहिल्या प्रकरणांत दाखल करण्यांत आली आहे.

## मजूरी कशी ठरते

मालाच्या किंमती कशा ठरतात ? माल उत्पन्न करण्यास लागणारा खर्च व त्यावर थोडाफार नफा आकारून तेवढ्या किंमतीस भांडवलदार माल विकतो. म्हणजे उत्पादनखर्च व नफा हे दोन किंमतीचे घटक होत. पण हे तरी प्रत्येकीं कसे ठरतात ? उत्पादनखर्चाचे पुनः तीन घटक असतात. (१) भांडवलदाराला जमिनमालकाचा खंड भरावा लागतो. (२) कच्चा माल, हत्यारें वगैरे उत्पादन-साहित्य खरेदी करावें लागतें आणि (३) मजूरी द्यावी लागते. या तीन प्रकारांचें स्वरूप कसें आहे ? प्रथम मजूरीचा दर कसा ठरतो तें पाहूं. कारण उत्पादनखर्चांत मजूरीचा खर्च हा फार मोठा खर्च असतो. भांडवलदाराला मजूरांची गरज असते. भांडवलदाराजवळ भांडवल जितकें जास्त तितक्या प्रमाणांत पुष्कळ मजूर तो नेमीत असतो. भांडवल कोणत्या स्वरूपांत असतें ? पैशाच्या स्वरूपांत असतें असें समजा. अर्थात् मजूरांना पैशाच्या स्वरूपांत मजूरी मिळेल. पण मजूर कांहीं पैसा चावून खावूं शकत नाहींत. त्यापासून ते विक्रीमाल खरेदी करतात. मजूरीचा दर भांडवल व मजूर यांमधील घासा-

घाशीनें ठरत असतो. भांडवल जास्त असलें व त्याला गरज असेल त्या मानानें मजूर कमी असले तर मजूरीचा दर वर जातो. उलट भांडवलाच्या गरजेच्या मानानें मजूर जास्त असले तर मजूरीचा दर खालीं येतो. पैशाच्या स्वरूपांत असलेलें भांडवल खरोखर किती आहे हें त्या भांडवलानें बाजारांत माल किती खरेदी केला जातो त्यावरून ठरतें. म्हणजे भांडवलाचें परिमाण बाजार-किंमतीवरून ठरतें व त्यावरून मजूरीचा दर ठरतो; पण आपण मूळ बाजारकिंमत कशावरून ठरते याचें संशोधन करीत आहो. मालाची बाजारकिंमत ही मालाचा उत्पादनखर्च व त्यावरील नफा यांच्या बेरजेइतकी असते. पण उत्पादन-खर्चांत मजूरीचा दर हा बाजारकिंमतीवरून ठरतो असें आपण आतांच पाहिलें. म्हणजे बाजारकिंमत मजूरीच्या दरावरून ठरते आणि मजूरीचा दर बाजार-किंमतीवरून ठरतो, अशी दुष्ट चक्रापत्ति येथें उत्पन्न होत आहे.

## नफा कोठून येतो

( प्रकरण २ रे ) बरें, नफा कोठून येत असावा? भांडवलदार उत्पादन-खर्चावर जी कांहीं तरी अधिक किंमत आकारतो तो नफा असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण थोडा खोल विचार केल्यास हें उत्तर चुकीचें आहे असे कळून येतें. समाजांत जो जो माणूस एकदां विक्रेता असतो तो तो पुन्हां गिऱ्हाईक होतोच. कोणी माल विकत असेल. कोणी सेवा विकीत असेल. पोस्टमास्तर हा डाळ तांदुळाचें गिऱ्हाईक असतो तर स्वतः नोकरीवर असतां पोस्टमास्तर जे श्रम करतो त्या श्रमाचा तो विक्रेताच असतो. प्रत्येक विक्रेता आपल्या मालावर (अथवा सेवेवर) ( समजा ) ५ टक्के नफा घेऊं लागला तर विक्रेता या नात्यानें त्याला तो गम-वावा लागेल. म्हणजे नफा म्हणून कडोस्रीस लावण्यासाठीं कोणाजवळच कांहीं राहूं शकणार नाहीं. म्हणून नफा कोठून येतो हें कोडें शिल्लकच राहतें आणि 'उत्पादन-खर्च अधिक नफा बरोबर किंमत' या समीकरणावरून किंमत कशी ठरते याचा कांहींच बोध होत नाहीं.

मालाचा पुरवठा मागणीपेक्षां कमी असला म्हणजे किंमती उतरतात व पुरवठा मागणीपेक्षां कमी असला म्हणजे किंमती वाढतात हेंही खरें आहे. पण मागणी व पुरवठा समसमान असलीं तर माल कांहीं फुकट मिळत नाहीं. त्याला किंमत द्यावी लागतेच. ही या चढउताराच्या मध्यबिंदूवर असलेली जी किंमत ती मूल्य होय. म्हणून किंमती कशा ठरतात, या प्रश्नाचा विचार मागणी-पुरवठ्या-

नुसार किंमतीचे होणारे जे चढउतार ते थोडा वेळ लक्षांत न घेतां करावयाचा झाल्यास तसा विचार करणें हें विनिमयमूल्य कसें ठरतें या प्रश्नाचा विचार करण्यासारखेंच आहे. तोच विचार पुढें केला आहे.

## विक्रीमाल

( प्रकरण ३ ) सारग्रंथाचें प्रकरण ३ हें मूळ 'कॅपिटल'चें पहिल्या खंडाचें पहिलें प्रकरण आहे. भौतिक सृष्टीचें स्वरूप समजून घेण्यासाठीं पदार्थविज्ञान-शास्त्रांत ज्याप्रमाणें प्रथम एकादें मातीचें ढेकुळ अभ्यासाला घेतात, शरीरविज्ञान-शास्त्रांत शरीररचना समजून घेण्यासाठीं म्हणजे शरीरांतील एकादा अवयव अथवा पेशी अभ्यासासाठीं घेत असतील, त्याप्रमाणें भांडवलशाही समाजाच्या अभ्यासा-साठीं विक्रीमालाचें मूल्य कसे ठरतें या प्रश्नाचें उत्तर संशोधण्यासाठीं विक्रीमालाचें स्वरूप पृथक्करणपूर्वक समजून घेण्यापासून मार्क्सनें कॅपिटल ग्रंथाची सुरवात केली आहे. कारण धनोत्पादन आणि धनाची वाटणी झाली तरी भोग्यवस्तु व्यक्तिमात्रास उपलब्ध होण्यापूर्वी समाजांत होणारा विनिमयव्यवहार भांडवल-शाही समाजांत मुख्यतः खरेदीविक्रीनेंच होतो. अर्थात् मालाच्या किंमती कशा ठरतात हें पाहणें, भोग्यधनाचा पुरवठा समाजास कसा होतो हें समजून घेण्या-साठीं, पूर्वावश्य आहे.

## विचारपद्धति

विक्रीमालाचें हें स्वरूप समजून घेतांना मार्क्सनें भौतिक शास्त्रांच्या प्रयोगशाळेंतील पद्धति अवलंबिली आहे. किती उष्णतेवर पाण्याची वाफ होतें हें पाहण्यासाठीं आपण साध्या स्टोव्हवर सैंपाकघरांत पाणी उकळून पाहिलें तर अचूक उत्तर मिळणार नाहीं. सैंपाकघरांतील हवा " कमीअधिक उष्ण असेल, वारा सुटला असेल, स्टोव्हची उष्णता नेमकी मोजणें अशक्य असेल, तेलाच्या अथवा स्टोव्हच्या कांहीं दोषामुळें उष्णता वाया जात असेल अथवा पुरेशी चढत नसेल. म्हणून हा प्रयोग सैंपाकघरांत न करतां प्रयोगशाळेंत करून पाहतात. तेथें उष्णता मोजण्याची अचूक साधनें असतात. पाणी अमुक एका उष्णतामानाचें मोजून घेतात. वातावरण योग्य असें समशीतोष्ण ठेवतां येतें. आणि मग अशा परिस्थि-तींत उष्णतेच्या कोणत्या अंशावर पाण्याची वाफ होते हें अचूकपणें सम-जून येतें.

पण जगाचे व्यवहार प्रयोगशाळेंत चालत नाहींत. प्रयोगशाळेंत ज्या अंशावर पाण्याची वाफ झाली त्याच अंशावर जगाच्या व्यवहारांत पाण्याची वाफ होवूं शकत नाहीं. तथापि प्रयोगशाळेंतला प्रयोग सामान्य व्यवहारांत मार्गदर्शक होतो. तसेंच विक्रीमालाचें मूल्य कसें ठरतें हें तपासतांना ( सिडने हुक म्हणतो ) मार्क्सनें " सरंजामशाही पूर्ण नष्ट झाली आणि व्यक्तिस्वातंत्र्यास आळा घालणारी आर्थिक मक्तेदारी निर्माण झाली नाहीं, असें गृहीत धरलें आहे. राष्ट्राराष्ट्रांच्या सरहद्दी नजरेआड केल्या आहेत. प्रत्येक धंद्यांत भांडवलशाही उत्पादनपद्धतिच प्रभावी आहे असें मानलें आहे आणि मग विक्रीमालाच्या स्वरूपाचें पृथक्करण सुरू केलें आहे. "

## हरणें आणि माणसें

' भांडवलशाही समाजाची संपत्ति विक्रीमालाच्या स्वरूपांतच असते, ' या मार्क्सच्या म्हणण्यांत एक विशेष अर्थ आहे. मनुष्यसमाज हा परस्परावलंबी आहे. शंभर अथवा हजार हरणें कुरणांत एकत्र चरत असलीं तरी तीं परस्परावलंबी नाहींत. आयतें उगवलेलें गवत प्रत्येक हरिण स्वतंत्रपणें खात असतें. गवत पुष्कळसें एकत्र उगवतें म्हणून हरणें एकत्र चरतात इतकेंच. माणसांचें असें नाहीं. त्याला धनोत्पादनाचें कार्य स्वतः करावें लागतें. गवतासारखें आयतें अन्न त्याला मिळत नाहीं. तसेंच हें कार्य प्रत्येक व्यक्ति आपापल्यापुरतें करूं शकत नाहीं. शेतकऱ्याचें लहानसें कुटुंब घेतलें तरी त्यांत परस्परावलंबन असतें. शेतकऱ्याची गृहिणी जें घरकाम व सूतकाम वगैरे व्यवसाय करते ते ती सगळ्या कुटुंबाकरितां करते. शेतकरी शेतांत खपून जें धन पिकवितो तें तो सर्व कुटुंबाकरितां पिकवितो. अर्थात् कुटुंबांत एकमेकांच्या श्रमांचें सहकार्य होत असतें, तसेंच एका प्राचीन खेड्यांतले कुंभार, लोहार, सुतार, शिम्पी, न्हावी, तेली, कोळी, महार, चांभार, मांग वगैरे अनेक व्यवसायी हे साऱ्या गांवासाठीं खपत असतात आणि गांवचा शेतकरी त्यांना पोसत असतो. यांतही परस्परावलंबन, श्रमसहकार्य अथवा श्रमफलाची देवघेव होत असते. पण या देवघेवीस खरेदीविक्रीचें म्हणजे पैशाच्या बदली माल देण्याचें स्वरूप पूर्वीच्या सर्वच समाजांत नव्हतें. पूर्वी देवघेवीस पुष्कळसें रूढीचें स्वरूप असे. वर्षभर कुंभारानें शेतकऱ्याला लागतील तेवढीं गाडगीं मडकीं पुरवावीं, न्हाव्यानें शेतकऱ्याच्या व त्याच्या मुलांच्या वर्षभर त्यांना हव्या इतक्या हजामती कराव्या आणि खळ्यावर धान्याची रास

लावली कीं न्हावी, कुंभार वगैरे व्यवसायिकांना शेतकऱ्यानें कांहीं एक ठराविक धान्य द्यावें असा बलुत्याचा व्यवहार आपल्याइकडे सर्व प्रसिद्ध आहे. याचें स्वरूप परस्परावलंबनाचें, व पर्यायानें विनिमयाचें, देवघेवीचें आहे. पण सरळ खरेदीविक्रीचें नाही. भांडवलशाही समाजांत मात्र धन हें खरेदीविक्रीच्या स्वरूपांतच असते. म्हणून धनाचा विचार करतांना त्याचें विक्रीमाल हें स्वरूप विशेषेंकरून ध्यानांत ठेवावें लागतें.

## श्रमजन्यता हा साधारण गुण

मालाची खरेदी आणि विक्री ही पैशाशी मालाचा विनिमय होवून होत असली, तरी थोडा खोल विचार केल्यास मालाची खरेदीविक्री अखेरीस ऐनजिनशीच होतें हें समजून येतें. तेली शिंप्याला पैसा देऊन कपडा घेतो, शिंपी ते पैसे शेतकऱ्याला देऊन त्याजपासून धान्य घेतो आणि शेतकरी तेच पैसे तेल्यास देऊन त्याजपासून तेल घेतो. अशा प्रकारें पैसा हा नुसता भारवाहक झाला असून तेल, कपडा आणि धान्य यांचाच तिघांनीं परस्परांत विनिमय केला असल्याचें आपणांस दिसून येतें. हा विनिमय अर्थात् आतां पूर्वीसारखा रूढीनें होत नसून सारख्या मालाला सारखा माल देण्याघेण्यानें होतो. पण हा सारखेपणा मोजायचा कसा ? प्रत्येक विक्रीमाल हा एक उपयोगमूल्य असतोच. एरवी त्याला विनिमयमूल्य येवूंच शकणार नाही. पण लोखंड, कापड, गहूं, अशा विविध उपयोगाच्या वस्तूंचें उपयोगमूल्य इतकें भिन्न भिन्न आहे कीं त्यांची तुलना करण्यास उपयोगमूल्य हा साधारण गुण म्हणून उपयोगी पडूं शकत नाहीं. दोन वस्तूंची लांबीरुंदी अथवा वजन यांची जशी तुलना करतां येते तशी दोन उपयोगमूल्यांची करतां येणार नाहीं. तेव्हां उपयोगमूल्यांचा विचार सोडून दिला तर मग अनेक विक्रीमालांत सर्वसाधारण अशी राहणारी एक गोष्ट म्हणजे हे सर्व माल माणसांच्या श्रमानें झालेले असतात हीच होय. हे श्रम निरनिराळ्या विक्रीमालासाठीं निरनिराळ्या प्रकारचे करावे लागतील हें खरें. पण माणसाची शारीरिक व मानसिक झीज होणें हा सर्व श्रमांचा साधारण परिणाम आहे.

## मूल्याचें स्वरूप

उपयोगमूल्याच्या निर्मितीसाठीं माणसाची ही झीज होत असते ती झीज भरून निघाली तरच पुन्हा उपयोगमूल्य निर्मितीचे श्रम होवूं शकतील. विक्री-

माल ज्यानें निर्माण केला त्याला अर्थातच त्या विक्रीमालाचा स्वतांला उपयोग नसतो. त्याला त्याचें उपयोगमूल्य नसून विनिमयमूल्य असतें. पण विनिमयमूल्य असतें याचें कारण त्या मालास आधीं मूल्य असतें हें होय. त्या मालाच्या निर्मितीसाठीं श्रम करणाऱ्यानें जितकें आपलें शरीर झिजविलें असेल व जितकें भरून काढल्यानेंच उत्पादनाचें श्रम त्याला पुन्हा करणें शक्य होत असेल, तितकें मूल्य त्या मालांत अंतर्भूत झालें आहे हें उघड आहे. कारण दुसऱ्या कोणास तो माल स्वतः तयार करावयाचा असल्यास स्वतःच्या शरीराची त्याला कमीतकमी तितकी झीज करावीच लागेल. पण हा दुसरा माणूस तोच विक्रीमाल पुन्हां स्वतां न करतां पहिल्या माणसास हवा असणारा व शरीराची तितकीच झीज करणारा दुसरा एकादा माल तयार करील. दोघांच्याही शरीराची सारखीच झीज होईल. आणि उत्पन्न केलेल्या मालाच्या अदलाबदलीनें दोघेही पुन्हां आपली झीज भरून काढतील. तेव्हां उपयोगमूल्यें जेव्हां श्रमांनीं निर्माण केलीं जातात तेव्हांच त्यांचे ठिकाणीं मूल्य निर्माण होतें, आणि वस्तूंचे ठिकाणीं हें जें मूल्य असतें तेंच विनिमयाचें रूपानें व्यक्त होतें म्हणून त्यास विनिमयमूल्य म्हणावयाचें.

## श्रमवेळ हेंच श्रमाचें माप

पण श्रम मापण्याचें साधन तरी कोणतें? श्रम हे विविध प्रकारचे असूं शकतील. त्यांचीं स्वरूपें विविध म्हणून त्यांचीं तुलना अशक्य आहे. पण त्यांनीं होणारी शरीराची झीज ही सर्वसाधारण आहे असें मानलें तरी सुताराचें काम, लोहाराचें काम, सोनाराचें काम, प्रोफेसराचें काम वगैरे विविध कामांनीं होणारी जी झीज ती मोजायची कशी? हें अशक्य आहे. पण श्रम मोजायचें दुसरें एक महत्त्वाचें साधन आहे. तें म्हणजे श्रमवेळ ही होय. माणसाला जेवणखाण, खेळ, विसावा, झोप वगैरे अत्यवश्य गोष्टी करून शिवाय धनोत्पादक श्रमासाठीं वेळ काढून ठेवावा लागतो. रोजच्या रोज अन्न इत्यादि उपयोगमूल्यें माणसास हवीं असतात. कपडे, घरें वगैरे अनेक दिवस टिकणाऱ्या वस्तुही माणसास हव्या असतात. पण या सर्वांच्या निर्मितीसाठीं रोजच्या रोज श्रम करावे लागतात. हे श्रम करण्यासाठीं सर्व समाजाला मिळून कांहींतरी मर्यादित वेळच असतो. एकाद्या समाजाचा वेळ कापड निर्माण करण्यांत फाजील खर्चला

गेला तर अन्नासाठीं वेळ किती खर्चावा, कापडासाठीं किती खर्चावा, घरें बांधण्यास किती खर्चावा हें समाजातर्फे कोण ठरवितो ? भांडवलशाही समाज तर व्यक्तिस्वातंत्र्यवादी असून ज्याला त्याला वाटेल तो व्यवसाय त्यानें करावा असें त्याचें प्रमुख तत्त्व आहे. एकंदर समाजांतील सर्वांनीं नुसतीं घरें-दारेंच बांधलीं आणि अन्ननिर्मितीचे श्रमच केले नाहींत तर समाज सुंदर बंगल्यांत राहूनही उपाशी मरणार नांहीं काय ?

नाहीं. कोणत्या धनोत्पादनाचे कामीं किती श्रमवेळ खर्च व्हावी हें बाजारावरून कळतें. भांडवलशाही समाजांतील पुष्कळ लोकांनीं घरें बांधण्यांत फाजील श्रमवेळ खर्च केली तर घरें फाजील स्वस्त होतील आणि अन्न उत्पन्न करण्याकडे श्रमवेळ कमी खर्च झाल्यामुळें अन्न महाग होईल, अर्थात् अन्नाची मागणी पुरवठ्यापेक्षां अधिक झाली कीं अन्न उत्पन्न करणें फायदेशीर होऊन घरबांधणीची कांहीं श्रमवेळ अन्नोत्पादनाचे कामीं लावण्याकडे समाजाची प्रवृत्ति होईल. सारांश श्रमाचें मोजमाप करण्यास श्रमवेळ हेंच उत्कृष्ट साधन असून भांडवलशाही समाजांत अभावितपणें तसा तिचा उपयोगही होत आहे.

## ‘ सामाजिक दृष्ट्या अवश्य श्रम ’

पण श्रम मोजण्याचें साधन श्रमवेळ होय असें मानलें तर जो कामगार अगदीं आळशी असेल तोच जास्त श्रम करतो व त्याच्याच हातून अधिक मूल्य निर्माण होतें असें मानावें काय ? नाहीं. त्या त्या काळीं सर्वसामान्य माणसाचें उत्पादनसामर्थ्य जें असेल व त्याप्रमाणें अमुक एक कामास ‘ सामाजिक दृष्ट्या अवश्य वेळ, ’ म्हणजे सामाजिक उत्पादनसामर्थ्याच्या प्रमाणांत अवश्य इतका जो वेळ लागत असेल तोच मूल्यमापनासाठीं घ्यावा लागेल. गिरणीचें कापड जेव्हां होत नव्हतें तेव्हां हातमागावर सामान्यतः कोष्ट्यांना कापड विणण्यास जो वेळ लागेल तोच त्यांच्या श्रमाचा मापक होता. पण गिरण्यांचें कापड हातमागाच्या दशांश वेळांत होऊं लागल्यानंतर हातमागावर केलेल्या दहा तास श्रमाचें मूल्य गिरणीच्या एक तास श्रमाच्या मूल्याबरोबरच आहे असें मानलें पाहिजे. कारण गिरणीची वेळ हीच आतां ‘ सामाजिक दृष्ट्या अवश्य वेळ ’ होय. कामगाराचें उत्पादनसामर्थ्य जसजसें वाढत जातें तसतशी ही श्रमवेळ कमी होत जाते. आणि तितक्या प्रमाणांत विक्रीमालाचें मूल्यही कमी होत जातें. गिरणीचें कापड हातमागापेक्षां स्वस्त पडतें, यावरून ही गोष्ट स्पष्टपणें लक्षांत येतें.

सारांश, प्रत्येक उपयोग–मूल्याला मूल्य असेलच असें नाहीं. जें उपयोग-मूल्य श्रम करूनच निर्माण करावें लागतें त्यालाच तेवढें मूल्य असेल व अर्थात्‌च त्यालाच विनिमयमूल्य असूं शकेल. हवापाण्यासारख्या ज्या वस्तु अगदीं मोफत मिळूं शकतील त्यांना मूल्य असणार नाहीं व विनिमयमूल्यही असणार नाहीं.

## विक्रीमालांतील गूढता

श्रमजन्य अशा उपयोगमूल्याला भांडवलशाही समाजांतच विक्रीमालाचें स्वरूप येतें असें मागें सांगितलें आहे. पण या उपयोगमूल्यास विक्रीमाल हें स्वरूप येताच त्याचे ठिकाणीं एक प्रकारची गूढता अथवा विपर्यस्तता उत्पन्न होतें असें मार्क्स सांगतो. मानवी समाज हा परस्परावलंबी आहे. प्रत्येक माणसास इतरासाठीं धनोत्पादनाचे श्रम करावे लागतात व इतरांच्या श्रमांचें फळ भोगावें लागतें. आर्थिक दृष्ट्या पाहिलें तर समाजव्यवस्था गुलामगिरीची असो, सरंजामशाहीची असो अथवा हिंदुस्थानांतल्या जुन्या ग्रामसंस्थांची असो, धनोत्पादन हें समाजांत रूढ असलेल्या परस्परावलंबनानेंच होत आलें आहे. तेल्यानें समाजाकरितां तेल काढावें, शिंप्यानें समाजाकरितां कपडे शिवावे, शेतकऱ्यानें समाजाकरितां धान्य पिकवावें आणि या सर्वांनीं परत समाजाचे घटक या नात्यानें इतरांच्या श्रमफलाचा उपभोग घ्यावा असें परंपरागत चालत आलें आहे. तेल, कापड, धान्य वगैरे पदार्थांचा जो विनिमय होतो तो माणसांमध्यें धनोत्पादन-कार्याचे कामीं जें हें सामाजिक सहकार्य होत आहे त्याचा स्वाभाविक परिणाम होय.

## विपरीत दृश्य

पण प्रस्तुत भांडवलशाही समाजांत हें स्वरूप विपरीत दिसतें. व्यक्ति-स्वातंत्र्य हा या समाजव्यवस्थेचा आधार मानला जातो. हें तत्त्व अर्थशास्त्रज्ञांच्या इतकें हाडीमाशीं खिळलेलें असतें कीं तेल, कापड, धान्य वगैरे वस्तु निर्माण करणाऱ्या माणसांचे श्रम हे सर्व सामाजिक श्रमांची बेरीज असून या सामुदायिक श्रमाच्या दोरीनें सर्व माणसें एका समाजांत गुंफली आहेत हें सत्य दृश्य अर्थ-शास्त्रज्ञांना न दिसता प्रत्येक व्यक्ति इतरापासून स्वतंत्र व स्वयंभू आहे असें त्यास वाटत असतें. तेल, धान्य, कपडा वगैरे वस्तूंचा जो विनिमय होतो तो या वस्तु प्रत्येकीं सामाजिक श्रमापासून उत्पन्न झाल्या आहेत म्हणून होतो हें अर्थ-शास्त्रज्ञांच्या ध्यानांत येत नसून वस्तूवस्तूंमध्यें विनिमय जो होतो त्यामुळें त्या

वस्तु निर्माण करणाऱ्या व्यक्तीव्यक्तींमध्यें संबंध निर्माण होतो असें त्यांना वाटतें. हा संबंध आधिभौतिक वस्तूमुळें निर्माण झालेला असतो म्हणून तो आधिभौतिक संबंध मानला जातो, सामाजिक श्रमामुळें उत्पन्न होणारा तो सामाजिक संबंध आहे असें मानलें जात नाहीं, हा मार्क्सच्या मतें, भांडवलशाही समाजाच्या अंगचा फार मोठा दोष आहे.

## भ्रम कसा होतो

अर्थशास्त्रज्ञांना होणाऱ्या या दृष्टिभ्रमाचें स्वरूप स्पष्ट करण्यासाठीं मार्क्सनें दोन उदाहरणें दिलीं आहेत. मनुष्याच्या डोळ्यांकडून पाहण्याची क्रिया घडते त्यावेळीं वास्तविक डोळ्यांतील ज्ञानतंतूंत प्रेरणा उत्पन्न होऊन प्रकाशकिरण उमटतो, तो डोळ्यांतून निघून बाह्यवस्तूपर्यंत जातो व त्यांत प्रतिबिंबित होवून परत आपल्या डोळ्यांत येतो, तेव्हां आपणांस ती 'वस्तु दिसली' असें आपण म्हणतों. पण हें शास्त्रीय सत्य आपल्या लक्षांत येत नाहीं; आपणास घडलेलें दर्शन हा आपल्या डोळ्यांतील प्रकाशकिरणाचा परिणाम आहे हें लक्षांत न येता समोर दिसणाऱ्या वस्तूचाच 'ती मला दिसणें' हा अंगभूत गुण आहे असें आपणांस वाटत असतें. त्याचप्रमाणें तेल, कापड या वस्तू जणूं कांहीं अंगभूत गुणांनीं विनिमय पावतात व म्हणून त्यांच्या निर्मात्यांचा परस्परांशीं आधिभौतिक संबंध येत असतो असें अर्थशास्त्रज्ञांना वाटतें. मार्क्सला स्वत:ला हें उदाहरण पूर्ण समर्पक वाटलें नाहीं. डोळा आणि वस्तु यांचे दरम्यान निदान प्रकाशकिरणाची प्रत्यक्ष जी ये-जा झाली या सत्याचा दृष्टिभ्रमाला येथें थोडातरी आधार आहे. पण तेल, कापड, धान्य यांचा परस्परांशीं आधिभौतिक व अंगभूत असा कांहींही संबंध सांगता येत नाहीं. म्हणून समर्पक दृष्टांत हवा यासाठीं मार्क्सनें धार्मिक जगांतलें उदाहरण घेतलें आहे. स्वर्ग, पाताळ, नरक वगैरे ज्या धार्मिक कल्पना आहेत त्यांना सत्य अस्तित्व आहे असें कोणीच सांगूं शकत नाहीं. माणसाच्या मेंदूंतून निघालेल्या त्या निवळ कल्पना आहेत. पण या कल्पना डोक्यांत निर्माण झाल्या कीं त्यांना स्वतंत्र शक्ति व स्वतंत्र कर्तृत्व आहे असें वाटूं लागतें. त्यांना आपण जिवंत कल्पितों, देवादिकांचीं लग्नें करतों, त्यांना आमच्या पापपुण्याचा जमाखर्च ठेवायला लावतों, त्यांच्याकडे धान्यसंपत्तीची भीक मागतो, त्यांची दुःखनिवारणार्थ करुणा भाकतों. पण

वास्तविक मेंदूतून निघालेल्या खोट्या कल्पनांच्या खेळण्यांशींच आपला हा खेळ चाललेला असतो. त्याचप्रमाणें तेल, कापड, धान्य या वस्तूंच्या कांहीं अंगभूत गुणांनींच त्यांचा विनिमय होतो हा अर्थशास्त्रज्ञांचा भ्रम म्हणजे त्यांच्या कल्पना-शक्तीचा खेळ आहे असें मार्क्स सुचवितो.

## कळप आणि समाज

भांडवलशाही समाजांतच हा भ्रम उत्पन्न होतो याचें कारण केवळ विकण्यासाठीं वस्तु निर्माण करण्याचा प्रघात याच समाजांत जास्तींतजास्त रूढ होता हें होय. अमक्या माणसासाठीं अमुक माल निर्माण करायचा नसून कोणाही 'गिऱ्हाइका' साठीं येथें माल निर्माण करायचा असतो. माल निर्माण करणाऱ्याला गिऱ्हाइक दिसत नसून त्याचा पैसा तेवढा दिसतो. उलट पैशानें आपणांला खरेदी करता येणारा माल दिसतो पण तो माल विकणारा दिसत नाहीं. यामुळें समाजांतील व्यक्ति या परस्परापासून सुट्या, परक्या, अनोळखी राहतात. एकाच कुरणांत चरणारीं हरणें जशीं कुरण एकत्र असल्यामुळें एकत्र चरत असलीं तरी तीं परस्परस्वतंत्र आहेत तशींच हीं माणसेंही स्वतंत्र आहेत, अशी भावना माणसाच्या मनांत वावरत असते. वस्तुस्थिति अशी मुळींच नाहीं. हरिणांचा जमाव हा कळप अथवा घोळका आहे. उलट माणसांची वसाहत हा समाज आहे. हरिणें हीं प्रत्येकीं स्वतंत्र आहेत तशीं माणसें नव्हत. आर्थिक उत्पादनाच्या कामीं समाजांतील व्यक्ति परस्परावलंबी असून जिवंत शरीराप्रमाणें समाजसंघटनाही बांधीव आहे व म्हणूनच जिवंत व कार्यक्षम आहे. जिवंत शरीराच्या एका भागावर फाजील कामाचा बोजा पडला तर तितक्या मानानें इतर अवयवांत पंगूपणा अथवा बधिरपणा येतो त्याप्रमाणें समाजांतील व्यक्तींची श्रमवेळ अन्ननिर्मितीचे कामीं फाजील खर्च झाली तर घरें बांधण्यास आवश्यक इतकी श्रमवेळ उरत नाहीं आणि मग मागें म्हटल्याप्रमाणें मागणी–पुरवठ्याच्या सिद्धांताअनुसार ताजवा उलटूं लागून अन्ननिर्मितीकडील श्रमवेळ कमी होते व घरें बांधण्याकडे जास्त खर्च होऊं लागते. एकंदर समाजाची एकूण श्रमवेळ ही अमुक इतकी मर्यादित आहे आणि तिची वाटणी निरनिराळ्या विक्रीमालांच्या निर्मितीसाठीं होणाऱ्या श्रमांत होत असते.

भांडवलशाहीं समाजांत या सामाजिक श्रमांस दोन प्रकारचें स्वरूप प्राप्त होत असतें. कोणताही धनोत्पादक श्रम अमुक एक सामाजिक गरज भागवितो आणि या नात्यानें सामुदायिक श्रमाची जी विभागणी होत असते तींत एक स्थान मिळवितो. हा श्रम समाजोपयोगी श्रम या नात्यानें कोणत्या तरी एकाच प्रकारची समाजाची गरज भागवीत असेल. हें त्याचें एक स्वरूप. पण हा श्रम स्वतः श्रम करणाऱ्याच्या विविध गरजा भागविण्यासही समर्थ होतो हें त्याचें दुसरें स्वरूप होय. सुतार हा समाजास फक्त सुतारीच्या वस्तु तेवढयाच पुरवितो. पण त्याबद्दल समाजाकडून त्याला हव्या असणाऱ्या बहुविध वस्तु मिळतात. विनिमयव्यवहार हा परंपरेच्या व रूढीच्या बंधनांतून सुटून अनिर्बंध चढाओढीच्या खरेदीविक्रीचें स्वरूप त्याला प्राप्त झालें म्हणजे माणसांना माणसांचा विसर पडतो, सामाजिक परस्परावलंबनाचा विसर पडतो, प्रत्येक व्यक्ति ही आपल्यापरी स्वतंत्र आहे असें वाटतें आणि विक्रीवस्तु तेवढया गारुड्याच्या टेबलाप्रमाणें समाजांत नाचत आहेत असा भास होतो. वास्तविक श्रम करणाऱ्या समाजांतील सर्व व्यक्तींची श्रमवेळ ही एकजिनसी व मर्यादित असून समाजांत तिची वाटणी नेहमीं होत असते व तशी ती होत राहील तरच समाज जगूं शकेल.

## क्रूसोचें उदाहरण काल्पनिक

व्यक्तिस्वातंत्र्यवादी अर्थशास्त्रज्ञ रॉबिन्सन क्रूसोचें उदाहरण नहमीं घेत असतात. क्रूसोसारखी आर्थिक दृष्टया पूर्ण स्वावलंबी व्यक्ति कादंबरींत चालण्या-सारखी असली तरी, मार्क्सच्या मतें परस्परावलंबी अशा सामाजिक जीवनाचें ती उदाहरण होवूं शकत नाहीं. तथापि क्रूसोच्या जीवनाचा विचार केला तरी त्याला आपली श्रमवेळ मर्यादित आहे हें लक्षांत घेऊन शेती, घर बांधणें, नाव बांधणें वगैरे कामीं ही श्रमवेळ हिस्सेरशीनें वाटून घ्यावी लागेच.

## निरानेराळे समाजप्रकार

सरंजामी समाजाचें स्वरूप लक्षांत घेतलें तर तेथलें सामाजिक परस्परा-वलंबन सहज समजून येतें. त्यांतील भूदास व सरंजामदार ( जमिनदार ) हे संबंध आर्थिक परस्परावलंबनाचे संबंध आहेत ही गोष्ट प्रत्यक्ष व्यवहारांत लपली जाऊं शकत नाहीं. भूदास असलेला शेतकरी जमिनदाराच्या मालकीच्या

शेतांत आठवड्यांतून कांहीं दिवस श्रम करून उत्पन्न होणारें सर्व धन जमीन-मालकास देतो आणि त्याच्या मोबदला मालकानें त्याला वहिवाटीस दिलेल्या हीणकस जमिनींत आठवड्यांतले उरलेले दिवस काम करून तें धन स्वतःसाठीं घेतो. मागें उल्लेखिलेलें एका शेतकरी कुटुंबाचें उदाहरणही मार्क्सनें हें सामाजिक परस्परावलंबन स्पष्ट करून दाखविण्यासाठींच घेतलें आहे. या कुटुंबांतील माणसें धान्य पिकविणें, गुरें पाळणें, सूत काढणें, कापड विणणें, कपडे शिवणें वगैरे कामें करतात. पण त्यांच्या त्या वस्तूंना आपापसांत विक्रीमालाचें स्वरूप येत नाहीं. कुटुंबरूपी एका अखबंद समाजाची तीं विविध कार्यें असतात. हेंच सामाजिक आर्थिक परस्परावलंबन विशद करण्यासाठीं मार्क्सनें पूर्णपणें स्वतंत्र व समान दर्जाच्या माणसांनीं बनविलेली एक वसाहत कल्पिली आहे. या वसाहतींत धनोत्पादनसाधनें सार्वजनिक मालकीचीं आहेत. आणि एकंदर समाजाची जी मर्यादित श्रमवेळ व श्रमशक्ति तिचा विनियोग धनोत्पादनाचे कामीं योजनापूर्वक वाटणी करून केला असून प्रत्येकाच्या श्रमाचें सामाजिक स्वरूप स्पष्ट होत आहे. अर्थात् उत्पन्न होणारें प्रत्येक धन हें सामाजिक धन होत असून त्या सर्व धनांचा कांहीं अंश भावी उत्पादनासाठीं धनोत्पादनसाधन म्हणून वेगळा काढून ठेवला जातो आणि बाकीचा भाग हा प्रत्येक व्यक्तीला उपभोगासाठीं अंशतः देण्यांत येतो. भांडवलशाही समाजाशीं या कल्पित समाजाची तुलना करता यावी यासाठीं या कल्पित समाजांत ज्याची श्रमवेळ जेवढी असेल तेवढ्या प्रमाणांत त्याला धनाचा वाटा मिळतो अशी कल्पना मार्क्सनें केली आहे. यामुळें श्रमवेळेचे दोन उपयोग होतात. सामाजिक गरजेप्रमाणें समाजांत वाटणी करणें हा एक श्रमवेळेचा उपयोग आणि भोग्य धनाची वाटणी श्रमपरिमाणानुसार करणें हा श्रमवेळेचा दुसरा उपयोग होत असतो. धनोत्पादन आणि धनाची वाटणी या दोन्ही बाबतीत व्यक्तीव्यक्तीमध्यें असणारे सामाजिक संबंध येथें उघड दिसतात.

## श्रममूल्य सिद्धांताचा मूळ उपयोग

मूल्य हें श्रमापासून निर्माण होतें या मुद्यावर मार्क्सचा विशेष जोर आहेच. पण तो मुद्दा मार्क्सनें नवीन काढला असें नव्हे. मागें सांगितल्याप्रमाणें रिकार्डो व ॲडॅम स्मिथ यांनींही हा मुद्दा प्रथम मांडला होता. मूल्य हें श्रमा-

पासून निर्माण होतें या सिद्धांताचा दोन दृष्टींनीं उपयोग करण्यांत येई. मालाच्या नक्की किंमती बाजारांत मागणी व पुरवठा या सिद्धांताअनुसार ठरतात खऱ्या, पण मागणी व पुरवठा हीं दोन्ही समतोल झालीं तरी मालाला कमींत कमी कांहीं किंमत पडतेच. मागणी वाढली तर किंमत वाढते, पुरवठा वाढला तर किंमत उतरते. पण मागणी व पुरवठा समतोल झाला असता मालाला जी किंमत पडते ती मागणीपुरवठ्याप्रमाणें चढउतार पावणाऱ्या किंमतीच्या चढ-उतार-रेषेचा मध्यबिंदु होय. हिलाच अर्थशास्त्रज्ञ मूल्य म्हणतात. हें मूल्य अथवा 'मध्य-किंमत,' सदर वस्तु अगदीं हवा पाण्यासारखी विनाश्रम मिळणारी असेल तर, कोणीही देणार नाहीं. उलट ज्या वस्तूसाठीं कोणी तरी श्रम करावेच लागतात ती वस्तु तो कोणी फुकट देणार नाहीं. आपल्या उपयोगी अशी दुसऱ्याच्या श्रमानें झालेली वस्तु घेऊन तो आपली वस्तु देईल. व्यवहारांत दोनच माणसें अशीं देव-घेव करीत नसून अगणित माणसें देवघेव करतात. पण ते जी देवघेव करतात तीं श्रमजन्य वस्तूंचीच करतात. उपयुक्त वस्तूंच्या देव-घेवींच्या शक्यतेस व इष्टतेस श्रम हेच आधार होत. हे श्रम अर्थातच 'सामाजिक दृष्ट्या अवश्य' असे असले पाहिजेत. हें मागें सांगितलेंच आहे. असे श्रम हेच मूल्य निर्माण करतात व किंमतीच्या चढउताराचा मध्यबिंदु ठरवितात, असें सांगण्यासाठीं या श्रममूल्य सिद्धांताचा क्लासिकल अर्थशास्त्रांनीं एक उपयोग केला.

त्याचप्रमाणें धनोत्पादक श्रमावांचून समाजांत ज्यांना धनाचा वाटा मिळतो त्यांना तो वाटा मिळणें हा अन्याय होय, असें प्रतिपादण्यासाठींही रिकार्डोनें या श्रममूल्य सिद्धांताचा उपयोग केला. रिकार्डोनें आपलें तार्किक अनुमान कडेपर्यंत चालवून जमीनमालक हे विनाश्रम जमिनीचा खण्ड मिळवतात तो खालसा झाला पाहिजे असें स्पष्ट प्रतिपादन केलें नाहीं. पुढें हेन्री जॉर्ज या अर्थशास्त्रज्ञानें हें मत स्पष्टपणें मांडलें. मार्क्सनें रिकार्डोचा हा श्रममूल्याचा सिद्धांत जसाच्या तसा प्रथम स्वीकारून मग तो वाढविला आहे. रिकार्डो व ॲडमस्मिथ हे कमी अधिक प्रमाणांत व्यक्तिस्वातंत्र्यवादी होते. श्रम हा शब्द उच्चारतांना एकेका व्यक्तीचे सुटे सुटे श्रम त्यांच्या डोळ्या-पुढें येत. यामुळें सामुदायिक आर्थिक उत्पादन क्रियेनें समाज एकजीव व एक-शरीर झाला आहे आणि सामाजिक श्रम हें सर्व एकसंच असून एकंदर समाजाची श्रमशक्ति व श्रमवेळ जी मर्यादित असतें तिची समाजव्यवहारांत वाटणी होत

असतें. सुट्या व्यक्ति आणि त्यांचे सुटे श्रम हा श्रम होय हा मुद्दा प्रथम मार्क्सनेंच प्रामुख्यानें मांडला आहे.

## वाढाव्याचा शोध

( प्रकरण ४ व ५ ) श्रमापासून मूल्य निर्माण होतें हें ठरलें. पुढें नफा कोठून निर्माण होतो हा आरंभीं उत्पन्न केलेला प्रश्न या प्रकरणांत मार्क्सनें चर्चिला आहे. मार्क्सनें नवीन संशोधिलेला महत्त्वाचा असा हा मुद्दा होय. नफा आणि वरकडमूल्य अथवा वाढावा यांत असलेला फरक पुढें सांगण्यांत येईल. सध्यां वरकडमूल्य अथवा वाढावा हाच शब्द नफ्यासाठीं योजूं. खरेदीविक्री-व्यवहारांत सारख्या वस्तूंची सारख्या वस्तूंशीं देवघेव होत असते. आणि प्रत्येक विक्रेता गिऱ्हाईक होत असतो, यामुळें सर्व विक्रेत्यांनीं विक्रीमालास अधिक किंमत घ्यायची ठरविली तरी गिऱ्हाईक या नात्यानें तीच अधिक किंमत परत देऊन टाकावी लागणार असल्यानें कोणासच नफा मिळविण्यास अवसर राहात नाहीं हें आपण मागें पाहिलें. मग नफा मिळतो कसा ? उपभोगा-साठीं जे लोक उपयोगमूल्यें खरेदी करतात ते त्या उपयोगमूल्यांचा उपभोग घेऊन तीं फस्त करतात. तेथें नफ्याचा प्रश्नच उरत नाहीं. नफा मिळतो तो माल विकणाऱ्याला मिळत असतो. हा मालविक्रेता आधीं स्वतः मालाचें गिऱ्हा-ईकही असतो. बटाट्याचें पोतें शेतकऱ्यांकडून खरेदी करावें आणि तें बाजारांत नेऊन गिऱ्हाइकास विकावें यांत सारख्याच वस्तूंशीं सारख्याच वस्तूंची देवघेव होणें हें वर पाहिल्याप्रमाणें अपरिहार्य आहे. तर मग नफा अथवा वाढावा उत्पन्न होतो तरी कुठें ? असा प्रश्न उपस्थित करून मार्क्सनें त्याचें उत्तर दिलें आहे तोच त्याचा मोठा शोध होय.

## श्रम व श्रमशक्ति

विक्रेता आणि गिऱ्हाईक हे सारख्याच वस्तूंची देवघेव करीत असतील हें खरें, पण ' जो विक्रीमाल खरेदी केल्यानंतर त्याची अथवा त्याच्या रूपांत-रांची विक्री होण्यापूर्वीं मूल्यांत वाढतो असा एकादा विक्रीमाल आहे काय ? ' याचा मार्क्सनें विचार केला व हा विक्रीमाल म्हणजे श्रमशक्ति होय असें उत्तर त्याला मिळालें. श्रम आणि श्रमशक्ति यांत महत्त्वाचा फरक आहे. स्वतः मार्क्सचा हा नवीन शोध असूनही त्यानें त्याची चर्चा अगदींच संक्षिप्त केली

आहे. तथापि नीट लक्ष पुरविल्यास हा मुद्दा समजण्यास कठीण नाहीं. कोष्टी हातमागावर कापड विणून तें बाजारांत विक्रीस नेतो त्यावेळीं तो आपले श्रम म्हणजे श्रमाचें रूपांतर विकतो. पण मजूर कारखानदाराची नोकरी जेव्हां पत्करतो तेव्हां तो असेंच आपलें श्रम विकतो का ? कारखानदाराकडून अमुक इतका पगार घेऊन म्हणजे घेण्याचा करार करून तो कारखानदाराला काय देतो ? श्रम देतो का ? त्याचे श्रम ही अव्यक्त वस्तु आहे. त्याचें व्यक्त स्वरूप म्हणजे मजूरानें श्रमानें निर्माण केलेला माल होय. तो निर्माण होतो, तसतसा कारखानदाराच्या मालकीचा ठरतो. मजूरानें तो कारखानदाराला विकावा लागतच नाहीं. मग मजूर मजुरीदाखल कारखानदाराला काय देतो ? श्रम करण्याची शक्ति–श्रमशक्ति देतो असें मार्क्सचें उत्तर आहे. या श्रमशक्तीचें मूल्य म्हणजे मजूरी किती मिळते ? येथें ' खुल्या बाजारांत मागणी व पुरवठा समान असतां वस्तु साधारणतः श्रममूल्याइतक्या किंमतीसच विकली जाते, ' हा नियम लागू होतो. समजा, कापडमाल बाजारांत आला, तो विकणाऱ्यांना मालाहून अधिक गिऱ्हाईक दिसलें, म्हणजे पुरवठ्यापेक्षां मागणी वाढली तर ते कापडवाले मालाची किंमत मूल्याहून अधिक करतील, पण त्यामुळें कांहीं गिऱ्हाईक मागें हटेल, उलट कापडमालांत नफा पुष्कळ मिळतो हें पाहून अधिक लोक कोष्टयाचा धंदा करतील. अशाप्रकारें मागणीपेक्षां पुरवठा वाढतांच कापडाची किंमत मूल्यापेक्षां कमी होईल. यामुळें कापडाची निपज कमी होऊं लागेल व पुन्हां त्याची किंमत वाढेल. सारांश मालाची किंमत नेहमीं मूल्याच्या आसपासच राहते व दीर्घकालांत एकंदरीनें ती मूल्याइतकीच भरते. श्रमशक्तिरूपी मालाची किंमत-म्हणजे मजूरी-अशीच ठरणार. पण श्रमशक्तीचें श्रममूल्य म्हणजे काय ? कापडाचें श्रममूल्य म्हणजे कापड करण्यास लागणारे श्रम. माणसाच्या श्रमशक्तीचें मूल्य म्हणजे काय ? ज्यायोगें श्रमशक्ति कार्यक्षम राहते त्यासाठीं करावे लागणारे श्रम. हें श्रमशक्तीचें मूल्य होय. श्रमशक्ति कशामुळें कार्यक्षम राहते ? आपण जगण्यासाठीं अन्न, वस्त्र वगैरे जें सेवन करतों त्यामुळें त्यांच्या निर्मितीसाठीं कोणाला तरी श्रम करावे लागतातच. म्हणजे मजूरांच्या चरितार्थधनाची जी किंमत पडते, तितकें, ( त्यामुळें पोसली जाऊन कार्यक्षम राहणाऱ्या ) श्रमशक्तीचें मूल्य होय. म्हणजे मजूराला जी मजूरी मिळते ती कमींतकमी त्याच्या चरितार्थास हवी असेल इतकी मिळते. कारखानदाराच्या गरजेहून मजूरांची संख्या

कमी असली तर ही मजूरी चरितार्थास लागणाऱ्या धनाच्या किंमतीहून अधिकही मिळेल. पण लगेच मजूरी फार मिळते म्हणून मजूरीचा धंदा अधिक लोक करूं लागतील, आणि कारखानदारांच्या गरजेहून मजूर जास्त झाले कीं, चरितार्थास लागणाऱ्या धनाच्या किंमतीहून मजूरीचा दर खालींहि जाईल. म्हणजे मजूरी चरितार्थास लागणाऱ्या धनाच्या किंमतीच्या जवळपासच असेल. अर्थात् चरितार्थास लागणारें धन देश-काल-परिस्थिति, संस्कृति यामुळें कमी-अधिक असूं शकेल. इंग्लंडच्या कामगारांना जेवढी मजूरी द्यावी लागेल, त्यापेक्षां चीनमधील मागासलेल्या व असंस्कृत कामगारांना कमी मजूरी द्यावी लागेल. चरितार्थाचा दर्जा निरनिराळ्या ठिकाणीं कमीअधिक असेल त्याप्रमाणें चरितार्थधनाची किंमत व म्हणून मजूरांची मजूरी कमीअधिक असेल त्याप्रमाणें चरितार्थधनाची किंमत व म्हणून मजूरांची मजूरी कमीअधिक असूं शकेल. पण कांहीं झालें तरी मजूराला श्रमशक्ति विकल्याबद्दल जी मजूरी मिळणार ती त्याच्या चरितार्थासाठीं कमींतकमी अवश्य धन जें लागेल त्याच्या किंमतीच्या आसपासच असणार हें उघड आहे. इतकी मजूरी घेऊन म्हणजे घेण्याचा करार करून कामगार हा कारखानदारास आपली श्रमशक्ति वापरण्यास देतो.

## वाढाव्याचें कोडें

या श्रमशक्तीपासून कारखानदार वाढावा अथवा वरकड मूल्य कसें निर्माण करतो? प्रथम कारखानदाराला उत्पादनक्रियेंत खर्च होणारें मूल्य उत्पन्न केलें पाहिजे. मजूराला द्यावयाचा पगार, धंदा कापडाचा असल्यास कापूस व इतर कच्चा माल, हातमाग, यंत्रें वगैरे उत्पादनसाधनें, जागाभाडें वगैरेसाठीं जें मूल्य उत्पादनाचे कामीं खर्च होतें तें सर्व कारखानदार स्वतः खर्च करीत असतो. मजूरानें ६ तास काम केले म्हणजे या सर्व मूल्याची भरपाई होण्या-इतकें मूल्य उत्पन्न होतें असें आपण समजूं, म्हणजे मजूर, कच्चा माल आणि उत्पादनसाहित्य यांची जी राबणूक ६ तासपर्यंत झाली तीमुळें खर्च झालेलें सर्व मूल्य पुन्हां उत्पन्न झालें. पण यांत कारखानदाराला कांहींच मिळालें नाहीं. जितकें मूल्य उत्पादनाचें कामीं खर्च झालें तेवढेंच उत्पादन-क्रियेंत परत उत्पन्न झालें तर कारखानदार भांडवल खर्च न करतां घरींच ठेवील अथवा बाजारांतला आयता माल घेऊन त्याचा व्यापार करील. सर्वच कारखानदारांनीं असें म्हटलें असतें तर आजवर कोणीच कारखानदारांनीं कारखाने घातले नसते आणि

म्हणून तयार माल कोणासच मिळाला नसता. पण आज दीडशें वर्षे कारखानदारी वाढत आहे आणि ती नफा मिळतो म्हणून वाढते ही गोष्ट कारखानदार कबूल करीत आहेत. मग हा नफा उर्फ वाढावा कोठून येतो ?

## मजूर फुकट केव्हां राबतो

थांबा. मजूरानें ६ तासपर्यंत काम करून स्वतःची श्रमशक्ति आणि कापूस वगैरे कच्चा माल यांचा व्यय केला, यंत्रें, हत्यारें वगैरेची झीज केली आणि हें खपलेलें मूल्य जितक्याचें तितकेंच उत्पन्न मालाच्या रूपानें परत निर्माण केलें. पण याच मजूरानें आणखी ६ तास काम केलें तर ? तर मग तो आणखी कापूस व कच्चा माल फस्त करील आणि यंत्रें व हत्यारें यांची आणखी इतकीच झीज करील. अर्थात् आणखी मूल्य निर्माण होईल हें खरें, पण तें पहिल्या ६ तासांत खर्च झालेलें मूल्य तितक्याचें तितकेंच उत्पन्न होईल. नाहीं कां ?

नाहीं, नाहीं. पहिल्या ६ तासांच्या उत्पादनांत व दुसऱ्या ६ तासांच्या उत्पादनांत मार्क्सनें महत्त्वाचा फरक दाखविला आहे. पहिल्या ६ तासांत कापूस व यंत्रें यांचें खर्च झालेलें मूल्य मालाच्या रूपांत भरून निघालें. त्याप्रमाणें मजूराला दिलेला पगारही भरून निघाला. पण मजूराची श्रमशक्ति सगळीच संपली नाहीं, तर फक्त अर्धी संपली. मजूर हा ६ तास काम करो अथवा १२ तास काम करो, त्याला मिळणारी मजूरी पूर्ण काम करण्याच्या शक्तीच्या मूल्या-इतकी म्हणजे चरितार्थ पूर्णपणें चालेल इतकी मिळावी लागते. या मजूरी-इतकें मूल्य ६ तासांच्या उत्पादनश्रमानें निर्माण होणाऱ्या मालांत वसूल होतें. नंतरच्या ६ तासांत कापूस व यंत्रें-हत्यारें यांचें नवें मूल्य खर्च होतें व त्याची भरपाई नव्या मालांत निर्माण होते. पण या दुसऱ्या ६ तासांत जी श्रमशक्ति खर्च होते तिचें मूल्य म्हणजे मजूरी पहिल्या ६ तासांतच वसूल होऊन जात असल्यानें दुसऱ्या ६ तासांत खर्च होणाऱ्या श्रमशक्तीचें मूल्य जें मालाच्या रूपानें प्राप्त होतें तें कारखानदारास अगदीं मोफत मिळतें. हेंच वरकड मूल्य अथवा वाढावा अथवा नफा होय. पहिल्या ६ तासांत मजूर जे श्रम करतो त्यानें तो आपली मजूरी वसूल करतो व दुसऱ्या ६ तासांत तो कारखानदारा-साठीं सपशेल फुकट राबतो.

## आकड्यांच्या हिशेबानें खुलासा

मार्क्सनें आंकडे मांडून केलेला हिशेब पुढें सारग्रंथांत ?ं ाच आहे. अगदी साधे आंकडे घेऊन हा हिशेब येथें समजून घेऊं. समजा, कामगाराची मजूरी रोज २ रु. आहे. ती कामगारास देण्याचें कारखानदारानें ठरविलें. आतां त्यानें ६ तास काम त्याचेकडून करून घेतलें काय अथवा १२ तास करून घेतलें काय, मजूरी २ रु. दिलीच पाहिजे. या कामगारानें ६ तास काम केलें. त्या वेळांत १ रु. चा कापूस वगैरे कच्चा माल आणि १ रु. यंत्रें-हत्यारें वगैरेची झीज, जागाभाडें वगैरे, आणि कामगाराची मजूरी २ रु. मिळून ४ रु. मूल्य खर्च झालें. अर्थात् ६ तासांत निर्माण होणाऱ्या मालाचें मूल्य ४ रु. झालें. कारखानदाराचें खर्च झालेलें मूल्य त्याच्या पदरांत पडलें. आतां मजूर पुन्हा ६ तास काम करतो. पुन्हां १ रु. कापूस व कच्चा माल आणि १ रु. यंत्रें-हत्यारें यांची झीज व जागाभाडें मिळून या दुसऱ्या ६ तासांच्या उत्पादनकार्यात २ रु. चें मूल्य खर्च झालें तें मालांत अवतरलें. पण पहिल्या ६ तासाप्रमाणें दुसऱ्या ६ तासांचा मालही ४ रु. चा निघाला. यांत अर्थात् श्रमशक्तीच्या नांवाचे २ रु. जे उरले म्हणजे अधिक मिळाले तो कारखानदाराचा नफा मजूरानें त्यास दिला. पहिल्या ६ तासांत कामगारानें आपल्या मजूरीच्या २ रु. साठीं काम केलें; दुसऱ्या ६ तासांत कारखानदाराला फुकट २ रु. देण्यासाठीं काम केलें. सारांश कापूस, यंत्रें वगैरे जो विविध कच्चा माल तो उत्पादनकार्यांत जेवढा खर्च होईल तेवढेंच मूल्य मालाच्या स्वरूपांत पुन्हां अवतरतें. पण श्रमशक्ति हा असा विक्रीमाल आहे कीं त्याचा जास्तींत जास्त उपयोग केल्यास आपल्याइतकें मूल्य तो निर्माण करतोच पण वरकड मूल्यही तो निर्माण करतो. तोच वाढावा अथवा नफा होय.

## स्वतंत्र व कफल्लक यांची जरूरी

कामगाराकडून असा वाढावा अथवा नफा भांडवलदाराला मिळविता यावा यासाठीं दोन प्रकारच्या परिस्थितींची आवश्यकता असावी लागते. आपली श्रमशक्ति विकून टाकण्यास स्वतंत्र असे कामगार बाजारांत उपलब्ध असणें ही पहिली परिस्थिति होय. गुलामगिरीच्या काळीं गुलाम हा आपली श्रमशक्ति विकण्यास स्वतंत्र नसे. त्याच्या शरीरावरच मालकाचा ताबा होता. सरंजाम-शाहीच्या काळीं भूदास हा जमिनीस बांधलेलें कुळ असे. यामुळें आपली श्रम-

शक्ति वाटेल त्यास विकून टाकण्यास तोही समर्थ नव्हता. व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार व अंमल होवूं लागला तशी गुलामगिरी व सरंजामशाही मागे पडली. व्यक्तिस्वातंत्र्याचा पुरस्कार होऊं लागला. स्वतःची श्रमशक्ति स्वेच्छेनें विकूं शकणारे कामगार भांडवलदाराला हवे तितके मिळूं लागले. कामगाराकडून वाढावा मिळविण्यास कारखानदाराच्या दृष्टीनें दुसरी आवश्यक परिस्थिति म्हणजे कामगाराला स्वतःच्या मालकीचें असें दुसरें धनोत्पादनसाधन नसावें ही होय. कारण ज्या कोष्ट्याजवळ स्वतःचा माग आहे, ज्या शेतकऱ्याजवळ स्वतांची जमीन आहे तो कारखानदाराकडे रोजगारी मागण्यासाठी येणारच नाहीं. म्हणजे कामगार हा दोन्ही दृष्टींनीं स्वतंत्र हवा. त्याच्यावर कायद्याचें अथवा रूढीचे कोणतेंच बंधन नसून स्वतःची श्रमशक्ति विकण्यास तो स्वतंत्र पाहिजे. आणि स्वतांच्या मालकीच्या धनोत्पादन-साधनाचा पाश त्याच्या पायास कांहींही नसून त्या दृष्टीनेंही तो पूर्ण स्वतंत्र म्हणजे पूर्ण कफल्लक पाहिजे. म्हणजे स्वतांची श्रमशक्ति विकण्यास स्वतंत्र पण जवळ चरितार्थाचें कोणतेंच साधन नसल्यामुळें कफल्लक असे कामगार बाजारांत कारखानदाराच्या मागणीहूनही अधिक मिळणें शक्य होतें. मग त्यांच्यांत रोजगारीसाठीं चढाओढ लागून मजूरीचे दर चरितार्थास कमींत कमी लागेल इतके कमी होतात; मग त्या मजूरांना कामावर नेमून व मजूरीइतकें मूल्य निर्माण होण्यास जितका काळ लागेल त्याच्या दुप्पट (अथवा कांहीं कमी-अधिक) राबणूक त्यांच्याकडून घेऊन भांडवलदार आपला वाढावा वसूल करतो.

## भांडवलशाहीचें ऐतिहासिकत्व

वर सांगितलेली दोन प्रकारची परिस्थिति इतिहासांत केव्हांही व कोठेंही असणारी अशी नाहीं. ती निसर्गसिद्ध नव्हेच. पण मानव समाजाच्या आरंभापासून धनोत्पादनाच्या बाबतींत जें सामाजिक परस्परावलंबन दिसून येतें तशीही ती सामाजिक म्हणजे मनुष्य समाजाच्या सर्व अवस्थांत आढळणारी परिस्थितिही नव्हे. ही एक ऐतिहासिक म्हणजे इतिहासक्रमागत अशी परिस्थिति आहे. गुलामगिरी व सरंजामशाही इतिहासक्रमांत नष्ट झाली म्हणून स्वतःची श्रमशक्ति विकण्यास स्वतंत्र असे मजूर मजूरांच्या बाजारांत उभे राहूं शकले. त्याचप्रमाणें ज्या इंग्लंडांत भांडवलशाही प्रथम सुरू झाली तेथें बहुसंख्य समाज शेती व खासगी धंदे यांतून हुसकला जाऊन धनोत्पादनसाधनांचे बाबतींत कफल्लक

बनला आणि कारखानदाराचे दारांत चरितार्थासाठीं नोकरी मागण्यास उभा राहिला. कामगार हाच वाढावा देतो, वाढावा हा भांडवलशाहीचा आधार होय आणि वाढावा देणारा हा कामगार विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितींतच निर्माण होतो, असे सांगून मार्क्सनें भांडवलशाही समाजरचना ही निसर्गसिद्ध नव्हे, मानवी समाजांत नेहमी आढळून येणारी म्हणजे सामाजिक अशीही ती नव्हे तर केवळ इतिहासक्रमांत अवतरलेली, व जशी आली तशी जाणारी ऐतिहासिक समाजघटना होय हा मुद्दा येथें स्पष्ट केला आहे. येथें मार्क्सनें 'नैसर्गिक', 'सामाजिक' व 'ऐतिहासिक' या तीन शब्दांच्या अर्थांत जो फरक केला आहे तो वाचकांनीं विशेष प्रकारें ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

## कुशल आणि हमाल

सगळेच कामगार सारख्या योग्यतेचे नसतात, अधिक कुशल आणि नुसते हमाल अशी कामगारांची वर्गवारी होत असते. त्याप्रमाणें त्यांच्या मजूरीच्या दरांतही फरक असतो. पण सामान्यतः श्रमशक्तीच्या उत्पादन खर्चाइतकी मजूरी मिळणें या सिद्धांतास त्यानें बाध येत नाहीं. अधिक कुशल कामगारास त्याचें कौशल्य शिकण्यासाठीं जो काळ घालावा लागतो व जो खर्च करावा लागतो त्यामुळें त्याच्या श्रमशक्तीच्या उत्पादनाचें मूल्य वाढतें व अर्थात् त्याची मजूरीही वाढते.

## स्थिर आणि चर भांडवल

(प्रकरण ६ व ७) भांडवलाच्या वर्गीकरणाची मार्क्सची पद्धति व क्लासिकल अर्थशास्त्रज्ञांची पद्धति या दोहोंत मूलग्राही फरक असून त्यावरून अर्थशास्त्राकडे पाहण्याचे दोघांचे दोन भिन्न दृष्टिकोन कळून येतात. मार्क्सचें वर्गीकरण असें आहे. नुकतेंच पाहिल्याप्रमाणें पहिल्या सहा तासांत मजूर जें काम करतो, त्यांत कच्चा माल, यंत्रें हत्यारें वगैरे उत्पादनसाहित्य व श्रमशक्ति यांचा व्यय होतो आणि तितक्याचें तितकें मूल्य उत्पन्न मालांत अवतरतें. पण दुसऱ्या ६ तासांतील कामांत कच्चा माल व उत्पादनसाहित्य यांचा व्यय होऊन त्याचें मूल्य उत्पन्न मालांत अवतरत असलें तरी मजूराची जी श्रमशक्ति या दुसऱ्या सहा तासांत खपते तिचें मूल्य पहिल्या ६ तासांत वसूल झालें असून दुसऱ्या ६ तासांतील श्रमशक्तीच्या खपानें मिळणारें मूल्य भांडवलदाराला अधिक

मिळतें. कच्चा माल व उत्पादनसाहित्य यांच्या खपानें मालांत जें मूल्य उत्पन्न होतें तें जितक्याचें तितकें असतें म्हणून मार्क्स त्याला 'स्थिर भांडवल' ( कॉन्स्टंट कॅपिट्ल ) म्हणतो. उलट श्रमशक्तीच्या खपानें उत्पन्न होणारें मूल्य श्रमशक्तीच्या मूल्याहून अधिक असतें म्हणून त्यास बदलणारें म्हणजे 'चर भांडवल' ( व्हेरिएबल कॅपिट्ल ) असें मार्क्स म्हणतो. वाढावा अथवा वरकड मूल्य जें मिळतें तें या चर भांडवलापासून मिळतें. उत्पादनांतील स्थिर भांडवलापासून त्याच्या खपाइतकेंच मूल्य परत मिळेल, अधिक मिळणार नाहीं. एकाच धंद्याच्या पोटशाखा अनेक असूं शकतात. उदाहरणार्थ कापूस पिंजणें, सूत काढणें, विणणें, कापड रंगविणें वगैरे, या कापडगिरणीच्या शाखा होत. या विविध शाखांत स्थिर व चर भांडवलाचें प्रमाण वेगवेगळें असूं शकतें. एका खात्यांत स्थिर भांडवल जास्त असेल तर दुसऱ्या खात्यांत चर भांडवल जास्त असेल. चर भांडवल—म्हणजेच कामगार. हेच वाढावा अथवा नफा उत्पन्न करतात. अर्थात् ज्या खात्यांत कामगार जास्ती त्याच खात्यांत नफाही जास्त पडला पाहिजे.

## सरासरी कशी निघते

पण कारखानदार असा हिशेब करीत नाहीं. कारखान्याच्या निरनिराळ्या शाखा एकत्र करून तो हिशेब करतो. सर्व स्थिर व चर भांडवलाची बेरीज करून तो सरासरी काढतो. त्यावर सरासरी द. शे. अमुक नफा असें मानतो. जी गोष्ट एका धंद्याच्या अनेक शाखांची तीच अनेक धंद्यांचीही असते. ज्या धंद्यांत इतर धंद्यांपेक्षां कामगार अधिक म्हणजे चर भांडवल अधिक आणि स्थिर भांडवल कमी त्या धंद्यांत इतर धंद्यांपेक्षां नफा अधिक झाला पाहिजे. कारण वाढावा हा चर भांडवलाकडूनच मिळतो. पण प्रत्यक्ष व्यवहारांत नफ्याचा दर धंद्यांत साधारणतः एकच असतो. याचें कारण काय? एकाच धंद्याच्या अनेक शाखांच्या भांडवलांची व नफ्यांची सरासरी त्या धंद्यांचा मालक काढीत असतो. पण अनेक धंद्यांचे अनेक मालक असून ते परस्परांपासून फुटून वागतात. मग त्यांच्या सर्वांच्या भांडवलांची आणि नफ्यांची सरासरी कोण काढतें? बाजारव्यवहार ही सरासरी काढतो. ज्या धंद्यांत कामगार ऊर्फ चर भांडवल अधिक त्या धंद्यांत वाढावा म्हणजे नफा अधिक पडतो खरा, पण उलट ज्या धंद्यांत नफा अधिक त्या धंद्यांत भांडवल अधिक

येऊं लागतें. भांडवलाचा पुरवठा मागणीहून अधिक वाढला कीं मजूरांचे मजूरीचे दर, कच्चया मालाची किंमत वगैरे सर्वांची वाढ होऊन मालाचें गिऱ्हाइक त्या मानानें कमी होतें व किंमती उतरतात. यामुळें नफ्याच्या दराला घट येऊं लागते म्हणून भांडवलाचा ओघ पुन्हा माघारा वळतो. अशा प्रकारें नफ्याचा दर नेहमीं थोडाफार निरनिराळ्या धंद्यांत खालींवर जात असला तरी त्याचा जो सरासरी दर म्हणून मध्यबिंदू असतो, त्याकडे नफ्याचा दर नेहमीं खेचला जात असतो. यामुळें एकाद्या धंद्यांत चर भांडवल कमी असलें अथवा दुसऱ्या एकाद्यांत चर भांडवल अधिक असलें तरी नफ्याच्या दरांत फारसा फरक कधींच रहात नाहीं. शेअर-बाजारांतील घडामोडी पाहिल्या असतां ही गोष्ट सहज लक्षांत येते.

## भांडवलशाही वर्गीकरण

आतां भांडवलाच्या वर्गीकरणाची क्लासिकल अर्थज्ञांची अथवा स्वतः भांडवलदारांची पद्धति पाहा. भांडवलदाराचे दृष्टीनें जिवंत मजूराची श्रमशक्ति आणि कच्चा माल, हत्यारें वगैरे उत्पादनसाहित्य यांत भांडवलप्रकार या दृष्टीनें कांहींच फरक नाहीं. पण कांहीं भांडवल रोजच्या रोज फस्त होवून नफ्यासह पुन्हा पुन्हा जन्मत असतें तर कांहीं भांडवल तसेंच पडून राहतें. कसें तें पाहा. १० हजारांचें यंत्र व इतर हत्यारें घेतलीं, १०० रुपयांचा कच्चा माल घेतला व १०० रुपये मजूरी ठरली. यांच्या साहाय्यानें एक दिवस काम केलें, तर १०० रुपयांचा कच्चा माल फस्त झाला. १०० रुपयांची श्रमशक्ति खलास झाली. पण १० हजारांचें सगळें यंत्र कांहीं खलास झालें नाहीं. त्यांत फक्त १०० रुपयांची झीज एका दिवसांत झाली असें समजूं. आतां पहिल्या दिवशीं १०० रुपयांचा कच्चा माल व १०० रुपयांची श्रमशक्ति खरेदी केली व एक दिवसांत संपविली. पण यंत्र मात्र १०० रुपयांचें झिजलें तरी सगळें १० हजारांचें यंत्र पहिल्याच दिवशीं खरेदी करून त्यांतलें १० हजार हें भांडवल १०० दिवस अडवून ठेवावें लागलें. कच्चा माल श्रमशक्ति मात्र रोजच्या रोज थोडथोडें भांडवल गुंतवून व त्याच्या नफ्यांतून नवें भांडवल उभारून खरेदी करतां आली. यंत्रें हत्यारें वगैरे उत्पादनसाहित्य हिशेबाच्या दृष्टीनें रोज थोडथोडें झिजतें. पण एकदमच खरेदी करावें लागतें व पुढें एकदमच निकामी होतें. म्हणून भांड-

वलदार या भांडवलाला कायम भांडवल ( फिक्स्ड् कॅपिट्ल ) म्हणतात. आणि रोजच्या रोज थोडथोडें भांडवल आणून, वापरून नफा मिळवून त्यांतून पुन्हा भांडवल उभारून धंद्याला जें वापरतां येतें तें कच्चा माल व श्रमशक्ति हें भांडवल फिरतें भांडवल ( सर्क्युलेटिंग कॅपिट्ल ) असें भांडवलदार समजतात.

## भ्रमाचा परिणाम

वरकडमूल्य हें श्रमशक्तीपासूनच निर्माण होतें ही गोष्ट मार्क्सच्या वर्गीकरणानें स्पष्ट होतें. पण भांडवलदाराच्या वर्गीकरणानें श्रमशक्ति व कच्चा माल यांची भेसळ केली जाऊन वाढावा ऊर्फ नफा हा श्रमशक्तींतूनच निर्माण होतो ही गोष्ट भांडवलदारांच्या व कामगाराच्याही लक्षांत येत नाहीं. नफ्याचा दर बाजारव्यवहाराच्या ओढाताणींत सारखा होत असल्यामुळें ज्या धंद्यांत चरभांडवल ऊर्फ कामगार अधिक त्या धंद्यांत अधिक नफा मिळूं शकतो हें सत्यही झांकलें जातें. तसेंच यंत्रसामुग्रींत व उत्पादनपद्धतींत सुधारणा केल्या असतां कामगारांची उत्पादनशक्ति वाढणें शक्य होवून उत्पादनखर्च कमी करता येतो, म्हणजे मजूरांची संख्या कमी करून नफा अधिक मिळणें शक्य होतें, यामुळेंही नफा हा भांडवलामुळें मिळतो असें वाटून कामगार हेच वाढावा उत्पन्न करतात ही गोष्ट भांडवलदारांच्या व कामगारांच्या लक्षांत येत नाहीं. नफा हा भांडवलामुळें म्हणजे भांडवलदाराच्यामुळेंच मिळतो असें भांडवलदाराला व कामगारालाही वाटतें. पण भांडवलदाराचा हा भ्रम त्याला फायदेशीर असतो. उलट कामगाराला हा भ्रम ‘ आपली पिळणूक होत आहे, आपण फुकट राबून भांडवलदाराला वाढावा देत आहों ’ ही सत्य परिस्थिति कळूं देत नाहीं; यामुळें भांडवलशाहीशीं लढण्याचें त्याचें कर्तव्य त्याच्या ध्यानांत न येवून आपण भाकर-तुकड्यासाठीं भांडवलदाराचें गुलाम झालें पाहिजे अशीच त्याची भावना होते.

नफा आणि वाढावा यांतील फरक येथें समजून येईल. वाढावा म्हणजे वरकडमूल्य ( सर्प्लस व्हॅल्यू ) हें श्रमशक्तीपासूनच मिळतें असें मार्क्सनेंच प्रथम सिद्ध केलें. मार्क्स हा वाढाव्याचें प्रमाण अर्थात्‌च फक्त श्रमशक्तीशीं लावतो. एकूण १०० रुपये भांडवलांत ४० रुपयांचीं यंत्रें वगैरे, २० रुपये कच्चा माल, ४० रुपये मजूरी आणि त्यावर ४० रुपये वाढावा आला, तर मार्क्स हा फक्त ४० रुपये मजूरीवर ४० रु. वाढावा आला असें मानून वाढाव्याचा दर १०० टक्के

आहे असें म्हणतो. भांडवलदार हा असें करीत नाहीं. ४० रुपये वाढाव्यालाच तो नफा म्हणतो. आणि नफ्याचा दर ४० टक्के आहे असें मानतो. या नफ्यांतून भांडवलाचें व्याज व जमिनीचा खण्ड भांडवलदार वजा करतो व बाकी राहील त्यास निवळ नफा असें मानतो.

## दोन भिन्न दृष्टिकोण

भांडवलाच्या या दोन वर्गीकरणांतील फरकाच्या बुडाशीं दोन भिन्न दृष्टिकोण आहेत. एकूण उत्पादनखर्च कमी करून नफा वाढवावा एवढ्याच दृष्टीनें भांडवलदार भांडवली व्यवहाराकडे पाहतो तर वाढावा उर्फ नफा हा केवळ कामगाराकडून निर्माण होत असतां तो भांडवलदारच लुबाडतात ही छपलेली गोष्ट उजेडांत आणणें हा मार्क्सचा हेतु आहे.

## कामाच्या वेळांत वाढ

( प्रकरण ८, ९, १० ) चर भांडवलामुळें म्हणजे श्रमशक्तीमुळें भांडवलदाराला जो वाढावा ऊर्फ नफा मिळतो तो भांडवलदाराला अगदींच मोफत मिळत असून तो जास्तीत जास्त मिळावा यासाठीं तो अनेक युक्त्या योजीत असतो. त्यांतली पहिली युक्ति म्हणजे कामाचे दररोजचे तास वाढविणें ही होय. कामगारानें ६ तास काम केलें तर कच्चा माल, यंत्रें, हत्यारें वगैरे उत्पादनसाहित्य व श्रमशक्ति यांचें खपलेलें पुरेपूर मूल्य भरून निघतें. यानंतर आणखी चार तास काम केल्यावर कच्चा माल नवा लागतो, यंत्रें हत्यारें वगैरे यांची नवी झीज होते व तेवढें मूल्य या ४ तासांच्या मालांत अवतरते. पण या चार तासांत नवी श्रमशक्ति ( कारखानदाराच्या दृष्टीनें ) खर्च होत नाहीं. म्हणजे पहिल्या ६ तासांच्या कामांत मजुरांच्या मजूरीचें मूल्य भरून निघालें असल्यानें पुढील चार तासांत जी श्रमशक्ति खर्च होते तीपासून मिळणारें मूल्य कारखानदाराला मोफत मिळतें. या चार तासाऐवजीं कामगाराला ५ तास राबविलें अथवा ६ तास राबविलें म्हणजे एकूण कामाचे तास १० ऐवजीं ११ अथवा १२ केले तरी श्रमशक्तीचें मूल्य म्हणजे मजूरी न वाढवितां वाढावा अधिक पदरांत पाडून घेता येतो. कारण श्रमशक्तीचें मूल्य म्हणजे मजूरी ही कामाच्या तासावर अवलंबून नसून मजुरांचा पुरवठा मागणीपेक्षां अधिक असला म्हणजे जीवनासाठीं किमान

मूल्य लागेल तितकीच मजूरी द्यावी लागते. मग कामाचे तास कमी असोत अथवा अधिक असोत. कामगाराकडून अगदीं घड्याळाच्या काट्याबरहुकुम सक्त काम करून घेणें हा वाढावा उर्फ नफा वाढविण्याचाच आणखी एक प्रकार आहे. मजुरीचे दर जीवनावश्यक मूल्याहूनही खालीं नेऊन केव्हां केव्हां वाढावा वाढविण्यांत येतो. पण कॅपिट्लमधल्या चर्चेत मार्क्सनें सारख्यास सारखा विनिमय होतो हें भांडवलशाहीचें तत्त्व अमलांत आहे असें गृहीत धरलें आहे.

## उत्पादनशक्तीची वाढ

वाढावा वाढविण्याचा आणखी एक प्रकार म्हणजे कामगाराची उत्पादनशक्ति वाढविणें हा. यांत्रिक अथवा शास्त्रीय शोधांनीं पूर्वीइतकीच श्रमशक्ति खर्च करून कामगार जास्त मूल्य उत्पन्न करूं शकतो. यामुळें कामगाराच्या मजूरीइतकें मूल्य निर्माण होण्यास पूर्वी ६ तास लागत असले तर आतां ५ तास लागतात आणि अर्थात् एकूण कामाचे तास १० असले तर वाढावा ४ तासांचा मिळण्याऐवजीं आतां ५ तासांचा मिळतो. शिवाय कामगाराची उत्पादनशक्ति वाढल्यामुळें दर ताशीं त्याचें नवें उत्पादनसामर्थ्य अधिक मूल्य निर्माण करीत असतें. येथेंही हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं कामगाराचें उत्पादनसामर्थ्य वाढल्यानें त्याची मजूरी वाढेलच असें नाहीं. कारण वर म्हटल्याप्रमाणें कामगारांची मजूरी त्यांच्या मागणीपुरवठ्याच्या परिस्थितीअनुसार ठरत असते.

## वाढाव्याचे प्रकार

कामाचे तास नुसते वाढवून वाढाव्याची जी वाढ करण्यांत येते तिला मार्क्स स्वतंत्र वाढावा ( ॲब्सोल्यूट सर्प्लस व्हॅल्यू ) असें नांव देतो. कारण दहा तासानंतर जो अकरावा व बारावा तास वाढविण्यांत आला त्यांत निर्माण झालेला वाढावा पूर्वीच्या वाढाव्याहून अथवा वेळाहून पूर्ण पृथक् असतो. कामगाराची श्रमशक्ति वाढवून, पण कामाची वेळ न वाढविता, कारखानदार जो वाढावा वाढवितात त्याला मार्क्स सापेक्ष्य वाढावा ( रिलेटिव्ह सर्प्लस व्हॅल्यू ) असें म्हणतो. कारण यांत कामाचे तास न वाढविता वेळाच्या मानानें मूल्य मात्र वाढत असतें. कामगाराचें उत्पादनसामर्थ्य वाढविण्यामुळें मजूरीचे दरही उतरूं शकतात. कारण चरितार्थसंपत्ति ज्या उद्योगधंद्यांत निर्माण होते त्यांतील कामगारांचें उत्पादनसामर्थ्य वाढल्यास त्या मालांचे बाजारभाव उतरतात.

अर्थात् जीवनावश्यक जिनसांच्या किंमती उतरून त्यामुळें मजूरीचे दरही उतरतात. यावरून जास्तींत जास्त विनिमयमूल्य व नफा मिळविण्यास टपलेले कारखानदार माल स्वस्त करण्यास कां उत्सुक असतात हें यावरून लक्षांत येईल. कामगाराच्या श्रमशक्तीचें मूल्य म्हणजे त्यास देण्यांत येणाऱ्या मजूरीचें मूल्य वसूल करण्यास लागणारा वेळ शक्य तो कमी केला म्हणजे उरलेला वेळ आपोआपच कारखानदाराला वाढावा मिळविण्यास वापरता येतो ही कारखानदाराची दृष्टि असते.

## प्रमाण वाढलें, प्रकार बदलला

कामगाराच्या उत्पादनशक्तीची वाढ हें जें सापेक्ष्य वाढावा वाढविण्याचें प्रमुख साधन तें भांडवलशाही उत्पादनशक्तीच्या अंगभूतच आहे. भांडवलदार उत्पादनव्यवसायांत उतरला त्यावेळीं जे चालू हस्तव्यवसाय होते तेच त्यास हातीं घ्यावे लागले. फरक एवढाच झाला कीं घरोघर आपआपल्या मालकीच्या मालांनीं व हत्यारांनीं धंदा करून आपला माल आपणच विकणारे कामगार आतां भांडवलदाराच्या श्रमगृहांत येवून भांडवलदारीच्या मालकीच्या कच्च्या मालांनीं व हत्यारांनीं काम करूं लागले व उत्पन्न होणारा माल कारखानदाराच्या हवालीं करून आपली मजूरी पैशांत घेऊन घरीं जाऊं लागले. मूळच्या एकेकट्या कामगाराच्या उत्पादनाचे जागीं आतां अनेक कामगार एकत्र उत्पादन करूं लागले हा उत्पादनपद्धतींत होणारा फरक आरंभीं फक्त संख्यात्मक म्हणजे प्रमाणात्मक फरक होता. तरी पण हळूहळू या प्रमाणाच्या फरकास प्रकाराच्या फरकाचें स्वरूप येवूं लागतें.

मार्क्सच्या एकंदर विचारसरणींत व कॅपिटलमधील विवेचनांत त्यानें जी हेगेलची विरोधविकासपद्धति मुख्यत्वें वापरली आहे तिचें एक ठळक स्वरूप येथें दिसून येतें. पाणी प्रथम थंड असतें, त्याला उष्णता लागली कीं तें तापूं लागतें. उष्णतेचें प्रमाण एकसारखें वाढतें ठेवलें कीं पाणी अधिकाधिक तापत जातें. यांत पाण्याच्या उष्णतेचें फक्त प्रमाण वाढत जातें. पण तें वाढतां वाढतां कांहीं एका बिंदूपर्यंत उष्णता वाढली कीं पाण्याचें 'पाणीपण' नाहींसें होवून त्याची वाफ होऊं लागते. हा फरक नुसता प्रमाणात्मक नसून प्रकारात्मक असतो. प्रथम कोणत्याही घटनेचें फक्त प्रमाण वाढत जातें व तें वाढता वाढता त्या घटनेचा

प्रकारच बदलत असतो हा हेगेलच्या विरोधविकासवादांतला एक महत्त्वाचा उपसिद्धांत असून तो मार्क्सनें येथें उपयोजिला आहे. प्रथम एकेकटे हस्तव्यवसायी आपापल्या घरीं राबत होते. त्यांना कारखानदारानें आपल्या श्रमगृहांत एकत्र आणलें. एकेकट्याचें उत्पादन अनेकांचें केलें. हा फरक प्रथम फक्त प्रमाणात्मक झाला. पण तेवढ्यानेंही कामगारांची उत्पादनशक्ति वाढूं लागली. इमारती, हत्यारें वगैरे समाईकपणें वापरता येऊं लागून उत्पादनखर्च कामगारांच्या संख्येच्या प्रमाणांत कमी लागू लागला. होता होता सामुदायिक शक्ति ही एक नवीन शक्ति निर्माण होऊन मूळचा प्रमाणांतला फरक प्रकारात्मक होऊन बसला. अनेक व्यक्तींच्या सहकार्याची शक्ति ही ती नवी शक्ति होय. हें सहकार्य घडवून आणणाऱ्या निरीक्षक मजूरांची गरज निर्माण झाल्यामुळें मजूरांकडून कामें करून घेणारा हवालदार हा एक मजूरांचा नवाच प्रकार निर्माण झाला.

## वैयक्तिकांतून सामुदायिकांत

मजूरांच्या सहकार्यानें जुन्या हस्तव्यवसायांतच धनोत्पादन करणें हें भांडवलशाही उत्पादनाचें आरंभस्वरूप होय. या सहकार्यांतच श्रमविभागपद्धतिही रूढ झाली. तिचे आरंभीं दोन प्रकार दिसून आले. एकादी 'व्हिक्टोरिआ' करायची झाली तर पूर्वी सुतार, लोहार, चांभार, रंगारी वगैरेंचे श्रम उपयोगी पडत असत. पण हे कारागीर आपापल्या घरीं माल नेऊन हीं कामें करीत. भांडवलदारानें या सर्व पृथक् धंदेवाल्यांना एका श्रमगृहांत आणून अनेक लहान धंद्यांचा गाडी तयार करणें हा एक मोठा धंदा बनविला. तसेंच कागद, टाइप, सुया वगैरे माल आपापल्या घरीं बसून करणाऱ्या कारागिरांना एकत्र आणून त्यांच्या एकेका धंद्याचे अनेक विभाग केले व तेवढे तेवढे एकेका कारागिराकडे देऊन श्रमविभागानें धंदा सुरू केला. यामुळें कारागिरांची उत्पादनशक्ति पुष्कळ वाढली. हत्यारांत पुष्कळ सुधारणा झाली आणि वैयक्तिक उत्पादनाहून सर्वांशीं भिन्न असा सामुदायिक उत्पादन हा नवाच प्रकार सुरू झाला.

भोग्य धनाचें सामुदायिक उत्पादन सुरू होऊन त्याला नवी व सुधारलेलीं हत्यारें लागू लागलीं तेव्हां हत्यारांचेही सामुदायिक कारखाने सुरू झाले आणि हत्यारांची सुधारणा होत होत त्याच सामुदायिक कारखान्यांत यंत्रेंही निर्माण

होवूं लागलीं. येथपासून कारखानदारी व्यवसायाचें सर्व स्वरूप बदललें. जुनीं हत्यारें होतीं तेव्हां कामगारांची लहर व कसब यांवर उत्पादन अवलंबून असे. कामगार कारखानदाराचा नोकर होता तरी प्रत्यक्ष काम करतांना तो हत्याराचा मालक होता. पण यंत्रांचा उदय झाल्यापासून कारखानदाराप्रमाणें तो यंत्राचाही नोकर–गुलाम झाला.

## हत्यार व यंत्र

हत्यार हें साधें यंत्र व यंत्र हें भानगडीचें हत्यार अशी व्याख्या गणीती व यंत्रज्ञ करतात. या दोहोंत फक्त प्रमाणाचाच फरक आहे, असें म्हणण्याचा त्यांचा आशय असतो. पण या दोहोंतील फरक आर्थिक व सामाजिक दृष्टीनें पाहिला तर नुसता प्रमाणाचा नसून प्रकाराचा आहे. एकेकटा कारागीर हत्याराच्या साहाय्यानें आपल्या लहरीअनुसार व कसबाअनुसार श्रम करीत होता तेथें आतां एका प्रचंड यंत्राचें एक लहानसें हत्यार स्वतःच बनून काम करणें कामगाराला भाग पडतें वगैरे यांत्रिक उत्पादनपद्धतीचीं ठळक वैशिष्ट्यें मार्क्सनें पृथक्करण-पूर्वक व सुलभतेनें सांगितलीं आहेत.

## यंत्रामुळें श्रमवेळाची वाढ

( प्रकरण १० ) यांत्रिक उत्पादनाचे आणखी कांहीं परिणाम या प्रकरणांत आले आहेत. स्त्रियांना व मुलांना यंत्रावर राबवून घेतां येतें. यामुळें कामगारांची संख्या वाढून मजूरीचे दर उतरणें शक्य होतें. स्त्रिया व मुलें कमी मजूरीवर राबवितां येतात. कुटुंबसंस्थेची व भावी पिढीची धुळधाण होतें. यांत्रिक उत्पादन सुरू झालें म्हणजे कामाचे तास वाढविणें अत्यवश्यच होतें. यंत्र जितकें जास्त वेळ राबत राहील तितकें लवकर त्याचें भांडवल वसूल होतें. एक यंत्र निर्माण होऊन काम करूं लागतें तों पाठोपाठ पुढील यंत्रांच्या उत्पादनाचा खर्च कमी होत असतो, म्हणजे यंत्रांच्या किंमती उतरतात अथवा अधिक चांगलीं यंत्रें निर्माण होऊन मुळचें यंत्र महाग पडूं लागतें. म्हणून एकेक यंत्र जितकें लवकर वापरून खलास करतां येईल तेवढी उत्पादनखर्चांत काटकसर होते. अर्थात् यंत्र जास्तींत जास्त वेळ राबविण्यासाठीं कामाचे तास वाढविणें अवश्य असतें. कामावरील कामगारांची संख्या वाढविण्यापेक्षां मूळ असलेल्या कामगारांचे कामाचे तास वाढविणें हेंच फायदेशीर असते. कामगारांच्या मजूरीचा

खर्च कमी करूनही उत्पादन वाढवितां यावें यासाठींही यंत्रें वापरण्यांत येतात. यामुळें कामगारांची बेकारी वाढते.

## यंत्राचा विपरीत परिणाम

यांत्रिक उत्पादनाचे बाबतींत जी एक विपरीत परिस्थिति येथें दिसून येते तिजकडे मार्क्सनें अभ्यासकांचें लक्ष विशेषपणें वेधलें आहे. यंत्रानें कामगाराची उत्पादनशक्ति वाढते व कामाचा वेळ कमी करतां येतो. पण प्रत्यक्ष फळ त्याचें असें येत आहे कीं रोजगारावर असलेल्या कामगारांना अधिक वेळ राबावें लागत आहे. आणि बऱ्याच जणांना बेकारीच्या खाईंत पडावें लागत आहे. याचें कारण यंत्रें हीं कामगाराचें काम करण्यासाठीं राबविण्यांत येत नसून मालकांच्या नफ्यासाठीं राबविण्यांत येतात. बरेचसे कामगार बेकार करता आले म्हणजे कामगारांचा मजूरीचा दर उतरवून भांडवलदारांस नफा अधिक मिळवितां येतो.

## यंत्र, दुःखवाढ आणि अर्थशास्त्रज्ञ

कामाचे तास भरमसाट वाढविण्याचा प्रकार इंग्लंडांत सुरू झाला तेव्हां समाजास चीड आली आणि सरकारनें कामाच्या तासांच्या मर्यादा ठरवून दिल्या. तेव्हां कारखानदारांनीं काम करण्याची तीव्रता व वक्तशीरपणा वाढवून तेवढ्याच वेळांत अधिक मूल्य निर्माण करण्याची तजवीज केली. भांडवलशाहीची सुरवात हस्तव्यवसायांनींच झाली. त्या हस्तव्यवसायांत भांडवलदारांनीं श्रमविभागपद्धति सुरू केली. आरंभीं मजूरांची संख्या पुरेशी नसे म्हणून श्रमविभागाचा उत्पादन वाढविण्यास उपयोग झाला. वसाहतींचे बाजार उत्पन्न न झाल्यानें मालास मागणी उत्पन्न झाली होती. पण शहरांतून जे जुने कारागीरसंघ होते त्यांची संख्या व त्यांतील कारागिरांची वैयक्तिक उत्पादनशक्ति मर्यादित असल्यानें भांडवलदारांनीं श्रमविभागपद्धतीचा अवलंब करून उत्पादन वाढविलें. वास्तवीक यंत्रांचा उपयोग होऊं लागल्यापासून उत्पादन आणखीही खूप वाढलें. पण आतां या उत्पादनशक्तीच्या वाढीचा परिणाम उलट होऊं लागला. कामगारांची जागा यंत्रानें घेतली; कामगार बेकार होवूं लागले. ज्या एका धंद्यांत यंत्रांचा हळूहळू प्रवेश होई त्या धंद्यांत इतर हस्तव्यवसायी

कारखानदारांना यांत्रिक धंद्याशीं चढाओढ करावी लागल्यानें मजुरांची निपटून पिळणूक होई. जेथें यंत्रांचा धंद्यांच्या क्षेत्रांत जलद प्रवेश होई तेथें एकदमच कामगारांवर बेकारीचे कडे कोसळत. उत्पादनाचे कामीं यंत्रांचा उपयोग होवूं लागल्यानंतर माणसांचीं दुःखें कमी होण्याऐवजीं त्यांची वाढ होते. यामुळें भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांचें तोंड आंबट होतें. पण त्यांच्या मतें हा दोष यंत्रांचा नसून भांडवलशाही पद्धतीनें त्या यंत्रांचा उपयोग होतो त्याचा हा दुष्परिणाम आहे. या अर्थशास्त्रज्ञांची मोठी चूक होते ती ही कीं यंत्रांचा उपयोग भांडवलशाहीवांचून होवूंच शकणार नाहीं असें त्यांना वाटतें. त्यामुळें यंत्रानें वाढणारीं दुःखें ही यंत्रामुळें वाढत नसून भांडवलशाहीमुळें वाढतात असें अगदीं शास्त्रीय पृथक्करण त्यांनीं केलें असलें तरी भांडवलशाहीवांचून यंत्रांचा उपयोग होवूंच शकत नाहीं असें त्यांचें मत असल्यामुळें कामगारवर्गावर कोसळणाऱ्या दुःखाबाबत कपाळाला हात लावून बसण्यावांचून ते कांहींच करूं शकत नाहींत.

## यंत्रानें कोसळणारी बेकारी

यंत्रांनीं एकेका धंद्यांतील रोजगारी वाढूं शकते असा एक युक्तिवाद असतो. समजा कांहीं कोष्टी १ लक्ष यार्ड कापड विणतात. त्या धंद्यांत यंत्रांचा प्रवेश झाला यामुळें कांहीं कामगार कमी झाले. पण कापडाचें उत्पादन ४ लक्ष यार्ड झालें. यामुळें कापूस, कोळसा, यंत्रसामुग्री या सर्वांची गरज चौपट लागू लागली व त्यांच्या सर्व उत्पादनक्षेत्रांत अजून यंत्र शिरलें नसल्यानें कामगारांची गरजही अधिक वाढली. पण हेंही चित्र इतकें सुंदर नाहीं. एका क्षेत्रांत यंत्र शिरलें म्हणजे त्यांतून हुसकलेल्या कामगारांना बाहेरचीं क्षेत्रें दिसतात खरीं पण श्रमविभागपद्धतीमुळें एकाच क्षेत्रांत काम करण्यास पात्र असलेले कामगार इतर क्षेत्रांत निकामी ठरून बेकारच राहतात. शिवाय जे कामगार विशेष कष्ट करून नवीन धंदा शिकतात ते या नव्या क्षेत्रांत शिरतात न शिरतात तोंच त्या क्षेत्रांत यंत्र घुसून पुन्हां त्यांची दाणादाण व हकालपट्टी सुरू होते. इंग्लंडांत हातरहाटाऐवजीं सुताच्या गिरण्या निघाल्या तेव्हां सूत एकदम पुष्कळ उत्पन्न होऊन तें स्वस्त झालें. यामुळें हातमागाचा धंदा खूप भरभराटला. पण पाठोपाठ कापडगिरण्या निघतांच ८ लक्ष कोष्टी कामगार एकदम बेकार झाले.

एकादा पाण्याचा मोठा लोंढा अथवा वन्य हत्तींचा एकादा मोठा कळप माणसांच्या मागें लागावा व त्यानें क्षणभरही त्यांना कोठें थारा घेऊं देऊं नये अशी अवस्था या यंत्रामुळें माणसांची होत असते. भांडवलशाहीनें कालवे, गोद्या, बोगदे, पूल, मोठमोठ्या इमारती यांची खूप वाढ केल्यामुळें मानवजातीची सोय झाली आहे खरी पण मानवजातीची सोय करणें हा भांडवलशाहीचा हेतु कधींच नव्हता. यंत्रें वगैरे धनोत्पादनसाधनें व कापड वगैरे भोग्य धन यांच्या उत्पादनाच्या क्षेत्रांत यंत्रें शिरल्यामुळें त्यांतील पुष्कळ कामगार बेकार झाले. हे कामगार मग कालवे, गोद्या, पूल, इमारती वगैरे कामास स्वस्त मजूरीनें मिळूं लागले. यंत्रें व भोग्य धन याची मागणी यंत्रांच्या वेगानें वाढत नव्हती. अर्थात् त्या क्षेत्रांत अधिक भांडवल गुंतविणें फायद्याचें नव्हतें. म्हणून कालवे, गोद्या, बोगदे वगैरे दीर्घकालपर्यंत थोडा थोडा नफा देणाऱ्या धंद्यांत भांडवल घातलें गेलें. यंत्रानें एका बाजूस कामगार बेकार होत असतां धनिकांची संख्याही वाढत असते. याचा परिणाम असा होतो कीं, बेकार होणाऱ्या मजूरांना धनिकांकडे घरगुती नोकऱ्या मिळतात. या नोकरांना राबवावें कसें याची कांहींच शिस्त नसते. कारण कारखाना कायद्यांनीं कारखाना कामगारांना संरक्षण मिळत असलें तरी घरगुती कामगारांना संरक्षण देण्यासारखे कायदे करणें शक्यच होत नाहीं. यामुळें घरगुती नोकरी हा गुलामगिरीचा एक नवाच प्रकार भांडवशाहीच्या यंत्रयुगांत जन्मास येतो.

## नफ्याच्या दराची घट

(प्रकरण ११) यंत्रांची वाढ जसजशी होत जाते तसतसा नफ्याचा दर घटत जात असतो, हा 'कॅपिट्ल'मध्यें मार्क्सनें सांगितलेला महत्त्वाचा सिद्धांत होय. याची उपपत्ति अशी; बाजार काबीज करण्यासाठीं चालणाऱ्या चढाओढींत माल स्वस्त करावा लागतो. यासाठीं तेवढ्याच मजूरींत मजूरांकडून अधिक माल उत्पन्न करणें अवश्य असतें. म्हणून मजूरांची उत्पादनशक्ति वाढवावी लागते. त्याचसाठीं यंत्रांचा उपयोग होतो. उत्तरोत्तर अधिकाधिक सुधारलेलीं यंत्रें पुढें येतात. या नव्या यंत्राचा उत्पादनखर्च पूर्वीच्या यंत्रापेक्षा अथवा हत्यारापेक्षां अधिक असल्यामुळें स्थिर भांडवलाची वाढ होते. त्या मानानें अर्थात्

चरभांडवल म्हणजे कामगारांची मजूरी कमी असते. कारण एरवी कोणी यंत्रांची वाढ करणारच नाहीं. यंत्रांनें उत्पादन वाढते व त्यासाठीं कच्चा माल वगैरे स्थिरभांडवलहि वाढतें आणि त्या मानानें चरभांडवल कांहीं वाढत नाहीं. पण वाढावा निर्माण होतो तो चरभांडवलानें होतो हें मागें आपण पाहिलें आहे. अर्थात् यंत्रांच्या वाढीबरोबर एकूण भांडवलाच्या मानानें चरभांडवल कमी कमी होत जाते व म्हणून नफ्याचा दरही कमी होत जातो. मार्क्सनें हें सिद्ध करण्यासाठीं दिलेलीं उदाहरणें समर्पक आहेत.

वाढाव्याचा दर १००% असून चरभांडवल १०० असलें व स्थिरभांडवल ५० असलें तर एकूण भांडवल ( स्थि. ५०+च. १०० ) १५० व नफा १०० येईल. म्हणजे नफ्याचा दर ६६⅔% येईल. पण चरभांडवल १०० वाढाव्याचा दर १०० व स्थिरभांडवल ४०० असेल तर एकूण भांडवल ( स्थि. ४००+ च. १०० ) ५०० होईल व वाढाव्याचा दर १०० असल्यामुळें नफ्याचा दर २० टक्के होईल.

## नफा वाढविण्याचें प्रयत्न

येथें वाढाव्याचा दर कायम आहे असें मार्क्सनें उदाहरणादाखल गृहीत धरलें आहे. पण प्रत्यक्ष व्यवहारांत यंत्रांचा वगैरे उपयोग कारखानदार हे मुख्यतः कामगारांची उत्पादनशक्ति वाढविण्यासाठीं म्हणजे वाढाव्याचा दर वाढविण्यासाठीं करीत असतात. म्हणजे एका बाजूनें कामगारांची संख्या कमी करीत राहिल्यानें वाढाव्याचा दर कमी कमी होत जाण्याची प्रवृत्ति उत्पन्न होत जाते तर दुसरीकडून कामगारांची उत्पादनशक्ति वाढवून वाढाव्याचें दरमाणशीं प्रमाण वाढविण्याचा प्रयत्न केला जातो. वेगळ्या भाषेंत सांगायचें म्हणजे कामगारांचे मालकासाठीं वाढावा निर्माण करण्याचे एकूण तास ( कामगार-संख्या कमी झाल्यामुळें ) कमी होत जातात तर उलट त्याच तासांत कामगाराचें उत्पादनसामर्थ्य वाढविण्यांत येत असतें. या ओढाताणींत नफ्याचा दर अखेर खालींखालींच खेचला जाणार असें मार्क्सचें मत दिसतें. पण हा नफा अखेर शून्य होऊन भांडवलशाही ठार होणारच किंवा कसे यासंबंधानें मार्क्सनें निर्णायक मत दिलेलें नाहीं असें मॉरिस डॉब याचें मत आहे. डॉब म्हणतो मार्क्स हा भांडवलशाहीचें ज्योतिष वर्तवीत नसून भांडवलशाहीचा गतिसिद्धांत ठरवीत

होता. या दृष्टीनें त्यानें यंत्रांच्या वाढीमुळें नफ्याचा दर उतरण्याकडे भांडवलशाहीची प्रवृत्ति होत जाते एवढेंच सांगणें पुरेंसें आहे. भांडवलदारवर्ग नफ्याचा हा दर परत वर खेचण्यासाठीं जे उपाय योजतात त्यांतलाच वाढाव्याचा दर वाढविणें हा एक उपाय होय. शिवाय भांडवलदार वाढाव्याच्या दरापेक्षांही वट्ट नफा वाढावा अशी खटपट करीत असतात. १०० ला ५ नफा येण्यापेक्षां २०० ला ९; ३०० ला १३; ५०० ला २० आला तरी त्यांना चालतें. कारण भांडवलाचा संचय एकदां होवूं लागला म्हणजे भांडवलाचा तुटवडा पडत नाहीं. वाढाव्याचेंच (म्हणजे फुकटांत) भांडवल मिळत असतें व अर्थात् त्याचा दर काय आहे यापेक्षा नफा एकूण किती आहे हा मुद्दा भांडवलदारास अधिक आकर्शक वाटतो. वाढाव्याच्या दराची वाढ हा जसा नफ्याच्या दराला वर खेचण्याचा एक उपाय असतो त्या प्रमाणें स्थिरभांडवलही अधिकाधिक स्वस्त होवून नफ्याच्या दराला वर खेचण्यास मदत करीत असते. पण या सर्वापेक्षां ऐन भांडवलाची वाढ करीत जाणें आणि नफ्याचा दर उतरत असतां एकूण नफ्याची वाढ करीत राहणें हेंच कार्य भांडवलदार मुख्यत: करीत असतात.

## मजूरच मजूरीचे उत्पादक

(प्रकरण १२ व १३) ऐन भांडवलाची वाढ करीत राहण्याचा हा जो भांडवलशाही प्रकार त्याला मार्क्स 'अक्युम्युलेशन' म्हणजे धनाचा संचय असें म्हणतो. हें धन साचतें तें कांहीं पावसासारखें आभाळांतून येत नाहीं. कामगार मालकासाठीं कांहीं तास फुकट काम करून जो वाढावा मालकास देत असतो तो वाढावा पुन:पुन: भांडवलांत भरतीस घालून भांडवलदार हा धनसंचय करीत असतो. कामगार हा कारखानदाराला केवळ वाढावाच मिळवून देतो असें नव्हे तर स्वतःच्या मजूरीचे जे पैसे तो कारखानदाराकडून घेतो, ते तो आठवड्याचे अथवा महिन्याचें काम कारखानदाराच्या पदरांत बांधल्यानंतर घेतो. त्यावेळीं व्यक्तिशः कारखानदार आपल्या कडोसीचे पैसे काढून कामगाराला मजूरी देतो खरी, पण तो कामगाराकडून त्याच्या श्रमाचे मूल्य आणि वाढावा इतका माल खरेदी करून त्यांतील श्रममूल्या इतकी मजूरी देतो व वाढावा फुकट लाटतो, इतकाच याचा अर्थ होय. भांडवलदार आपल्या कडोसीचे जे पैसे मजूरास देतो तेही पूर्वी मजूरांनी दिलेल्या वाढाव्यांतलेच पैसे असतात. याचा अर्थ भांडवल-

शाहीच्या आरंभी जेव्हां वाढावा नव्हता, तेव्हां भांडवलदाराच्या हातीं भांडवल-शाहीच्या आरंभीं कांहीं तरी रक्कम कच्चा माल व यंत्रसामुग्री खरेदी करण्यास आणि मजूरांचें श्रमफल घेतांना त्यास मजूरी देण्यासाठीं असली पाहिजे हें उघड आहे ही रक्कम कुठली ?

भांडवलदारानें पोटास चिमटा घेऊन काटकसर केली म्हणून त्याजजवळ प्रथम हें धन साचलें आणि म्हणून तो भांडवलदार झाला आणि उधळपट्टी करून अविचारानें वागणारे लोक मजूर झाले असें अर्थशास्त्रज्ञ सांगत असतात. वस्तु-स्थिति मुळींच अशी नाहीं. ज्या इंग्लंडांत प्रथम भांडवलशाही सुरू झाली तेथें भांडवलदारांच्याजवळ प्रथम धनसंचय आला तो सरळ सरळ त्यांनीं गरीब शेतकऱ्यांच्या जमिनी हिसकून घेतल्या व सरकारी कायद्यांनीं गरीबांना गुलामां-प्रमाणें राबविलें म्हणून आला हें मार्क्सनें पुढें ( प्रकरण १४ त ) दाखविलेंच आहे.

## एकदां कफल्लक, कायमचा कफल्लक

कारखानदार वाढाव्याचा उपयोग फिरून नव्या भांडवलासाठीं करो अथवा न करो भांडवलशाही उत्पादन म्हटलें कीं त्याचा एक विशिष्ट सामाजिक परिणाम होतोच होतो. कच्चा माल, हत्यारें वगैरेवर कारखानदाराची पूर्ण मालकी असल्यामुळें व कामगारांना चरितार्थाचें स्वतंत्र साधन कांहींच नसल्यामुळें कमींत कमी मजूरीवर कामगार राबतात व मिळणारी मजूरी नित्य खाऊन फस्त करून कफल्लक होत्साते कारखानदाराच्या दारांत श्रमशक्ति विकण्यास रोजच्या रोज येत राहतात. उलट कारखान्याचा मालक या नात्यानें उत्पन्न धन ( वाढाव्यासुद्धां ) भांडवलदाराच्या हातीं येतें. त्यांतला उपभोगास हवा तो भाग उपभोगासाठीं ठेवून बाकीच्याचें कारखानदार भांडवल बनवितो. यामुळें धनी आणि कफल्लक हा उत्पादनसंबंध समाजांत कायमचा राहतो. कफल्लकाला धनी होण्याची संधि फारशी कधींच मिळत नाहीं.

## ऐतिहासिक व नैतिक

कामगार स्वतःच्या उपयोगासाठीं जें धनसेवन करतो त्यापासून त्याला आनंद वगैरे होत असेलही. पण कारखानदाराच्या दृष्टीनें पाहता एंजिनाला तेल,

कोळसा घातला म्हणजे तें जसें कार्यक्षम राहतें त्याचप्रमाणें कामगारालाही अन्न-वस्त्ररूपी तेल, कोळसा घालावा लागतो एवढेंच त्यास वाटत असतें. म्हणजे कामगार कामावर असतां कारखानदारासाठीं राबत असतोच. पण कामावरून घरीं गेल्यावर तो जो धनोपभोग व सुखोपभोग घेत असतो त्यामुळेंही तो कारखानदारास हवी असणारी श्रमशक्ति ताजीतवानी करीत असतो व कारखानदारास हवी असणारी कामगारांची पुढील पिढीही तयार करीत असतो. मूठभर धनिक वर्गाची धनिकशाही टिकविण्यासाठीं जणूं कांहीं बहुसंख्य समाजाचें सगळें जीवित आहे अशी भांडवलशाही समाजाची रचना झालेली असते. वाढाव्यानें धनसंचय होऊं लागला म्हणजे कारखानदार हा वाढावा परत परत भांडवलांत घालतो. आरंभीचें भांडवल अगदीं कारखानदारानें स्वतःच्या श्रमानें मिळविलें असें धरून चाललें तरी भांडवलदाराला नित्य जो धनोपभोग घ्यावा लागतो त्यांत भांडवलाचें मूल्य कांहीं दिवसांनीं संपून गेलेलें असतें. आणि मग उपभोगाचें धनही वाढाव्यांतलेंच असतें व भांडवलही वाढाव्यांतलेंच असतें. कामगारांच्या फुकट मिळालेल्या श्रमावरच भांडवलदार व भांडवलशाही यांचें जीवन सर्वस्वी पोसलें जातें. भांडवलशाही व भांडवलदार यांना अशा प्रकारें नैतिक आधार कांहींही नाहीं ही गोष्ट येथें मार्क्सनें स्पष्ट केली आहे. पण भांडवलशाहीला नैतिक आधार कांहींही नसला तरी तिचें ऐतिहासिक समर्थन येथें ( १२ व्या प्रकरणाचे शेवटीं ) मार्क्सनें स्वतःच केलें आहे. भांडवलदारांनीं स्वतःच्या फायद्यासाठीं कां होईना समाजाची धनोत्पादनशक्ति वाढविली व त्यामुळेंच अधिक उच्च दर्जाची समाजरचना निर्माण करणें शक्य झालें आहे. माणसाचें धनोत्पादनसामर्थ्य वाढविणें हेंच भांडवलशाहीचें ऐतिहासिक कार्य असून तें जेव्हां पुरे होईल अथवा झालें असेल तेव्हां धनोत्पादनसाधनें भांडवलदारांच्या हातून काढून घेऊन सार्वजनिक मालकीचीं करावीं, म्हणजेच समाजवाद स्थापन करावा हें योग्य होय असें मार्क्स सुचवितो. भांडवलशाहीला माणसाचें सुख वाढविता आलें नाहीं अथवा समाजाला कोणताही नैतिक पाया देता आला नाहीं, फक्त समाजाची धनोत्पादनशक्ती भांडवलदारांनीं वाढविली, पण ज्या ऐतिहासिक कारणांनीं त्यांना हें काम करतां आलें त्याच कारणांनीं पुढें माणसाचें धनोत्पादनसामर्थ्य भांडवलशाहीच खच्ची करते म्हणून मानवसमाजाचा नाश करावयाचा नसेल तर एकदां धनोत्पादनसामर्थ्य वाढविण्याचें भांडवलशाहीचें

कार्य पुरें झालें म्हणजे तिचा नाशही वेळोवारीच केला पाहिजे असें मार्क्सचें म्हणणें आहे.

## भांडवलशाहीच्या जन्मकालचें मानवदुःख

( प्रकरणें १४–२० ) 'प्राथमिक धनसंचयाचें गुपित' या प्रकरणापासूनच्या ७ प्रकरणांत भांडवलशाहीच्या आरंभीं जो धनसंचय भांडवलदारांना लाभला तो त्यांच्या काटकसरीपासून लाभला नसून इंग्लंडांत जेथें भांडवलशाही सुरू झाली तेथें गरीबांना त्यांच्या जमिनींतून हुसकून लावून भांडवलदारांनीं जी लूट मिळविली तें भांडवलशाहीचें आरंभीचें भांडवल होतें. ही गोष्ट मार्क्सनें ब्रिटिश भांडवलशाहीच्या आरंभकाळाचा हृदयद्रावक इतिहास सांगून सिद्ध केली आहे. गरीब लोकांच्या हालअपेष्टांचें मार्क्सनें जें हृदय पिळवटून येथें वर्णन केलें आहे त्यावरून मार्क्सच्या जीवनकार्याची मुख्य प्रेरणा केवळ शास्त्रीय विचाराची अथवा पांडित्याची हौस ही नसून मानवजातीबद्दल त्याच्या अंतःकरणांत जी नैतिक कळकळ होती ती त्याच्या जीवनकार्याची प्रेरणा आहे असें दिसून येतें. त्यासाठींच जगाचा नुसता खुलासा त्यास नको असून तें त्याला पालटायचें होतें आणि हा पालट नुसत्या कळकळीनें, हळहळीनें, रडारडीनें होत नसून इतिहासक्रमाचे भौतिकसिद्धांत समजून घेतले पाहिजेत, त्यांची आपल्या इच्छेस अनुकूलता कोठें आहे ती पाहिली पाहिजे, समाजांतला कोणता वर्ग हें जग पालटण्याचें काम करण्यास समर्थ आहे हें पाहिलें पाहिजे आणि त्याप्रमाणें त्या वर्गास हें काम करण्यास प्रवृत्त केलें पाहिजे असें त्याचें म्हणणें आहे.

## ऐतिहासिक विकासक्रम

इतिहासक्रमाचा हा सिद्धांत सांगण्याच्या दृष्टीनें ' भांडवलशाही धनसंचयाची ऐतिहासिक प्रवृत्ति ' हें विसावें प्रकरण फार महत्त्वाचें आहे. त्यांत इतिहासाचा क्रम सांगतांना विरोधविकास पद्धतीची विचारसरणी मार्क्सनें फारच स्पष्टपणें अनुसरली आहे. भांडवलशाहीच्या आरंभीं गुलामगिरी व सरंजामशाही यांचा लोप होत आला असून मालकीचें शेत असलेले लहान मालक शेतकरी आणि मालकीचीं हत्यारें असलेले लहान मालक कारागीर हे धनोत्पादनाचा मोठा

आधार होते. गुलामगिरी व सरंजामशाही यांनीं समाजाच्या धनोत्पादनसामर्थ्याची कांहीं काळानें कुचंबणा सुरू केली तेव्हां त्या कवचांतून समाज बाहेर पडून वर सांगितल्याप्रमाणें खाजगी शेती व खाजगी कारागिरी हा धनोत्पादन प्रकार अमलांत आला. त्यामुळें व्यक्तींच्या सर्व शक्तींचा वापर होऊन त्यांचा विकास होत गेला. पण कांहीं काळानें या वैयक्तिक शक्तींचा विकास खुंटला. नव्या शक्ति व नव्या भावना निर्माण झाल्या. वैयक्तिक उत्पादनाच्या चौकटींत त्यांची प्रगति होईना. म्हणून ती चौकट भांडवलशाहीनें मोडून धनोत्पादन-साधनावर हजारों लोकांची असलेली खाजगी मालकी उध्वस्त केली आणि मूठभर भांडवलदारांची खाजगी मालकी निर्माण केली. हें करीत असतां भांडवलशाहीनें मानवजातीचें हाल हाल केलें. मोठा मासा लहान माशाला खातो त्याप्रमाणें क्रमाक्रमानें मोठ्या भांडवलदारांनीं लहान भांडवलदारांना खाऊन गट्ट केलें. सामुदायिक उत्पादन वाढत गेलें, माणसाची धनोत्पादन-शक्ति अफाट वाढली. आतां उत्पादन सामुदायिक आणि मालकी मात्र वैयक्तिक व तीही मूठभरांच्या हातीं, अशी परिस्थिति निर्माण झाली. होता होता या भांडवलशाहीच्या कवचांत माणसाची धनोत्पादनशक्ति आतां वाढेना. पण तिच्या मरणाची तयारी तिनेंच आपल्या पोटांत करून ठेविली आहे. कामगारवर्गाची पिळणूक होते. तीमुळें तो बंडास प्रवृत्त होतो. भांडवलशाहीबरोबरच कामगारांची संघटना होत असते व तोच शेवटीं तिचा संहार करण्यास समर्थ होऊन संहार करील असा मार्क्सचा सिद्धांत आहे. समाजव्यवस्थेचें कवच धनोत्पादन-सामर्थ्याच्या वाढीस उपयोगी पडत असतां तेंच पुढें त्याच वाढीस अडथळा करूं लागलें कीं तें फोडावें लागतें हाच विरोधविकासाचा सिद्धांत मार्क्सनें या २० व्या प्रकरणांत मांडून दाखविला आहे.

## पैशानें सामुदायिकपणा झाकला जातो

( प्रकरणें २१–२८ ) पैसा या आर्थिक प्रकाराची शास्त्रीय व ऐतिहासिक उपपत्ति मार्क्सनें जी मांडली ती बरीच क्लिष्ट असली तरी अर्थशास्त्रावरील सर्वसामान्य पुस्तकांत तरी अशीच क्लिष्टपणें मांडली असल्याचें आढळून येतें. लोकांच्या जाणीवांत पैशानें कोणता फरक केला हें मार्क्सनें या चर्चेत दाखविलें आहे हा मार्क्सचा विशेष होय. मानवेतर सृष्टींत चरितार्थ-

संपादनाची क्रिया ( मधमाशा वगैरे कांहीं अपवाद वगळल्यास ) सामुदायिक सहकार्यावर म्हणजे परस्परावलंबनावर आधारलेली नाहीं. कुरणांत एकत्र चरणारीं हरणें कळप करून राहतात तरी तीं परस्परावलंबी नव्हेत. मानवी समाजाचें धनोत्पादनकार्य परस्परावलंबनानें चालतें. शरीराचे अवयव ज्याप्रमाणें परस्परसहकार्य व परस्परावलंबन यांच्या बलावर आपापलें व एकंदर शरीराचें धारण-पोषण करतात त्याप्रमाणें मानवी व्यक्ति धनोत्पादनाचे कामीं परस्परसहकार्य व परस्परावलंबन यांनीं आपापलें व समाजाचें धारण-पोषण करीत असतात. पितृप्रधान कुटुंबव्यवस्थेंत हें परस्पर सहकार्य व परस्परावलंबन उघड दिसत असतें. प्रत्येकानें सर्वांसाठीं आणि सर्वांनीं प्रत्येकासाठीं राबावें असें या कौटुंबिक समाजाचें स्वरूप असतें. त्यांत विनिमय म्हणजे ' हें माझें धन तूं घे आणि तें तुझें धन मला दे ' ( ' ददामि प्रतिगृह्णामि ' ) असा व्यवहार असत नाहीं. यामुळें धनोत्पादनकार्यानें मानवी समाजांत जें ऐक्य निर्माण केलें आहे तें त्यांत उघड दिसत असतें. विनिमयपद्धति सुरू झाली कीं हें सहकार्य व परस्परावलंबन अदृश्य होऊं लागतें आणि विनिमयाचें माध्यम असा पैसा अस्तित्वांत येवून रूढ झाली कीं मग सहकार्य व परस्परावलंबन अगदींच लक्षांत येईनासें होतें. प्रत्येक व्यक्तीला आपण स्वतंत्र, स्वावलंबी व स्वयंपूर्ण आहों असें वाटूं लागतें. भांडवलशाही पद्धतीचा पैसा हा फार मोठा आधार असून व्यक्तिस्वातंत्र्य भांडवलशाहींत बोकाळतें याचें कारण विनिमय, व पैशानें विनिमयाला आलेलें सौकर्य हें होय असें मार्क्स सुचवीत आहे.

## पैसा हें खुणेचें धन

पैसा जवळ असलेला माणूस स्वतःला धनवान मानतो. पण सामाजिक दृष्टीनें पाहिलें तर पैसा हें स्वयंसिद्ध धन नव्हे. तें फक्त खुणेचें धन म्हणजे धनाची खूग अथवा प्रतीक आहे. पैशाचें परिमाण कमी असलें व चलनव्यवहारही कमी असला म्हणजे खरेदीविक्री व्यवहाराला पैसा अपुरा पडतो. व उलट खरेदीविक्री व्यवहार कमी होऊन स्वस्त झाल्यासारखा दिसतो. पैशाचें परिमाण वाढलें व चलनव्यवहार वाढला तर खरेदीविक्रीव्यवहाराचें सौकर्य वाढून मालांचें भाव वाढल्यासारखे दिसतात. तथापि निरनिराळ्या मालांच्या किंमती केवळ पैशाच्या परिमाणावरून ठरतात हें म्हणणें चूक होईल.

कारण पैसा हा कृत्रिम म्हणजे कागदी बनवूनही त्यांचें परिमाण वाढविता येतें. आणि पैसा हा विनिमयव्यवहारांत नुसता मध्यस्थ असून विनिमय होतो तो वस्तुतः; पर्यायानें कां होईना पण, प्रत्यक्ष वस्तूवस्तूंचाच होत असतो. यामुळें विक्रीवस्तूसाठीं सामाजिक दृष्ट्या आवश्यक असे जे श्रम करावे लागतात त्यावरूनच विक्रीवस्तूंचें मूल्य ठरत असून मागणी-पुरवठा तत्त्वाअनुसार या मूल्याच्या थोडें खालीं अथवा थोडे वर बाजारभाव ठरतात. विक्रीवस्तूंची किंमत ही पैशाचे स्वरूपांत लक्षांत न घेता विनिमयांत मिळणाऱ्या मालाच्या स्वरूपांत लक्षांत घेतल्यास ही गोष्ट कळून येते. पैसा परिमाणांत वाढला अथवा कमी झाला तर सर्वच माल व श्रमशक्ति यांची किंमत एकदम वाढते अथवा कमी होते. मालाचे भावही वाढतात-कमी होतात. त्याबरोबरच मजूरीचे दरही वाढतात-कमी होतात. असें घडण्याला महागाई-स्वस्ताई असें कोणी म्हणत नाहीं. मालामालांच्या आणि माल व श्रमशक्ति यांच्या सापेक्ष्य किंमतीत जे उलटसुलट चढ-उतार होतात त्याला महागाई-स्वताई हे शब्द लागतात, हें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे.

देवघेवीच्या म्हणजे विनिमयाच्या व्यवहारांत कर्जप्रकाराची उत्पत्ति ही मालाची उत्पत्ति व उपभोग यांना जो वेळ लागतो त्यामुळें होते असें मार्क्सनें दाखविलें आहे.

## व्यापार हा अनुत्पादक कसा ?

व्यापारानें कोणतेंच नवें मूल्य निर्माण होत नाहीं हें मार्क्सचें जें मत आहे तें सकृद्दर्शनीं चमत्कारिक वाटतें. कारण आपण ज्या समाजांत वावरतों आहों त्या समाजांत गिरणींत कामगारानें कष्ट करून कापड निर्माण करणें जितकें आवश्य तितकेंच गिरणींतलें हें कापड दुकानदारानें घेऊन विकणेंही आवश्यक आहे. दोघांचेही श्रम या सामाजिक परिस्थितींत जरूरीचे असतां व्यापारी तेवढा अनुत्पादक असें मार्क्स कां म्हणतो ? याचें विशेष कारण आहे. भांडवलशाही समाजाचें परीक्षण करून त्याचा गतिसिद्धांत ठरवितांना मार्क्स त्यांतील टिकाऊ वैशिष्ट्यें कोणतीं आणि अशाश्वत वैशिष्ट्यें कोणतीं तें पाहतो आहे. समाजव्यवस्था गुलामगिरीची असो, सरंजामशाहीची असो, भांडवलशाहीची असो, नाहींतर समाजवादी असो, धनोत्पादक श्रम केल्यावांचून व तेही

परस्परावलंबनानें व सहकार्यानें केल्यावांचून धनोत्पादनव्यवसाय चालणारच नाहीं. पण व्यापार अथवा मालाची खरेदीविक्री म्हणजे विनिमय ही बाब अशी नव्हे. कुटुंबसंस्था होती त्यावेळीं खरेदीविक्री नव्हती आणि आज ती असली तरी उद्यां समाजवादी समाजघटना निर्माण झाल्यावर ती नाहींशी होईल. उत्पन्न मालाचा साठा समाजामार्फत कोठें तरी केला जाईल व त्याची वाटणी समाजामार्फत केली जाईल. म्हणजे उत्पादन व वाटणी ही राहतीलच. पण विनिमय म्हणून वेगळें कांहींही राहणार नाहीं. समाजविकासांत विनिमयव्यवहाराचें जें ऐतिहासिक स्थान आहे तें मार्क्स अमान्य करीत नाहीं. तें नैसर्गिक अथवा सामाजिक नव्हे हें सांगणें इकडेच मार्क्सचा कटाक्ष आहे.

## वाहतूक व हिशेब

वाहतूक व हिशेब या संबंधानें मार्क्सनें जें मत दिलें आहे त्यावरून मार्क्सची ही विचारसरणी अधिक स्पष्ट होते. उत्पादक श्रम हे जसे कोणत्याही समाजव्यवस्थेंत आवश्यच असतात त्याचप्रमाणें उत्पन्न झालेलें धन उत्पन्न झालेल्या ठिकाणापासून उपभोगाच्या जागेपर्यंत नेण्याचें कार्यही अवश्य आहे. म्हणून वाहतुकीनें मालाचें मूल्य वाढतें ही गोष्ट मार्क्सनें कबूल केली. हिशेब ठेवण्याचा खर्चही आज भांडवलशाही पद्धतींत मूल्य वाढविणारा नाहीं असेंच मार्क्स म्हणतो, पण समाजवादी समाजघटना निर्माण होईल त्यावेळी सर्व समाजाचें सामुदायिक उत्पादन सुरू होईल व तेव्हां जो सर्वांचा मिळून एक हिशेब ठेवला जाईल तो आर्थिक उत्पादनाचें नियोजन व नियंत्रण करण्यास अवश्य ठरेल असें मार्क्सचें म्हणणें आहे.

## व्यापारी भांडवल क्रांतिकारक नव्हे

व्यापारी भांडवल व औद्योगिक भांडवल या दोहोंच्या कार्यांत मार्क्स सूक्ष्म फरक करतो. व्यापार हा मूल्य वाढवीत नाहीं असें त्यानें म्हटलेंच आहे. शिवाय व्यापारी भांडवलशाही समाजक्रांति करण्यासही समर्थ नाहीं असें तो आणखी सांगतो. जुन्या समाजव्यवस्थेचा अधःपात करण्यास अथवा तिची मोडतोड करण्यास व्यापारी भांडवल समर्थ असतें, पण नवी समाजव्यवस्था निर्माण करण्याचें सामर्थ्य व्यापारी भांडवलांत नाहीं असें त्याचें म्हणणें आहे. सकृद्दर्शनीं हें बोलणें आक्षेपार्ह वाटतें. कारण व्यापारी भांडवलानें मालाचा खप वाढला,

त्यामुळेंच माणसाची उत्पादनशक्ति वाढली आणि म्हणून समाजव्यवस्था बदलली. तेव्हां व्यापारी भांडवल हें क्रांतीला कारण होत नाहीं कसें? येथेंही पुन्हां मार्क्सचें म्हणणें असें दिसतें कीं माणसाची उत्पादनशक्ति वाढविण्यास भांडवल-शाही अमदानींत व्यापारी भांडवलानेंच प्रेरणा दिली असली तरी गुलामगिरी-पूर्वीच्या समाजाची उत्पादनशक्ति वाढविण्यास व्यापारी भांडवल हें उपयोगी पडलें नव्हतें. आणि भांडवलशाहीचा भरभराटीचा काळ संपून गेल्यानंतर पुन्हा व्यापारी भांडवल हें उत्पादनसामर्थ्याच्या वाढीस अडथळा करूं लागतें, व वाढतें उत्पादनसामर्थ्य हें व्यापारी भांडवलाचा अडथळा दूर सारून क्रांति करते. मुख्य मुद्दा असा कीं समाजक्रांतीचें कार्य उत्पादनसामर्थ्याच्या वाढीमुळेंच मुख्यतः होतें, हा इतिहासाच्या सर्व काळांतला सिद्धांत आहे तसा तो सिद्धांत व्यापारी भांडवलासंबंधानें खरा ठरत नाहीं.

## व्याज व नफा

व्याज आणि नफा यांतील फरक हा निवळ दर्शनी आहे. दोन्हीही मजू-रांच्या फुकट मिळणाऱ्या श्रमांतूनच येत असतात असें मार्क्स दाखवितो. यांतही ऐतिहासिक व सामाजिक हा फरकच मार्क्सला अभिप्रेत आहे. पैसारूपी भांडवलाची मालकी अथवा कारखाना वगैरे उत्पादनसाधनांची मालकी ही कांहीं मूल्य वाढविण्याचे कामीं सहाय्य करीत नाहीं तर धनोत्पादक श्रम हेच कोणच्याही कालांत मूल्याचे निर्माते होत असें त्यास म्हणावयाचें आहे.

# कॅपिट्लची विचारपद्धति व दृष्टिकोण : : ३

'कॅपिट्ल'–सारग्रंथांतील महत्त्वाचे मुद्दे चट्कन् वाचकांच्या लक्षांत यावे म्हणून मागील प्रकरणांत त्यांचें संक्षिप्त व संगतवार विवरण केलें. आतां थोडासा पुनरुक्तिदोष पत्करून कॅपिट्ल ग्रंथाच्या विशिष्ट विचारपद्धतीकडे व दृष्टिकोणाकडे वाचकांचें लक्ष वेधण्याचा प्रयत्न करतों.

## अर्थशास्त्राचें शास्त्रत्व

'कॅपिट्ल' हा ग्रंथ शास्त्रीय विवेचनात्मक आहे. या अर्थानें हें भांडवलशाहीचें अर्थशास्त्र होय असें म्हणतां येईल. अर्थशास्त्राच्या विचारासंबंधानें मतभेद आहेत. त्यांत जसे ॲडॅम स्मिथ, रिकार्डो वगैरे अर्थशास्त्रज्ञ होवून गेले तसाच मार्क्स हाही एक भांडवलशाहीचा अर्थशास्त्रज्ञ म्हणता येईल का? एखाद्या ज्योतिष्यानें ग्रहांच्या गतीसंबंधानें अमुक एका प्रकारचें भविष्य वर्तविलें, दुसऱ्यानें दुसऱ्या एका प्रकारें वर्तविलें आणि दोघेही मग कोणाचें म्हणणें खरें होतें हें पाहण्यासाठीं आभाळाकडे पाहात वर्षानुवर्षे बसले. अशाच प्रकारें मार्क्स हाही भांडवलशाहीसंबंधानें अमुक एक मीमांसा करून अथवा भविष्य वर्तवून आरामपणें जगाकडे पाहात बसला का? एंजिनिअरिंगच्या पुस्तकांत गुरुत्त्वाकर्षणाच्या नियमाचा उपयोग करून इमारत कशी बांधावी, निरनिराळ्या गुणावगुणाप्रमाणें माल कोणता कुठें वापरावा वगैरे वर्णन असेल. कारागीर कोणते असावे, त्यांनीं काय काम करावें, कसें करावें असें कांहीं वर्णन असेल. आणि वैद्यकीच्या पुस्तकांत कोणत्या रोगाचें स्वरूप कसें असेल, त्याचें निवारण कसें होईल वगैरे चर्चा असेल. तसेंच अर्थशास्त्राचें धनोत्पादन व धनाची वाटणी कशी होते, मालाला

किंमत कां येते, मालकी हक्क कां निर्माण होतो, मागणी व पुरवठा यांचा किंमतीवर परिणाम काय घडतो यांची शास्त्रोक्त चर्चा करणें याचें नांव अर्थशास्त्र. त्यांत मानवी सुखदुःख, भावना यांचें विवेचन तपशीलवार येण्याचें कारण नाहीं. ज्वालामुखी कसा असतो, कां होतो, तो फुटतो व वाहतो कसा वगैरे विषय शास्त्रोक्त पद्धतीनें सांगतांना ज्वालामुखीनें माणसांचे होणारे हाल, त्यांच्या कुटुंबाची, संस्कृतीची होणारी वाताहात वगैरेचें तपशीलवार वर्णन केलें जाईल तर तो भूगर्भशास्त्राचा ग्रंथ न होतां इतिहास, कादंबरी अथवा काव्य अथवा नीतिग्रंथ या सदरांत पडेल. भूगर्भशास्त्राचें विवेचन करतांना मानवी सुखदुःखांचा विचार आपण बाजूस ठेवतों अशा अर्थानें अर्थशास्त्र हें शास्त्र म्हणता येणार नाहीं अथवा मानवी सुखदुःखांचा प्रश्न अर्थशास्त्रांत अगदीं अलाहिदा म्हणून काढून ठेवता येणार नाहीं हें खरेंच. पण मानवी सुखदुःखांचा विचार करूनही व त्यांची चर्चा शास्त्राच्या कक्षेंत स्वीकारूनही ॲडम स्मिथनें अर्थशास्त्र हें इतर भौतिक शास्त्रासारखेंच एक शास्त्र आहे ही गोष्ट प्रामुख्यानें मांडली. सुखदुःखांचा विचार हा वैयक्तिक असून समाजांतील व्यक्ति आपापल्या सुखदुःखाबद्दल विचार व यत्न करीत असल्यानें शास्त्रज्ञ आणि राज्यसंस्था त्यासंबंधानें तटस्थ राहूं शकतात असें त्याचें म्हणणें होतें. गुलामगिरी, सरंजामशाही वगैरे समाजव्यवस्थांनीं जी कृत्रिमता निर्माण केली होती ती अनैसर्गिक होती. निसर्ग म्हणजे निवळ जडसृष्टि नसून उद्भिज्ज, पक्षी, जनावरें वगैरे प्राणी हे निसर्गाचे भाग आहेत. तसाच माणूस हाही एक भाग आहे. आणि एका माणसानें अथवा माणूससमूहानें दुसऱ्या माणसास अथवा माणूससमूहास अडविलें नाहीं तर व्यक्तिमात्राच्या ठिकाणीं असणाऱ्या ज्या नैसर्गिक प्रवृत्ति त्यांचा परस्पराशीं थोडाफार विरोध आला तरी एकंदर त्याच्या संघर्षापासून समाजहित साधतें असा निसर्गनियम ॲडम स्मिथ सांगतो. आर्थिक जीवनांतील हें संघर्षाचे जे नियम अथवा तत्त्वें तेंच अर्थशास्त्र होय. या अर्थानें तें ज्योतिषशास्त्र, रसायनशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र यांसारखें त्रिकालाबाधित नियमांचें दृढशास्त्र आहे असें स्मिथ मानतो. एकदां या नैसर्गिक म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्यावर आधारलेल्या पद्धतीनें समाज चालू लागला म्हणजे मग समाजांत थोडें फार दुःख असलें तर तें अपरिहार्य आहे असें मानावें, जुन्या संवयी, स्वभाव, घटना वगैरेंचे मरून चाललेले हे अवशेष आहेत असें मानावें आणि कालांतरानें या दुःखांची संवय होऊन

किंवा नैसर्गिक राहणीनें या जुनाट दुःखांचा नायनाट होऊन तीं दुःखें नाहींशीं होतील म्हणावें अशी क्लासिकल अर्थपंडितांची विचारसरणी आहे.

## अर्थशास्त्र हें भयाण शास्त्र

यांत जी मानवी दुःखाबद्दल बेपर्वाई नव्हे पण एक प्रकारची सहिष्णुता अथवा माल्थससारख्यांना वाटणारी बेपर्वायुक्त निराशा दिसते ती ओवेन, सिसमाँडी, प्रुधाँ वगैरे तत्त्वज्ञांना पटली नाहीं. ज्या समाजव्यवस्थेनें मानवी सुखांची प्रचंड घोषणा व प्रतिज्ञा केली तीमुळेंच माणसांवर संकटांचे डोंगर कोसळताहेत तर ही व्यवस्था नुसती नैसर्गिक आहे म्हणून कपाळास हात लावून बसतां येणारच नाहीं असा या तत्त्वज्ञांचा आग्रह होता. ही व्यवस्था नैसर्गिक आहे हेंही त्यांना मान्य नव्हतें. अमर्याद लोभ हा अनैसर्गिक आहे असें ओवेन म्हणे, तर माणसाला उपाशी मारणारी हीं यंत्रें नैसर्गिक म्हणून उपेक्षणीय मानणें गैर आहे असें सिसमाँडी, प्रुधाँ यांचें म्हणणें होतें. यांची लिखाणें निर्विकार शास्त्रीय लिखाणें नसून मानवी सुखदुःखांच्या भावनांनीं जळजळीत झालेलीं आहेत. शास्त्रीय दृष्टीनें हा दोषच होय. पण हा दोष हे शास्त्रज्ञ कबूलही करतील, किंबहुना अर्थशास्त्र हें भौतिक शास्त्रासारखें निर्विकार शास्त्र नसून कोणताही मानवी जीवनाचा विषय हा निर्विकार 'शास्त्र' होवूं शकणार नाहीं असेंही हे शास्त्रज्ञ सरळ सांगतील. कार्लाइलनें अर्थशास्त्राला 'डिस्मल सायन्स' म्हणजे 'भयाण शास्त्र' असें उपरोधिकपणें म्हटलें आहे तें याच अर्थानें होय.

## मार्क्सची प्रेरणा नैतिक होती

मार्क्सच्या 'कॅपिट्ल' मध्येंही कितीतरी लिखाण मानवी सुखदुःखांच्या जिव्हाळ्यानें ओथंबलेलें आहे हें सारग्रंथाची संहिता वाचणारांना आढळून येईल. यंत्राची उत्पत्ति झाल्यापासून भांडवलशाहीची वाढ एका बाजूस होत असतां दुसऱ्या बाजूस त्याचवेळीं मानवी दुःखांचा कहर कसा उसळला आहे, कुटुंबसंस्था, लहान मुलें यांच्यावर कशी आपत्ति कोसळली आहे याचीं वर्णनें मार्क्सनें हृदय पिळवटणारीं केलीं आहेत. प्राथमिक धनसंचयाचा भांडवलशाहीपूर्वीचा इतिहास सांगतांनाही मार्क्सनें अगदीं हृदयाला घरें पडतील असे प्रकार वर्णिले आहेत. मार्क्सला 'कॅपिट्ल' लिहिण्याची किंबहुना आयुष्यभर त्यानें मांडलेल्या शिकवणुकीची प्रेरणा झाली ती नैतिकच होती. मानवजातीवर होत असणारे अन्याय व

कोसळणारीं दुःखें नुसतीं अशीं अशीं/कोसळतात एवढें कार्यकारणभावात्मक प्रतिपादन अपुरें असून हीं दुःखें नाहींशीं करण्याचे उपाय शोधणें हें कार्य त्यानें आपल्यापुढें ठेवलें होतें. म्हणजे एवढ्यापुरतें बोलायचें तर मार्क्सचें ओवेन, प्रुधाँ, सिसमाँडी, फोरिअर या सर्वांशीं साम्य आहे. अर्थशास्त्राचें 'शास्त्रत्व' मर्यादित कसें आहे हें त्यानें मागें दिलेल्या कॅपिट्लच्या प्रथम खंडाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत स्पष्ट केलें आहे. अर्थशास्त्र हें भांडवलवाल्यांच्या क्षितिजाच्या कक्षेंत जोंपर्यंत राहतें, वर्गकलह जोंपर्यंत गुप्त असतो तोंपर्यंत भांडवलशाही ही त्रिकालाबाधित समाजव्यवस्था असून अर्थशास्त्र हें भूगर्भशास्त्र, खगोलशास्त्र यांसारखें त्रिकालाबाधित शास्त्र आहे, हा भांडवलदारी अर्थशास्त्रज्ञांचा भ्रम टिकूं शकतो. पण एकदां वर्गकलह उत्पन्न झाला कीं तें शास्त्र 'शास्त्र' म्हणून राहात नसून समाजांत युद्धास उभ्या राहिलेल्या भांडवलदाराची ती वकिली होते असें मार्क्सचें म्हणणें आहे. अर्थशास्त्र हें इतर भौतिकशास्त्रांच्या अर्थानें शास्त्र नव्हे असेंच मार्क्स येथें सुचवीत आहे. पण मग ओवेन, सिसमाँडी, प्रुधाँ यांचे विचार अशास्त्रीय असून मार्क्स-एंजल्स याचे विचार तेवढे शास्त्रशुद्ध होत व म्हणूनच मार्क्सच्या विचारसरणीस 'शास्त्रशुद्ध समाजवाद' असें मानलें जातें, हें कसें ?

## मार्क्सच्या भौतिकवादाचा विशेष

इंग्लंडांतील व्यक्तिवादी अर्थशास्त्रज्ञ आणि फ्रान्समधील तत्त्ववेत्ते हे भौतिकवादी होते. म्हणजे जगाचें रहाटगाडगें ईश्वराच्या अथवा कोणाच्या लहरीनें चालत नसून आधिभौतिक सृष्टीच्या गुणधर्मानें चालतें असें त्यांचें मत होतें. मार्क्सही या अर्थानें भौतिकवादीच होता. पण त्याच्या भौतिकवादास ऐतिहासिक भौतिकवाद हें नांव आहे. आणि 'कॅपिटल्'मध्यें व मार्क्सच्या एकंदर विचारसरणींत जें 'शास्त्र' आहे तें हें ऐतिहासिक भौतिकशास्त्र आहे. ओवेन हा भौतिकवादी होता तरी मानवी जीवन हें केवळ सृष्टीच्या गुणधर्माच्या चौकटींत गुलामासारखें न बांधतां चिकणमातीप्रमाणें आपल्या इच्छेस येईल तो आकार त्यास देतां येईल असें ओवेनला वाटे. फ्रान्समध्यें कांहीं भौतिकवाद्यांना मानवी कर्तृत्वाला जगांत वाव फार थोडा आहे, फक्त सृष्टीचे आहेत ते गुणधर्म समजून घ्यावे आणि त्यांतल्या त्यांत करता येईल तेंच पुन्हा पुन्हा करावे, येथेंच माणसाचें कर्तृत्व व कर्तव्य संपतें असें वाटे. मार्क्सची विचारसरणी या दोघाहूनहि निराळी

आहे. भूगर्भशास्त्र, खगोलशास्त्र हीं त्रिकालाबाधित व मानवी हस्तक्षेपापासून स्वतंत्र अशीं शास्त्रें आहेत. पण अर्थशास्त्र, राज्यशास्त्र असें कोणतेंहि मानवीशास्त्र त्रिकालाबाधित व केवळ जडधर्मयुक्त नसून इतिहासकाळांत मानवी जीवन सतत पालटत गेलें आहे, त्यांत माणसाचें कर्तृत्व व त्याचा स्वभावही बदलत गेला आहे, झाडें, नद्या, सरोवरें, उन्हाळे, पावसाळे यासारखे मानवी जीवन मेलेलें, जडधर्म-नियंत्रित नाहीं तर माणसाच्या इच्छा, आकांक्षा, वासना, भावना, स्वभाव यांनीं माणसाचें घडणारें जें जिवन्त कर्तृत्व तें तो त्या त्या सृष्टिव्यापारावर गाजवितो व आपल्या जीवनाच्या इतिहासांत नव्या नव्या घटना घडवितो—इतिहास घडवितो-असें मार्क्सचें म्हणणें आहे. पण ओवेनप्रमाणें मनुष्य हा अमर्यादकर्तृत्व आहे असेंही मार्क्स म्हणत नाहीं. माणूस आणि सृष्टि यांच्या संयोगानें आणि संघर्षणानें मानवी जीवनाचा जो इतिहास घडला तोच पुढील मानवांच्या कर्तृत्वाला व आकांक्षांनाही कांहीं निश्चित मर्यादा घालतो आणि या इतिहासाच्या मर्यादाशीं झगडत झगडत माणसाला आपलें कर्तृत्व गाजवावें लागतें असें तो म्हणतो.

## भौतिक शास्त्रें व मानवी शास्त्रें

मानवी व्यवहारांत शास्त्र नाहीं असें मार्क्स मानीत नाहीं, तर मानवी व्यवहारांतल्या शास्त्रांचे नियम भौतिक शास्त्राप्रमाणें त्रिकालाबाधित नसून निर-निराळीं मानवी व्यवहाराचीं शास्त्रें निरनिराळ्या काळीं व स्थळीं ऐतिहासिक क्रमानुसार निरनिराळीं असतात असें तो सांगतो. लोकसंख्येचें शास्त्रही निरनि-राळ्या कालखंडांत, मार्क्सच्या मतें, निरनिराळें असतें. तसेंच अर्थशास्त्र, राज्यशास्त्र वगैरेही वेगवेगळें असतें. पण या वेगवेगळेपणांतही कांहींशी एकसूत्रता आहे. भूतकालांतून वर्तमानकालांत उदय पावणारी घटना भूतकालांतील बीजरूप कार-णांचें अंकुररूपी कार्य असते. वर्तमानकाळाचा भूतकाळाशीं आणि भविष्यकाळाचा वर्तमानकाळाशीं कार्यकारणसंबंध असतो. आणि याच क्रमानें मानवी जीवन सारखें पालटत असतें. या पालटाच्या क्रमाचें जें शास्त्र तेंच इतिहासशास्त्र अथवा ऐतिहासिक भौतिकवाद होय.

## कोणती विचारसरणी प्रभावी ठरते

इतिहासांत मानवी जीवनामध्यें घडणारे हे जे पालट आहेत ते आर्थिक उत्पादनाचा जो प्रकार रूढ असेल तदनुसार-त्याच्या क्रियेप्रतिक्रियेप्रमाणें घडत

असतात. कारण चरितार्थसंपादनाचा व्यवसाय मानवी इतिहासाच्या सुरवातीपासून आजतागायत माणसाला पुष्कळच करावा लागत असूनही अजून चरितार्थाची तरतूद पुरेशी होत नाहीं. चरितार्थसंपादन हेंच मानवी जीवनाचें प्रमुख कार्य होवून बसतें. त्या कार्यास ज्या प्रकारची आर्थिक, सामाजिक, राजकीय, धार्मिक घटना हवी असते त्या प्रकारची घटना माणसास बनवावी लागते. किंवा माणूस अमुक एक घटना आर्थिक उत्पादनासाठीं हेतुपूर्वक अमुक प्रकारची बनवितो असेंही नाहीं. पण आर्थिक उत्पादनप्रकाराच्या प्रगतीस जी घटना अनुकूल असेल ती टिकते. व बाकीच्या नष्ट होतात. उत्पादनप्रकाराच्या त्या त्या परिस्थितींत जे जे प्रश्न सुटण्यासारखे असतात त्या संबंधानेंच विचार व यत्न माणूस करीत असतो. अथवा त्या त्या उत्पादन प्रकाराच्या परिस्थितींत सुटण्यासारखे जे प्रश्न असतील त्यासंबंधीचे विचार व प्रयत्न करणारे लोक प्रभावी ठरतात. बाकीच्यांचे विचार व प्रयत्न मागें पडून एकंदर समाजाच्या विचारांना व भावनानां या प्रभावी विचारसरणीचेंच वळण लागतें.

## मनुष्यकर्तृत्व व इतिहासक्रम

आर्थिक उत्पादनप्रकाराचें स्वरूप जसें असेल त्याप्रमाणें मानवी संस्कृति, राहणी, समाजघटना, विद्या, कला यांचें रूप बनतें असें जें मार्क्सचें मत आहे त्याचा अर्थ स्वतंत्र धार्मिक, सामाजिक, राजकीय भावना, वासना, कल्पना माणसाला नाहींत असा नव्हे. त्या आहेत, व त्यांचा आर्थिक उत्पादनप्रकाराशीं संघर्ष चालू असतो. या संघर्षांत उभयतांचे एकमेकांवर म्हणजे सर्वांचे सर्वांवर परिणाम घडत असतात. पण त्यांत आर्थिक उत्पादन प्रकार हा स्वाभाविकपणें प्रभावी ठरतो व आपणांस अनुकूल असें रूप भावना, कल्पना यांना देत असतो. फाशी जाणाऱ्या माणसाप्रमाणें मनुष्य सर्वस्वी पराधीनपणें या संघर्षास केवळ बळी पडत असतो असें नव्हे, तर हा संघर्षखेळ स्वतः माणूसच आपल्या कर्तृत्वानें खेळत असतो. किंवा वेगळ्या शब्दांत सांगायचें तर माणसाचें सर्वांगीण कर्तृत्व आणि इतिहासाचा क्रम यांचाच हा संघर्ष होत असून एकमेकांचे परिणाम एकमेकावर होत असतात. ओवेननें माणसाच्या कर्तृत्वाला महत्त्व दिलें; माणूस परोपकार बुद्धीनें वागेल तर समाजदुःख नष्ट होईल असें तो म्हणे. मार्क्सला माणसाचें कर्तृत्व व सामर्थ्य अमान्य नव्हतें. पण इतिहासक्रमानें त्याला कांहीं मर्यादा घातल्या आहेत, माणसाच्या कर्तृत्वाचें स्वरूप हेंही या इतिहासक्रमांतलाच एक

भाग आहे आणि धनोत्पादनप्रकाराची प्रगति होण्यास अनुकूल असेंच कर्तृत्व यशस्वी होईल–असेच प्रश्न माणूस सोडविण्यास हातीं घेईल, हें इतिहासशास्त्र ओवेनला कळलें नाहीं. म्हणून ओवेनप्रभृतींचे विचार हे अशास्त्रीय होत असें मार्क्सचें म्हणणें आहे.

मनुष्यकर्तृत्वास मार्क्सनें अतिशय महत्त्व दिलें आहे. पण तें यशस्वी होण्यासाठीं इतिहासक्रम तपासला पाहिजे, असें तो म्हणतो. त्या इतिहासक्रमांत कोणतें कर्तृत्व मानवी दुःखपरिहार करण्याचे दृष्टीनें यशस्वी होईल, समाजांतील कोणता वर्ग तें कर्तृत्व इतिहासक्रमानुसार गाजवील, व कोणता वर्ग इतिहासक्रमाला कलाटणी देण्यास समर्थ होईल याचा विचार मार्क्सनेंच प्रथम केला. ओवेन, प्रुधाँ, सिसमाँडी, वगैरे सर्व तत्त्वज्ञांहून मार्क्सचा जो विशेष आहे तो हा होय. त्यानें समाजक्रांतीचें शास्त्र शोधलें व हें क्रांतिकर्तृत्व वेळोवेळीं कोणत्या वर्गाच्या हातून होवूं शकतें, इतिहासक्रमानें त्या कर्तृत्वास मर्यादा व नियंत्रण कसें पडतें याची त्यानें तपासणी केली हें मार्क्सचें वैशिष्टय आहे.

ही ऐतिहासिक भौतिकवादाची विचारसरणी प्रथम मार्क्सनें मांडली व मग आपण स्वीकारली असें एन्जल्सनें ' फायर बाक 'वरील आपल्या निबंधाच्या एका तळटीपेंत लिहिलें आहे. मार्क्स व एन्जल्स यांचे याविषयींचे विचार त्यांच्या पंचविशींतच निश्चित झाले होते. यासंबंधानें मेहेरिंगनें मार्क्सचरित्रांत दिलेले मार्क्सचे दोन उतारे येथें देतों.

## फ्रेंच क्रांतींत काय यशस्वी झालें

मार्क्स व एन्जल्स यांनीं १८४५ व ४७ चे दरम्यान ' होली फॅमिली ' हा जाडा ग्रंथ लिहिला. त्यांतील विचार अजून पुष्कळ अपूर्ण व कच्चे आहेत असें मेहरिंग म्हणतो. पण त्यांत या ऐतिहासिक भौतिकवादाचीं बीजें स्पष्टपणें सांपडतात. फ्रान्सच्या राज्यक्रांतींत ( १७८९ ) यशस्वी काय झालें याची चर्चा ' होली फॅमिली 'मध्यें एके ठिकाणीं चालू आहे. त्या क्रांतीचे पुढारी निर्भेळ लोकशाहीचे व व्यक्तिस्वातंत्र्याचे पुरस्कर्ते होते. स्वातंत्र्य, समता व बंधुभाव या ध्येयनिष्ठेसाठीं ( आयडिआ ) त्यांनीं क्रांति केली. पण " भांडवलदारवर्गाच्या हिताशीं विसंगत असें स्वरूप या ध्येयनिष्ठेस येताच ती पराभूत झाली. " जनताहिताच्या ज्या आकांक्षेस इतिहासक्रमांत व्यक्त स्वरूप प्राप्त होतें त्या आकांक्षा ( म्हणजे

ध्येयनिष्ठा ) आपल्या व्यवहार्यतेच्या मर्यादा कांहीं काळ ओलांडून पुढें जातात आणि अखिल जनतेच्या कल्याणाच्या परिभाषेंत वावरूं लागतात. पण अखेरीस उत्पादनप्रकाराच्या त्या त्या अवस्थेंत ज्या वर्गाचें हित साधणें शक्य असतें त्या वर्गाचें हितच प्रभावी ठरून अखिल मानवी हिताच्या ध्येयनिष्ठा हवेंत विरून जातात. " १७८९ च्या क्रांतींत भांडवलदाराचे हितसंबंध ( यशस्वी होणें शक्य होतें व तेच ) यशस्वी झाले, आणि क्रांतींतला करुणरस विरून गेला, अत्युत्साहाचे पुष्पहार सुकून गेले. भांडवलदारांचे हितसंबंध हे अखेरीस इतके प्रभावी ठरले कीं, त्यांनीं मॅरटची लेखणी, दहशतवाद्यांची कुऱ्हाड ( गिलोटीन ), नेपोलियनची समशेर, धर्ममंदिरांचा क्रॉस आणि बुर्बोन राजांचें निळें रक्त या सर्वांचा सारखाच पराभव केला. " फ्रेंच भांडवलदारांनीं १७८९ तील आपल्या आकांक्षा १८३० सालीं पूर्ण यशस्वी केल्या. त्या वेळीं त्यांच्या राजकीय लोकशाहीच्या पोकळ आकांक्षा पूर्णविराम पावल्या होत्या. जगाच्या आणि मानवजातीच्या कल्याणासाठीं सनदशीर प्रातिनिधिक राज्यघटना स्थापण्याचें ध्येय त्यांनीं साफ दूर सारलें. अखिल जनतेचें हित साधण्याच्या दृष्टीनें १७८९ ची क्रांति फसली तथापि भांडवलदार वर्गाचें हित साधण्याच्या दृष्टीनें ती यशस्वी झाली. त्या वेळच्या उत्पादनसाधनांत व उत्पादनप्रकारांत याहून अधिक कांहींही यशस्वी झालें नसतें.

## कामगारांचें क्रांतिकर्तृत्व

भांडवलशाही क्रांति यशस्वी करण्याचें हें काम जसें भांडवलदार वर्गानें जनतेच्या साहाय्यानें केलें त्याचप्रमाणें भांडवलशाहीचा पाडाव करून समाजवादी क्रांति करण्याचें कार्य कामगारवर्गाचें आहे, मात्र आतां केवळ कामगारवर्गाचेंच हित साधणार नसून कामगारवर्गाबरोबर सर्वच समाजाचेंही हित साधणार आहे असें मार्क्स म्हणतो. कामगारवर्ग सर्व समाजाचें हित साधणार, अर्थात् कामगार कोणी ईश्वराचे अवतार आहेत असें नव्हे. तर " कामगारवर्गाची पूर्ण वाढ झाली म्हणजे त्याचें जीवन हें अखिल मानवजातीच्या जीवनाचें प्रतीक बनतें. विद्यमान मानवी समाजांत जें अमानुष जीवन बहुसंख्य समाजास घालवावें लागतें तें कामगारवर्गांत विशेष ठळकपणें प्रतीत होतें. अखिल मानवजातीचें सर्व दुःखी जीवन कामगारजीवनांत समाविष्ट झालेलें असतें. कामगारवर्गाला या दुःखाची शास्त्रीय जाणीव होत असते आणि परिस्थितीच्या चाकोरींतूनच या दुःखी जीवनाविरुद्ध

बंड करण्याच्या प्रवृत्तीकडे कामगारवर्ग खेंचला जातो. कामगारवर्गालाच स्वतांचा मोक्ष करण्याची शक्यता असते आणि त्याला यशही येतेंच. त्यासाठीं त्याला आपणांस जन्म देणाऱ्या भांडवलशाहीचा विध्वंस करावा लागतो." ( होली फॅमिली ) कामगारवर्गास भांडवलशाहीचा अंत करतां येण्याची ही शक्यता व त्याचें जुनें ऐतिहासिक कार्य 'होली फॅमिली 'नंतर वीस वर्षांनीं कॅपिट्लच्या पहिल्या खंडांत मार्क्सनें अधिक स्पष्टपणें मांडलें आहे.

## उत्पादनप्रकाराचें सामर्थ्यही ऐतिहासिक

कामगारवर्गापुढें हें कर्तव्य व ही शक्यता मांडणें हाच 'कॅपिट्ल' ग्रंथाचा हेतु आहे. आर्थिक उत्पादनप्रकार हा मानवी जीवनाचें बाबतींत सर्वकष असतो ही गोष्ट 'कॅपिट्ल' लिहितांना मार्क्सनें गृहीतच धरली आहे. आणि भांडवलशाहीचे मानवी जीवनावर जे सर्वांगीण परिणाम होतात असें मार्क्स 'कॅपिट्ल' मध्यें दाखवितो त्यावरून ती सिद्ध होत आहे. अर्थात् इतिहासक्रमांत पुढें केव्हांतरी चरितार्थधन सहजलभ्य व विपुल झालें, माणसाला त्या संबंधानें कोणतीही चिंता अथवा खबरदारी घ्यावी लागेनाशी झाली म्हणजे आर्थिक उत्पादनप्रकाराचें सर्वंकषत्व जाईल हें मार्क्सलाही मान्य असेल. या दृष्टीनें आर्थिक उत्पादनप्रकाराचें मार्क्सनें वर्णिलेलें सर्वंकषत्व हाही ऐतिहासिक क्रमानें नाहींसा होणारा प्रकारच ठरणार आहे. पण मानवजातीच्या जन्मापासून आजतागायत व यापुढेंहि कित्येक वर्षे हें त्याचें सर्वंकषत्व राहील हें खरें आहे.

## विक्रीमालाचें पृथक्करण

'कॅपिट्ल' ग्रंथाच्या चर्चेस मार्क्सनें विक्रीमालाच्या पृथक्करणापासून सुरवात केली आहे त्याचें विशेष कारण आहे. भांडवलशाही समाजव्यवस्था ही एक इतिहासक्रमांत निर्माण झालेली अवस्था असून तिच्या अंगभूत गुणधर्मांनींच ती नष्ट होणार आहे व तिच्या नाशाचें काम तिच्याच पोटीं जन्मास आलेल्या कामगारवर्गाच्या हातून व्हावयाचें आहे हें तत्त्व ( हा भांडवलशाहीचा गतिसिद्धांत ) मार्क्स सिद्ध करूं इच्छितो. पण भांडवलशाहीचें स्वरूप कळण्यापूर्वी भांडवलशाहीनें मानवी समाजाबद्दल जो एक भ्रम उत्पन्न केला आहे तो दूर करणें मार्क्सला अवश्य वाटलें. हा भ्रम विक्रीमालानें उत्पन्न केला आहे. सारख्या वस्तूशीं सारख्या वस्तूचा विनिमय करणें व होवूं देणें ही कल्पना

भांडवलशाही समाजव्यवस्थेचा आधार आहे. या विनिमयवस्तु म्हणजे विक्री-माल हा भांडवलशाही धनप्रकाराचें मुख्य प्रतीक असतो, इतकेंच नव्हे तर एक व्यक्ति आणि दुसरी व्यक्ति आणि अशा साऱ्या शेकडों, हजारों, लाखों, कोट्यवधि ज्या मानवी व्यक्ति त्या प्रत्येकी परस्परभिन्न व परस्परस्वतंत्र अशा व्यक्ति असून विक्रीमालाची देवघेव हेंच त्यांना एकत्र आणण्याचें साधन आहे, असें क्लासिकल तत्त्वज्ञ सांगत. सरंजामशाही व गुलामगिरी यांनीं मानवी समाज जो दास्यांत जखडलेला होता तें दास्य तोडून टाकणें हें क्लासिकल तत्त्वज्ञांना साधावयाचें होतें, तरी त्यांनीं प्रतिपादिलेल्या व्यक्तिस्वातंत्र्यानें प्रत्येक व्यक्ति आपल्यापरीं स्वतंत्र व स्वयंभू आहे हा प्रसृत केलेला समजही गैरसमज आहे असें मार्क्सला दिसलें व तें सिद्ध करण्यासाठीं विक्रीमालाच्या पृथक्करणापासूनच त्यानें भांडवलशाहीच्या मीमांसेस सुरवात केली आहे.

## मूल्य चर्चा

विक्रीमालाची किंमत मागणी व पुरवठा यांच्या रस्सीखेचीनें ठरतें हें खरें, पण मागणी व पुरवठा समान असेल तर माल फुकट मिळत नाहीं. त्याला कांहींतरी किंमत पडतेच; ही किंमत पडते ती कशामुळें ? सारख्याशीं सारख्याचा विनिमय होतो हें खरें, पण लोणी, कापड, बायबल, व प्रोफेसराची अक्कल यांत सारखेपणा मोजायला साधन काय आहे ? त्यांचे उपयोग व यांच्या उत्पादनपद्धति हीं अगदीं भिन्न भिन्न आहेत. मग सारखेपणा यांच्यांत आहे कुठें ? परस्परापासून भिन्न व स्वतंत्र असलेल्या व्यक्तींनीं अगदीं स्वतंत्र व स्वायत्तपणें केलेल्या व भिन्न भिन्न उपयोगाच्या विक्रीमालांचा–सारख्यांचा सारख्याशीं विनिमय –व्हावा असा सारखेपणा त्यांच्यामध्यें काय आहे ? ' त्यांच्या उत्पादनास लागणारे मानवी श्रम ' हें मार्क्सचें या प्रश्नास उत्तर आहे. हे श्रम, शिक्षकाचे, कोष्ट्याचे, लोणीवाल्याचे वेगवेगळ्या प्रकारचे असतील. पण शिक्षकाला जगण्यासाठीं लोणीवाला व कोष्टी यांचे श्रम हवे असतात, लोणीवाल्याला शिक्षक व कोष्टी यांचे श्रम हवे असतात आणि कोष्ट्याला लोणीवाला व शिक्षक यांचे श्रम हवे असतात. ते तिघे आपापल्या श्रमांची देवघेव करून जगतात.प्रत्येकजण स्वतंत्र व स्वयंभू नसून तिघांनीं मिळून परस्परोपयोगी श्रम करून, परस्परांच्या साहाय्यानें राहून आपलें संयुक्त जग व त्यांतील संयुक्त राहणी निर्माण केली आहे.

विक्रीमालांच्या देवघेवीमुळें त्यांच्यांत परस्परसंबंध निर्माण झाले, एरवी ते प्रत्येकीं परस्परापासून स्वतंत्र आहेत हें म्हणणें खोटें असून प्रत्येकजण इतरांच्या उपयोगासाठीं श्रम करतो. सर्वजण परस्परावलंबी असतात म्हणून त्यांना आपल्या श्रमफलांची देवघेव करावी लागते व यामुळेंच मानवी जीवन शक्य झालें आहे असें मार्क्स सांगतो. मूल्य हें श्रमावरून ठरतें हें रिकार्डोचें म्हणणें मार्क्सनें मान्यही केलें आहे व सिद्धही केलें आहे, पण त्याच म्हणण्याचा आधार घेऊन मानवी व्यक्ति या परस्पर स्वतंत्र वस्तूंचा घोळका नव्हे तर परस्परोपयोगी धनोत्पादक श्रमाच्या रज्जूंनीं विणलेली ती संघटना आहे, सर्व सामाजिक श्रमाचा एकजीव ज्यांत खेळतो आहे अशी समाज ही एक जिवंत संघटना आहे असें तो सांगतो. एकंदर मनुष्यसमाजाला चरितार्थसाधनें श्रम करून संपादावीं लागतात. श्रम करण्यास पात्र अशीं माणसें विचारांत घेतलीं आणि एकंदर समाजास किती धन लागेल याचा विचार केला तर जरूर लागणाऱ्या धनाच्या मानानें श्रम हे मर्यादित असून माणसाच्या कित्येक गरजा एकेकट्याच्या श्रमानें पार पडण्यासारख्या नाहींत. यामुळें प्रत्येक माणूस आपल्यापुरता राहूं शकत नसून प्रत्येकाचें श्रमसामर्थ्य सामाजिक श्रमसामर्थ्याच्या संघटनेंत मिळवावें लागतें व मग त्या श्रमांची माणसांच्या गरजाअनुसार वाटणी करावी लागते. ही श्रमांची वाटणी नेहमीं न्याय्य होते अथवा इतिहासांत होत आली आहे असें मुळींच नाहीं. पण मानवी श्रमसामर्थ्याची बेरीज ही एकच मर्यादित अशी सामाजिक रकम आहे व तिची वाटणी आणि संघटना करूनच माणसें सामुदायिक सहकार्यानें धन निर्माण करतात व जगतात हा सगळया मानवी इतिहासाचा सिद्धांत आहे. ही गोष्ट सरंजामशाही समाजांत, गुलामगिरी समाजांत उघड दिसत होती. भांडवलशाही समाजांत गिऱ्हाईक आणि दुकानदार हे जसे परस्परांशीं पूर्ण अनोळखीनें, परस्परस्वतंत्रतेनें विक्रीमालाचा क्रय आणि विक्रय करतात तसें त्यावेळीं होत नव्हतें. वस्तुनिर्मितीचें ध्येय विक्री हें आहे असें त्यावेळीं वाटत नसून माणसांनीं घ्यावयाचा उपभोग हें आहे असें त्यावेळीं वाटत होतें.

## श्रम व धन यांची वाटणी

भांडवलशाही काळांत समाजाचें हें परस्परावलंबी स्वरूप झाकलें गेलें असलें तरी वस्तुस्थिति कांहीं त्यानें बदलत नाहीं. भांडवलशाहींतही माणसांच्या

श्रमांची विभागणी होतच आहे. ही विभागणी कशी होते ? अमुक इतक्या काळांत माणसाला जगण्यासाठीं अमुक इतकें धन लागतें. या काळांतील, समजा, एका वर्षांतील अमुक इतके दिवस माणूस धननिर्मितीचे श्रम करूं शकतो तसेंच एका दिवसांत फक्त अमुक इतके तास तो धननिर्मितीचे श्रम करूं शकतो. अर्थात् एका मनुष्यसमाजाचे हे श्रम मर्यादित म्हणजे अमुक इतके असतात. अर्थात त्यांची समाजांत वाटणी करावी लागते आणि त्या श्रमांचीं फलें जो विक्री-मालांच्या रूपानें बाजारांत येतात त्यांचा विनिमय ( म्हणजे तत्त्वतः श्रमाचा विनिमय ) त्यांना निर्मितीसाठीं लागलेल्या श्रमवेळेच्या मापानें होतो. भांडवल-शाही समाजांत हें सर्व इतकें सामुदायिक विचारपूर्वक होत नाहीं; पण अभावित-पणें चालू असते. मागणी व पुरवठा हा सिद्धांत अदृश्यपणें हें कार्य घडवीत असतो. ज्या मालास मागणी जास्त येईल त्याचा भाव वाढतो अर्थात् त्या मालावर लोक जास्त श्रमवेळ खर्चूं लागतात व तो माल मागणीपेक्षां अधिक होवून तो स्वस्त होवूं लागतो, त्याचा भाव उतरला कीं नफा व मजूरी कमी होते म्हणून त्या मालाचे निर्मितीसाठीं खर्च करण्यांत येणारी श्रमवेळ कमी खर्चण्यांत येवूं लागते आणि अशा प्रकारें नेहमीं मागेंपुढें थोडीफार खेचाखेच होवून श्रमवेळ व उत्पन्न धन यांची वाटणी होत असते.

## वर्गीकरणाची विशिष्ट पद्धति

माणसाचें आर्थिक जीवन हें माणसाच्या जन्मापासून परस्परावलंबी व सहकार्यावर आधारलेलें असल्यामुळें धनोत्पादक श्रमांची वाटणी व उत्पन्न धनाची वाटणी हे प्रकार कुटुंबसंस्थेंत, सरंजामी पद्धतींत, गुलामगिरींत, शिकारी समाजांत सर्वत्र आढळतात. या दृष्टीनें मार्क्स या प्रकारांना माणसांचीं ' सामाजिक ' वैशिष्टयें मानतो. ' नैसर्गिक ' जीवन हें डोंगर, झाडें, नद्या, सरोवरें यांना आहे. पक्षी, जनावरें यांचें जीवन केवळ नैसर्गिक अशा जडापासून बरेंच भिन्न आहे. तथापि तें नैसर्गिक या सदरांत घालतां येईल. पण माणसाच्या जीवनांतील परस्पर सहकार्यावर आधारलेला धनोत्पादनप्रकार हा मनुष्येतर सृष्टींत नाहीं म्हणून तो निवळ नैसर्गिक नव्हे. तो माणसांच्या सामाजिक कर्तृत्वावर आधारलेला आहे. कोणताही ' समाज ' बनण्यासाठीं व व्यक्तीच्या आणि समाजाच्या जीवनासाठीं व अभ्युदयासाठीं त्याची गरज असल्यानें मार्क्स श्रमवेळेची वाटणी

व उत्पन्न धनाची वाटणी याला ' सामाजिक ' प्रकार असें म्हणेल. समाजाचें स्वरूप बदललें म्हणजे याच्याही स्वरूपांत बदल होईल. पण तत्त्वतः तो कायम राहतो. उलट क्रयविक्रय म्हणजे विनिमय हा सामाजिक नसून ' ऐतिहासिक ' आहे. कुटुंबसंस्थेंत व गुलामगिरींत क्रयविक्रय असतच नाहीं. सरंजामीसमाज मोडकळीस येऊं लागला म्हणजे विनिमय हळूहळू अस्तित्वांत येतो. भांडवलशाही समाजांत तो जारी असतो. भांडवलशाहीनंतर तो नष्टही होईल. समाजाच्या कोणत्याही स्वरूपांत तो असतोच असें नव्हे तर ऐतिहासिक क्रमांत तो येतो आणि जातो. म्हणून विनिमय हा एक ऐतिहासिक प्रकार होय. 'नैसर्गिक' ' सामाजिक ' व ' ऐतिहासिक ' असें मार्क्सनें केलेलें हें वर्गीकरण सामाजिक इतिहासाच्या अभ्यासास फार महत्त्वाचें आहे.

## किंमतीची चर्चा कां केली

श्रममूल्य सिद्धांताची चर्चा मार्क्सनें सुरू केली ती मागणी व पुरवठा समान असतां किंमत ( म्हणजे येथें मूल्य ) कशामुळें ठरते या प्रश्नानेंच केली हें खरें. पण भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञ किंमतीची चर्चा करतांना जास्तींत जास्त किंमत येऊन जास्तींत जास्त नफा मिळविण्यास माल विकण्याची पद्धति, उत्पादनाच्या पद्धति व साधनें कोणतीं घ्यावीं व कशीं वापरावीं हें समजून घेण्यासाठीं करतात. मार्क्सनें किंमत कशी ठरते हाच प्रश्न विचारून भिन्नभिन्न उपयोगमूल्यांत किंमतीचा आधार म्हणून जें सर्वसाधारण आहे तें परस्परावलंबी मानवी श्रम होत आणि प्रत्येक व्यक्ति ही परस्पर स्वतंत्र व केवळ विक्रीमालाच्या देवघेवीमुळें एकत्र येणारी आहे असें नसून समाज हा परस्परावलंबी व एकसंध असल्यामुळें आणि एकूण सामाजिक श्रमवेळेची समाजांत वाटणी होत असल्यामुळें उत्पन्न धनाचा विनिमय होतो असें मार्क्स या मूल्यसिद्धांताच्या चर्चेनें सांगत आहे. रिकार्डोच्या श्रममूल्य सिद्धांताचा उपयोग मार्क्सनें अशा प्रकारें क्लासिकल अर्थशास्त्रज्ञांची बेफिकिर व्यक्तिस्वातंत्र्यवादाची कल्पना चूक आहे हें दाखविण्यासाठीं केला आहे.

## रिकार्डो व मार्क्स

रिकार्डोनें श्रममूल्य सिद्धांताचा जो उपयोग प्रामुख्यानें केला आहे तो मार्क्सनेंही केला आहेच. विशेष हें कीं तो तार्किक परिसीमेला नेऊन भांडवल-

शाहीचा डाव त्यानें भांडवलशाहीवरच उलटवला आहे. जमिनदार हे श्रम न करता श्रममूल्याचा उपभोग घेतात ही जी रिकार्डोची तक्रार तीच मार्क्स जमिन-दाराप्रमाणें भांडवलदाराविरुद्धही करतो आणि कामगारांचें श्रममूल्य भांडवलदार फुकट लाटत असल्यानें जमिनदारांचें जीवन जसें अनैतिक होय तसेंच भांडवल-दारांचेंही जीवन अनैतिक होय असें तो सुचवितो. तथापि मार्क्स भांडवलदाराच्या जीवनाला अनैतिहासिक मानीत नाहीं. भांडवलदारांनीं मोफत मिळणाऱ्या श्रम-मूल्याच्या लोभानें जी माणसाची धनोत्पादनशक्ति वाढविली त्यामुळेंच आतां विपुल धन निर्माण होणें शक्य होऊन अधिक उच्च अशा भूमिकेवर समाजाची उभारणी होईल असें मार्क्सनें भांडवलशाहीचें ऐतिहासिक दृष्ट्या समर्थनही केलें आहे. पण भांडवलदार व भांडवलशाहीचे अर्थशास्त्रज्ञ आपण ही समाजरचना व्यक्ति-स्वातंत्र्य, समता, बंधुभाव यावर आधारीत आहों असें म्हणतात त्यांना उत्तर देण्यासाठीं, नैतिक अन्यायाचा व सामाजिक विषमतेचा मुद्दा मार्क्सनें मांडला आहे. अर्थात् यांतली केवळ वावदूकतेची दृष्टि ही गौणच होय. नैतिक अन्या-याची आणि सामाजिक दुःखाची चीड ही स्वतः मार्क्सला कम्युनिझमचा विचार करायला लावण्याला कारण झाली असून समाजक्रांतीचें कार्य ज्या कामगारांनीं करावयाचें त्यांना क्रांतिकारक कार्य करण्यास चेव यावा आणि वर्गबंधुत्वाची भावना त्यांच्या ठिकाणीं जागृत व्हावी यासाठीं त्यानें कामगारदुःखांचीं वर्णनें हृदयद्रावकतेनें ‘ कॅपिटल ’मध्यें केलीं आहेत.

## सोन्याचें अंडें घालणारी हंसी

विक्रीमालाचें पृथक्करण करून भांडवलशाही तत्त्वज्ञांची समाजकल्पना फोल ठरविल्यावर भांडवलशाही तत्त्वज्ञांच्या विचारपद्धतीनेंच भांडवलशाही व्यवहाराची मीमांसा पुढें चालवून समतेच्या पांघरुणाखालीं विषमता कशी नांदते आहे आणि भांडवलदारवर्ग कामगारांचें फुकट श्रम जे घेतो ते त्याला कसे शक्य होतात याचें मार्क्सनें संशोधन केलें आहे. विक्रीमालाच्या बाजारांत जो क्रयविक्रय होतो तो सामान्यतः सारख्यास सारखा असा होतो हें मान्य करून व तेंच सूत्र हातीं धरून मार्क्स आपली वाट काढीत आहे. बाजारांत जर सारख्यास सारखें दिलें घेतलें जातें तर नफा भांडवलदाराला मिळतो तो कोठून मिळतो अशी शंका त्यानें उपस्थित केली आहे. शेतकरी

धान्य विकून पैसे मिळवितो आणि पैसे देऊन कापड घेतो. त्या कापडाचा तो उपभोग घेऊन टाकतो. ज्यानें त्याचें धान्य घेतलें तो तें धान्य खाऊन टाकतो आणि दोघेही नवीन उत्पादनाचे श्रम करण्यास पुन्हा तयार होतात. कारखानदाराचें म्हणजे भांडवलदाराचें असें होत नाहीं. तो पैसे देऊन कच्चा माल हत्यारें, मजूर वगैरे विकत घेतो व त्यांच्या मार्फत पक्का माल तयार करून विकतो. त्यानें या खरेदीसाठीं घातलेल्या पैशापेक्षां त्याला पक्का माल विकून अधिक पैसे मिळतात. ते कोठून आले ? असा मार्क्सचा प्रश्न आहे. देखरेखीचा खर्च वगैरे सर्व मार्क्सनें विचारांत घेतला आहे. ‘ कामगार ’ या शब्दांत मजूरी घेऊन बौद्धिक श्रम करणारे जे लोक त्यांचा समावेश मार्क्सनें जरूर केला आहे. ‘ तरी पण नफा उरतो तो कोठला ? ’ अशी शंका तो घेतो आहे. जें एकीकडून खरेदी केलें तेंच परत विकलें. दरम्यान त्याचें रूपांतर झालें, तरीपण एकूणांत त्याची किंमत कां वाढावी असा प्रश्न मार्क्स मांडतो आहे. आणि कारखानदारानें खरेदी केलेल्या अनेक मालांपैकीं एकादा माल परत विकण्यापूर्वी सोन्याचें अंडें घालणाऱ्या हंसीप्रमाणें आपलें मूल्य वाढवितो कीं काय याचा तपास त्यानें केला आहे. मजूराची श्रमशक्ति ही आपलें मूल्य वाढविणारी हंसी होय असें उत्तर मार्क्सला सापडलें आहे. मागील प्रकरणांत याची उपपत्ति स्पष्ट केलीच आहे. भांडवलशाहीपूर्वी बाजारांत आपलें कापड विकण्यासाठीं येणारा कोष्टी-धंदेवाला आणि भांडवलशाहींत भांडवलदारास स्वतःला विशिष्ट मुदतीपुरतें विकून घेणारा कोष्टी-मजूर यांत मार्क्सनें फरक केला आहे. कोष्टी-धंदेवाला आपण विणलेलें कापड गिऱ्हाइकास विकतो. तेव्हां तो आपलें श्रमफल म्हणजे आपल्या श्रमाचें मूर्तस्वरूप म्हणजे एक प्रकारें श्रमच विकतो. पण कोष्टी-मजूर श्रम विकीत नाहीं. कारण त्यानें आपले श्रम अजून करावयाचे असतात. श्रम केल्यावर जें फल निर्माण होतें तें फल भांडवलदाराच्या मालकीचें झालेलेंच असतें. भांडवलदार जी मजूरी देऊं करतो तिच्याशीं या श्रमफलाच्या किंमतीचा कांहींही संबंध नसतो. मजूरांची मजूरी ठरते ती त्यांच्या नोकरी मिळविण्यासाठीं आपसांत चाललेल्या चढाओढीनें ठरते. यामुळें चरितार्थाला कमींतकमी लागेल एवढ्या मजूरीवर कामगार काम करतो. मजूरीनें मिळणाऱ्या धनानें त्याची स्वतःची सध्यांची श्रमशक्ति आणि मुलें पोसण्याची शक्ति म्हणजे भावी काळची श्रमशक्ति निर्माण होते. अर्थात् ही श्रमशक्ति तो भांडवलदाराला

विकतो. ती आपल्या उत्पत्तीस लागणाऱ्या मूल्याहून अधिक मूल्य उत्पन्न करणारी हंसी आहे. कोष्टी-धंदेवाला जेव्हां स्वतःचा माल स्वतः विकीत असेल तेव्हां त्याला हें वाढलेलें मूल्य त्याचें त्याला मिळत होतें असें मानलें तर आतां कारखानदार हें वरकड मूल्य आपण लाटतो. भांडवलशाहीच्या आरंभीचे हस्तव्यवसाय संघटित करून श्रमविभागाच्या तत्त्वाच्या अवलंबानें भांडवलदार कामगाराची श्रमशक्ति कशी वाढवितो व कामगाराची मजूरी मात्र न वाढवितां फक्त आपला वाढावा तेवढाच कसा वाढवीत असतो, हें मार्क्सनें 'कॅपिटल'मध्यें विशद केलें आहे. हा इतिहास सांगतांना मानवजातीवर भांडवलशाहीमुळें कोसळणाऱ्या दुःखांचीं जीं वर्णनें त्यानें केलीं आहेत तीं भांडवलशाहीचें फक्त ऐतिहासिक समर्थन होईल पण नैतिक समर्थन होणार नाहीं हें दाखविण्यासाठीं आणि समाजक्रांतिकार्यास कामगारांना प्रवृत्त करण्यासाठीं केलीं आहेत. स्वतः मार्क्सच्या हृदयाचा तो स्वयंस्फूर्त आविष्कारही आहे. भांडवलशाहीचा विकास वर्णितांना पहिल्यानें जे हस्तव्यवसाय भांडवलशाहीनें हाताशीं धरले त्यांच्या चौकटींत भांडवलशाहीउत्पादनाची प्रथम वाढ झाली पण पुढें कोंडी होवूं लागली त्याबरोबर ते हस्तव्यवसाय मोडून भांडवलशाहीनें यांत्रिक उत्पादन सुरूं केलें ही विरोधानें विकास होत जाण्याची पद्धति त्यानें भांडवलशाहीस लावून दाखविली आहे.

## माल्थसला उत्तर

लोकसंख्या वाढल्यामुळें मजूरांची हलाखी वाढते या रिकार्डो व माल्थसच्या मुद्याला मार्क्सनें दिलेलें उत्तर समर्पक आहे. मजूरांची मजूरी जी ठरते ती मजुरांची संख्या गरजेहून अधिक आहे कीं कमी आहे यावरून ठरते. मजुरांची संख्या ही नेहमीं गरजेहून अधिक असली म्हणजे त्यांची मजूरी कमींत कमी दरावर ठेवता येतें म्हणून बेकार मजूराचें राखीव सैन्य भांडवलशाहीस नेहमीं जय्यत तयार हवें असतें. हें बेकारांचें सैन्य नेहमीं उपलब्ध असावें यासाठीं मजूरांची गरज कमी करण्याचे उपाय भांडवलशाही नेहमीं शोधतें व या उपायचिंतनांतच यंत्रांचा—अधिकाधिक सुधारलेल्या यंत्रांचा जन्म होतो. वाढावा नेहमीं नेहमीं भांडवलांत पडत असून भांडवल व त्याबरोबरच उत्पादनसाधनें आणि कामगारांची उत्पादनशक्तिही वाढत असतात. याबरोबरच

कामगाराचें दुःखही वाढत असतें. कामगार संघटित होत असतात. भांडवलदार आपसात एकमेकाला फाडून खात असतात. लहान भांडवलदाराला मोठा खातो, त्याला त्याच्यापेक्षां मोठा असेल तो खातो आणि अशा प्रकारें धनाचें केंद्रीकरण होता होता शेंकडा नव्वद लोक कफल्लक होतात. मग कामगारांनीं उरलेल्या १० धनिकांना कफल्लक करायचें असतें. हीच समाजवादी क्रांति होय.

## भांडवलशाहीचा गतिसिद्धांत

पण अशा प्रकारें कामगारांनीं भांडवलशाहीविरुद्ध बंड केलें नाहीं तर भांडवलशाही टिकूं शकेल काय ? या प्रश्नाचें मार्क्सनें दिलेलें उत्तर हाही त्यानें लावलेला एक अपूर्व शोध होय. वरकड मूल्य ऊर्फ वाढावा म्हणजे मजूराकडूनच उत्पन्न होत असल्यानें व भांडवलदारांची प्रवृत्ति धनोत्पादनसाधनें वाढवून त्या प्रमाणांत मजूरांची संख्या कमी करण्याची असल्यानें एकूण भांडवलाच्या प्रमाणांत नफाही कमी कमी होत जात असला पाहिजे असें मार्क्सचें म्हणणें आहे. आणि हें म्हणणें थोडा विचार केला असतां सहज पटणारेंही आहे. उत्पादनसाधनें वाढवून भांडवलदार मजूरांची उत्पादनशक्ति वाढवीत असतो. त्या प्रमाणांत मजूरांची संख्या कमी होत गेली तरी नफ्याचें प्रमाण कायम राहूं शकेल हें खरें, पण अखेर उत्पादनसाधनें म्हणजे यंत्रें वगैरे बनविण्याच्या कारखान्यांचा म्हणजे उत्पादनसाधनांचाच खर्च इतका अफाट होत जातो कीं त्या प्रमाणांत मजूरांची संख्या कमी होते, स्थिर भांडवलाच्या प्रमाणांत चर भांडवल कमी होत जातें. पण स्थिर भांडवल हें वाढावा देत नाहीं. नेहमीं जितक्याचें तितकेंच राहतें आणि मजूरांपासून पिळून काढावयाचा वाढावा एकंदर भांडवलाच्या प्रमाणांत कमी कमी होत जातो, म्हणजेच नफ्याचा दर उतरतो असें मार्क्सचें म्हणणें आहे. मार्क्सनंतरच्या भांडवलशाहीच्या इतिहासांत हा अनुभवही आला आहे. पण हा नफ्याचा दर घटता घटता अखेर भांडवलशाही आपल्या अंगभूत आर्थिक गतिसिद्धांतानेंच कोलमडून पडलीच पाहिजे असें मार्क्सनें पूर्णतया सिद्ध केलेलें नाहीं असें मॉरिस डॉबचें मत असल्याचें मागें उल्लेखिलेंच आहे. मार्क्सनें कॅपिटलचे पुढील दोन खंड पूर्ण केलेले नाहींत पण भांडवलशाही कोलमडून पडेलच असें स्पष्ट मार्क्सनें मांडलें नाहीं याचें कारण हा अपुरेपणा होय असें कोणी म्हणेल तर हें म्हणणें डॉबला पटत नाहीं.

त्याच्या मतानें असें निर्णायक भविष्य सांगणें हें मार्क्सला अभिप्रेत नव्हतेंच. भांडवलशाहीचा गतिसिद्धांत सांगणें एवढेंच त्याला करावयाचें होतें. आणि माणसाची उत्पादनशक्ति वाढवीत असतांच भांडवलशाही उत्तरोत्तर माणसाचीं दुःखें व बेकारी वाढवून कामगारवर्ग या आपल्या शत्रूस आपल्याच पोटांत उत्पन्न करते, हळू हळू कफल्लकांची संख्याहि फुगत जाते, नफ्याचा खालीं खालीं जाणारा दर वर वर खेचून धरण्याच्या भांडवलदारांच्या उद्योगांत शेकडों भांडवलदारांची धूळदाण होते, आर्थिक व्यवहारांत जणू कांहीं जागतिक प्रमाणावर महायुद्धच माजते व भांडवलशाहीची भरभराट आतां होण्याची शक्यता संपली असें वाटूं लागतें इतका गतिसिद्धांत त्यानें सांगितला आहे. अशा परिस्थितींत भांडवलशाहीनें कफल्लक, जागृत व संघटित केलेले कामगार भांडवलशाही खलास करतीलच असा मार्क्सचा अंदाज असून तोही भांडवलशाहीच्या गतिसिद्धांताचाच भाग आहे असें मार्क्स सुचवितो. मानवी समाजक्रांतीच्या विचारांत मार्क्सचा भर मानवी कर्तृत्वावर विशेष असल्यानें ' भांडवलशाहीचा अंगभूत गुण अखेर माणसावर संकटें आणणारा, आणि प्रथम माणसाची उत्पादनशक्ति वाढवून अखेर त्याच उत्पादनशक्तीवर उलटणारा आहे, त्याचा नाश करणें तुला इष्ट आहे आणि शक्यही आहे ' असें कामगाराला मार्क्स सांगतो आहे.

निवळ आर्थिक दृष्टीनें पाहतां भांडवलशाही आपल्या अंगभूत गुणांनीं म्हणजे तिच्या गतिसिद्धांतानेंच ठार झाली पाहिजे असें मार्क्सनें म्हटलेलें नाहीं हें डॉबचें म्हणणें कबूल केलें तरी भांडवलशाहीच्या केवळ अंगभूत गुणांनीं ही भांडवलशाहीची वाढ खुंटूं शकते असें दाखविणें फारसें कठिण नाहीं. कारण उत्पन्न होणाऱ्या भांडवलशाही मालाहून जगांतील समाजांत मजूरी ऊर्फ खरेदीशक्ति कमी वाटली गेली तर माल न खपता पडून राहणार आणि या अंगभूत दोषानेंच भांडवलशाहीची वाढ खुंटणार आहे. हा मुद्दा मी अन्यत्र तपशीलानें मांडला आहे. तो उतारा थोडा फरक करून येथें देतो.

## धनाचे दोन प्रकार

आपण ज्या ज्या वस्तुजातास ' धन ' असें म्हणतों त्याचे स्थूलतः दोन प्रकार होतात, एक ' भोग्य धन '. उदाहरणार्थ आपण डाळतांदूळ खातों, पुस्तकें वाचतों, कपडे अंगांत घालतों, सिनेमा पाहतों; हें जें भोगकार्य आपण करीत

असतों तेथें तें धन 'भोग्य धन' असें म्हणावें लागतें. पण आपण पुढील सालच्या बियासाठीं कांहीं धान्य बाजूस काढून ठेवतों. शेतकरी सुतारापासून नांगर, कुळव करून घेतो, शेतीसाठीं बैल विकत घेतों, छापखानेवाला छापखान्याचें साहित्य आणतो, गिरणीवाला कारखान्यांचीं यंत्रें बनवितो वगैरे हा सर्व धनप्रकार म्हणजे 'धनोत्पादक धनप्रकार' अथवा संक्षेपानें 'उत्पादक धन' या सदरांत पडेल. आगगाड्यांतून कांहीं लोक चैनीनें प्रवास करतात. तर दुसरे कांहीं लोक आगगाड्यांचा उपयोग धनोत्पादनाकडे करतात. म्हणून कांहीं धन हें 'भोग्य' व 'उत्पादक' या दोनहीं सदरांखालीं पडेल. पण एकंदरींत सर्व धनाचे वरीलप्रमाणें स्थूलतः दोन प्रकार कल्पिण्यास त्यानें कांहीं बाध येत नाहीं. यांपैकीं भोग्य धन हें नेहमीं भोगलें जाऊन संपत राहणार व उत्पादक धनाच्या साहाय्यानें पुनः पुन्हा जें उत्पादक व भोग्य या दोनही प्रकारचें धन निर्माण होत राहील त्यांतील भोग्य धन पूर्वी भोगून संपलेल्या धनाची जागा भरून काढणार. तसेंच उत्पादक धनही वापरून संपत जाणार व त्याची जागा नवीन उत्पन्न होणारें उत्पादक धन भरून काढणार.

## गणित चुकतें

आणि जगाचा आर्थिक व्यवहार सुरळीत चालावयाचा म्हणजे उत्पादक धनानें भोग्य धन निर्मून माणसाच्या मुखीं घालावें, माणसानें उत्पादकधनाच्या साह्यानें भोग्य धन व उत्पादकधन पुनःपुन्हा गरजेप्रमाणें उत्पन्न करावें हें इष्ट होय. असें चालू असतां माणसास उत्पादनसाधनांच्या साहाय्यानें, त्यांची सुधारणा झाल्यामुळें, जर पूर्वीपेक्षां अधिक धन निर्माण करतां येऊं लागलें तर त्यानें वाटल्यास दुप्पट उपभोग घ्यावा किंवा वाटल्यास कामाचा वेळ निमा करावा. गेल्या वर्षी माझ्या शेतांत शंभर मण धान्य पिकलें, पण यंदा मी खतांत सुधारणा केल्यामुळें व यांत्रिक नांगर वापरल्यामुळें २०० मण धान्य पिकलें, तर गेल्या वर्षीपेक्षां दुप्पट माणसें मला पोसतां येतील किंवा एक वर्षभर मी शेताची मशागत बंद ठेवीन; हें गणित ध्यानांत घेतलें असतां गेल्या १५।२० वर्षांत माणसाचें उत्पादनसामर्थ्य जें सरसकट दुप्पट झालें आहे त्यामुळें माणसाची सुबत्ता दुप्पट वाढली असली पाहिजे अथवा कामाचे तास निम्मे कमी झाले असले पाहिजेत असें वाटतें. पण असें न होतां कोट्यवधि

लोक रोजगारधंदा नाहीं म्हणून उपाशीच राहात आहेत हें आपणांस दिसून येतें. असें हें गणित कां चुकावें ? 'बेकारी कां वाढली ?' असा प्रश्न भांडवलवाल्यांना केला कीं, ते म्हणतात, 'बाजारांत मालास गिऱ्हाईक नाहीं म्हणून माल पडून राहतो, म्हणून नवीन निर्माण करणें शक्य होत नाहीं, म्हणून मजूर कमी करावे लागतात व बेकारी वाढते.' पण बाजारांत माल पडून कां रहातो ? असा प्रश्न विचारला असतां अर्थशास्त्रज्ञ सांगतात की, 'बेकारी व कमी रोजगारी यांमुळें लोकांजवळ माल खरेदी करण्याची शक्ति नाहीं, म्हणून माल पडून राहणारच.' तेव्हां माल खपत नाहीं म्हणून बेकारी माजते व बेकारी माजते म्हणून माल पडून राहतो असें हें वेडसर उत्तर आपल्या हातीं लागतें.

## मजूरीचें आवश्यक माप

पण या वेडांतच आपणांस हव्या असणाऱ्या शहाण्या उत्तराची किल्ली आहे. कशी तें पहा. एकदां जो पैसा-अडका मजुरी, पगार हें रूप धारण करून माल उत्पन्न करण्याचें काम करणाऱ्याच्या हातीं येतो तोच पुनः माल खरेदी करणाऱ्याची शक्ति या रूपानें मजुरांकडून माल विकणाऱ्या मालाच्या मालकाकडे जातो. दरम्यान अधले मधले लोक पुष्कळ असतील. पण माल निर्माण करणारा मजूर-कारकूनवर्ग मालाच्या मालकांपासून जी मजुरी, पगार मिळवितो तीच परत त्यास देऊन तो माल खरेदी करतो असें स्थूलमानानें म्हणण्यास हरकत नाहीं. मालाचा मालक सर्वच निर्माण झालेला माल विकावयास काढीत नाहीं. वर वर्गीकरण केल्याप्रमाणें मालाचा जो 'उत्पादक' माल असेल तो पुढील उत्पादनासाठीं राखून ठेवून 'भोग्य' माल असेल तेवढाच गिऱ्हाइकांपुढें मांडील. हा 'भोग्य' माल सगळा खपेल तरच नवीन माल उत्पन्न करणें मालाच्या मालकांस शक्य होईल हें खरें. पण तो मालाचा मालक मजूर-कारकुनांस बाजारांत उद्यां मांडल्या जाणाऱ्या भोग्य मालाच्या किंमतीइतकी मजुरी देईल तरच मजूर-कारकून गिऱ्हाईक या नात्यानें त्या सर्व मालाची खरेदी करील. यावरून मजुरी अथवा पगार श्रम करणाऱ्यांना किती मिळावा याचें माप ठरतें. श्रम करून भोग्य व उत्पादक माल निर्माण करणाऱ्यांना त्यांपैकीं भोग्य मालाची खरेदी करण्याइतकी मजुरी अथवा पगार मिळणें अवश्य आहे. उत्पादक व भोग्य माल निर्माण करणाऱ्यांची मजुरी व भोग्य मालाची किंमत हीं

सारखीं पाहिजेत असें हें मजुरीचें आवश्यक माप आहे. ही किंमत व ही मजुरी सारखी असतील तर बाजारांत माल पडून राहिला म्हणून बेकारी वाढली व बेकारी वाढली म्हणून बाजारांत माल पडून राहिला असें वेडसर बोलणें बोलण्याची गरज राहणारच नाहीं. असें बोलावें लागतें याचें कारण बाजारांत येणाऱ्या भोग्य मालाच्या किंमतीपेक्षां मजुरांकारकुनांस मजुरी कमी मिळते हेंच होय.

## वाढावा कसा उत्पन्न होतो

एकूण मालाच्या मूल्यापेक्षां मजुरी जितकी कमी मिळते तितक्याला कम्युनिस्ट शास्त्रज्ञ 'वाढावा' (सर्प्लस व्हॅल्यू) म्हणतात. खुल्या बाजारांत मालाची जी खरेदी-विक्री होते, तेथें गिऱ्हाइक व दुकानदार हे दोघे क्रयविक्र-यास पूर्ण स्वतंत्र असतात व एकमेकांस सारखेच अडवूं शकतात. यामुळें माल व किंमत यांची सारखेपणानें अदलाबदल होते असें भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांचें मत असतें. मजुरांच्या बाजारांत मजूर व भांडवलदार हे एकमेकांपुढें दुकानदार व गिऱ्हाईक म्हणून उभे राहतात. मजुरांची मजुरी ही त्यांनीं निर्माण केलेल्या मालापैकीं भोग्य मालाच्या किंमतीइतकी असली पाहिजे असें आपण आतांच म्हटलें, पण ती तशी असत नाहीं, कमी असतें हेंही आपण पाहिलें. मग मजुरीचा करार करण्यास बाजारांत आलेला मजूर ही कमी मजुरी कां पत्करतो, असा प्रश्न उद्भवतो. त्यांचें उत्तर असें आहे, कीं भांडवलदार जेव्हां मजुरापुढें स्वतां नेमून घेण्यास उभा असतो त्या वेळीं त्याच दिवशीं मजूर नेमला गेला नाहीं तरी भांडवलदाराचें चालण्यासारखें असतें. तो सधन असतो. भांडवलदारास योग्य वाटणाऱ्या मजुरीवर मजूर न आल्यास तो पगडी डोईवर ठेवून घरीं चालता होतो. पण मजूर कफल्लक असतो. त्यास त्या दिवशीं मजुरी नसल्यास फाके पडण्याची भीति असते; म्हणून तो अमुक एक मजुरी द्याच असा हट्ट धरूं शकत नाहीं. त्या त्याच्या अडलेल्या परिस्थितीचा फायदा भांडवलदार घेऊन भावी भोग्य मालाच्या किंमतीपेक्षां कमी मजुरीवर तो मजुरास नेमतो. बाजारांत क्रयविक्रयाचें उभयपक्षांचें मानीव स्वातंत्र्य प्रत्यक्ष व्यवहारांत फक्त येथें भांडवलदारांसच राहतें मजुरास राहत नाहीं. अशा प्रकारें भांडवलदारास वाढावा मिळून भांडवलशाहींतील विषमतेस येथून सुरवात होते.

## आजवर कसें चाललें

बरें, भांडवलदार तरी भोग्य मालाच्या किंमतीहून मजुरास कमी मजुरी देऊन आपला सर्व माल खपविण्याची तजवीज कशी करणार? कारण हीच मजुरी जर खरेदीशक्ति म्हणून बाजारांत येणार तर ती सर्व माल खरेदी करूं शकणार नाहीं हें भांडवलदारांस कळत नाहीं काय? याचें उत्तर भांडवलशाहीच्या इतिहासांत सांपडतें. भांडवलशाहीच्या जन्मकाळीं निरनिराळ्या धंद्यांचें संघ असत. त्यांची उत्पादनाचीं साधनें व संघटना मागासलेली होती. भांडवलवाल्यांनीं निरनिराळ्या मजूरांत सहकार्य सुरू करून व पुढें यंत्रें उत्पन्न करून उत्पादनसाधनें व संघटना यांचें सामर्थ्य वाढविलें. यामुळें पूर्वीच्या उत्पादन-खर्चांतच अधिकाधिक उत्पन्न होऊं लागलें. यामुळें भांडवलदाराचा माल स्वस्त पडूं लागला व जुन्या धंदेवाल्यांचें गिऱ्हाईक भांडवलदारांस मिळूं लागले. याचा परिणाम असा झाला, कीं भांढवदारांचा भोग्य माल त्यांच्याच मजूरांनीं त्यांना मिळणाऱ्या कमी मजुरीनें अंशतः खरेदी केला तरी उरलेल्या मालास मागासलेल्या धंदेवाल्यांचें गिऱ्हाईक मिळालें, व या नव्या गिऱ्हाइकांकडून किंमतरूपानें मिळणारा पैसा भांडवलदारांस नफा म्हणून मिळूं लागला. अर्थात् तितक्या प्रमाणांत जुने धंदेवाले बुडाले व मजुरांची संख्याही वाढली. मजूर हे चरितार्थास लागेल त्याहून कमी मजुरीवर कामास येणें अशक्य होतें. तेवढी मजुरी त्यानीं घेतलीच; पण भांडवलदारानें उत्पादन-परिस्थितीच्या केलेल्या संघटनेमुळें व सुधारलेल्या उत्पादनसाधनामुळें मजूराची उत्पादनशक्ति त्याला चरितार्थास लागेल त्याहून पुष्कळच अधिक धन निर्माण करण्याइतकी वाढली. उत्पन्न झालेल्या भोग्य धनांतून मजुरानें आपल्या चरितार्थापुरतेंच खरेदी केल्यावर ( कारण त्याची मजुरी म्हणजे खरेदीशक्ति चरितार्थसंपादनापुरतीच आहे ) जें उरलें ( वाढावा ) तें भांडवलदाराने मागासलेल्या धंदेवाल्यांच्या गिऱ्हाइकांस विकलें व या वाढाव्याची किंमत हा भांडवलवाल्यांचा नफा राहिला. या नफ्याचे जोरावर भांडवलदारानें बुडालेल्या धंद्यांतले मजूर आणखी नेमले व प्रत्येक वेळीं वाढावा विकण्यासाठीं दूरदूरचे मागासलेले धंदे बुडवून नवे नवे गिऱ्हाइक मिळविलें.

## अगतिकता कोठें आली

हें नवें नवें गिऱ्हाइक जोंवर मिळत होतें तोंवर वाढाव्याचा माल खपत राहिला व म्हणून नवीन निर्माण होत राहिला. निरनिराळ्या भांडवलदारांची व निरनिराळ्या भांडवलदार राष्ट्रांची या कामीं स्पर्धा सुरू झाली व हें बाहेरचें गिऱ्हाइक कायमचें आपणांसच मिळावें, म्हणून त्यांची युद्धें झालीं. वाढावा विकण्यासाठीं हें बाहेरचें गिऱ्हाईक मिळत राहिलें तोंवर माल पडून राहण्याचें संकट कधींच फार काल टिकलें नाहीं. पण आतां जगांत अशी वेळ आली आहे कीं, सर्व राष्ट्रांत व साऱ्या जगांत धनोत्पादक साधनांचे मालक म्हणजे भांडवलदार व त्यावर ठरलेल्या मजुरीनें रावणारे मजूर अशी जवळ जवळ साऱ्या जगांतील मानवजातीची वाटणी झाली आहे. जगांतील भांडवलदारांचा जो भोग्य माल बाजारांत येतो त्याला आतां त्यांच्या जगांतील मजूरांबाहेरचें गिऱ्हाइक उरलें नाहीं. हे मजूर त्यांना भोग्य मालाच्या किंमतीहून कमी अशी जी मजुरी मिळते तिच्याइतकाच माल खरेदी करूं शकतात. बाकीचा माल पडून राहतो. तो खपत नाहीं म्हणून नवीन निर्माण होत नाहीं व बेकारी वाढते. म्हणून परत माल खपत नाहींसा होतो व परत बेकारी वाढते आणि या भोंवऱ्यांतून मानवजात बाहेर पडूं शकत नाहीं. यासाठीं भांडवलदार राष्ट्रें दुसऱ्यांच्या प्रदेशांवर हल्ले करून दुसऱ्याचें गिऱ्हाईक मिळविण्यासाठीं झटतात व त्याचा परिणाम युद्धांत होतो. याला भोग्य मालाच्या किंमतीइतकी मजुरी देणें व भांडवलदारानें नफा मिळविण्याचें बंद करणें हाच उपाय आहे हें साध्या गणितानें कळतें. पण धनोत्पादक साधनांचा म्हणजे यंत्रें, कारखाने, जमिनी यांचा मालक जो भांडवलदार तो नफा मिळणार असल्याशिवाय या साधनांचा वापरच करूं देणार नाहीं, एखादी गोष्ट गणितानें सिद्ध होते म्हटल्यानें तो ऐकणार नाहीं, म्हणून त्याचीं धनोत्पादक साधनें समाजानें कायदेशीरपणें जप्त करणें हें समाजाचें कर्तव्य ठरतें असें कम्युनिस्टांचें म्हणणें आहे.

## कवच फोडा

सारांश नफ्याच्या लोभानें भांडवलदारानें यंत्रें व शास्त्रें यांचा उपयोग करून माणसाची उत्पादनशक्ति वाढविली हें खरें. त्यामुळें मानवसमाजाचा फायदा झाला हेंही निःसंशय. पण आज नफा मिळणें बंद होताच भांडवलदार

उत्पादक साधनें अडवून ठेवून बेकारी वाढवीत आहेत, लोकांना खायला अन्न व पांघरायला वस्त्र नसतांही मालाची नासधूस करीत आहेत, यामुळें भांडवलशाहीची विकासक्षमता संपली असून यापुढें भांडवलशाहींत मानवसमाजाचा विकास न होतां पीछेहाट, ऱ्हास होणार असल्यानें भांडवलशाहीचें कवच फोडून मानवसमाजानें बाहेर पडलें पाहिजे हें मत कम्युनिझमचें सार आहे. कोंबडीच्या अंड्याचें कवच आंतल्या पिलाच्या वाढीस पुष्कळ काल अवश्य असतें. पण अंड्यांत होण्यासारखी वाढ होऊन गेल्यावर स्वत: विकास न पावणाऱ्या अंड्यांत तें पिलूं राहिल्यास तें मेल्यावांचून राहणार नाहीं; म्हणून पिलाच्या विकासासाठीं अंडें फोडून त्यास बाहेर काढावें लागतें, याच न्यायानें मानवजातीच्या विकासासाठीं त्यावरील भांडवलशाहीरूपी कवच फोडण्याची वेळ आतां आली आहे. तथापि अशी क्रांति टाळून भांडवलशाही टिकविण्याचा उपाय माल्थसनें सुचविला आहे. समाजांत जमिनदारासारखा एक फुकटखाऊ वर्ग ठेवला म्हणजे तो उर्वरित धन खरेदी करून फस्त करील असें माल्थस सांगतो. जे. ए. हॉब्सन यानें यापुढें खुशालचेंडू लोकांच्या वसाहती वाढून ते हें उर्वरित धन फस्त करतील असें सुचविलें आहे. याचा अर्थ केवळ अंगभूत गुणांनीं भांडवलशाही मरेलच असें नाहीं. कुचंबत राहीलही. तिचा नाश करायचा तर कामगारांनीं शस्त्र उचललें पाहिजे हाच मार्क्सचा सिद्धांत पत्करावा लागतो.

## स्मिथ आणि मार्क्स

मार्क्सनंतर भांडवलशाहीचा जो विकास झाला व एकंदर भांडवलशाही विकासाचें जें संशोधन झालें त्यावरून भांडवलशाहीसंबंधानें मार्क्सनें सांगितलेला गतिसिद्धांत अधिकाधिक दृढ होत आहे. ॲडम स्मिथ हा भांडवलशाही अर्थशास्त्राचा जनक होय. तो यांत्रिक उत्पादनपद्धतीचें स्वरूप त्यास स्पष्टपणें कळून येण्यापूर्वी मरूनही गेला होता. अनेक लहान लहान स्वतंत्र भांडवलदारांचा समाज त्याचे डोळ्यापुढें दिसत होता. मालक आणि मजूर हा संबंध त्याला दिसला होता तरी श्रमविभागपद्धतीनें उत्पादन केलें असतां कामगारांचें उत्पादनसामर्थ्य वाढतें व समाजोपयोगी धनाची लयलूट होते, यासाठीं एकेका मालकाच्या नियंत्रणाखालीं अनेक मजूरांकडून उत्पादन होवूं लागलें व त्यामुळें उत्पादनाचें थोडेंसें केन्द्रीकरण झालें तरी व्यक्तिस्वातंत्र्याचा नाश त्यानें होत

नाहीं, कामगारांची संख्या भांडवलदारांना कमी पडूं लागली कीं कामगारांची मजूरी वाढूं शकेल, भांडवलदारांच्या माल खपविण्याच्या आपसांतील चढाओढींत गिऱ्हाइकास माल स्वस्त मिळूं शकेल, माल स्वस्त विकण्याच्या चढाओढीमुळें भांडवलदार कामगारांची उत्पादनशक्ति वाढवितील आणि या सर्वांमुळें आपोआप सुबत्ता व सुसंस्कृति यांची वाढ होईल असें ॲडॅमस्मिथला वाटत होतें. याच चढाओढीचें तत्त्व प्रत्यक्ष अमलांत येऊं लागलें म्हणजेच व्यक्तिस्वातंत्र्याचा कसा लोप होतो, संपत्तीचें केन्द्रीकरण होता होता बहुसंख्य समाज कफल्लक होवून मूठभर लोकांच्या हातीं धनोत्पादनाची हक्कदारी कशी जाते हें मार्क्सनें कॅपिट्लमध्यें दाखविलें. पण मार्क्सनें कॅपिट्लमध्यें चर्चा करतांना भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांची तत्त्वें होतीं तशीं गृहीत धरून त्यांच्या अंमलबजावणीचे परिणाम सांगितले. व्यक्तिस्वातंत्र्य व चढाओढ यांची परिणति अखेर आर्थिक हक्कदारींत होते, ज्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या आश्रयानें भांडवलशाहीचा प्रथम विकास होत जातो तेंच व्यक्तिस्वातंत्र्य भांडवलशाहीचा कोंडमारा करूं लागताच व्यक्तिस्वातंत्र्याची मान मुरगाळून भांडवलशाही आर्थिक हक्कदारीच्या मार्गानें आपली प्रगति करून घेत असते असें मार्क्स दाखवितो. ज्याला ॲडॅमस्मिथ आर्थिक व्यक्तिस्वातंत्र्य म्हणतो ती मुळांत बहुसंख्य समाजाचे बाबतींत आर्थिक उपासमारी व आर्थिक कोंडी असते हा मुद्दा मार्क्सनें 'कॅपिट्ल' मध्यें विशेष जोर देऊन मांडला आहे.

## दुहेरी स्वातंत्र्य

बहुसंख्य कामगारांचे बाबतींत हें आर्थिक व्यक्तिस्वातंत्र्य दुहेरी असतें असें मार्क्स उपरोधिकपणें सांगतो. कामगाराला सरंजामशाही अथवा गुलामगिरी या समाजव्यवस्थेंतलें दास्याचें बंधन भांडवलशाहीचे वेळीं राहिलेलें नसतें. आपली श्रमशक्ति कोणासही कोणत्याही किंमतीला विकण्यास तो स्वतंत्र असतो. पण त्यास दुसरेंही एक 'स्वातंत्र्य' असतें. म्हणजे जमीन, हातमाग अथवा धनोत्पादनाचें कोणतेंही हत्यार अथवा साधन त्याचेजवळ त्याच्या मालकीचें नसतें. कोणत्याही मालकीच्या धनोत्पादनसाधनाच्या पाशापासूनही तो 'स्वतंत्र' असतो. या दुसऱ्या स्वातंत्र्याचें स्वरूप मोठेसें गोड नसून क्रूर आहे. उंच अंतरिक्षांत फिरणाऱ्या पक्ष्याला कशाचेंही बंधन नसतें. त्याच्या पंखांचा तो मालक असतो.

हे पंख त्यानें अंतरिक्षांत उघडे करून विहार करावा कीं ते मिटून धरावे हें ठरविण्यास त्याचा तो ‘ स्वतंत्र ’ आहे ! पण खरोखर असा ‘ स्वतंत्र ’ तो आहे का ? उडता उडता पंख थकले म्हणून त्यानें ते क्षणभर मिटले तर ? तर काय ? हजारों फूट उंच अशा अंतरिक्षांतून अदृश्य अशा गुरुत्वाकर्षणाच्या रज्जूनें तो पक्षी खेचला जाऊन भूतलावरील शिलाखंडावर त्याच्या शरीराचा चेंदामेंदा होईल. कामगाराला भांडवलशाहीच्या आरंभी जें दुसरें ‘स्वातंत्र्य’ असतें तें क्रूर असतें. भांडवलदारी अमदानापूर्वी कामगाराचीं मालकीचीं असलेलीं धनोत्पादनसाधनें हिरावलीं जावून त्यास हें स्वातंत्र्य मिळालेलें असतें. अंतरिक्षांतील पक्ष्याला जसा भूमीचा आधार नसतो, तसेंच कामगाराला चरितार्थाला आधारभूत असें कांहींच धनोत्पादनसाधन नसतें. यामुळें स्वतांची श्रमशक्ति विकण्यास अथवा न विकण्यास तो कायद्यानें स्वतंत्र असला तरी भुकेच्या अदृश्य बंधनामुळें त्याला श्रमशक्ति कमींत कमी मजूरी घेऊन विकावी लागते. व्यक्तिस्वातंत्र्य असतें फक्त भांडवलदाराला. बेकार मजूरांचें राखीव सैन्य नेहमीं हजर ठेवल्यानें मजूरांचीं मजूरी कमी होते हें ठाऊक असल्यानें भांडवलदार नेहमीं कमी मजूरांकडून अधिक काढून घेण्याचा यत्न करीत असतो याच क्रमांत यांत्रिक साधनांची वाढ होते. भांडवलदारांच्या आपसांतील चढाओढीमुळें अनेक भांडवलदार प्रत्यही कफल्लक होत जातात. सारांश व्यक्तिस्वातंत्र्यावर स्मिथनें आधारलेल्या भांडवलशाहीचा आरंभ कामगारांच्या नव्या गुलामागिरींतच झाला असून भांडवलशाहीच्या भरभराटीबरोबर व्यक्तिस्वातंत्र्याची भरभराट न होतां गळचेपी होत गेली असें मार्क्सनें दाखविलें आहे. कामगाराचें हें दुहेरी व्यक्तिस्वातंत्र्य ‘ नैसर्गिक ’ नव्हेच. पण तें सर्व काळांत आढळून येत नसल्यानें ‘ सामाजिक ’ ही नव्हे तर इतिहासांत फक्त विशिष्ट क्रमानेंच आलें असल्यानें केवळ ‘ ऐतिहासिक ’ आहे. हें दुहेरी स्वातंत्र्य भांडवलशाहीचा आधार होय. भांडवलशाही या दुहेरी स्वातंत्र्यामुळेंच अस्तित्वांत येऊं शकली म्हणून तीही नैसर्गिक अथवा सामाजिक नसून ऐतिहासिकच होय. इतिहासक्रमांत जशी ती आली तशीच ती नष्टहि होईल आणि नष्ट करावीहि लागेल असें मार्क्स सांगतो.

## उपसंहार : : : ४

### लोकशाहीचा खोटा देखावा

अॅडम स्मिथनें आपल्या आर्थिक व्यक्ति स्वातंत्र्याच्या तत्त्वावरून राजकीय क्षेत्राबाबतही महत्त्वाचीं अनुमानें सूचित केलीं आहेत. ज्याला राजकीय पारतंत्र्य म्हणता येईल असें पारतंत्र्य स्मिथच्या विचारसरणीअनुसार वास्तविक अजीबात अशक्यच झालें पाहिजे. पण भांडवलशाहीच्या आरंभापासूनच बहुसंख्य समाजाचें आर्थिक स्वातंत्र्य जसें नष्ट झालें तसेंच राजकीय स्वातंत्र्यही नष्ट होऊं लागलें. मार्क्सनें 'कॅपिटल' मध्यें भांडवलशाहीची केवळ आर्थिक मीमांसाच तेवढी केली असल्यानें तेथें राजकीय विषय आलेला नाहीं. पण मार्क्सच्या इतर वाङ्मयांत हा राजकीय गुलामगिरीचा मुद्दा प्रामुख्यानें आला आहे. ही राजकीय गुलामगिरी आर्थिक गुलामगिरीचा स्वाभाविक परिणामच होता. मध्ययुगांत राज्यकर्त्यांना राज्यकारभारासाठीं व स्वतःच्या चैनीसाठीं करभार व इतरही मार्गांनीं पैसा मिळविण्याची आवश्यकता असे, म्हणून मध्ययुगाचे शेवटीं राजे लोक युरोपांत व्यापाऱ्यांचे मिंधे होवूं लागले. राजांना आर्थिक चिमट्यांत धरून या व्यापाऱ्यांनीं सरंजामशाहीचा व शहरांतील कारागीर-संघांचाही पाडाव केला व राज्यसत्तेस पैशाची लगाम घातली. हळूहळू व्यापारी हेच भांडवलदार शेतकरी व कारखानदार झाले, तसतसे ते लोकशाहीचा पुरस्कार करूं लागले. पण याचा हेतु सरंजामदारांच्या कोंडवाड्यांतील जनता भांडवलशाहीच्या कोंडवाड्यांत घेणें एवढाच होता. इंग्लंडांत १८३२ च्या पार्लमेंट सुधारणेच्या कायद्यानें भांडवलदारवर्गाच्या हातीं राज्यसत्ता आली तिचा उपयोग त्यांनीं जनतेच्या

जीवनाची आर्थिक कैची करण्यासाठींच केला. पुढें जमिनदार वर्गानीं कामगारांची कड घेतल्यामुळें कामगारांचें जीवन थोडें सुखावह झालें. पण भांडवलदार व जमीनदार यांमधील विरोध इंग्लंडांत चालू शतकांत अजीबात नाहींसा झाला असून आतां मतप्रसाराचीं व धनोत्पादनाचींही साधनें धनिक वर्गाच्या हातीं असल्यामुळें राजकीय मतस्वातंत्र्य व आर्थिकस्वातंत्र्य हीं दोन्हीं इंग्लंडसारख्या देशांत नष्ट झालीं आहेत.

## खुल्या व्यापाराचें रहस्य

इंग्लंडसारख्या देशांत कामगारांना जरा बऱ्या प्रकारचीं आर्थिक परिस्थिति मिळालेली दिसते. पण तिचें कारण भांडवलशाहीनें बाहेरच्या जगावर लादलेलें राष्ट्रीय पारतंत्र्य हें होय. अॅडम स्मिथच्या विचारसरणीप्रमाणें राष्ट्रीय पारतंत्र्य ही अशक्य बाब व्हावयास पाहिजे. एका राष्ट्राची स्वारी दुसऱ्या राष्ट्रांवर कां होते? या दुसऱ्या राष्ट्राची आर्थिक लूट करण्यासाठीं. पण अॅडम स्मिथच्या मताप्रमाणें पाहतां एका माणसानें दुसऱ्याचा गळा दाबून त्याचें धन लुबाडण्यानें दोघांच्या धनाची वाढ होणार नाहीं. दुसऱ्याचा गळा दाबून अथवा जीव घेण्याचा धाक घालून एकानें धन लुबाडलें तर त्याला पुन्हां असें धन लुबाडणें कधींच शक्य होणार नाहीं. तो दुसरा माणूस जिवंत राहिला तरी आपलें धन लुबाडलें जाईल या भीतीनें मुळीं धन निर्माणच करणार नाहीं. पण जर एकानें दुसऱ्याच्या गळ्यास हात न घालता दोघांनींही धनोत्पादन केलें व आपापल्या धनाचा ‘ सारख्याशीं सारखे ’ असा विनिमय केला तर दोघांनाही धनलाभ होवून दोघेही स्वतंत्र, एकमेकापासून निर्भय, व स्नेहपूर्ण राहतील आणि दोघांच्याही धनाची वाढ होईल. हीच गोष्ट दोन राष्ट्रासंबंधानेंहीं खरी ठरेल. ज्या राष्ट्रांत जो माल करणें निसर्गतः शक्य आहे त्या राष्ट्रांत तो माल तयार करून इतर राष्ट्रांस विकावा व इतर राष्ट्रांत जो माल होऊं शकतो पण आपल्या राष्ट्रांत होऊं शकत नाहीं तो माल त्या इतर राष्ट्रांकडून आपण विकत घ्यावा, म्हणजे कोणाचेंच नुकसान होणार नाहीं, परस्परांत समता निर्माण होईल, परस्परांत सहकार्य वाढेल व एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राला जिंकण्याची रानटी इच्छाच करणार नाहीं हें राष्ट्रीय स्वातंत्र्याचें तत्त्व अॅडम स्मिथच्या सुप्रसिद्ध खुल्या व्यापाराच्या तत्त्वाचें रहस्य आहे.

## भांडवलशाहीची साम्राज्यशाही

पण प्रत्यक्ष व्यवहारांत भांडवलशाहीनें हें राष्ट्रीय स्वातंत्र्याचें तत्त्व जितक्या निकरानें मोडलें आहे तितक्या निकरानें पूर्वीच्या कोणत्याही अमदानींत मोडलें गेलें नव्हतें. इंग्लंडचा माल हिंदुस्तानच्या बाजारांत खपण्यास सुरवात झाली तेव्हांपासून पोटांत कांचेचा तुकडा गेला असतां शरीर आंतून कापीत कापीत अखेर तो जसा प्राण हरण करतो त्याप्रमाणें ब्रिटिश मालानें हिंदी आर्थिक व राजकीय स्वातंत्र्याचा प्राण हरण केला आहे. प्रथम इंग्लंडचें कापड येथें आलें त्यामुळें येथें लक्षावधि कोष्टयांच्या धंद्याची होळी झाली. हिंदुस्तानच्या बाजारांत एतद्देशीय व विदेशीय प्रतिस्पर्धी नसावे म्हणून इंग्लंडनें हिंदुस्तान जिंकून घेतलें. आणि याचप्रमाणें अमेरिका, फ्रान्स, जर्मनी, बेल्जम, इटाली, जपान वगैरे राष्ट्रांनीं मागासलेल्या राष्ट्रांवर शस्त्रें चालवून त्यांचे धंदे बुडविले व त्यांचें धन-शोषण सतत चालू ठेवण्यासाठी त्यांचें राजकीय स्वातंत्र्यही नष्ट केलें. भांडवल-शाहीची ‘ साम्राज्यशाही ’ झाली ती हीच होय.

## साम्राज्यशाही म्हणजे काय

“ भांडवलशाहींत आर्थिक मक्तेदारी ( मोनॉपोली ) उत्पन्न झाली व माला-ऐवजीं भांडवल बाहेर जाऊं लागलें, जगांतील बड्या राष्ट्रांनीं आपसांत जगांतील मुलुखांची वाटणी करून घेतली म्हणजे भांडवलशाहीच्या त्या अवस्थेस ‘ साम्रा-ज्यशाही ’ म्हणावें ” असें लेनिन म्हणतो. माझ्या मतें साम्राज्यशाहीचा उदय इतक्या उशीरा होतो असें मानण्याचें कारण नाहीं. कारण इंग्लंडचा माल खप-विण्यासाठीं इंग्लंडनें हिंदुस्तान जिकण्यास सुरुवात केली तेव्हांपासून ब्रिटिश भांडवलशाहीची राज्यसत्ता येथें आली. इंग्लंडांत भांडवलदारांची राज्यसत्ता असली तरी तेथील जनता तेथील भांडवलदारी राज्यावर थोडें तरी नियंत्रण घालूं शके. पण हिंदुस्तानवर जी ब्रिटिश भांडवलशाही राज्यसत्ता आली ती सरळ सरळ राजकीय गुलामगिरीच आली. म्हणून या सत्ताप्रकारास वेगळें नांव देण्या-साठीं हीच साम्राज्यशाही सत्ता असें म्हणावेसें मला वाटतें. अशा परदेशावर राजकीय व आर्थिक गुलामगिरी लादून ब्रिटिश भांडवलदारांनीं जो खूप नफा मिळवला त्यांतला कांहीं वाटा वाढत्या मजूरीच्या रूपानें ब्रिटिश मजूरांना मिळून त्यांची सुबत्ता झाली खरी. पण एकंदर जगाच्या दृष्टीनें पाहिलें तर राष्ट्रीय

स्वातंत्र्याच्या तत्त्वाचा नाश करून भांडवलशाहीनें राष्ट्रीय गुलामगिरी ऊर्फ साम्राज्यशाही बऱ्याच पूर्वीपासून निर्माण केली असेंच म्हणावें लागतें.

## अंतर्विरोधाचा जन्म

इंग्लंडपुरतेंच बोलायचें तर ही त्याच्या राष्ट्रीय वैभवाची वाढच होती हें खरें आहे. पण तींत टिकाऊपणा नव्हता. इतिहासक्रमांत ती जशी आली तशीच ती जाणार होती. भांडवलशाहीस साम्राज्यशाही स्वरूप येत असतां तिच्या गर्भातच तिचे अंतर्विरोध निर्माण होत होते. हिंदुस्तानसारख्या देशांना जिंकून व फक्त आपल्यासाठीं खुला व्यापार करून इंग्लंडनें तेथें नफा मिळविला. पण जर्मनीसारख्या देशांनीं इंग्लंडच्या पक्क्या मालाविरुद्ध जकातीच्या भिंती उभारून त्या मालास मज्जाव केला. या जकातींनीं इंग्लंडचा पक्का माल जर्मनींत जाण्याचें बंद केलें. एवढ्यानेंही फारसें बिघडलें नाहीं. खरी अडचण पुढेंच आली. इंग्लंडांत कापडाच्या गिरण्यासाठीं जीं यंत्रें हवीं होतीं त्यांचे कारखानेही निघाले. इंग्लंडांतल्या कापडगिरण्यांना दहा यंत्रें हवीं असलीं तर त्या दहा यंत्रासाठीं यंत्रांचा कारखाना कोण काढणार, तो कसा परवडणार? ज्या कारखानदारांनीं यंत्रांचे कारखाने काढले त्यांनीं इंग्लंडच्या कापडगिरण्यांना लागणारीं दहा यंत्रेंच काढून हात न आटोपता १०० यंत्रें काढलीं. आतां इंग्लंडच्या कापडाला जसा परदेशी बाजार हवा तसा इंग्लंडच्या यंत्रांनाही हवा. जर्मनींत इंग्लंडच्या कापडाला मज्जाव होता. पण इंग्लंडच्या यंत्रांच्या आयातीविरुद्ध जकाती नव्हत्या. म्हणून इंग्लंडचीं यंत्रें जर्मनींत खपलीं. यंत्रें खपतात म्हणून इंग्लंडच्या कारखानदारांनीं अधिक वाकबगार व स्वस्त यंत्रें चढाओढीनें काढून बाजारांत मांडलीं. इंग्लंडच्या कारखानदाराजवळ नुकतींच घेतलेलीं आधींचीं यंत्रें अजून काम करीत असल्यानें त्यांना नवीन यंत्रें घेणें परवडत नव्हतें. हीं सुधारलेलीं यंत्रें जर्मनींतल्या नवीन कारखानदारांनीं घेतलीं. आणि त्या यंत्रावरचा जर्मनीचा अधिक स्वस्त व सुबक माल परदेशच्या बाजारांत इंग्लंडच्या मालास मागें हटवूं लागला. इंग्लंडच्या कापडास जन्म देण्यासाठीं यंत्रें निर्माण करणारे इंग्लंडचे कारखाने अशा प्रकारें इंग्लंडच्या कापडगिरण्यांच्या नाशास कारण झाले. इंग्लंडच्या कापडकारखानदारांनीं ज्याप्रमाणें कापड हिंदुस्तानांत विकलें त्याप्रमाणें यंत्रकारखानदारांनीं हिंदुस्तानांत यंत्रेंही विकलीं व येथें ‘स्वदेशी’ कापड गिरण्या निघाल्या. त्यांनीं हिंदुस्तानांत ब्रिटिश कापडाचा गळा धरला.

## कारखानदारीचें केन्द्रीकरण

कारखानदार--कारखानदारांत ही जी एकप्रकारें यादवी चालली त्या यादवीचा परिणाम कांहीं भांडवलदार ठार होऊन थोड्यांच्या हातीं भांडवली सत्ता जाण्यांत झाला. अनेक भांडवलदार आर्थिक दृष्ट्या ठार झाले अथवा थोड्या भांडवलदारांच्या पोटांत समाविष्ट झाले. कापडगिरण्या व यंत्रकारखाने यांतील चढाओढ थांबविण्यासाठीं त्यांचें एकीकरण थोड्या भांडवलदारांच्या हातीं होवूं लागलें. अमेरिकेंत हेन्री फोर्डनें मोटारकारखाने काढले आहेत ते नुसते मोटारींचेच कारखाने नाहींत. मोटारीस लागणारें सर्व साहित्य फोर्ड कंपनीच्याच मालकीच्या अनेक कारखान्यांत तयार होतें. टायरला लागणाऱ्या रबराचे मळे, टायरला अथवा आणखी कशाला लागणारा कापूस पिकविण्यासाठीं कापसाचीं शेतें, लोखंडाच्या व कोळशाच्या खाणी, इमारतसामानांचे कारखाने वगैरे सर्व आतां फोर्ड कंपनीच्या मालकींत आहेत. अशा बड्या कारखानदारांची संख्या अर्थात् थोडी असते. त्यांची आपसांत जोरदार चढाओढ माजली तर दोन आगगाड्यांच्या टकरीप्रमाणें साऱ्या समाजावर त्यांचे अनर्थ कोसळतात. बरें त्यांनीं आपसांत समेट केला तरीही समाजाची गळचेपी होते. कारण चढाओढ थांबविण्यासाठीं ते बाजारकिंमती महाग ठेवण्याचे करार आपसांत करतात. धनोत्पादनसाधनांची प्रगति करून मालाची निष्पत्ति अधिक करण्याचें कार्य थांबवितात. इतकेंच नव्हे तर बाजारभाव कमी होवूं नयेत म्हणून उत्पन्न होणारा माल नष्टही करून टाकतात.

## भांडवलाचें परदेशगमन

भांडवलाचें हें केन्द्रीकरण होत असतां कामगारवर्गाची संघटना होत असते व कामगारवर्ग संघटनेच्या बळावर आपली मजूरी वाढवून घेतात, आपल्या राहणीच्या परिस्थितीची सुधारणा करण्याची शक्ति कारखानदारावर करतात. याचा परिणाम आंतरराष्ट्रीय भांडवलशाहीवर फार मोठा होतो. इंग्लंडसारख्या उत्पादनाचे बाबतींत सुधारलेल्या देशांत कामगारांची राहणी व मजूरी उच्च दर्जाची होती यामुळें कारखानदारीचा उत्पादनाचा खर्च वाढतो. उलट हिंदुस्तान, चीन यांसारख्या मागासलेल्या देशांत मजूरी कमी असते, कच्चा माल तेथेंच असतो व पक्क्या मालाचे बाजारही तेथेंच असतात. अशा मागासलेल्या देशांत

ब्रिटिश भांडवलदार भांडवल गुंतवितात यामुळें त्यांचा नफा वाढतो पण त्यामुळें इंग्लंडांतल्या कारखान्यांना भांडवल नाहींसें होऊन तेथें कारखानदारी थंडावते आणि बेकारी वाढते.

## भांडवलशाही प्रतिगामी झाली

भांडवलशाहीनें आपल्या जन्मकालीं सरंजामशाही व अनियंत्रित राज्यसत्ता नष्ट करून भांडवलशाही लोकशाही निर्माण केली असें मागें म्हटलें आहे. पण मागासलेल्या राष्ट्रांत साम्राज्यशाहीच्या छत्राखालीं जें भांडवल जात असते त्याची ही प्रगतिक्षमताही नष्ट झालेली असते. हिंदुस्थान हें याचें रोकडें उदाहरण आहे. येथील जनतेची पिळणूक विदेशी साम्राज्यशाहीप्रमाणें स्वदेशी हक्कदारवर्ग, भांडवलदार व संस्थानिक हेही करीत असतात. म्हणून या वर्गांना जनतेची भीति वाटते आणि जनतेवर दडपण ठेवण्यासाठीं विदेशी साम्राज्यसत्तेचा आश्रय त्यांना हवा असतो. साम्राज्यवाद्यांनाही आपली सत्ता जनतेवर पक्की ठेवण्यासाठीं या एतद्देशीय प्रतिगामी वर्गाचें साहाय्य हवें असतें. म्हणून जनतेच्या हल्ल्यापासून या प्रतिगामी वर्गाचें रक्षण साम्राज्यशाही करीत असते. भांडवलशाहीच्या मूळारंभीच्या स्वरूपांत जी भांडवलशाही प्रतिगामी समाजाचा उच्छेद करून एकंदर समाजास प्रगतिपथावर खेचण्यास कारण झाली तीच भांडवलशाही साम्राज्यशाही स्वरूपांत मागासलेल्या राष्ट्रांतील सर्व प्रतिगामी शक्तींचें सरंक्षण करूं लागते.

## सामाजिक अधःपात

इकडे इंग्लंडांतल्या धनिक वर्गाचा नफा वाढत असतां एकंदर इंग्लंडचेंही दारिद्र्य वाढत जात असतें. इंग्लंडांतल्या धनिकांनाही नफाबुकांच्या पावत्या फाडत बसण्याखेरीज कांहींच काम राहात नाहीं. संयुक्त भांडवली कंपन्यांच्या वाढीमुळें कंपन्यांतून भागीदार हे भांडवल गुंतवून व डायरेक्टरांच्या हातीं सगळा कारभार सोपवून घरबशे होतात. घरबशा व्याजखाऊंची ही संख्या पुढें एकसारखी वाढत जात असते. कामगारवर्गातही अधिक पगार मिळविणारे कारागीर कंपन्यांतून पैसे गुंतवून व्याज खात बसण्याची संवय लावून घेतात. यामुळें गरीब कामगारांपेक्षां आपण कांहीं तरी उच्च दर्जाचे आहे असें त्यांस वाटूं लागतें. कामगारांतच अशी दुही उत्पन्न झाल्यानें त्यांचें वर्गलढ्याचें सामर्थ्य कमी

होऊन आधीं औद्योगिक प्रगति पावलेल्या इंग्लंड–फ्रान्ससारख्या राष्ट्रांतला समाज भांडवल विदेशीं जाऊं लागल्यामुळें बेकार, लुला, ढिला, खुशालचेंडू होतो. जे. ए. हॉब्सन यानें अशा परिस्थितींतला, पश्चिम युरोपांतला समाज कसा दिसेल याचें चित्र आपल्या इंपीरिॲलिझम् या ग्रंथांत रेखाटलें असून त्यांतला लेनिननें घेतलेला मजकूर सारांशरूपानें येथें देतों.

## खुशालचेंडूंची वसाहत

युरोपांतल्या पुष्कळशा भागाला त्यावेळीं दक्षिण इंग्लंड, फ्रान्समधील रिव्हिएरा, इटाली व स्वित्झर्लंड, येथें गुलहौशी प्रवाशांच्या राहाण्याच्या ज्या जागा आहेत यांचें जसें स्वरूप असतें तसें येईल. आशियाखंडांतून नफा व पेन्शनें आणून खात बसणाऱ्या खुशालचेंडूंचे कळप तेथें जागोजाग निर्माण होतील. तेथें कांहीं थोडे व्यापारी वाहतुकीचे धंदे करणारे लोक राहतील; अगदींच नश्वर मालाचे धंदे व परदेशांतून आलेल्या पक्क्या मालावर शेवटचे कांहीं तरी संस्कार करण्याचे धंदे तेथें शिल्लक राहतील आणि बाकी सर्व वस्ती खुशालचेंडूंची व त्यांच्या दासदासींची राहील. राष्ट्रांचे प्राणभूत धंदे येथें राहणार नाहींत अथवा मुख्य पोषक धान्यांचें उत्पादन या प्रदेशांत होणार नाहीं. सर्व प्रकारचा उपयुक्त माल आशिया व आफ्रिका यांतून येत राहील. साऱ्या युरोपचें एक संयुक्तराज्य होईल, त्यामुळें जगाच्या संस्कृतींत भर पडणार नसून फुकटखाऊंच्या वसाहतींचें एक प्रचंड संकट युरोपवर कोसळेल. त्यांच्याजवळ नोकरीस असणारीं माणसें कोणतींही कारखानदारीचीं व धनोत्पादक कामें करणार नाहींत, ते नुसते वरिष्ठ वर्गाची वैयक्तिक सेवा करणारे हुजरे होतील.

## फॅसिझम् व युद्धें

हॉब्सननें वर्णिलेली ही खुशालचेंडूंची वसाहत निर्माण होण्यापूर्वी विदेशी भांडवल पाठविणाऱ्या राष्ट्रांवर प्राणांतिक संकटें कोसळत असतात. इंग्लंड–फ्रान्स येथील भांडवलदारांनीं स्वदेशांत भांडवलावर पुरेसा नफा पडत नाहीं म्हणून जर्मनीसारख्या देशांत भांडवल पाठविलेलें असतें. तेथें इंग्लंड–फ्रान्स-सारख्या फार पुढें गेलेल्या राष्ट्रांना मागें खेंचून आंतरराष्ट्रीय वर्चस्व मिळविण्यासाठीं संघटित भांडवलशाही ऊर्फ फॅसिझम् स्थापित झालेला असतो. फिच्टे व मुल्लर या तत्त्वज्ञांनीं फॅसिझमची तात्त्विक भूमिका कशी तयार केली होती हें

मागें आलेंच आहे. अंतर्गत एकजूट करण्याच्या नांवावर कामगारसंघटना व लोकशाही यांना तेथें मूठमाती देण्यांत आलेली असते. आणि इंग्लंड-फ्रान्सचे बाजार काबीज करण्यासाठीं इंग्लंड-फ्रान्सशीं लढाई करावी लागेल म्हणून इंग्लंड-फ्रान्सपेक्षां अधिक वाकबगार अशीं शस्त्रें बनविण्याचे कारखाने तेथें निघालेले असतात. इंग्लंड-फ्रान्सनींच जर्मनींत पाठविलेलें भांडवल या शस्त्रास्त्रकारखान्यांत शिरून इंग्लंड-फ्रान्सला बेचिराख करण्यासाठीं बॉम्ब्स, टॅंक्स, मशिनगन्स; बंदुका, तोफा यांची निर्मिती करीत असते. चालू महायुद्धापूर्वी इंग्लंड-फ्रान्समधून जर्मनींत गेलेलें भांडवल आज जर्मनीच्या विध्वंसक शस्त्रास्त्रांच्या रूपानें इंग्लंड-फ्रान्सवर चाल करून आलें आहे. हा आंतरराष्ट्रीय युद्धांचा मुद्दा मार्क्सनें 'कॅपिटल' मध्यें मुळींच विचारांत घेतला गेला नाहीं. याचें कारण भांडवलशाहीचा केवळ आर्थिक गतिसिद्धांत मांडणें एवढेंच कार्य मार्क्स कॅपिट्लमध्यें करीत होता हें होय. मार्क्सच्या काळीं व मार्क्सनंतरच्या ६० वर्षांत किरकोळ युद्धें सतत चालू असून दोन प्रचंड महायुद्धें झालीं, पैकीं दुसरें अजून चालू आहे व अधिकाधिक भडकत जाऊन शेवटीं जगांतल्या सर्व संस्कृतीचाच नाश करतें कीं काय अशी भीति वाटत आहे. ॲडॅम स्मिथच्या विचारसरणीअनुसार पाहतां मागें म्हटल्याप्रमाणें आंतरराष्ट्रीय महायुद्धें भांडवलशाहींत होण्याचें मुळींच कारण नसावें. पण इतिहासाचा अनुभव अगदीं उलट असल्याचें दिसून येत आहे. म्हणून भांडवलशाहींत युद्धें अपरिहार्य कां व्हावींत याची थोडीशी उपपत्ति येथें समजून घेऊं.

## स्मिथचा आशावाद

ॲडॅम स्मिथनें आपल्या नव्या समाजव्यवस्थेस भांडवलशाही असें नांव दिलें नव्हतें. व्यक्तिवादस्वातंत्र्यवाद असें नांव त्यानें आपल्या नव्या तत्त्वास दिलें होतें. गुलामगिरी अथवा भूदासपद्धति नष्ट व्हावी, वाटेल त्याला वाटेल तें उत्पादन करण्याची व वाटेल त्याची नोकरी करण्याची मुभा असावी, पूर्ण करारस्वातंत्र्य समाजांत नांदावें, व्यापारधंद्यावर अणि राष्ट्राराष्ट्रांतील आर्थिक व्यवहारांवर सरकारचें नियंत्रण नसावें, आयातनिर्यात जकाती नसाव्या, राष्ट्राराष्ट्रांत पूर्ण खुला व्यापार चालावा, माल विकणाऱ्यानें महागांत महाग ज्या बाजारांत विकतां येईल तेथें तो विकावा आणि माल खरेदी करणाऱ्याला

स्वस्तांत स्वस्त मिळेल तेथें त्यानें तो घ्यावा असें अॅडॅम स्मिथ म्हणे. राज्य-संस्थेनें फक्त करारपालन करविण्याचें आणि चोऱ्यामाऱ्यांचा प्रतिबंध करण्याचें म्हणजे न्यायकोर्टाचें आणि पोलिसचें काम करावें असें त्याचें मत होतें. यामुळें निरनिराळ्या व्यक्तींत व निरनिराळ्या राष्ट्रांत–शाळेंतील मुलांत अभ्यासाची ईर्षा व चढाओढ लागते तशी–ईर्षा व चढाओढ धनोत्पादनाच्या बाबतींत लागून सर्व जगांत संपत्ति विपुल झाल्यानें एकमेकांचे गळे कापण्याचा नुकसान-कारक मूर्खपणा जगांतलीं माणसें करणार नाहींत आणि राष्ट्रांतील व्यक्तीव्यक्तींत व राष्ट्रराष्ट्रांत परस्परसाहाय्याची, स्नेहाची, सहानुभूतीची भावना नांदूं लागेल, सर्वत्र शांति, तुष्टि, पुष्टि, यांचें साम्राज्य नांदेल हें अॅडॅम स्मिथला अगदीं नैसर्गिक वाटलें.

## कॉब्डेन, नॉर्मन एन्जल व कौट्स्की

अॅडॅम स्मिथचा एकोणिसाव्या शतकांतला एक अनुयायी व ब्रिटिश भांडवलवाल्यांचा पुढारी कॉब्डेन याचा ‘ खुल्या व्यापारामुळें युद्धें थांबतील ’ असें प्रतिपादणारा एक उतारा मागें दिलाच आहे. “ आंतरराष्ट्रीय खुल्या व्यापारानें राष्ट्रराष्ट्रांतील दळणवळण पूर्ण होऊन राष्ट्रराष्ट्रांत इतकें परस्परा-वलंबन उत्पन्न होईल कीं लोकांना युद्धाच्या समुद्रांत बुडविण्याची राज्यकर्त्यांची शक्ति त्यामुळें राज्यकर्त्यांच्या हातून हिसकून घेतली जाईल” असें कॉब्डेनला मनापासून वाटे. कॉब्डेनही अॅडॅम स्मिथप्रमाणें या मतास ‘व्यक्तिस्वातंत्र्य’, ‘ खुला व्यापार ’ वगैरे नांव देई. ‘शाही’ म्हणजे सत्ता. भांडवलशाही म्हणजे भांडवलवाल्याच्या सत्तेखालीं आलेली समाजव्यवस्था. या समाजव्यवस्थेंत व्यक्ति-स्वातंत्र्याचा बहुतेक लोपच झाला आहे असें केवळ सोशॅलिस्टच मानीत नसून भांडवलशाहीचे कित्येक पुरस्कर्तेही कबूल करूं लागले आहेत. कॉब्डेनच्या लक्षांत त्यावेळीं हें आलें नव्हतें. पण भांडवलशाहींत आज व्यक्तिस्वातंत्र्याचा लोप झाला आहे, हें कबूल करूनही भांडवलशाहीचा पुरस्कार करणारा ब्रिटिश तत्त्वज्ञ नॉर्मन एंजल इतकेंच नव्हे तर जर्मन मार्क्सवादी ( अर्थात् भांडवल-शाहीचा विरोधक ) कार्ल कौट्स्की हे भांडवलशाहीच्या म्हणजेच हल्लींच्या साम्राज्यशाहीच्या जगांत आंतरराष्ट्रीय शांतता शक्य आहे असें मानतात. हल्लींच्या साम्राज्यशाही जगांत राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय जगांत धंद्याचें इतकें

प्रचंड प्रमाणावर एकीकरण झालें आहे व वाढत्या क्रमानें होत आहे आणि त्यामुळें जगाचा एवढा मोठा आर्थिक फायदा होत आहे, कीं परस्परसहकार्य व परस्परसंघटन न करतां मारामाऱ्या करीत राहाणें ही गोष्ट मूर्खपणाची आहे हें जगास पटविणें कठीण नाहीं असें नॉर्मन एंजल म्हणतो.

आज आंतरराष्ट्रीय युद्धें होतात याचें कारण निरनिराळ्या मुत्सद्यांची क्षुद्र दृष्टि व धनिकांचा क्षुद्र स्वार्थ हें आहे; पण या लोकांशीं युक्तिवाद करून त्यांची डोकीं ठिकाणावर आणल्यास युद्धें टळणें शक्य आहे असें नॉर्मन एंजलचें मत आहे. तसेंच निरनिराळीं साम्राज्यवादी राष्ट्रें आपसांत लढण्याऐवजीं आपसांत एकजूट करून मागसलेल्या राष्ट्रांची आपसांत वांटणी करतील आणि आंतरराष्ट्रीय शांततेनें जगाचा उपभोग घेतील असें भांडवलशाही-साम्राज्यशाहीचा 'शत्रु' कार्ल कौट्स्की यालाही वाटतें. इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका हीं जगांतील तीन प्रमुख साम्राज्यवादी राष्ट्रें परस्परांत स्पर्धा असूनही गेल्या शंभर वर्षांत एकमेकांशीं लढलीं नाहींत आणि मागासलेल्या राष्ट्रांची पिळवणूक त्यांनीं परस्परसमजुतीनें आणि परस्परसहकार्यानें केली हें लक्षांत घेतां नॉर्मन एंजल आणि कार्ल कौट्स्की यांचें म्हणणें सकृद्दर्शनीं खरें दिसतें.

## शहाणपण अपुरें पडलें ?

पण तसें म्हटलें तर याच शंभर वर्षांत वरील तीनही राष्ट्रांना इतर अनेक राष्ट्रांशीं अनेकदां लढावें लागलें. गेल्या महायुद्धांत या तीनही राष्ट्रांची एकजूट होऊन जर्मनी, ऑस्ट्रिया वगैरे राष्ट्रांशीं त्यांना प्रचंड रणकंदन खेळावें लागलें आणि आतां तर गेल्या महायुद्धासही लाजवील असें सर्वभक्षक युद्ध जगावर कोसळलें आहे. हा मुत्सद्यांच्या मूर्खपणाचा व धनिकांच्या लोभाचाच परिणाम काय ? इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका येथील ज्या मुत्सद्यांना व धनिकांना आपण आपसांत लढूं नये असें वाटण्याइतका शहाणपणा गेलीं शंभर वर्षें होता व अजूनही आहे त्यांना इटली, जर्मनी व जपान यांशींही लढूं नये हें कसें कळत नाहीं ? इटली, जर्मनी व जपान या देशांतल्या ज्या मुत्सद्यांनीं व धनिकांनीं आपल्या शहाणपणानें व चतुराईनें आपल्या राष्ट्रांचें बल अगदीं थोड्या काळांत प्रचंड वाढविलें त्यांच्या त्या शहाणपणास इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका या राष्ट्रांशीं लढणें हें आपणांस आर्थिक दृष्ट्या नुकसानीचें होईल हें कळूं नये काय ? कीं

शहाणपण व कर्तृत्व यांचा यांत कांहींही संबंध नसून परिस्थितीच्या अपरिहार्यतेनेंच मानवजातीवर युद्धाचा अनर्थ कोसळत आहे ?

## चीनमधील ब्रिटिश वर्चस्व

चालू महायुद्धापूर्वी कांहीं आठवडे इंग्लंड आणि जपान यांचें भांडण चीनमध्यें विकोपाला गेलें होतें. जपान्यांनीं चीनमधील ब्रिटिश नागरिकांचे अनन्वित छळ आणि अपमान केले तरी ब्रिटिश पंतप्रधान चेंबर्लेन युद्ध टाळण्याची शिकस्त करीत होता. पण अखेरीस जपानशीं युद्ध केल्यावांचून इंग्लंडचें चीनमधील भांडवल, अब्रू शाबूत राहात नाहीं अशी ब्रिटिश मुत्सद्यांची खात्री झाली होती. उलट इंग्लंडला चीनमधून हाकून लावल्यावांचून जपानचें चीनवरील साम्राज्य सुरक्षित राहूं शकत नाहीं असें जपानी मुत्सद्दी बोलूं लागले. पुढें अँग्लो-जर्मन तेढ निकराला जाऊन युद्ध भडकलें, त्यामुळें अँग्लो-जपानी तेढ थोडी मागें पडली. पण अजूनही त्यांचें युद्ध अपरिहार्य आहे असें दोनही देशांना वाटतेंच आहे. हा विरोध अपरिहार्य कां होत आहे ? याला मुत्सद्यांचा मूर्खपणा कारण आहे कीं ही परिस्थितीचीच अपरिहार्यता आहे याचें थोडेंसें परीक्षण करूं म्हणजे युद्धें अपरिहार्य कां होतात याचा आपणांस उलगडा होईल.

## जपानला इंग्लंडची अडचण

हल्लीं उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत चीनचा पूर्वभाग जपाननें जिंकला आहे. पण जुन्या चिनी सरकारकडून इंग्लंड, अमेरिका वगैरे राष्ट्रांनीं अनिर्बंध व्यापाराच्या सवलती मिळविलेल्या असून जपानच्या हस्तक अशा नव्या चिनी सरकारनेंही या सवलती आपणाकडे कायम राहूं दिल्या पाहिजेत असें इंग्लंड व अमेरिका यांचें म्हणणें आहे. आतां इंग्लंड अमेरिका वगैरे राष्ट्रांना मिळालेल्या अनिर्बंध व्यापाराच्या सवलती तशाच चालू ठेवल्या तर जपानी व्यापारास कसा धोका पोचतो पहा. इंग्लंड हें आज अमेरिकेच्या खालोखाल धनसंपन्न राष्ट्र आहे. चीनमध्यें तर परकी राष्ट्रांचें जें भांडवल गुंतलेलें आहे त्यांत इंग्लंडचा पहिला नंबर असून सुमारें पंचवीस कोटी पौंड म्हणजे हिंदी हिशेबानें सव्वातीनशें कोटी रुपये इंग्लंडचें भांडवल चीनमध्यें गुंतलें आहे व तें चीनच्या सर्व बंदरांत, सर्व शहरांत व अंतर्भागांतही गिरण्या, कारखाने, मोटारी, आगगाड्या, पक्क्या सडका,

खाणी, बँका वगैरे चीनच्या सर्वांगीण जीवनास व्यापून राहिलें आहे. टिन्स्टीन, शांघाय यांसारख्या प्रमुख शहरीं इंग्लंडला आपला व्यापारधंदा, बँका वगैरे सुरक्षित ठेवतां याव्या यासाठीं स्वतंत्र मुलुख तोडून देऊन सैन्य आणि न्याय-कोर्ट ठेवण्याचीही परवानगी जुन्या चिनी सरकारनें इंग्लंडला दिली आहे. पण जपानचें खुद्द राज्यच आतां चीनमध्यें स्थापन झालें असल्यानें जपानशीं तुलना करतां इंग्रज हे चीनमध्यें आतां परकी ठरतात. तरीपण इंग्लंडच्या व्यापारधंद्याची स्पर्धा जपानला इतकी जाणवते कीं इंग्लंडला हाकून लावल्याखेरीज जपानला उसंत वाटत नाहीं. असें कां व्हावें? याचें कारण इंग्लंडजवळचा भांडवलाचा प्रचंड सांठा हें होय. जपाननें आर्थिक उत्पादनाच्या पद्धति अतिशय सुधारलेल्या आहेत. तथापि जपानजवळ भांडवल मुळींच नाहीं. उलट कर्जाचे प्रचंड डोंगर जपानच्या डोक्यावर चढले आहेत. चीनशीं सध्यां चालू असलेल्या लढ्यानें जपानचें रक्त पार शोषून गेलें आहे. अशा कफल्लक जपानांतले कफल्लक व कर्ज-बाजारी कारखानदार आणि व्यापारी चीनच्या बाजारांत इंग्रज कारखानदार व व्यापारी यांच्याशीं स्पर्धेला बसले म्हणजे काय होतें? जपानी सरकारला राज्य-कर्ते या नात्यानें जपानी व इंग्रज या दोन्ही व्यापाऱ्यांना व कारखानदारांना सारख्याच कायद्यानें वागवावें लागतें. अर्थात् धनसंपन्न असा इंग्रज व्यापारी व कारखानदार बाजारांतील खुल्या स्पर्धेत भांडवलाच्या बळावर जपानी व्यापाऱ्याला व कारखानदाराला मागें रेटून नेस्तनाबूद करतो. इतकेंच नव्हे तर जपानी अमलाविरुद्ध बंड करणाऱ्या चिनी देशभक्तांच्या सैन्याला मदत करून जपानचीं हाडें खिळखिळीं करतो. यामुळें चीनमध्ये राज्य जपानचें, धुमाकूळ चिनी बंड-वाल्यांचा आणि आर्थिक हक्कदारी ब्रिटिश व्यापाऱ्यांची असा देखावा उत्पन्न होतो.

## द्रव्यबल विरुद्ध शस्त्रबल

जपाननें चीनवर आपलें राज्य स्थापलें तें कांहीं केवळ हौसेखातर नव्हे. इंग्लंड, अमेरिका वगैरे परकी धनवानांनीं चीनमध्यें अधिकच धनवान होत रहावें, चीनची वाढती लूट करून तेथील सर्व धनोत्पादनसाधनें आपल्या लगामीं खेचावी आणि जपानी व्यापाऱ्यांची व कारखानदारांचीं दिवाळीं निघत असतांहि इंग्लंड, अमेरिका इत्यादि राष्ट्रांची नफेबाजी अनिर्बंधपणें चालण्यासाठीं कायदा व शांतता संभाळण्याची पोलिसी हमाली करावी ही कांहीं चीनवर राज्य

स्थापण्यांत जपानची महत्त्वाकांक्षा नव्हती. अर्थात् भांडवलाच्या दारिद्र्यानें जपानी कारखानदारांना आणि व्यापाऱ्यांना जें दुर्बलत्व येतें तें भरून काढण्यासाठीं जपाननें राजकीय शस्त्र हातीं घेतलें. १९३९ च्या जूनजुलैमध्यें टिन्स्टीनमधील ब्रिटिश वसाहतींतल्या ब्रिटिश नागरिकांना जपानी पोलिसांनीं व लष्करानें अनेकदा तपासणीच्या नांवाखालीं विवस्त्र करून त्यांचा अनेकदां अपमान केला. दिवसानुदिवस चीनमधील ब्रिटिश व्यापारी, कारखानदार, बँकवाले यांचे उद्योगधंदेच काय पण खासगी जीवनही जपानी सैनिकांकडून व पोलिसांकडून अशक्य केलें जात आहे. इंग्लंडचें चीनमधील भांडवल इतकें प्रचंड आहे व जपानचें आर्थिक दारिद्र्य इतकें भयंकर आहे, कीं चीनच्या खुल्या बाजारांत जपानी धंद्यांचा ब्रिटिश धंद्यापुढें टिकाव लागणें शक्यच नाहीं. म्हणून ब्रिटिश धंद्यांना चीनचा बाजार खुला न ठेवणें, राजकीय बलानें उत्तरोत्तर ब्रिटनला चीनमधून हाकून लावणें ही गोष्ट जपानला अत्यवश्यक होत आहे. असें होऊं लागलें म्हणजे केवळ भांडवलाच्या बळावर जपानी कारखानदारांशीं ब्रिटनची चीनमध्यें जी स्पर्धा चालू आहे त्या स्पर्धेत इंग्लंडचें लष्करी-आरमारी बलही सामील होतें. आणि अखेरीस जपान व इंग्लंड यांचें शस्त्रयुद्ध अपरिहार्यतेनें जगावर कोसळण्याचा संभव वाढत जातो.

## इंग्लंड कशाला भितें

कार्ल कौट्स्की व नॉर्मन एंजल यांचा सिद्धांत खरा असेल तर वास्तविक ब्रिटिश भांडवलवाले आणि जपानी भांडवलवाले यांनीं एकजूट होऊन चीनमध्यें आपलें व्यापारी बस्तान बसवावें हें, युद्ध करून उभयतांचे नुकसान करण्यापेक्षां अधिक फायद्याचें आहे हें त्यांना पटावें पण अशा एकजुटींत दोघांचाही फायदा न होतां कोणीतरी एक दुसऱ्याच्या उदरांत गडप होणार हें दोघांनाही दिसतें आहे, कारण एकजूट व्हायची म्हणजे काय होईल ? इंग्लंडजवळ प्रचंड भांडवल आहे व जपानजवळ मुळींच नाहीं. तेव्हां असा कफल्लक भागीदार बरोबरीनें नफा लाटण्यासाठीं आपल्यांत सामील करून घ्यावा ही गोष्ट इंग्रज भांडवलदाराला फायद्याची वाटणें शक्य नाहीं. शिवाय जपानी भागीदाराजवळ भांडवल तर नाहींच, पण उलट राजकीय शस्त्रबल त्याच्या पाठीशीं चीनमध्यें उभें आहे. या शस्त्रबलाच्या जोरावर हा जपानी भागीदार ब्रिटनच्या सगळ्याच भांडवलावर

केव्हांही झडप घालील ही भीतीची तलवार ब्रिटिश व्यापाऱ्यांच्या डोक्यावर नेहमींच टांगलेली राहणार. तेव्हां जपान दरिद्री आहे ही संधि साधून व अमेरिकेसारख्या धनवान् आणि बलाढ्य राष्ट्राची मदत घेऊन जपानला लष्करी बलानें चिरडून टाकणें हेंच ब्रिटनला अधिक फायद्याचें वाटणार हें स्वाभाविक आहे. जर्मनीचा धाक इंग्लंडला उत्पन्न झाला नसता तर यापूर्वीच इंग्लंडला जपानशीं युद्ध करावें असें वाटलें असतें.

## जपान कशाला भितें

उलट जपानच्या मनांतही याच प्रकारची विचारसरणी बळावत जाते. जपानी भांडवलदार म्हणतात, इंग्लिश भांडवलवाल्यांशीं आपण चीनमध्यें गट्टी केली तरी तिची शाश्वती कितीशी? जपानी सरकार दरिद्री आहे. आजचा शस्त्रास्त्रांचा प्रचंड भार जपानी सरकारची शक्ति रोज खर्ची करीत आहे. चिनी-जपानी युद्धानें व चीनमधील बंडाळीनें जपानचें रक्त आटत आहे. युरोपांत अडचणी असल्यानें चीनमध्यें व चीनच्या आसपास इंग्लंड दुर्बल आहे. यामुळें नजिकच्या भविष्यकाळांत इंग्लंडला चीनमधून हाकून लावण्यासाठीं इंग्लंडशीं लढा दिला तर यश येण्याचा संभव जपानला दिसतो. पण इंग्लंडच्या आंतरराष्ट्रीय अडचणी मिटण्याला पुरेसा अवधि मिळाला तर दरम्यान शस्त्रास्त्रांच्या खर्चाखालीं जपान खचत जाऊन, निर्धास्त, धनसंपन्न, शस्त्रास्त्रसन्नद्ध असें इंग्लंड चीनमधून जपानलाच हाकून लावील हा धोका जपानला दिसत आहे. पोर्तुगीज व फ्रेंच साम्राज्यवाद्यांना दोनशें वर्षांपूर्वी जगाच्या सर्व भागांतून हुसकून लावून इंग्लंडनें निरंकुशत्व मिळविलें हें जपानला माहीत आहे. यामुळें इंग्लंडशीं एकजूट करून पुढेंमागें इंग्लंडच्या पोटांत गडप होण्याचा निश्चित धोका पत्करण्यापेक्षां आज इंग्लंडच्या अडचणींचा फायदा घेऊन इंग्लंडला चीनमधून हुसकून लावण्यांतच कमी धोका आहे असें अनेक जपानी मुत्सद्यांना वाटत आहे. इंग्लंड व जपान यांच्या भौतिक परिस्थितीच्या विषमतेंतच याप्रमाणें कलहबीजें असून भौतिकदृष्ट्याच या दोन राष्ट्रांचें युद्ध अपरिहार्य वाटतें. नॉर्मन एंजल व कार्ल कॉट्स्की यांचा निव्वळ आर्थिक हिशेब येथें लागूं पडत नाहीं.

## मागल्या युद्धांतली तेढ

मागील महायुद्धाचेवेळीं इंग्लंड व जर्मनी यांच्यामधील तेढही अशीच बिनतोड ठरली. अठराव्या शतकांत इंग्लंडनें फ्रेंचांना आपल्या मार्गांतून काढ्या-

प्रमाणें काढून टाकलें, हिंदुस्थानांतील प्रमुख प्रदेशांवर आपला अंमल बसविला व एकोणिसाव्या शतकांतील पाऊणशें वर्षेपर्यंत जगांतील बाजारपेठांत ब्रिटिश मालाचें व समुद्रांवर ब्रिटिश आरमाराचें वर्चस्व स्थापन केलें. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या पंचविशींत इंग्लंडच्या स्पर्धेस जर्मनी हें राष्ट्र उभें राहिलें. डेन्मार्क, ऑस्ट्रिया व फ्रान्स या तीन राष्ट्रांचा प्रशियानें लागोपाठ पराभव करून व लहानसहान जर्मन संस्थानांचें एकीकरण करून जर्मन राष्ट्र बनविलें. फ्रान्सकडून प्रचंड खंडणी मिळविली व ब्रिटिश साम्राज्य उलथून पाडून त्याची जागा पटकावण्याचा चंग बांधला. यावेळीं आफ्रिकेंतील प्रदेश जिंकण्याबाबत इंग्लंड, फ्रान्स, इटली व जर्मनी या चार राष्ट्रांत खूप चुरस माजून राहिली. आफ्रिकेचा प्रदेश प्रचंड असल्यानें सर्वांची भूक भागूं लागली व तेवढ्या वेळेपुरता प्रत्यक्ष युद्धप्रसंग टळला. पण जर्मनीची महत्त्वाकांक्षा वाढत होती. पश्चिम व पूर्व आफ्रिकेंत, पासिफिक महासागरांत, चीनमध्यें, जर्मनीनें आपले हितसंबंध वाढविले. बर्लिनपासून बगदादपर्यंत रेल्वे बांधून मेसोपोटेमियांतील खाणी हस्तगत करण्याची योजना जर्मनीनें आंखली. जर्मनीचा आपल्या हितसंबंधाच्या प्रदेशांकडे जाण्याचा रस्ता इंग्लंडच्या पूर्वेचा उत्तर समुद्र, इंग्लिश चॅनल, फ्रान्सच्या पश्चिमेचा अटलांटिक महासागर, इंग्लंडची जिब्राल्टर सामुद्रधुनी, भूमध्यसमुद्र, तांबडा समुद्र, अरबी समुद्र, हिंदी महासागर, शेवटीं मलाया द्वीपकल्पास वळसा घालून पासिफिक महासागरांत शिरणें हाच होता. इंग्लंडचाही आपल्या हिंदुस्तान, ऑस्ट्रेलिया या प्रदेशास जाण्याचा हाच मार्ग होता. जर्मनीस मेसापोटेमियाच्या तेलाच्या खाणी मिळण्यानें जर्मन आरमार इंग्लंडला अजिंक्य होऊन हिंदुस्थान हातचें जाईल इतका इंग्लंडला धाक पडला. फ्रान्सलाही जर्मनीचें हें वाढतें बल धोक्याचें वाटलें. उलट इंग्लंड व फ्रान्स यांचें युरोपांतील व साऱ्या जगांतील प्रभुत्व नष्ट करून आपण जगाचे प्रभु व्हावें अशी महत्त्वाकांक्षा जर्मनीनें धरली. यामुळें अखेर १९१४ सालीं जर्मनीचें इंग्लंड–फ्रान्सशीं युद्ध सुरू झालें व चार वर्षांच्या लढाईनंतर जर्मनीच्या सर्व आशा फोल झाल्या.

गेलें महायुद्ध अगदीं अपरिहार्यच होतें काय हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. इंग्लंडचे एक माजी मजूर मुख्य प्रधान रॅम्से मॅक्डोनल्ड हे या युद्धाच्या विरुद्ध होते. निरनिराळ्या राष्ट्रांतील प्रमुख मुत्सद्यांनीं एकत्र येऊन वाटाघाटी केल्या असत्या व तडजोड केली असती तर युद्धाचें झालेलें भयंकर

नुकसान टळलें असतें व प्रत्येक राष्ट्रास युद्धानें झाला त्याहून अधिक फायदा झाला असता असें मॅक्डोनल्ड यांनीं म्हटलें आहे; ज्यांना हें महायुद्ध अंदाजापेक्षां लांबलें असें मागाहून वाटलें त्यांनींही असेंच मत पुढें प्रकट केलें.

## गेल्या महायुद्धाची अपरिहार्यता

पण या मागाहूनच्या विचारसरणीचा उपयोग महायुद्ध अपरिहार्य कां झालें हें ठरविण्यास उपयोगी पडत नाहीं. युद्धापूर्वीची परिस्थिति काय होती हें पाहणें महत्त्वाचें आहे. इंग्लंडनें खुल्या व्यापाराच्या तत्त्वानें जगांतील बाजारपेठा काबीज केल्या तशीच जर्मन पेठही काबीज केली. तेव्हां हें खुल्या व्यापाराचें तत्त्व जर्मन उद्योगधंद्यास घातक आहे असें ठरवून जर्मन सरकारनें फिन्टे, लिस्ट, मुल्लर, यांच्या मताप्रमाणें सरहद्दीवर जकातीच्या भिंती उभारल्या व त्यांच्या संरक्षणाखालीं अगदीं नवीन शास्त्रीय यांत्रिक शोध लावून इंग्लंडपेक्षाहीं सुबक आणि स्वस्त माल जगाच्या बाजारांत मांडण्यास सुरवात केली. इंग्लंडची उत्पादनपद्धति जर्मनीच्या मानानें मागासलेलीच राहिली. या जुन्या पद्धतींत गुंतलेलें कोट्यवधि पौंड भांडवल ही पद्धति बंद करण्यानें बुडणार होतें व जर्मनीसारख्या नव्या सुधारलेल्या पद्धति अवलंबिण्यानें आणखी नवें भांडवल घालावें लागणार होतें. असें कांहीं नुकसान सोसून इंग्लंडनें उत्पादनांत सुधारणा केलीही; पण बाजारभाव ठरवितांना बुडीत भांडवल विचारांत घेणें जरूर असल्यानें जर्मन मालाइतका इंग्लंडचा माल स्वस्त पडेना. तेव्हां चालू शतकाच्या आरंभीं ब्रिटिश साम्राज्यांत खुल्या व्यापाराचें तत्त्व मागें पडून जकातीचा पुरस्कार होऊं लागला. जर्मनीची उत्पादनपद्धति सुधारलेली होती तरी जर्मनीस कच्च्या मालाचे हक्काचे प्रदेश नव्हते आणि जकाती उभारून आपलाच माल खपविण्यास राजकीय सत्तेचा विदेशी बाजार नव्हता. तेव्हां जर्मन आरमारापेक्षां श्रेष्ठ दर्जाचें आरमार ठेवून जर्मनीस कच्च्या मालाचे व हक्काच्या बाजाराचे प्रदेश मिळूं द्यावयाचे नाहींत असा निश्चय इंग्लंडनें केला व जर्मनी जेव्हां इंग्लंडच्या आरमारापेक्षां अधिक चांगलें आरमार उभारूं लागला तेव्हां इंग्लंडनें युद्धाला सुरवात केली.

## तडजोड अशक्य होती

यांत कोणता मुद्दा असा आहे, कीं उभय राष्ट्रांच्या मुत्सद्द्यांनीं तो वाटाघाटीनें सोडविला असता? ब्रिटिश साम्राज्यापैकीं कच्च्या मालांचे प्रदेश,

बाजारांचे प्रदेश, मेसापोटेमियांतील तेलाच्या खाणी, म्हणजे हिंदुस्थान, आफ्रिका, मेसापोटेमिया वगैरे प्रदेशांतील महत्त्वाचे भाग केवळ टेबलाभोवतीं बोलाचाली करून इंग्लंडनें देऊन टाकले असते म्हणजे हा वाद मिटला असता काय? इंग्लंडला ही गोष्ट पत्करली असती काय? आणि समजा, इंग्लंडनें हो म्हटलें असतें तरी एवढें पदरांत घेऊन आतां आणखी द्या नाहीं तर युद्ध करतों असें जर्मनीनें कां म्हटलें नसतें? वस्तुस्थिति अशी होती, कीं ब्रिटिश साम्राज्याची व व्यापाराची पक्कड उत्तरोत्तर सगळ्या जगावर बसलेली होती. एकतर या पकडींत गुलाम होऊन राहाणें अथवा तिला प्रतिकार करणें यांपैकीं कांहींतरी एक गोष्ट जर्मन धनिकांना पत्करणें भाग होतें. त्यांची उत्पादनपद्धति इंग्लंडपेक्षां सुधारलेली होती. पण म्हणूनच इंग्लंडची पक्कड त्यांचा अगदीं कोंडमारा करीत होती. ती पक्कड सोडविण्यासाठीं सर्व ब्रिटिश साम्राज्यशाहीस आव्हान देणें त्यांना भाग पडलें. उलट जर्मनीचें वाढतें उत्पादनसामर्थ्य व युद्धसामर्थ्य वेळींच खची केलें नाहीं तर ब्रिटिश साम्राज्यास ग्रासल्यावांचून राहाणार नाहीं हें ओळखून इंग्लंडनें जर्मनीचें युद्धाचें आव्हान स्वीकारलें.

## इंग्लंड-जपान-तडजोड होईल?

झालेला अनर्थ आतां मागाहून केवढाही भयंकर वाटला तरी महायुद्धा-पूर्वी इंग्लंड आणि जर्मनी यांना युद्धावांचून तडजोडीचा मार्ग काढता आला असता असें वाटत नाहीं. मागील युद्धाचा अनर्थकारक अनुभव आज ब्रिटिश व जपानी मुत्सद्यांच्या डोळ्यापुढें आहेच. तो लक्षांत घेऊन तें युद्ध टाळण्यासाठीं तडजोड करूं शकतील काय? जर्मनीच्या डोळ्यापुढें हा अनर्थ होता. त्याला युद्ध टाळायचेंही होतें. पण तो तें टाळूं शकला काय? समजा, जपानी व ब्रिटिश मुत्सद्दी टोकिओ येथे वाटाघाटीस बसले तर काय होईल? जपानी मुत्सद्दी इंग्लंडला म्हणतील, " तुमचें चीनमध्यें २५ कोटी पौंड भांडवल आहे तें तेथें ठेवा. आम्हांला भांडवल नाहीं. तुमचें भांडवल कर्ज म्हणून घेतों. तुम्ही आमच्याशीं व्यापारी चढाओढ करण्याचें थांबवून इंग्लंडांत परत जा. तुमच्या भांडवलाचें व्याज आम्ही तुम्हांला वेळच्या वेळीं घरपोंच पाठवूं. जगांत तुम्हांला केवढें तरी साम्राज्य आहे! हें एवढें चीनचें राज्य आम्हांला नित्रस्तपणें भोगूं द्या. गेल्या युद्धानें जगाचा केवढा विध्वंस केला पाहा आणि आमची मागणी पुरी करून जगाला वांचवा!"

यावर इंग्लंडचे मुत्सद्दी आपल्या भांडवलाचें उदक जपानी मुत्सद्यांच्या हातावर सोडतील का ? आणि समजा सोडलें, तरी आणखी पांच वर्षांनीं चीन पचवून बलाढ्य झालेला जपान हळूच हिंदुस्थान मागूं लागला तर ? म्हणून गेलें महायुद्ध टाळतां आलें असतें हें म्हणणें जसें खरें नाहीं तसें गेल्या महायुद्धाचा सर्व अनुभव जमेस धरूनही जपान व इंग्लंड यांचा लढा टाळणें कठिण आहे. जपाननें पडतें घ्यायचें म्हटलें तरी तें कठिण होतें. चीनवर ब्रिटिश आणि अमेरिकन भांडवलाची पकड एवढी मोठी आहे, कीं जपाननें चढाई केली नसती तर पुढील दहापांच वर्षांत चीन व जपानही अँग्लो-अमेरिकन साम्राज्यशाहीच्या भक्ष्यस्थानीं पडलें असतें. आज युद्धखर्चानें सर्व बाजूंनीं नुकसानींत आलेलें जपान इंग्लंडपुढें नमतें घेईल तर नुसतें भांडवलाचे पाश आवळून इंग्लंड चीनवर आणि जपानवरही आपलें साम्राज्य स्थापन करील. सारांश, येथें दिवस-गत होऊं शकली तरी तडजोडीस जागा नाहीं. कोणीतरी दुसऱ्यापुढें शरण जाऊन नामशेषच झालें पाहिजे. अर्थात् दोघांच्याहि अडचणी आणि बल लक्षांत घेतां यशाचा संभव प्रत्येकाला दिसत असल्यास शरणागतीनें मरावें यापेक्षां लढतां लढतां मरावें आणि यशाचा संभव पत्करावा असेंच कोणीही ठरवील.

## युद्ध कोणाचें

युद्धाचा खर्च व त्यापासून होणारें भयंकर नुकसान हें आर्थिक दृष्ट्याचें तोट्याचें आहे हें पटेल तर जगांतली राष्ट्रें लढणार नाहींत हा जो नॉर्मन एंजल याचा युक्तिवाद तो फोल कसा असतो हें वरील विवेचनावरून कळून येईल. दुसऱ्याही एका दृष्टीनें हा युक्तिवाद फोल आहे असें दिसून येतें. ‘ इंग्लंड व जर्मनी यांचें युद्ध ’ ‘ इंग्लंड व जपान यांचें युद्ध ’ अशी शब्दयोजना आपण करतों व ‘ इंग्लंडचें नफानुकसान ’ ‘ जर्मनीचें नफानुकसान ’ असें म्हणतों; पण वस्तुस्थिति थोडाशी वेगळी असते.

चीनमध्यें जें इंग्रजांचें २५ कोटि पौंड भांडवल आहे तें कांहीं सगळयाच्या सगळया इंग्रजांचें नाहीं. अगदीं थोड्या ब्रिटिश भांडवलदारांची ही एवढी प्रचंड रक्कम आहे. हेच थोडे भांडवलदार इंग्लंडमध्यें सत्ताधारी आहेत. चीन-मधील २५ कोटि पौंड भांडवल बुडतें असें त्यांना दिसलें तर ते जपानशीं युद्धाला उभे राहतील. अशा युद्धांत २५ कोटि, ४० कोटि कांहींतरी खर्च होईल

असें समजूं. हा खर्च चीनमधील २५ कोटि भांडवलाचे हे ब्रिटिश मालक करीत नसून ब्रिटिश सरकार म्हणजे सगळे ब्रिटिश राष्ट्र करतें. यामुळें चीनमधील २५ कोटि पौंडांच्या ब्रिटिश मालकांवर त्याचा फारच थोडा बोजा पडतो.

## युद्ध हा किफायतशीर धंदा

युद्धाच्या खर्चासाठीं जनतेवर कर बसवून सरकार ही खर्चाची रक्कम वसूल करतें. पण जनतेवर कर वाढविण्यालाही मर्यादा असतें व करांतून युद्धाचा खर्च भागत नाहीं. तेव्हां मग सरकार कर्ज उभारतें. हें कर्ज अर्थातच जे धनवान भांडवलदार असतात तेच घेतात. हें युद्धकर्ज असल्यानें त्यावर व्याजहि भरपूर मिळतें. युद्ध संपल्यावर विजय मिळाला तर शत्रूपासून मिळण्याऱ्या खंडणींतून व्याजासह कर्जाची भरपाई होऊन भांडवलदारांना युद्ध हा एक रिकामपणीं पडलेल्या भांडवलाचा किफायतशीर धंदा होतो. शत्रूचे नवे नवे प्रदेश मिळाले, कीं हें फुगलेलें भांडवल पुन्हां गुंतविण्यासाठीं या भांडवलदारांना नवें क्षेत्र मिळतें. बरें, पराभव झाला तर प्रजेवर कर बसवून भांडवलदारांच्या युद्धकर्जरोख्यांची सव्याज फेड होते. शिवाय युद्धसाहित्य महागाईनें पुरविण्याचा धंदा इतका किफायतशीर होतो कीं अखेर युद्धकर्जें बुडालीं तरी 'युद्धाचा धंदा' एकंदरींत फायद्यांत पडल्याचें दिसून येतें. गेल्या महायुद्धांत अमेरिकेची युरोपीय राष्ट्रांनीं घेतलेलीं कर्जें त्यांनीं आतां जवळजवळ बुडविलींच आहेत. पण इंग्लंड आणि फ्रान्स युद्धांत सांपडले असतां अमेरिकेच्या व्यापाराची इतकी चलती झाली कीं महायुद्धापूर्वी युरोपांतून कर्जें व माल मागून नेणारी अमेरिका आतां इंग्लंड-फ्रान्सच्या पुढें जाऊन जगाचा बाजार बळकावून बसली व जगाचा सावकार बनली आहे.

## अमेरिकेचा स्वार्थ कशांत

अमेरिकेचे अध्यक्ष रूझवेल्ट यांना हल्लींचें युरोपीय युद्ध टाळायचें होतें. पण त्यांचे प्रतिपक्षी बडे भांडवलदार असून त्यांना युद्ध टाळण्याची घाई झालेली नव्हती. फक्त अमेरिकेनें त्यांत पडण्याची लगट करूं नये एवढेंच त्यांचें म्हणणें होतें. "युरोपीय युद्ध सुरूं झालें कीं इंग्लंड, फ्रान्स युद्धांत गुंततील व जगाच्या बाजारांतून त्यांना आपण हाकून लावून जगाच्या साम्राज्याचें स्वामी होऊं, पुढें मग सवडीअनुसार जर्मनीविरुद्ध इंग्लंड-फ्रांसला मदत करून जर्मनीचा पराभव

करूं! पण तशा त्या वेळीं इंग्लंड आणि फ्रांस हीं आपली आर्थिक गुलाम बनलेलीं असतील! असा तो सुदिन उगवेना का? युरोपीय युद्ध थांबविण्याचा खटाटोप उगीच कां करतां?" असें रूझवेल्टच्या प्रतिपक्षाचें रूझवेल्टला विचारणें आहे.

शस्त्रास्त्र-कारखानदारांना तर जागतिक मंदीच्या काळांत प्रचंड नफा मिळविण्यास युद्धासारखा धंदाच नाहीं. युद्धाचा धाक आणि प्रत्यक्ष युद्ध दोन्हीही त्यांना सारखींच किफायतशीर होतात. युद्धांत उध्वस्त होणारी नागरिकांची दौलत राज्यकर्त्यांकडून सरकारी करांतून अथवा कर्जांतून नुकसानभरपाईच्या द्वारां जिवंत होते असें कायदा बोलतो. या बाबतींत गोरगरिबांच्या नुकसानीची दाद लागत नाहीं, पण धनिकांना नुकसान झालें तेंच बरें झालें असें वाटण्याइतकी वाढत्या मापाची भरपाई मिळते. सैनिक मरतात ते सामान्य जनतेंतले मरतात. वरिष्ठ वर्गांना हुद्देदाऱ्या मिळतात आणि या हुद्देदारांत जे मरतील त्यांची कीर्ति चिरंजीव होऊन वारसांची यथास्थित तरतूद होते. नॉर्मन एंजल ज्या युद्धखर्चाला आणि युद्धाच्या नुकसानीला भितो त्याची भीति सत्ताधारी भांडवलदार वर्गाला वाटण्याचें कारण काय?

## गेलें युद्ध टळलें असतें पण—

होतां होईतों तुल्यबलाशीं अथवा बलिष्ठाशीं लढूं नये, यशाचा संभव जास्तींत जास्त असेल असेंच क्षेत्र आर्थिक पसाऱ्यास निवडावें हा विवेक सत्ताधारी वर्ग व देशभक्त करतात हें खरें आहे. याच कारणासाठीं जर्मनीनें १९१४ सालीं इंग्लंडला आव्हान दिलें ही चूक केली असें हिटलरनें आपल्या चरित्रांत लिहिलें असून १९०४-५ सालीं रूसो-जपानी युद्ध झालें त्यावेळीं जर्मनीनें जपानची बाजू घेऊन रशियावर हल्ला केला असता तर युक्रेनच्या धान्याच्या कोठाराचा व इतर अनेक संपत्तीचा प्रचंड मुलूख जर्मनीस मिळून इंग्लंडशीं न लढतांच जर्मनीचें कल्याण झालें असतें असें हिटलर आत्मचरित्रांत म्हणतो. कदाचित् मग गेलें महायुद्ध झालेंच नसतें. रशियांत कम्युनिस्ट क्रांतिहि झाली नसती, चीनमध्यें राष्ट्रीय पक्षाचा व चिनी कम्युनिस्टांचा उदयहि झाला नसता व कदाचित् चीन हें राष्ट्र जपानच्या किंवा इंग्लंडच्या अथवा अमेरिकेच्या, अथवा, विभागणी होऊन सर्वांच्याच भक्षस्थानीं पडलें असतें.

पण पुढेंहि युद्ध टळलें असतें असें नव्हे. इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, जपान या राष्ट्रांची परस्परांत हल्लीं चालू आहे ती स्पर्धा चाललीच असती. इंग्लंडजवळ प्रचंड भांडवल असल्यानें जपान व जर्मनी यांना जगाच्या बाजारांत इंग्लंडनें जिकीरीस आणलें असतें व मग जर्मनी व जपान यांना आपण व्यापारधंद्याच्या नुकसानींत ठार होऊं नये म्हणून इंग्लंडशीं केव्हां तरी लढावें लागलें असतें. याच कारणासाठीं त्यांना अमेरिकेशींही लढावें लागलें असतें.

शिवाय कांहीं राष्ट्रांनीं एकदा एकजूट करून व्यापारधंदा करण्याचें ठरविलें तरी मागाहून उदयास येणाऱ्या राष्ट्रांशीं या एकजूट केलेल्यांचा कलह सुरू होऊन तो बिनतोड होतो. नेपोलियनचा पाडाव झाल्यानंतर इंग्लंड व फ्रान्स यांनीं चुरशीचे आणि तेढीचे अनेक प्रसंग टाळून सलोखा राखला व आपापलीं साम्राज्य-क्षेत्रें एकमेकांस ताप न होईल अशीं वेगवेगळीं आंखलीं, पण मागाहून उदयास आलेल्या जर्मनीशीं त्यांचा विरोध बिनतोड झालाच आणि त्याच्या मागून उदयास आलेल्या इटली व जपान यांच्याशीं हा विरोध तसाच बिनतोड होत आहे.

## सद्यःस्थितींत युद्ध हें अंगभूत

आहे याच भूपृष्ठावर साम्राज्यवर्धन करतांना एकेकाच प्रदेशाबावत अनेक साम्राज्यवाद्यांची ओढाताण होणें अपरिहार्य व्हावें इतकी जगाची वाटणी झाली आहे. कांहीं राष्ट्रें भांडवलाच्या दृष्टीनें प्रचंड धनवान असतात तर मागाहून उदयास आलेलीं राष्ट्रें अधिक वाकबगार असूनहि भांडवलाच्या दृष्टीनें दरिद्री असतात. अर्थात् खुल्या बाजारांत धनवान राष्ट्र दरिद्र्याला मागें खेचून ठार करूं पाहतें आणि मग दरिद्री राष्ट्र तरवारीला हात घालून युद्ध सुरू करतें अथवा हें आधींच हेरून धनवान राष्ट्रच अनुकूल कालीं युद्ध सुरू करतें. युद्धाचा हेतु निर-निराळ्या राष्ट्रांतील मूठभर धनिकांच्या दौलती रक्षिणें व वाढविणें हाच असतो व अशा युद्धांचा खर्च या दौलतदारांवर न पडतां त्या त्या राष्ट्रांतील जनता सोसते. युद्धकर्जाच्या रूपानें, युद्धसाहित्य व शस्त्रास्त्रें विकून मिळणाऱ्या नफ्यांच्या रूपानें या धनिकांना युद्धापासूनहि मिळकत चांगली होते आणि भांडवलाच्या वाढीस नवींनवीं क्षेत्रें मिळतात. युद्धांची अपरिहार्यता सभ्यांच्या वस्तुस्थितींतच कशीं आहे हें यावरून दिसून येईल.

## युद्धासंबंधीं अचूक अनुमान

युद्धांची ही अपरिहार्यता लेनिननें आपल्या 'इंपीरिऑलिझम्' या ग्रंथांत स्पष्टपणें मांडली आहेच. पण ती मार्क्स-एन्जल्स यांनाही त्यांच्या काळीं दिसली होती हें विशेष होय. कॅपिट्ल ग्रंथांत केवळ आर्थिक दृष्टीनेंच भांडवलशाहीचा गतिसिद्धांत मार्क्सला संशोधावयाचा असल्यानें त्यांत त्यानें आंतरराष्ट्रीय युद्धाचा विषय आणला नाहीं. पण एन्जल्सनें गेल्या महायुद्धाचें भाकित आश्चर्य वाटावें इतकें अचूक वर्तवून ठेवलें आहे. १८८८ च्या ३ फेब्रुवारीस लायबकेनेटला पाठविलेल्या पत्रांत एन्जल्स लिहितो, "भावी महायुद्ध जगांतील प्रतिस्पर्धी राष्ट्रांत जगांत सर्व सत्ताधारी कुणी व्हावयाचें या मुद्यावर होईल. फ्रान्सच्या सरहद्दीवर हें रण होईल. त्यांत उभयपक्षीं जयापजय पुष्कळ होतील. पोलंडच्या बाजूला चढाईचें युद्ध होऊन रशियन सरहद्दीवरील पोलंडचे किल्ले परचक्राकडून जिंकले जातील. त्यामुळें पीटर्सबर्गमध्यें राज्यक्रांति होईल, त्यामुळें युद्ध चालविणाऱ्या दोन्ही पक्षांना जगांतील वस्तुजाताचें स्वरूप अगदींच वेगळें दिसूं लागेल." एन्जल्सला या गेल्या महायुद्धाची अगदीं तारीख सांगता आली नाहीं हें खरेंच, पण १९१४ पूर्वी २८ वर्षे त्यानें शास्त्रीय दृष्टीनें इतकें अनुमान बांधलें हें मार्क्सिस्ट अर्थशास्त्राच्या थोरवीचेंच द्योतक आहे. १९३९च्या सप्टेंबरमध्यें हल्लींचें अँग्लोजर्मन महायुद्ध सुरू झालें. १९३९च्या आरंभापर्यंत हें युद्ध टाळण्याची मुत्सद्याची शिकस्त सुरू होती. निदान जर्मनी व रशिया, इंग्लंड व जपान यांची लढाई जुंपली तरी इंग्लंड व जर्मनी आपसांत लढणार नाहींत असें वाटत होतें. पण जॉन स्ट्राची या ब्रिटिश मार्क्सवाद्यानें १९३५ मध्येंच इंग्लंड व जर्मनी यांचें युद्ध कसें अपरिहार्य आहे याची सोपपत्तिक चर्चा आपल्या 'नेचर ऑफ् कॅपिटॅलिस्ट क्राइसिस्' या ग्रंथांत केली आहे. हा ग्रंथ फार थोर योग्यतेचा असून 'कॅपिट्ल' च्या तीन खंडांतील महत्त्वाच्या सिद्धांतांचें विवरण यांत आधुनिक अर्थशास्त्रज्ञांच्या विचाराशीं तुलना करून केलें आहे. इंग्लंड, जर्मनी, फ्रान्स अमेरिका यांमधील तेढ गेल्या महायुद्धानंतरच्या काळांत कशी बिनतोड होत होती याची चर्चा त्या ग्रंथाच्या १३व्या प्रकरणांत स्ट्राचीनें केली असून युरोप--अमेरिकन भांडवलशाहीला आतां सर्वविध्वंसक युद्धावांचून व पाशवी मनोवृत्तींच्या धिंगाण्यावांचून अन्य मार्ग कसा राहिला नाहीं तें स्ट्राची सांगतो आहे. स्ट्राचीनें केलेलें हें सर्व विवेचन भांडवलशाहीचें आधुनिक स्वरूप व चालू

महायुद्धाची अपरिहार्यता कळून येण्यास अत्यंत महत्त्वाचें आहे. स्ट्राचीचा हा उतारा—जरा मोठा असला तरी अवश्य म्हणून—येथें देतो.

## युद्धाची तयारी कशासाठीं ?

मार्क्सच्या “ अर्थशास्त्रीय तत्त्वांनीं आगामी महायुद्धाचें भाकित करता यईल इतकेंच नव्हे तर या तत्त्वांच्या ज्ञानामुळें भांडवलशाही जगांतील आर्थिक व सामाजिक संबंधापासून युद्ध निर्माण होणें कसें अपरिहार्य आहे हेंहि यावरून कळून येतें. आणि ही गोष्ट विशेष महत्त्वाची आहे. भांडवलशाहीची अंगभूत अशी अपरिहार्य घटना काय आहे हें समजलें पाहिजे. भांडवलशाहीचे आर्थिक व्यवहार वाढतां वाढतां त्याच्या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या अप्रतिकार्य शक्ति कोणत्या आहेत त्या लक्षांत आल्या पाहिजेत. तरच आजच्या जगांत काय घडतें आहे याचा आपणांस उलगडा होईल. खरोखर आज जगांतील प्रत्येक भांडवलशाही साम्राज्य अतिशय वेगानें आणि आपल्या आर्थिक स्थैर्यास धोका आणूनही युद्धाची सतत तयारी करीत आहे तें काय म्हणून ? मध्ययुरोपांतील राष्ट्रांच्या सरहद्दीवर सैन्याची धांवपळ कां सुरू झाली आहे ? गेल्या महायुद्धापूर्वींच्या दहा वर्षांत जेवढें आंतरराष्ट्रीय वैर निर्माण झालें होतें तेवढें वैर आतांही निर्माण झालें आहे ही गोष्ट सर्वमान्य आहे. हें असें कां होत आहे ?

## मूर्ख विचारसरणी

मार्क्सवादी नसलेले पण अतिशय सूक्ष्म दृष्टीनें पहाणारे जे जे शास्त्रज्ञ आहेत त्यांना या प्रश्नांचीं उत्तरें मुळींच देतां येत नाहींत. आतां जर महायुद्ध उभें राहिलें तर जगांतील भांडवलदारवर्गांना इतर कोणत्याही घटनेपेक्षां हें युद्ध अधिक अनर्थावह होईल यांत कोणासही शंका वाटत नाहीं. असें जर आहे तर आमचे भांडवलशाही राज्यकर्ते या संकटाकडे उघड उघड धांव घेतांना दिसतात असें कां ? मार्क्सवादी नसलेल्या निरीक्षकांना ‘आमचे राज्यकर्ते वेडे झाले आहेत’ ‘मानव जातीच्या ठिकाणीं ज्या क्रूर भावना असतात त्या मधून मधून अशा उद्भवून माणसाला परस्परांच्या कत्तली करण्यास प्रवृत्त करतात’ असले कांहींतरी सिद्धांत मांडावे लागतात. त्यांच्या मतें त्यांचे स्वतांचे भांडवलदार व त्यांचे सध्यांचे सहाय्यक हेच तेवढे समंजस व शांत वृत्तीचे

आहेत. पण दुसरीं कांहीं पिसाळलेल्या कुत्र्यासारखीं राष्ट्रें असून शांतिवादी राष्ट्रांवर हल्ला करण्याकरितां तीं टपून बसलीं आहेत. म्हणून अशा राष्ट्रांविरुद्ध बचावाचीं युद्धें खेळावीं लागतात. उदाहरणार्थ सध्यांचे वेळीं मार्क्सवादी नसलेले लेखक अगदीं एकमतानें सांगत आहेत कीं, इंग्लंड, फ्रान्स व अमेरिका हीं राष्ट्रें शांततावादी असून जर्मनी हें राष्ट्र मात्र दुर्दैवानें पिसाळलें आहे. म्हणून यापुढें होणाऱ्या जर्मन हल्ल्याचा प्रतिकार करण्यासाठीं उत्कृष्ट राजकीय व लष्करी तयारी करून ठेविली पाहिजे. हल्लींच्या आंतरराष्ट्रीय परिस्थितीचें चित्र अशा प्रकारें रेखाटणें ही गोष्ट सर्वस्वीं मूर्खपणाची आहे असें म्हटलें तर त्यांत कांहीही अतिशयोक्ति नाहीं. जर्मनींतील राज्यकर्त्यांना मधून मधून वेडाची लहर येते व स्वतःवर सर्वनाशाचा धोका ओढवून घेऊनही ते जगावर हल्ला चढवितात असें खरोखर म्हणतांच येणार नाहीं. १९१४ खालीं जर्मन भांडवलदार गटानें युरोपीय राष्ट्रांच्या सरहद्दी, परराष्ट्रें व आर्थिक संघटना यावर संकट आणलें; व स्वतांचा नाश करून घेतला तसेंच संकट तेंच जर्मन राष्ट्र पुनश्च आणूं पहात आहे याचा कांहीं तरी खुलासा करतां यावयास नको काय ?

## कापाकापीवर उभारलेली परिस्थिति

भांडवलशाहींत पुनःपुनः युद्धें होणें अपरिहार्य असतें हा जो मार्क्सवाद्यांचा सिद्धांत तो सध्यांच्या परिस्थितींत कसा लागू पडतो ? या प्रश्नाचें उत्तर अगदीं सोपें आहे. १९१४ सालाप्रमाणेंच आतांही जर्मन भांडवलदार व जमीनदार सध्यांची आंतरराष्ट्रीय संघटना बदलून घेण्यास अनिवार परिस्थितीमुळें उद्युक्त आले आहेत. कारण त्या वेळेप्रमाणें आतांही भांडवलदार व जमीनदार या नात्यानें यापुढें चालू परिस्थितींत जिवंत राहणें त्यांना अशक्य आहे. हल्लींची आंतरराष्ट्रीय परिस्थिति जर्मनीची कापाकापी करून उभारण्यांत आली आहे. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका आणि त्याहून कमी प्रमाणांत इटाली या राष्ट्रांतील भांडवलदारांनीं गेल्या महायुद्धानंतरच्या परिस्थितींत शक्य झालें तितक्या प्रमाणांत मागासलेले मुलूख आपसांत वाटून घेतले. कच्च्या व पक्क्या मालाचे बाजार आपल्या हातांशीं ओढून घेतले. भांडवलशाहीच्या सद्यःस्थितींत नफ्याचा दर अमुक इतक्या कमींतकमी मर्यादेवर रहावा यासाठीं अवश्य अशी सर्व परिस्थिति त्यांनीं हस्तगत करून घेतली. पण हें घडवून आणण्यासाठीं जर्मन

भांडवलदारांना नुसती जिवंत राहण्यासाठीं जी परिस्थिति अवश्य होती ती सर्वस्वी हिरावून घेणें त्यांना भाग पडलें. भांडवल गुंतविण्यासाठीं, कच्चा माल मिळविण्यासाठीं आणि भरपूर नफ्यानें माल विकतां येईल असे बाजार हातीं ठेवण्यासाठीं जर्मनीस ज्या वसाहतींची गरज होती त्या वसाहती जर्मनीला न देणें हें जेत्या राष्ट्रांना भाग पडलें.

## जर्मनी काय करतो

इतक्यानेंच भागलें नाहीं. जर्मन भांडवलदारांचे जे उद्योगधंदे आहेत त्यांची उत्पादनशक्ति अफाट आहे. जर्मनींतील वेस्टफॅलिया येथील उद्योग-धंद्यांची उत्पादनशक्ति जगांतील अतिश्रेष्ठ धंद्याइतकी वाढली आहे. तेथील खाणी, पोलादाचे कारखाने, गॅसचे कारखाने, एंजिनिअरिंग वगैरे क्षेत्रांत अगदीं अद्यावत् यंत्रसामुग्री आली आहे. पण आर्थिक परिभाषेंत याचा अर्थ काय होतो ? याचा अर्थ जर्मन भांडवलशाहींत जें एकंदर भांडवल आहे त्यांत स्थिर भांडवल खूपच असून चर भांडवल त्या मानानें फार थोडें आहे असा होतो. याचा परिणाम काय हें आपणांस माहीत आहे. जर्मन भांडवलदारांना आपले धंदे जर किफायतीनें चालवावयाचे असतील, नफ्याचा दर खालीं उतरूं नये आणि एकूण नफा कमी होऊं नये असें त्यांना घडवून आणावयाचें असेल तर नफ्याचा दर उतरूं नये यासाठीं जे अनेक उपाय योजण्यांत येतात असें मार्क्सनें ( कॅपिटलमध्यें ) सांगितलें आहे ते उपाय त्यांना योजले पाहिजेत. पहिला उपाय म्हणजे मजुरीचे दर मजुरांच्या चरितार्थाला कमींत कमी जेवढें धन लागेल तितके खालीं खेचून अथवा मजुरांचें कौशल्य कमी झालें तरी त्याची पर्वा न करतां मजुरीचा दर चरितार्थांच्याहि खालीं खेचून, वाढाव्याचा दर वर खेचणें हा होय. जर्मन भांडवलदार हा उपाय पूर्ण प्रमाणांत उपयो-गांत आणीत आहेत. पण या उपायाच्या पोटींच अपायाचें बीज रुजत घातलेलें असतें. मजुरीचे दर कमी करण्यामुळें जनतेला लागणाऱ्या उपभोग्य संपत्तीचा खप स्वदेशांत अगदीं कमींतकमी प्रमाणांत होतो, म्हणून वाढाव्याच्या दराची वाढ करण्यासाठीं या उपायाबरोबरच दुसरेही उपाय योजावे लागतात. नवीन विदेशीय बाजार मिळविणें, भांडवल गुंतविण्यास नवें क्षेत्र मिळविणें, कच्च्या मालाचे मुलुख मिळविणें, हे ते उपाय होत. उदाहरणार्थ जर्मन भांड-

वलदारांना आपण उत्पन्न केलेल्या मालांपैकीं बराच माल वाढावारूपानें पदरांत पाडून घेणें एवढेंच पुरत नसून तो माल विकून त्याचें पैशांत रूपांतर करणें हेंही अवश्य असतें, आणि हा माल स्वदेशांत मजुरी उतरल्यानें तेथें विकून टाकणें अशक्य होतें म्हणून परदेशांत विकून टाकणें हें अपरिहार्य ठरतें.

## गेल्या युद्धानंतरची विसंगति

मार्क्सची ही विचारपद्धति आपण वापरल्यास जर्मन भांडवलदारांनीं आतां मुलूखविस्तार केला पाहिजे, अथवा त्यांचा कांहीं तरी स्फोट झाला पाहिजे ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्वच्छ आहे. जेत्या राष्ट्रांनीं आर्थिक विस्ताराची साधनें सर्व जर्मन भांडवलदारांकडून हिसकून घेतलीं होतीं. म्हणून तीं परत हवीं असें जर्मनीला वाटतें हें तर खरेंच, पण इतर सर्व भांडवलशाही राष्ट्रांच्यापेक्षां जर्मन भांडवलदारांचें उत्पादनसामर्थ्य प्रचंड असल्यामुळें त्यांनाच या साधनांची इतर राष्ट्रांपेक्षांहि अधिक गरज आहे असें त्यांना वाटतें. उदा. फ्रेंच भांडवलदारांचे मुलूख जर हिसकून घेतले गेले असते तर गरीबीनें कां होईना त्यांना आपलें जीवन कंठता आलें असतें. कारण जर्मन भांडवलदारांच्यापेक्षां फ्रेंच भांडवलदारांची उत्पादन शक्ति पुष्कळच कमी होती व आहे. त्यांच्याजवळ स्थिर भांडवल बरेंच कमी असून त्या मानानें चर भांडवल पुष्कळ अधिक आहे. भांडवलशाहीच्या दृष्टीनें पाहिलें तर खरोखर गेल्या युद्धांत फ्रान्सचा पराभव होऊन जर्मनीचा विजय व्हावयास हवा होता. तसें झालें असतें, तर भांडवलशाही टिकविण्याच्या दृष्टीनें त्याचा परिणाम असा झाला असता कीं जर्मन भांडवलदारांना फ्रेंच साम्राज्याचा बराचसा भाग मिळाला असता आणि त्यामुळें परस्पराशीं स्पर्धा करणाऱ्या निरनिराळया भांडवलदार राष्ट्रांना त्यांच्या उत्पादनशक्तीच्या प्रमाणांत जवळ जवळ योग्य इतके मुलुख मिळाले असते. ज्या राष्ट्राची उत्पादनशक्ति जास्त आहे त्याला विस्तारास अधिक मुलूख मिळाला असता. पण गेल्या महायुद्धांत फ्रान्सचा जय होऊन जर्मनीचा पराभव झाल्यामुळें सामर्थ्यशाली अशा जर्मन भांडवलदारांची विस्तारांचीं सर्व साधनें हिरावून घेतलीं गेलीं आणि फ्रेंचांना आधींच असलेल्या पुष्कळ मुलुखांत आणखी मुलुख मिळाला, म्हणून गेल्या युद्धाचा परिणाम असा झाला कीं, आर्थिक वस्तुस्थितीशीं राजकीय परिस्थितीची संगति राहिली नाहीं. उलट त्या दोहोंतील विरोध अधिकाधिकच तीव्र होत गेला.

## जर्मनीवर बिनतोड प्रसंग

रसाय तहानें हा परिणाम जगावर लादल्यानंतर पूर्वीच्यापेक्षां कितीतरी लौकर पुन्हां युद्धपरिस्थिति निर्माण होणें अपरिहार्य झालें. लेनिननें आपल्या ' इंपीरिॲलिझम् ' ( साम्राज्यशाही ) या ग्रंथांत या प्रश्नाची चांगली चर्चा केली आहे. विसाव्या शतकांतील जागतिक परिस्थितीस मार्क्सवादी विचारसरणी त्यानें फार चांगल्या प्रकारें लावून दाखविली आहे. लेनिननें त्या पुस्तकांत असें दाखविलें आहे कीं जगांत निरनिराळ्या भांडवलदार राष्ट्रांत जी प्रादेशिक वाटणी झाली ती निरनिराळ्या राष्ट्रांच्या नवीन बदललेल्या उत्पादन-सामर्थ्याच्या प्रमाणांशीं विसंगत झाली म्हणजे त्यांत संगती उत्पन्न करण्याकरितां मुलुखांची फेरवाटणी करावी लागते. म्हणून भांडवलशाही युद्धें होतात; १९१४ सालीं जर्मनी हें दुसऱ्या नंबरचें प्रचंड भांडवलदारी राष्ट्र झालें होतें. अर्थात् जगांत मुलुखगिरीचे बाबतींत दुसऱ्या दर्जाचें राष्ट्र व्हावें अथवा मरून जावें असा बिनतोड प्रसंग जर्मन भांडवलदारांपुढें होता.

## फॅसिझम् कां आला ?

१९१४ सालीं जर्मनीचें आर्थिक सामर्थ्य आणि त्याचा राजकीय दर्जा यांत जी विसंगति होती ती आज १९३४ सालीं त्याहूनही अधिक झाली आहे. आजही जर्मनी हें आर्थिक सामर्थ्याचे बाबतींत जगांत दुसऱ्या नंबरचें राष्ट्र आहे. १९२० पासून १९३० पर्यंतच्या कालांत जर्मनीचें उत्पादनयंत्र अगदीं अद्यावत् सुधारून जगांत अव्वल दर्जाचें बनविण्यांत आलें आहे. ( कदाचित् अमेरिका एकटीच जर्मनीला वरचढ असली तर असेल ) फ्रान्सपेक्षां जर्मनीचा वरचढपणा आतां अधिकच वाढला आहे. पण उलट जर्मन भांडवलदारांना आर्थिक विकासाला कोठेंच वाव ठेवण्यांत आलेला नाहीं. अर्थात् जर्मन भांडवलदार अगदीं हताश व बेफाम मनःस्थितींत आहेत यांत मुळींच आश्चर्य नाहीं. गेल्या महायुद्धांत आपण जें गमाविलें तें तर परत मिळविलेंच पाहिजे, पण अधिकहि मिळविलें पाहिजे असेंहि त्यांना वाटतें, यांत तरी आश्चर्य काय ? ही परिस्थिति लक्षांत घेतां जर्मन भांडवलदार हल्लीं अगदीं बेफाम साहसाचा जो जुगार खेळत आहेत, तो स्वाभाविक नव्हे काय ? जर्मनींतालं फॅसिझम हा तेथील आर्थिक परिस्थितीचें अगदीं स्वाभाविक असें फळ आहे. जर्मन भांडवलदारांना जगा-

वयाचें असल्यामुळें स्वदेशांत एक पोलादी हुकुमशहा स्थापावा आणि विदेशावर चढाई करण्याची शक्ति वाढवावी असें करण्यावांचून त्यांना गत्यंतरच नव्हतें. गेल्या महायुद्धानंतर ज्या कोंडींत आपण सांपडलों आहों असें त्यांना दिसत होतें ती कोंडी तोडण्यास एवढाच एक मार्ग होता."

## मुत्सद्यांचा परीक्षिति झाला

स्ट्रॅचीच्या या उताऱ्याचें वैशिष्ट्य व त्यांतला अचूकपणा आज स्ट्रॅचीनें अनुमानिलेलें युद्ध प्रत्यक्ष कोसळलेंच असल्यानें आश्चर्यकारक वाटतो. सर्व राष्ट्रांच्या मुत्सद्यांना ही गोष्ट टाळायची होती व टाळणें शक्य आहे असें वाटून त्यांचे प्रयत्नही अटोकाट चालले होते. पण सर्वांच्या देखत हे सर्व प्रयत्न फसले आणि मृत्यूच्या टप्प्यापलीकडे जाऊन ऋषींची भविष्यवाणी चुकवूं पाहाणाऱ्या परिक्षितीस अखेर मरणानें गाठलें त्याप्रमाणें सर्व मुत्सद्यांना धाब्यावर बसवून एका मार्क्सवाद्याची भविष्यवाणी खरी झाली. यांत मार्क्सच्या विचारसरणीची अचूकता सिद्ध होते.

## क्रूर आर्थिक युद्धें

भांडवलशाहीचा आधार जसा वर्गयुद्ध हा आहे त्याप्रमाणें आंतरराष्ट्रीय युद्धें हा भांडवलशाहीची अपरिहार्य फलश्रुति आहे हें वरील विवेचनावरून समजून येईल. आंतरराष्ट्रीय युद्ध म्हटलें कीं शस्त्रयुद्ध, रक्तपात, वैरभावनेनें केला जाणारा धनाचा विध्वंस या गोष्टी डोळ्यासमोर येतात. अशीं युद्धें जगाच्या पाठीवर कोठें ना कोठें नेहमीं चालू असलीं तरी प्रत्येक भांडवलशाही राष्ट्र नेहमींच शस्त्रयुद्ध करीत असतें असें नाहीं. पण शस्त्रयुद्धासारखें न दिसतांही तितकेंच भयानक अथवा त्याहूनही अधिक भयानक असें आर्थिकयुद्ध भांडवलशाही समाजांत नेहमीं चालू असतें. रानटी समाजांत माणसाला शिक्षा करण्यासाठीं त्याचा वध करायचा असला म्हणजे शस्त्रानें त्याचा शिरच्छेद करीत. ही क्रूर चाल जर्मनीसारख्या राष्ट्रांत अजूनही रूढ आहे. सुधारलेल्या अमेरिकेनें मृत्यूची शिक्षा झालेल्या गुन्हेगारांस विजेच्या धक्क्यानें ठार मारण्याची 'दयाळू' पद्धति अमलांत आणली आहे. पण अशा विजेच्या धक्क्यानें मरणाऱ्या माणसाचे हाल किती होतात हें पाहण्यासाठीं गेलेल्या एका पत्रपंडितानें ही वीजहत्या

शस्त्रहत्येपेक्षांही क्रूर व चीड आणणारी आहे असें वर्णन केलें आहे. तेथें रक्तपात झालेला दिसत नाहीं. पण विजेच्या खुर्चीवर बसलेला माणूस विजेच्या प्रवाहाचा धक्का बसतांच जीव जाण्यापूर्वी रताळ्यासारखा सर्वांगभर उकडला जाऊन काळा ठिक्कर पडतो, त्याच्या सर्वांगास एकसारखे खतखतून पोपडे येत असतात आणि हा किळसवाणा प्रकार चालू असतां तें शरीर त्या खुर्चीवरून निसटण्यासाठीं जागच्या जागीं नाचत राहून कांहीं सेकंद अथवा मिनिटें जिवंतपणाची व असह्य वेदनांची साक्ष देत असतें. त्याचप्रमाणें प्रत्यक्ष शस्त्रयुद्धाप्रमाणें रक्तपात न करणारें पण यातना देण्याचे बाबतींत शस्त्रयुद्धापेक्षांही क्रूर असें आर्थिक युद्ध भांडवलशाहींत नेहमीं चालू असून त्यांत समाजांतील लहानापासून थोरापर्यंत आणि श्रीमंतापासून गरीबापर्यंत सर्व सारखेच सापडलेले असतात. मानव-जातीच्या कल्याणासाठीं निघालेले यांत्रिक व शास्त्रीय शोध भांडवलशाहीनें धनोत्पादनाचे कामीं उपयोगांत आणल्यामुळें भांडवलशाही भरभराटली. पण भांडवलशाहीच्या सर्व अमदानींत मानवजातीचें धनोत्पादनसामर्थ्य सतत वाढत असतां व धनाची वाढ सतत होत असतां बहुसंख्य मानवजात वाढत्या प्रमाणांत बेकारी, जीवनाची अनिश्चिती, शारीरिक धोका व फाजील कष्ट वगैरेंच्या जंजाळांत कशी अहर्निश सापडली होती याचें मार्क्सनें वर्णन केलेंच आहे.

## पैशाचें जगड्व्याळ कार्य

यंत्रामुळें जशी ही सर्वांगीण आपत्ति वाढत असते तशीच पैसा व बँका यामुळेंही ही आपत्ति वाढत असते ती कशी तें पाहूं. भांडवलशाहीच्या भरभराटीबरोबर पैसा व बँका यांना विशेष महत्त्व येतें. किंबहुना यांच्या बळावर भांडवलशाहीची भरभराट झपाट्यानें होतें. मी एक पैशाची सुंठ घेतों व दुका-नदारास पैसा देतो. यावरून दुकानदार व मी अशा दोघांचें जग कल्पिलें तर आम्हां दोघांजवळ मिळून १ पैसा व १ पैशाची सुंठ अशा वस्तु असल्या म्हणजे हा विनिमय होवूं शकतो हें आपणाला कळतें. यावरून आपल्या या प्रचंड जगांत जितक्या किंमतीच्या विक्रीवस्तु असतील तितके पैसे गिऱ्हाइकाजवळ असले पाहिजेत असें सकृद्दर्शनीं वाटतें. पण खरोखर अशी गरज नसते. सुंठ जशी आपण उगाळून कपाळाला घालतों अथवा काढ्यांत शिजवून खाऊन टाकतो त्याप्रमाणें

दुकानदार पैसा संपवीत नाहीं. पैसा हा नेहमीं फिरता राहतो व तोच तोच पैसा अनेक देवघवीचें काम करतो. शेतकरी कोष्टयाला पैसा देऊन कापड घेतो, कोष्टी धर्मगुरूला तोच पैसा देऊन बायबल घेतो, तोच पैसा धर्मगुरु गुत्तेवाल्याला देऊन प्यायची दारू घेतो आणि गुत्तेवाला तोच पैसा शेतकऱ्याला देऊन त्याजपासून धान्य घेतो. अशा प्रकारें शेतकऱ्याचा पैसा परत त्याच्याकडे येतो व अदलाबदल म्हणजे विनिमय जो होतो तो ऐनजिनशीं म्हणजे मालास माल असा होत जातो. पण पैसा खर्च न होतां म्हणजे तो संपून न जाताही विनिमयव्यवहाराची एक गरज तो भागवितो हें येथें लक्षांत येतें. हळूहळू सोन्यारुप्याच्या पैशाची जागा कागदी पैसा घेऊं लागतो. जगांत सोनें-रुपें इतकें थोडें आहे कीं तें सर्व देवघेवीच्या व्यवहाराला नाण्याच्या रूपांत वापरायचें म्हटलें तर हल्लीं जगांत चालू आहे त्या उलाढालीच्या एक-हजारांश उलाढालीही चालणार नाहींत. म्हणून कागदी पैशानें व्यवहाराची फार सोय होते. याच कागदी पैशाची चलनी नोट, चेक, हुंडी, कर्जरोखे वगैरे अनेक रूपें अस्तित्वांत येवून बँका, रोखेबाजार वगैरे प्रचंड जगड्व्याळ संस्था निर्माण होतात. पण याच्याच पोटीं भांडवलशाहीचा आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ सुरू होतो.

## भांडवलशाहीची आंधळी कोशिंबीर

मार्क्सनें कॅपिटलच्या आरंभींच दाखविलें आहे, कीं मानवसमाज हा परस्परसहकारी व परस्परावलंबी आहे; म्हणूनच तो ' समाज ' आहे, नुसता घोळका नाहीं. पण भांडवलशाहींत विक्रीमालाला महत्त्व आल्यामुळें प्रत्येक माणूस आपल्यापरीं स्वावलंबी, स्वतंत्र व स्वयंभू आहे, असा भ्रम होतो. माणसें परस्परावलंबी, परस्परसहकारी आहेत म्हणूनच पैसा व विक्रीमाल जन्मास आला ही गोष्ट लक्षांत येत नाहीं. उलट माणसामाणसांना एकत्र आणणारा दुवा म्हणजे पैसा व विक्रीमाल असें वाटू लागतें.

हा खरोखर भ्रम असतो. या भ्रमाचा भांडवलशाहीच्या भरभराटीच्या काळांत एक विशिष्ट परिणाम होवूं लागतो. एकाद्या खेड्यांत कोष्टयानें कापड किती विणावें हें पूर्वी त्याला माहीत असे. त्याचें गिऱ्हाईक त्यांना लागणाऱ्या मालाचें परिमाण व कोष्टयांची उत्पादनशक्ति या सर्वांचें मोजमाप त्याला पाठ असे. तितका माल तो काढी. आज असें होत नाहीं. केवळ्या जगाला कोणता

माल किती हवा हें कोणासच नक्की सांगता येत नाहीं. बाजारांत गिऱ्हाइकांकडून पैसा येईल, तितका माल बाजाराला हवा हें खरें. पण गिऱ्हाइकाकडून पैसा किती येईल याचा अंदाज कांहींच नसतो. आणि त्यापूर्वीच माल मात्र तयार करावा लागतो. अर्थात् भावी कालांत येणाऱ्या पैशाच्या नांवानें हा माल तयार करायचा, त्यासाठीं कच्चा माल घ्यायचा, त्यासाठीं यंत्रसामुग्री करायची, म्हणजे व्यवहार उधारीचा होतो; म्हणजेच पतरूपी पैसा निर्माण करावा लागतो. आधुनिक यांत्रिक व शास्त्रीय उत्पादनांत एक वर्षांत एक लाखाचा माल तयार करायचा म्हटलें तर त्यासाठीं पन्नास वर्षेपर्यंत दरसाल एक लाखाचा माल निर्माण करणारी पन्नास लाखाची यंत्रसामुग्री आधीं उभी करावी लागते. चढाओढ हा आर्थिक उत्पादनाचा पाया असल्यानें अनेक कारखानदार अशी पन्नास लाखाची यंत्रसामुग्री करतात व सर्वांचा माल एक दिवस बाजारांत येऊन पडतो. पण गिऱ्हाईक किती आहे हें कोणासच माहीत नसतें. आणि मग चढाओढीनें भाव उतरवून जसें सर्व भांडवलदारांचें नुकसान होतें, त्याचप्रमाणें अखेर सर्व माल खपला नाहीं म्हणजे लाखों रुपयांचें भांडवल बुडीत जाऊन भांडवलदारांचें नुकसान होतें, कामगार बेकार होतात, भांडवलदार धुळीस मिळतात, संपत्तीचा विध्वंस होतो व सर्व समाजाची धनशक्ति थोडथोड्या लोकांच्या हातीं जात असते. जेवणारी माणसें किती हें न कळतां खूप अन्न शिजविलें म्हणजे जशी नासाडी, नुकसान व अनारोग्य उद्भवतें तसाच हा प्रकार होय. भांडवलदार-भांडवलदारांत, कामगार-कामगारांत आणि भांडवलदार—कामगारांत हें चढाओढीचें युद्ध चालत राहून प्रत्यक्ष शस्त्रें न वापरतांहि प्राणांची व दौलतीची उकडहंडी होत रहाते. खेड्यांची मर्यादा ओलांडून बाजार जगड्व्याळ झाला, त्याचा हा परिणाम होतो हें खरें. तथापि माणूस परस्परावलंबी आहे, या सत्याचा विसर पडल्यानें सामुदायिक जीवनाविषयीं बेफिकिरी उत्पन्न होवून जो तो आपल्यापुरतांच विचार करूं लागतो, त्याचा बव्हंशीं हा परिणाम होय.

## व्यक्तिवाद्यांची भूमिका

प्रत्येक व्यक्ति स्वावलंबी व इतरापासून स्वतंत्र आहे, ही जी व्यक्तिस्वातंत्र्यवाद्यांची कल्पना असल्याचें मार्क्सनें दाखविलें आहे त्या कल्पनेमुळें भांडवलशाहीच्या आर्थिक व्यवहारांत अराजक माजतें. राज्यसत्तेचें कार्यक्षेत्र फक्त

राजकीयच आहे, जीवित व मालमत्ता यांचें गुन्हेगारापासून रक्षण करणें, पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्यावर व राजीखुषीवर आधारलेले आर्थिक करार लोकांना पाळायला लावणें व व्यक्तिव्यक्तीमध्यें चोख न्याय देऊन लोकांच्या सर्व आर्थिक व सामाजिक व्यवहाराच्या बाबतींत पूर्ण तटस्थ राहणें हें सरकारचें कर्तव्य आहे, असें व्यक्तिवाद्यांनीं प्रतिपादिलें. व्यक्तीव्यक्तीमध्यें संबंध यावयाचा तो फक्त विक्रीमालाच्या देवघेवीमुळें यावयाचा. हा विक्रीमाल प्रत्येकजण दुसऱ्यासाठींच करणार; पूर्वींच्या खेड्यांतल्या कोष्ट्याला व कुंभाराला गांवाला माल किती हवा हें माहीत असे व तेवढा तो करी. पण भांडवलशाही समाजांत मालाचें उत्पादन व विनिमय खेड्यांपुरतेंच न राहतां प्रांतीय, राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय प्रमाणावर होवूं लागलें. एवढ्या मोठ्या क्षेत्रावरील गिऱ्हाइकास कोणता माल किती हवा हें कसें ठरवणार? मागणी व पुरवठा या सिद्धांतानुसार ही माहिती अनुमानता येईल व त्यामुळें उत्पन्नावर नियंत्रण ठेवणें शक्य होईल असें भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांनीं उत्तर दिलें. या उत्तराची अर्थशास्त्रज्ञांची उपपत्ति काय हें मागें एकदोनदा चर्चिलें आहेच. पण अर्थशास्त्रज्ञांची ही उपपत्ति भांडवलशाही धंद्यांचें स्वरूप जसें जगड्व्याळ झालें तशी निकामीच नव्हे तर अपायकारक ठरली.

## मागणी-पुरवठा हा सिद्धांत कां फसला

ज्या मालाला मागणी वाढेल म्हणजे गिऱ्हाईक जास्त व माल कमी असें होवून किंमत वाढेल त्या मालाच्या धंद्यांत आपोआप नवें भांडवल येईल आणि ज्या मालाला मागणी कमी येईल त्या मालाच्या धंद्यांतून भांडवल बाहेर जाईल ही उपपत्ति धंद्यांत वार्षिक उत्पादनाच्या चारपांचशेंपट भांडवल एकदम गुंतवून व तें पन्नासपाऊणशें वर्षे सतत किफायतशीर मालविक्रीनें वसूल करण्याचें ठरवून तो धंदा काढायचा म्हटला म्हणजे निरुपयोगी ठरते. असा एखादा प्रचंड भांडवली धंदा काढल्यावर मालाला मागणी खुंटली तर लक्षावधि रुपये भांडवल उकिरड्यावारी फुंकलें जातें. 'मालाला मागणी' याला सुद्धां एक विशिष्ट अर्थ आहे. भिकाऱ्यांची गर्दी चोहोंकडे हवी तेवढी आहे. पण भांडवलदाराला शहाजोग मागणी म्हणजे पैसा घेऊन येणाऱ्या गिऱ्हाइकाची मागणी हवी असते. तेव्हां जगांतील लोकसंख्या अमुक इतकी माहीत आहे, आपल्या मालाचें विक्रीचें क्षेत्रही अमुक इतकें हें माहीत आहे असें धरून चाललें व त्यावरून

माल निर्माण करायचा किती हें अनुमानता येईल असें म्हटलें तरी तेवढ्यानें भागत नाहीं. कारण पैसा घेऊन येणारे गिऱ्हाईक किती याचा अंदाज लोकसंख्या किती यावरून लागत नाहीं. पैशाचे प्रकार अनेक झालेले असतात. पतीच्या व्यवहारामुळें समाजांत पैसा किती याचा थांग लागत नाहीं. आणि यांतला किती पैसा कारखानदारी उभारण्यांत खर्च होतो व भोग्य मालाच्या खरेदींत किती होतो हेंही कुणाला कळत नाहीं. प्रत्येक उत्पादक आपापल्यापरीं अधिकाधिक प्रचंड कारखानदारी वाढवीत असतो. त्यासाठीं प्रचंड भांडवल प्रत्येकजण गुंतावितो. अर्थात् समाजाला हवा त्याहून कितीतरी अधिक माल निर्माण होतो. तो खपत नाहीं व भांडवल व भांडवलदार यांची धुळदाण होते.

## आर्थिक योजनेचें वेड

राज्यसंस्थेनें आर्थिक व्यवहारांत तटस्थ रहावें आणि मागणी व पुरवठा या सिद्धांताला म्हणजे पैशाला राजा करावें अशी भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांची कल्पना होती. पण यामुळें आर्थिक व्यवहारांत शासन म्हणजे नियंत्रण मुळींच न राहतां सर्वत्र बजबजपुरी माजली व तीमुळें प्रचंड अनर्थ ओढवले. सध्यांच्या काळीं भांडवलशाही टिकवून धरूं पाहाणाऱ्या अर्थशास्त्रज्ञांना भांडवलशाहींत अराजकता हाच दोष प्रामुख्यानें दिसतो व तेवढा नाहींसा करून भांडवलशाही टिकविता येईल असें त्यांचें मत असतें. सोव्हिएट रशियांत एकीमागून एक आंखीव आर्थिक योजना हातीं घेतल्या गेल्या व पार पाडल्या गेल्या, सारें जग आर्थिक अनर्थांत होरपळत असता रशियांत मात्र आर्थिक प्रगति सतत होत राहिली त्यामुळें चढाओढीचें व अराजकतेचें धोरण आर्थिक व्यवहारांत बंद करून आंखीव आर्थिक योजनेचें धोरण अवलंबिलें पाहिजे असें अनेक भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांना वाटूं लागलें आहे. त्याचा कोठें कोठें कमीअधिक प्रमाणांत अमलही होतो आहे. या धोरणामुळें राज्यसंस्थेचें कार्यक्षेत्र वाढतें. कोणत्या मालास गिऱ्हाईक किती आहे हें सरकारनें सर्व कारखानदारासाठीं अजमावावें आणि त्याप्रमाणें उत्पादनाचे नियंत्रण करावें अशी ही कल्पना आहे. अमेरिका, जर्मनी, इटाली इत्यादि ठिकाणीं या धोरणाचा थोडाबहुत अमलही सुरू आहे. युद्धप्रयत्नाचे बाबतींत हें धोरण बरेंच जारी आहे.

## भांडवलशाहींत आंखीव योजना अशक्य

पण निवळ आर्थिक उत्पादनाचे बाबतींत बोलायचें तर भांडवलशाहीला आंखीव योजना यशस्वी करणें शक्य होणार नाहीं असें दिसून येतें. कारण ज्या प्रचंड कारखानदारीचे बाबतींत हें नियोजन विशेष अवश्य आहे त्या प्रचंड कारखानदारीची चढाओढ ही आंतरराष्ट्रीय असते. यामुळें कोणत्याही एका सरकारला हें नियोजन करणें शक्य होत नाहीं. दोन अथवा अधिक राष्ट्रांनीं सहकार्यानें करावें म्हटलें तर निरनिराळ्या राष्ट्रांत अनेक कारणांनीं विषमता असतें, यामुळें सहकार्य व्हावयाचे ऐवजीं हळूहळू एक दुसऱ्याच्या पोटांत गडप होण्याची भीति असते. एका राष्ट्रांतील भांडवलदारांतही विषमता असल्यामुळें जे वलवान असतात ते राज्यसंस्था काबीज करून दुर्बलांना अगदीं सरकारी दाढांनीं चावून खातात.

नियोजन होतें तेंही विध्वंसक अथवा जनतेच्या उपासमारीस कारण असें होतें. अमेरिकेंत आर्थिक नियोजनाच्या नांवाखालीं शेतांत उगवलेला कापूस परत शेतांत नांगरून टाकण्यांत आला. कां ? तर कापूस उगवून अगदीं काढणीस आल्यावर त्याला गिऱ्हाइक नाहीं असें कळून आलें. म्हणून हा कापूस काढून बाजारांत आला असता तर मागणी कमी म्हणून त्याचा भाव फार उतरला असता, तो सगळा लवकर खपला नसता आणि त्याची काढणी, ठेवणी व सांभाळणी यांचा खर्च फार झाला असता. त्यामुळें अखेर प्रचंड नुकसान आलें असतें. म्हणून जरूर इतकाच कापूस शिलक ठेवून बाकीचा नांगरण्यांत आला. पण कापसाला बाजारांत मागणी नव्हती याचा अर्थ काय ? अमेरिकेसारख्या धनवान देशांतही लक्षावधि माणसें अपुऱ्या कपड्यांमुळें थंडीवाऱ्यांत कुडकुडत असतात. कापडखरेदीस त्यांचेजवळ पैसा नसतो. म्हणून मालाला मागणी कमी आहे असें मानलें जातें. पण मालाच्या विध्वंसांत लक्षावधि डॉलर उध्वस्त होतातच. शिवाय पैशानें येईल तीच मागणी पुरवायची म्हटलें म्हणजे लक्षावधि गरिबांच्या जीवनास उपयोगी अशा वस्तु निर्माण करण्याऐवजीं थोड्याशा धनिकांना लागणाऱ्या चैनीच्या वस्तु निर्माण करण्याकडे भांडवलाचा व्यय होत राहतो. आणि अमुक मालाला अमुक इतका बाजार कमी पडतो असें अगदीं हिशेबानें कळून आलें म्हणजे तेवढा बाजाराचा मुलूख जिंकून घेण्यासाठीं परराष्ट्रांशीं युद्धें कर-

ण्यासाठीं शस्त्रास्त्रकारखान्यांची आंखणी होते. एकंदरींनें बेकारी, अनिश्चिती, धोका यांतलें आर्थिकनियोजन पद्धतीनें कांहींही कमी होत नाहीं. शस्त्रयुद्ध दहाबीस वर्षांनीं केव्हां तरी येत असलें तर हें आर्थिक युद्ध आखिल समाजांत अहर्निश चालू राहतें, आंखीव योजनेच्या धोरणामुळें भांडवलदारांतील चढाओढ जितक्या प्रमाणांत कमी होईल तितक्या प्रमाणांत भांडवलदारवर्गाच्या कैचींत कामगारवर्ग सापडत जातो. त्याच्या संघटना मोडण्यांत येतात व संघटित भांडवलशाहीचा म्हणजे फॅसिझमूचा गुलाम मजूरवर्गास बनविण्यांत येतें. हाच फॅसिझम् होय. अखेर आर्थिक युद्धाचें रूपांतर शस्त्रयुद्धांत व्हावयाचें टळत नाहींच.

## भांडवलशाहींत अराजक अपरिहार्य

आर्थिक नियोजनानें भांडवलशाही सुधारूं शकतें हें तत्त्व मुळांतच चूक आहे. प्रत्येक माणूस स्वतंत्र, स्वावलंबी व स्वयंभू आहे या अर्थशास्त्रज्ञांच्या तत्त्वामुळेंच अराजक माजलें असें मार्क्सचें मत आहे. भांडवलशाहीच्या सुधारकांना रशियाच्या उदाहरणावरून तें मत पटून त्यांनीं 'भांडवलशाहींतलें व्यक्तिस्वातंत्र्य व तज्जन्य अराजक मोडावें आणि संघटित भांडवलशाही स्थापावी' असें प्रतिपादलें व तसे प्रयत्नही झाले. पण त्यांना यश कां आलें नाहीं? अखेर संघटित भांडवलशाहीनें युद्धें माजवून सगळीच भांडवलशाही आज मोडींत घातली आहे; असें कां व्हावें? याचें कारण 'भांडवलशाहींत अराजकता हा एक दोष आहे व तो नाहींसा केल्यानें भांडवलशाहीची सुधारणा होवूं शकते' हें मतच खरें नसून मार्क्सनें असें मत मांडलेलेंच नाहीं. मार्क्स भांडवलशाहींत आर्थिक अराजक आहे असें म्हणतो तेव्हां भांडवलशाहीपासून तें अभिन्न आहे, तिच्या तें अंगभूतच आहे आणि भांडवलशाहीच्या नाशाबरोबरच तें नाश पावूं शकतें असें म्हणण्याचा त्याचा आशय असतो. धनोत्पादनसाधनावर खाजगी मालकी असणें हें भांडवलशाहीचें नुसतें लक्षण नव्हे तर सारसर्वस्व आहे. हीं साधनें प्रचंड प्रमाणांत वाढलीं म्हणजे बहुसंख्य समाजाचें जीवनसाधन असे जे लहान धंदे वगैरे ते सर्व अजीबात नष्ट होतात. धनोत्पादनसाधनांच्या मालकाला मिळणारा नफा हीच एक त्याला सदर साधनें वापरांत ठेवण्याला प्रेरणा असते. हा नफा चढाओढीनें मिळावयाचा असल्यानें धनोत्पादनसाधनांची प्रत्येक भांडवलदार सुधारणा करतो. त्यांत अधिकाधिक भांडवल गुंतवून बहुसंख्य समाज

म्हणजे नक्त पगारावर जगणारे मजूर, कारकून वगैरे यांची संख्या तो त्या प्रमाणांत कमी करतो. यामुळें मालाचें गिऱ्हाईक मालाच्या मानानें कमी होतें. उलट प्रत्येक भांडवलदार अधिकाधिक उत्पादन करण्यासाठी चढाओढीनें धावत असल्यानें गिऱ्हाइकाच्या मानानें उत्पादन वाढत जातें. अर्थात् काहीं एका मर्यादेपलीकडे उत्पादन गेलें कीं माल न खपून नफ्याचा दर उतरूं लागतो आणि मग भांडवलदारांची दिवाळी वाजतात.

संघटित भांडवलशाहीनें म्हणजे फॅसिझम्नें भांडवलदारांतली चढाओढ कमी करून मजूरसंघटना दडपून टाकल्या. यामुळें अराजक कांहींसें मोडलें खरें, पण तें त्या त्या देशापुरतें मोडलें. त्यामुळें मजूरवर्गाची आपत्ति वाढली. मजूरवर्गाची मजूरी कमी झाल्यामुळे स्वदेशी बाजार कमी झाला, उरलेला खपविण्याला हक्काचा बाजार हवा म्हणून परदेश जिंकण्यासाठी युद्ध सुरु करावें लागलें. म्हणजे ज्या एका राष्ट्रांत अराजक मोडलें तेथें बहुसंख्य जनतेसाठीं तुरुंगखाना उघडला आहे व आंतरराष्ट्रीय अराजकाचें पर्यवसान भयानक शस्त्रयुद्धांत झालें आहे.

## रशियन घटनेचें सार

रशियानें आर्थिक आंखणी करून आपली भरभराट करून घेतली यावरून भांडवलदार राष्ट्रांचीही तशी भरभराट होईल असे नाहीं. रशियानें आंखणी केली हे रशियाचें वैशिष्ट्य नसून भांडवलशाही नष्ट करून समाजवादी समाजघटना स्थापण्याचा उपक्रम केला हे त्याचें वैशिष्ट्य होय. यामुळें भांडवलदार-भांडवलदारांत तेथें आतां चढाओढ होत नाहीं. कारण तेथें भांडवलदार नाहींतच. सरकार जनतेचें आहे व धनोत्पादनसाधनें बहुंशी त्या सरकारच्या मालकीचीं आहेत. पूर्वीं एका खेड्यांत कुंभाराला, सुताराला गांवच्या गरजा माहीत असत. तेवढा माल ते करीत. त्याप्रमाणें एकंदर रशियन जनतेस काय काय हवें याचा शास्त्रज्ञाकडून अंदाज केला जातो; लोकप्रतिनिधीकडून सल्ला मागितला जातो; परदेशांतून आणावयाचा माल कोणता याचा अंदाज बांधला जातो. भावी उत्पादनासाठीं काय काय किती हवें याचा अंदाज घेतला जातो आणि तेवढा माल जनतेकडून निर्मून घेतला जातो. निर्मिलेल्या मालांपैकीं विदेशी पाठवावयाचा माल, आणि भावी उत्पादनासाठीं लागणारा माल वगळून बाकीचा माल जनतेला उपभोगाकरता खरेदी करतां येईल एवढी मजूरी वाटली जाते. जनता त्या मजूरीनें माल खरेदी करून व उपभोगून

पुन्हा नव्या उत्पादनाला ताजीतवानी होते. कमीत कमी मजूरीवर अधिकांत अधिक माल निघून मधला नफा टाळावा अशी बुद्धि तेथें कोणाची नाही, असण्याचें कारण नाहीं.

रशियाच्या समाजघटनेवर कोणी कोणतेही आक्षेप घेवो. त्या घटनेचें सार हें वर सांगितल्याप्रकारचें आहे. प्रत्येक व्यक्ति स्वतंत्र, स्वावलंबी, स्वयंभू असें तेथें मानीत नाहींत. राष्ट्र हें एक परस्परावलंबी कुटुंब आहे असें तेथें मानतात. तसेंच बहुसंख्यसमाजास भांडवलदारांनीं संघटितपणें पिळून काढून भांडवलदारांनी संघटितपणें नफा मिळवावा हें तेथल्या उत्पादनाचें ध्येय नसून कुटुंबांतील सगळ्यांचें धारण, पोषण, संवर्धन, संस्कृतिविकास व्हावा यासाठी धनोत्पादन व इतर सर्व सामाजिक व्यवहार तेथें केले जातात.

## भांडवलशाहीचें कार्य संपलें

अर्थात् धनोत्पादनांची सध्यां जी अफाट सुधारणा झाली आहे त्यामुळेंच रशियास या गोष्टी आज करतां येत आहेत. यापूर्वी म्हणजे उत्पादनसाधनें मागसलेलीं असतांना रशियास या गोष्टी करतां आल्याच नसत्या हें मार्क्स-वाद्यांना म्हणजे कम्युनिस्टांना मान्यच आहे. म्हणूनच भांडवलशाहीनें मानव जातीवर अन्याय व दुःख यांचे डोंगर लोटले याबद्दल मार्क्सला नैतिक चीड येत असतांही धनोत्पादनसाधनांची अफाट वाढ करून भांडवलशाहीनें मानव जातींचें धनोत्पादनसामर्थ्य वाढविलें याबद्दल तो भांडवलशाहीचें ऐतिहासिक दृष्ट्या समर्थन करतो व तिला धन्यवाद देतो. पण आतां जगभर भांडवलशाहीचा साम्राज्यवादी पसारा पसरला असून नफा मिळविण्यासाठी कमींत कमी मजूरीवर जास्तींत जास्त धन निर्माण करण्याच्या भांडवलशाहीच्या अपरिहार्य धोरणामुळें धनोत्पादनसाधनें पुरेशीं वापरलींही जात नाहींत, लोकांना धनाचें डोंगर समोर दिसत असले तरी तें धन वापरायला मिळत नाहीं, धनाचा विध्वंश होत आहे व युद्धें माजत आहेत. भांडवलशाहीच्या हातून आतां माणसाचें धनोत्पादन-सामर्थ्य, सुख व संस्कृति वाटण्याची आशा उरलेली नाहीं. म्हणून ऐतिहासिक कार्य संपलेली अशी ही भांडवलशाही नष्ट करून धनोत्पादनसाधनें सार्वजनिक मालकीचीं केलीं पाहिजेत व मग जनतेच्या उपयोगाच्या दृष्टीनें धनोत्पादन केलें

पाहिजे असें मार्क्सवाद्यांचें म्हणणें आहे. रशियांतली आजची समाजघटना मार्क्सच्या मृत्यूनंतर पस्तीस वर्षांनीं अस्तित्वांत आली. तथापि अशा समाजघटनेची बीजभूत कल्पना त्याच्या लिखाणांत सर्वत्र दिसून येतें. ही समाजघटना एका राष्ट्रांत निर्माण होण्यानें भागत नाहीं, जगभर तिचा प्रसार झाला पाहिजे असें मार्क्स सांगतो. अशी जागतिक क्रांति घडवून आणणें हें रशियन सरकारचेंही ध्येय आहे.

---

( १ )

# कार्ल मार्क्स आणि हिंदुस्थान

[ कार्ल मार्क्सनें अमेरिकेंतल्या ' न्यू यॉर्क ट्रिब्यून ' पत्रांत १८५२ व १८५९ च्या दरम्यान हिंदुस्तानसंबंधानें अनेक लेख लिहिले. पैकीं ' हिंदुस्तानांतील ब्रिटिश राज्य ' ( २५ जून १८५३ ) आणि हिंदुस्तानांतील ब्रिटिश राज्याचे भावी परिणाम ( ८ ऑगस्ट १८५३ ) हे दोन लेख येथें उध्दृत केले आहेत. हिंदुस्तानांत १८५७ चें बंड झालें त्याहीं पूर्वी लिहिलेल्या या लेखांत इतिहास तपासून पाहण्याचा मार्क्सचा दृष्टिकोन किती शास्त्रशुद्ध व दूरच्या भविष्यांत अचूक पाहणारा होता हें दिसून येतें. त्यानें ब्रिटिश सत्ता येथें कां व कशी आली एवढेंच सांगितलें नसून तिचे येथल्या जीवनावर परिणाम काय झाले व होणार इतर कोणत्याही परकी सत्तेपेक्षां या विदेशी भांडवलशाहीचें वैशिष्ट्य काय व अखेर तिचा कसा निकाल लागणार हे सोपपत्तिक दिलें आहे. कॅपिटल-मध्यें आपली विचारपद्धति मार्क्सनें इंग्लंड या अगदीं सुधारलेल्या राष्ट्रास लावून दाखविली असून पुढील लेखांत ती हिंदुस्तानसारख्या अगदीं मागासलेल्या राष्ट्रास लावून दाखविली आहे. हिंदुस्तानचा हा विषय आपल्या इकडील वाचकांना जवळचा असल्यानें मार्क्सची विचारपद्धति समजण्यास या दोन लेखांचा विशेष उपयोग होईल. ]

## हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्य

युरोपांत इटलीस जें भौगोलिक स्थान आहे तें आशिया खंडांत हिंदुस्तानला आहे. युरोपपेक्षां आशिया खंड जसे फार मोठें आहे, तसेंच त्या प्रमाणांत इटालीपेक्षां हिंदुस्तानहि फार मोठें आहे. इटालीच्या आल्प्सच्या जागीं हिंदुस्तानांत हिमालय आहे. इटालींत लॅाबार्डीचीं मैदानें आहेत त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत बंगालचा सपाट प्रदेश आहे. इटालींतील ॲपिनाइन्सचे जागीं हिंदुस्तानांत दख्खन आहे. आणि इटालींतील सिसिली बेटाचे जागीं हिंदुस्थानांत सिलोन बेट आहे. इटालींत जशीं विविध पिकें विपुल प्रमाणांत निघतात तशीच हिंदुस्थानांत विविध पिकें विपुल प्रमाणांत निघतात. राजकीय दृष्ट्या दोनहि देशांच्या सारख्याच चिंधळ्या झालेल्या आहेत. वेळोवेळीं ज्याप्रमाणें इटालीवर

परकीय जेत्यांनीं तलवारी चालवून इटालीचे अनेक राष्ट्रखंड पाडले, तसेंच हिंदुस्थानांतहि घडलें आहे. मुसलमान, मोंगल अथवा ब्रिटिश यांनीं आपल्या एकछत्री अंमलानें हिंदुस्तानास एक राष्ट्र बनविलें; पण ज्यावेळीं या तिघांपैकीं कुणाचाहि अंमल नव्हता, त्यावेळी हिंदुस्तानांत जितकीं शहरें होतीं तितकीं आपसांत भांडणारीं स्वतंत्र राज्यें होतीं.

पण सामाजिक दृष्टीनें पाहतां हिंदुस्तान हें इटालीसारखें नसून आयर्लंड-सारखें आहे. आयर्लंड आणि इटाली यांचें हें चमत्कारिक मिश्रण, छिनालपणा ( व्हॉलप्चुअसनेस ) आणि दुःख यांची झालेली ही हिंदुस्थानरूपीं भेळ, हिंदुस्तानच्या प्राचीन धर्मपरंपरांमध्येंच लहान प्रमाणांत असल्याचें दिसून येतें. हिंदुस्थानांतील प्राचीन धर्म हें लैंगिक भोगवासनेचा अतिरेक आणि शारीरिक क्लेश सोसणाऱ्या यतींची वृत्ति यांची भेसळ आहेत. लिंग आणि खुळचट समजुती, महंत आणि नर्तकी, हीं परस्परविरुद्ध टोकाचीं अशीं या धर्माचीं प्रतीकें आहेत.

हिंदुस्तानांत सुवर्णयुग होतें असें कोणी म्हणतात. त्यांचें तें मत मला मुळींच मान्य नाहीं. माझ्या मतासाठीं मला सर चार्लस वुड यांचेप्रमाणें खुली-खान याच्या मताचा आधारहि नको आहे. पण वाटल्यास उदाहरणादाखल औरंगजेबाचा काळ घ्या अथवा उत्तरेंत मोंगल आले त्या वेळचा किंवा दक्षिणेंत पोर्तुगीज आले तो काळ घ्या, किंवा मुसलमानांची स्वारी दक्षिणेवर झाली तो काळ घ्या किंवा अगदीं प्राचीन म्हणजे ब्राह्मणांचा पौराणिक काळ घ्या; या पौराणिक कालगणनेप्रमाणें हिंदी जनतेचें दुःख खिस्ती लोक जग जेव्हां जन्मास आलें म्हणतात त्याही पूर्वीपासून चालत आलें आहे. आणि वर उल्लेखिलेल्या सर्व काळांत हिंदी जनतेला दुःखाचाच भोगवटा मिळाला आहे.

तथापि एक गोष्ट निःसंशय खरी आहे कीं, हिंदुस्तानच्या लोकांना अतिप्राचीन कालापासून आजतागायत जीं भयंकर दुःखें भोगावीं लागलीं असतील त्यापेक्षां ब्रिटिशांनीं हिंदुस्तानवर आणलेलें दुःख मूलतः वेगळें व अधिक तीव्र स्वरूपाचें आहे, ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीनें युरोपीयन सुलतानशाहीचें रोप एशियाटिक सुल-तानशाहीवर लावलें आणि या दोन सुलतानशाहींचा झालेला संगम इतका राक्षसी ठरला कीं साष्टीच्या देवळांतील भयानक राक्षसांनाहि तो संगम मागें सारील

पण मी यालाही महत्त्व देत नाहीं, ब्रिटिशांच्या वासाहतिक राज्यसत्तेचें हें कांहीं वैशिष्ट्य नव्हे. या बाबतींत इंग्रजांनीं केवळ डच वसाहतवाल्यांचें अनुकरण केलें होतें. ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीचा राज्यकारभार कशा प्रकारचा होता याची कल्पना येण्यास जावा बेटाचा ब्रिटिश गव्हर्नर सर स्टॅफोर्ड रॅफल्स यानें डच ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभारासंबंधानें जें लिहिलें त्याची आठवण केली म्हणजे पुरे. हा गव्हर्नर लिहितो—

'या डच ईस्ट इंडिया कंपनीला केवळ लोभभावनेनें ग्रासलें होतें. पूर्वी वेस्ट इंडिजमधलि मळेवाले स्वतःच्या गुलामांना जसें वागवीत त्याप्रमाणें ही डच कंपनी हिंदी लोकांना वागवीत असून त्यांच्या अंगांतील सर्व कर्तृत्वशक्ति आपल्या फायद्यासाठीं वापरतां यावी म्हणून हिंदी लोकांच्या रक्तांतला शेवटचा थेंब पदरांत पडेपर्यंत त्यांना आपल्या राज्ययंत्रांच्या चरखांत पिळून काढीत असत. राज्यकारभार रानटी, अधिकारी लोभी आणि त्यांतच या डच कंपनीची लोभमूलक पिळणूक. मुत्सद्यांच्या डोक्यांतून लोकांना पिळण्याच्या जितक्या युक्त्या निघूं शकतील तितक्या युक्त्या वापरल्या जात. सर्व प्रकारची आर्थिक हक्कदारी आपल्या मुठींत ठेवण्यासाठीं व्यापाऱ्यांकडून अनेक युक्त्या अंमलांत आणल्या जात. या सर्व कारणांमुळें डच कंपनीकडून हिंदी जनतेवर दुःखाचे डोंगर लादले गेले होते.' डच कंपनीनें हिंदुस्थानावर हें जें दुःख ओतलें तें तसेंच दुःख ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्तानावर ओतलें होतें.

हिंदुस्तानांत जीं अंतर्गत युद्धें झालीं, परचक्रें आलीं, क्रांत्या झाल्या, जनतेचे जे पराभव झाले, जनतेवर जे दुष्काळ कोसळले आणि हे सर्व अनर्थ वेगानें आणि एकामागून एक असे येऊन त्यांनीं जनतेला जे दुःख दिलें त्या सर्वांना हिंदुस्तानच्या जनतेच्या जीवनांत खोलवर शिरतां आलें नाहीं: पण इंग्लंडनें मात्र हिंदी समाजघटना तिच्या पायापासून शिखरापर्यंत उध्वस्त करून टाकली असून तिच्या पुनर्घटनेचें लक्षण अजून कांहींहि दिसत नाहीं. हिंदी माणसांचें जुनें जीवन उध्वस्त झालें आणि नवें जीवन कोणतेंच त्यास मिळालें नाहीं. यामुळें हिंदु माणसाच्या हल्लींच्या दुःखावर एक प्रकारच्या विशिष्ट औदासिन्याची छटा उमटलेली आहे. हें औदासीन्य अतिप्राचीन काळापासून ब्रिटिश अमलाच्या सुरुवातीपर्यंतच्या सर्व राजवटीहून ब्रिटिश अंमलांचें वैशिष्ट्य दाखवीत आहे.

अतिप्राचीन कालापासून आशियांतील राज्यसंस्थांचीं तीन खातीं असत. सरकारी जमाबंदी खातें म्हणजे अंतर्गत जनतेची लूट; युद्धें म्हणजे विदेशीय राष्ट्रांची लूट; आणि शेवटचें खातें सार्वजनिक उपयोगाचीं कामें हें असे. आशियाखंडाची विशिष्ट हवा आणि प्रादेशिक परिस्थिति म्हणजे मुख्यतः आफ्रिकेच्या सहारा प्रदेशापासून अरबस्तान, इराण, हिंदुस्तान, तार्तरी यांतून ते थेट आशियांतील अत्युच्च पठारापर्यंत पसरलेलीं वाळवंटें; त्यामुळें कृत्रिम अशा कालव्यांनीं पाण्याची सोय करून शेतीची मशागत करणें हें पौर्वात्य शेतीव्यवसायाचें वैशिष्ट्यच होऊन बसलें होतें. इजिप्त आणि हिंदुस्तान याप्रमाणें मेसापोटेमिया आणि इराण येथेंही जमीन सुपीक करण्यासाठीं महापुरांचा उपयोग करितात. पठारांचा उपयोग जमीनींना पाणी पुरविणारे कालवे काढण्यासाठीं करण्यांत येतो. पाश्चिमात्य राष्ट्रांत आर्थिक दृष्ट्या पाण्याचा उपयोग अशा प्रकारें जेथें समायीकपणें करावा लागला तेथें उदाहरणार्थ—फ्लँडर्स, इटाली वगैरे ठिकाणीं—वैयक्तिक शेतीव्यवसाय अशक्य होऊन शेतीव्यवसायाची ऐच्छिक सामुदायिक संघटना झाली. पण पौर्वात्य देशांत संस्कृति अगदीं हीन होती आणि मुलूख फार प्रचंड होता म्हणून ऐच्छिक सामुदायिक शेती होऊं शकली नाहीं. मध्यवर्ती राज्यसत्तेनेंही जनतेच्या जीवनांत फार ढवळाढवळ केल्यानें सामुदायिक संघटना अशक्य झाली. सार्वजनिक उपयोगाचीं कामें करण्याची जबाबदारी पौर्वात्य राज्यकर्त्यांवर या कारणानें येऊन पडली होती. जमीनीला कृत्रिम मार्गांनीं सुपीक करण्याचें काम अशा प्रकारें राज्यकर्त्यांवर पडल्यानें राज्यकर्त्यांकडून कालव्यांची व्यवस्था नीट राहीनाशी झाली कीं लगेच शेतीचा ऱ्हास होऊं लागे. इजिप्त, इराण, हिंदुस्थान यांतील प्रचंड प्रांतांची शेती एकदां अतिशय सुपीक तर लगेच अगदीं ओसाड अशी कां दिसतें याचा यावरून खुलासा होतो. एक युद्ध झालें कीं एखाद्या मुलुखांतून सर्व संस्कृति व लोकवस्ती कित्येक शतकेंपर्यंतही कां नाहींशी होते हेंही यावरून कळतें.

ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीचें हिंदुस्तानच्या पूर्वीच्या राज्यकर्त्यांकडून जमाबंदी आणि युद्धें हीं दोन खातीं वारसाहक्कानें घेतलीं. पण सार्वजनिक उपयोगाच्या कामांचें खातें मात्र हातीं घेतलें नाहीं. हिंदुस्तानांतील शेती वर सांगितल्याप्रमाणें सरकारी मदतीवर अवलंबून असून ब्रिटिशांच्या खाजगी चढाओढीचें तत्त्व तिला लागू होत नाहीं. यामुळें ब्रिटिश ईस्ट इंडिया कंपनीनें सार्वजनिक उपयोगाच्या

कामांची उपेक्षा करतांच शेतीचा ऱ्हास झाला. अशियांतील साम्राज्यांत एका राज्यकर्त्यानें शेतीची उपेक्षा केल्यास तिचा ऱ्हास व्हावा आणि पुढील राज्यकर्त्यानें शेतीला उत्तेजन देतांच पुन्हां शेतीची भरभराट व्हावी असे प्रकार अनेकदां घडले आहेत. युरोपांत चांगल्या व वाईट ऋतुमानाप्रमाणें पिकें चांगलीं येतात अथवा वाईट येतात तसेंच हिंदुस्तानांत राज्यकर्ते चांगले अथवा वाईट असतील त्याप्रमाणें पिकें चांगले अथवा वाईट येतात. आणि म्हणून ब्रिटिश अंमलानें शेतीचा जो ऱ्हास केला व जनतेवर जो जुलूम केला हा हिंदी जीवनाचा कायमचा विध्वंस आहे असें मानण्याचें वास्तविक कारण नव्हतें. पण ब्रिटिश अंमलानें सगळ्या आशिया खंडाच्या इतिहासांत एक अगदीं नवी घटना निर्माण केली. तीमुळें हा विध्वंस कायमचा ठरला. हिंदुस्तानच्या भूतकाळांत राजकीय सत्तेचें स्वरूप वेळोवेळीं कसेंहि पालटलेलें असो, अतिप्राचीन काळापासून एकोणिसाव्या शतकाच्या पहिल्या दशकापर्यंत हिंदी समाजजीवन कधींहि पालटलेलें नव्हतें. हातमाग आणि सूत कातण्याचा रहाट यांनीं सूत कातणारे आणि कापड विणणारे असंख्य लोक जन्मास घातले असून हिंदी समाजघटनेचे ते आधार होते. अतिप्राचीन काळापासून या हिंदी श्रमजीवी वर्गांनीं विणलेलें सुंदर कापड युरोपांत येत असे. त्याबद्दल युरोपांतील मूल्यवान धातू हिंदुस्थानांत येत असत. आणि हिंदी समाजजीवनांतील अतिशय महत्त्वाचा घटक असा जो सोनार, त्याला लागणारा कच्चा माल म्हणजे सोनें हें त्याला मिळत असे. नाजूक दागिने करण्याची या सोनाराची हौस येवढी मोठी होती कीं जवळ जवळ नागडीं उघडीं हिंडणारीं माणसेंही कानांत दोन सोन्याचे डूल घालीत आणि गळ्यांत एखादा सोन्याचा दागिना घालीत असत. हाताच्या बोटांत अंगठ्या आणि पायाच्या बोटांत जोडवी हे दागिने हिंदुस्तानांत सर्वसामान्य आहेत. स्त्रिया व मुलें नेहमीं हातांत व पायांत मोठमोठी सलकडीं व वाळे घालतात आणि दर घरांत निरनिराळ्या देवतांच्या मूर्ति ठसविलेल्या पुतळ्या आढळून येतात. ब्रिटिश आगंतुकानें हिंदुस्तानांत प्रवेश केल्यावर तेथल्या समाजाचा आधार असा हातमाग व सूत कातण्याचा रहाट मोडून टाकला. युरोपांत येणारे हिंदुस्तानचें कापसाचें कापड इंग्लंडनें प्रथम हुसकून लावलें. नंतर हिंदुस्तानांत युरोपीय सूत पाठविण्यास सुरवात केली. आणि शेवटीं कापसाच्या कापडाच्या या मातृभूमींतच विदेशी कापडाचे गट्टे नेवून रचले. १८१८ सालीं हिंदुस्तानांत इंग्लंडांतून जें सूत धाडलें जात होतें त्याची पुढील

अठरा वर्षांत बावनशेंपट वाढ झाली. १८२४ सालीं इंग्लंडांतून हिंदुस्तानांत फार तर ६० लक्ष यार्ड मलमल जात असे ती १८३७ त ६ कोटी ४० लक्ष यार्डांवर गेली. त्याच काळांत मलमल काढण्यांत प्रसिद्ध अशा डाक्का शहरची लोकसंख्या दीड लक्षावरून वीस हजारावर आली. बारीक वस्त्र तयार करण्यांत प्रसिद्ध अशा हिंदी शहरांची लोकसंख्या अशा प्रकारें घटली तर हें मोठेंच नुकसान होय. पण याहीपेक्षां भयंकर नुकसान म्हणजे हिंदी जीवनांतील शेती आणि हस्तव्यवसाय यांचें परस्परसहकार्य इंग्लंडची वाफेची शक्ति आणि शास्त्रीय शोध यांनीं नष्ट केलें हें होय.

मध्यसरकारनें सार्वजनिक उपयुक्ततेचीं कामें करण्याची जबाबदारी उरकावी आणि एकंदर जनतेनें देशभर पसरलेल्या लहान लहान खेड्यांत घरगुती शेती व घरगुती हस्तव्यवसाय यांचें सहकार्य घडवून आणून नांदावें असें जीवन आशिया खंडांतील सर्व देशाप्रमाणें हिंदुस्तानांतील हिंदूंनींहि अतिप्राचीन कालापासून आक्रमिलेलें होते. या खेड्यांस एक प्रकारचें स्वतंत्र व संघटित जीवन प्राप्त झालें होतें. या ग्रामसंस्थेचें विशिष्ट स्वरूप कसें होतें याची कल्पना हाऊस ऑफ कॉमन्सच्या हिंदुस्तानसंबंधींच्या सरकारी रिपोर्टांतील पुढील उताऱ्यावरून येऊं शकेल.

" भौगोलिक दृष्ट्या विचार करतां हिंदुस्तानांतील एक खेडें हें सुमारें हजार एकराच्या आंतबाहेर इतकी पिकाची जमीन अथवा माळरान यांचें बनलेले असतें. राजकीय दृष्ट्या पाहिलें तर एकाद्या कार्पोरेशनसारखें या खेड्याचें स्वरूप असतें. या खेड्यांतील अधिकारी व नोकरवर्ग यांची संघटना साधारणतः पुढीलप्रमाणें आहे.

' पाटील ' हा प्रमुख नागरिक असतो. खेड्यांतील सर्व व्यवहाराचा तो मुख्य अधिकारी असतो. नागरिकांचे तंटे तो तोडतो. पोलिसचें काम करतो. जमीनसारा गोळा करण्याचें कामहि तोच करतो. त्याचा खेड्यांत चांगला दरारा असून खेड्यांतील परिस्थितीची उत्तम माहिती त्याला असते यामुळें हें काम त्याला चांगल्या प्रकारें करतां येतें. ' कुर्नुम ' ( कुलकर्णी ? ) हा जमीन-मशागतीचे हिशेब ठेवतो व जमीनीसंबंधींच्या सर्व नोंदी तो करतो. 'तालीयर' ( तराळ ? ) हा अधिकारी खेड्यांतील गुन्ह्यांचा तपास लावतो, एका खेड्याहून

दुसऱ्या खेड्याला जाणाऱ्या वाटसरूंची रखवाली करतो व पिकांचे मोजमापाचे कामीं मदत करतो. सरहद्द सांगणारा एक नोकर असतो. खेड्याची शीव तो संभाळतो. गांवांतील व खेड्याखेड्यांतील शिवेसंबंधींच्या वादांत त्याची साक्ष काढली जाते. पाणीपुरवठ्याचा मुख्य अधिकारी हा तलावावर देखरेख करून शेतीसाठीं पाण्याची वाटणी करतो. ब्राह्मण हा खेड्यांतील धर्मकार्य करतो. पंतोजी वाळूवर मुलांना लिहिण्या-वाचण्याला शिकवितांना दिसतो. पंचांग सांगणारा एक ब्राह्मण ज्योतिषिही असतो. हे सर्व अधिकारी व नोकर मिळून खेड्याचें सरकार बनते. कांहीं कांहीं भागांत हे अधिकारी कमी अथवा अधिक असतात. अनेक अधिकाऱ्यांचीं कामें कांहीं ठिकाणीं एकेकालाच करावी लागतात.

अगदीं स्थानिक स्वरूपाच्या या राज्यांच्याखालीं हजारों वर्षें हिंदी खेड्यांतील माणसें रहात आलीं आहेत. खेड्याच्या सरहद्दी बहुधा पालटल्या नाहींत. केव्हां केव्हां सर्वच्या सर्व खेडीं, युद्धें, दुष्काळ, रोगराई यांनीं उध्वस्त झालीं असूनसुद्धां गांवांचीं नांवें, त्यांच्या चतुःसीमा, त्यांतील हितसंबंध आणि तींच तींच कुटुंबें हीं हजारों वर्षेपर्यंत तशींच रहात आलीं आहेत. स्वतः या खेड्यांतील नागरिकांनीं मध्यराज्यसत्तेचे कधीं व कसे तुकडे झाले याची केव्हांहि पर्वा केली नाहीं. जोंपर्यंत खेडे हें अखंड राहिलें असेल तोंपर्यंत तें खेडें कोणाच्या राज्यांत आहे अथवा कोणत्या राजाकडून कोणत्या राजाकडे गेलें आहे याची फिकीर ते करीत नसत. त्यांची अंतर्गत आर्थिक संघटना मध्यसत्तेंत होणाऱ्या घालमेलीनें बदलत नसे. देशाच्या राजधानींत कांहींहि उलाढाली झाल्या तरी निरनिराळ्या खेड्यांत पाटील हाच प्रमुख नागरिक, तोच जज्ज व मॅजिस्ट्रेट आणि तोच खेड्याचा कलेक्टरहि असे."

ही लहान व प्राचीन कालापासून एकच स्वरूपांत चालत आलेली सामाजिक संघटना आतां हळूहळू उध्वस्त होत असून ती कायमची नष्ट होत चालली आहे. कर वसूल करणारा ब्रिटिश अधिकारी अथवा ब्रिटिश सैनिक यांनीं ही संघटना उध्वस्त होत नसून इंग्लंडची वाफेची शक्ति आणि खुला व्यापार यामुळें हा विध्वंस होत आहे. खेड्यांतील ही कौटुंबिक समाजघटना, घरगुती सूत कातणें, घरांत कापड विणणें आणि घरांत शेती करणें यावर आधारलेली असून तिला एक प्रकारें स्वयंपूर्णता आली होती पण इंग्रजांनीं या व्यवस्थेंत हस्तक्षेप करून सूत कातण्याचें काम लॅकेशायरला नेलें व कोष्टी

बंगालमध्येंच ठेवला. अथवा हिंदु सूत कातणारा व हिंदु कोष्टी या दोघांचाहि धंदा हिसकून घेतला आणि अशा प्रकारें या अर्धरानटी व अर्धसुसंस्कृत समाजा-खालचा आर्थिक पाया मोडून टाकून हिंदुस्तानांत खरोखर फार मोठी आणि पूर्वी कधींहि न झाली अशी सामाजिक क्रांति घडवून आणली. हिंदुस्तानावर पसरत असलेल्या ब्रिटिश राज्यामुळें तेथील उद्योगी व शांततप्रिय कौटुंबिक समाज विस्कटले जाऊन त्यांच्या चिंधड्या होत आहेत, समाजबंधनें विस्कटून मोकाट झालेल्या व्यक्तींची प्राचीन संस्कृतिच नव्हे तर परंपरागत धंदेही बुडविले जात आहेत आणि हीं माणसें दुःखाच्या गर्तेत लोटलीं जात आहेत, हें सर्व पाहून मनास हळहळ वाटते. पण आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, ही कृषीवल पद्धतीची ग्रामसंस्था ( आयडिलिक व्हिलेज कम्युनिटी ) पौर्वात्य देशांतील सुलतानशाहीचा शेंकडों वर्षे आधार झाली आहे. या संकुचित समाजव्यवस्थेमुळेंच या लोकांची दृक्कक्षा अगदीं संकुचित झाली. ते जुन्या सवयी, चालीरीति व भोळ्या समजुती यांचे गुलाम झाले. यामुळें त्यांच्यांत असेल नसेल तो मोठेपणा लोपून जाऊन ऐतिहासिक क्रमानें विकसत जाण्याचा जोमहि त्यांच्यांत राहिला नाहीं. आपण हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं, हे लोक टीचभर जमिनीच्या तुकड्याच्या मूर्ख अहंकारांत गुरफटून जाऊन राज्याच्या उलथापालथी, सबंध गांवांच्या कत्तली, असे भयंकर अवर्णनीय प्रकार शांतपणें पहात राहिले. अगदीं सामान्य सृष्टिक्रमाहून यांत त्यांना कांहींहि अधिक दिसत नसे. स्वतः हे लोक अगदीं दुबळे असून कुणाहि लुटारूच्या हल्ल्यास सहज बळी पडत. या झाडा-झुडपासारख्या जड व अचल आणि शरणागत जिण्याची प्रतिक्रिया म्हणून दुसऱ्या बाजूस अनंत विध्वंसक पंथ उत्पन्न झाले. कत्तली करणें ही त्यांची एक धार्मिक बाब ठरली. आपण हेंही ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं, या हिंदी लोकांत जाति पडून गुलामगिरीहि माजली होती. मनुष्य हा सृष्टीचा प्रभु होण्यऐवजीं गुलाम झाला होता. आपोआप बनत आलेली समाजघटना ही सृष्टीचा त्रिकालाबाधित कायदा आहे असें या लोकांनीं मानिलें. वास्तविक सृष्टीचा प्रभु असा माणूस इतका मूर्ख व कुचकामाचा झाला कीं, तो हनुमान माकडापुढें व शबला गाईपुढें गुडघे टेकून त्यांची पूजा करूं लागला.

हिंदुस्तानमध्यें इंग्लंड जी सामाजिक क्रांति करीत होतें ती करण्यांत इंग्लंडचे हेतु अतिशय दुष्ट होते व ही क्रांति करतांना इंग्लंडनें सर्व

प्रकारचा मूर्खपणा केला हें अगदीं खरें. पण खरा प्रश्न तो नव्हे; खरा प्रश्न आहे तो असा कीं आशिया खंडांतील समाजव्यवस्थेत मूलग्राही क्रांति केल्यावांचून मानव जातीस आपलें भवितव्य साध्य करून घेतां येईल कीं काय? जर तें करणें अवश्य असेल तर इंग्लंडचे गुन्हे कांहींही असोत, ही क्रांति घडवून आणण्यांत अजाणता कां होईना, इंग्लंड हे इतिहासाचें हस्तक बनलें होतें....

* * *

## ब्रिटिश राज्यसत्तेचे हिंदुस्थानवर भावी परिणाम

या पत्रांत हिंदुस्थानसंबंधानें माझा अभिप्राय मी संपविणार आहे.

हिंदुस्तानवर ब्रिटिश सत्ता कशी स्थापन झाली? मोंगल अधिकाऱ्यांनीं मोंगल बादशहाची सार्वभौमसत्ता मोडून काढली. ह्या मोंगल अधिकाऱ्यांची सत्ता मराठ्यांनीं मोडून काढली. मराठ्यांना अफगाणांनीं पराभूत केलें. आणि अशा प्रकारें सर्वजण सर्वांशीं लढत असतां इंग्लंडनें पुढें घुसून सर्वांना उलथून पाडलें. हिंदुस्तान देशांत हिंदु आणि मुसलमान येवढीच फूट नव्हती. तर टोळ्या टोळ्या व जाती जाती यांमध्येंही फूट पडली होती. प्राचीनकालापासून चालत आलेली हिंदी समाजरचना एकमेकांपासून अलग राहिलेल्या माणसांनीं उत्पन्न केलेल्या समतोलावर आधारलेली होती. अशा फुटीर समाजाचें व राष्ट्राचें भवितव्य विदेशी जेत्यांच्या भक्ष्यस्थानीं पडणें हेंच स्वाभाविक नव्हतें का? हिंदुस्तानचा प्राचीन इतिहास अगदीं आम्हांला माहीत नसला तरी इंग्रजांनीं आज हिंदुस्तान हिंदी लोकांच्याच खर्चावर पोसलेल्या हिंदी सैन्याकडूनच आपल्या ताब्यांत ठेवला आहे ही गोष्ट नाकबूल करतां येईल काय? हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास येरवीं कसाही असो, पण लागोपाठ कोणीना कोणी परक्यानीं हिंदुस्तानला जिंकलें असलें पाहिजे हें उघड आहे. परकी जेत्याच्या भक्ष्यस्थानीं पडणें हा भोगवटा हिंदुस्तानच्या कपाळचा सुटत नाहीं. हिंदी समाजाला खरोखर स्वतःचा इतिहासच नाहीं. निदान असा इतिहास असलाच तर, आज कोणासच माहीत नाहीं. ज्याला आपण हिंदुस्तानचा इतिहास म्हणतों तो लागोपाठ एकामागून एक परदेशांतून आलेल्या उपटसुंभांनीं स्थापलेल्या साम्राज्याचा आहे. परकीय उपटसुंभांना प्रतिकार न करणाऱ्या व स्वतः कोणताही बदल होऊं न देतां संकटाकडे पाठ

पुरवून हताशपणें रहाणाऱ्या समाजाच्या पार्श्वभूमिवर ही परक्यांचीं साम्राज्य उभारलेलीं होतीं. म्हणून येथें प्रश्न आहे तो इंग्रजांना हिंदुस्तान जिंकण्याचा हक्क आहे कीं नाहीं असा नसून तुर्क, पर्शियन, रशियन यांनीं हिंदुस्तान जिंकलेला बरा कीं इंग्लंडनें जिंकलेला बरा असा आहे.

इंग्लंडला हिंदुस्तानांत दुहेरी कर्तव्य पार पाडावयाचें आहे. एक कर्तव्य विध्वंसक आहे आणि दुसरें पुनर्घटनेचें आहे. पहिलें कर्तव्य जुनी एशियाटिक समाजघटना उध्वस्त करण्याचें असून दुसरें कर्तव्य आशिया खंडांत पाश्चात्य समाजपद्धतींचा भौतिक पाया रचणें हें आहे.

अरब, तुर्क, तार्तर, मोंगल वगैरे ज्यांनीं ज्यांनीं लागोपाठ हिंदुस्तान जिंकला ते ते सर्व हिंदु संस्कृतींत विरून गेले. इतिहासाच्या अविरत क्रमानुसार आपल्या प्रजेच्या उच्चतम संस्कृतीनें हे रानटी जेते स्वतःच जिंकले गेले. आपल्या प्रजेपेक्षां अधिक उच्च संस्कृति असलेले जेते इंग्रज हेच हिंदुस्तानांत पहिले होत. म्हणूनच हिंदु संस्कृतीचा पगडा त्यांच्यावर बसला नाहीं. हिंदी ग्रामसंस्था मोडून टाकून, देशी उद्योगधंदे खणून काढून आणि देशी समाजव्यवस्थेंत जें कांहीं श्रेष्ठ आणि उन्नत होतें, त्याचाही नायनाट करून हिंदु संस्कृति इंग्रजांनीं नष्ट केली. हिंदुस्तानांतील इंग्रजांच्या इतिहासांत पानापानांतून विध्वंसाव्यतिरिक्त कांहींच आढळत नाहीं. विध्वंसाच्या या ढिगाऱ्यांत पुनरुज्जीवनाच्या प्रयत्नाचा मागमूसही लागत नाहीं. तरी पण हें पुनरुज्जीवनाचें कार्य सुरू झालें आहे खास.

मोंगल बादशहांच्या साम्राज्यांत हिंदुस्तानची जी राजकीय एकजूट व जो साम्राज्यविस्तार झाला होता त्यापेक्षां अधिक एकजूट व अधिक विस्तार करणें ही गोष्ट पुनरुज्जीवनाच्या कार्याला पूर्वावश्य होती. ब्रिटिश समशेरीनें ही गोष्ट घडवून आणली. आतां ती विजेच्या तारायंत्रांनीं अधिक मजबूत व कायम होईल. हिंदी सैन्य ब्रिटिश सार्जंटांनीं उभारून व कवाईत शिकवून तयार केलें आहे. हिंदुस्तानच्या राष्ट्रीय स्वातंत्र्याची ही आतां पहिली निशाणी होय. जो येईल त्या उपटसुंभानें हिंदुस्तानला खाऊन टाकावें हा प्रकार यापुढें होणार नाहीं. हिंदी समाजांत छापखान्याचें स्वातंत्र्य इतिहासांत अगदीं पहिल्यानें आतां मिळणार आहे. हिंदु आणि युरोपियन यांच्या सहकार्यानें तें आतां निर्माण

होत असून पुनर्घटनेचें तें नवें सामर्थ्यवान साधन आहे. जमिनदारी व रयतवारी या ज्या दोन जमीनमालकी पद्धति त्या आपल्यापरीं अतीशय दुष्ट असल्या तरीसुद्धां जमीनमालकीचे हे दोन प्रकार एशियाटिक समाजांत मोठे लोकप्रिय असे आहेत. हिंदुस्तानांतील जनतेंतून कलकत्त्यास इंग्रजांनीं मोठ्या नाखुषीनें व तुरळकपणें शिकवून तयार केलेले जे लोक त्यांचा एक वर्ग निर्माण होतो आहे. युरोपियन शास्त्रज्ञान व राज्यकर्तृत्व त्यांच्या अंगीं येत आहे. वाफेच्या शक्तीनें हिंदुस्तानास युरोपशीं सतत व जलद दळणवळण ठेवण्यास भाग पाडलें आहे. हिंदुस्तानांतील सर्व प्रमुख बंदरांचा संबंध हिंदुस्तानच्या आग्नेयीकडील महासागराशीं आला असून जगापासून दूर एका कोपऱ्यांत प्रगति खुंटून बसलेला हा देश पुन्हां जगाच्या उलाढालींत सांपडला आहे, रेल्वे आणि वाफेचीं जहाजें यांच्या सहकार्यानें इंग्लंड आणि हिंदुस्तान यामधील अंतर वेळाच्या दृष्टीनें कमी होत जाईल. तें जवळ जवळ आठ दिवसांवरही येईल आणि प्राचीन पौराणिक कथांत ऐकूं येणारा हा देश पाश्चिमात्य जगास जोडला जाईल.

इंग्लंडांतील राजकर्त्या वर्गांना आतांपर्यंत हिंदुस्तानच्या प्रगतीबद्दल जी आस्था वाटत असे ती हंगामी व तवकलींची अशी वाटत असे. सरदार वर्गांना हिंदुस्तान जिंकावासा वाटे. धनलोभ्यांना तो लुटावासा वाटे, आणि गिरणीवाल्यांनो त्यांत व्यापार करावासा वाटे. पण आतां परिस्थिति बदलली आहे. गिरणीवाल्यांना हिंदुस्थान हें उत्पादक राष्ट्र बनवावयाचें आहे. त्यासाठीं हिंदुस्तानांत कालवे, पाठबंधारे व अंतर्गत दळणवळण त्यांना निर्माण करावयाचें आहे. हिंदुस्तानभर रेल्वेचें जाळें त्यांना पसरावयाचें आहे. ही गोष्ट ते आतां केल्यावांचून रहात नाहींत. भावी काळांत याचे होणारे परिणाम केवळ कल्पनातीत आहेत.

मालाची वहातूक व त्यांचा विनिमय घडवून आणण्याचीं साधनें आजवर मुळींच नसल्यानें हिंदुस्तानची उत्पादनशक्ति अगदींच खुंटलेली होती ही गोष्ट प्रसिद्ध आहे. निसर्ग अतिशय उदार असतांना समाज अत्यंत दरिद्री असावा अशी स्थिति जगांत हिंदुस्तानइतकी दुसरीकडे कुठेंही दिसून येत नाहीं. विनिमयाचीं साधनें नव्हतीं म्हणून असें झालें. १८४८ त ब्रिटिश हाउस ऑफ कॉमन्सची एक चौकशी कमिटी बसली होती. तिच्यासमोर पुढील गोष्ट सिद्ध झाली.

'खानदेशांत ज्वारी सहा शिलींगापासून आठ शिलिंगाला एक क्वार्टर अशी विकली जात असतां, पुण्याला ती ६४ ते ७० शिलिंगापर्यंत विकली जाते. खानदेशापासून पुण्यापर्यंतचे रस्ते चिखलाचे असल्यामुळें वहातूक अशक्य आहे, त्यामुळें खानदेशचा माल पुण्यास मिळत नाहीं. आणि म्हणून लोक दुष्काळांत रस्त्यावर उपाशीपोटीं मरून पडत आहेत.'

ज्या ठिकाणीं बंधारे घालून पाणी अडविता येईल, आणि निरनिराळ्या वाटांनीं पाणी नेता येईल तेथें तेथें पाण्याची सोय करून शेती वाढवितां येईल. या शेतीला रेल्वेचा फायदेशीरपणें उपयोग करून घेता येईल. पौर्वात्य राष्ट्रांत कालव्यांचें अस्तित्व हें शेतीच्या भरभराटीचें साधन होय असें वर सांगितलेंच आहे. हे कालवे खूप वाढविले म्हणजे पाण्याच्या अभावीं पुनः पुन्हां येणारे स्थानिक दुष्काळ टाळतां येतील. रेल्वेचें महत्त्व, या दृष्टीनें पाहिल्यास, सहज लक्षांत येणारें आहे. कारण घाटाजवळच्या जिल्ह्यांत कालव्याखालीं भिजणारी जी जमीन आहे तीपासून कालवे नव्हते त्यावेळीं जितके कर वसूल होत त्यापेक्षां तिप्पटीहून अधिक कर हल्लीं वसूल होतात. १० ते १२ पट अधिक रोजगारी तेथें वाढली आहे, तसेंच १२ ते १५ पट अधिक नफा त्या जमीनींत होत आहे.

रेल्वेमुळें लष्करी ठाण्यांचा खर्च कमी होईल व लष्करी ठाण्यांची संख्याही कमी करतां येईल. फोर्ट वुइल्यम येथील टाऊन मेजर कर्नल वॉरन् हा हाऊस ऑफ कॉमन्सच्या सिलेक्ट कमिटीपुढें दिलेल्या साक्षींत सांगतो की

'हल्लींच्या परिस्थितींत देशाच्या दूरदूरच्या भागांतून माहिती मिळविण्यास कित्येक दिवस व कित्येक आठवडेहि लागतात. निरनिराळ्या ठिकाणीं सूचना पाठविण्यास, सैन्य पाठविण्यास माल पाठविण्यासहि अनेक दिवस व अनेक आठवडे लागतात. रेल्वे झाल्यास हल्लींच्या दिवसाइतके अगर आठवड्याइतके तासच या कामीं खर्च होतील. रेल्वेच्या या फायद्याचें महत्त्व वर्णावें तेवढें थोडेंच. रेल्वेची सोय झाली म्हणजे सैन्याचे तळ दूरदूर ठेवतां येऊन हल्लींहून अधिक आरोग्यकारक जागा त्यासाठीं निवडता येईल. त्यामुळें दुखण्यानें जीं माणसें मरतात तितकीं मरणार नाहींत. जागोजाग मालाचा जेवढा साठा ठेवावा लागतो तितका पुढें ठेवावा लागणार नाहीं.' तसेंच माल बिघडण्यानें होणारे नुकसान कमी होईल. प्रतिकूल हवेमुळें मालाची होणारी नासाडी वांचेल. सैन्याची कार्यक्षमता जितकी वाढेल त्या प्रमाणांत त्याची संख्या कमी करतां येईल.

आपण वर पाहिलें आहे कीं जुन्या ग्रामसंस्थांची राजकीय संघटना आणि आर्थिक संघटना ही ईस्ट इंडिया कंपनीनें उध्वस्त केली. पण या विध्वंसांतील अतिशय वाईट गोष्ट ही होती कीं, जुना समाज विस्कटल्यानंतर त्या समाजाचे जे अनेक तुकडे चोहोंकडे पसरून राहिले आहेत त्यांच्यांतला प्राण नष्ट झाला असून त्यांची वाढ खुंटली आहे. एकमेकांशीं त्यांचा संबंध कांहींहि राहिला नाहीं. हिंदुस्तानांत सडका नसल्यामुळें तेथील खेडीं एकमेकांपासून अलग राहिलीं. सडकांच्या अभावीं त्यांचा हा एकेकटेपणा कायम राहिला. यामुळें खेड्यांतील समाजाला सुखसोयी अगदीं कमी मिळाल्या. इतर खेड्यांशीं दळणवळण कधींच उत्पन्न झालें नाहीं. यामुळें सामाजिक प्रगतीस आवश्यक अशी इच्छा व प्रयत्न कधींच होऊं शकले नाहींत. खेड्यांचे हें स्वयंपूर्ण जडत्व ब्रिटिशांनीं मोडून टाकलें. आतां रेल्वेमुळें आजवर नसलेलें दळणवळण निर्माण होऊं शकेल. शिवाय 'रेल्वेचा एक परिणाम होऊं शकेल कीं, ज्या ज्या खेड्यांशीं रेल्वेचा संबंध येईल, त्या त्या खेड्यांना इतर देशांतील नवी नवी व्यवहारसाधनें व तीं साधनें प्राप्त करून घेण्याचे मार्ग समजूं लागतील. यामुळें खेड्यांतील परंपरागत गुण प्राप्त झालेल्या कारागिराला आपल्या कर्तृत्वाला भरपूर वाव मिळविता येऊन स्वतांमधील दोष तो नाहींसे करूं शकेल.' (चॅपमन—'दि कॉटन ॲन्ड कॉमर्स ऑफ इंडिया')

मला माहीत आहे कीं, हिंदुस्थानांत रेल्वे सुरू करण्यांत ब्रिटिश गिरणीवाल्यांचा हेतु, इंग्लंडच्या गिरणीला लागणारा कापूस व इतर कच्चा माल कमीत कमी खर्चांत मिळविणे येवढाच आहे. पण एकदां तुम्ही एखाद्या राष्ट्राच्या वहातुकीचे कामीं यंत्रांचा उपयोग केलांत म्हणजे, त्या राष्ट्रांत लोखंड अगर कोळसा असेल तर, त्या लोखंड आणि कोळशापासून नवीन माल निर्माण होणें तुम्ही टाळूं शकत नाहीं. एकदां एखाद्या प्रचंड देशभर तुम्हीं रेल्वेचें जाळें पसरलें म्हणजे त्या रेल्वेच्या वहातुकीच्या ज्या रोजच्या व तांतडीच्या गरजा असतात त्या भागविण्याचे औद्योगिक कारखाने तुम्हांला सुरूं करावेच लागतात. यामुळें रेल्वेशीं प्रत्यक्षपणें ज्यांचा संबंध नाहीं अशा अनेक धंद्यांतही यंत्रांचा उपयोग होणें अपरिहार्य होतें. म्हणून रेल्वे ही हिंदुस्थानांत खरोखर आधुनिक यांत्रिक उद्योगधंद्यांचा झेंडा उभारणार आहे यांत संशय नाहीं. ही गोष्ट निश्चितपणें घडून येणार याचें आणखी एक कारण असें आहे कीं, हिंदुस्थानांतील हिंदु लोकांना इंग्रज अधिकाऱ्यनीं अगदी नवीन पद्धतीचे श्रम करण्यास अवश्य

अशी मनःप्रवृत्ति निर्माण करूं दिली आहे. तसेंच यांत्रिक रचनेचें अवश्य इतकें ज्ञान हिंदूंना मिळवूं दिलें आहे. कलकत्त्याच्या टांकसाळींत हिंदी एंजीनिअरांच्या अंगीं यांत्रिक बाबतींतली कार्यक्षमता व विशेषज्ञता दिसून येते तीवरून वरील विधानास पुरावा मिळतो. कलकत्त्यास गेली कित्येक वर्षे वाफेचीं यंत्रे काम करीत असून हरिद्वारच्या कोळशाच्या खाणींत कित्येक वाफेचीं एंजिनें हिंदी यंत्रज्ञांनीं चालविलेलीं आहेत. अशीं आणखीही कित्येक उदाहरणें देतां येतील. कॅंबेलच्या मनांत ईस्ट इंडिया कंपनीच्या कित्येक खुळ्या समजुती अजूनहि आहेत. तरीपण तोही कबूल करतो कीं ' हिंदुस्तानातील पुष्कळ लोकांच्या ठिकाणीं औद्योगिक उत्पादनास लागणारी हिंमत भरपूर आहे. भांडवलाचा संचय करण्यास लागणारी मनोवृत्ति हिंदी लोकांच्या ठिकाणीं खास आहे. हिशेबांत हिंदी लोकांचें डोकें चांगलेंच सूक्ष्मपणें चालतें. आंकडे आणि शास्त्रीय काटेतोलपणा हाहि त्यांच्या बुद्धीस तोलतो. हिंदी लोक अतिशय बुद्धिमान आहेत.' रेल्वे सुरू झाली म्हणजे जी आधुनिक कारखानदारी सुरू होईल तिच्यामुळें परंपरागत श्रमविभागपद्धति नाहींशी होईल. या परंपरागत श्रमविभागावरच हिंदी लोकांची जातिव्यवस्था आधारलेली होती, हिंदी लोकांचा प्रगति व त्यांच्या सामर्थ्याची वाढ खुंटविण्यास जातिभेद हें निर्णायक कारण होतें.

ब्रिटिश भांडवलदारांना हिंदुस्थानांत ज्या ज्या गोष्टी नाइलाजानें कराव्या लागतील त्यामुळें बहुसंख्य जनतेच्या सामाजिक जीवनांत फारशी आधिभौतिक स्वरूपाची दुरुस्ती होईल असें नाहीं. कारण ही दुरुस्ती होणें हें केवळ उत्पादन-सामर्थ्य वाढण्यावर अवलंबून नसून, उत्पन्न धनाचा वाटा जनतेला मिळण्यावर आहे. पण एक गोष्ट त्यांना करावीच लागेल ती ही कीं, उत्पादनसामर्थ्याची वाढ व उत्पन्न धनाची अधिक प्रमाणांत प्राप्ती या दोहोंसाठीं जी भौतिक भूमिका अवश्य आहे ती ब्रिटिश भांडवलदार निर्माण करतील. भांडवलदारांनीं याहून अधिक चांगलें कधीं कांहीं केलें आहे का ? प्रगति करण्याचें काम करीत असतांनाच, रक्तांतून व घाणींतून, दुःखांतून व अधःपातांतून मानवजातीला फरफटत ओढीत नेणें हीच गोष्ट भांडवलदार आजवर करीत आले नाहींत काय ?

ब्रिटिश भांडवलदारांनीं हिंदी समाजांत नव्या समाजव्यवस्थेची जीं हीं बीजें पेरण्यास सुरुवात केली आहे त्यांचीं गोड फळें हिंदी लोकांना मिळण्यापूर्वी

इंग्लंडांतील कारखानदारी कामगारांनीं इंग्लंडांतील हल्लींच्या राज्यकर्त्यांना उलथून पाडावें लागेल, अथवा हिंदुस्तानांतील हिंदु लोकांच्या अंगीं ब्रिटिश सत्तेचें जोखड झुगारून देण्याइतकें सामर्थ्य यावें लागेल. यापैकीं शेवटीं कांहींहि घडो, एक गोष्ट आज निश्चितपणें सांगता येईल कीं या थोर व कुतूहलोत्पादक देशाचें पुनरुज्जीवन झाल्यावांचून आतां राहात नाहीं. या देशांतील माणसें हाडाचीं गरीब आहेत. त्यांच्या दीनमनोवृत्तींतसुद्धां एकप्रकारचें सौम्य सौजन्य आहे, निसर्गतः जड असूनसुद्धां हे लोक शूर आहेत अशी कबूली ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं दिली आहे. युरोपच्या भाषा व युरोपचे धर्म यांची हिंदुस्थान ही जन्मभूमि होय. हिंदुस्थानांतले जाठ हे प्राचीन जर्मनासारखे शूर असून तेथील ब्राह्मण हे प्राचीन ग्रीक पंडिताप्रमाणें तत्त्वज्ञ आहेत.

समारोपादाखल चार शब्द लिहिल्यावांचून मला हा हिंदुस्तानचा विषय हातावेगळा करता येत नाहीं.

भांडवलशाही संस्कृतींत जी अतिशय ढोंगबाजी व अंगभूत रानटीपणा आहे तो इंग्लंडांतल्या सभ्याचाराखालीं झाकला जातो. पण हें ढोंग आणि रानटीपणा येथला बुरखा फाडून अगदीं नागडेपणानें वसाहतींत वावरत असतात. आम्ही मालकी हक्काचे संरक्षक आहोंत असें हे भांडवलदार येथें म्हणत असतात, पण बंगाल, मद्रास आणि मुंबई या प्रांतांत शेतकीच्या मालकी हक्काबाबत ज्या क्रांत्या या भांडवलदारांनीं घडवून आणल्या तेवढ्या क्रांत्या कोणत्या तरी क्रांतिकारक पक्षानें आजवर केल्या आहेत काय ? लॉर्ड क्लाइव्ह हा स्वतः एक फार मोठा दरोडेखोरच होता. पण त्यानें सुद्धां हिंदुस्तानांत कंपनीचे अधिकारी साध्या लांचलुचपतीनें आपल्या लोभभावनेचें समाधान होत नाहीं असें पाहून राक्षसी पिळवणुकीचा आश्रय करतात असें म्हटलें आहे. इंग्लंडांत राष्ट्रीय कर्ज ही अतिशय पवित्र गोष्ट आहे अशी वटवट हे भांडवलदार करीत असतात. यांनींच हिंदुस्तानांतील राजांनीं ईस्ट इंडिया कंपनींत गुंतवलेल्या मिळकतीवरचा नफा साफ जप्त करून टाकला नाहीं काय ? फ्रेंच राज्यक्रांतीशीं लढतांना आमच्या पवित्र ख्रिस्ती धर्मासाठीं आम्ही लढतों असें हे म्हणतात. पण यांनीं त्याचवेळीं हिंदुस्तानांत ख्रिस्ती धर्माच्या प्रसारास बंदी केली होती. ओरिसा आणि बंगाल यांतील पवित्र देवळांना जाणाऱ्या हजारों यात्रेकरूंपासून पैसा उकळण्यासाठीं जगन्नाथाच्या देवळांत चालणारे खून व

वेश्यागिरी यांचा व्यापार यांनीं हस्तगत केला नव्हता काय ? मालकी हक्क सुव्यवस्था, 'कुटुंबसंस्था व धर्म' यांच्या नांवांनीं कंठशोक करणारी हींच तीं माणसें होत.

हिंदुस्तानचें क्षेत्र युरोपइतकें मोठें आहे. त्याची लोकसंख्या २५ कोटी आहे. येवढ्या या प्रचंड देशावर ब्रिटिश उद्योगधंद्यांचा होणारा विध्वंसक परिणाम अगदीं उघड दिसणारा व गोंधळून (?) टाकणारा आहे. एक गोष्ट आपण लक्षांत ठेवली पाहिजे कीं ही जी नवीन भांडवलशाही नांवाची यांत्रिक उत्पादनपद्धति निर्माण झाली आहे, तिच्या प्रकृतीचा हा सहज परिणाम आहे. भांडवलाची संपूर्ण सत्ता, हा या उत्पादन पद्धतीचा आधार होय. भांडवल हें शक्ति बनण्यासाठीं त्याचें केंद्रीकरण होणें आवश्यक असतें. या केंद्रीकरणाचा जगाच्या बाजारावर जो विध्वंसक परिणाम होतो त्यामुळें आजच्या जगांतील प्रत्येक सुधारलेल्या शहरांत जें अर्थशास्त्र व्यवहारांत आलें आहे, त्याचें अंगभूत सिद्धांत फार मोठ्या प्रमाणावर व्यक्त होत असलेले दृष्टीस पडतात. एका नव्या जगाची आधिभौतिक भूमिका इतिहासाच्या या भांडवलशाही कालखंडानें निर्माण करावयाची आहे. अखिल मानवजातींच्या परस्परावलंबनावर आधारलेले जागतिक दळणवळण आणि त्या दळणवळणाचीं साधनें निर्माण करणें हीं या आधिभौतिक भूमिकेची एक बाजू होय. या भूमिकेची दुसरी बाजू म्हणजे माणसाची धनोत्पादनशक्ति वाढविणें आणि आधिभौतिक उत्पादनपद्धतीचें रूपांतर निसर्गावर शास्त्रीय ज्ञानाचें प्रभुत्व स्थापण्यांत करणें ही होय. ज्याप्रमाणें भूगर्भांत झालेल्या क्रांत्यांनीं आपल्या पृथ्वीचा पृष्ठभाग तयार केला त्याप्रमाणें भांडवलशाही, उद्योगधंदे व व्यापार यांच्याकडून नव्या जगाची भौतिक भूमिका तयार होत असते. भांडवलशाही कालखंडांत प्रगतीचें जें फळ प्राप्त झालें, तें प्रचंड समाजक्रांतीनें माणसाच्या हातांत दिलें म्हणजे मानवी प्रगतीचें आजचें स्वरूप बदलेल. बाजार जागतिक होणें, उत्पादनाचें सामर्थ्य सर्वत्र आधुनिक परिमाणाचें होणें, सर्व सुसंस्कृत लोकांच्या सामुदायिक नियंत्रणाखालीं हा जागतिक बाजार व उत्पादनसामर्थ्य येणें हीं तीं मानवी प्रगतीचीं फलें होत. मानवाच्या प्रगतीचें आजचें स्वरूप, मेलेल्या माणसांच्या डोक्याच्या कवट्यांतून अमृतपान करणाऱ्या हिंदूंच्या रानटी देवतेसारखें आहे. हें या प्रगतीचें स्वरूप वर म्हटल्याप्रमाणें मानव प्रगतीचीं फलें माणसाच्या हातीं आल्यावर बदलून जाईल.

---

# ( २ )

# ‘ तत्त्वज्ञानाचें दारिद्र्य ’

[ प्रुधाँ या फ्रेंच तत्त्वज्ञाच्या ‘ दारिद्र्याचें तत्त्वज्ञान ’ ( फिलॉसफी ऑफ पॉव्हर्टी ) या ग्रंथावर मार्क्सनें ‘ तत्त्वज्ञानाचें दारिद्र्य ’ ( पॉव्हर्टी ऑफ फिलॉसफी ) या नांवाचें पुस्तक लिहून टीका केली होती, असा उल्लेख मागें आला आहे. मार्क्सच्या या पुस्तकांतले कांहीं उतारे येथें दिले आहेत. कॅपिटल-मध्यें मार्क्सनें जी ऐतिहासिक विचारपद्धति वापरली आहे, तीच अतिसंक्षिप्त-रूपानें पण अधिक सुबोधपणें येथें त्यानें मांडली आहे.]

( प्रुधाँच्या मतें– ) प्रत्येक सामाजिक तत्त्वाचें एकेक शतक असून, त्या त्या शतकांत तें तें तत्त्व प्रभावी झालें: उदाहरणार्थ केंद्रीभूत सत्तेच्या तत्त्वाचें जसें अकरावें शतक, तसेंच व्यक्तिमत्वाच्या तत्त्वाचें अठरावें शतक होय. या क्रमानें पाहिजे असतां अमुक शतकाचें अमुकत्त्व असें म्हणावयाचें नसून अमुक तत्त्वाचें अमुक शतक असें म्हणावें लागतें. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे इतिहासानें तत्त्वें निर्माण केलीं नसून तत्त्वांनीं इतिहास निर्माण केले असें हें ( प्रुधाँचें ) मत आहे. आतां अर्थात आम्हांला तत्त्वें आणि इतिहास या दोघांचाहि बचाव करावयाचा असल्यामुळें, ‘ अमुक तत्त्व अकराव्या शतकांतच प्रभावी ठरलें, अथवा अठराव्या शतकांतच प्रभावी ठरलें, पण इतर शतकांत प्रभावी ठरलें नाहीं, असें कां ? ’ असा प्रश्न आम्ही स्वत:ला विचारतों. या प्रश्नाचें उत्तर शोधून काढण्यासाठीं अकराव्या शतकांत माणसें कशीं होती, अठराव्या शतकांत माणसें कशीं होतीं, त्या त्या निरनिराळ्या शतकांतील माणसांच्या गरजा काय होत्या, त्यांचें उत्पादनसामर्थ्य किती होतें, त्यांची उत्पादनपद्धति कोणची होती, उत्पादनास ते कच्चा माल कोणता वापरीत,– थोडक्यांत म्हणजे जीवनाला आवश्यक अशा धनोत्पादनपद्धतींत माणसा-माणसांचे संबंध कसे होते याचें संशोधन आम्हांस करावें लागतें; या सर्व प्रश्नांचा तळ पहावयाचा म्हणजे–माणसाचा प्रत्येक शतकांतला अपवित्र असा पण खरा इतिहास समजून घेऊन, या मानवी इतिहासाच्या नाटकाचे सूत्रधार व नट म्हणजे ही माणसेंच होत अशी इतिहासाची मांडणी करून दाखविणें

हेंच नव्हे काय ? पण एकदां तुम्ही माणसांना त्यांच्या इतिहासाचे नट व सूत्रधार बनविलें म्हणजे इतिहास-प्रतिपादनाच्या खऱ्या आरंभ बिंदूशीं तुम्ही येतां. कारण त्यावेळीं तुम्ही प्रथम जीं त्रिकालाबाधित तत्त्वें म्हणून सांगितलीं त्यांचा तुम्ही त्यागच करतां......

अर्थात् समतेच्या तत्त्वाकडे असणारी प्रवृत्ति ही चालू शतकाचें वैशिष्ट्य आहे असें दिसून येतें हें खरेंच. परंतु पूर्वींच्या निरनिराळ्या शतकांत, माणसांच्या गरजा निरनिराळ्या, त्यांचीं उत्पादनसाधनें निरनिराळीं असें असतांहि, त्या शतकांनीं आमच्या आजच्या काळांतील समतेच्या प्राप्तीसाठींच मार्गक्रमण केलें असें आपण म्हणतों तेव्हां जुन्या एका शतकांतील माणसें व त्यांचीं साधनें यांच्या जागीं आमच्या शतकांतील माणसें व त्यांचीं साधनें यांची स्थापना करण्याची चूक आपण करतों. आपण दुसरी चूक करतों ती ही कीं, पूर्वींच्या पिढ्यांनीं जी मानवप्रगतीचीं फळें निर्माण केलीं, त्यांचें रूपांतर पुढल्या पुढल्या पिढ्या करीत असतात, हा जो इतिहासाचा क्रम त्याबद्दलहि आपण गैरसमज करून घेत असतों. अर्थशास्त्रज्ञांना माहीत असणारी एक गोष्ट ही आहे कीं, एका धंद्याचा जो पक्का माल असतो तो दुसऱ्या एकाद्या धंद्याचा कच्चा माल असून तो दुसरा धंदा नवीन पक्का माल निर्माण करीत असतो......

अर्थशास्त्रज्ञांच्या विचाराची एक विशिष्ट चमत्कारिक पद्धति व क्रम असतो. त्यांच्या मतें जगांत कृत्रिम आणि नैसर्गिक असें कोणत्याहि संस्थांचें फक्त दोन प्रकार आहेत. सरंजामी संस्था या कृत्रिम संस्था असून भांडवलदारी संस्था या मात्र नैसर्गिक संस्था होत असें त्यांना वाटतें. या बाबतींत या अर्थ-शास्त्रज्ञांचें धर्मवाद्यांशीं साम्य आहे. हे धर्मवादीहि धर्माचे अनेक प्रकार मानतात. जो धर्म त्यांचा स्वत:चा नसतो, तो ईश्वरप्रणीत नसून मर्त्य मानवांनीं काढलेला तो धर्म आहे असें ते म्हणतात. या धर्मवाद्यांचा धर्म मात्र ईश्वरापासून स्फुरण पावलेला आहे असें त्यांचें मत असतें. आजचे भांडवलशाही उत्पादनसंबंध हेच तेवढे नैसर्गिक होत असें जेव्हां ( भांडवलशाही ) अर्थशास्त्रज्ञ म्हणतात त्या वेळीं या भांडवलशाही संबंधांतच निसर्गाच्या नियमानुसार संपत्तीचें उत्पादन होतें व यांनच निसर्गक्रमानुसार उत्पादनसामर्थ्याची वाढ होते असें त्यांचें म्हणणें असतें. हे उत्पादनसंबंध नैसर्गिक नियमानुसार घडत असून त्यांच्यावर काल महात्म्याचा प्रभाव चालू शकत नाहीं; हे सिद्धांत त्रिकालाबाधित असून समा-

जाच्या कोणत्याहि अवस्थेंत ते खरेच असले पाहिजेत असें या अर्थशास्त्रज्ञांना वाटतें. या मताप्रमाणें पाहतां आजवर इतिहास घडत आला असला तरी यापुढें इतिहासाचा क्रम कायमचा खुंटला पाहिजे. पूर्वी सरंजामशाहीच्या अनैसर्गिक संस्था होत्या. तेव्हां पूर्वी इतिहास होता हें उघड आहे. या सरंजामशाहींत हल्लींच्या भांडवलशाही समाजाहून वेगळ्या प्रकारचे उत्पादन-संबंध होते. ते उत्पादन संबंध अनैसर्गिक म्हणून अशाश्वत होते. पण हल्लींचे उत्पादन संबंध मात्र नैसर्गिक व शाश्वत आहेत असें अर्थशास्त्रज्ञांना वाटतें.

सरंजामशाहींतहीं कफल्लक असा कामगार वर्ग ( प्रॉलेटॅरिएट ) होताच. तो भूदास वर्ग होय. आजच्या भांडवलशाहीचीं सर्व विकासबीजें, त्या भूदासवर्गांत होती. सरंजामी उत्पादनपद्धतीच्या अंगींहि परस्परविरुद्ध अशीं दोन लक्षणें होती. त्यांना प्रुधाँ एक चांगली बाजू व एक वाईट बाजू असें म्हणतों.

प्रुधाँच्या मतें प्रत्येक आर्थिक प्रकाराच्या दोन बाजू असतात. एक चांगली बाजू व दुसरी वाईट बाजू. निव्वळ बुद्धिवादी लोक इतिहासांतील थोर पुरुषासंबंधानें जसें बोलतात तसें प्रुधाँ अर्थशास्त्राच्या प्रकारासंबंधानें बोलत असतो. नेपोलियन हा थोर पुरुष होता. त्यानें कित्येक वाईट गोष्टीहि केल्या. ही चांगली बाजू आणि ती वाईट बाजू, हे फायदे व ते तोटे, हे जोडीनें लक्षांत घेतले म्हणजे प्रत्येक आर्थिक प्रकारांत असणारा विरोध दिसून येतो असें प्रुधाँचें म्हणणें आहे. या विरोधानें उत्पन्न होणारी अडचण निवारण्याचा उपाय म्हणजे चांगली बाजू शाबूत ठेवून वाईट बाजू नाहींशी करणें हा होय.

हें वर्गीकरण करतांना प्रुधाँ एक गोष्ट लक्षांत घेत नाहीं ती ही कीं, वाईट बाजू व चांगली बाजू यांमधील लढ्यांत अखेरीस वाईट बाजू ही चांगल्या बाजूवर विजय मिळविते. वाईट बाजूमुळेंच गति निर्माण होऊन इतिहास घडून येतो. कारण या वाईट बाजूमुळेंच इतिहासाला कलाटणी देणारा झगडा निर्माण होत असतो. सरंजामी अमदानींत सरदार वर्गाच्या अंगीं उमदे सद्गुण असलेले दिसून येत. हक्क आणि कर्तव्यें यांचा अन्वय असे, खेड्यांतले घरगुती उद्योगधंदे आणि शहरांतले पितृ-प्रधान जीवन हें भरभराटत असे. कारागीर संघटणामुळें शहरांत धंद्यांची भरभराट चांगली होत असे. थोडक्यांत म्हणजे सरंजामशाहीची ही सर्व चांगली बाजू होय; अशा उत्साहानें अर्थशास्त्रज्ञांनीं या चांगल्या बाजू वगळून कलंकभूत अशी वाईट बाजू म्हणजे सरंजामशाहींतील जी भूदास

पद्धति, हक्कदारी, बेबंदशाही, वगैरे गोष्टी तेव्हढ्याच नाहींशा करून टाकण्याचा आग्रह धरला असता तर त्याचा परिणाम काय झाला असता? ज्यांनीं त्या समाजांत अंतर्गत झगडा निर्माण करावयाचा तीं तत्वें यामुळें नष्ट झालीं असतीं. आणि भांडवलशाहीचा विकास गर्भातच ठार झाला असता. असें करूं पहाणें म्हणजे इतिहासच नष्ट करण्याचा दुराग्रह धरण्यासारखें होय.

भांडवलशाहीचा विजय होऊन गेल्यानंतर मात्र सरंजामशाहीची चांगली बाजू व वाईट बाजू या वर्गीकरणाची आतां कोणी आठवणहि काढीत नाहीं. सरंजामशाहीच्या अमदानींतच भांडवलदारांनीं ज्या उत्पादनशक्ति वाढविल्या त्यांचा पूर्ण ताबा आतां भांडवलदारांनीं घेतला आहे. जुन्या सर्व आर्थिक घटना आणि तदनुसार निर्माण होणारे राजकीय संबंध म्हणजे सरंजामशाही राज्यपद्धति या सर्वांचा भांडवलदारांनीं आतां साफ चुराडा करून टाकला आहे.

सरंजामशाही उत्पादनपद्धतीचें स्वरूप नीट समजून घ्यावयाचें असेल तर तिच्या अंगभूत असणारा अंतर्विरोध हा तिच्या जीवनालाच अवश्य होता ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. सरंजामशाहीचें शास्त्रीय संशोधन करतांना, या अंतर्विरोधांतच धनोत्पादन कसें होत होतें, वर्ग-विरोधाची वाढ होत असतांच धनोत्पादक शक्तिहि कशा वाढत होत्या, समाजांतील एक वर्ग म्हणजे समाजाची वाईट बाजू अथवा दोष वाढत वाढत जाऊन त्या समाजाच्या दास्यविमोचनाचे कामीं या वाढीचा उपयोग कसा झाला हें दाखविलें गेलें पाहिजे. अशा पद्धतीनें संशोधन करणें म्हणजेच ज्या उत्पादनपद्धतीच्या पोटांत उत्पादनशक्तींचा विकास होत असतो. ती उत्पादनपद्धती व तदनुसार झालेले उत्पादनसंबंध हे त्रिकालाबाधित नसतात हे सिद्ध करणेच होय. अमुक उत्पादनसंबंध मानव जातीच्या अमुक विकासावस्थेंत व अमुक प्रकारच्या उत्पादनशक्तीचे बाबतींतच निर्माण होतात; माणसांच्या उत्पादनशक्तींत बदल झाला म्हणजे त्यांच्या उत्पादनसंबंधातहि बदल होतो हेंच या शास्त्रीय संशोधनानें सिद्ध केलें जातें. मानवी संस्कृतिविकासाचीं जीं फळें, म्हणजे माणसांनीं मिळविलेल्या ज्या उत्पादनशक्ति त्यांचें जतन करणें ही गोष्ट मानवजातीच्या आत्यंतिक हिताची आहे. या शक्तीचें रक्षण करण्यासाठीं अर्थातच या शक्तींना जन्म देणारे ( पण पुढें या शक्तीच्या वाढीस प्रतिबंध करणारे ) परंपरागत समाजप्रकार हे उध्वस्त

करावे लागतात. हें विध्वंसकार्य सुरू झालें म्हणजे, पूर्वी क्रांतिकारक असलेला वर्ग आतां सनातनी बनूं लागतो.

भांडवलदार आपल्या भांडवलशाहीची सुरुवात कफल्लक अशा कामगारापासून करीत असतो. हे कामगारहि जुन्या सरंजामी काळांतले अवशेष असतात. भांडवलशाहीच्या ऐतिहासिक क्रमांत तो भांडवलशाहीबीजें निर्माण करीत असतो. हीं विरोधी बीजें प्रथमतः कमीअधिक प्रमाणांत प्रच्छन्न असतात. त्यांची ती सुप्तावस्था असते. भांडवलशाहीचा विकास होत असतां, तिच्या गर्भांतच नवीन म्हणजे आधुनिक कफल्लक कामगारवर्ग विकास पावत असतो. हा कामगारवर्ग व भांडवलशाहीवर्ग यांचे दरम्यान कलह माजत असतो. अगदीं प्रथमावस्थेंत या कलहाचें स्वरूप तुरळक, प्रासंगिक अशा विध्वंसक क्रियांत दिसून येतें. हळू हळू त्या कलहाचें स्वरूप उभय पक्षांच्या लक्षांत स्पष्ट प्रकारें येऊं लागून उभयपक्षांकडून त्या कलहाच्या भूमिकेचा रीतसर पुकारा केला जातो. उलट सर्व आधुनिक भांडवलदारांचे एकवर्ग या नात्यानें परस्परहितसंबंध कामगाराविरूद्ध समान असले तरी त्यांचे आपापसांत तीव्र हितविरोध असतातच. त्यांच्या भांडवलशाही जीवनाची जी आर्थिक परिस्थिति तीमुळें हे हितविरोध निर्माण होतात. भांडवलदार वर्ग ज्या उत्पादन–संबंधांत आपला व्यवहार करीत असतो ते उत्पादनसंबंध एकस्वरूपी नसून त्याचें स्वरूप दुहेरी आहे ही गोष्ट दिवसानुदिवस अधिकाधिक स्पष्ट होत जाते. ज्या उत्पादनसंबंधांत संपत्ति निर्माण होते, त्या उत्पादनसंबंधांत धनोत्पादनशक्तींचा विकास होत असतो, व त्याच उत्पादनसंबंधांत त्या शक्तींनां दडपणाऱ्या प्रतिशक्ति निर्माण होत असतात. या उत्पादनसंबंधांत भांडवलशाही संपत्ति निर्माण होते. पण ही भांडवलदार वर्गाची संपत्ति असते. वैयक्तित संपत्ति दिवसानुदिवस नष्ट होत जाऊन भांडवलदार वर्गाच्या संपत्तीवर कफल्लकांचा वर्गही वाढत जात असतो.

भांडवलशाहींतला हा अंतर्विरोध जितका जितका उजेडांत येत जातो तितकें तितकें अर्थशास्त्रज्ञांचें म्हणजे भांडवलदारांच्या शास्त्रीय प्रतिनिधींचें, त्यांच्याच सिद्धांताशीं भांडण माजूं लागतें. आणि म्हणून या शास्त्रज्ञांतच नवे नवे पंथ निर्माण होतात.

अर्थशास्त्रज्ञांत एक दैववादी पंथ निर्माण झाला. भांडवलदार हा प्रत्यक्ष व्यवहारांत त्याला धनोत्पादनाचे कामीं मदत करणाऱ्या कामगारांच्या दुःखाबद्दल जसा बेफिकीर असतो त्याप्रमाणें हे अर्थशास्त्रज्ञ भांडवलशाही उत्पादनपद्धतींत त्यांना दिसून येणाऱ्या दोषांबद्दल बेफिकीर असतात. या दैववादी पंथांत क्लासिकल आणि रोमँटिक असे दोन गट आहेत. ॲडम स्मिथ आणि रिकार्डो हे क्लासिकल पंथाचे होत. जे भांडवलदार सरंजामी समाजाच्या अवशेषाशीं झगडत असतां जुने सरंजामी आर्थिक संबंध नाहींसे करून माणसाची धनोत्पादनशक्ति वाढवीत असतात, व याप्रकारें उद्योगधंदे आणि व्यापार यांना नवी उठावणी देत असतात त्या भांडवलदारांच्या सरंजामशाहीशीं चालू असलेल्या या झगड्यांत भांडवलदाराच्या बाजूनें जो कामगारवर्ग सामील झालेला असतो तो अत्युत्साहानें धनोत्पादक श्रम करीत असतो. या श्रमामध्यें त्याला मधून मधून क्लेशहि सोसावे लागतात. पण हे क्लेश अपवादात्मक आहेत असें त्याला वाटत असतें. ॲडम स्मिथ आणि रिकॉर्डो हे अर्थशास्त्रज्ञ या भांडवलशाही कालखंडाचे इतिहासकारहि होत. भांडवलशाही उत्पादनसंबंधांत संपत्ति कशी निर्माण होते, या उत्पादनसंबंधांचे निरनिराळे प्रकार कसे पडतात, त्यांत त्रिकालाबाधित नियम कोणाचे आहेत, हे प्रकार व हे नियम सरंजामशाही समाजांतील प्रकारापेक्षां व नियमांपेक्षां अधिक श्रेष्ठ कसें आहेत वगैरे गोष्टी मांडून दाखविणें येवढेंच आपले काम आहे असें स्मिथ व रिकॉर्डो यांना वाटत असे. या उत्पादनप्रकारांत माणसांना जें दुःख भोगावें लागतें तें यांच्या मतें नैसर्गिक व अपरिहार्य आहे, स्त्रीला प्रसूतिदुःख हें जसें निसर्गतः अपरिहार्य असतें तसेंच उद्योगधंद्यांतील दुःख हें त्यांच्या मतें अपरिहार्यच होय.

रोमँटिक पंथ हा आमच्या काळचा आहे. या पंथाच्या मतें भांडवलदारवर्गानें कामगारांशीं युद्धच पुकारलें आहे. जितकी संपत्ति अधिक निर्माण होते, तितकें दुःख अधिक निर्माण होत आहे हें त्यांना दिसतें आहे. पण हे अर्थशास्त्रज्ञ आपल्या उच्च आसनावर बसून, जीं मानवी एंजिनें कष्ट सोसून संपत्ति निर्माण करीत आहेत, त्यांच्याकडे तुच्छतेनें पहात राहतात. या माणसांचें दुःख अपरिहार्य आहे असें म्हणून ते बेफिकीर रहातात. ॲडम स्मिथ, रिकार्डो यांनीं आर्थिक विकासाच्या ज्या पायऱ्या सांगितल्या आहेत त्या त्यांना मान्य

असतात. पण माणसांच्या दुःखाबद्दल रिकॉर्डो व स्मिथ हे कांहींसा खिन्न असा भोळा भाव दाखवीत, त्या ऐवजीं हे अर्थशास्त्रज्ञ क्रूर आनंद व्यक्त करतात.

भूतदयावादी असा एक पंथ अर्थशास्त्रज्ञांत निर्माण झाला आहे. त्याला हल्लींच्या उत्पादनसंबंधांत असलेली वाईट बाजू अगदीं मनाला झोंबते. आपल्या विवेकबुद्धीचें शांतवन करण्यासाठीं ते प्रस्तुत समाजस्थितींतले खरेखुरे अंतर्विरोध सौम्य करतात. कामगारांच्या दुःखाबद्दल त्यांना खरोखर वाईट वाटते. भांडवलदाराच्या बेलगाम चढाओढीबद्दल त्यांना खेद होतो. कामगारांनीं गंभीर व्हावें, अधिक मेहनत करावीं, मुलें कमी करावीं असा उपदेश ते कामगारांना करीत असतात. उत्पादनकार्यांत जो उत्साह खर्च करावयाचा तो सयुक्तिकपणें करा असा उपदेश भांडवलदारांना करीत असतात. तत्त्व आणि तपशील, सिद्धांत आणि त्यांचे परिणाम, कल्पना आणि व्यवहार, आकार आणि सार, न्याय आणि वस्तुस्थिति यांमध्यें साखरेची साल काढण्याप्रमाणें बारीक बारीक खुसपटें काढणें, हें येवढें चांगलें पण तें तेवढें वाईट असें बारीक फरक करणें, येवढें या पंथाचे काम असतें.

परोपकारी म्हणून एक पंथ आहे. त्यानें या भूतदयावादी पंथाच्या विचारावर कळस चढवला आहे. हा पंथ मुळीं अंतरविरोधच मान्य करीत नाहीं. सर्वच लोक भांडवलदार झाले पाहिजेत असें तो म्हणत असतो. व्यवहारापासून भिन्न व ज्यांत अंतर्विरोध नाहींत असें सोलीव तत्त्व सिद्ध करून दाखविण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा असते. व्यवहारांत प्रतिक्षणीं दिसून येणारे अंतर्विरोध काल्पनिक दृष्ट्या नाहीसे करून टाकणें हे तत्त्वतः अगदीं सोपें आहे. म्हणून या परोपकारी पंथाच्या मताप्रमाणें एक आदर्श वास्तव परिस्थिति कल्पिता येते. या परिस्थितींत भांडवलशाही संबंधांतले आर्थिक प्रकार शिल्लक ठेवावे पण त्यांतील अंतर्विरोध काढून टाकावे अशी त्यांची इच्छा असते. आपण भांडवलदारांच्या अनर्थावह अशा व्यवहार पद्धतींशीं खऱ्या मनानें झगडत आहों असें त्यांना वाटत असतें. भांडवलदारापेक्षांहि अधिक इमानी भांडवलदार आपण आहोंत असा त्यांचा समज असतो.

अर्थशास्त्रज्ञ हे जसे भांडवलदार वर्गाचे शास्त्रज्ञ प्रतिनिधी होत त्याप्रमाणें सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट हे कामगारवर्गाचे शास्त्रज्ञ प्रतिनिधी होत. कामगार

वर्ग हा जोंपर्यंत वर्ग या भूमिकेस पोचण्याइतका पूर्ण विकसित झालेला नाहीं आणि म्हणूनच कामगारवर्गाचा भांडवलशाहीशीं असलेला झगडा राजकीय स्वरूप पावलेला नाहीं, तसेंच कामगारांचें दस्यविमोचन करून एक नवी समाज-व्यवस्था स्थापता येईल इतकें उत्पादनसामर्थ्य भांडवलशाहीच्या गर्भांत अजून जोंपर्यंत वाढलें नाहीं तोंपर्यंत कामगारांचे हे शास्त्रज्ञ प्रतिनिधी, निव्वळ कल्पना-वादी (युटोपिअन्स) रहातात. जुलूमग्रस्त जनतेच्या गरजा भागविण्यासाठीं निरनिराळ्या समाजपद्धति ते कल्पनेंत बांधीत असतात. आणि शास्त्रसंशोधनाच्या मार्गे मनानें धांवत असतात, पण इतिहास जसजसा पुढें जाऊं लागतो. आणि त्याबरोबरच कामगारांचा झगडा जसजसा अधिक स्पष्ट रूप धारण करूं लागतो तसतसे शास्त्रीय सिद्धांत मनांत शोधत बसण्याची त्यांना गरज रहात नाहीं. डोळ्यासमोर जें घडत आहे तें लक्षांत घ्यावें आणि त्याचा पुकार करावा याहून अधिक कांहीं करण्याची जरूरी नसते. जोंवर ते शास्त्र हुडकीत बसतात आणि निरनिराळ्या समाजव्यवस्थांच्या कल्पनांचे मनोरे उभारीत असतील तोंवर ते वर्गकलहाच्या आरंभावस्थेंतच असतात. दुःख हें त्यांना नुसतें दुःख आहे एवढेंच कळतें. या दुःखालाच एक क्रांतिकारक विध्वंसक बाजू आहे हें त्यांना कळत नाहीं. पण व्यवहारांत यांना एकदां वर्गकलह दिसूं लागला म्हणजे ऐतिहासिक क्रमांतूनच शास्त्रीय ज्ञानाचा उदय होतो. मग हे कामगारांचे पुढारी इतिहासक्रम पूर्णपणे समजल्यामुळें शब्दप्रामाण्य सोडून देऊन क्रांतिकारक बनतात.......

---

## विक्रीमाल, किंमत व नफा : : : १*

### धनाच्या पुरवठ्याचें शास्त्र

मानव जातीला जगण्यासाठीं जो विक्रीमाल ( कमॉडिटीज ) लागत असतो त्याच्या आर्थिक पुरवठ्याची चर्चा अर्थशास्त्रांत केलेली असते. आधुनिक भांडवलशाही राज्यांत ही प्रक्रिया मालाच्या खरेदी-विक्रीनें अमलांत येते. माणसांना उत्पन्नादाखल जो पैसा मिळतो त्या पैशांनीं हा माल खरेदी करून माणसें त्यावर आपली मालकी प्रस्थापित करतात. माणसांच्या उत्पन्नाचे अनेक प्रकार असतात. त्याचे सामान्यतः तीन प्रकारांत वर्गीकरण करतां येईल. दरसाल भांडवल हें भांडवलदारास 'नफा' देतें, 'जमीन' ही जमीन-मालकास 'खंड' देते, आणि 'श्रमशक्ति' ही ( अर्थात सर्वसामान्य परिस्थितींत आणि श्रमशक्ति ही धनोत्पादनाचे कामीं वापरली जाईल त्यावेळीं ) श्रमशक्तीच्या मालकास 'मजूरी' देते. याप्रमाणें भांडवल हें भांडवलदाराला, जमीन ही जमीन-मालकाला आणि श्रमशक्ति ही श्रम करणाराला, अशी हीं

* कॅपिटल खंड ३ रा.

धनप्राप्तीचीं म्हणजे अनुक्रमें नफा, खंड व मजूरी यांचीं साधनें आहेत असें माणसांना वाटत असतें. हीं सर्व उत्पन्नें जणूं कांहीं कधींच न जीर्ण होणाऱ्या झाडाचीं, दरसाल खालीं जाणारीं, फळें आहेत, किंवा अगदीं बिनचूक बोलायचें म्हणजे तीन भिन्न झाडांची समाजांतील भांडवलदार, जमीन-मालक व मजूर या तीन वर्गांना दरसाल मिळणारीं हीं तीन प्रकारचीं फळें होत असें वाटत असतें. धनाचे जे विविध प्रकार आहेत त्यांच्या मिळकतीचीं भांडवल, जमीन व श्रम हीं तीन भिन्न भिन्न व स्वतंत्र साधनें होत असा लोकांचा समज असतो.

## किंमत कशी ठरते

पण आर्थिक स्वरूपाच्या विक्रीमालाचा पुरवठा होण्याचें बाबतींत प्रत्येक वर्गाला मिळणाऱ्या उत्पन्नाचें परिमाण हीच कांहीं निर्णायक बाब ठरत नाहीं. मालांना येणारी किंमत हाहि एक या प्रक्रियेंतील घटक असतो. आणि म्हणून किंमती कशामुळें ठरतात या प्रश्नाची मोठी शोधक चौकशी आजवर अर्थशास्त्रज्ञांनीं केली आहे.

सकृद्दर्शनीं या प्रश्नांत कांहीं अवघड दिसतच नाहीं. कारखान्यांतला कोणताही माल आपण घेतला तर त्याची किंमत, मालक आपला खर्च व त्याच्या विशिष्ट धंद्यांत जेवढा नफा घेण्याचा प्रघात असेल तेवढी रक्कम याची बेरीज करून किंमत ठरवितो. अर्थात मालाची किंमत ही उत्पादनखर्च आणि नफा यांच्या बेरजेइतकी असते.

## उत्पादन-खर्चाचें वर्गीकरण

कारखानदार माल निर्माण करण्यासाठीं जें जें खर्च करतो तो सर्व उत्पादनखर्च असें तो मानतो. या खर्चांत पहिल्यानें कच्चा माल व इतर साहाय्यक माल ( कापूस, कोळसा वगैरे ) आणि मागाहून यंत्रें

हत्यारें इमारती वगैरेंचा समावेश होतो. खर्चाची दुसरी बाब म्हणजे जमिनीचें भाडें. ( इमारतीचें भाडें ) तिसरी बाब म्हणजे मजूरांना दिली जाणारी मजुरी. यावरून आपणांस आतां कारखानदाराच्या उत्पादनखर्चाचें वर्गीकरण पुढील तीन प्रकारांत करतां येईल.

( १ ) उत्पादन-साधनें ( कच्चामाल व साहाय्यक माल, यंत्रें, हत्यारें आणि इमारती )

( २ ) जमीन-भाडें ( कारखान्याची जमीन कारखानदाराच्या मालकीची असली तरी तिचें भाडें हिशेबांत धरण्यांत येईल. )

( ३ ) मजूरी

## वर्गीकरणांतील अडचणी

या तीन प्रकारांचे आणखी थोडें खोल जाऊन पृथक्करण केलें तर पूर्वी लक्षांत न आलेल्या अशा अनेक अडचणी दिसतात. पहिल्यानें आपण मजुरी विचारांत घेऊं. मजूरीचे दर भारी असतील अथवा हलकें असतील त्याप्रमाणें उत्पादनाचा एकंदर खर्च, ( आणि अर्थात उत्पन्न मालाची किंमत ) जास्त अथवा कमी असेल. पण मजूरीचा दर कशानें ठरतो ? श्रमशक्ति देऊं केली आणि मागितली गेली म्हणजे मजूरी ठरते असें आपण समजूं. भांडवलदाराला आपल्या एखाद्या धनोत्पादन-कार्यासाठीं मजूरांची गरज लागते. आणि म्हणून तो श्रमशक्तीची मागणी करतो. श्रमाला फार मोठी मागणी उत्पन्न होण्यासाठीं भांडवलाची खूप वाढ व्हावी लागते. हें भांडवल कशाकशाचें बनलेलें असतें ? पैसा आणि विक्रीमाल यांचें तें बनलेलें असतें. अथवा पैसा हाहि एक विक्रीमालच असल्यानें ( याची तपशीलवार चर्चा पुढें येईल ) भांडवल फक्त विक्रीमालाचेंच बनलेलें असतें, असें समजण्यास हरकत नाहीं. या विक्रीच्या वस्तु जितक्या अधिक मूल्यवान असतील तितकें त्यांचें

भांडवल अधिक असतें व तितक्या प्रमाणांत श्रमशक्तीला मागणीहि अधिक येते. त्यामुळें मजूरीचे दरहि वाढतात. आणि अखेर तयार मालाची किंमतहि वाढते. तेव्हां आतां आपण भांडवल ज्याचें बनलेलें असतें त्या विक्रीच्या वस्तूंचें मूल्य अथवा किंमत कशी ठरते हें पाहूं. माल उत्पन्न करण्याला जो खर्च येतो त्यावरून मालाचें मूल्य ठरतें. या माल उत्पत्तीच्या खर्चांतच मजूरीचाहि समावेश होतो. म्हणजे एकंदरीनें दीर्घकालाचा हिशेब केल्यास मजूरीच्या दरानें मजूरीचा दर ठरतो, आणि वस्तूच्या किंमतीवरून वस्तूची किंमत ठरते, असलें चमत्कारिक अनुमान काढावें लागतें. मजूराच्या अन्नाचीं जी किंमत असेल त्यावरून मजूराच्या मजूरीचा दर ठरतो असें कोणी म्हणतात. पण हीं अन्नद्रव्येंही विक्रीच्या वस्तुच होत आणि त्यांची किंमत आपण वर पाहिल्याप्रमाणें मजूरीवरून ठरत असते; म्हणजे या पद्धतीनेंही या युक्तिवादांतील चुकी उघडच लक्षांत येते.

कारखानदाराच्या उत्पादन-खर्चांत उत्पादन-साधनांचा आपण वर समावेश केला आहे. पण कापूस, यंत्रें, कोळसा इत्यादि या वस्तूहि विक्रीमाल आहेत हें सहज समजेल. अर्थात त्यांची किंमतहि मजूराच्या अन्नद्रव्याप्रमाणेंच अथवा कारखानदाराच्या भांडवलांतील इतर माला-प्रमाणेंच ठरते हें उघड आहे.

म्हणून उत्पादन-खर्चाचा विचार करून उत्पन्न मालाची किंमत ठरविण्याचा प्रयत्न अगदींच व्यर्थ जातो. मालाच्या किंमती मालाच्या किंमतीवरूनच ठरविण्याची आपत्ति तेथें उत्पन्न होते.

## नफ्याच्या दरांतील सारखेपणा

उत्पादन-खर्चांत कारखानदार आपला नफा (प्रघातानुसार जो ठरत असेल तो) मिळवीत असतो. या बाबतींत आतां अडचण

कांहींच नाहीं असें वाटेल; कारण हा नफा किती आकारायचा हें भांडवलदाराला आपल्या धंद्यांतल्या सामान्य प्रघातावरून माहीतच असते. विशेष परिस्थितीमुळें नफ्याच्या रूढ दराहून कमी अथवा अधिक नफा एखादा कारखानदार आकारतो हें खरें, पण एका विशिष्ट धंद्यांत सर्वत्र सरासरीनें नफ्याचा दर एकच असतो.

एवढेंच नव्हे, तर चढाओढीमुळें निरनिराळ्या धंद्यांतील नफ्यांचे दरहि परस्परांशीं कांहीं एका समपातळींत येत असतात. हें अपरिहार्यच आहे. कारण अमुक एका धंद्यामध्यें खूप नफा होऊं लागला तर कमी नफा होणाऱ्या धंद्यांतून या अधिक नफा होणाऱ्या धंद्यांत भांडवल वाहून येतें. किंवा अगदींच नवें असें भांडवल चांगला नफा देणाऱ्या धंद्याची वाट पहात असतें व तें या खूप नफा देणाऱ्या धंद्यांत उडी घेतें. यामुळें सहजच या धंद्यांत मालाची निपज खूप अधिक होतें. आणि मग खूप अधिक निपजलेला हा सर्व माल खपविण्यासाठीं त्याच्या किंमती उतरवाव्या लागतात व अर्थात नफाहि कमी होतो. एखाद्या विशिष्ट धंद्यांत नफा अगदीं कमी होत असला तर याउलट प्रकार घडतो. म्हणजे या धंद्यांतून भांडवल शक्य तितकें बाहेर पडतें; मालाची निपज कमी होते व अर्थात मग किंमती वाढून नफ्याचा दरहि वाढतो.

## सारखेपणा अदृश्य कां असतो

याप्रमाणें निरनिराळ्या धंद्यांतील नफ्याचा दरहि समतोल होत असतो. म्हणून सर्वसामान्य नफ्याचा दर ( अगदीं सारखा होत नसला तरी ) कारखानदारी व्यवहारांत थोड्या कमीअधिक प्रमाणांत सारखा असतो असें म्हणतां येते. एका धंद्याच्या सर्व शाखांत सामान्यतः नफ्यासारखा दर असतो ही गोष्ट जितकी स्पष्टपणें लक्षांत येते

तितकी उघडपणें सर्वच धंद्यांत नफ्याचा सर्वसामान्य दर असूं शकेल ही गोष्ट लक्षांत येत नाहीं. कारण सर्वसामान्य उत्पादन-खर्च, यंत्रांची झीज, यंत्रांचा केला जाणारा उपयोग, यांचें प्रमाण व स्वरूप निरनिराळ्या धंद्यांत भिन्नभिन्न असतें. ह्या सर्व भिन्नतेंत समतोलपणा निर्माण होण्यासाठीं उत्पादन-खर्चावर निरनिराळ्या धंद्यांतले कारखानदार जो नफा आकारतात त्याचा दर कोठें खूप अधिक तर कोठें खूप कमी असूं शकतो. यामुळें सर्वसामान्य असा एक दर सर्वत्र असतो ही वस्तुस्थिति झांकली जाते. परंतु निरनिराळे उत्पादनखर्च एकंदर उत्पन्नांतून वजा करून पाहिलें असतां सर्वच धंद्यांत नफ्याचा एक विशिष्ट, जवळ जवळ सारखा असा दर दिसून येतो.

## नफ्याचें प्रमाण कसें ठरतें

याप्रमाणें सर्व कारखानदारींच्या धंद्यांत नफ्याचा दर एक विशिष्ट असतो हें लक्षांत घेतलें म्हणजे कोणत्या धंद्यांत किती नफा पडावा हें धंद्यांत भांडवल किती गुंतवलें आहे यावरून ठरवितां येईल असें समजून येतें. एखाद्या कारखान्यांत बंदुका होतात कीं कापसाचे पायमोजे होतात ही बाब नफा किती होतो हें पाहतांना लक्षांत घेण्याची अगदीं जरूरीच नाहीं असें नाहीं. धंद्याची सुरक्षितता, विशिष्ट मालाच्या विक्रीची कमीअधिक सोय, वगैरे कारणांनीं नफ्याच्या दरांत कमीअधिकपणा येत असतो. पण हे फरक महत्त्वाचे नव्हत. नफ्याचा सामान्य दर आपण १० टक्के आहे असें समजूं. अर्थात १० लक्ष भांडवलावर १ लक्षावरील नफ्याच्या दसपट नफा मिळाला पाहिजे हें उघड आहे. ( अर्थात एखाद्याच्या भाग्याचे अथवा अभाग्याचे अपवादात्मक प्रसंग एखाद्या विशिष्ट धंद्यांत येतील ते जसे हिशेबांतून आपण वगळतों त्याचप्रमाणें अव्यवस्थितपणाहि विचारां-

तून वगळून धंदा चालविण्याची पद्धति योग्य प्रकारची आहे असें धरून चालतों.)

## भांडवलदाराच्या श्रमांमुळें नफा मिळतो ?

आणखी एक गोष्ट आपण लक्षांत ठेवली पाहिजे कीं विक्रीमाल उत्पन्न करणाऱ्या कारखान्यांतच केवळ नफा मिळतो असें नसून मालविक्रीसाठीं उत्पादक व गिऱ्हाईक यांचे दरम्यान मालविक्रीची दलाली करण्यानें म्हणजे व्यापारानेंहि नफा मिळतो. तसेंच बँका, रेल्वे वगैरेंनाहि नफा मिळत असतो. अशा सर्व उद्योगांत धंद्याची कार्यक्षमता चांगली आहे असें धरून चाललें तर भांडवल जितकें अधिक अथवा कमी असेल तितका नफा अधिक अथवा कमी असतो. म्हणून धंद्याच्या प्रत्यक्ष व्यवहारांत गुंतलेल्या लोकांची, 'नफा हा भांडवलांतून आपोआप निर्माण होतो,' 'झाडाची योग्य मशागत केली असतां त्याला जशीं फळें येतात तसा भांडवलाला नफा येतो,' अशी ठाम खात्री झालेली असते. पण नफा हा भांडवलाचा नैसर्गिक गुण आहे असें कांहीं मानतां येत नाहीं. म्हणून भांडवलदार जे परिश्रम करतो त्यामुळें नफा उत्पन्न होतो असें मानलें जातें. आपण धंद्यांतील व्यवस्थेची कार्यक्षमता योग्य प्रकारची आहे असें धरून चालूनच चर्चेस सुरवात केली आहे. व्यवस्थापकाच्या कार्यक्षमतेवर यशापयश पुष्कळच अवलंबून असतें. जर व्यवस्थापक कार्यक्षम नसेल तर त्या धंद्याचा नफ्याचा दर स्वाभाविकपणेंच खालीं जाईल. उलट व्यवस्थापक चांगला असेल तर नफ्याचा दर सरासरीच्या वर जाईल.

---

# मालाच्या खरेदीविक्रींतील नफा व मूल्य : : २*

## शून्यांतून सृष्टि ?

पण भांडवलापासून 'आपोआपच' नफा कसा निर्माण होणार ? एखाद्या मालाच्या उत्पत्तीसाठीं एखाद्या भांडवलदाराला २५ डॉलर्स खर्च येतो असें आपण समजूं. यांत कच्चा माल, साहाय्यक साहित्य, यंत्रें, हत्यारें, इमारती यांची झीज वगैरे समाविष्ट झालीं आहेत, माल उत्पन्न झाल्यावर तो २७·५० डॉलर्सला कारखानदार विकून टाकतो. या मालाची किंमत खरोखर २७·५० डॉ. आहे असें आपण मानलें तर उत्पादन-खर्चाहून ही जी अधिक किंमत आली ती शून्यांतून निर्माण झालेली सृष्टि आहे असें आपणास म्हणावें लागेल. कारण मालाच्या उत्पादनखर्चाच्या २५ डॉ. त सर्व उत्पादनखर्च आलेलाच आहे. पण शून्यांतून वस्तु निर्माण होण्याची कल्पना मानवी बुद्धीला पटणेंच अशक्य आहे. म्हणून सर्व अर्थशास्त्रज्ञांनीं आजवर मालाचें मूल्य उत्पादनाच्या प्रक्रियेंत वाढत नाहीं, ही प्रक्रिया पूर्ण

* कॅपिटल, खंड ३ व १.

झाल्यानंतर कारखानदाराच्या हातीं जे विक्रीमालरूपी फळ येत असतें तें एकूण उत्पादनखर्चाच्या मूल्याइतकेंच असतें—आपण घेतलेल्या उदाहरणांत उत्पन्न मालाची किंमत २५ डॉ. असते—असें मानलें आहे.

पण मग हा जो २॥ डॉ. वाढावा मालविक्रींतून मिळाला तो कोठून आला ? मालविक्रेत्याच्या हातून गिऱ्हाइकाच्या हातीं गेला तर जातां जातां त्याची किंमत वाढली असें म्हणतां येत नाहीं. कारण शून्यांतून सृष्टी निर्माण झाली म्हणण्यासारखेंच हें हास्यास्पद होईल. ही अडचण निवारण्यासाठीं सामान्यतः दोन मार्गांचा अवलंब केला जातो. कांहींच्या मतें विक्रीस आलेला माल हा विक्रेत्याच्या हातीं असतो त्याहून गिऱ्हाइकाच्या हातीं अधिक मूल्यवान ठरतो. कारण गिऱ्हाइकाची एक गरज तो भागवितो. विक्रेत्याची गरज तो अशी भागवूं शकत नाहीं. दुसरे कांहीं लोक असें म्हणतात कीं दिलेल्या किंमतीइतकें मालाचें मूल्य वास्तविक नसतेंच. गिऱ्हाईक किंमतींत जो वाढावा देतें तो विक्रेत्याला तें फुकट देतें.

## दोघांनाही नफा होतो ?

या दोन मतांचें आपण आतां पृथक्करण करूं. "व्यापार आणि सरकार" या निबंधांत कॉंडिलॅक हा लेखक लिहितो, "मालाच्या खरेदीविक्रींत सारख्याच मूल्याची देवघेव होते हें खरें नव्हेंच.... या उलट गोष्ट खरी आहे. देवघेवीचा करार करणाऱ्या पक्षांपैकीं प्रत्येक-जण कमी देतो व अधिक घेतो. कारण खरोखर सारख्या मूल्यांची देवघेव जर झाली असती तर देवघेव करणाऱ्या पक्षांत कोणालाच नफा झाला नसता. पण दोघांनाहि नफा होतो, अथवा व्हायला हवा. तुम्ही 'कां ?' म्हणून विचाराल. याचें उत्तर असें कीं वस्तूचें मूल्य केवळ आपणास जी तिची गरज असते तीवर अवलंबून असते. एका

माणसाला जें अधिक मूल्यवान वाटेल तेंच दुसऱ्याला कमी मूल्यवान वाटेल. दुसऱ्या एखाद्या वस्तूसंबंधानें यां उलट प्रकार असेल. आम्हांला निरुपयोगी अशी एखादी वस्तु देऊन टाकून आपल्याला उपयुक्त अशी एखादी वस्तु आपण घेत असतों. हेंच वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे कमी देऊन अधिक मिळविण्याची इच्छा आपण करीत असतों ....”

## कॉंडिलॅकचा घोटाळा

गणिती युक्तीवादाचें काय नमुनेदार उदाहरण आहे हें! दोन माणसें जेव्हां कशाची तरी देवघेव करतात तेव्हां प्रत्येकजण दुसऱ्याला कमी देऊन अधिक घेतो काय? त्याचा अर्थ असा होईल कीं मी जर शिंप्याकडून ५ डॉ. ला एक कोट घेतला तर शिंप्याच्या हातीं तो कोट असेपर्यंत ५ डॉ. पेक्षां त्याची किंमत कमी असते पण माझ्या हातीं तो येतो तेव्हां त्याचें मूल्य वाढून तो ५ डॉ. किंमतीचा होतो. पण या गडबडगुंड्यानें मालाचें मूल्य आमच्या गरजेवर अवलंबून असतें हा सिद्धांत सिद्ध होण्याच्या जवळपास आपण जात नाहीं. कारण जरी कोट हा विक्रेत्याला असतो त्यापेक्षां गिऱ्हाइकाला अधिक मूल्यवान असतो तरी पैसाहि गिऱ्हाइकाला असतो त्यापेक्षां विक्रेत्याला अधिक मूल्यवान असतो. (याचा अर्थ सारख्या वस्तूंचीच देवघेव झाली असा गणिताच्या हिशेबानें होतो. उपयोगमूल्य व विनिमय-मूल्य ह्यांचा घोटाळा कॉंडिलॅकनें केला असल्यामुळें त्यानें असें लिहिलें आहे. हा फरक पुढें सांगण्यांत येईल.)

## एकदां विक्रेता, दुसऱ्यांदा गिऱ्हाईक

बरें, विक्रीच्या वस्तू त्यांच्या मूळ मूल्याहून अधिक किंमतीस विकल्या जातात असें मानलें तर त्यावरून यापेक्षांहि अधिक चमत्कारिक

अनुमानें निघतात. आपण असें समजूं कीं विक्रेत्याला कांहीं विशेष अनुकूल परिस्थिती मिळाल्यामुळें २५ डॉ. चा माल त्याला २७·५० डॉ. म्हणजे १० टक्के अधिक किंमतीला विकतां आला. विक्रेत्याला याप्रमाणें १० टक्के वाढावा मिळाला. पण एकदां विक्रेता असणारा हा माणूस लवकरच पुन्हा गिऱ्हाईक होतो. तिसऱ्या एका विक्रीच्या वस्तूच्या मालकाशीं त्याची गांठ पडते. हा तिसरा विक्रेताहि आतां या वेळीं गिऱ्हाईक झालेल्या पहिल्या विक्रेत्याला १० टक्के वाढावा घेऊन माल विकतो. म्हणजे आमच्या पहिल्या माणसाला विक्रेता या नात्यानें २·५० डॉ. वाढावा मिळाला आणि गिऱ्हाईक या नात्यानें त्याचें २·५० डॉ. नुकसान झाले. एकंदरींत वस्तुस्थिति अशी होते कीं प्रत्येक विक्रीमालाचा मालक आपला माल १० टक्के वाढावा घेऊन गिऱ्हाइकाला विकतो. पण याचा अर्थ मूळ मूल्यालाच मालाची खरेदी-विक्री होते असा आहे; मालांच्या किंमती वाढतात पण त्यांचे खरेखुरे मूल्यसंबंध कायमच राहतात.

आतां आपण असें समजूं कीं गिऱ्हाइकाला अनुकूल परिस्थिति मिळाल्यामुळें मूळ मूल्याहून कमी किंमतीला माल मिळतो, हेंच गिऱ्हाइक दुसऱ्या खेपेस स्वतः विक्रेता होतें वगैरे मुद्दा वाचकांना आतां लक्षांत येईलच. गिऱ्हाईक या नात्यानें १० टक्के जी त्याला सूट मिळाली ती विक्रेता या नात्यानें त्याची गेली. सर्व गोष्टी पूर्वींप्रमाणेंच कायम राहिल्या.

## फुकट पैशानें मालखरेदी ?

यावर कोणी असा आक्षेप घेतील कीं ' पूर्वींचा तोटा अशा रीतीनें भरून निघणें ही गोष्ट एकदां जो गिऱ्हाईक असतो तो पुन्हां विक्रेता होईल तरच शक्य आहे; पण अशी कांहीं माणसें समाजांत असतात

कीं त्यांच्याजवळ विकायला कांहीं नसतेंच.' असा भ्रम असणारे लोक 'जो खरेदी करतो पण विकीत नाहीं असा समाजामध्यें एक वर्ग आहे' असें मानतात. म्हणजे हा वर्ग धनोत्पादन न करतां उपभोग घेणारा असला पाहिजे. पण असा वर्ग ज्या पैशाच्या बळावर नेहमीं खरेदीच करीत राहील तो पैसा त्या वर्गानें मालाच्या मालका-पासूनच मिळवला पाहिजे आणि तो अर्थातच मोफत मिळवला पाहिजे. मग तो कायदेशीर अथवा बेकायदेशीर हक्कानें कसाहि मिळो. अशा वर्गाला मालाच्या मूल्याहून अधिक किंमतीला माल विकणें म्हणजे पूर्वीं त्याला दिलेला फुकटचा पैसा अंशतः कपटानें वसूल करणें होय. उदाहरणार्थ प्राचीन काळीं आशियामायनरांतील शहरें रोमच्या सर-कारला खंड देत. हा पैसा घेऊन रोमन लोक आशियामायनरांतील लोकांकडून माल खरेदी करीत. हा माल त्यांना मूळ मूल्याहून महाग मिळत असे. आशियामायनरचे लोक माल विकतांना मालाच्या मूल्या-हून अधिक किंमत रोमन लोकांना फसवून घेत आणि अशा प्रकारें आपण मोफत दिलेल्या पैशांतला अंश वसूल करीत. पण दीर्घकाळाचा हिशेब केला तर आशियामायनरच्या लोकांची फसवणूक होतच असे. ते रोमन लोकांना जो माल देत त्याची त्यांना मिळणारी किंमत त्यांनींच आधी व मागाहून दिलेल्या पैशांतून त्यांना मिळे. संपत्ती वाढविण्याचा किंवा वाढावा उत्पन्न करण्याचा हा मार्ग नव्हे.

## खरेदीविक्रीनें मूल्य वाढत नाहीं

एखादा मालक व्यक्तिशः फाजील किंमतीला माल विकून स्वतःला श्रीमंत बनवूं शकेल. **अ** हा मालक **ब** आणि **क** या त्याच्या सह-काऱ्यांना फसवूं शकेल. **अ** **ब**ला १० डॉ. ची दारू देऊन १२·५० डॉ. चें धान्य घेईल. अशा प्रकारें **अ**नें आपल्या १० डॉ. चें रूपांतर

१२·५० डॉ. मध्यें केलें. अथवा वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे कमी पैशांतून अधिक पैसे काढले; पण या हकीगतीची आणखी खोल तपासणी करूं. हा विनिमय होण्यापूर्वी **अ**जवळ १० डॉ. ची दारू होती आणि **ब**जवळ १२·५० डॉ. चें धान्य होतें. म्हणजे एकंदर मूल्य दोघांजवळ मिळून २२·५० डॉ. होतें. विनिमय झाल्यानंतर दोघांजवळ मिळून २२·५० डॉ. मूल्यच राहिलें. खरेदीविक्रीच्या व्यवहारांत मूल्य एक फार्दिंगनेंहि वाढलें नाहीं. **अ** आणि **ब** यांच्या वाट्यांचें प्रमाण फक्त उलटें झालें. **अ**नें विनिमयानें आपल्या व्यवहारांतलें कपट न झाकतां **ब**चे फक्त २·५० डॉ. चोरले असते तरीहि ही परिस्थिति अशीच राहिली असती. वाटणीचें प्रमाण बदलावें म्हणून खरेदी विक्रींतील मालाचें मूल्य वाढूं शकत नाहीं. एखाद्या ज्यूनें १८ व्या शतकांतील तांब्याचें नाणें सोन्याचें नाणें घेऊन विकलें म्हणून कांहीं त्या देशांतल्या मूल्यवान धातू वाढत नाहींत. कोणत्याहि एका राष्ट्रांतील सर्व भांडवलदार एकमेकांकडून अधिक किंमत घेऊं शकत नाहींत.

याप्रमाणें या हकीगतींत कितीहि गिरक्या घेतल्या अगर पिरगळे दिले तरी वस्तू तितकीच्या तितकीच राहते. सारख्या मूल्याच्या वस्तूंचा विनिमय झाल्यास वाढावा उत्पन्न होणारच नाहीं. आणि विषम मूल्यांच्या वस्तूंचा विनिमय झाला तरी वाढावा (सर्प्लस व्हॅल्यू=वरकड मूल्य) उत्पन्न होऊं शकत नाहीं. सारांश वस्तूंचा विनिमय अथवा क्रयविक्रय करण्यानें वस्तूचें मूल्य वाढत नाहीं.

## खरेदीविक्री सारख्यांचीच होते

माल विकल्यानंतर मालाची जी किंमत वाढलेली दिसते ती विक्रीपासून मिळणेंच शक्य नाहीं. मालाची किंमत आणि त्याचें मूल्य यांत कमी अधिकपणा आहे म्हणून किंमत वाढली असाहि खुलासा करतां येणार

नाहीं. किंमत जर मूल्याहून कमी अधिक असेल तर ती मूल्याबरोबर आणली पाहिजे. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें तर एखादे वेळीं मूल्याहून अधिक किंमत वस्तूच्या विक्रीमध्यें मिळाली तर तो व्यवहार अपवादात्मक मानला पाहिजे. असले अवांतर मुद्दे उपस्थित करून आपला घोटाळा होऊं देऊं नये. असा सोलीवपणें सिद्धांत मांडण्याची पद्धत केवळ शास्त्रीय ज्ञानाच्या क्षेत्रांतच आहे असें नव्हे. बाजारभावाचे एकसारखे होणारे चढ व उतार हे एकमेकांची वजावाट करून टाकून आपलें अंगभूत नियामक तत्त्व होऊं शकेल असा एक सरासरी बाजारभाव उत्पन्न करतात. हें नियामक तत्त्व अथवा हा नियामक बाजारभाव व्यापाऱ्याला अथवा धंदेवाल्याला दीर्घकालीन व्यवहारांत मार्गदर्शक ठरतो. याप्रमाणें व्यापाऱ्याला हें माहीत असतें कीं दीर्घकाळाचा विचार केल्यास विक्रीचा माल हा सरासरी किंमतीसच विकला जातो. त्याला कमी अथवा अधिक किंमत मिळत नाहीं. म्हणून मूळ मूल्याइतक्या किंमतीलाच माल विकला जातो असें धरून चालून नफ्याचा म्हणजे वाढाव्याचा उगम कोठें आहे, तें सांगतां आलें पाहिजे. पण अशा परिस्थितींत वाढाव्याचा उगम उत्पादनाच्या प्रक्रियेंतच होतो हें उघड दिसतें. ज्या मिनिटाला माल पूर्ण तयार होऊन पहिल्या विक्रेत्याच्या हातून सुटतो त्याचवेळीं तो शेवटचें गिऱ्हाईक म्हणजे मालाचा भोक्ता जी किंमत देईल तितक्या किंमतीचा असला पाहिजे. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे विक्रीमालाचें मूल्य उत्पादन खर्चाहून अधिक असलें पाहिजे. उत्पादनाचें कार्य चालू असतांच त्या मालांत एक नवें मूल्य निर्माण झालें असलें पाहिजे.

येथें आपणांस विक्रीमालांतून मूल्य कसें निर्माण होतें ह्या प्रश्नाची चर्चा आतां केली पाहिजे.

---

# विक्रीमाल : : ३*

## भांडवलशाही संपत्तीचें स्वरूप

ज्या समाजांत भांडवलशाही उत्पादनपद्धति रूढ असते तेथील संपत्ति विक्रीमालाच्या स्वरूपांत आढळून येते. विक्रीमाल हा आपल्या शरीराबाहेरची एक वस्तु आहे. त्याच्या अंगभूत गुणधर्मानें माणसाची कोणती ना कोणती गरज तो भागवीत असतो. ही गरज भुकेची असो अथवा हौसेची असो, हा फरक आर्थिक दृष्ट्या महत्त्वाचा नाहीं. तसेंच विक्रीची ही वस्तू प्रत्यक्ष चरितार्थाचें साधन म्हणून आपली गरज भागविते कीं धनोत्पादनाचें साधन म्हणून आपली गरज भागविते याचाहि विचार येथें आपणांस कर्तव्य नाहीं.

प्रत्येक उपयुक्त वस्तु उदाहरणार्थ लोखंड, कागद वगैरे वस्तु-गुण व परिमाण या दोन दृष्टींनीं पाहतां येते. वस्तु ही अनेक गुण-धर्मांचा समवाय असते. आणि म्हणून ती विविध प्रकारांनीं उपयोगी पडते. वस्तूंचे निरनिराळे उपयोग शोधणें हें काम इतिहासाचें आहे.

* कॅपिटल, खंड १, प्रकरण १ व २.

तसेंच या उपयुक्त वस्तूंचें परिमाण मोजण्याचीं निरनिराळीं सर्वमान्य मापें कोणतीं हें ठरविणें हेंहि इतिहासाचें काम आहे. या मापांत जो फरक दिसून येत असतो तो मालाच्या स्वरूपांतील भिन्नभिन्नतेमुळें असतो अथवा कांहीं अंशीं प्रघातानें होतो.

## वस्तूंचें उपयोगमूल्य व विनिमयमूल्य

वस्तूचा जो उपयोग तें तिचें उपयोगमूल्य होय. पण हें उपयोगमूल्य म्हणजे कांहीं हवेंतली वस्तु नव्हे. वस्तूच्या अंगभूत गुणांनींच उपयोगमूल्य हें मर्यादित असल्यानें वस्तूहून भिन्न असें अस्तित्व त्याला असत नाहीं. लोखंड, धान्य अथवा हिरा अशा प्रकारचा विक्रीमाल हा एक भौतिक पदार्थ आहे. आणि या नात्यानें तो कांहीं तरी उपयुक्त वस्तु असतो, तो उपयोगमूल्य असतो. वस्तूच्या अंगीं उपयुक्त गुण उत्पन्न करण्यास कितीहि श्रम लागोत उपयोगमूल्य या वस्तुगुणाचा त्या श्रमाशीं कोणताहि संबंध नाहीं. आपण जेव्हां उपयोगमूल्यासंबंधानें बोलतों तेव्हां त्यांच्या विशिष्ट परिमाणाचा विचार आपण करीत असतों; १२ घड्याळें, १२ यार्ड रेशमी कापड, १०० टन लोखंड, असें आपण बोलत असतों. वस्तूंचीं उपयोगमूल्यें हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे. विक्रीमालाच्या व्यापारी ज्ञानाचें तें क्षेत्र आहे. उपयोगमूल्यें प्रत्यक्ष उपयोगानें अथवा उपभोगानेंच आपल्या पदरांत पडतात. तसेंच आपल्या सर्व धनाचें सार-सर्वस्वहि हीं उपयोगमूल्येंच असतात. मग समाजाचें स्वरूप कोणतेंहि असो. आपण ज्या समाजव्यवस्थेचा विचार करायला बसलों आहों त्या समाजव्यवस्थेंत हीं उपयोगमूल्यें विनिमयमूल्याचे सांठे असतात.

सकृद्दर्शनीं विनिमयमूल्य हा संख्यावाचक संबंध दिसतो. एका प्रकारचीं उपयोगमूल्यें दुसऱ्या प्रकारच्या उपयोगमूल्याशीं विशिष्ट

प्रमाणांत देवघेव केलीं गेलीं आहेत आणि हा संख्यात्मक संबंध भिन्नभिन्न कालस्थलाप्रमाणें एकसारखा बदलतो आहे असें दिसून येतें. म्हणून विनिमयमूल्य ही अगदीं एक अचानक घडणारी आणि केवळ सापेक्ष बाब आहे असें वाटतें. आणि म्हणून 'वस्तूचें अंगभूत विनिमयमूल्य' ही भाषाच वदतोव्याघातासारखी ठरते. आतां या प्रश्नाचा आणखी थोडा खोल विचार करूं.

## गहूं व कापड यांत सामान्य काय ?

असें समजा कीं १ टन गहू, हे कांहीं बुटाचा रंग, कांहीं लांबीचे रेशमी कापड अथवा कांहीं वजनाचें सोनें यांच्याशीं देवघेवीस काढले; अशा अनेक प्रकारच्या निरनिराळ्या परिमाणांतल्या वस्तूंशीं त्यांचा विनिमय केला. गव्हाला याप्रमाणें अनेक विनिमयमूल्यें आहेत असें यावरून दिसतें. पण ज्या अर्थीं बुटाचा रंग, रेशमी कापड, सोनें वगैरे विक्रीच्या वस्तु ह्या १ टन गव्हाच्या प्रतिनिधी असतात त्याअर्थीं त्यांच्याहि ठिकाणीं विनिमयमूल्य असलेंच पाहिजे. यावरून एक गोष्ट निश्चित होतें कीं अमुक एका विक्रीमालाशीं तुल्य अशीं जीं विनिमयमुल्यें ठरतात त्या सर्वांच्या ठिकाणीं कांहींतरी एकसारखी सर्वसाधारण गोष्ट असते. दुसरी बाब अशी कीं विनिमयमूल्याच्या मागें कांहींतरी असलें पाहिजे—हें जें कांहीं मागें असेल त्याचें विनिमय-मूल्य हें फक्त बोधचिन्ह असतें.

आतां गहूं आणि लोखंड या दोन वस्तु आपण घेऊं. या दोन वस्तूंचा विनिमय कोणत्याहि प्रमाणांत होवो त्या दोघींचें समीकरण मांडून दाखवितां येणें केव्हांहि शक्य आहे. या समीकरणांत धान्याचें अमुक इतकें परिमाण हें लोखंडाच्या अमुक इतक्या परिमाणाशीं

समान आहे असें म्हणतां येतें. उदाहरणार्थ १ टन गहूं बरोबर २ टन लोखंड असें आपण समजूं. या समीकरणाचा अर्थ काय? त्याचा अर्थ असा कीं एकाच मापाचा एक गुण या वस्तूंच्या ठिकाणीं म्हणजे १ टन गहूं आणि २ टन लोखंड यांच्या ठिकाणीं आहे. म्हणजे या दोन वस्तु तिसऱ्या कोणत्या तरी वस्तूशीं समान आहेत. ही तिसरी वस्तु म्हणजे गहूंहि नव्हे व लोखंडहि नव्हे. पण गहूं व लोखंड या दोन्हींपैकीं कोणाच्याहि बदली ठेवतां येईल अशी ती तिसरी वस्तु आहे.

## दोन मूल्य-प्रकारांतील भेद

गहूं व लोखंड या दोघांच्याहि ठिकाणीं असणारी ही जी तिसरी वस्तू ती त्या वस्तूंचा रासायनिक अथवा इतर भौतिक गुणधर्म नव्हे. असे गुणधर्म वस्तूंचा उपयोग या नात्यानें आपलें लक्ष वेधतात. पण वस्तूंचा जो विनिमय होतो त्यांत उपयोगमूल्य बाजूस ठेवून विचार केला जातो. एक उपयोग मूल्य हें दुसऱ्या उपयोग-मूल्यासारखेंच आहे; फक्त दोन्हींचें परिमाण योग्य असलें म्हणजे झालें असें आपण मानतों; बार्बन् म्हणतो, "एक प्रकारचा कपडा हा दुसऱ्या प्रकारच्या कपड्यासारखाच असतो. दोहोंची किंमत सारखी असली म्हणजे झालें. सारख्या मूल्यांच्या वस्तूंत अंतर अथवा भिन्नता नसतेच .... .... १०० पौंड किंमतीचे शिसें अथवा लोखंड हें १०० पौंड किंमतीचें सोनें अथवा चांदी यांच्या इतक्याच मूल्याचें आहे." उपयोगमूल्यें या नात्यानें वस्तूंचे गुणधर्म वेगवेगळाले असतात. पण विनिमयमूल्यें या नात्यानें त्यांचीं परिमाणें वेगवेगळीं असतात. त्यांच्या उपयोगमूल्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं.

## मानवी श्रम हे सामान्य

तर मग आपण जर मालाचीं उपयोगमूल्यें विचारांतून काढून टाकूं तर सर्व विक्रीमालांच्या ठिकाणीं एक सर्वसाधारण गुण असलेला दिसून येतो. तो गुण म्हणजे हा सर्व माल श्रमानें निर्माण करण्यांत आला आहे—तो श्रमजन्य आहे हा होय. परंतु श्रमानें उत्पन्न झालेला माल या नात्यानेंहि आपल्या हातीं त्या मालांत फरक झालेला आहे. ज्याप्रमाणें आपण उपयोगमूल्य विचारांतून काढून टाकतो त्याचप्रमाणें उपयोगमूल्याचे आकार व त्याचे भौतिक घटक—ज्यामुळें वस्तूच्या ठिकाणीं उपयोग-गुण निर्माण होतो—त्यांचाहि विचार आपण करीत नाहीं. उदा. टेबल, घर, सूत अथवा दुसरी अशीच कोणतीहि उपयुक्त वस्तू यांची उपयोगांतली विविधता आपण लक्षांत घेत नाहीं. तसेंच यापैकीं एखादा माल सुतारानें, दुसरा गवंड्यानें, तिसरा सूत कातणाऱ्यानें अथवा चौथा अशाच कोणीतरी माणसानें विशिष्ट धनोत्पादकश्रमानें केला हें आपण लक्षांत घेत नाहीं. वस्तूचे उपयुक्त गुण जसे विचारांतून वगळतों त्याचप्रमाणें त्या वस्तूंच्या ठिकाणीं मूर्तरूप पावलेल्या विविध श्रमांची उपयुक्तता आणि त्या श्रमाचें विशिष्ट स्वरूप हेंहि आपण विचारांत घेत नाहीं. म्हणजे वरील सर्व प्रकारच्या वस्तूंतील सर्व प्रकारची भिन्नता आपण नष्ट करून टाकतों. सर्व वस्तु एकाच प्रकारच्या श्रमाच्या—सर्वसामान्य मानवी श्रमाच्या बनलेल्या आहेत असें आपण ठरवितों.

आतां या प्रत्येक वस्तूंत जें उरलेलें आहे तें काय आहे याचा आपण विचार करूं.—या प्रत्येक वस्तूंत आतां केवळ एक अगोचर (भावरूप) असें एकच सत्य आहे. तें सत्य म्हणजे सजातीय मानवी श्रमाचा केवळ तो एक गोळा होय. श्रमशक्ति कोणत्या प्रकारें खर्च केली आहे याचा विचार लक्षांत न घेतां, फक्त खर्च केलेल्या श्रमशक्तीची ही बेरीज होय.

या वस्तु आतां आपणाला सांगतात तें इतकेंच कीं मानवी श्रमशक्ति त्यांच्या उत्पादनांत खर्च झाली आहे, मानवी श्रमांच्या त्या मूर्ति आहेत. मानवी श्रम या सामाजिक वस्तूचे हे पदार्थ नुसते गोळे आहेत, या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहिल्यास या सर्व वस्तु मूल्यें आहेत असें म्हणावें लागतें.

## श्रमवेळ हें श्रमाचें माप

आपण हें पाहिलें आहे कीं विक्रीच्या वस्तूंचा जेव्हां विनिमय होतो तेव्हां विनिमयमूल्य हें उपयोगमूल्याहून अगदींच स्वतंत्र आहे असें दिसून येतें. पण त्या विक्रीवस्तूंचीं उपयोगमूल्यें आपण लक्षांत न घेतलीं तर वर स्पष्ट केलेलें मूल्यच शिल्लक राहतें. म्हणून वस्तूंचा ज्या ज्या वेळीं विनिमय होतो त्या त्या वेळीं त्यांच्या विनिमयमूल्यामध्यें जें समान राहतें तें त्यांचें मूल्य होय. आपल्या या संशोधनांत पुढें पुढें आपणाला दिसून येईल कीं वस्तूंचीं मूल्यें हीं विनिमयमूल्यांतच व्यक्त होऊं शकतात. तथापि तूर्त विनिमयमूल्य या त्याच्या व्यक्त स्वरूपाचा विचार न करतांच मूल्याचें स्वरूप काय आहे हें आपण समजून घेऊं. उपयोगमूल्य अथवा उपयोगी वस्तु हिला मूल्य असते याचें कारण मानवी श्रमाची ती बनलेली असतें हें होय. मग या मूल्याचें परिमाण कसें मोजावयाचें ? मूल्य निर्माण करणाऱ्या वस्तूचे म्हणजे त्या वस्तूंत असणाऱ्या श्रमाचें परिमाण मोजण्यानेंच त्या वस्तूचें परिमाण मोजतां येईल हें उघड आहे. श्रमाचें परिमाण श्रम करण्यास लागणाऱ्या वेळावरून मोजतात.

## आळसानें मूल्य वाढतें ?

कांहीं लोक असें म्हणतील कीं जर वस्तु निर्माण करण्यावर खर्च होणारा वेळ हाच त्याच्या मूल्याचा मापक असेल तर मजूर हा

जितका अधिक आळशी व अधिक अकुशल असेल तितकी त्यानें केलेली वस्तु अधिक मूल्यवान म्हणावी लागेल. कारण त्याला ती वस्तु निर्माण करण्यास अधिक वेळ लागेल. पण हा युक्तिवाद चूक आहे. कारण मूल्याचें सारसर्वस्व असे जे श्रम ते सजातीय मानवी श्रम असावे लागतात; एकजातीय श्रमशक्ति त्या वस्तूच्या उत्पादनांत जी खर्च होईल ती विचारांत घेतली जाते. एखाद्या समाजानें उत्पन्न केलेल्या सर्व विक्रीमालांच्या मूल्यांची जी बेरीज ती सजातीय मानवी श्रमशक्तीचें फल अशीच मानली जाते. मग त्या सर्व वस्तूंच्या निर्मितींत अनेक कमी अधिक कौशल्याचे श्रम खर्च झालेले असोत. प्रत्येकाचा श्रम हा समाजाची सरासरी अशी जी श्रमशक्ति तिचाच भाग असें मानलें जातें. आणि सर्व भिन्नभिन्न श्रमांना या सरासरी श्रमांत सारखेपणानें समाविष्ट केलें जातें. म्हणजे अमुक एक माल निर्माण करण्याला समाजांतील निरनिराळ्या कौशल्याच्या मजूरांना कमी अधिक वेळ लागला असला तरी त्या सर्वांच्या सरासरीनें जो वेळ निघेल तोच वेळ त्या मालाच्या निर्मितीस लागला असें मानलें जातें. याला ' सामाजिक दृष्ट्या आवश्यक श्रम, ' ( सोशिअली नेसेसरी लेबर ) असें म्हणूं. उत्पादनाच्या सर्वसामान्य परिस्थितींत आणि अमूक एक वेळीं उत्पादनाचा सरासरी वेग आणि सरासरी चातुर्य जें असेल त्याच्या सहाय्यानें तो माल निर्माण करण्यास लागणारा जो वेळ तो ' सामाजिक दृष्ट्या खर्च झालेला अवश्य असा श्रम-वेळ ' ( सोशली नेसेसरी लेबर-टाईम ) होय. इंग्लंडांत वाफेच्या शक्तीवर चालणारे हातमाग सुरू झाल्यावर सुताचें कापड विणण्याचें श्रम बहुधा निम्म्यानें कमी झालें. ज्यांच्या जवळ अजूनहि हातमागच होते त्यांना पूर्वी-इतकाच वेळ लागत असे. पण आतांच्या त्यांच्या एका तासाच्या श्रमाचा जो माल, तो वाफेच्या शक्तीनें माग चालविण्याची पद्धति

सुरूं झाल्यानें सामाजिकदृष्ट्या आवश्यक अशा अर्ध्या तासाचा माल ठरला, आणि म्हणून त्यांची किंमत पूर्वीच्या निम्म्यानें कमी झाली.

## विक्रीमाल हा श्रमाचा गोळा

यावरून आपल्या लक्षांत येतें कीं कोणत्याहि वस्तूच्या मूल्याचें परिमाण त्या वस्तूच्या उत्पादनास लागणाऱ्या सामाजिकदृष्ट्या आवश्यक अशा श्रमाच्या परिमाणानें, अथवा त्या श्रमास लागणाऱ्या वेळानें ठरतें. प्रत्येक वस्तु विक्रीची वस्तु या दृष्टीनें तिच्या सबंध वर्गातील वस्तूंचा सरसकट नमुना म्हणून मानली जाते. म्हणून ज्या वस्तूंच्या उत्पादनांत श्रमाचें सारखेंच परिमाण खर्च झालेलें असतें, अथवा ज्यांच्या उत्पादनास सारखाच वेळ लागलेला असतो त्यांचें मूल्य सारखें असतें. एका वस्तूच्या उत्पादनास लागणाऱ्या वेळाचें दुसऱ्या वस्तूच्या उत्पादनास लागणाऱ्या वेळांशीं जें प्रमाण असतें तेंच पहिल्या वस्तूच्या मूल्याचें दुसऱ्या वस्तूच्या मूल्याशीं असतें. मूल्यें या नात्यानें सर्व विक्रीच्या वस्तु या श्रमवेळाचे निरनिराळ्या मापाचे गोळे होत.

## उत्पादन वेळ बदलत जातो

म्हणून जर वस्तूच्या उत्पादनास लागणारा वेळ नेहमीं सारखाच राहील तर त्या वस्तूंचें मूल्यहि सारखेंच राहील. पण वस्तूच्या उत्पादनास लागणारा हा वेळ श्रमाची उत्पादनशक्ति जसजशी बदलते तसतसा बदलत जातो. श्रमाची उत्पादनशक्ति अनेक परिस्थितीमुळें बदलत असते. उदा. अनेक कामगारांचें उत्पादनाचें सरासरी कौशल्य, भौतिक शास्त्रांची परिस्थिति, त्या भौतिक शास्त्रांचा व्यावहारिक उपयोग, धनोत्पादनाची केलेली सामाजिक संघटना, धनोत्पादन-साधनांचें सामर्थ्य व परिमाण, भौतिक परिस्थिति इत्यादि गोष्टी श्रमाची उत्पादकता

कमी-अधिक करीत असतात. ८ बुशेल गव्हावर चांगल्या हंगामांत जितके श्रम खर्चावे लागतील तितकेच श्रम वाईट हंगामांत ४ बुशेल गव्हावर खर्च करावे लागतील. खूप धातु असणाऱ्या खाणींतून कांहीं एका श्रमानें जितकी धातु काढतां येईल, त्याहून कमी धातु तितक्याच श्रमानें दरिद्री खाणींतून काढतां येईल. भूपृष्ठावर हिरे फार थोडे सांपडतात म्हणून त्यांच्या शोधाला सरासरीनें श्रमवेळ फारच खर्च होतो. म्हणून अगदीं थोड्या हिऱ्यांत फारच फार श्रम साठवलेले असतात. सोन्याच्या विक्रींत पूर्ण मूल्य बहुधा मिळतच नसावें असें जॅकॉब म्हणतो. हिऱ्यांचे बाबतींत ही गोष्ट अधिकच खरी आहे.

## श्रमसामर्थ्य व मूल्य यांचें व्यस्त प्रमाण

ईश्र्वेजच्या मतानें ब्राझील येथील हिऱ्यांच्या खाणींतून १८२३ सालीं संपलेल्या ८० वर्षांत निघालेल्या हिऱ्यांनीं, साखर आणि कॉफी यांच्या ब्राझीलमधल्याच मळ्यांत १ $\frac{1}{2}$ वर्षांत जो माल झाला त्या मालाच्या किंमतीइतकी किंमतही मिळवली नाहीं. त्या हिऱ्यांचे उत्पादनांत कितीतरी अधिक श्रम खर्च झाले होते. म्हणून त्यांचें मूल्यहि कितीतरी अधिक होतें. पण विक्रींत त्याची योग्य किंमत आली नाहीं. खाणी यापेक्षां अधिक समृद्ध असत्या तर तेवढ्याच श्रमांत कितीतरी अधिक हिरे मिळाले असते आणि त्यांचें मूल्य उतरलें असतें. जर थोडे श्रम खर्च करून आपणाला कोळशाचा हिरा बनवितां येईल तर त्याची किंमत विटांपेक्षांहि उतरेल. सामान्यतः बोलायचें म्हणजे श्रमांचें धनोत्पादनसामर्थ्य जितकें अधिक तितका एखाद्या वस्तूच्या उत्पादनास लागणारा वेळ कमी, म्हणून त्या वस्तूमध्यें खर्च होणारे श्रमहि कमी आणि तिचें मूल्यहि कमी असते; याच्या उलट, श्रमाचें उत्पादन-सामर्थ्य जितकें कमी तितका त्या वस्तूच्या उत्पादनास लागणारा वेळ अधिक

असतो, व त्या वस्तूचें मूल्य अधिक असतें. म्हणून वस्तूचें मूल्य तिच्या उत्पादनास लागणाऱ्या श्रमाच्या परिमाणाच्या समप्रमाणांत आणि त्या श्रमाच्या उत्पादन-सामर्थ्याच्या व्यस्त प्रमाणांत बदलतें.

## मूल्यचर्चेचा गोषवारा

वस्तूला मूल्य नसूनहि ती उपयोगमूल्य होऊं शकते. एखादी उपयुक्त वस्तु श्रमावांचून निर्माण होते त्यावेळीं असें घडतें. हवा, न कसलेली जमीन, नैसर्गिक कुरणें इत्यादि, या विनामूल्य अशा उपयुक्त वस्तु होत. वस्तु उपयुक्त असेल, माणसाच्या श्रमानेंहि उत्पन्न झालेली असेल, पण ती विक्रीचा माल नसूं शकेल. जो स्वतःच्या श्रमानें वस्तु निर्माण करून आपल्या गरजा भागवितो तो उपयोगमूल्यें करतो, पण विक्रीमाल निर्माण करीत नाहीं. विक्रीमाल निर्माण करण्यासाठीं त्यानें उपयोगमूल्यें निर्माण करूनच भागत नाहीं तर दुसऱ्यास उपयोगी अशीं मूल्यें, म्हणजे सामाजिक उपयोगमूल्यें निर्माण करावी लागतात. शेवटचा मुद्दा म्हणजे वस्तु उपयुक्त असल्यावांचून ती मूल्य होऊं शकत नाहीं. वस्तु निरुपयोगी असेल तर तिच्यासाठीं झालेले खर्चहि निरुपयोगी होत. कारण त्या श्रमांना श्रम म्हणून हिशेबांत धरले जात नाहीं व अर्थात त्यापासून मूल्यहि निर्माण होत नाहीं.........

× × × × ×

# विक्रीमालाचें गूढ

## टेबल पारलौकिक झालें !

सकृद्दर्शनीं विक्रीमाल हा अगदीं सहज समजण्यासारखी साधी वस्तु दिसतो. पण त्याचें पृथक्करण करूं लागलें तर खरोखर ती एक

चमत्कारमय वस्तु आहे. आध्यात्मिक व धार्मिक जगांतल्या गूढ गोष्टी त्यामध्यें दिसून येतात. उपयोगमूल्य या दृष्टीनें विक्रीमालांत गूढ असें कांहीं नाहीं. मग आपण त्यांचे मानवी गरजा भागविणारे गुण लक्षांत घेतले काय, अथवा ते गुण मानवी श्रमाचीं फळें आहेत या दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें काय, दोन्हीहि सारखेंच. माणूस आपल्या उद्योगानें निसर्गदत्त साहित्याचें रूप आपल्याला उपयोगीं होईल अशा-प्रकारें बदलतो हें सूर्यप्रकाशाइतकें स्वच्छ दिसतें. उदा. लाकडाचें रूप बदलून आपण त्यापासून टेबल करतों. आपले सर्व श्रम जमेस धरले तरी टेबल हें अखेर लांकूड असतेंच, पण विक्रीमाल म्हणून तें टेबल जेव्हां आमच्यासमोर येतें तेव्हां त्याचें स्वरूप एकदम कांहीं तरी पारलौकिक होतें. तें केवळ जमीनीवर आपल्या उभें राहिलेलें असतें एवढेंच नव्हे तर इतर सर्व विक्रीमालाशीं त्याचें जें नातें उत्पन्न होतें त्या नात्याच्या दृष्टीनें तें आपल्या डोक्यावर उभें राहतें. आणि आपल्या लांकडी डोक्यांतून अचाट व आश्चर्यकारक कल्पना निर्माण करतें.

## श्रमाचें सामाजिक स्वरूप

विक्रीवस्तूचें गूढ स्वरूप याप्रमाणें तिच्या उपयोगमूल्यांत नसतें. तसेंच तें मूल्याचें जे घटक असतील त्यांच्या स्वरूपांतहि असत नाहीं. कारण उपयुक्त श्रम हे कितीहि विविध प्रकारचे असोत धनोत्पादक व्यवहार कितीहि भिन्न भिन्न प्रकारचा असो, कोणतेहि मानवी श्रम हे मानवी शरीराचे असतात; शारीरिक क्रिया—मग ती प्रत्येकीं कोण-त्याहि स्वरूपाची असो—ती मनुष्याचा मेंदू, ज्ञानतंतु, मज्जातंतु इत्यादींच्या व्ययानें होत असते. दुसरी गोष्ट अशी कीं मूल्याचें संख्यात्मक स्वरूप निश्चित करण्याला अवश्य गोष्ट म्हणजे जी श्रम-

वेळ, अथवा श्रमाचें परिमाण त्यासंबंधानें संख्या व गुण असा उघड उघड फरक लक्षांत येतो. समाजाच्या कोणत्याहि अवस्थेंत चरितार्थ-साधनाच्या निर्मितीस लागणारा श्रमवेळ हा मानवजातीच्या आस्थेचा विषय असतो. अर्थात समाजविकासाच्या सर्वच अवस्थांमध्यें सारखीच आस्था माणसाला या श्रमवेळेबद्दल असतेच असें नाहीं. शेवटचा मुद्दा असा कीं माणसें ज्यावेळीं एकमेकांसाठीं काम करूं लागतात त्यावेळीं त्यांच्या श्रमास सामाजिक स्वरूप येतें.

## गूढता कां यावी

असें आहे तर मग श्रमजन्य वस्तूला विक्रीमालाचें स्वरूप येतांच त्यांत त्याला गूढ स्वरूप कां येतें ? या विक्रीमालाच्या विशिष्ट रूपा-मुळेंच हें गूढ स्वरूप येतें. सर्व विक्रीच्या वस्तु हीं सर्व एकसारखींच मूल्यें असल्यामुळें त्यांच्या रूपानें व्यक्त होणारे श्रम हेहि सारखेच असतात. त्या वस्तु निर्माण करण्यास लागणाऱ्या वेळानें मोजली जाणारी त्यांची शक्ति त्या श्रमजन्य वस्तूंच्या मूल्याचें रूप धारण करतें. उत्पाद-कांचे परस्परसंबंध-ज्यामुळें त्यांच्या श्रमाचें सामाजिक स्वरूप निश्चित होते ते-वस्तूंच्यामधील सामाजिक नात्याचें रूप धारण करतात.

विक्रीमाल ही गूढ वस्तु वाटतें याचें कारण तिच्या ठिकाणच्या मानवी श्रमांचें सामाजिक स्वरूप त्या श्रमांच्या मालावर गोचरपणें उमटविलेलें दिसतें. कारण धनोत्पादकांचा त्यांच्या एकंदर श्रमाशीं असलेला जो सामाजिक संबंध तो उत्पादका उत्पादकांत आहे असें न दिसतां त्या वस्तूवस्तूमध्यें आहे असें दिसतें. यामुळेंच श्रमजन्य माल हा विक्रीमाल होतो; ज्याचे गुण इंद्रियांना एकाचवेळीं गोचर व अगोचर असतात अशी सामाजिक वस्तु तो होतो. एखाद्या वस्तू-पासून येणारा प्रकाश आपणाला जो दिसतो तो डोळ्याच्या मज्जा-

तंतूचा स्वतःचाच कांहींतरी खेळ आहे असा दिसत नसून डोळ्याच्या बाहेर स्वतंत्रपणें असणारी कांहींतरी वस्तु आहे असा दिसत असतो.

## धार्मिक जगाशीं सादृश्य

पण पाहण्याच्या क्रियेंत निदान एका वस्तूपासून दुसऱ्या वस्तूकडे प्रकाशाची गती घडली आहे. बाहेरच्या एका वस्तूकडून डोळ्याकडे प्रकाश आला आहे. एका शरीरी वस्तूचा दुसऱ्या शरीरी वस्तूशीं संबंध आलेला आहे. पण विक्रीमालाची बाब याहून वेगळीं आहे. तेथें विक्री-माल या नात्यानें वस्तूचें अस्तित्व आणि श्रमजन्य वस्तूंचा परस्पर-मूल्यसंबंध—ज्यामुळें सदर वस्तूवर विक्रीमाल असा शिक्का बसतो—या दोहोंचा वस्तूच्या अंगभूत गुणाशीं आणि त्यापासून उत्पन्न होणाऱ्या भौतिक नात्याशीं कांहींहि संबंध येत नाहीं. विक्रीमालाचें बाबतींत माणसामाणसांत वास्तविक सामाजिक संबंध निर्माण झालेला असतो. पण या माणसांना तो संबंध वस्तूवस्तूमध्येंच उत्पन्न झालेल्या संबंधासारखा दिसतो. म्हणून याला सादृश्य दाखवायचें असल्यास भ्रमाचें पटल घातलेल्या धार्मिक जगाच्या क्षेत्रांत आपणांस गेलें पाहिजे. या धार्मिक जगांत माणसाच्या मेंदूतून उत्पन्न झालेल्या कल्पना स्वयंभू जिवंत वस्तु असल्यासारख्या भासतात; त्यांचा पर-स्परांशींहि संबंध आहे व सर्वांचा मिळून मानववंशाशींहि संबंध आहे असें दिसतें. अशीच गोष्ट माणसाच्या हातांनीं तयार झालेल्या विक्री-मालाच्या बाबतींत घडून येत असते. यालाच माणसाच्या श्रमानें उत्पन्न झालेल्या वस्तूस विक्रीमालाचें स्वरूप येतांच तिला चिकटवि-ण्यांत येणारी गूढता ( फेटिश ) असें मी म्हणतो. विक्रीमालाच्या उत्पादनक्रियेशीं ही अभेद्यपणें संलग्न असते.

वर दिलेल्या पृथक्करणावरून कळून येईल कीं विक्रीमालाच्या

अंगच्या या गूढतेचें मूळ तो माल उत्पन्न करण्याच्या श्रमाचें जें विशिष्ट सामाजिक स्वरूप आहे त्यांत असतें.

## वैयक्तिक श्रमास येणारें सामाजिक स्वरूप

सामान्यतः सांगावयाचें म्हणजे उपयुक्त मालांना विक्रीमालाचें स्वरूप येतें याचें कारण विक्रीमाल होणाऱ्या ज्या वस्तू त्या उत्पन्न करण्याचें काम खाजगी व्यक्तींनीं अथवा व्यक्तीसमूहांनीं एकमेकांपासून स्वतंत्रपणें चालविलें असतें हें होय. या सर्व स्वतंत्र खाजगी व्यक्तींचे जे श्रम त्यांची बेरीज म्हणजेच एकंदर सामाजिक श्रम होत. आपण उत्पन्न केलेल्या वस्तूंचा विनिमय करण्यासाठींच हीं माणसें एकमेकांशीं संबंध ठेवतात, असा विनिमय करण्यापूर्वी त्या व्यक्तींचा संबंध येत नाहीं म्हणून या वस्तु उत्पन्न करणाऱ्या व्यक्तींच्या श्रमाचें विशिष्ट सामाजिक स्वरूप विनिमय क्रियेखेरीज केव्हांहि व्यक्त होत नाहीं. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे ज्यावेळीं विनिमयाची क्रिया वस्तूवस्तूंचा संबंध व तद्वारां अप्रत्यक्षपणें त्या वस्तु निर्माण करणारांचा संबंध स्थापित करते त्यावेळींच विक्रीमाल उत्पन्न करणाऱ्या व्यक्तींचे श्रम हे सामाजिक श्रमाचा भाग आहेत ही गोष्ट स्थापित होते. म्हणून वस्तु निर्माण करण्याचे श्रम करणाऱ्यांना एका व्यक्तीच्या श्रमाचा दुसऱ्या व्यक्तीच्या श्रमाशीं असलेला संबंध हा श्रम करीत असणाऱ्या व्यक्तीव्यक्तीमधील प्रत्यक्ष सामाजिक संबंधासारखा दिसत नसून व्यक्ति-व्यक्तीमधील भौतिकसंबंध आणि वस्तूवस्तूमधील सामाजिक संबंध असें त्याचें स्वरूप त्यांना दिसते. वस्तूंचा ज्यावेळीं श्रमजन्य वस्तु म्हणजे विनिमयमूल्यें—या नात्यानें विनिमय होतो तेव्हांच त्यांना सामाजिक समान दर्जा प्राप्त होतो. ही समानता उपयोगमूल्यें या नात्यानें त्यांच्यांत असणाऱ्या विविधतेहून भिन्न असते.

## श्रमाचें दुहेरी स्वरूप

जेव्हां उपयुक्त वस्तु या विनिमयासाठींच उत्पन्न केल्या जातात तेंव्हां श्रमजन्य वस्तूंचें उपयोगमूल्यें व विनिमयमूल्यें हें वर्गीकरण महत्त्वाचें ठरतें. विनिमयाची पद्धति रूढ झाली म्हणजे प्रत्यक्ष विनिमयापूर्वींच म्हणजे मालाची उत्पत्ति होत असतांना त्या मालाचें विनिमयमूल्य हें स्वरूप लक्षांत घेणें अवश्य होतें. या क्षणापासूनच व्यक्तीचे धनोत्पादक श्रम सामाजिकदृष्ट्या दुहेरी स्वरूप धारण करतात. अमुक एक उपयोगाची वस्तु उत्पन्न करणारे श्रम या नात्यानें त्या श्रमांनीं माणसाची एक सामाजिक गरज भागवावी लागते. आणि याच नात्यानें समाजाच्या सामुदायिक श्रमांचा अच्छेद्य अवयव या नात्यानें त्याला एक स्थान मिळते. हें या श्रमाचें एक स्वरूप. सामाजिक श्रमविभागाची सामाजिक विकासक्रमांत आपोआप उत्पन्न झालेली एक शाखा असें हें स्वरूप असतें. या मानवी श्रमाचें दुसरें स्वरूप म्हणजे, व्यक्तिशः विशिष्ट धनोत्पादक श्रम करणाऱ्याच्या अनेक गरजा-जितक्या प्रमाणांत व्यक्तीव्यक्तींच्या उपयुक्त श्रमांत विनिमय शक्यता निर्माण झालेली असते तितक्या प्रमाणांत-भागल्या जातात, आणि म्हणून प्रत्येक वेगवेगळ्या व्यक्तीचे उपयुक्त श्रम हे इतर सर्व व्यक्तींच्या श्रमाशीं सारख्या दर्जाचे ठरतात. निरनिराळ्या जातींच्या श्रमांना हा सारखेपणा आणण्यासाठीं त्यांची विषमता त्यावेळीं विचारांतून काढून टाकावी लागते किंवा विनिमयाच्या सर्व वस्तु या मानवी श्रमशक्तीनें निर्माण झालेल्या वस्तु असें समच्छेद रूप त्यास द्यावें लागते. व्यक्तींच्या श्रमाचें हें द्विविध सामाजिक स्वरूप, वस्तूंचा विनिमयाचा व्यवहार रोजच्या रोज होऊं लागला म्हणजेच व्यक्तींच्या मनावर ठसतें. अशा प्रकारें वस्तु निर्माण करणाऱ्या श्रमांचे अंगीं सामाजिक दृष्ट्या उपयुक्त

असण्याचा जो गुण असतो ती उपयुक्तता केवळ निर्माण करणाऱ्या-पुरती असून चालत नाहीं, तर ती उपयुक्तता इतरांसाठीं असावी लागते. तसेंच त्याच्या विशिष्ट श्रमाचे ठिकाणीं, इतर सर्व उत्पादकांच्या भिन्न भिन्न प्रकारच्या श्रमाशीं सारखे म्हणजे तुल्य असण्याचा जो गुण असतो तो गुण भिन्न भिन्न उपयोगाच्या वस्तूंच्या ठिकाणीं असणाऱ्या मूल्याचें रूप धारण करतो.

## मूल्य ही सामाजिक क्रिया

यामुळें ज्यावेळीं आपण आपल्या श्रमजन्य वस्तू मूल्यें या नात्यानें एकमेकाजवळ विनिमयासाठीं आणतों त्यावेळीं मानवी सजातिय श्रमाचे घट म्हणून आपण त्यांना एकमेकाजवळ आणत नाहीं; घडतें तें याच्या उलट घडतें. ज्या ज्या वेळीं आपण विनिमयाच्या मार्गानें आपला निर-निराळा माल मूल्यें या नात्यानें समान लेखतों त्या त्यावेळीं त्या मालावर खर्च झालेल्या विविध श्रमास आपण सर्वसामान्य मानवी श्रम या नात्यानें सारखें लेखत असतों. आपणाला याची जाणीवहि नसतें. तरीहि आपण वास्तविक तेंच करीत असतों. मूल्य हें आपण काय आहों याच्या वर्ण-नाची चिठ्ठी कपाळावर लावून घेऊन हिंडत नसतें. उलट मूल्यामुळेंच प्रत्येक श्रमजन्यवस्तु सामाजिक चिन्ह ठरतें. पुढें आपण या चिन्हाचा अर्थ शोधून काढतों; आपल्याच सामाजिक वस्तूंच्या मागें जें गुपित दडलेलें आहे तें आपण समजून घेतों. कारण उपयुक्त वस्तूवर मूल्य असा शिक्का मारणें ही भाषेसारखीच सामाजिक क्रिया आहे.

## अर्थशास्त्रांतला नवा शोध

श्रमजन्य वस्तु या ज्या अर्थानें मूल्यें आहेत असें मानल्या जातात त्या अर्थानें त्या मानवी श्रमांचें व्यक्त स्वरूप होत, हा अली-

कडील शास्त्रीय शोध मानवी विकासांतील नवीन कालखंड सुरू करणारा आहे. पण व्यक्तीव्यक्तींनीं केलेले सामाजिक श्रम हें त्यांचें स्वरूप अदृश्य होऊन त्या वस्तुच परस्परांशीं भौतिक दृष्ट्या संबद्ध आहेत असा खोटा देखावा जो निर्माण होतो तो कांहीं वरील शोधानें नाहींसा केला जात नाहीं. आपण ज्या उत्पादन-प्रकारासंबंधानें म्हणजे विक्रीमालाच्या उत्पादनप्रकारासंबंधानें बोलतों आहों, त्या उत्पादन प्रकारांत खाजगी व्यक्तींचे सामाजिक श्रम परस्परापासून स्वतंत्रपणें केले जातात. हे भिन्न भिन्न श्रम मानवी श्रम या नात्यानें परस्पराशीं सारखे असतात. आणि म्हणून मालाच्या स्वरूपांत ते मूल्य हें रूप धारण करतात. वर 'विनिमय केल्या जाणाऱ्या वस्तु या मानवी श्रमांचे घट असतात' हा जो नवीन शोध म्हणून सांगितला तो शोध लागल्यानंतरहि उत्पादकांना विनिमयांतील वस्तूंचें रूप मूल्य हेंच दिसत असतें. भौतिक शास्त्रांनीं हवेचे निरनिराळे घटक कोणते हें नवीन शोधांनीं सांगितलें असलें तरी हवेचें स्वरूप कांहीं त्यामुळें बदलत नाहीं. तसेंच विनिमयांतील वस्तु या मानवी श्रम आहेत हा शोध लागला तरी उत्पादकांना त्या वस्तु मूल्य आहेत असेंच वाटल्याशिवाय राहात नाहीं.

## वस्तूंचें राज्य माणसावर !

ज्यावेळीं माल उत्पन्न करणारे लोक वस्तूंचा विनिमय करतात त्यावेळीं अमुक एक प्रकारची दुसरी वस्तु आपल्या वस्तूच्या मोबदल्यांत किती मिळेल याच प्रश्नाचा विचार ते करतात. वस्तूंचा विनिमय कोणत्या प्रमाणांत होईल एवढीच फिकीर ते करीत असतात. रूढीनें ज्यावेळीं हें प्रमाण कांहीं एका मर्यादेवर स्थिर होतें तेव्हां तें प्रमाण वस्तूच्या अंगभूत गुणावरूनच स्थिर झालें आहे असें वाटूं लागतें.

उदा. १ टन लोखंड आणि २ औंस सोनें या वस्तु निसर्गतःच सारख्या किंमतीच्या आहेत असें माणसाला वाटत असतें. सोनें आणि लोखंड यांचे अंगभूत रासायनिक व भौतिक गुण भिन्नभिन्न असूनहि १ पौंड सोनें व १ पौंड लोखंड ही वजनांत निसर्गतःच सारखी असतात. त्याचप्रमाणें १ टन लोखंड व २ औंस सोनें यांची किंमत निसर्गतः सारखी असली पाहिजे, असा कांहींसा समज रूढ होतो. वस्तु, मूल्यांचीं परिमाणें या नात्यानें, देवघेवीत सतत येऊं लागल्या म्हणजे त्यांच्यावर मूल्य हा शिक्का कायमचा बसतो. या विनिमयमूल्यांचीं परिमाणें सतत बदलत असतात. धनोत्पादकांच्या इच्छा, दूरदृष्टि अथवा खटाटोप यांस न जुमानतां हे बदल होत असतात. वास्तविक हीं माणसें करतात ते खटाटोप सामाजिक स्वरूपाचे होत. पण आपण विशिष्ट वस्तूसाठीं खटपट करतों असें त्यांना वाटत असतें. या वस्तूवर माणसाचें राज्य चालावें पण त्याऐवजीं या वस्तूंचें राज्य माणसावर चालत असतें.

## श्रमवेळाचा विनिमय मूल्यावर परिणाम

सर्व व्यक्तींचे स्वतंत्रपणें केले जाणारे श्रम सामाजिक श्रमविभाग या नात्यानें आपोआप विकासक्रमांत उत्पन्न झाले असून सामाजिक व्यवहारांत संख्यात्मक प्रमाणांत ( त्यांची भिन्नता नाहींशी करून ) ते सारखे मानले जात आहेत, ही शास्त्रीय जाणीव पुष्कळ दिवसपर्यंत विक्रीमालाच्या उत्पादनपद्धतीचा विकास होत होत अनुभवानें येत असते. याचें कारण काय ? कारण वस्तूंचीं विनिमयप्रमाणें नेहमीं कमीअधिक होत असतांना, वस्तूच्या उत्पत्तीसाठीं सामाजिक दृष्ट्या अवश्य असा जो श्रमवेळ खर्च झालेला असतो तो निसर्गाचा जणूं कांहीं प्रभावी नियमच, अशा प्रकारें या विनिमयप्रमाणांवर परिणाम करीत असतो. आपल्या शेजारींच एखादें घर कोसळलेलें आपणांस

ऐकूं आलें असतां गुरुत्वाकर्षणाच्या नियमाची आपणांस जाणीव होते, तसेंच हें आहे. विनिमयमूल्याचें प्रमाण श्रमवेळानें ठरविलें जाणें ही गोष्ट विनिमयमूल्यांचीं प्रमाणें जीं कमीअधिक होत असतांना दिसतात त्याखालीं दडलेली असतें. या प्रमाणांचें जें आकस्मिकपणें कमीअधिक होणें तें बाजूस सारून श्रमवेळानें वस्तूचें विनिमयमूल्य ठरतें हें सत्य आपण दृष्टिपथांत आणलें, तरी मूल्य ठरण्याच्या या पद्धतींत भासणारी जी आकस्मिकता ती कांहीं त्यामुळें नाहींशी होऊं शकत नाहीं.

## बूट आणि कोट यांचें नातें ?

माणसाचे सामाजिक जीवनाच्या प्रकारासंबंधीचे विचार आणि अर्थात त्या प्रकाराचें माणसांनीं केलेले शास्त्रीय पृथक्करण हें त्या सामाजिक जीवनाच्या ऐतिहासिक विकासाच्या उलट क्रमानें होत असतें. सामाजिक जीवनाचा ऐतिहासिक विकास घडून गेल्यानंतर त्या विकासक्रमाचे जे परिणाम त्याला अगदीं हाताशीं सांपडतात त्यांचें पृथक्करण तो करूं लागतो. विक्रीमालावर ज्या गुणविशेषांचा शिक्का मारलेला असतो, आणि ज्या गुणविशेषांचा लोकमतावर पगडा बसलेला असणें ही गोष्ट वस्तूंचा विक्रीमाल या नात्यानें प्रसार होण्यास पूर्वावश्य असते, ते गुणविशेष, माणसानें त्यांचें स्वरूप समजून घेण्या-पूर्वींच, नैसर्गिक व स्वयंसिद्ध असें स्थिररूप धारण करते झालेले असतात. हें स्वरूप समजून घेण्याचा प्रयत्न तरी माणूस करतो, पण त्यांचा ऐतिहासिक विकास समजून घेण्याचा तो प्रयत्नहि करीत नाहीं. कारण त्याच्या मतें वस्तूंत बदल हा होतच नसतो. म्हणूनच विक्रीमालाच्या किंमतींच्या पृथक्करणाच्या प्रयत्नामुळें मूल्याचें परिमाण

ठरविण्याचा प्रयत्न झाला, आणि पैशाच्या स्वरूपांत सर्व प्रकारच्या मालाचें जें प्रगटीकरण झालें त्यावरूनच सर्व विक्रीमालास मूल्य हें स्वरूप प्राप्त झालें. तथापि खरोखर पाहतां पैसा हें जें सर्व विक्रीमालांचें अंतिम स्वरूप त्याच्याचखालीं व्यक्तीच्या खाजगी श्रमाचें सामाजिक स्वरूप, आणि वैय्यक्तिक उत्पादकांची सामाजिक नातीं लपलेलीं असतात. कोट अथवा बूट यांचे रेशमी कापडाशीं नातें आहे. कारण दोन्हीहि सर्वसामान्य मानवी श्रमाच्या मूर्ति आहेत असें मी म्हणतों तेव्हां माझ्या बोलण्यांत उघड उघड विसंगति आहे असें लोकांना वाटतें. तरीपण ज्यावेळीं उत्पादक माणसें कोट आणि बूट यांची रेशमी कापडाशीं तुलना करीत असतात, अथवा वेगळ्या शब्दांत सांगावयाचे म्हणजे सोनें अथवा रुपें हे जे सर्व जगांतील वस्तूंचे विनिमयसाधन त्याच्याशीं विनिमयाच्या निमित्तानें जेव्हां तुलना करीत असतात तेव्हां ते स्वतःचे खाजगी श्रम आणि एकंदर समाजाचे सामुदायिक श्रम यांमधील नातें अशा विसंगत स्वरूपांतच व्यक्त करीत असतात.

## अर्थशास्त्रज्ञांचा भ्रम

भांडवलशाही अर्थशास्त्रांत विचार व्यक्त करण्याचे असेच सर्व प्रकार आहेत. इतिहासक्रमागत अशी विक्रीमालउत्पादनाची जी विशिष्ट पद्धति तिची परिस्थिति व तिजमुळें उत्पन्न होणारे संबंध मानवी समाजांत कायमचे आहेत असे विचार भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञ मांडीत असतात. पण विक्रीमालासंबंधीचें सर्व गूढ, श्रमोत्पन्न मालाच्या भोंवतीं पसरलेली सर्व जादू, त्या वस्तु विक्रीमाल या स्वरूपांत असतात तोंपर्यंतच कायम राहते. दुसऱ्या एखाद्या उत्पादन पद्धतीचें आपण परीक्षण करूं लागतांच ही गूढता नाश पावते.

## रॉबिन्सन क्रूसोचें जग

'रॉबिन्सन् क्रूसोचे अनुभव' हा अर्थशास्त्रज्ञांचा मोठा आवडता विषय असतो. म्हणून आपणहि आतां रॉबिन्सन् क्रूसोच्या बेटाकडे दृष्टीक्षेप करूं. क्रूसो मोठा नेमस्तवृत्तीचा माणूस आहे; त्याला स्वतःच्या कांहीं गरजा या भागवाव्या लागतातच. म्हणूनच थोडेसें उपयुक्त असें कार्यहि त्यास करावें लागतें. हत्यारें तयार करणें, घरांतल्या उपयुक्त वस्तु करणें, मेंढ्या पाळणें, मासे धरणें, शिकार करणें वगैरे हीं त्याचीं कामें होत. प्रार्थना वगैरे जे दुसरे उद्योग तो करी ते त्याच्या करमणुकीचे विषय होते. म्हणून आपण त्यांचा विचार करण्याचें कारण नाहीं. त्याचें हें सर्व काम विविध प्रकारचें होतेंच, तथापि त्याला हें माहीत होतें कीं ही सर्व विविध कामें म्हणजे एकाच रॉबिन्सन्च्या शारीरिक हालचाली होत. मानवी श्रमाचे हे विविध प्रकार होत. परिस्थितीच्या सक्तीनेंच त्याला आपल्या निरनिराळ्या कामासाठीं वेळ वाटून द्यावा लागे. एका कामाला दुसऱ्या कामापेक्षां वेळ कमी अधिक लागणें ही गोष्ट तें काम करण्यांत असणाऱ्या कमीअधिक अडचणीवर अवलंबून राहील. बोट फुटून तो समुद्रांत पडला त्यावेळीं रॉबिन्सन्नें एक घड्याळ, एक कागदाची लिहिण्याची वही, एक लिहिण्याची लेखणी व शाई इतके कडोसरीस लावून तो आपल्या बेटास लागला होता, असें आपण समजूं. आतां तो खराखुरा इंग्रज या नात्यानें जन्मतः हाडीमाशीं खेळलेला हिशेबीपणाचा गुण वापरून जमाखर्च ठेवूं लागतो. मालमत्तेसंबंधीच्या त्याच्या यादींत त्याच्या स्वतःच्या उपयुक्त वस्तूंचें टिपण केलेलें असतें. त्यांना उत्पन्न करण्यासाठीं कोणकोणत्या क्रिया करावयाच्या आणि त्यापैकीं प्रत्येक वस्तूनें सरासरी आपला किती वेळ घेतला याचें टाचण त्यानें केलेलें असतें.

रॉबिन्सन् आणि त्यानें केलेल्या त्याच्या धनस्वरूपी अनेक वस्तु यांमधील संबंध इतका साधा आणि कोणतेहि परिश्रम न करतां समजण्यास स्वच्छ असतो कीं सेडले टायलरलासुद्धां तो संबंध सहज समजेल. आणि हा संबंध इतका सोपा असूनहि वस्तूचें मूल्य ठरविण्यास लागणाऱ्या सर्व गोष्टी त्यांत अस्तित्वांत असतात.

## युरोपीय मध्ययुगांतलें दृश्य

आतां आपण रॉबिन्सन क्रूसोच्या प्रकाशानें न्हालेल्या बेटाकडून अंधारांत दडलेल्या युरोपीय मध्ययुगाकडे वळूं. येथें क्रूसोसारखा स्वतंत्र व स्वयंसिद्ध मनुष्य कोणीहि नसून प्रत्येकजण परावलंबी आहे. भूदास आणि उमराव, मांडलिक आणि सम्राट, सामान्य माणूस आणि धर्मगुरु असे यांचे संबंध आहेत. सामाजिक धनोत्पादन-क्रिया व धनोत्पादन-पद्धतीवर आधारलेले इतर व्यवहार यांचें स्वरूप, या समाजपद्धतींत, सामाजिक परस्परावलंबन हेंच असतें. या समाजाची मूळ भूमिका सामाजिक परस्परावलंबन ही असल्यामुळेंच श्रम आणि श्रमजन्य वस्तु यांचें असतें तसें स्वरूप उघड दिसतें. त्यांत अद्भुतता कांहींहि निर्माण होऊं शकत नाहीं. सामाजिक व्यवहारांत प्रत्यक्ष सेवा आणि ऐनजिनसीं मजूरी हें या सर्व व्यवहाराचें स्वरूप असतें. या ठिकाणीं श्रमाचे विशिष्ट व नैसर्गिक स्वरूप हें तावडतोब सामाजिक स्वरूप धारण करतें. विक्रीमालाच्या उत्पादनपद्धतींत मालांची गुणभिन्नता वगळून त्यांची श्रमजन्यता तेवढीच लक्षांत घेतली म्हणजे त्यांचें सामाजिक स्वरूप लक्षांत येतें. विक्रीमाल उत्पन्न करण्याचे श्रम हे भांडवलशाही समाजांत स्वतंत्रपणें,कोणाच्याहि सक्तीवांचून केले जातात तथापि ते जसे त्यास लागणाऱ्या वेळानेंच मोजले जातात त्याप्रमाणें सरंजामी समाजांतील सक्तीचे श्रमहि त्यास लागणाऱ्या वेळानेंच मोजले

जातात. प्रत्येक भूदासाला आपण मालकासाठीं करतों ते श्रम हे आपल्या श्रमशक्तीचा एक विशिष्ट विभाग आहेत हें माहीत असतें. धर्मगुरूला द्यावयाचा टाईथ नांवाचा कर हा खराखुरा असतो आणि त्यापासून मिळणारा आशिर्वाद मात्र भ्रम असतो. म्हणून सरंजामी समाजांतील निरनिराळ्या वर्गांनीं कोणतेंहि कार्य केलेलें असो, सामाजिक श्रम करतांना व्यक्तीव्यक्तीमध्यें जीं सामाजिक नातीं उत्पन्न होतात तीं परस्परांचीं वैयक्तिक नातीं होत हें उघड दिसत असते. श्रमानें उत्पन्न होणाऱ्या वस्तूवस्तूंमधील सामाजिक संबंध असा बुरखा या वैयक्तिक संबंधावर पडत नाहीं.

## पितृप्रधान शेतकरी कुटुंब

सामुदायिक व प्रत्यक्ष परस्परसहकार्यावर आधारलेले श्रम कसे असूं शकतील याचें उदाहरण आपणांस पहावयाचें असल्यास, सुधारलेल्या जमातींच्या इतिहासाच्या आरंभ काळांतील आपोआप होत असलेल्या सामाजिक विकासाकडे आपण मागें वळून पाहिलें पाहिजे. पण ती गोष्ट अजून शक्य नाहीं. अगदीं जवळचें अशा प्रकारचें उदाहरण घ्यावयाचें असल्यास धान्य, गुरेंढोरें, सूत, कापड, कपडे, वगैरे सर्व वस्तु घरांतच करणाऱ्या पितृप्रधान समाजांतील शेतकरी कुटुंबाचें उदाहरण आपणास घेतां येईल. या निरनिराळ्या वस्तु म्हणजे त्या कुटुंबाचें दृष्टीनें पाहतां त्यांच्या श्रमानें निर्माण झालेल्या अनेक वस्तु आहेत. पण त्या कुटुंबांतील माणसांना परस्परांस कांहीं त्या विक्रीमालासारख्या दिसत नाहींत. जमीन नांगरणें, गुरें पाळणें, सूत कातणें, कापड विणणें, कपडे शिवणें वगैरे जे अनेक व विविध श्रम, तीं सर्व सामाजिक कार्यें होत. कारण कुटुंबरूपी समाजाचींच हीं कार्यें नव्हेत काय? एका कुटुंबाचीं कार्यें हीं विक्रीमाल उत्पन्न करणाऱ्या समाजांतील अर्था-

प्रमाणेंच आपोआप विकसत गेलेल्या श्रमविभागावर आधारलेलीं असतात. कुटुंबांतील निरनिराळ्या व्यक्तींना वांटून दिलेलें काम आणि निरनिराळ्या व्यक्तींच्या श्रमवेळाची आंखणी या गोष्टी त्या त्या माणसाचें वय काय, ती व्यक्ती स्त्री आहे किंवा पुरुष आहे, नैसर्गिक परिस्थिति कोणती आहे, ऋतुमान कसें आहे, या सर्वांवर अवलंबून राहतात. कुटुंबांतील प्रत्येक व्यक्तीची श्रमशक्ति ही एकंदर कुटुंबाच्या श्रमशक्तीचा एक विशिष्ट विभाग म्हणूनच उपयोगांत येत असते. आणि म्हणून ही श्रमशक्ति, तीसाठीं खर्च होणाऱ्या वेळानें मोजणें ही गोष्ट त्या श्रमाच्या सामाजिकपणावरूनच ठरते.

## स्वतंत्र व्यक्तींचा समाज

आतां आपण थोडासा तोंडपालट म्हणून अगदीं स्वतंत्र अशा व्यक्तींच्या समाजाचें एक चित्र आपल्यासमोर काढूं या. या सर्व व्यक्तींचीं धनोत्पादनसाधनें सामुदायिक असून निरनिराळ्या व्यक्तींची श्रमशक्ति एकंदर समाजाची एक श्रमशक्ति याच दृष्टीनें वापरली जाते. रॉबिन्सन् क्रूसोच्या श्रमाचे हे सर्व गुणविशेष येथेंहि दिसून येतात. फरक इतकाच कीं रॉबिन्सन्चे श्रम व्यक्तीचे होते येथें ते सर्व श्रम समाजाचे असतात. रॉबिन्सननें उत्पन्न केलेली प्रत्येक वस्तु ही त्याच्या वैयक्तिक श्रमाचाच परिणाम होती. आणि म्हणून केवळ एक उपयुक्त वस्तु एवढ्याच दृष्टीनें तो तिजकडे पहात होता. आतां आपण कल्पिलेल्या आपल्या समाजांत निर्माण झालेल्या सर्व वस्तु या सामाजिक पद्धतीनें निर्मिलेल्या आहेत. त्याचा एक भाग धनोत्पादनाचें साधन म्हणून सामाजिक मालकींत राहतो. पण दुसरा भाग चरितार्थाचें साधन म्हणून समाजांतील व्यक्तीकडून उपभोगिला जातो. आणि म्हणून त्या समाजांतील व्यक्तींत या विभागाची वाटणी करणें हें अत्यवश्य ठरतें.

या वस्तूंची वाटणी कशी करावयाची ही गोष्ट त्या समाजाच्या धनोत्पादन संघटनेवर अवलंबून राहील. तसेंच धनोत्पादकांचा ऐतिहासिक विकास किती झाला आहे हेंहि पहावें लागेल. विक्रीमालाच्या उत्पादन प्रकाराशीं तुलना करतां यावी म्हणून प्रत्येक धनोत्पादकाला चरितार्थ-साधनाचा वाटा किती द्यावयाचा हें आपण तो निर्माण करण्यासाठीं लागलेल्या श्रमवेळेवरून ठरवावयाचें आहे असें समजूं या. उदाहरणार्थ श्रमवेळ ही दोन प्रकारचें कार्य करील : विशिष्ट सामाजिक योजने अनुसार श्रमवेळची वाटणी होईल व त्यामुळें समाजाच्या विविध प्रकारच्या गरजा भागविण्यास लागणाऱ्या श्रमांना प्रत्येकीं योग्य इतकी श्रमवेळ मिळेल. उलट प्रत्येक व्यक्तीनें केलेले श्रम किती आणि त्यामुळें उत्पन्न झालेल्या धनांतील त्याचा वाटा किती हेंहि ही श्रमवेळच ठरवील. व्यक्तीव्यक्तींनीं केलेले श्रम आणि सर्वांनीं उत्पन्न केलेलें धन या दोन्ही दृष्टीनें व्यक्तीव्यक्तींमध्यें उत्पन्न होणारा सामाजिक संबंध अगदीं साधा व सहज समजणारा असा आहे. हा सोपेपणा केवळ उत्पादनाचे बाबतींतच नसून वाटणीच्या बाबतींतहि असतो.

## उत्पादन प्रकाराचें धर्मस्वरूपांत पडणारें प्रतिबिंब

धार्मिक जग हें वास्तव जगाचें केवळ प्रतिबिंब असतें. भांडवलशाही समाज हा विक्रीमालाच्या उत्पादनावर आधारलेला आहे. या समाजांत उत्पादक हे आपण उत्पन्न करतों त्या धनाला विक्रीमाल व मूल्य असें संबोधून तद्वारां एकमेकाशीं संबंध ठेवतात. असा संबंध ठेवून व्यक्तीव्यक्तींच्या खाजगी व भिन्न भिन्न श्रमांना ते सजातीय मानवी श्रमाचे स्वरूप देतात. अशा समाजास ख्रिस्ती धर्म हा प्रतिबिंब या नात्यानें अगदीं योग्य धर्म आहे. यांत माणसांची विविधता लक्षांत न घेतां प्रत्येक मनुष्य दुसऱ्या कोणत्याहि माणसासारखाच असतो

असें मानलें जातें. विशेषतः ख्रिस्ती धर्माचा भांडवलवाल्यांनीं केलेला विकास म्हणजे जो प्रॉटेस्टँटिझम् त्यांत हा व्यक्तीव्यक्तींचा सारखेपणा फारच ठळकपणें स्वीकारलेला असतो. प्राचीन आशियांतील व इतर ठिकाणच्या प्राचीन धनोत्पादन प्रकारांत आपणांस असें आढळून येतें कीं वस्तूंना विक्रीमालाचें स्वरूप देणें आणि म्हणूनच वस्तु निर्माण करणाऱ्यांना विक्रीमाल निर्माण करणाऱ्या व्यक्तींचें स्वरूप देणें ही मुख्य महत्त्वाची मानली जात नाहीं. पण हे प्राथमिक समाज जसजसे मोडकळीस येऊं लागतात तसतसा हा प्रकार महत्त्व पावूं लागतो. हे प्राचीन धनोत्पादक समाज आधुनिक भांडवलशाही समाजाशीं तुलना करता अगदीं साधे व पारदर्शक असत. पण हे समाज माणसाच्या अपूर्ण विकासावर आधारलेले असत. त्यांनीं ऐतिहासिक दृष्ट्या प्राथमिक टोळ्यांतील आपल्या बांधवाशीं असलेले संबंध तोडलेले नसत; किंवा हे समाज पूर्ण गुलामगिरीच्या नात्यावर आधारलेले असत. असे समाज माणसाची धनोत्पादनशक्ति अगदीं थोड्या प्रमाणांत वाढलेली असते त्यावेळींच निर्माण होतात. आणि म्हणून भौतिक जीवनाच्या क्षेत्रांतील माणसामाणसांमधले व माणूस आणि निसर्ग यांमधले संबंध अगदीं संकुचित असतात. हा संकुचितपणा प्राचीनांच्या निसर्गपूजेंत आणि इतर प्रकारच्या लोकप्रिय अशा धर्मांत प्रतिबिंबित झालेला असतो. ज्यावेळीं रोजच्या व्यवहारांतील व्यक्तीव्यक्तींचे आणि व्यक्ति व निसर्ग यांमधले व्यावहारिक संबंध पूर्णपणें सुबोध व सयुक्तिक होतील तेव्हां खऱ्या जगाचे धार्मिक प्रतिबिंब कायमचें नाहींसें होईल.

## गूढता केव्हां जाईल

समाजाची जीवनपद्धति ही धनोत्पादनाच्या पद्धतीवर आधारलेली आहे. स्वतंत्र बुद्धीनें एकत्र येणाऱ्या माणसांच्या श्रमाची विचारपूर्वक

आंखणी करून धनोत्पादनाचें कार्य करावयाचें असा विचार केला असतां त्यांतील गूढता अजीबात नाहींशी होते. पण अशी आंखणी करतां येण्याजोगी परिस्थिति निर्माण होण्यास विशिष्ट आधिभौतिक भूमिका अथवा विशिष्ट परिस्थिति निर्माण व्हावी लागते. ही भूमिका अथवा परिस्थिति दीर्घ कालानें दुःखमय प्रक्रियेच्या मार्गांतून विकसतां विकसतां इतिहासक्रमप्राप्त अशी निर्माण होते.

अर्थशास्त्रानें अपूर्णपणें कां होईना मूल्य आणि त्याचें परिमाण यांचें पृथक्करण केलें असून त्यांच्या बुडाशीं काय आहे याचा शोधहि लावला आहे. पण श्रमाचें प्रतीक, श्रमानें उत्पन्न केलेल्या मालाचें मूल्य हेंच होय असे कां समजतात, तसेंच श्रमवेळ ही मूल्याच्या परिमाणा-वरून कां मोजली जाते, हा प्रश्न त्यांनीं स्वतःस कधींहि विचारलेला नाहीं. हें विशिष्ट लक्षण त्या विक्रीमालावर ठळक अक्षरांत छापलेलें असून या विक्रीवस्तु, ज्या समाजव्यवस्थेंत उत्पादनपद्धतीवर माणसाचें नियं-त्रण नसून उत्पादनपद्धतीचें माणसावर नियंत्रण असतें, त्या समाज-व्यवस्थेंतल्या आहेत असें कळून येतें. श्रमाचें प्रतीक म्हणजे त्या श्रमानें उत्पन्न केलेला माल ही व्याख्या भांडवलदाराच्या बुद्धीला उत्पादक श्रमाइतकीच निसर्गतः अवश्य वाटतें. म्हणून भांडवलशाही उत्पादन-पद्धतीच्या पूर्वींचे जे उत्पादन प्रकार त्यांना ख्रिस्तीधर्मगुरूंनीं ख्रिस्ती-धर्माच्या पूर्वींच्या धर्मांना जसें वागवलें तसें भांडवलदार वागवतात.

---

## श्रमशक्तीचा क्रय-विक्रय : : : ४*

वस्तूच्या ठिकाणचें मूल्य हें त्या वस्तूवर खर्च झालेल्या मानवी श्रमानेंच निर्माण होतें हें आपण पाहिलें. आतां आपण कारखानदाराला आपल्या विक्रीमालापासून त्यांत गुंतवलेल्या भांडवलापेक्षां अधिक मूल्य ( वाढावा=सर्प्लस व्हॅल्यू ) कसें निर्माण करतां येतें हें पाहूं.

वाचकापुढें पुन्हां पूर्वींचेंच उदाहरण मांडूं. अमूक एका विक्री-मालाच्या उत्पत्तीसाठीं भांडवलदाराला २५ डॉ. लागतात असें आपण समजूं. माल तयार झाल्यावर भांडवलदार तो माल २७·५० डॉ. ला विकतो. आपण मागें तपासून पाहिलें आहे कीं त्याला अधिक मिळा-लेलें २·५० डॉ. क्रयविक्रयाच्या उलाढालींत मिळणें अशक्य असून उत्पादनाच्या प्रक्रियेंतच ते २·५० डॉ. उत्पन्न झाले पाहिजेत. हें कसें घडतें तें आतां पाहावयाचें आहे.

### जितकें पेरलें तितकेंच उगवलें

मूल्य हें सामाजिकदृष्ट्या आवश्यक अशा श्रमानें निर्माण होतें हें

---

* कॅपिटल खंड १ ला प्रकरण ६.

समजलें म्हणजे हा प्रश्न अंशतः सुटतोच. उपलब्ध साधनांनीं म्हणजे सुताचा चरखा, कापूस वगैरे साहित्यांनीं सूत काढावयाचें म्हणजे सुताच्या कारखान्यांत श्रम करावे लागतात. हे श्रम जितपत ‘ सामाजिकदृष्ट्या आवश्यक ’ असतील तितपतच ते मूल्य निर्माण करतात. आणि म्हणून हे श्रम धनोत्पादनसाधनाच्या मूळच्या मूल्यांत ( म्हणजे प्रस्तुत कापसाच्या मूल्यांत ) नवीन मूल्याची भर घालतात. त्याचप्रमाणें झिजलेल्या यंत्रांचें वगैरे झिजलेलें मूल्य सुताच्या रूपानें पुन्हां निर्माण करतात. पण येथें अडचण उत्पन्न होते ती अशी कीं नवीन करण्यांत आलेल्या श्रमाची मजूरीहि भांडवलदारानें उत्पादनखर्चांत समाविष्ट केलेली असली पाहिजे. कारण यंत्रें, इमारती, कच्चामाल वगैरे सर्वांच्या खर्चाबरोबर मजूरांची मजूरीहि उत्पादनखर्चांत समाविष्ट करावी लागते. सूत कातण्याचे जे श्रम केले जातात त्यासाठींच ही मजूरी दिली जाते. अर्थात उत्पादनप्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर प्राप्त झालेली सर्व मूल्यें उत्पादनप्रक्रियेपूर्वींहि तितकींच उपलब्ध होतीं असें म्हणावें लागतें.

## कारखान्यांतच वाढावा निपजतो

परंतु सूत कातण्याच्या क्रियेनें जें नवीन मूल्य निर्माण झालें आहे तें भांडवलदारानें दिलेल्या मजूरीइतकेंच असतें असें नाहीं, कमी अथवा अधिक असतें. जर नवीन निर्माण झालेलें हें मूल्य अधिक असेल तर हा वाढावा कोठून मिळतो याचा आपणास शोध लावतां येईल. पण आपण क्रयविक्रयामध्यें सारख्याच मूल्यांची देवघेव होते असें धरून चाललेलों आहों; तसेंच किंमत ही मूल्याहून पुष्कळदां वेगळी असते; पण यामुळेंहि कांहीं खुलासा होत नाहीं हेंहि आपण पाहिलें आहे. मग हा वाढावा कोठून आला ? कारखानदार पैसा देऊन विक्रीमाल

घेतो. ( म्हणजे पैसा देऊन कच्चा माल, यंत्रें, श्रमशक्ति वगैरे खरेदी करतो.) या व्यवहारास आपण ‘ पै-विमा ’ [ पैसा-विक्रीमाल] असें म्हणूं. नंतर हाच विक्रीमाल ( त्याचें रूपांतर करून ) तो पैसा घेऊन विकतो. या वेळीं त्याला मूळच्या पैशापेक्षां अधिक पैसा ( मूळचें मूल्य अधिक वाढावा ) मिळतो. या दुसऱ्या व्यवहारास ‘ विमा—पै ’ असें म्हणूं. ‘ पै—विमा ’हा सारख्याशीं सारख्याचा विनिमय आहे तसेंच ‘ विमा—पै ’ हाही सारख्याचा सारख्याशीं विनिमय आहे. अर्थात पहिल्या म्हणजे खरेदीच्या ( पै—विमा ) व्यवहारानें कारखानदाराच्या कारखान्यांत ‘ विमा ’ म्हणजे विक्रीमाल आल्यानंतर पुन्हां दुसऱ्या म्हणजे विक्रीच्या ( विमा—पै ) व्यवहारासाठीं तो बाजारांत जाण्यापूर्वीं त्याच्यांत वाढ झाली असली पाहिजे. कारखानदाराच्या कारखान्यांत विक्रीमालाचा जेव्हां वापर ( म्हणजे कंझम्प्शन ) होतो तेव्हां ही वाढ होत असली पाहिजे.

## श्रमशक्ति म्हणजे काय ?

ज्या मालाच्या उपयोगमूल्याचा वापर होत असतांनाही त्याच्या विनिमयमूल्याची वाढ होते म्हणजेच ज्याचा वापर होत असतांही त्यांत नवीन श्रम समाविष्ट होत असतात असा विशिष्ट गुणधर्मवान विक्रीमाल बाजारांत मिळण्याचें भाग्य पैसेवाल्या कारखानदाराला लाभलें पाहिजे. असा विशेष गुणाचा विक्रीमाल कारखानदाराला बाजारांत मिळतो आणि तो म्हणजे कामगाराचें श्रम करण्याचें सामर्थ्य—श्रमशक्ति हा होय. श्रमशक्ति याचा अर्थ माणूस कोणतेंही उपयोगमूल्य निर्माण करतांना माणसाच्या ठिकाणीं असणारी जी शारीरिक व मानसिक शक्ति खर्च करतो ती सर्व प्रकारची शक्ति होय. आतां आपण या प्रश्नाची थोडी अधिक खोल चिकित्सा करूं.

## मजूराचें स्वातंत्र्य

मजूराला मजूरी देऊन भांडवलदार जे मिळवितो, म्हणजेच मजूराला पैसे देऊन त्यापासून तो जे विकत घेतो ती त्या मजूराची श्रमशक्ति असते. पण भांडवलदारास मजूराची ही श्रमशक्ति खरेदी करतां यावी यासाठीं अनेक प्रकारच्या परिस्थितीची आवश्यकता असते. मजूराची श्रमशक्ति मजूर बाजारांत विक्रीस आणील तरच विकत मिळूं शकते. आणि तो ती जितकी विकील तितकीच विकत मिळूं शकते. मजूराला ती विकतां यावी यासाठीं तिची विल्हेवाट करण्याचा त्याला पूर्ण हक्क असावा लागतो. म्हणजेच तो स्वतंत्र असावा लागतो. आपल्या श्रमकर्तृत्वाचा तो पूर्ण मालक असावा लागतो. मजूर आणि भांडवलदार बाजारांत एकमेकास भेटतात, आणि विक्रीमालांचे दोन सारख्या हक्कांचे मालक—एक गिऱ्हाईक व दुसरा विक्रेता एवढ्याच फरकाचे-कायदेशीर दृष्ट्या सारख्या दर्जाचे असे हे दोन गृहस्थ असतात. हा त्या उभयतांत येणारा संबंध सतत येत रहावा यासाठीं श्रमशक्तीच्या मालकानें आपली श्रमशक्ति एका विशिष्ट वेळासाठींच विकणें अवश्य असतें. कारण सगळीच्या सगळी त्यानें जर एकदम विकून टाकली तर त्यानें स्वतःलाच विकून टाकलें असा त्याचा अर्थ होईल. तो गुलाम होईल; (श्रमशक्तिरूपी) विक्रीमालाचा मालक न राहतां तो स्वतःच विक्रीमाल होऊन बसेल.

## मजूराचें दुसरें स्वातंत्र्य

बाजारांत श्रमशक्ति ही भांडवलदाराला मालाच्या स्वरूपांत खरेदी करतां यावी याची दुसरी आवश्यक परिस्थिति म्हणजे श्रमशक्तीच्या मालकाला आपल्या श्रमशक्तीनें निर्माण केलेला माल विकतां येण्याऐवजीं त्याच्या जिवंत शरीरांतच असणारी श्रमशक्ति विकणें त्यास अवश्य

असलें पाहिजे. श्रमशक्ति विकणाऱ्याच्या मालकीचें कच्चा माल, हत्यारें व इतर साहित्य-जें विक्रीमाल तयार करण्यास लागत असतें तें-नसलें, तसेंच कारखान्यांत माल तयार होऊन तो विकला जाईपर्यंत त्याच्याजवळ खाण्याला अन्नहि नसलें म्हणजे वर सांगितलेली दुसरी परिस्थिति (श्रमशक्ति विकून टाकण्याची मजूराला आवश्यकता असणें ही) निर्माण होते. म्हणून कारखानदाराला, बाजारांत स्वतंत्र मजूर सांपडावा लागतो. त्याची स्वतंत्रता दोन प्रकारची असली पाहिजे. आपल्या श्रमशक्तीची हवी तशी विल्हेवाट त्याला करतां आली पाहिजे, आणि उलट त्या मजूराजवळ दुसरा कोणताहि विक्रीमाल असतां कामा नये. त्याला कोणतेंहि बंधन नसावें आणि ज्यावर श्रमशक्ति खर्च करतां येईल असें कांहींहि साधन त्याजजवळ नसावें.

## नैसर्गिक, सामाजिक व ऐतिहासिक

हा दुहेरी स्वतंत्र मजूर भांडवलदाराला बाजारांत कसा मिळेल याची भांडवलदाराला पर्वा नसते. आणि सध्यां आपणालाहि त्याची पर्वा नाहीं. पण एक गोष्ट स्पष्ट आहे ती ही कीं व्यक्ति भांडवलदार होते ती कांहीं केवळ निसर्गानें नव्हे; तसेंच श्रमशक्तीरूपी विक्रीमालाच्या मालकांनाहि निसर्ग निर्माण करीत नाहीं. ही परिस्थिती नैसर्गिक नसते. किंवा इतिहासाच्या सर्व काळीं असणारी अशा अर्थानें ती सामाजिकहि नसते. पूर्वीपासून इतिहासकालांत विकसत आलेली ही अवस्था असते. अनेक आर्थिक क्रांत्या होऊन आणि सामाजिक उत्पादनपद्धतींचे अनेक प्रकार उध्वस्त होऊन ती बनलेली असते.

आतां आपण श्रमशक्ती या चमत्कृतिपूर्ण विक्रीमालाचें थोडें खोल परीक्षण करूं. दुसऱ्या कोणत्याहि विक्रीमालाप्रमाणें याला मूल्य असतें. हें मूल्य कसें ठरवतां येतें ?

## श्रमशक्तीचें मूल्य म्हणजे कोणतें

इतर कोणत्याहि विक्रीमालाच्या मूल्याप्रमाणें श्रमशक्तीचें मूल्यहि त्याच्या उत्पादनास आणि अर्थात त्यांच्या पुनरुत्पादनास लागणाऱ्या वेळानेंच ठरलें पाहिजे. श्रमशक्ति ही एका जिवंत व्यक्तीचा अंगभूत गुण याच नात्यानें अस्तित्वांत राहूं शकतें. अर्थात श्रमशक्तीच्या अस्तित्वासाठीं एक माणूसहि अस्तित्वांत असावा लागतो. जिवंत माणसाला जिवंत राहण्यासाठीं कांहीं वस्तूंची आवश्यकता असते. म्हणून श्रमशक्तीच्या निर्मितीसाठीं लागणारा वेळ म्हणजे मनुष्य जिवंत राहण्यासाठीं लागणाऱ्या वस्तु निर्माण करण्यास लागणारा वेळ होय हें उघड होते. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे श्रमशक्तीच्या मालकाला जिवंत ठेवण्यास आवश्यक असणाऱ्या अशा वस्तूंचें जें मूल्य तेंच श्रमशक्तीचें मूल्य होय.

## मजूराचा राहणीचा दर्जा

या आवश्यक वस्तु श्रम करणाऱ्या माणसाला सामान्यतः ठीक अशा परिस्थितींत राहतां येईल इतक्या पुरेशा असाव्या लागतात. अन्नवस्त्र, उष्णता, बिऱ्हाडाची जागा, वगैरे ज्या व्यक्तीच्या नैसर्गिक गरजा, त्या देशपरत्वें वेगवेगळ्या असूं शकतात. तसेंच या प्राथमिक गरजांचें प्रमाण आणि ज्या प्रकारें त्या पुरविल्या जातात त्यांची पद्धति त्या त्या देशांत संस्कृतिविकास किती प्रमाणांत झाला असेल त्यावर अवलंबून राहते. स्वतंत्र मजूरवर्ग कोणत्या परिस्थितींत निर्माण झाला आहे, म्हणजेच त्या त्या देशांतल्या चालीरीती व रूढी काय आहेत, मजूरवर्गाचा राहणीचा दर्जा कसा आहे या सर्वांवर वरील गोष्टी अवलंबून राहतात. म्हणून श्रमशक्तीचें मूल्य ठरवितांना हा ऐतिहासिक व नैतिक मुद्दा विचारांत घ्यावा लागतो. इतर कोणत्याहि विक्री-

मालाच्या बाबतींत हा मुद्दा लक्षांत घ्यावा लागत नाहीं. पण अमुक एका देशांत अमुक एका काळीं जीवनाला कमींत कमी आवश्यक अशा वस्तूंचे सरासरी परिमाण काय हें साधारणतः ठाऊक असतें.

## प्रजोत्पादनाचा खर्च

श्रमशक्तीचा मालक हा मर्त्य प्राणी असतो. जर असे श्रमशक्तीचे मालक बाजारांत सतत यावयाचे असतील आणि भांडवलाला तशी सतत गरजहि असेल तर जितकी श्रमशक्ति वापरण्यानें, झिजण्यानें व मरणानें संपेल तितकी कमीतकमी नवीन निर्माण होणें अवश्य आहे. म्हणून श्रमशक्ति निर्माण होण्यासाठीं ज्या आवश्यक वस्तू लागतील त्यांत या बदली श्रमशक्तीच्या निर्मितीस म्हणजे मजूरांच्या मुलांच्या निर्मितीस अवश्य अशा वस्तूंचाहि अंतर्भाव करावा लागतो. तसेंच या आवश्यक वस्तूंत अमुक एका श्रमाच्या शाखेसाठीं जरूर लागणारें चातुर्य अथवा विद्या शिकण्यासाठीं करावयाच्या खर्चाचाहि या आवश्यक वस्तूंत समावेश होतो. अर्थात सर्वसामान्य श्रमशक्तीचा विचार करतां हा खर्च फारसा नसतो.

## श्रममूल्य कसें ठरतें

श्रमशक्तीचें मूल्य हें जीवनास आवश्यक अशा वस्तूंच्या अमुक इतक्या मूल्याबरोबर असतें असें यावरून कळून येईल. या आवश्यक वस्तु जशा कमी अथवा अधिक लागतील, म्हणजे त्यांच्या उत्पादनास वेळ ज्या मानानें कमी अथवा अधिक लागेल त्या मानानें श्रमशक्तीचें हें मूल्य कमी अथवा अधिक होतें. या आवश्यक वस्तूपैकीं अन्नद्रव्यें, सरपण वगैरे वस्तू रोजच्या रोज संपविल्या जातात. म्हणून त्यांची रोजच्या रोज भरतीहि करावी लागते. कपडे, गृहसाहित्य इत्यादि

आवश्यक वस्तु भोगून संपण्याला अधिक काळ लागतो आणि म्हणून त्यांच्या जागीं नव्या वस्तु दीर्घकाळानें आणाव्या लागतात. कांहीं वस्तूंची किंमत रोज द्यावी लागते, दुसऱ्या कांहींची आठवड्यानें, तीन महिन्यांनीं वगैरे द्यावी लागते.पण अमूक एका काळावर-समजा १ वर्षा-वर या सर्व आवश्यक वस्तूंच्या खर्चाची वाटणी केली तरी मजूराला रोजच्यारोज जें सरासरी उत्पन्न मिळत राहील त्यांतूनच हा सर्व खर्च भागवावा लागतो. म्हणजे मजुराला उभ्या वर्षांत ज्या आवश्यक वस्तु लागतील त्यांचें मूल्य ठरवून त्या मूल्यास ३६५ नीं भागलें असतां रोजचा मजूरीचा दर ठरतो. हा मजूरीचा सरासरी दर वसूल करण्या-साठीं ६ तासांचे श्रम अवश्य आहेत असें आपण धरून चाललों तर मजूराची श्रमशक्ति ही अर्ध्या दिवसाच्या सामाजिक श्रमाइतकी असते, अथवा श्रमशक्ति निर्माण करण्यासाठीं अर्ध्या दिवसाचें काम ( १२ तासांचा सबंध दिवस असें धरून चालून ) अवश्य असतें असें म्हणतां येईल. रोजच्यारोज श्रमशक्ति निर्माण करण्यासाठीं जें हें श्रमाचें परि-माण लागतें तें या श्रमशक्तीचें रोजचें मूल्य होय. जर अर्ध्या दिव-साचे सरासरी सामाजिक श्रम हे ७५ सेंट किंमतीच्या सोन्यांत समा-विष्ट केलेले असले तर अर्ध्या दिवसाच्या श्रमशक्तीची किंमत ७५ सेंट सोनें आहे असें समजावें.जर श्रमशक्तीचा मालक रोज ७५सें.ला आपली श्रमशक्ति विकीत असेल तर तिची विक्रीची किंमत त्या श्रमशक्तीच्या मूल्याइतकी असते. आणि हें मूल्य भांडवलदारानें उत्पादनखर्चांत ) देऊन टाकलें आहे असें आपण धरून चाललों आहों.)

## मजूर पत निर्माण करतो

आपण जिला श्रमशक्ति असें म्हणतों त्या चमत्कृतिपूर्ण विक्री-

वस्तूचें एक वैशिष्ट्य असें आहे कीं ज्यावेळीं विक्रेता आणि गिऱ्हाईक यांचेमध्यें श्रमशक्तीच्या खरेदीविक्रीचा करार होतो त्यावेळीं श्रमशक्ति या विक्रीमालाचें उपयोगमूल्य गिऱ्हाइकाला देऊन टाकलेलें नसतें. श्रमशक्तीचें उपयोगमूल्य ती खरेदी केल्यानंतर प्रत्यक्ष तिचा वापर होतो तेव्हां पदरांत पडतें. याप्रमाणें श्रमशक्तीचीं विक्री आणि तिचा प्रत्यक्ष वापर ह्या दोन्हीमध्यें कांहीं वेळ जात असतो. पण ज्या विक्रीमालाची विक्री आधी होऊन त्यांचा उपयोग गिऱ्हाईकाकडून कांहीं कालानें केला जातो त्या विक्रीमालाची किंमत तो उपयोग पूर्ण झाल्यानंतर दिली जाते. भांडवलशाही उत्पादनपद्धति ज्या ज्या देशांत असतें त्या त्या देशांत श्रमशक्तीचा वापर झाल्यानंतर म्हणजे आठवडाभर श्रमशक्ति वापरल्यानंतर मजूरी वाटण्यांत येते. यावरून मजूर हा श्रमशक्तीचें उपयोगमूल्य भांडवलदाराला उधारीनें देत असतो असें दिसून येतें. आपण श्रमशक्तीची किंमत घेण्यापूर्वी तो गिऱ्हाइकाला तिचा वापर करूं देतो. म्हणून मजूर हाच सर्व देशांत भांडवलदाराला पत निर्माण करून देतो असें म्हणावें लागतें.

---

## वाढावा कसा उत्पन्न होतो : : : ५*

### श्रमशक्तीचा वापर

उपयोगांत येणारी श्रमशक्ति म्हणजेच श्रम होत. श्रमशक्ति खरेदी करणारा भांडवलदार श्रमशक्ति विकणाऱ्यालाच ती वापरावयास लावून ती श्रमशक्ति आपल्या पदरांत पाडून घेतो. भांडवलदार हा अतिशय चतुराईनें धनोत्पादनसाधनें निवडतो. त्याचप्रमाणें आपल्या धंद्याच्या विशिष्ट शाखेस अवश्य अशी श्रमशक्तिहि निवडतो. सूत काढण्याची गिरणी, जोडे करण्याचा कारखाना, वगैरे जो त्याचा धंदा असेल त्या धंद्यांत मजूराला तो आपलें धनोत्पादनसाधन त्याच्या श्रमांनीं वापरूं देतो, श्रमशक्ति बाजारांत जशी उपलब्ध असेल तशी त्याला पत्करावी लागते. अगदीं आरंभीं मिळणारी श्रमशक्ति भांडवलशाही नव्हती अशा काळांतली असते; तीच तो घेतो. श्रम हे भांडवलाच्या नियंत्रणाखालीं आले म्हणजेच मग उत्पादनप्रकारांत बदल होत जातात. त्यांचा विचार पुढें करतां येईल.

---

*कॅपिटल, खंड १, प्रकरण ७

## श्रमशक्तीच्या वापराचीं वैशिष्ट्यें

भांडवलवाल्याला विकलेल्या श्रमशक्तीचा वापर करणें ही जी श्रमाची प्रक्रिया तिचीं दोन वैशिष्ट्यें आहेत.

मजूर हा भांडवलदाराच्या नियंत्रणाखालीं श्रम करतो. काम योग्य प्रकारें व्हावें आणि धनोत्पादनसाधनांचा उपयोग योग्य कामीं व्हावा याची भांडवलदार काळजी घेतो. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे श्रमकार्य चालू असतां मजूराला स्वातंत्र्य व स्वावलंबन रहात नाहीं.

दुसरें वैशिष्ट्य म्हणजे मजूराच्या श्रमानें उत्पन्न झालेला माल हा मजूराचा रहात नसून भांडवलदाराच्या मालकीचा होतो. श्रमशक्तीचें रोजचें मूल्य भांडवलदार मजूराला देतो असें आपण गृहीत धरलें आहे. अर्थात् ती श्रमशक्ति वापरण्याचा हक्क त्याला पोहोंचतो. तसेंच धनोत्पादनसाहित्य वगैरे कारखान्यास अवश्य असणाऱ्या वस्तु भांडवलदाराच्या मालकीच्या असतात. यामुळें श्रमकार्य हें भांडवलदारानें खरेदी केलेल्या साहित्यांतच चालत असतें; आणि त्या श्रमकार्यापासून उत्पन्न झालेला मालहि भांडवलदाराच्याच मालकीचा होतो.

## वरकड मूल्यासाठीं माल निर्मिती

हा उत्पन्न झालेला माल सूत, बूट, असा कांहीं तरी उपयोगमूल्य असतो. पण जरी बूट वगैरे माल सामाजिक प्रगतीला अवश्य असतो, आणि आमचा भांडवलदारहि निःसंशय प्रगतिशील मनुष्य असतो, तरी पण तो बुटासाठीं बूट निर्माण करीत नाहीं. उपयोगमूल्यें हीं विनिमयमूल्यें आहेत व होतील, एवढ्याच दृष्टीनें तो तीं निर्माण करतो. भांडवलदाराच्या डोळ्यापुढें दोन हेतु असतात. त्याला विनिमयमूल्य

असलेलें उपयोगमूल्य निर्माण करावयाचें असतें. तो विकण्याची वस्तू म्हणजे विक्रीमाल निर्माण करतो. त्याचा दुसरा हेतु म्हणजे बाजारांत त्यानें ज्या धनोत्पादनसाधनासाठीं व श्रमशक्तीसाठीं पैसा खर्च केला त्या पैशाहून अधिक मूल्य असलेला विक्रीमाल त्यास निर्माण करावयाचा असतो. त्याला नुसते उपयोगमूल्य निर्माण करावयाचें नसून विनिमयमूल्य निर्माण करावयाचें असतें. नुसतें विनिमयमूल्य नव्हे, तर वरकडमूल्य ( वाढावा—सर्प्लस व्हॅल्यू ) त्यास निर्माण करावयाचें असतें. विक्रीमालाचें मूल्य हें त्यांत असलेल्या श्रमाच्या परिमाणावरून ठरतें हें आपणांस माहीत आहे. भांडवलदाराच्या पदरांत जो श्रमजन्य माल पडतो त्यालाहि हाच नियम लागू आहे. म्हणून मजूराच्या श्रमानें उत्पन्न झालेल्या मालांत श्रम खर्ची किती पडले ह्याचा आपण प्रथम हिशेब करूं.

## विक्रीमालांतील श्रमाचा हिशेब

उदाहरणादाखल आपण सूत घेऊं. सूत काढण्यासाठीं कच्चा माल म्हणून १० पौंड कापूस लागेल. या कापसाचें मूल्य किती याची चौकशी सध्यां नकोच. भांडवलदारानें तो २·५० डॉ. ला खरेदी केला असें धरून चालूं. कापसाच्या किंमतींत असणारे श्रम सरासरी सामाजिक श्रम या नात्यानें कापसाच्या किंमतींत अंतर्भूत झाले आहेत. तसेंच कापूस कातण्याच्या चात्या वगैरे श्रमसाधनांच्या निर्मितींत ५० सेंट मूल्य निर्माण झालें आहे. ३ डॉ. किंमतीचें सोनें ही जर २४ तासाची म्हणजे कामाच्या २ दिवसांची निर्मिती असेल तर सुतामध्यें २ दिवसांचें काम अंतर्भूत आहेच असें सिद्ध होतें. कापूस निर्माण करण्याकरितां खर्च झालेला वेळ सूत निर्माण करण्याच्या वेळांत अंतर्भूत आहे. कारण कापूस हा सुताचा कच्चा माल होय.

हीच गोष्ट सूत कातण्याच्या चात्यांनाहि लागू आहे. कारण या चात्यांची झीज झाल्यावांचून सूत कांतलें जाऊंच शकणार नाहीं. त्या त्या सामाजिक परिस्थितींत अपरिहार्य इतकी श्रमवेळ सूत कातण्याचे कामीं खर्च झाली आहे असें आपण धरून चालतों आहों. याप्रमाणें १ पौंड सूत कातण्याला जर १ पौंड कापूस लागणार असेल तर तेवढाच कापूस कारखान्यांत खर्च होईल. तीच गोष्ट चातीलाही लागू आहे. कारखानदाराला लोखंडी चात्याऐवजीं सोन्याच्या चात्या वापरण्याची लहर आली तरी सुताच्या मूल्याचा हिशेब करतांना सूत कातण्यासाठीं लागणाऱ्या लोखंडी चात्यांच्या निर्मितीसाठीं जो सामाजिक वेळ लागेल तोच लक्षांत घेतला जाईल.

## मजूराचे श्रम किती

आतां आपण सूत कातणाऱ्या मजूरानें किती मूल्य कापसांत वाढविलें याचा विचार करूं. आपण असें गृहीत धरलें आहे कीं सूत कातण्याचे श्रम हे अगदीं साधे, चातुर्य न लागणारे, एका विशिष्ट समाजव्यवस्थेंतील सरासरी श्रम होत. (याविरुद्ध गृहीत धरलें तरी फलितार्थ बदलत नाहीं हें पुढें आपल्या लक्षांत येईल.)

अमुक एका सामाजिक परिस्थितींत सूत कातण्याला जो वेळ लागत असेल त्याहून अधिक वेळ खर्च होणार नाहीं ही गोष्ट महत्त्वाची आहे. उत्पादनाच्या सर्वसामान्य परिस्थितींत १ तासामध्यें १ $\frac{२}{३}$ पौंड कापसाचे १ $\frac{२}{३}$ पौंड सूत जर काढलें तर अशा वेगानें केलेल्या १२ तास कामासच १२ तासाचें काम म्हणतां येईल. या १२ तासांत (१२ × १ $\frac{२}{३}$) पौंड कापसाचें (१२ × १ $\frac{२}{३}$) पौंड सूत निघेल. या व्यवहारांत सामाजिक दृष्ट्या आवश्यक श्रमवेळ हीच उत्पादक श्रमवेळ मानली जाते हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

श्रम हे सूत काढण्याचे कामीं खर्च झाले, त्यांचा कच्चा माल कापूस हा होता, निघालें तें सूत निघाले, यापैकीं कोणतीहि गोष्ट मूल्य निर्मितीच्या प्रश्नाचा विचार करतांना विचारांत घेण्याचें कारण नाहीं. सुताच्या गिरणींत या मजूराला न लावतां कोळशाच्या खाणींत त्याला लावलें असतें तर त्याच्या श्रमाची वस्तु निसर्गानें दिलेला कोळसा ही ठरली असती. खाणींतून काढलेला १ हंड्रेड्वेट कोळसा हा अमुक एका खर्च झालेल्या श्रमाचेंच प्रतीक ठरला असता.

## जितके श्रम तितकें मूल्य

श्रमशक्ति विकली गेली तेव्हां तिचें रोजचें मूल्य ७५ सेंट ठरलें आणि हे ७५ सेंट ६ तासांच्या कामांत अंतर्भूत आहेत असे आपण धरून चालतों. अर्थात ७५ सेंट इतकें मूल्य निर्माण करण्यास म्हणजे मजूराला दर दिवसाला लागणाऱ्या आवश्यक वस्तूंचें मूल्य निर्माण करण्यास ६ तासांचे श्रम करावे लागतात. आतां आमचा सूत कातणारा मजूर जर १ तासांत १ २/३ पौं. कापसाचे २/३ पौं. सूत काततो तर ६ तासांत १० पौंड कापसाचे १० पौं. सूत काततो. सूत कातण्याच्या या क्रियेनें कापूस हा श्रमाचे ६ तास खाऊन टाकतो. ही श्रमवेळ ७५ सेंट इतक्या सोन्याबरोबर आहे. म्हणून सूत कातण्याच्या श्रमानें कापसांत ७५ सेंट नवे मूल्य निर्माण झालें आहे. आतां आपण १० पौंड सुताच्या एकंदर मूल्याचा विचार करूं. त्यांत २ १/२ दिवसांचे श्रम समाविष्ट आहेत. पैकीं २ दिवस कापूस व श्रमसाधनें यांचे आणि सूत कातण्याच्या कामाचा अर्धा दिवस, हे मिळून २ १/२ दिवस. इतक्या सर्व श्रमवेळाचें मूल्य ३·७५ डॉ. असतें. १० पौं. सुताच्या मूल्याबरोबर असणारी किंमत ३·७५ डॉ. असते. १ पौं. सुताची किंमत ३७·५ सें. असते.

हें पाहून आमचा भांडवलवाला चकित होतो. उत्पन्न झालेल्या मालाचें मूल्य त्याच्या निर्मितींत गुंतवलेल्या भांडवलाच्या मूल्याइतकें असतें. भांडवल म्हणून जें मूल्य खर्च केलें तें कांहीं वरकडमूल्य म्हणजे वाढावा निर्माण करीत नाहीं. १० पौंड सुताची किंमत ३·७५ डॉ. असून हे ३·७५ डॉ. २·५० डॉ. इतकी कापसाची किंमत, श्रमसाधनांच्या झिजेदाखल ५० सें. आणि ७५ सें. सूत-कातणाऱ्याच्या श्रमशक्तीची किंमत इतक्याचे बनलेले आहेत.

## भांडवलदारानें उत्पादन कां करावे ?

आपला भांडवलदार कदाचित म्हणेल कीं भांडवल जें गुंतवलें तें अधिक पैसा निर्माण व्हावा यासाठींच गुंतविलें. पण नरकाचा रस्ता सद्हेतूनेंच घडविलेला असतो. कदाचित धनोत्पादन न करतां पैसा मिळावा अशीही इच्छा त्यानें केली असेल. पण उपयोग काय ? अधिक पैसा मिळाला नाहीं म्हणून यापुढें आपण स्वतः माल निर्माण न करतां बाजारांतच खरेदी करावा असें तो ठरवील. पण त्याचे सर्व भांडवलदार बांधव जर असेंच करतील तर बाजारांत वस्तु मिळणार कोठून ? बरें, पैसा कांहीं खातां येत नाहीं. भांडवलदाराचा जीव कासावीस होतो; त्याचा स्वार्थत्याग लक्षांत घेतला पाहिजे. त्यानें ते ३·७५ डॉ. उधळून टाकले नसते का ? पण ते शिल्लक ठेवून त्यानें ते उत्पादनासाठीं वापरले आणि त्यापासून सूत तयार केलें. पण यामुळेंच मनांत मळमळ राहण्याऐवजीं त्याच्या हातांत उत्तम सूत राहिलें. शिवाय जेथें कांहींच मिळत नाहीं अशा ठिकाणीं राजासुद्धां आपला हक्क बजावीत नाहीं. त्या भांडवल-दाराचा त्याग ( पैसा शिल्लक ठेवण्यांत केलेला ) हा कितीहि पुण्याईचा असो, त्याचा मोबदला पैशाच्या रूपांत देतां येईल असें कांहींच येथें उरलें नाहीं; कारण उत्पादनक्रियेंतून जो विक्रीमाल उत्पन्न झाला

त्याचें मूल्य त्या उत्पादनप्रक्रियेंत गुंतलेल्या सर्व मूल्याच्या बेरजेइतकें आहे. म्हणून त्यानें सद्गुणाचें बक्षीस सद्गुण हेंच असतें असें समजून आपलें समाधान मानून घेतलें पाहिजे. पण असें न करतां तो कुरकुरूं लागतो. सूत हें त्याला अगदींच निरुपयोगी आहे. त्यानें तें विक्रीसाठीं उत्पन्न केलें आहे. म्हणून तो तें विकून टाकील. आणि यापुढें फक्त स्वतःला लागणाऱ्या उपयुक्त वस्तूच निर्माण करील. तो संतापतो. मज़ूराला केवळ स्वतःच्या इंद्रियांनीं विक्रीमाल निर्माण करतां आला असता काय? मजूरांनीं ज्याच्या सहाय्यानें उत्पादक श्रम केले तें साहित्य भांडवलदारानेंच त्याला दिलें ना? त्या साहित्यांतच मजूरानें आपले श्रम घातले ना? समाजांतील बहुसंख्य लोक कफल्लक असतात हें लक्षांत घेतां आपणाजवळ असलेला कापूस, चात्या यांचा धनोत्पादनासाठीं उपयोग करून भांडवलदारानें समाजाची बहुमोल नोकरी केली नाहीं काय?

## भांडवलदारही श्रम करतो!

मज़ूराला मजूरीदाखल जीवनसाहित्य पुरवून मजूरावरहि भांडवलदारानें उपकार केला नाहीं काय? इतकी जी भांडवलदारानें सेवा केली तिचें वेतन त्यानें कांहींच घेऊं नये का? पण उलट प्रश्न असा कीं मजूरानेंहि कापूस व चाती यांचें रूपांतर सुतांत करून भांडवलदाराची सेवा केलीच कीं नाहीं? शिवाय येथें सेवेचा प्रश्नच नाहीं. सेवा म्हणजे उपयोगमूल्याचा प्रत्यक्ष उपयोग करणें. मग हे उपयोगमूल्य एखादा विक्रीमाल असो अथवा नुसते श्रम असोत; पण येथें फक्त विनिमयमूल्याचाच प्रश्न आहे. भांडवलदारानें ७५ सें. चें मूल्य मजूरास दिलें. मजूरानेंहि नेमकें तितकेंच मूल्य कापसांत मिळविलेल्या ७५ सें. मूल्याच्या रूपानें भांडवलदारास दिलें. येथें मूल्याची मूल्यानें

फिटाफीट झाली. आतां आपला भांडवलदार मित्र क्षणभरापूर्वीचा पैशाच्या पिशवीचा गर्व सोडून देऊन मजूराची विनम्र भूमिका पत्करतो. भांडवलदारानेंहि श्रम केले नाहींत का ? सूत कातणाऱ्यावर देखरेख-त्यांचें नियंत्रण, हें भांडवलदारानें केलें ना ? त्यापासूनहि मूल्य उत्पन्न होत नाहीं का ? हा भांडवलदाराचा प्रश्न ऐकतांच भांडवलदाराचे निरीक्षक व नियंत्रक चपापतात. पण इतक्यांत त्याचीं मुद्रा खुलते. आपल्या घोटाळ्याच्या शब्दानें त्यानें आम्हांला बनवलेलें असतें. पण त्याला त्याची मुळींच फिकीर नसते. हें व अशा तऱ्हेचे सर्व फसवे-गिरीचे युक्तिवाद पुन्हां पुन्हां वटवटण्यासाठीं अर्थशास्त्राच्या प्रोफे-सरांना पगार दिलेला असतो. तो ऑफिसच्या बाहेर जें कांहीं बोलतो त्याचा कधीं विचारच करीत नाहीं. ऑफिसच्या आंत आपण काम करतों एवढें त्याला माहीत असतें.

## थोडें सूक्ष्म परीक्षण

या एकंदर विषयाचें आपण आतां आधिक सूक्ष्म परीक्षण करूं. रोजच्या श्रमशक्तीचें मूल्य ७५ सेंट आहे. कारण त्यांत अर्ध्या दिवसाचे श्रम अंतर्भूत आहेत. श्रमशक्तीच्या निर्मितीसाठीं रोज लागणाऱ्या ज्या आवश्यक वस्तू त्यांची उत्पत्ति अर्ध्या दिवसांत होते. पण खर्च झालेल्या श्रमशक्तींत अंतर्भूत झालेले श्रम आणि अजून खर्च करतां येतील असे श्रम या दोन वेगळ्या वस्तू आहेत. २४ तास जगण्याला मजूराला अर्ध्या दिवसाच्या कामाचें मूल्य लागतें खरें, पण जगण्या-इतकें मूल्य एकदां मिळाल्यानंतर सगळा दिवस काम करणें मजूराला अशक्य होत नाहीं. श्रमशक्तीचें मूल्य आणि श्रमशक्तीचा उत्पादन-क्रियेंत वापर या दोन गोष्टी अगदीं भिन्न आहेत. श्रमशक्ति खरेदी करतांनाच भांडवलदाराच्या डोळ्यापुढें हा फरक होता. श्रमशक्तीचा

उपयुक्त गुण म्हणजे सूत अथवा बूट तयार करण्याचें कसब हें मूल्यनिर्मिण्यास दुय्यम अवश्य होतें. कारण मूल्य निर्माण करण्यासाठीं विशिष्ट प्रकारचे उपयुक्त श्रम करावेच लागतात. मुख्य निर्णायक बाब म्हणजे श्रमशक्ति या विक्रीमालाचें विशिष्ट स्वरूपाचें मूल्य ही होती.

## आणि यांत अन्याय नाहीं

श्रमशक्ति हा विक्रीमाल केवळ मूल्य निर्माण करणारा असतो इतकेंच नव्हे तर अंगभूत मूल्याहून अधिक मूल्य निर्माण करणारा असतो हा त्याचा विशेष होय. भांडवलवाल्यानें त्याच्या पासून ही सेवा आपेक्षिलेली असते आणि अशी अपेक्षा करतांना विक्रीमालाच्या देवघेवीसंबंधाचे जे त्रिकालबाधित सिद्धांत आहेत त्यांना धरूनच तो वागत होता. कारण इतर कोणत्याहि विक्रीमालाच्या विक्रेत्याप्रमाणें श्रमशक्तीच्या विक्रेत्यालाहि विनिमयमूल्य मिळावें आणि तो आपलें उपयोगमूल्य विकतो. तेल विकणाऱ्या व्यापाऱ्याला जसें तेलाचें उपयोग मूल्य स्वतःला मुळींच नको असतें, त्याप्रमाणें श्रमशक्ति विकणाऱ्या मजूराला श्रमशक्तीचें उपयोगमूल्य मुळींच नको असतें. भांडवलदारानें श्रमशक्तीचें दैनिक मूल्य देऊन टाकलें आहे. अर्थात् सर्व दिवस त्या श्रमशक्तीचा उपयोग करणें हें आतां भांडवलदाराच्या हक्काचें आहे. रोजच्या श्रमशक्तीला टिकविण्यासाठीं फक्त अर्ध्या दिवसाच्या श्रमाचें मूल्य खर्चावें लागतें. पण ही श्रमशक्तिसर्व दिवसभरहि वापरतां येते. अर्थात् तिच्या सर्व दिवसाच्या वापरानें तिला आवश्यक लागणाऱ्या मूल्याच्या दुप्पट मूल्य तिच्या वापरांत निर्माण होतें. श्रमशक्ति खरेदी करणाराला ही परिस्थिति भाग्याची आहे तें खरेंच, पण त्यामुळें श्रम-शक्ति विकणारावर अन्याय झाला असें म्हणतां येणार नाहीं.

आमच्या भांडवलवाल्यानें ही परिस्थिति आगाऊच हेरलेली असून त्यामुळें त्याला अत्यानंद झालेला असतो. म्हणून मजूराला कारखान्यामध्यें केवळ ६ तासच पुरेल इतकें धनोत्पादनसाहित्य मिळत नसून १२ तास पुरेल इतकें साहित्य त्यास मिळत असते. जर १० पौंड कापसापासून ६ तासांत १० पौंड सूत निघते तर २० पौंड कापसापासून १२ तासांत २० पौं. सूत निघालें पाहिजे. या वाढलेल्या श्रमवेळांत निर्माण झालेल्या मालाचा आतां आपण थोडासा विचार करूं.

## मूल्यनिर्मिती व वाढावानिर्मिती

५ दिवसांचे श्रम आतां २०पौं.सुतांत अंतर्भूत झालेलें आहेत. कापूस आणि चातीचे झिजलेले पोलाद यांचे ४ दिवस आणि सूत कातण्याचा १ दिवस. सोन्याच्या परिभाषेत बोलावयाचें म्हणजे ७·५० डॉ. इतकें मूल्य २० पौंड सुतांत आहे. ही २० पौंड सुताची किंमत होय. दर पौंडाला अजूनहि सुताला ३७.५ सें. किंमत पडते. परंतु उत्पादनक्रियेंत समाविष्ट होणारें मूल्य ६·७५ डॉ. आहे आणि एकंदर सुताचें मूल्य ७-५० डॉ. आहे. अशा प्रकारें उत्पन्न झालेल्या मालांत उत्पादनक्रियेंत गुंतवलेल्या मूल्याच्या $\frac{1}{9}$ मूल्याइतकी वाढ झालेली आहे. ६·७५ डॉ. याचें रूपांतर ७·५० मध्यें केलें आहे. ७५ सें. इतका वाढावा मिळाला. युक्ति यशस्वी झाली. सर्व आवश्यक परिस्थिति भांडवलदारास समाधानकारक मिळाली. विक्रीमालाच्या विनिमयाचे कायदे मुळींच मोडावे लागले नाहींत. कारण सारख्या मूल्याचा सारख्या मूल्याशीं विनिमय झाला. विक्रीमालाचें गिऱ्हाईक या नात्यानें भांडवलदारानें कापूस, चात्या व श्रमशक्ति यांचें मूल्य देऊन टाकलें होतें. विक्रीमालाचे इतर कोणीहि गिऱ्हाईक जसें वागेल तसेंच तो वागला. म्हणजे आपल्या विक्रीमालाचें उपयोगमूल्य त्यानें वापरलें.

श्रमशक्तीच्या वापरानें ७·५० डॉ. किंमतीचे २० पौंड सूत मिळाले. आतां भांडवलदार बाजारांत जातो आणि आपला विक्रीमाल विकतो. १ पौंड सूताला ३७·५ सें. याप्रमाणें तो तें विकतो. १ फार्दिंग-सुद्धां कमी अथवा अधिक घेत नाहीं. तरीसुद्धां या विक्रीच्या व्यवहारांत त्यानें मूळ घातलेल्या भांडवलापेक्षां ७५ सें. त्यास अधिक मिळतात. मूल्यनिर्मितीचें कार्य आणि वाढावा–निर्मितीचें कार्य यांची तुलना केली असतां वाढावा निर्मितीचें कार्य हें मूल्यनिर्मितीचें कार्यच आणखी कांहींवेळ चालू ठेवल्यानें होतें असें दिसून येईल. जर श्रमशक्ति वापरण्याचें कार्य, श्रमशक्तीसाठीं घातलेलें जें भांडवल तितकेंच परत निर्माण व्हावें इतका वेळ, चालू ठेवलें तर हें फक्त मूल्य-निर्मितीचेंच कार्य होईल. पण त्या पलीकडे जर श्रमशक्ति वापरणं चालू ठेवलें तर तें वाढावा निर्माण करण्याचें कार्य असें ठरेल.

## उत्पन्न धनांत मूल्य किती

पण श्रम हे सामाजिक दृष्ट्या आवश्यक इतक्या वेळांत जितक्या प्रमाणांत एखादे धन निर्माण करतील तितक्याच प्रमाणांत मूल्य निर्माण करतात असें मानलें जातें. श्रमशक्तिहि रूढ परिस्थितींतच खर्च झाली पाहिजे. जर आपोआप चालणारी चाती ही सूत काढण्याच्या गिरणींत सर्वसामान्यतः वापरण्यांत येत असेल तर मजूराला सुताचा रहाट देतां येणार नाहीं. सामान्यतः चांगला असा कापूस न देतां वाईट कापूस मजूराला देणें अयोग्य ठरेल. कारण या दोनहि बाबतींत दर पौंड सुतामागें सामाजिक दृष्ट्या अनवश्यक इतका वेळ त्याला घालवावा लागेल. या फाजील वेळांत मूल्यहि निर्माण होणार नाहीं व त्याला पैसाहि मिळणार नांहीं. शिवाय श्रमशक्तिहि सर्वसामान्य अशी असली पाहिजे. उत्पादनाच्या ज्या शाखेंत ती खर्च केलेली असेल

त्या शाखेंतील कसबाच्या सरासरींइतकें कसब त्या श्रमशक्तींत असलें पाहिजे. तसेंच अमुक एकावेळीं तिचा व्यय करण्याचा जो वेळ असेल, आणि ती खर्च करण्याचें जे परिणाम असतील तितकीच ती खर्चावी लागेल. या सर्व गोष्टी भांडवलदार अतिशय काळजी-पूर्वक पहात असतो. आपले कामगार एक क्षणाहि आळसांत वाया घालवीत नाहींत याची तो काळजी घेतो. अमुक वेळ वापरण्यासाठीं त्यानें श्रमशक्ति खरेदी केलेली असते. आणि तो हक्क बजावण्याचा त्याचा आग्रह असतो. तो आपली लूट होऊं देणार नाहीं. तसेंच कच्चा माल व हत्यारें यांचाहि गैरवापर तो होऊं देणार नाहीं. कारण गैर वापरलेला कच्चा माल व हत्यारें हीं वाया गेलेले श्रम होत.त्यांचा उत्पन्न धनांत समावेश होत नाहीं, अथवा त्यांचें मूल्यहि बनत नाहीं.

## कसबी व बिन कसबी श्रम

आपण वर पाहिलेंच आहे कीं वाढावा उत्पन्न करण्याचे कामीं खर्च झालेले श्रम हे अगदीं साधे सरासरी गुणाचे श्रम असतात कीं बऱ्याच भानगडीचे असतात हा मुद्दा महत्त्वाचा नाहीं. जे श्रम अधिक उच्च दर्जाचे अथवा अधिक गुंतागुंतीचे असतील त्यांना लागणारी श्रमशक्ति निर्माण करण्यासाठीं जे आवश्यक चरितार्थधन लागेल त्यासाठीं अधिक वेळ खर्च होईल. आणि अर्थात् अशा श्रमांत बिनकसबाच्या श्रमशक्तीपेक्षां अधिक मूल्य असेल. ही श्रमशक्ति अधिक मूल्यवान असल्यानें अधिक उच्च दर्जाच्या कामीं ती लावण्यांत येईल. अर्थात् बिनकसबाच्या श्रमांनीं जेवढ्या वेळांत जितकें मूल्य निर्माण होईल त्यापेक्षां अधिक मूल्य तेवढ्याच वेळांत कसबाच्या श्रमांनीं निर्माण होईल. पण सूत कातणाऱ्याच्या श्रमांत आणि जव्हेऱ्याच्या श्रमांत कितीहि फरक असो, जव्हेरी हा आपल्या श्रमाच्या

ज्या विभागानें आपल्या श्रमशक्तीइतकें मूल्य निर्माण करतो तो विभाग वाढावा निर्माण करणाऱ्या श्रमशक्तीच्याच प्रकाराचा असतो.*

---

* कसबाचे श्रम आणि बिनकसबाचे श्रम यामधील फरक हा अंशतः भ्रममूलक आहे. निदान इतकें तरी खरें कीं हा फरक आतां वस्तुस्थितींत उरलेला नाहीं. परंपरागत रूढींत तुरळकपणें कोठें उरला असेल तेवढाच. अंशतः हा फरक शिल्लक राहण्याचें कारण कांहीं विशिष्ट प्रकारच्या मजूरांना त्यांच्या विशिष्ट परिस्थितीमुळें आपल्या श्रमशक्तीचा मोबदला इतर मजूरा-इतका मिळवतां येत नाहीं. कांहीं आकस्मिक परिस्थितीचा केव्हां केव्हा एवढा परिणाम घडतो कीं त्यामुळें कसबी मजूर हे अकसबी गणले जातात व अकसबी मजूर कसबी गणले जातात. उदा. कामगारांची शरीरप्रकृति जेथें खालावलेली असते आणि जेथें कामगार थकलेले असतात ( भांडवलशाही पद्धति जेथें खूप विकसली आहे तेथें असा प्रकार असतो ) अशा देशांत हलक्या दर्जाच्या कामाला खूप शारीरिक शक्ति लागत असून तें काम कसबी काम असें मानलें जातें. उलट अधिक नाजुक अशा प्रकारचीं जीं कामें असतात तीं अकसबी कामें अशीं मानलीं जातात. इंग्लंडांतल्या एका गवंड्याचें उदाहरण आपण घेऊं. त्याचें काम कोष्टयाच्या कामापेक्षां अधिक उच्च दर्जाचें आहे. उलट कापूस फोडण्याचें काम अधिक शारीरिक कष्टाचें असतें, तरी तें अकसबी गणलें जातें. शिवाय आपण हेंहि लक्षांत ठेवलें पाहिजे कीं कसबाचें काम म्हणून जें म्हणतात त्याचें एकंदर प्रमाण सगळ्या राष्ट्राच्या एकूण श्रमांत फार थोडें असतें. लेइंग हा लेखक हिशेब करून सांगतो कीं इंग्लंड आणि वेल्समध्यें १ कोटि १० लक्ष माणसांचें जीवन अकसबी कामावर अवलंबून आहे. लेइंगनें हा हिशेब केला त्या काळीं १ कोट ७० ल. लोकसंख्या इंग्लंडांत होती. त्यांतील १० लक्ष लोक श्रीमान म्हणून आणि १० लक्ष लोक दरिद्री, गुंड, गुन्हेगार, वेश्या म्हणून वगळले तर ४० लक्ष लोक मध्यमवर्गीय म्हणून उरतात. लहान लहान अशा गुंतवलेल्या भांडवलाच्या व्याजावर जगणारे लोक, अधिकारी, लेखक, कलावंत, शाळामास्तर वगैरे हे सर्व मयध्मवर्गांत मोडतील. हा ४० लक्षाचा आकडा भरण्यासाठीं लेइंगनें

त्यांत मध्यमवर्गीय म्हणून अधिक पगार असलेले जे कारखाना—कामगार त्यांचा समावेश केला आहे. उलट बँकवाल्यांना तो त्यांतून वगळतो. गवंड्यांना कसबी कामगार म्हणून लेखतो. बाकी १ कोटी १० लक्ष उरतात. ( एस् लेइंगः—नॅशनल डिस्ट्रेस, लंडन १८४४ ). जेम्स मिल्ल यानें "ज्यांना स्वतःच्या अन्नासाठीं श्रमाखेरीज खर्चण्याला कांहींहि नसतें असा वर्ग हाच सामान्य जनतेंतील बहुसंख्य असतो" असें म्हटलें आहे. ( एन् सायक्लोपेडिया ब्रिटानिका १८३१ कॉलनी या लेखाची पुरवणी ).

# स्थिर (कॉन्स्टंट्) भांडवल व चर (व्हेरिएबल्) भांडवल : : : ६*

आतां आपणांस कळून आलेंच आहे कीं वाढावा हा धनोत्पादनाच्या प्रक्रियेमध्यें निर्माण होतो. तो कसा निर्माण होतो हेंहि आपणाला कळलें आहे. अर्थात निरनिराळ्या धंद्यांत भांडवल कितीहि घातलेलें असलें तरी वाढाव्याचें परिमाण भिन्न भिन्न असूं शकेल. कारण वाढावा जो निर्माण होतो तो अगदीं नवीन अशा श्रमांनीं होतो. मूळच्या धनोत्पादनसाधनांतून निर्माण होत नाहीं. पुन्हां आपल्या जुन्या उदाहरणाकडे वळूं. भांडवलदारानें कापूस आणि चात्या वगैरे साहित्यासाठीं ६ डॉ. खर्च केले आणि ७५ सेंट मजूरी मजूराला दिली. सूत कातण्याच्या श्रमानें ६ डॉ. मूल्य बदलूं शकलें नाहीं. ६ डॉ. हे जें उत्पादनसाधनाचें मूल्य तें तसेंच राहिलें. ७५ सें. जे मजूराला दिले ते वापरले जाऊन त्यांच्या जागीं मात्र १·५० डॉ. निघालेले आपणांस दिसून येतात.

* कॅपिट्ल, खं. १, प्र. ८-९; खं. ३, प्र. ८-१०; खं. २, प्र. ८.

## भांडवलाचे दोन प्रकार

धनोत्पादनसाधन म्हणजे कच्चा माल, साहाय्यक साहित्य व श्रमाचीं हत्यारें याबाबत खर्च झालेलें जें भांडवल त्याचें मूल्य धनोत्पादनाच्या प्रक्रियेंत मुळाइतकेंच राहतें, बदलत नाहीं. म्हणून आपण त्याला स्थिर (कॉन्स्टंट) भांडवल म्हणूं. उलट श्रमशक्ति खरेदी करण्याचें कामीं जें भांडवल खर्च केलें जातें त्याचें मूल्य उत्पादनाच्या क्रियेंत बदलतें. आपल्या मूल्याइतकें मूल्य निर्माण करून शिवाय तें वाढावाहि निर्माण करतें. हा वाढावा कोठें कमी असेल कोठें अधिक असेल. या भांडवलाचे स्थिर परिमाणांतून चर परिमाणांत रूपांतर केलें जातें म्हणून आपण त्यास चर भांडवल म्हणतों.

आतां एक गोष्ट स्पष्ट झाली आहे ती ही कीं उत्पादनाच्या निरनिराळ्या शाखांत स्थिर भांडवल व चर भांडवल यांचा जो परस्पर संबंध असतो तो निरनिराळा असूं शकतो. उदा. एंजिनाच्या कारखान्यांत धनोत्पादनांच्या हत्यारांच्या ज्या परिमाणाचें श्रमशक्तीनें रूपांतर करावयाचें असेल तें परिमाण सूत कातण्याची गिरणी अथवा कोळशाची खाण इत्यादि धंद्यांतील उत्पादनसाधनाच्या परिमाणाहून वेगळें असेल. स्थिर भांडवल म्हणजे धनोत्पादनसाधनें आणि चर भांडवल म्हणजे मजुरांची श्रमशक्ति यांच्या मधील प्रमाणांस आपण स्थिरचरसंबंध (ऑर्गॅनिक कॅांपोझिशन्) असें म्हणूं. धंद्यांच्या निरनिराळ्या शाखांत हा स्थिरचर भांडवलसंबंध (ऑर्गॅनिक कांपोझिशन् ऑफ कॅपिटल) वेगवेगळ्या प्रमाणांत असूं शकतो. हा वेगवेगळेपणा केवळ काल्पनिक नसून वस्तुस्थितींतही असतो.

## भांडवलाचा स्थिरचरसंबंध

तीन निरनिराळीं भांडवलें (तीन निरनिराळ्या धंद्यांच्या शाखांचीं)

आहेत व त्यांचे स्थिरचर भांडवलसंबंध भिन्न भिन्न आहेत अशी आपण कल्पना करूं.

( १ ) ८० स्थि. ( स्थिर भांडवल ) + २० च. ( चर भांडवल )
( २ ) ५० स्थि. ( ,, ) + ५० च. ( ,, )
( ३ ) २० स्थि. ( ,, ) + ८० च. ( ,, )

आतां आपण मजूरांच्या श्रमशक्तीचा वापर तीनहि शाखांत सारख्याच वेगानें होतो, म्हणजे प्रत्येक शाखेंत श्रमशक्तीस मिळणाऱ्या मजूरीच्या दुप्पट मूल्य मिळतें, अशी कल्पना करूं. त्यावरून आपणांस पुढीलप्रमाणें वाढावा मिळेल.

भांडवल नं. ( १ ):—२० डॉ. वाढावा.
भांडवल नं. ( २ ):—५० डॉ. वाढावा.
भांडवल नं. ( ३ ):—८० डॉ. वाढावा.

नफा हा सर्व भांडवलावर शेंकडेवारीनें आकारला जातो हें लक्षांत घेतां वरील तीन भांडवलावर अनुक्रमें २०%, ५०% आणि ८०% असा नफ्याचा दर पडतो. वरील उदाहरणांत आपण श्रमशक्तीचा वापर तीनहि ठिकाणीं सारखा होईल असें गृहीत धरलें आहे. पण बहुधा असें होत नाहीं. कांहींत हा वापर कमी तर कांहींत हा वापर अधिक होत असतो. तसेंच वाढाव्याचें परिमाण ठरविण्याचें कामीं धंद्यांच्या निरनिराळ्या शाखांत असणाऱ्या दुसऱ्याहि कित्येक परिस्थिति निर्णायक ठरत असतात. उदा. सर्व भांडवल भराभर वसूल होत जाणें ( टर्न ओव्हर ) ही एक बाब अशापैकीं आहे. हिचा विचार पुढें करण्यांत येईल. यावरून लक्षांत घ्यावयाचें तें हें कीं दोन निरनिराळ्या धंद्यांत उत्पन्न झालेला वाढावा सारखा असूं शकत नाहीं. एकाच धंद्याच्या दोन शाखांत तर ही विषमता अधिकच असते. तर मग शंका अशी येते कीं नफ्याचा दर सर्वसामान्यतः सारखा असतो हें कसें ?

## नफ्याचा दर सारखा कसा होतो

आतां आपण एका धंद्यांतल्या पांच निरनिराळ्या शाखा उदाहरणादाखल घेऊं. प्रत्येकींतील स्थिरचर भांडवलसंबंध भिन्नभिन्न आहेत असें समजूं. तसेंच चर भांडवल १००% वाढावा देतें अथवा वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे मजूरांना दिलेल्या मजूरीच्याइतकें मूल्य वाढावारूपानें पदरांत पडतें असें समजूं.

| | भांडवल | वाढावा | मालाचें मूल्य | नफ्याचा दर |
|---|---|---|---|---|
| (१) | ८० स्थि. + २० च. | २० | १२० | २०% |
| (२) | ७० स्थि. + ३० च. | ३० | १३० | ३०% |
| (३) | ६० स्थि. + ४० च. | ४० | १४० | ४०% |
| (४) | ८५ स्थि. + १५ च. | १५ | ११५ | १५% |
| (५) | ९५ स्थि. + ५ च. | ५ | १०५ | ५% |

याठिकाणीं निरनिराळ्या शाखांना अगदीं निरनिराळे नफ्याचे दर आहेत. श्रमाच्या वापराचा ( एक्स्प्लॉयटेशन ) वेग मात्र सर्वत्र सारखा आहे.

पांचहि शाखांत गुंतवलेलें भांडवल एकूण ५०० आहे. एकंदर उत्पन्न झालेला वाढावा ११० आहे. आणि एकंदर तयार झालेल्या विक्रीमालाचें मूल्य ६१० आहे. ५०० हे सबंध एकच भांडवल आहे असें मानूं. त्याचे ५ भाग केले आहेत. उदा. कापसाच्या कारखान्यांत पिंजण्याची शाखा, कातण्याची शाखा, विणण्याची शाखा वगैरे वेगवेगळ्या शाखांत स्थिरचर भांडवलसंबंध भिन्न भिन्न असतात, पण कापसाच्या धंद्याचें भांडवल सबंध एकच असते. अर्थात नफा आकारावयाचा तो सर्व शाखांच्या सरासरीवरच आकारावा लागतो.

हा नियम वरील उदाहरणास लावल्यास सबंध एक ५०० भांडवल = ३९० स्थि. + ११० च., अथवा हेच प्रमाण दर शेकडा सांगावयाचें झाल्यास १०० भांडवल = ७८ स्थि. + २२ च. असें सांगावें लागेल. प्रत्येक १०० भांडवल हें सबंध ५०० भांडवलाचा $\frac{१}{५}$ आहे. अर्थात सर्व भांडवलाचा सरासरी स्थिरचर भांडवलसंबंध ७८ स्थि. + २२ च. असा ठरतो. याच प्रकारें २२ हा सरासरी वाढावा शंभराच्या कोणत्याहि अंशास ठरतो. म्हणून सरासरी नफ्याचा दर २२% ठरतो. आणि म्हणून उत्पन्न झालेल्या मालाच्या प्रत्येक मालाची विक्रीची किंमत १२२ ठरते.

## साहित्याचें विविध स्वरूप

आपलीं अनुमानें चुकूं नयेत यासाठीं आणखी एक परिस्थिति आपणांस लक्षांत घ्यावयाची आहे. स्थिर भांडवल (म्हणजे धनोत्पादनसाधनें) हें दोन भिन्न घटकांचें बनलेलें असतें. धनोत्पादनसाधनें अनेक प्रकारचीं असतात. त्यांतील मुख्य म्हणजे इमारती, यंत्रें, हत्यारें, कच्चा माल आणि साहाय्यक साहित्य वगैरे, श्रम करण्याचे साधनसाहित्य हा एक प्रकार व ज्यावर श्रम करावयाचे त्या वस्तु हा दुसरा असे हे प्रकार असतात. प्रत्यक्ष श्रम करतांना श्रमसाहित्य हें श्रमवस्तूहून फार वेगळ्या प्रकारें उपयोगांत येतें. यंत्रांत उष्णता उत्पन्न करण्यासाठीं वापरावयाचा कोळसा साफ जळून नाहींसाच होतो. त्याचप्रमाणें चाकांना व कण्याला बुळबुळीत करण्यासाठीं वापरलेलें तेल हें नाहींसें होतें. रंग वगैरे साहाय्यक साहित्य सकृद्दर्शनीं नष्ट होतें. पण मालाच्या गुणांत तें व्यक्त झालेलें दिसतें. कच्चामाल हेंच उत्पन्न मालांतलें सार (सब्स्टन्स्) असतें. पण त्याचें रूप बदललेलें असतें. थोडक्यांत म्हणजे कच्चामाल आणि साहाय्यक साहित्य हीं

मालाच्या उत्पादनाच्या क्रियेंत वापरून खलास होतात. उत्पादन-क्रियेच्या सुरवातीस त्यांचें जें रूप असतें त्यांतलें कांहींहि शिल्लक रहात नाहीं.

## टिकाऊ साहित्य

पण धनोत्पादनसाधनांची गोष्ट वेगळी असते. हत्यार, यंत्र कारखाना, भांडी, इत्यादि वस्तूंचा मूळचा आकार शिल्लक आहे तोंवरच तीं उपयोगीं पडतात. आजच्याप्रमाणें उद्याहि आजच्याच स्वरूपांत श्रमाच्या प्रक्रियेंत त्यांचा उपयोग व्हावा लागतो. सर्व श्रमाच्या प्रक्रियेंत ज्याप्रमाणें त्यांचें हें रूप कायम असतें त्याप्रमाणें त्या वस्तु निरुपयोगी झाल्यानंतरहि त्यांचें रूप कायमच राहतें. त्यांच्या साहाय्यानें उत्पन्न झालेला माल कसाहि असो, यंत्रें, हत्यारें, कारखाने यांचें रूप स्वतंत्रपणें कायम असतें. कारखान्यांत एखादें श्रमाचें हत्यार आल्यापासून तें निरुपयोगी होऊन अडगळीच्या खोलींत टाकलें जाईपर्यंत श्रमाचे कामीं त्याचा जो वापर होतो तो वेळ आपण मोजल्यास श्रमानें त्याचें सर्व मूल्य वापरून संपविलें आहे, आणि त्याचें विनिमयमूल्य उत्पन्न मालांत अंतर्भूत झालें आहे असें आपणांस दिसून येईल. उदा. सूत कातण्याचें एक यंत्र १० वर्षें वापरून निरुपयोगी झालें म्हणजे १० वर्षांच्या श्रमक्रियेंत त्याचें मूल्य त्या मुदतींत उत्पन्न झालेल्या मालांत समाविष्ट झालें असा याचा अर्थ आहे. श्रम करण्याच्या एका हत्याराचें सगळें आयुष्य म्हणजे पुनःपुनः त्याच्या साहाय्यानें केल्या जाणाऱ्या श्रमप्रक्रियांची बेरीज होय. मानव प्राणी आणि श्रमाचें हत्यार यांमध्यें या बाबतींत साम्य आहे. प्रत्येक दिवस माणसाचा जो जगण्यांत जातो त्यानें त्याचें मरण २४ तास जवळ येत असते. एखाद्या माणसाकडे नुसतें पाहिल्यानें त्याचा हा अखेरचा मुक्काम

किती जवळ आला आहे हें सांगतां येणार नाहीं. पण व्यक्तीबाबत असा अंदाज करतां न आला तरी विमा कंपन्या सरासरी मानवी आयुष्याचा अंदाज बराच अचुकपणें करीत असून खूप नफाहि मिळवितात. हीच गोष्ट श्रमाचे हत्यारांचे बाबतींतहि घडते. अमुक एक श्रमाचें हत्यार—उदा. एखादें यंत्र—किती दिवस टिकेल हें आपणांला अनुभवावरून कळतें. अमुक एक हत्याराचें उपयोगमूल्य श्रमाच्या क्रियेंत ६ दिवस टिकतें असें आपण धरून चाललों तर दररोज $\frac{1}{6}$ मूल्य खर्च होतें, आणि यामुळेंच रोजच्या मालांत त्याचें $\frac{1}{6}$ मूल्य समाविष्ट होतें असें म्हणावें लागतें. श्रमाच्या हत्यारांची झीज अशीच मोजतात.

## साधन मूल्याचें मालांत संक्रमण

यावरून हें उघड होतें कीं धनोत्पादनाच्या साधनांचें जितकें मूल्य उत्पादनाच्या प्रक्रियेंत उत्पाद्य वस्तूंत समाविष्ट होतें त्याहून अधिक मूल्य त्यांत समाविष्ट होऊं शकत नाहीं. जर या धनोत्पादनसाधनांत मूल्यच नसतें, म्हणजेच जर हें धनोत्पादनसाधन माणसांच्या श्रमांनीं निर्माण झालें नसतें तर उत्पन्न मालांत त्याचें मूल्य रूपांतरित झालेंच नसतें. या साधनामुळें उपयोगमूल्य निर्माण झालें असतें खरें, पण विनिमयमूल्य निर्माण होऊं शकलें नसतें जमीन, हवा, पाणी, खाणींत असणारा कोळसा, जंगलांतील लाकूड वगैरे वस्तु धनोत्पादनसाधन म्हणून उपयोगीं पडत असल्या तरी त्या माणसाच्या श्रमापासून झालेल्या नव्हत. त्या निसर्गसिद्ध आहेत. म्हणून त्यांच्या ठिकाणीं विनमयमूल्य असत नाहीं. अर्थात् उत्पन्न मालांतहि त्यांच्यामुळें विनिमयमूल्य निर्माण होत नाहीं. श्रमाच्या एखाद्या हत्याराचें रोज खर्च होणारें मूल्य त्याच्या अगदीं थोड्या अंशाइतकें असलें तरी, रोजच्या उपयोगासाठीं त्या हत्यारानें आपलें

सगळें शरीर रोजच्यारोज वापरास द्यावें लागतें. एखाद्या यंत्राची किंमत १००० डॉ. आहे; तें १००० दिवसांत वापरून निरुपयोगी होतें. अशा स्थितींत रोजच्या मालांत त्याचें १/१००० मूल्य समाविष्ट होत असलें पाहिजे. तरीपण रोजच्या श्रमप्रक्रियेसाठीं सगळेंच्या सगळें यंत्र काम करण्यास हात जोडून उभें राहिलें पाहिजे. अर्थात् त्याची उपयुक्तता रोजच्या रोज थोडी थोडी कमी होत जाणार हें उघड आहे.

## यंत्र इत्यादींचा विशेष गुण

स्थिरभांडवलाच्या या भागासंबंधीं विशेष गोष्ट अशी आहे कीं त्याचा वापर होत असतां व त्यामुळें झीज होत असतां त्याचें थोड-थोडें मूल्य उत्पन्न वस्तूंत जात असतें. आणि बाकीचें मूल्य त्या स्थिरभांडवलांतच स्वस्थ बसून रहात असतें. हें मूल्य एकसारखें कमी होत असतें. अखेरीस तें पूर्ण निरुपयोगी होतें त्यावेळेपर्यंत, त्यानें उत्पन्न केलेल्या मालांत त्याचें सर्व मूल्य समाविष्ट झालेलें असतें. हा सर्व उत्पन्न झालेला माल सतत अनेकवार त्याच प्रकारच्या श्रम-प्रक्रियेंतून निर्माण झालेला असतो. जोंपर्यंत श्रमाचें हें हत्यार काम देत असतें व त्याच्या जागीं दुसरें हत्यार आणावें लागत नाहीं, तोंपर्यंत स्थिरभांडवल त्यामध्यें कायम राहून त्याचा कांहीं अंश उत्पन्न झालेल्या मालाचा घटक या नात्यानें बाजारांत फिरत असतो.

## कायम भांडवल व फिरतें भांडवल

श्रमाच्या हत्यारांमध्यें कायम असलेला भांडवलाचा हा भाग भांडवलाच्या इतर विभागाप्रमाणेंच बाजारांत हिंडत असतो. भांडवलाचें सर्वच मूल्य बाजारांत फिरत असल्यानें वास्तविक सर्वच भांडवलाला फिरतें भांडवल ( सर्क्यूलेटिंग कॅपिटल ) म्हटलें पाहिजे.

पण भांडवलाच्या ज्या भागाच्या बाजारांत फिरण्याचा आपण विचार करीत आहों त्याचा एक विशेष प्रकार आहे. हें भांडवल आपल्या उपयोगमूल्याच्या स्वरूपांत बाजारांत फिरत नाहीं. तर फक्त त्याचें विनिमयमूल्यच क्रमाक्रमानें थोडथोडें, उत्पन्न मालांत जितक्या प्रमाणांत तें अंतर्भूत होत असेल तितक्या प्रमाणांत, बाजारांत फिरत राहतें. ह्या त्याच्या गुणवैशिष्ट्यामुळें या भांडवलास 'कायम भांडवल' ( फिक्स्ड कॅपिटल ) म्हणतात. याहून भिन्न प्रकारचें भांडवलाचे जे घटक, त्यांना फिरतें भांडवल ( सर्क्यूलेटिंग कॅपिटल ) म्हणतात.

भांडवलाच्या निरनिराळ्या घटकाकडून उत्पन्न मालामध्यें जितकें कमी अथवा अधिक मूल्य घातलें जात असेल त्या कमीअधिक-पणाचा परिणाम निरनिराळ्या भांडवलापासून उत्पन्न होणारा वाढावा कमीअधिक होण्यांत होत असेल. यामुळेंहि वाढाव्याचा नेमका उगम कांहींसा अदृश्य होत असतो.

## भांडवलदाराचा भ्रम

भांडवलदार तयार झालेल्या मालाचा जेव्हां विचार करीत असतो त्यावेळीं स्थिरभांडवल ( धनोत्पादनसाधनें ) आणि चरभांडवल ( मजूरी ) यामधील फरक त्याच्या लक्षांत येत नाहींत. आपल्या उत्पादनखर्चाचा कांहीं भाग धनोत्पादनसाधनावर आणि दुसरा कांहीं भाग मजूरीवर खर्च झाला आहे हें तो जाणतो. तसेंच त्याला जर उत्पादनक्रिया सतत चालू ठेवावयाची असेल तर विक्रीमालाच्या विक्रीपासून मिळालेल्या पैशाचा उपयोग धनोत्पादनसाधनें व श्रम-शक्ति खरेदी करण्यासाठीं केला पाहिजे हेंहि तो जाणतो. पण यावरून मूल्य आणि वरकडमूल्य ( वाढावा ) यांचें जन्मस्थान कोणतें याचा त्याला मुळींच बोध होत नाहीं. उलट धनोत्पादन-

साधनाचें मूल्य आणि मजूरीचेंहि मूल्य पुनःपुनः उत्पादनखर्चांत अंतर्भूत होत आहे एवढेंच त्याला दिसत असतें. स्थिरभांडवल व चरभांडवल यांतील जो विशेष फरक तो या बाहेरच्या देखाव्यानें अशा प्रकारें झांकला जाऊन उत्पादनप्रक्रियेच्या शेवटीं पदरांत पडणारा वाढावा हा भांडवलाच्या सर्वहि घटकांतून सारखाच उपलब्ध होतो असें त्याला वाटत असतें.

## भांडवलदाराचा दृष्टिकोण

पण कायम भांडवल आणि फिरतें भांडवल यांमधील फरक मात्र भांडवलदाराला स्पष्टपणें दिसतो. श्रमाच्या हत्यारांचें मूळचें मूल्य १२०० डॉ. आहे, ३८० डॉ. चा कच्चा माल आहे, आणि १०० डॉ. मजूरी आहे असें आपण समजूं. तसेंच आणखी असेंहि समजूं कीं श्रमक्रियेंत श्रमाच्या हत्यारांचें २० डॉ. इतकें मूल्य खर्च झालें आहे. या श्रमक्रियेनें उत्पन्न झालेल्या मालाचा उत्पादनखर्च २० डॉ. (हत्यारांची झीज)+३८० डॉ. (कच्चामाल वगैरे)+१०० डॉ. (मजूरी)=५०० डॉ. हें आतां त्या वस्तूचें मूल्य होय. भांडवलदार हें ५०० डॉ. मूल्य वाढाव्याचा विचारहि न करतां आपल्या हातीं घेतो. यंत्रें, कारखाने, वगैरे शिल्लकच असतात. त्यांचें पूर्ण मूल्य ११८० असतें. त्यांचें मूल्य उपेक्षिलें जाऊं शकत नाहीं. आणि भांडवल-दाराच्या दृष्टीस पुढीलप्रमाणें हिशेब दिसत असतो. उत्पन्न मालांतलें २० डॉ. मूल्य स्थिर भांडवलाच्या म्हणजे श्रमाच्या हत्यारांच्या झिजेमुळें निर्माण झालेलें असतें. ४८० डॉ. मूल्य कच्चामाल व मजूरी (फिरतें भांडवल) यांच्या वापरांतून निर्माण होतें. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे मी (भांडवलदार) कच्चामाल आणि मजूरी या स्वरू-पांत जें मूल्य धंद्यांत गुंतवतों तें एकाच श्रमक्रियेमध्यें उत्पन्न होणाऱ्या

मालाच्या रूपानें माझ्या हातीं परत येतें. उलट श्रमाच्या हत्यारांच्या मूल्यांत जें भांडवल गुंतवलेलें असतें तें श्रमक्रियेंत दीर्घकाल रहात असून प्रत्येक श्रमक्रियेनें उत्पन्न झालेल्या प्रत्येक मालाबरोबर थोडथोडें मजकडे परत येत असते. म्हणून तें पुन्हां थोडथोडें सांठवून यंत्रें वगैरे पूर्णपणें निरुपयोगी होतील त्यावेळेपर्यंत त्यांच्या मूल्याची भरती करण्याची तजवीज करावी लागते. भांडवलदाराच्या डोक्यांत कायम भांडवल आणि फिरतें भांडवल यांमधील हा फरक याप्रमाणें अगदीं ठळकपणें बिंबलेला असतो. कच्च्या मालासाठीं केल्या जाणाऱ्या खर्चा-प्रमाणेंच मजूरीसाठीं केलेला खर्चहि प्रत्येक श्रमप्रक्रियेंतून वसूल करून नव्या श्रमशक्तीच्या खरेदीसाठीं तयार ठेवावा लागतो. यामुळें मजूरी म्हणजे चरभांडवल हें या बाह्य देखाव्यामुळें कच्च्या मालांत म्हणजे स्थिरभांडवलाच्या एका भागांत मिसळलें जातें. वरवर पाहणाराला इमारती, यंत्रें, हीं सर्व एका बाजूस कायम भांडवलासारखीं दिसतात. आणि दुसऱ्या बाजूस कच्चामाल साहाय्यक साहित्य आणि मजूरी वगैरे फिरत्या भांडवलासारखीं दिसतात. आणि यामुळें मजूरी व भांडवलाचे इतर अनेक प्रकार यामधील फरक अगदींच अदृश्य होत असतो.

---

# सारखा नफा कसा मिळवला जातो : : ७*

आतां आपण कायम भांडवल व फिरतें भांडवल यांमधील फरकाचा नफ्याच्या दरावर काय परिणाम होतो याच्या विचाराकडे वळूं. मागें दिलेल्या कोष्टकांत (पान ६८) आपलें सर्व स्थिर भांडवल उत्पन्न मालांत समाविष्ट होतें, म्हणजे सर्वच भांडवल फिरतें भांडवल आहे असें आपण गृहीत धरलें. एखादेवेळीं असें घडत असेल. पण तो कांहीं सर्वसामान्य नियम नाहीं. म्हणून आपण वस्तुस्थिति लक्षांत घेतली पाहिजे, ती ही कीं सामान्यतः स्थिर भांडवलाचा कांहीं भागच खर्च केला जाऊन बाकीचा शिल्लक रहात असतो. हा शिल्लक राहणारा भाग मोठा अथवा लहान असेल त्या प्रमाणांत, सारख्याच आकाराच्या निरनिराळ्या भांडवलांनीं उत्पन्न झालेला वाढावा (इतर सर्व परिस्थिति सारखीच आहे असें धरून चालून) स्वाभाविकपणेंच अधिक अथवा कमी होत असतो. पुढील उदाहरणांत आपण श्रमशक्तीच्या १००% वाढावा उत्पन्न होत आहे असें धरून चालूं.

* कॅपिटल खंड ३ रा प्रकरण ९.

| भांडवल | वाढावा | नफ्याचा दर शें.% | स्थिर भांड. झीज | उत्पन्न मालाचें मल्य | उत्पादन खर्च |
|---|---|---|---|---|---|
| (१) ८० स्थि. + २० च. | २० | २० | ५० | ९० | ७० |
| (२) ७० स्थि. + ३० च. | ३० | ३० | ५१ | १११ | ८१ |
| (३) ६० स्थि. + ४० च. | ४० | ४० | ५१ | १३१ | ९१ |
| (४) ८५ स्थि. + १५ च. | १५ | १५ | ४० | ७० | ५५ |
| (५) ९५ स्थि. + ५ च. | ५ | ५ | १० | २० | १५ |
| ३९० स्थि. +११० च. | ११० | ११० | ................. | | एकूण |
| ७८ स्थि. + २२ च. | २२ | २२ | ................. | | सरासरी |

वरीलपैकीं १ पासून ५ पर्यंतची सर्व भांडवलें मिळून एकच एक सबंध भांडवल असें आपण मानूं तर यांतहि ५०० = ३९० स्थि. + ११० च. असें स्थिरचर प्रमाण पडतें. आणि म्हणून दर शेंकडा ७८ स्थि. + २२ च. हें पूर्वींचेंच प्रमाण कायम राहतें. आणि सरासरी २२% हा वाढावाहि कायम राहतो. हा वाढावा जर आतां १ पासून ५ पर्यंतच्या सर्व भांडवलांत प्रत्येकीं सारखा वाटला तर हें कोष्टक पुढीलप्रमाणें मांडतां येईल.

| भांडवल | वाढावा | उत्पन्न मालाचें मूल्य | उत्पादन किंमत | उत्पन्न मालाची किंमत | नफ्याचा दर% | मूल्य व किंमत यांतील फरक |
|---|---|---|---|---|---|---|
| (१) ८० स्थि.+२० च. | २० | ९० | ७० | ९२ | २२ | + २ |
| (२) ७० स्थि.+३० च. | ३० | १११ | ८१ | १०३ | २२ | − ८ |
| (३) ६० स्थि.+४० च. | ४० | १३१ | ९१ | ११३ | २२ | −१८ |
| (४) ८५ स्थि.+१५ च. | १५ | ७० | ५५ | ७७ | २२ | + ७ |
| (५) ९५ स्थि.+ ५ च. | ५ | २० | १५ | ३७ | २२ | +१७ |

वरील सर्वांची बेरीज करितां

| | | | | |
|---|---|---|---|---|
| (१) | + २ | | | |
| (४) | + ७ | आणि | (२) | − ८ |
| (५) | + १७ | | (३) | − १८ |
| | + २६ | | | − २६ |
| | या वस्तू मूल्याहून २६ अधिकला पडतील | | | मूल्याहून २६ कमी इतक्या किंमतीला पडतील |

## वाढाव्याची वजावाट

यावरून किंमतींतील फरकाची, वाढावा सर्वांस सारखा केल्यानें वजावाट होते असें दिसून येईल. कारण उत्पन्न मालांतील एक भाग जितक्या प्रमाणांत मूल्याहून अधिक किंमतीस विकला जातो तितक्याच प्रमाणांत दुसरा भाग मूल्याहून कमी किंमतीस विकला

जातो. आणि नं. १ पासून नं. ५ पर्यंतच्या भांडवलांचें आपल्यापुरतें स्थिरचर प्रमाण वेगवेगळें असलें तरीहि नफ्याचा दर एकच यावा यासाठीं वरील किंमतीच्या दरानेंच त्या वस्तु विकाव्या लागतात. अशा प्रकारें मिळालेल्या किंमतींना आम्हीं उत्पादनाच्या किंमती म्हणतों. ( भांडवलदारानें जो उत्पादनखर्च केला असेल त्यांत मिळविलेल्या सरासरी नफ्याची भर घातली असतां ती उत्पादनाची किंमत होय. )

विक्रीमालाची उत्पादनकिंमत = उत्पादनखर्च + सरासरी नफा.

## सर्व मूल्यांची बेरीज सर्व किंमतींच्या बेरजेइतकी

निरनिराळ्या शाखांतील भांडवलदार आपला विक्रीमाल विकतांना उत्पादनप्रक्रियेमध्यें खर्च झालेलें जें भांडवलीमूल्य असेल तें वसूल करतो. पण वाढावा अथवा नफा या बाबतींत असें घडत नाहीं. प्रत्येक वेगवेगळ्या शाखेंतील भांडवलदार आपल्या शाखेंतील वस्तूच्या उत्पादनक्रियेमध्यें उत्पन्न होणारावाढावा तसाच्या तसा मिळवूं शकत नाहीं, तर सर्व भांडवलदार वर्गानीं मिळून जो वाढावा मिळविला असेल त्याचा प्रचलित सरासरी दर त्याला मिळवितां येतो. कोणतेंही गुंतवलेलें भांडवल—त्याचा स्थिरचर संबंध कसाहि असो—दरसाल दरशेंकडा एकंदर भांडवलावर जेवढा नफा मिळतो तेवढाच आपल्यासाठीं मिळवूं शकतें. नफ्याच्या दृष्टीनें पाहतां निरनिराळे भांडवलदार हे भागीदारांना दरशेंकडा सारखा नफा वांटून देणाऱ्या संयुक्त भांडवली कंपनीच्या भागीदारासारखे असतात. ह्या नफ्याच्या वाटणींत जो फरक असतो तो भांडवल कमी अथवा अधिक असेल त्या प्रमाणांत असतो. अशा प्रकारें धंद्यांच्या सर्व शाखांचा आपण विचार केल्यास एकंदर समाजांत उत्पन्न मालांची एकूण किंमत त्या मालांच्या एकूण

मूल्याइतकी असते, हा सिद्धांत पुढील घटनेमुळें चुकीचा ठरतोसा दिसेल. एका भांडवदारास यंत्रें कच्चामाल वगैरे जो विक्रीमाल धनोत्पादनसाधन असतो तो दुसऱ्या भांडवलदारापासून विकत घेतलेला असतो. त्याला दिलेल्या किंमतींत त्याचा नफा अंतर्भूत असतो. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे धंद्याच्या एका शाखेचा नफा हा दुसऱ्या शाखेच्या उत्पादनखर्चांत अंतर्भूत असतो असें दिसतें. पण आपण जर एका बाजूस देशांतील सर्व उत्पादनाचा खर्च एकत्र करूं आणि दुसऱ्या बाजूस सर्व नफे एकत्र करूं तर वरील हिशेब बिनचूक आहे असें आपणांस आढळून येईल. उदा. रेशमी कापड हें रेशमी कोटासाठीं लागतें. रेशमी कापडासाठीं रेशीम लागतें. म्हणून कांहीं भांडवलदार रेशीम निर्माण करण्यासाठीं (समजा) १०० डॉ. भांडवल गुंतवतात. नफ्याचा दर जर १०% असेल तर रेशमी कापड करणाऱ्या कारखानदारानें हे रेशीम ११० डॉ. स विकत घेतलें पाहिजे. आणि त्यानें शिंप्यांना आपलें कापड १२१ डॉ. ला विकलें पाहिजे. या तीन शाखांत गुंतवलेलें भांडवल अशा प्रकारें खालीलप्रमाणें आहे.

| | |
|---|---|
| रेशमाच्या उत्पादनांत | १०० डॉ. |
| रेशमीकापडाच्या उत्पादनांत | ११० डॉ. |
| कोटाच्या उत्पादनांत | १२१ डॉ. |
| | ३३१ डॉ. |

वरील रकमेवर ३३·१ इतका नफा पडला पाहिजे. हा नफा अखेरीस कोट १३३·१ डॉ. एवढ्या किंमतीला विकला असतां मिळतो. (वास्तविक कोटाची किंमत पुष्कळ अधिक असली पाहिजे. आपण फक्त रेशीम खरेदी करण्यासाठीं जें भांडवल घातलें तेवढ्याचाच विचार

येथें करीत आहों.) पण या नफ्यापैकीं शिंप्यांना फक्त १२·१ डॉ. मिळतात. रेशमी कापड खरेदी करतांना त्यांना कापडवाल्याला २१ डॉ. द्यावे लागतात. हे कापडवाले स्वतःजवळ फक्त ११ डॉ. च ठेवून उरलेले १० डॉ. रेशीम तयार करणाऱ्यांना परत करतात. अशा प्रकारें प्रत्येक भांडवलदाराला त्याच्या भांडवलाच्या हिस्सेरशीप्रमाणें नफा मिळतो.

## वाढाव्याचा दर भिन्न, नफ्याचा दर सारखा

सरासरी नफ्याचा दर एकदां स्थापित झाला म्हणजे गुंतवलेल्या अनेक भांडवलांवर (त्यांचें वाढाव्याचें प्रमाण सारखें नसलें तरी) त्या त्या भांडवलाच्या प्रमाणांत नफा मिळत जातो. एखादे वेळीं एखाद्या मालाच्या उत्पादनांत जो वाढावा मिळतो तो त्या मालाच्या मालकाला सर्वच्या सर्व नफा म्हणून पदरांत पाडून घेतां येतो खरा. पण हा अपवादात्मक प्रसंग होय, सर्वसामान्य नियम नव्हे. सर्वसामान्य नियम पाहतां नफा (नफ्याचा दर) व वाढावा यांचीं परिमाणें खरोखर सारखीं नसतात. अमुक एका धंद्याच्या शाखेंत किती वाढावा निर्माण झाला ही गोष्ट भांडवलावरील सरासरी नफ्यावर त्या वाढाव्याचा ज्या मानानें परिणाम होईल त्या मानानेंच विचारांत घेतला जातो. व्यक्तिशः धंद्यांच्या शाखा अथवा त्या शाखांचे भांडवलदार यांच्याशीं या वाढाव्याच्या प्रश्नाचा फक्त अप्रत्यक्ष संबंध येत असतो. कारण अमुक एखाद्या शाखेंत वाढावा वाढला तरी सर्व शाखांत मिळून जो वाढावा उत्पन्न होतो त्या सर्वांचीच त्यामुळें वाढ होते व अर्थात सरासरी नफ्याचा दरहि वाढतो. खरोखर व्यक्तिशः वेगवेगळ्या भांडवलदाराला लक्षांत न येतांहि हा प्रकार चालत असतो. त्याला हा प्रकार दिसत नाहीं, समजत नाहीं, आणि खरोखर त्याला त्याची पर्वाहि नसते.

## भांडवलदाराची खोटी कल्पना

धंद्यांच्या निरनिराळ्या शाखांत नफा व वाढावा यामध्यें जो फरक पडत असतो तो नफ्याचें खरें स्वरूप आणि त्याचा उगम झाकून टाकतो. केवळ भांडवलदारालाच या गोष्टी अदृश्य असतात असें नव्हे. तशा त्या अदृश्य असण्यांत भांडवलदाराचा फायदाहि असतो. मजूरालाहि या गोष्टी अदृश्य असतात. त्यांचें मात्र त्यांत नुकसान असतें. प्रत्यक्ष व्यावहारिक अनुभवापुरतें पहावयाचें तर नफा व उत्पादनखर्च यांमध्यें जो फरक असतो त्यामुळें भांडवलदाराला मूल्याचा खरा अर्थ काय हें कळतच नाहीं. कारण विक्रीमाल उत्पन्न करण्यासाठीं खर्चीं पडणाऱ्या श्रमाचा विचार तो करीत नसतो. तर जिवंत अथवा जड अशा ज्या धनोत्पादनसाधनासाठीं त्यानें रोकड मोजलेली असते तेवढ्यापुरताच तो विचार करीत असतो. आणि म्हणून नफा ही गोष्ट विक्रीमालाच्या अंगभूत मूल्याहून भिन्न असली पाहिजे असें त्याला वाटत असतें. उत्पादनखर्चामध्यें वाढ होऊन विक्रीची किंमत ठरते व वाढ होते तो नफा मिळतो; तोच निरनिराळ्या शाखांच्या भांडवलदारांना स्वाभाविकपणेंच डोळ्यापुढें असतो. हा नफा वस्तूच्या अंगभूत मूल्यावरून ठरत नसून अगदींच आगंतुक अशा कारणांनीं ठरतो. आणि म्हणून नफा हा वस्तूच्या अंगभूत मूल्याहून भिन्न असतो ही खोटी कल्पना भांडवलदाराच्या मनांत दगडासारखी घट्ट बसलेली असते.

## भांडवलदाराच्या श्रमाची उपपत्ति

व्यवहारापुरता विचार करावयाचा तर भांडवलाच्या कोणत्याही भागास एकसारखाच नफा पडत असतो. स्थिरचर भांडवलसंबंध कोणत्याहि भांडवलाचा कसाहि असो, $\frac{१}{४}$ मृत भांडवल (स्थिर) आणि $\frac{३}{४}$ जिवंत भांडवल (चर) अथवा $\frac{३}{४}$ मृत आणि $\frac{१}{४}$ जिवंत,

असें भांडवल उत्पादनाच्या कामास लावलें गेलें तर यांतील पहिल्यांत एकपट स्थिर भांडवल तर तिप्पट चर भांडवल आहे. उलट दुसऱ्यांत तिप्पट स्थिर भांडवल आणि एकपट चर भांडवल आहे. अर्थात पहिल्याचा वाढावा दुसऱ्याच्या तिप्पट आहे; तरीपण ( श्रमाचा वापर सारख्या वेगाचा आहे असें धरून ) नफा दोन्हींत सारखाच येईल. व्यक्तिशः प्रत्येक भांडवलदाराचें क्षितिज अगदीं मर्यादित असतें; कारण आपला नफा व्यक्तिशः आपणच अथवा आपल्याच धंद्यांत उपयोगांत आणलेल्या श्रमापासून निर्माण झालेला नाहीं हें त्याला माहीत असतें. आणि नफ्याचा सरासरी दर विचारांत घेण्याच्या दृष्टीनें त्याचें हें करणें योग्यहि असतें. पण सर्व भांडवलाकडून सर्व श्रमाचा वापर केला असतां ह्या नफ्याची समपातळी कशी येते हें त्याला कळत नाहीं. अर्थशास्त्राच्या प्रोफेसरांनींहि ही गोष्ट आजवर स्पष्ट केलेली नसल्यानें त्यांचें अज्ञान अधिकच दृढ असतें. श्रमाची काटकसर करणें—अमुक एक विक्रीमाल निर्माण करण्यासाठीं अवश्य लागणारे श्रम कमी करण्याची खटपट करणें इतकेंच नव्हे तर मजूरांची संख्याच कमी करणें आणि मृत भांडवल ( स्थिर भांडवल ) अधिकाधिक वापरांत आणणें या गोष्टी त्यास न्याय्यच वाटतात. मग जिवंत श्रम हे त्याच्या दृष्टीनें नफ्याचा उगम ठरतील कसे ? श्रमाचें परिमाण अथवा श्रम करणाऱ्या मजूरांची संख्या कमी करूनच नफा वाढविणें—व्यक्तिशः भांडवलदाराचा नफ्याचा दर वाढविणें—शक्य होतें तर जिवंत श्रम हेच नफा देतील हें अशक्य आहे असे तो मानीत असतो.

---

# वाढावा वाढविण्याच्या पद्धति : : : ८*

## वाढावा कोणता

श्रमशक्ति कामास लावून वाढावा निर्माण केला जातो. भांडवल श्रमशक्ति खरेदी करून तीसाठीं मजूराला मजूरी देत असते. आपल्या श्रमांनीं मजूर हा नवें मूल्य निर्माण करतो. तें त्याच्या मालकीचें असत नाहीं. भांडवलदाराच्या मालकीचें होतें. आपल्या मजूरीच्या मूल्या-इतकें मूल्य निर्माण करण्यासाठीं प्रथम त्यास कांहीं काळ राबावें लागतें. पण मागाहून त्याचें राबणें थांबत नाहीं. आणखी कांहीं तास तो श्रम करीत असतो. या वेगळ्या वेळांत तो जें नवें मूल्य निर्माण करतो तें त्याच्या मजूरीच्या मूल्याहून अधिक असतें. हेंच वाढावा मूल्य होय.

अशा प्रकारें कामाचा दिवस मजूरीइतकें मूल्य निर्माण करण्यास अवश्य असेल त्याहून अधिक वाढवून भांडवलदार वाढावा निर्माण करीत असतो. इतिहासक्रमांत मजूराचे श्रम ज्या उत्पादनपरिस्थितींत

* कॅपिट्ल, खंड १, प्रकरण १०, ११ १२.

सांपडतात त्या उत्पादनपरिस्थितींत भांडवलदार मजूराला प्रथम आपल्या लगामीं लावतो. अर्थात उत्पादनाची पद्धति तो ताबडतोब बदलत नाहीं. नुसता कामाचा दिवस वाढवून अशा प्रकारें वाढावा वाढविणें हा प्रकार जुन्या भाकरीच्या कारखान्यांतहि होता तसाच तो हल्लींच्या सूत कातण्याच्या कारखान्यांतहि आहे.

## वेळवाढीची नैसर्गिक मर्यादा

पण कामाचा वेळ किती वाढवायचा याला मर्यादा असते. त्या मर्यादेपलीकडे तो वाढवितां येत नाहीं. दोन कारणांनीं ही मर्यादा ठरते. मजूराची शरीरशक्ति हें एक कारण. २४ तासांत एक मनुष्यप्राणी अमुक इतकीच प्राणशक्ति खर्च करूं शकतो. घोडाहि सरासरी ८ तास काम करूं शकतो. दिवसाच्या बाकीच्या कांहीं भागांत या प्राण-शक्तीला झोप घ्यावी लागते. उरलेल्या भागांत अन्न खाणें, अंग धुणें, कपडे घालणें वगैरे कामें करावीं लागतात. श्रमाचा दिवस वाढविण्याच्या या केवळ भौतिक मर्यादा होत. दुसऱ्या कांहीं नैतिक मर्यादाहि असतात. मजूराला कांहीं बौद्धिक व सामाजिक गरजा भागवावयाच्या असतात. या किती असतील तें त्या त्या समाजाची एकंदर प्रगति किती झाली असेल यावरून ठरतें. पण या सर्व भौतिक व सामाजिक मर्यादा फार लवचीक असतात. त्यांना कमी—अधिकपणास खूप वाव असतो. म्हणून कामाचे तास ८, १०, १२, १४, १६, १८ असे वेगवेगळे असल्याचें आढळून येतात. कामाचे तास वाढविण्याचे भांडवलदारांनीं जे प्रयत्न इंग्लंडांत केले ( इंग्लंडांतच भांडलवशाही पद्धति प्रथम सुरू झाली ) त्यामुळें कित्येक शतकें मजूरवर्गाकडून भांडवलदारांना विरोध होऊन सामाजिक व राजकीय झगडे चालले होते.

वाढावा वाढविण्याच्या आणखीहि पद्धति आहेत. श्रमाच्या वापराचा

वेग अधिक वाढवून त्यापासून तेवढ्याच वेळांत अधिक मूल्य निर्माण करून घेणें हा एक प्रकार. दुसरा प्रकार श्रमशक्तीच्या मूल्याच्या खालीं मजूरीचा दर नेणें हा होय. प्रत्यक्ष व्यवहारांत हा प्रकार खूपच अमलांत असतो. पण आपण श्रमशक्तीसुद्धां सर्व विक्रीमाल पूर्ण मूल्याला विकला अथवा खरीदला जातो असें गृहीत धरलें असल्यामुळें याचा विचार आपणांस कर्तव्य नाहीं.

## सापेक्ष वाढावा व स्वतंत्र वाढावा

शेवटीं सापेक्ष (रिलेटिव्ह) वाढाव्याच्या आपणांस विचार करावयाचा. याबाबत पुढीलप्रमाणें परिस्थिति उत्पन्न होते. कामाचा दिवस ( समजा ) १० तास आहे. त्यापैकीं ६ तास श्रमशक्तीचें मूल्य निर्माण करण्यांत खर्च होतात. उरलेल्या ४ तासांत अमुक इतका वाढावा निर्माण होतो. दिवस ११ तासांचा करणें शक्य असतें अथवा १० तासांतच श्रमाचा अधिक वापर करणें शक्य असलें, अथवा दोन्ही पद्धती एकदम उपयोगांत आणल्या तर वाढाव्याचें प्रमाण अधिक वाढतें. कामाचा दिवस वाढवून केलेली वाढाव्याची वाढहि स्वतंत्रपणें ( ॲब्सोल्यूट ) वाढ होय. उलट १० तासांचा दिवस वाढविणें अशक्य आहे, तसेंच श्रमाचा वापर वाढविणें हेंहि अशक्य आहे असें समजा. तरी पण “ मजूरीच्या मूल्याइतकें मूल्य निर्माण करण्यास आवश्यक ” अशी जी श्रमवेळ ती लहान करणें कदाचित शक्य होईल. मजूरीइतकें मूल्य निर्माण करण्यास ६ तास लागतात असें आपण गृहीत धरलें. पण या ६ ऐवजीं ५ तासांतच तितकें मूल्य आपणांस निर्माण करतां आलें तर वाढावा निर्माण करण्यास ४ तासांऐवजीं ५ तास आपल्या हातीं राहतील. या ठिकाणीं कामाच्या दिवसाशीं सापेक्षतेनें ( रिलेटिव्हली ) वाढावा वाढविण्यांत आला आहे.

## धनोत्पादन शक्तीची वाढ

असा सापेक्ष वाढावा मिळविण्यासाठीं मजूराच्या उपभोगास आवश्यक अशा ज्या वस्तु त्या थोड्या वेळांत निर्माण केल्या पाहिजेत. हेंच वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे श्रमाची धनोत्पादनशक्ति वाढविली पाहिजे. म्हणजे पूर्वींइतकाच विक्रीमाल पूर्वीपेक्षां कमी श्रमांत निर्माण होऊं शकेल. हें घडवून आणण्यासाठीं इतिहासक्रमांत प्राप्त झालेली श्रमपद्धति भांडवलदाराला पुरेशी होत नाहीं. त्याच श्रमपद्धतींत नुसता कामाचा दिवस वाढविण्यानें त्याचा कार्यभाग होत नसतो. श्रमाचें उत्पादनसामर्थ्य वाढविण्यापूर्वी समाजाची आणि उत्पादनसाधनांची परिस्थिति त्यास बदलावी लागते. सगळ्या धनोत्पादन पद्धतींत क्रांति घडवून आणावी लागते. याच उपायानें श्रमशक्तीचें मूल्य कमी करून श्रमशक्तीच्या मूल्याइतकें मूल्य निर्माण करण्याचा वेळ त्यास कमी करतां येतो.

श्रमशक्तीचें मूल्य कमी करण्यासाठीं धंद्याच्या ज्या ज्या शाखांच्या मालामुळें श्रमशक्तीचें मूल्य ठरतें त्या सर्व शाखांत, म्हणजे अर्थात् परंपरागत चरितार्थसाधनांच्या धंद्यांत श्रमाची उत्पादनशक्ति वाढवावी लागते. अशा धंद्यांत चरितार्थसाधनें निर्माण करणारे धंदेच अंतर्भूत होतात असें नव्हे तर अशा धंद्यांना धनोत्पादसाधनें पुरवणारे धंदेहि अंतर्भूत होतात. उदा. बुटाच्या १ जोडाचें मूल्य हें केवळ चांभाराच्या श्रमावर अवलंबून नसून कातडें, मेण, दोरा, वगैरे सर्वांच्या मूल्यावर अवलंबून असतें. पण जीवनाला आवश्यक अशा वस्तु अथवा धनोत्पादनसाधनें दोन्हीहि निर्माण न करणारे असे जे धंदे असतील अशा धंद्यांत श्रमाची उत्पादशक्ति वाढली तरी तिचा सर्वसामान्य श्रमशक्तीच्या मूल्यावर कांहींच परिणाम होत नाहीं.

## उत्पादन खर्च कमी करणें हा हेतु

उदा. एखाद्या भांडवलदारानें शिंप्यांच्या श्रमाची उत्पादनशक्ति वाढवून शर्ट स्वस्त केले तर त्यानें सर्वसामान्य श्रमशक्तीचें मूल्य कमी होईलच असें नाहीं. पण ज्या मानानें श्रमशक्तीचें उत्पादन-सामर्थ्य वाढविण्याचें कार्य भांडवलदार करीत असतो त्या मानानें तो वाढाव्याचा सर्वसामान्य दर वाढवीत असतो. म्हणून भांडवलाच्या अंगींच श्रमाची उत्पादनशक्ति वाढविण्याची एक प्रवृत्ति असून विक्री-माल स्वस्त करणें आणि तद्वारां मजूरीहि स्वस्त करणें हें या प्रवृत्तीचें कार्य असतें.

ज्याअर्थी एकाच प्रक्रियेनें विक्रीमाल स्वस्त होतो आणि वाढावाहि वाढतो त्या अर्थी येथेंच 'विनिमयमूल्य निर्माण करणें हाच जर भांडवलदाराचा मुख्य हेतु तर तो विक्रीमालाचें विनिमयमूल्य कमी कमी करण्याची खटपट कां करतो?' या कोड्याचें उत्तर सांपडतें. भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या चौकटींत श्रमाची उत्पादनशक्ति वाढविण्याचा हेतु हा मजूराला त्याच्या चरितार्थसंपादनाचें मूल्य निर्माण करण्यासाठीं जो वेळ लागतो तो कमी करणें व तद्वारां तो भांडवल-दाराचें काम ज्या वेळांत मोफत करतो तो वेळ वाढविणें हा असतो.

---

# भांडवल हें उत्पादनपद्धतीची क्रांति कशी करते : : : ९*

## (१) सहकार्य

प्रत्येक भांडवलदार एकदम बरेचसे मजूर नेमून उत्पादन सुरू करतो तेव्हां भांडवलशाही उत्पादन सुरू होतें. एकाच जागेंत अथवा श्रमाच्या एकाच क्षेत्रांत, एकाच वेळीं बरेचसे मजूर एकाच विक्री-वस्तूच्या निर्मितीसाठीं राबूं लागणें हा इतिहासदृष्ट्या व तर्कदृष्ट्या भांडवलशाहीचा आरंभ होय. उत्पादनपद्धतीच्या दृष्टीनें पाहतां हस्त-व्यवसायाची भांडवलशाही ( मॅन्युफॅक्चर-कॅपिटॅलिझम् ) ही धंदे-संघांतल्या हस्तव्यवसायी धंद्यापासून भिन्न मानतां येतच नाहीं. फक्त एकाच वेळीं भांडवलदार अनेक कामगार नेमतो एवढाच फरक ही हस्त-व्यवसायी भांडवलशाही व धंदेसंघ ( गिल्ड्स् ) यांमध्यें सांगतां येईल. धंदेसंघांतील हस्तव्यवसायी धंदेगृह या हस्तव्यवसायी भांडवलशाहीनें केवळ अधिक मोठें केलेलें असतें.

---

* **कॅपिटल खंड १, प्रकरण १३.**

## आरंभीचा फरक प्रमाणात्मक

म्हणून सुरवातीस हा फरक केवळ प्रमाणात्मकच ( क्वांटिटेटिव्ह ) असतो. तरीपण कांहीं मर्यादेंत मूळच्या व्यवसायांत महत्त्वाचा फरक पडतोच. पूर्वी प्रत्येक धंद्यांत वैयक्तिक मजूर सर्वसामान्य मजूरापासून कमीअधिक प्रमाणांत वेगळा दिसत असे. पण आतां भांडवलशाही उत्पादनपद्धतींत वैयक्तिक मजूर—मग कोणी धोंडोपंत असो अथवा दुसरा कोणी धोंडिबा ( पीटर ऑर पॉल ) असो, सर्व सारखे होतात. शेतकरी या नात्यानें एडमंड बर्क ( १८ व्या शतकांत ) सांगतो कीं शेतीवर जरी एकदम ५ मजूर नेमले तरी त्यांचे वैयक्तिक फरक नष्ट होतात आणि यावरून अमुक ५ प्रौढ मजूर एकदम जितकें काम जेवढ्या वेळांत शेतावर करतील तितकेंच काम तेवढ्या वेळांत दुसरे कोणतेहि ५ प्रौढ मजूर करतील असें बर्कचें मत आहे. तें कसेंहि असो, एक गोष्ट खरी कीं एकदम कामास लावलेल्या अमुक इतक्या मजूरांचा सामुदायिक श्रमदिवस एक दिवसाचे सरासरी सामाजिक श्रम भांडवलदाराच्या पदरांत टाकीत असतो असें मानलें जातें. उदा. भांडवलदार १२ मजूरांना प्रत्येकीं १२ तासाप्रमाणें १ दिवस कामावर लावतो. हा १ दिवस म्हणजे भांडवलदाराच्या दृष्टीनें १४४ श्रम तास होत. आणि जरी या १२ माणसांपैकीं प्रत्येकाचें काम १२ माणसांच्या सरासरी सामाजिक श्रमांहून कमीअधिक असूं शकते, आणि १ च काम करण्याला प्रत्येकाला कमीअधिक वेळहि लागूं शकतो, तरी भांडवलदार प्रत्येक मजूराचा श्रमदिवस हा १४४ तासांच्या $\frac{१}{१२}$ आहे असेंच मानीत असतो. उलट हींच १२ माणसें त्यांच्या ६ जोड्या करून ६ लहान लहान मालकांनीं कामावर लावलीं तर प्रत्येक मालकाला सारखेंच मूल्य मिळणें आणि म्हणून सारखाच वाढावा प्रत्ये-

काला मिळणें हें फारसें संभवनीय नाहीं. प्रत्येक मालकास मिळणारें फल इतरांपासून भिन्न असूं शकेल. जर १ मजूराला एका विक्री-मालाच्या उत्पादननासाठीं सामाजिकदृष्ट्या आवश्यक वेळाहून पुष्कळच अधिक वेळ लागेल तर त्याच्या श्रमाला सरासरी श्रम असें मानलें जाणार नाहीं. आणि म्हणून वर सांगितलेल्या लहान लहान ६ मालकां-पैकीं कोणाला फारच कमी वाढावा मिळेल तर दुसऱ्या कोणाला पुष्कळच अधिक वाढावा मिळेल. ही विषमता एकंदर सामाजिक व्यवहारांत वजावाटीनें नाहींशी होईल खरी, पण त्या वैय्यक्तिक माल-कांचें दरम्यान ती नाहींशी होणार नाहीं. असो.

## समुदायामुळें साहित्याची बचत

हस्तव्यवसायी भांडवलशाहींत हत्यारें वगैरे जुनीं उत्पादनसाधनें सारखींच रहात असलीं तरी एकदम अनेक मजूर कामावर लावल्या-मुळें श्रमप्रक्रियेच्या भौतिक परिस्थितींत एकदम फार फरक पडतो. अनेक माणसें ज्या इमारतींत काम करतात ती इमारत, कच्चामाल, ठेवण्याची वखार, भांडीं, हत्यारें, वगैरे इतर साधनें हीं सर्व पूर्वीं वेग-वेगळ्या मजूरांना वेगवेगळीं लागत असत. तीं आतां अनेक मजूरांना एकदम एकत्र मिळतात. या वस्तूंचें उपयोगमूल्य धनोत्पादनकार्यांत अधिक वाढविलें गेल्यानें त्यांचें उत्पादनमूल्य वाढतें असें नाहीं. भांडवल-दारांचा त्यांच्यावरील खर्च वाढत नाहीं;हा विशेष फायदा भांडवल जितकें मोठें असेल तितक्या प्रमाणांत अधिकाधिक मिळत जातो. ज्या खोलींत २० कोष्टी २० मागावर काम करतात ती खोली १ कोष्टी आणि त्याचे २ उमेदवार हे एका मागावर काम करीत असतां त्यांना लागणाऱ्या खोलीपेक्षां पुष्कळ मोठी असेल. पण २० माणसांना लागणारें १ श्रमगृह बांधण्याला लागणारा खर्च हा प्रत्येक २ माणसांना १

श्रमगृह याप्रमाणें २० माणसासाठीं १० श्रमगृहें बांधण्यास लागणाऱ्या खर्चापेक्षां पुष्कळ कमी असतो. यावरून फार मोठ्या प्रमाणावर अनेक मजूरांना एकदम वापरतां येण्यासाठीं एकत्र आणलेल्या धनोत्पादन-साधनांचें मूल्य, जितक्या प्रमाणांत त्यांचा उपयोग होतो, तितक्या प्रमाणांत वाढत नाहीं. या साधनांचा सामुदायिक वापर केल्यास प्रत्येक उत्पन्न वस्तूंत त्या साधनांतील अगदीं थोडथोडें मूल्य संक्रमित होत असतें. आणि याप्रकारें विक्रीमालाचें एकंदर मूल्य कमी होतें. धनोत्पादनसाधनांच्या वापराचें कामीं ही जी काटकसर होते ती अनेक मजूर हीं धनोत्पादनसाधनें सामुदायिकपणें वापरतात यामुळें होतें. अर्थात हे मजूर एकमेकास मदत करतात असें नाहीं, फक्त एकमेकाजवळ कामें करतात. त्यामुळें हा सामुदायिक वापर शक्य होतो.

ज्यावेळीं पुष्कळ मजूर पद्धतशीर रीतीनें एकत्र अथवा शेजारीं शेजारीं, पण एकाच उत्पादनप्रक्रियेंत अथवा एकाच धंद्याच्या भिन्न भिन्न उत्पादनप्रक्रियेंत श्रम करतात तेव्हां या पद्धतीस सहकार्याची उत्पादनपद्धति म्हणतात.

## समुदायशक्ति ही एक नवी शक्ति

ज्याप्रमाणें घोडेस्वारांच्या एका पलटणीची चढाईची शक्ति अथवा पायदळाच्या एका पलटणीची बचावाची शक्ति ही त्या पलटणींतल्या एकेका घोडेस्वाराच्या अथवा सैनिकाच्या शक्तींची बेरीज केली असतां त्या बेरजेपेक्षां फारच मोठी ठरते, त्याचप्रमाणें एकेका कामगाराच्या सुट्या सुट्या शक्तींची बेरीज ही, अनेक कामगार लावले असतां-उदा. एखादें जड वजन उचलणें, एखादें चाक फिरवणें, अथवा एखादा अडथळा दूर करणें अशा कामीं लाविली असतां त्या शक्तीपेक्षां फारच कमी भरेल. अशा बाबतींत सामुदायिक श्रमाचा जो

परिणाम घडतो तो कदाचित् वैयक्तिक श्रमानें घडून येणारहि नाहीं, अथवा खूप वेळ खर्च करूनहि अगदीं क्षुद्र इतका घडेल. यांत सह-कार्यानें आपण व्यक्तीची उत्पादनशक्तिच वाढविली एवढेंच नसून सामुदायिक शक्ती नांवाची एक नवी शक्तिच निर्माण केली आहे. (" १ माणसाला १ टन वजन उचलतांच येणार नाहीं. १० माणसें कसेंबसें कष्टानें उचलूं शकतील. आणि १०० माणसें असलीं तर मात्र प्रत्येकजण एकेक बोट लावून सगळेजण तें ओझें उचलतील." जॉन बेलर्स, लंडन १६९६)

## माणसाची सामाजिकता

अनेक शक्ति अशाप्रकारें एका सामुदायिक शक्तींत संघटित केल्यानें जशी एक नवी शक्ती निर्माण होते त्याचप्रमाणें उत्पादक मजूरांचा परस्परसंबंध सामुदायिक उत्पादनांत येत असल्यामुळें प्राणिमात्रांचे ठिकाणीं असणारी चढाओढीची व उत्साहाची भावना जागृत होते. त्यामुळें व्यक्तिशः मजूराची कार्यक्षमताहि वाढते. म्हणून १२ माणसें एकत्र काम करूं लागलीं असतां त्या सर्वांच्या १ दिवसाच्या १४४ तासांत व्यक्तिशः प्रत्येकानें १२ तासांत वेगवेगळेपणें जितकें काम केलें असतें, अथवा एकानें १२ तास केल्यानंतर दुसऱ्यानें १२ तास याप्रमाणें सगळ्यांनीं एकमेकामागून काम केलें असतें तर जें काम झालें असतें त्या कामापेक्षां वरील १४४ तासांचें काम अधिक भरलें असतें. याचें कारण, अरिस्टॉट्ल मनुष्याला राजकीय प्राणी म्हणतो, त्याप्रमाणें तो राजकीय प्राणी नसला तरी तो खात्रीनें सामाजिक प्राणी आहे हें होय.

## कामाच्या अनेक भागांची एकदम प्रगति

जरी अनेक माणसें एकाच वेळीं एकाच कामावर अथवा एकाच

जातीच्या श्रमास लावलीं, तरी प्रत्येकाचें काम, एकंदर सामुदायिक श्रमप्रक्रियेमध्यें, एकमेकांच्या श्रमापासून फार दूरदूरचे असूं शकेल. या श्रमप्रक्रियेंतील निरनिराळ्या अवस्थांतून उत्पादनाची वस्तु सह-कार्यामुळें भराभर पूर्णतेकडे जात असते. उदा. १२ मजूर एका शिडीच्या खालच्या टोंकापासून वरच्या टोंकापर्यंत दगड पोंचविण्या-साठीं शिडीवर रांग धरून राहिले तर प्रत्येकजण तेंच काम करतो आणि त्यामुळें या सर्वांच्या क्रिया मिळून एक सणंग क्रिया घडून येऊन एकेका मजूरानें दगड घेऊन व शिडीवरून चढून-उतरून ते जितक्या लवकर नेले असते त्यापेक्षां पुष्कळच अधिक लवकर या २४ हातांच्या मजूरांच्या माळेनें, ते नेले जातात. एक वस्तु तेवढ्याच अंतरावर अनेक व्यक्तींच्या सहकार्यानें कमी वेळांत नेली जाते. तसेंच एखादी इमारत एकदम अनेक बाजूंनीं सुरू केली असतां त्यामुळें श्रमांचा समवाय घडत असतो. अर्थात या ठिकाणीं परस्परसहकार्य करणारे गवंडी प्रत्येकजण वेगवेगळेपणें एकच प्रकारचें काम करीत असतात. १ गवंडी रोज १२ तास याप्रमाणें १२ दिवसांच्या १४४ तासांत प्रगति करील त्याहून १२ गवंडी १४४ तासांच्या आपल्या सामुदायिक श्रमांत, अधिक प्रगति करतात. याचें कारण एकत्र सह-कार्यानें काम करणाऱ्या मनुष्यसमुदायाला हात आणि डोळे जणूं कांहीं शरीराच्या पुढें आणि मागेंहि असतात. कांहीं अंशीं हीं माणसें सर्वतश्चर असतात. एका कामाचें भिन्न भिन्न भाग एकदम प्रगति करीत असतात.

## वेळाची बचत

एखादें काम भानगडीचें म्हणजे अनेक प्रक्रियांचें असलें तर, सह-कार्य करणारीं माणसें अनेक असल्यामुळें श्रमाच्या निरनिराळ्या

प्रक्रिया निरनिराळ्या लोकांत वाटून देऊन त्या एकदम पार पाडता येतात. आणि एकंदर काम पार पाडण्यास जो वेळ लागतो तो त्यांमुळें कमी करतां येतो ( एका व्यक्तीला जें फल प्राप्त करून घेतां येणार नाहीं तें अनेक व्यक्ती एकदम काम करून मिळवितात. एकजण नांव वल्हवितो, दुसरा सुकाणूं फिरवतो, आणि तिसरा माशांसाठीं जाळें टाकीत असतो. अशा प्रकारें जें यश एका धीवराला मिळालें नसतें तें यश अनेक धीवर सहकार्यानें मिळवितात. " डेस्टट् डी ट्रेसीः ट्रेड टी ला व्होलेंटे एट् डी सेस् इफेट्स्ः पॅरीस १८२६ पान ७८ )

## कांहीं कामांतलें वेळाचें महत्त्व

धंद्यांच्या कित्येक शाखांत त्यांच्या श्रमप्रक्रियेच्या विशिष्ट स्वरूपामुळें अशा कांहीं आणीबाणीच्या वेळा निर्माण होतात कीं तेवढ्या त्या वेळांत अमुक एक परिणाम घडवून आणावाच लागतो. उदा. मेंढ्यांच्या एखाद्या कळपाची लोंकर काढावयाची असली अथवा गव्हाचें पीक कापावयाचें असलें तर तें काम सुरू झाल्यापासून अमूक एका वेळांत संपण्यावरच त्याचे गुण आणि परिमाण अवलंबून असतें. अशा बाबतींत श्रमप्रक्रियेला लागणारा वेळ आंखून दिलेला असतो. हेरिंग नांवाचे मासे पकडण्यांतहि अशीच ठराविक कालमर्यादा असते. अशीं कामें अमुक एका वेळांत घडवून आणणें ही गोष्ट अनेक श्रमदिवस एकत्र आणणें यावर अवलंबून असते. श्रम करणाऱ्यांची संख्या किती असेल त्यावरून घडलेलें काम किती उपयुक्त होईल हें ठरतें. पण अशा श्रम करणाऱ्यांची संख्या कितीहि मोठी असो, तेवढ्याच वेळांत एकेकट्या श्रम करणाऱ्यांची संख्या तितकें काम करण्यास जेवढी लागली असती त्यापेक्षां या समुदायांत काम करणारांची संख्या फारच थोडी असते. पश्चिम अमेरिकेमध्यें आणि इंग्रजांनीं जुन्या समाजव्यवस्था

उध्वस्त करून टाकलेल्या हिंदुस्थानांतील विभागांत अशी सहकार्य पद्धति नसल्यामुळें, अमेरिकेंत धान्य व हिंदुस्थानांत कापूस दरसाल कितीतरी नास होतो.

## प्रचंड कामांना सहकार्याचा उपयोग

सहकार्याचा पहिला फायदा असा कीं कोणतेंहि काम दीर्घकाल-पर्यंत करतां येतें. आणि म्हणून वाहत्या पाण्याचे ढाळ बांधणें, ताली बांधणें, कालवे, सडका, रेल्वे वगैरे बांधणें अशा कामीं सहकारपद्धतिच अमलांत आणावी लागते. सहकार्याचा दुसरा फायदा असा कीं उत्पादनाचें क्षेत्र कमी करणें हें त्यांत शक्य होतें. अशा प्रकारें श्रम कमी-करून उत्पादन वाढविण्यानें अनेक प्रकारच्या खर्चांची बचत होते. अनेक प्रकारच्या मजूरांच्या एकत्र येण्यानें व धनोत्पादनसाधनांच्या केंद्रीकरणानें ही बचत शक्य होते.

## मोठ्या भांडवलाची सहकार्यास गरज

एकेकट्या माणसांचा प्रत्येकीं कामाचा एक एक श्रमदिवस घेऊन त्यांची बेरीज केली तर त्यापेक्षां तितक्याच माणसांच्या सहकार्यानें झालेलें एका दिवसाचें काम अधिक उपयोगमूल्य निर्माण करतें. आणि म्हणून सहकार्यामुळें उपयोगमूल्याचा निर्मितीचा वेळहि कमी होत असतो. आपण केलेल्या पृथक्करणांत पाहिल्याप्रमाणें उत्पादनशक्तीची ही वाढ केवळ सहकार्यामुळेंच झालेली असते. परंतु एकाच भांडवलाच्या साहाय्यानें, एकाच भांडवलदारानें रोजमजूरांना एकदम कामास लावल्याशिवाय, आणि म्हणून त्यासाठीं एकदम त्या भांडवलदारानें त्यांची श्रमशक्ति खरेदी केल्याशिवाय त्या रोजमजूरांना एकत्र सहकार्य करणें शक्य होत नाहीं. या सर्व श्रमशक्तींचीं मूल्यें अथवा १ दिवसाची

किंवा १ आठवड्याची या सर्व मजूरांची मजूरी भांडवलदाराच्या खिशांत असली पाहिजे, तरच या सर्व विविध श्रमशक्ति उत्पादन-प्रक्रियेसाठीं एकत्र आणतां येतील. दर आठवड्यास आणि याप्रमाणें वर्षभर थोड्याशा मजूरांना मजूरी देण्यास जेवढें भांडवल लागतें त्यापेक्षां पुष्कळच अधिक भांडवल ३०० मजूरांना १ दिवसाची मजूरी एकदम देण्यास लागतें. आणि म्हणूनच ज्यांचें सहकार्य घडवून आणावयाचें त्या मजूरांची संख्या एकदम किती असावी, म्हणजेच सहकार्याचें प्रमाण केवढें असावें ही गोष्ट, श्रमशक्ति खरेदी करण्यासाठीं भांडवल-दार एकदम किती भांडवल देऊं शकतो यावर अवलंबून असतें. चर भांडवलासंबंधानें ही जी गोष्ट ती स्थिर भांडवलासंबंधानें अशीच खरी असते. उदा. ३० भांडवलदार प्रत्येकीं वेगवेगळेपणें १०।१० मजूर कामावर लावीत असतां त्यांना प्रत्येकीं जेवढा कच्चा माल लागतो त्या प्रत्येकाच्या ३० पट कच्चा माल ३०० मजूर लावणाऱ्या एकाच भांडवलदाराला एकदम लागतो. मजूर ज्या प्रमाणांत वाढविले जातील तितक्याच प्रमाणांत त्यांनीं सामुदायिकपणें वापरावयाच्या धनोत्पादन-साधनांचें मूल्य व परिमाण वाढतेंच असें नाहीं. तरीपण तें पुष्कळच वाढतें. याप्रमाणें धनोत्पादनसाधनांचें प्रचंड परिमाण व्यक्तिशः भांडवल-दाराच्या हातीं एकत्रित झालेलें असणें ही रोजमजूरांच्या सहकार्याला आवश्यक अशी भौतिक परिस्थिति आहे. धनोत्पादनसाधनांचें हें केंद्री-करण जितक्या प्रमाणांत मोठें झालें असेल तितक्या प्रमाणांत सहकार्याचें मान म्हणजे सहकार्य करणाऱ्या मजूरांची संख्या मोठी असूं शकतें.

## भांडवलदाराचें वर्चस्व अपरिहार्य

वर आपण पाहिलेंच आहे कीं ज्यावेळीं मजूर हा स्वतःसाठीं श्रम

न करतां भांडवलदारासाठीं करतो व म्हणून त्याच्या हाताखालीं श्रम करीत असतो त्यावेळीं मजूर भांडवलदाराच्या अंकित होतो. हें अंकित होणें आरंभीं नाममात्र असतें. अगणित रोजमजूरांचें असें रोज सहकार्य होऊं लागलें म्हणजे उत्पादनक्रिया चालू ठेवण्यासाठीं भांडवलदाराचें अवश्य वाटणारें वर्चस्व उत्पादनक्रियेचा एक अंगभूत भागच होऊन बसतें. उत्पादनाच्या क्षेत्रावर भांडवलदारानें आपलें प्रभुत्व गाजविणें ही गोष्ट आतां सेनापतीनें रणांगणावर प्रभुत्व गाजविण्याइतकीच अपरिहार्य झाली आहे.

## नियंत्रक सत्ता

मोठ्या प्रमाणावरील कोणत्याहि संघटित श्रमास कमीअधिक प्रमाणांत नियंत्रक सत्ता ही लागतेच. ही नियंत्रकसत्ता निरनिराळ्या व्यक्तींच्या कार्यांत परस्परानुकूलता उत्पन्न करते. आणि शरिराच्या निरनिराळ्या अवयवांनीं वेगवेगळें काम न करतां सर्व शरिरांतील एकाच प्राणशक्तीनें निरनिराळ्या अवयवांकडून एकहेतूनेंच काम करून घ्यावें तशा प्रकारचें कार्य ही नियंत्रक सत्ता करीत असते. व्हायोलिन वाजविणाऱ्या एका कलावंताला वेगळा नियंत्रक लागत नाहीं. त्याचा तोच स्वतः नेता असतो. उलट वृंदवादनाला ( ऑर्चेस्ट्राला ) मात्र वेगळा नेता लागतो. भांडवलाच्या हातीं मजूर येऊं लागल्यापासून नियंत्रण, देखरेख आणि समन्वय करण्याचें काम हें भांडवली उत्पादनांतलें महत्त्वाचें कर्तव्य होऊन बसतें. एकदां त्याला असें स्वतंत्र स्वरूप आलें म्हणजे त्याला एक विशिष्ट स्वरूपहि येत असतें. भांडवलशाही उत्पादनाचा प्रेरक हेतु म्हणजे भांडवलशाहीचें ध्येय प्रथम जास्तींत जास्त वाढावा उत्पन्न करणें हें असतें. अर्थात याचसाठीं भांडवलदाराचा फायदा व्हावा म्हणून जास्तींत जास्त

प्रमाणांत श्रमशक्तीची पिळणूक व्हावी लागते. एकाच वेळीं कामावर नेमलेल्या म्हणजे परस्पर-सहकार्य करणाऱ्या कामगारांची संख्या जशी वाढत जाते तसा त्यांचा प्रतिकारही वाढत जातो. आणि उलट दडपण घालून मजूरांची प्रतिकारशक्ति दडपून टाकण्याची आवश्यकताहि वाढत जाते. धनोत्पादनसाधनें आतां मजूरांची राहिलेली नसतात. तीं भांडवलदारांच्या मालकीचीं असतात. भांडवलदारांच्या हातीं या धनोत्पादनसाधनांचें प्रमाण जसें वाढत जातें तसें त्याबरोबर त्याचा विनियोग योग्य प्रकारें होईल असें त्यावर नियंत्रण घालण्याची जरूरीहि वाढत जातें. रोज-मजूरांचें सहकार्य आतां केवळ त्यांना एकत्र आणणाऱ्या भांडवलाकडूनच होऊं शकतें. कामगारांच्या निर-निराळ्या कामांतील परस्परसंबंध आणि त्या सर्व निरनिराळ्या कामांची एका मोठ्या उत्पादक कामासाठीं जुळणी करण्याची क्रिया या गोष्टी मजूराच्या कक्षेबाहेरच्या असतात. मजूरांना एकत्र आणून त्यांना एकत्र ठेवणाऱ्या भांडवलाचीं तीं कामें असतात. म्हणून मजूरांच्या विविध श्रमामध्यें असणारा संबंध भांडवलदाराच्या आंखीव योजनेच्या स्वरूपांत त्यांना दिसतो. प्रत्यक्ष व्यवहारांत आपले सर्व व्यवहार ज्याच्या अंकित आहेत त्या परक्याच्या इच्छाशक्तीनें हे संबंध घडून येतात, असें मजुरांना दिसत असतें. म्हणून भांडवल-दाराची सत्ता ही मजुरांना अनियंत्रित सुलतानासारखी वाटते. सहकार्याचें प्रमाण वाढत जाते तसतसें या सुलतानीस एक विशिष्ट स्वरूप येत जाते. भांडवलदार हा मजूरावर प्रत्यक्ष व सतत नियंत्रण करण्याचें काम एका विशेष प्रकारच्या मजूराला देत असतो. एखाद्या लष्करी संघटनेप्रमाणेंच औद्योगिक कामगारांच्या सैन्यासाठीं भांडवलदाराला आपल्या हाताखालीं ऑफिसर्स ( डायरेक्टर्स, मॅनेजर्स ) आणि नॉन् कमिशन ऑफिसर्स ( फोरमेन, ओव्हर-लुकर्स ) हे लागत असतात.

काम चालू असतां भांडवलदाराच्या नांवानें ते हुकमत गाजवीत असतात.

## भांडवली सत्तेची दोन कारणें

यावरून आपणांस दिसून येईल कीं श्रमशक्ति भांडवलाच्या अंकित होणें आणि तिच्यावर भांडवलाचें नियंत्रण येणें या गोष्टी दोन कारणांनीं घडतात. एक असें कीं सामुदायिकपणें केल्या जाणाऱ्या सर्वच कामास नियंत्रक सत्ता लागते. दुसरें असें कीं भांडवलशाही अमदानींत भांडवलदारासाठीं वाढावा निर्माण करणें हेंच या श्रमशक्तीचें कार्य असतें. या दोन कारणांमधील भेद नेहमीं ध्यानामध्यें ठेवला पाहिजे. तरच आपणांस भांडवलशाही उत्पादनाचें स्वरूप कळून येईल.

## श्रमशक्तीच्या वाढीबद्दलचा भ्रम

अनेक मजूर समुदायानें एकत्र काम करतात म्हणूनच नवीन धनोत्पादनशक्ति अस्तित्वांत येतात. आणि मजूरांच्या सहकार्यामुळें विद्यमान शक्तींची वाढ होते, हें आपण पाहिलें. हे दोन फायदेहि सहकार्यांतूनच उत्पन्न होतात. श्रमक्रियेंतच हें सहकार्य होऊं लागतें. आणि सहकार्य सुरू होताच मजूरांचें स्वतःवरील स्वामित्व नष्ट होऊन ते भांडवलाच्या अंकित होतात. अशा प्रकारें मजूराची वाढलेली धनोत्पादनशक्ति सहकार्यांत काम करीत असतांना भांडवलदाराच्या मालकीची असते. ही वाढ अगदीं फुकटांत होत असते. वर सांगितलेल्या परिस्थितींत मजूर आले कीं ही वाढ होते. आणि भांडवल हें वर सांगितलेली परिस्थिति निर्माण करते. ही 'फुकटांत' म्हणण्याचें कारण असें कीं सामाजिक श्रमांच्या धनोत्पादनशक्तीच्या वाढीमुळें म्हणजे मजूरामजूरांमधील सहकार्यानें वाढणाऱ्या धनोत्पादनशक्तीमुळें भांडवल-

दाराला मुळींच खर्च येत नाहीं. पण उलट ही वाढलेली धनशक्ति भांडवलदाराच्या हवालीं आपले श्रम करण्यापूर्वीं, मजूरानें स्वतः वाढविलेली नसते. आणि म्हणून ही शक्ति भांडवलाचा एखादा अंगभूत गुणच आहे कीं काय असें वाटत असतें.

## प्राचीन आशियांतील सहकार्य

साध्या सहकार्याचे परिणाम किती प्रचंड होतात हें प्राचीन आशिया, इजिप्त, येथील लोकांच्या इतिहासावरून दिसून येतें. " पौर्वात्य राष्ट्रांत पूर्वीं असें घडून आलें आहे कीं राज्यकर्त्यांना आपल्या मुलकी आणि लष्करी व्यवस्थेसाठीं लागणारा खर्च भागविल्यानंतरहि पुष्कळ शिल्लक रहात असून सौंदर्यवर्धनाच्या अथवा उपयुक्ततेच्या कामासाठीं ते ती शिल्लक वापरीत असत. अशीं कामें उभारण्यासाठीं बिगरशेती धंदे करणाऱ्या असंख्य लोकांच्या श्रमशक्तीवर त्या राज्यकर्त्यांची असलेली सत्ता त्यांनीं वापरली; त्यांच्या हातीं असलेल्या धनाच्या साहाय्यानें या लोकांकरवीं देशभर पसरलेलीं त्यांचीं प्रचंड स्मारकें त्यावेळीं त्यांनीं बाधविलीं....प्रचंड पुतळे उभे करणें, प्रचंड वजनाच्या वस्तु एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेणें या प्राचीनांच्या गोष्टी आजहि माणसाला चकित करून टाकतात. त्या कामीं त्या वेळीं प्रचंड प्रमाणांत फक्त मानवी बळच वापरलें जात होतें.....त्या वेळची मजूरांची संख्या आणि त्यांच्या प्रयत्नांचें एकीकरण एवढ्यानेंच तीं कामें होऊं शकलीं...आशियांतील एखाद्या राजाच्या बिगरशेती धंदेवाल्याजवळ स्वतःच्या शरीराखेरीज दुसरें कोणतेहि श्रमसाधन राजाच्या सेवेस आणण्यासारखें नव्हतें. त्यांची संख्या हेंच त्यांचें बल ठरलें. आणि या प्रचंड संख्येचें नियंत्रण करण्याच्या शक्तीनें त्यावेळचीं तीं भव्य कामें उभीं झालीं. या असंख्य मजूरांना ज्या सरकारी महसूलांनीं खाऊं

घालण्यांत आलें तो एकाच्या किंवा थोड्या लोकांच्या हातीं होता म्हणूनच हीं प्रचंड कामें होऊं शकलीं." ( आर. जोन्स : टेक्स्ट् बुक् ऑफ लेक्चर्स : १८५२ पृ. ७७ ) आशियांतील व इजिप्तमधील राजांची आणि एशियांतील धर्माधिकाऱ्यांची ही शक्ति आतां भांडवलदारांच्या हातीं संक्रमित झाली आहे.

मानवविकासाच्या प्रभातकालीं शिकारीदर जगणाऱ्या टोळ्यांमध्यें, हिंदी शेतकरी समूहांमध्यें वगैरे जें सहकार्य दिसून येतें तें धनोत्पादन-साधनांच्या सामुदायिक मालकीवर आधारलें होतें. तसेंच प्रत्येक समाजांत कोणीहि व्यक्ति आपल्या समाजाशीं आपला असलेला बंध तोडूं शकत नव्हती. एकहि मधमाशी आपल्या पोवळ्याला सोडीत नाहीं. तशी ही एकजूट असे. त्यावेळीं होणाऱ्या या सहकार्याचें स्वरूप भांडवलशाही अमदानींत हल्लीं होणाऱ्या सहकार्यापासून वरील दोनहि बाबतींत अगदीं भिन्न होतें. प्राचीन काळीं, मध्ययुगांत आणि विद्यमान काळीं मागासलेल्या वसाहतीमध्यें प्रचंड प्रमाणावर कोठें कोठें जें सहकार्य चाललेलें आढळून येतें तें मुख्यतः अंकितत्वावर आधारलेलें असतें. हें अंकितत्व गुलामगिरीमुळें येतें. पण भांडवलशाही सहकार्यामध्यें आरंभापासून अखेरपर्यंत स्वतःची श्रमशक्ति भांडवलदाराला विकणाऱ्या रोजमजूराचें स्वातंत्र्य हें अत्यवश्य मानलें जातें. ऐतिहासिक दृष्टीनें भांडवलशाही सहकार्याचा हा प्रकार लहान शेतकऱ्यांची शेती आणि स्वतंत्र हस्तव्यवसायिकांचे धंदे यांच्याविरुद्ध निर्माण झालेला दिसतो. या जुन्या व्यवसायांच्या दृष्टीनें पाहतां भांडवलशाहींतलें सहकार्य ऐतिहासिक दृष्ट्या त्यांतून निर्माण झालें असें वाटत नाहीं. पण खुद्द सहकार्य हे तत्त्वतः ऐतिहासिक आहे, परंपरागत आहे आणि भांडवलशाही पद्धतींत तें समाविष्ट झाल्यानें भांडवलशाही पद्धतीला त्यानें वैशिष्ट्य आणून दिलें आहे असें दिसून येतें.

एकाच उत्पादनाच्या क्रियेमध्यें एकदम रोजमजूरांची प्रचंड संख्या लावणें हा भांडवलशाही उत्पादनाचा आरंभ होय. श्रमाच्या प्रक्रियेनें मजूराला भांडवलाच्या अंकित करून श्रमशक्तीच्या वापरांत हा पहिला फरक घडवून आणला.

## (२) श्रमविभाग आणि
## हस्तव्यवसायात्मक भांडवलशाही (मॅन्यूफॅक्चर)*

सहकार्य हें श्रमविभागावर आधारलें असतें आणि त्यामुळें हस्त-व्यवसायी भांडवलशाहींत त्याला एक विशिष्ट स्वरूप येत असतें. १६व्या शतकाच्या मध्यापासून १८व्या शतकाच्या शेवटल्या ३० वर्षांपर्यंत भांडवलशाही उत्पादनाची पद्धति श्रमविभागात्मक हस्तव्यवसायाचीच होती. हें उत्पादन दोन मार्गांनीं वाढत होतें.

### अनेक हस्तव्यवसायांचें सहकार्य

(१) एकाच श्रमगृहामध्यें एका भांडवलदाराच्या नेतृत्वाखालीं निरनिराळे हस्तव्यवसायी एकत्र आणून त्यांच्या सर्वांच्या हातून एकाच प्रकारचा माल निर्माण केला जाई. उदा. एक घोड्याची गाडी, सुतार, चांभार, शिंपी, लोहार, चकाकी देणारे, रंगारी, मुलामा देणारे, इ. विविध कारागिरांच्या श्रमांनीं घडविली जात असे. गाड्या करावयासाठीं या सर्व कारागिरांना भांडवलदारांनीं एका इमारतींत आणून त्यांच्याकडून गाडी करवून घेतली. त्यांचें काम एकमेकांच्या सहकार्यानें झालें. गाडी पूर्ण झाल्याशिवाय तिला मुलामा चढवितां येत नाहीं हें खरें, पण एकदम अनेक गाड्या करण्याचें काम सुरू झालें तर कांहीं गाड्या मुलामा देणारांच्या हातीं असतील

* कॅपिटल, खंड १, प्रकरण १४.

त्यावेळीं पुढल्या कांहीं गाड्यांचीं प्राथमिक कामें दुसरे कामगार करूं शकतात. अजून आपण साध्या सहकार्यासंबंधींच बोलत आहों. माणसें आणि वस्तु यांच्या स्वरूपांत आपणाला येथें उत्पादनसाहित्य मिळतें.

## सहकार्यामुळें झालेलें एकीकरण

पण लवकरच एक महत्त्वाचा फरक घडून येतो. शिंपी, लोहार वगैरे कारागीर आतां फक्त गाड्या करण्याच्याच कामांत गुंतल्यामुळें आपापल्या व्यवसायांतील पूर्वीची इतर अनेक कामें करण्याची त्यांची संवय हळूं हळूं नाहींशी होते. उलट त्यांचें कर्तृत्व एका विशिष्ट क्षेत्रापुरतेंच आतां होत असल्यानें या संकुचित क्षेत्राच्या दृष्टीनें ते आपलें कर्तृत्व फार चांगलें गाजवूं लागतात. अगदीं आरंभीं गाडी तयार करण्याचें काम हें अनेक स्वतंत्र धंदेवाल्यांच्या जोडणीनें केल्यासारखें दिसे. हळूं हळूं गाडी बांधण्याच्या एका कामाचे हे निरनिराळे विभाग पाडले आहेत असें स्वरूप त्यास आलें. प्रत्येक विभागाचें काम आंखीव व ठाशीव झालें आणि सगळा धंदा मिळून सर्व कामगार एकजुटीनें करूं लागले. याच प्रकारें कापड विणण्याचे कारखाने व इतर असेच कित्येक कारखाने अनेक हस्तव्यवसायांच्या भांडवलदारांनीं केलेल्या एकीकरणांतून व नियंत्रणापासून निर्माण झाले.

## एकाच हस्तव्यवसायाची विभागणी

(२) ही हस्तव्यवसायी भांडवलशाही वरीलहून अगदींच वेगळ्या अशा पद्धतीनेंहि निर्माण झाली. एक भांडवलदार एकाच वेळीं एकच अथवा एकाच जातीचें काम करणारे अनेक कारागीर एकत्र एका श्रमगृहांत नेमीत असे. कागद करणारे, छापण्याचे खिळे करणारे सुया करणारे असे हे कारागीर असत. हें सहकार्य अगदीं प्राथमिक

स्वरूपाचें असे. या प्रत्येक कारागिराच्या हाताखालीं एखाददुसरा कारागीरहि असे. असा प्रत्येक कारागीर एकेक वस्तु पूर्णपणें करी. तिच्या उत्पादनासाठीं लागणाऱ्या सर्व प्रक्रिया त्याचा तोच करी. आपल्या जुन्या हस्तव्यवसायी पद्धतीनें तो अजूनहि काम करीत असे. पण लवकरच बाहेरच्या परिस्थितींत पुष्कळसा फरक पडून एकाच ठिकाणीं सर्व मजूर आणण्याच्या या गोष्टीचा उपयोग वेगळ्या प्रकारें होऊं लागला. सुया, कागद किंवा टाईप यांची मागणी इतकी वाढली कीं एकेकट्यानें तो तो सर्व माल निर्माण करण्यानें हवा तितका पुरवठा जलद होईना. म्हणून एकेका कारागिराला तो तो माल पुरा करण्याचें काम न देतां त्या माल निर्माण करण्याच्या प्रक्रियेचे पोटभाग पाड-ण्यांत येऊन एकाच वेळीं निरनिराळ्या कारागिरांना निरनिराळीं कामें देण्यांत आलीं. ही कामाची आगंतुक कारणानें झालेली विभागणी तशीच चालू ठेवल्यामुळें तीपासून उत्पादनाचा फायदा होऊं लागला; हळू हळू अशा परिस्थितींत श्रमविभागाची कायम पद्धत निर्माण होते. उत्पन्न झालेला विक्रीमाल हा पूर्वीं अनेक कामें एकट्यानेंच करणाऱ्या कारागिराकडून आतां केला जात नसून, तो आतां अनेक कारागिरां-कडून, प्रत्येक कारागिरानें एकंदर उत्पादनप्रक्रियेंतील एकेकच क्रिया करावी अशा पद्धतीनें केला जातो.

## श्रमविभागानें उत्पादनाचा गुण पालटतो

आतां आपण अधिक तपशीलांत शिरूं. या श्रमविभागपद्धतींत एक कारागीर आयुष्यभर एकच एक काम करीत राहिल्यामुळें त्याचें शरीर हें त्याच्या कामाचें आपोआप हत्यारच होऊन बसतें. त्याचा परिणाम असा होतो कीं तें काम उरकण्यास अनेक कामें एकामागून एक अशा प्रकारें एकट्यानेंच करणाऱ्या कारागिरापेक्षां या कारागिरास

तें काम करण्यास कमी वेळ लागतो. एकंदर कारखान्यांतील अनेक वेगवेगळीं कामें करणारे जे मजूर, त्या सर्वांमिळून कारखाना हा एक जिवंत यंत्र म्हणजेच एक सामुदायिक मजूर बनतो. आणि म्हणून जुन्या स्वतंत्र कारागिरांशीं तुलना करतां श्रमविभाग पद्धतीनें निर्माण होणारा माल कमी वेळांत तयार होतो. म्हणजेच श्रमाची उत्पादनशक्ति वाढते. तसेंच श्रमविभागपद्धतीनें एकेक विशिष्ट काम त्याच त्याच मजुरानें करावयाचें म्हटलें म्हणजे त्या कामाच्या पद्धति सुधारत जातात. एकच एक साधें काम पुनःपुन्हां केल्यानें त्या कामावर कामगाराचें चित्त एकाग्र होतें, आणि तेंच काम कमी श्रमांत कसें करावें हें त्याला अनुभवानें समजूं लागते. वयानें लहान-मोठे कामगार एकाच काळीं राहून कारखान्यांत एखादी वस्तु करण्याचें कामीं श्रमविभागानें सहकार्य करीत असल्यामुळें निरनिराळ्या कामांचें जें चातुर्य कामगारांच्या अंगीं येतें तें संचित होऊन परंपरेनें लहान लहान कामगारांना तें चातुर्य मिळत जातें.

## प्राचीन उत्पादन व आधुनिक उत्पादन

ही भांडवलशाही कारखानदारी ज्यावेळीं सुरू झाली त्यावेळीं समाजामध्यें निरनिराळे धंदे निरनिराळे लोक करीत असून सामाजिक श्रमविभाग रूढ झाला होता. हीच श्रमविभागाची पद्धति भांडवलदारानें आपल्या कारखान्यांत पद्धतशीरपणें सुरू करून ती अगदीं जास्तींत जास्त काटेकोर केली; त्यामुळें भिन्न भिन्न कामें करणाऱ्या कामगारांचें चातुर्य वाढलें. "डाक्क्याची मलमल ही तलमपणांत अद्वितीय ठरली आहे. कारोमांडेल किनाऱ्यावरील कॅलिको व इतर अनेक प्रकारचें कापड तेजस्वितेंत व टिकाऊपणांत अव्वल दर्जाचें असतें. तरीपण भांडवल, यंत्रसामुग्री, श्रमविभाग, अथवा युरोपीय

कारखानदाराला आपला माल करण्यास ज्या अनेक सोयी असतात. त्यांवाचून या वस्तु केल्या जातात. या वस्तु विणणारा कोष्टी हा एकलकोंडी व्यक्ति असतो. गिऱ्हाइकानें मागणी केली कीं तो आपलें वस्त्र विणतो. त्याचा हातमाग अगदींच ओबडधोबड असतो. झाडाच्या नुसत्या फांद्या अथवा काठ्या लावून तो केलेला असतो. विणलें जाणारें वस्त्र गुंडाळण्याचीहि सोय त्यांत नव्हती. आणि म्हणून माग वस्त्राच्या पूर्ण लांबीइतका पसरून ठेवावा लागल्यानें तो अगदीं गैरसोयीचा होई. तो त्या कोष्ट्याला आपल्या झोपडींत ठेवतां येत नसे. आणि म्हणून उघड्या मैदानावर कोष्ट्याला आपला धंदा करावा लागून हवेंतल्या थोड्याहि फरकानें त्या कोष्ट्याच्या धंद्यावर परिणाम होत असे." (हिस्टॉरिकल अँड डिस्क्रिप्टिव्ह अकौंट ऑफ इंडिया : ह्यू मरे अँड जेम्स वुइलसन् : व्हॉ. II पान ४४९: एडिंबरो: १८३२ );

कोळ्याला जशी जाळे विणण्याची कला परंपरागत मिळते तसें हें विणण्याचें कौशल्य मागल्या पिढीकडून पुढल्या पिढीकडे अशा प्रकारें प्राप्त होते. तरीहि या हिंदु कोष्ट्याचें काम कारखानदारी मजूराच्या कामापेक्षां अधिक भानगडीचें असतें.

## वैयक्तिक आणि श्रमविभागात्मक हस्तव्यवसाय

एकच कारागीर एक माल पूर्ण करण्यासाठीं स्वतःच खपत असला म्हणजे तो माल करण्याच्या विविध प्रक्रिया त्याला स्वतःलाच एका-मागून एक कराव्या लागतात म्हणून त्यासाठीं त्याला एकसारखी जागा बदलावी लागते अथवा हत्यारें बदलावीं लागतात. एका प्रक्रियें-तून दुसऱ्या प्रक्रियेंत जातांना कामाचा ओघ तुटतो. आणि श्रम-दिवसांत खंड पडतात. पण कारखान्यांत श्रमविभागानें केल्या जाणाऱ्या भिन्न भिन्न कामांत प्रत्येक कामगार एकेका कामास सर्व दिवसभर

जुंपलेला राहतो. यामुळें श्रमदिवसांत खंड पडत नाहीं. आणि श्रमाची उत्पादनशक्ति अशा प्रकारें जी वाढलेली असते ती श्रमाचा वेग वाढल्यानें वाढते. कारण पूर्वींच्याच वेळांत अधिक श्रमशक्ति आतां खर्च होते. शिवाय वाया जाणारी श्रमशक्ति कमी होते. स्थितीकडून गतीकडे जातांना थोडीफार शक्ति खर्च होत असतेंच. पण श्रमविभाग-पद्धतीनें कामें सुरू झालीं म्हणजे गति अखंड चालू राहून ही शक्ति खर्च होण्याचें टळतें. उलट एकच काम सतत करीत राहिल्यानें माणसांच्या अंगीं असणारा प्राणिसहज उत्साह आणि सहजता ही नाहींशी होते, कारण काम केवळ बदलल्यानेंच जी एक करमणूक होत असतें व आनंद होत असतो तो यामुळें नष्ट होतो.

## हत्याराची सुधारणा

कामगाराची उत्पादनशक्ति ही केवळ कामगाराच्या कार्यक्षमतेवरच अवलंबून नसून त्याचीं हत्यारें अधिकाधिक कार्यक्षम करण्यावर अव-लंबून असते. सुऱ्या, हातोडे वगैरे निरनिराळीं हत्यारें निरनिराळ्या प्रक्रियांत वापरतां येतात. एकच हत्यार एका प्रक्रियेंत अनेक कामा-साठीं वापरतां येतें. परंतु एका श्रमकार्याच्या अनेक प्रक्रिया श्रम-विभागपद्धतींत भिन्न भिन्न झाल्या म्हणजे प्रत्येक वेगळ्या प्रक्रियेला एक विशिष्ट स्वरूप येत असतें. आणि त्यामुळें त्या त्या प्रक्रियेंतील हत्यारेंहि भिन्न भिन्न होत जातात. पूर्वीचें एकच एक हत्यार निर-निराळ्या प्रक्रियांना वापरलें म्हणजे ज्या अडचणी येऊं लागतात त्या निवारण्यासाठीं हे फरक केले जातात. श्रमाचीं हत्यारें वेगवेगळीं करणें हा कारखानदारी पद्धतीचा एक ठळक विशेष आहे. एका बर्मिंगहॅम-मध्यें ५०० निरनिराळ्या प्रकारचे हातोडे होतात. आणि त्यांतला कोणताहि एक एकाच सर्व कामासाठीं चालत नसून त्यांतील अनेक

हातोडे त्या कामाच्या अनेक प्रक्रियांना वेगवेगळे लागतात. या कारखानदारी पद्धतीनें हत्यारें साधीं होतात, सुधारतात, आणि त्यांची संख्याहि वाढते.* विशिष्ट श्रमप्रकाराला लागणारे विशिष्ट हत्यारच करावयाचें यामुळें ही प्रगति होते. यामुळें यंत्राच्या उत्पत्तीलाहि आवश्यक अशी भौतिक परिस्थिति निर्माण होते. कारण यंत्र हें अनेक साध्या हत्यारांची संघटना करूनच बनविलेलें असतें.

श्रमविभागांत विशिष्ट काम करणारा मजूर आणि त्याचीं साधीं हत्यारें हा कारखानदारीचा अगदीं प्राथमिक घटक होय. आतां आपण आपण कारखानदारी उत्पादनाचें स्वरूप साकल्यानें कसें दिसतें याचा विचार करूं.

## अनेक अवयवांचा एक माल

कारखानदारी उत्पादनाच्या संघटनेचीं मुख्यतः दोन स्वरूपें असतात. जुन्या हस्तव्यवसायी कारखानदारीचे आधुनिक यांत्रिक कार-

* डार्विन आपल्या 'जीवकोटींचें मूळ' या ग्रंथात वनस्पति आणि प्राणी यांच्या नैसर्गिक अवयवासंबंधानें लिहितो. "जोंपर्यंत एकाच इंद्रियाला भिन्न भिन्न प्रकारचीं कामें करावीं लागतात तोंपर्यंत तें इंद्रिय वेगवेगळीं कामें करण्याचा आपला गुण कायम ठेवतें. नैसर्गिक निवडीचा ( नॅचरल सिलेक्शन ) सिद्धांत येथें आपलें उपयुक्त गुण सांभाळण्याचें आणि निरुपयोगी गुण नष्ट करून टाकण्याचें कार्य विशेष काळजीनें करीत नाहीं. याचें कारण त्या इंद्रियास विविध कामांच्या उपयोगीं पडावें लागतें हें होय. जर तें इंद्रिय एकाच कामीं वापरलें गेलें असतें तर त्याच्या अंगचे इतर गुण खचित नष्ट झाले असते. याच पद्धतीनें सर्वच कामासाठीं वापरण्यांत येणाऱ्या सुऱ्या एकाच आकाराच्या असतात. पण निरनिराळ्या उपयोगासाठीं निरनिराळ्या सुऱ्या वापरण्यांत येऊं लागल्या म्हणजे त्यांचे आकार उपयोगपरत्वें बदलत जातात."

खानदारींत रूपांतर होत असतांना या दुहेरी स्वरूपाचें होणारें कार्य फार महत्त्वाचें असतें. उत्पन्न होणाऱ्या मालामुळेंच हें दुहेरी स्वरूप निर्माण होतें. उत्पन्न होणारा माल निरनिराळ्या स्वतंत्र उत्पादन-प्रक्रियांत तयार झालेले अवयव एकत्र आणून व फक्त त्यांची जोडणी करून बनविण्यांत येतो अथवा एकामागून एक अशा अनेक प्रक्रियां-तून जात असतां अखेरीस तो माल पूर्ण होतो.

उदा. एक आगगाडीचें एंजिन घ्या. त्यांत ५००० स्वतंत्र विभाग असतात. हें लोकोमोटिव्ह अर्थात् अगदीं प्राथमिक कारखानदारीचें उदाहरण होऊं शकत नाहीं. कारण तें आधुनिक यांत्रिक कारखानदारीनें केलें आहे. पण घड्याळाचें उदाहरण चालूं शकेल.

## घड्याळाची कारागिरी

पूर्वी नूरेन्बर्गमधला घड्याळाचा कारागीर सगळें घड्याळ एकटाच करीत असे. पण आतां कारागिरांची प्रचंड संख्या घड्याळांतील निर-निराळीं कामें करण्यासाठीं लावली जाते. मेनस्प्रिंग करणारे, डायल करणारे, स्पायरल स्प्रिंग करणारे, ज्युवेल्ड होल करणारे, रुबी लेव्हर करणारे, कांटे करणारे, केस करणारे, स्क्रू करणारे, मुलामा देणारे, पितळेचीं व पोलादाचीं चाकें करणारे, टांचण्या करणारे, पिव्हट करणारे, ....इ. असंख्य कारागीर घड्याळ पूर्ण हातांत येईपर्यंत लागतात. यांतील फक्त कांहीं थोड्या अवयवांना अनेक कामगारांच्या हातून जावें लागतें. बाकीचे सर्व अवयव वेगवेगळे कामगार एकेकटेच करतात. नंतर हे सर्व अवयव एकत्र आणून त्यांच्या जोडणीनें त्यांचें यंत्र बनवलें जातें. हा पूर्ण तयार झालेला माल आणि त्याचे भिन्नभिन्न अवयव यांमधील नातें हें केवळ आकस्मिक आहे. हे निरनिराळे अवयव करणारे कामगार एकाच कारखान्यांत एकत्र आणून त्यांच्याकडून ते ते अवयव करवून

घेऊन त्यांच्या जोडणीनें घड्याळ तयार करणें काय किंवा हे सर्व अवयव करणारे कामगार जेथें आपापल्या ठिकाणीं हे अवयव तयार करीत असतील तेथून ते एकत्र आणून मग त्यांच्या जोडणीनें घड्याळ तयार करणें काय घड्याळ हें व्हायचें तसेंच होतें. या सर्व अवयवांचे व्हॉड आणि न्यूफ्‌चॅटेल या कँटनमध्यें स्वतंत्र हस्तव्यवसाय चालतात. तसेंहि ते चालूं शकतील. जिनीव्हामध्यें घड्याळाचे प्रचंड कारखाने असून एकाच भांडवलदाराच्या हाताखालीं घड्याळाचे निरनिराळे अवयव करणारे कारागीर कामें करतात. जिनीव्हांतहि डायल, स्प्रिंग आणि केसहि बहुधा कारखान्यांत करीत नाहींत. घड्याळ करण्याच्या कारखान्यांत कामगार एकत्र आणून तो धंदा नफ्यानें चालविणें ही गोष्ट क्वचित घडणारी आहे. कारण घरीं कामें करणाऱ्या कामगारांत चढाओढ फार असते. एकंदर घड्याळ करण्याच्या कामाचे परस्परभिन्न असे विभाग पाडतां येऊन निरनिराळ्या विभागांत साम्य कांहींच नसल्यानें तींच तींच हत्यारें निरनिराळ्या विभागांना वापरतां येत नाहींत म्हणून भांडवलदार घड्याळाचे निरनिराळे अवयव करण्याचीं हीं कामें कामगारांना त्यांच्या त्यांच्या घरीं देतो. आणि श्रमगृह बांधण्याचा खर्च वांचवितो.*

---

* १८५४ मध्यें जिनीव्हांत ८०००० घड्याळें होत. न्यूफ्‌चॅटेलच्या कँटनमध्यें याच्या ५ पटीहून अधिक घड्याळें होत असत. लाचॉफ्-डी फॉड्स् या गांवीं घड्याळाचे प्रचंड कारखाने आहेत. तेथें जिनीव्हाच्या दुप्पट घड्याळें दरसाल होतात. १८५० पासून १८६१ पर्यंत जिनीव्हांत ७५०००० घड्याळें झालीं. घड्याळासारख्या वस्तूच्या अवयवांतल्या निर्मितीचे धंदे एकत्र आणतां येत नसल्यानें प्रचंड यंत्रानें चालविण्याचा धंदा असें स्वरूप घड्याळासारख्या वस्तूच्या उत्पादनास येत नाहीं. घड्याळ या वस्तूस प्रचंड धंदा करण्यास आणखीहि दोन अडचणी आहेत. घड्याळाचे अवयव अतिशय नाजूक असतात ही एक अडचण.

तरीपण श्रमविभागांत काम करणारा हा मजूर जरी आपल्या घरीं बसून काम करीत असतो तरी तो भांडवलदारासाठीं आतां हें काम करीत असतो. सर्वच्या सर्व घड्याळ आपणच एकटा करणारा जो प्राचीन घड्याळजी तो स्वतःच्या गिऱ्हाइकासाठीं घड्याळ बनवीत होता, पण हा सुटे अवयव करणारा कारागीर गिऱ्हाइकासाठीं माल तयार करीत नसून भांडवलदारासाठीं करीत असतो.

वरीलहून मालउत्पत्तीचा दुसरा प्रकार म्हणजे ज्यांत उत्पन्न होणारा माल पूर्ण होण्याच्या प्रवासांत पायरीपायरीनें निरनिराळ्या अवस्थांतून जात असतो तो. टांचण्यांचें उदाहरण या प्रकारांत येतें. टांचण्या करण्याच्या तारेला ७२ माणसांच्या, केव्हां केव्हां ९२ माणसांच्या हातून प्रत्येकीं निरनिराळ्या अवस्थांतून जावें लागतें.

## कारखानी उत्पादनाचें व्यापक स्वरूप

आपण उदाहरणादाखल विशिष्ट एका कच्च्या मालाकडे लक्ष पुरवूं या. कागद करण्यास लागणाऱ्या चिंध्या, अथवा सुया करण्यास लागणारी तार घ्या. तिचा माल पूर्ण होण्यापूर्वीं अनेक कामगारांच्या

---

आणि दुसरी अडचण म्हणजे घड्याळ ही चैनीची वस्तू असतें ही होय. म्हणून घड्याळाच्या प्रकारांत विविधताहि पुष्कळ असते. लंडनमधल्या कोणत्याहि उत्तम घरांत वर्षांतून येणारीं कोणतींहि १२ घड्याळें एकासारखीं एक नसतात. व्हॅचेरीन् अँड कान्स्टॅंटिन् या घड्याळकंपनीनें घड्याळाच्या कामीं मोठीं यंत्रें यशस्वी रीतीनें वापरलीं आहेत. पण त्यामुळेंच त्यांना भिन्न भिन्न आकाराचीं घड्याळें करतां येत नाहींत. फक्त तीनचार प्रकारच त्यांनीं केलेले आहेत. अत्यंत विजातीय अशा अवयवांची बनलेली वस्तु म्हणून घड्याळाचेंच उदाहरण देतां येईल. या घड्याळ करण्याच्या सर्व क्रियेचें निरीक्षण केल्यास निरनिराळ्या प्रक्रियांना निरनिराळीं हत्यारें कशीं लागतात हें चांगल्या प्रकारें कळून येतें.

ह्यातून अनेक अवस्थांतून तिला जावें लागतें. उलट कारखान्यांत काम चाललेलें आपण पाहिल्यास तेथें कच्चा माल सर्व अवस्थांतून एकदम चाललेला दिसून येतो. कारखानारूपी जो समुदायिक मजूर तो आपल्या कांहीं हातांनीं व त्या हातांतल्या हत्यारांनीं ती तार ओढतो, दुसरीं हत्यारें घेतलेल्या दुसऱ्या कांहीं हातांनीं ती तार ताणून धरतो, आणखी कांहीं हातांनीं कापतो, आणखी कांहीं हातांनीं तिला टोक करतो. म्हणून अमुक एका ठराविक वेळांत पूर्वीपेक्षां पुष्कळ अधिक टांचण्या होतात. कारखानदारींतहि श्रमप्रक्रियेची सामाजिक संघटना होते याचें कारण एकेका कामगाराला विशिष्ट कामाला जुंपलें जातें हें होय.

## कामगारांना शिस्तीची कैची

एका मोठ्या कामाचें प्रत्येक पोटकाम हें पूर्ण होणाऱ्या वस्तूच्या निर्मितींतील एकेक अवस्था होय. अर्थात त्या त्या अवस्थेसाठीं काम करणारा एक मजूर अथवा अनेक मजूरांचा गट आपल्या अवस्थेंतील कामानें पुढल्या अवस्थेंतील कामाचा कच्चा मालच तयार करीत असतो. मागल्या अवस्थेंतील कामाचा शेवट हा पुढील अवस्थेंतील कामाचा आरंभ असतो. प्रत्येक अवस्थेंतील कामास किती वेळ लागतो हें अनुभवानें कळून येतें. आणि अमुक एक अवस्थेंतलें काम अमुक वेळांत होईल असें धरून चालूनच एकंदर कारखान्याची संघटना केलेली असते. असें धरून चालतां आलें तरच पुरवणीदाखल अशा अनेक श्रमक्रिया एकदम व अखंडपणें चालू शकतात. एका मोठ्या कामांतील अनेक प्रक्रिया अशा प्रकारें परस्परावलंबी असल्यानें मजूरहि परस्परावलंबी होतात. आणि त्यामुळें कोणाहि कामगाराला आवश्यक वेळाहून अधिक वेळ काम करतां येत नाहीं. यामुळें सर्व कामांत

सातत्य, एकसारखेपणा, नियमितपणा, शिस्त आणि श्रमाचा वेग इत्यादि गुण जे उत्पन्न होतात ते पूर्वींच्या स्वतंत्र हस्तव्यवसायिकांत अथवा भांडवलशाहीच्या प्राथमिक अवस्थेंतील सहकार्यांतहि दिसून येत नव्हतें.

## मुख्य काम व त्याचीं पोटकामें

एकाच कामाच्या निरनिराळ्या प्रक्रियांना कमीअधिक वेळ लागतो यामुळें सारख्याच वेळांत निरनिराळ्या पोटकामांचें फल कमी-अधिक येत असते. आणि म्हणून एकाच कामगाराला दररोज तेंच तेंच पोटकाम जरी करावें लागलें तरी निरनिराळ्या पोटकामांना लाग-णारी मजूरांची संख्या, त्या पोटकामाच्या फलाची एकंदर कामाच्या फलश्रुतीस गरज कमीअधिक असेल त्याप्रमाणें, कमीअधिक असूं शकते. उदा. टाईप करण्याच्या क्रियेंत टाईप बनविणारे चार मजूर असतात, टाईप मोडणारे दोन असतात, तर टाईप घासणारा एकच असतो. कारण टाईप बनविणारा तासाला २००० टाईप बनवितो, मोडणारा ४००० मोडतो आणि घासणारा ८००० घासतो.

अशा प्रकारें निरनिराळ्या पोटकामांना लागणाऱ्या कामगारांचें प्रमाण अनुभवानें निश्चित ठरलें म्हणजे जितक्या प्रमाणांत एखादें काम वाढवा-वयाचें असेल तितक्या प्रमाणांत त्या त्या पोट-मजूरांची संख्या वाढवावी लागते. उदा. टाईप घासणारा एक माणूस अधिक नेमावयाचा अस-ल्यास त्याच्याबरोबर दोन टाईप मोडणारीं माणसें आणि चार टाईप करणारीं माणसें नेमल्यावांचून तें शक्य होत नाहीं. यांत फायद्याची गोष्ट एक असते कीं एकच माणूस कांहीं बाबतींत लहान प्रमाणावरील कामांस उपयोगी पडतो तसा तोच मोठ्या प्रमाणावरील कामासहि पुरतो. उदा. देखरेखीचें काम हें अशा प्रकारचें आहे. तसेंच माल तयार होत असतांना एका अवस्थेपर्यंत झालेला माल पुढल्या प्रक्रियेसाठीं

दुसरीकडे वाहून नेण्याचें कार्य हेंहि याच जातीचें असतें. अशीं कामें अमुक एका मजूराला वाटून देणें फायदेशीर होण्यासाठीं कांहीं एका परिमाणापर्यंत मजूरांची संख्या वाढावी लागते. आणि कारखान्यांतल्या श्रमविभागानुसार विभागलेल्या भिन्न भिन्न क्षेत्रांतील एकाच क्षेत्रांत ही मजूरांची संख्या वाढणें पुरें होत नसून प्रत्येक क्षेत्रांत यथाप्रमाण वाढ व्हावी लागते.

## बाटल्यांच्या कामांतील श्रमविभाग

कित्येक कारखान्यांत संघटित मजूरांचा एकेक गटच असतो. काचेच्या बाटल्या करणारांचा कारखाना घ्या. त्यांत बाटल्या करण्याच्या तीन भिन्न भिन्न अवस्था कल्पितां येतील. पहिली प्राथमिक अवस्था. तीमध्यें काचेची घटक द्रव्यें तयार करणें, वाळू आणि चुना मिसळणें, तीं सर्व द्रव्यें वितळून त्यांचा रस तयार करणें, या पहिल्या अवस्थेंत अनेक वेगवेगळे मजूर लावलेले असतात. शेवटची जी भट्टींतील सुकलेल्या बाटल्या काढून घेऊन व त्यांचें वर्गीकरण करून त्यांचे गठ्ठे बांधण्याची अवस्था, तींतहि पुष्कळ मजूर असतात. मधली जी अवस्था तीमध्यें काच वितळविण्याचें मुख्य काम असतें. भट्टीच्या प्रत्येक तोंडास मजूरांचा एकेक गट असतो. त्यामध्यें एकजण काचेस सफाई देतो. दुसरा फुंकणारा असतो. एकजण काच काढून देतो. असे आणखीहि कांहीं कामगार प्रत्येक गटांत असतात. हे निरनिराळे कामगारांचे गट म्हणजे एकंदर कारखानारूपी शरीराचीं तीं इंद्रियेंच होत. या गटांतील एक मनुष्य नसला तरी तो गट लटका पडतो. पण काचेच्या भट्ट्यांना अनेक तोंडें असतात. इंग्लंडांतील भट्ट्यांना चार ते सहा तोंडें असतात. प्रत्येक तोंडांत एक मातीचा रांजण असतो, त्यांत वितळलेला काचेचा रस असतो आणि वर सांगितलेला पांच माणसांचा गट प्रत्येक

तोंडाशीं असतो. प्रत्येक गटाची रचना प्रत्यक्ष श्रमविभागावर केलेली असते. निरनिराळ्या गटांच्या दरम्यान साधें सहकार्याचें नातें असतें. कारण सर्वजण मिळून धनोत्पादनाचें एकच साधन—उदा. भट्टी वापरतात. त्यामुळें त्या भट्टीचा उपयोग काटकसरीनें होतो. चार ते सहा तोंडाची चार ते सहा गटांना राबविणारी एक भट्टी म्हणजे एक काचगृह होतें. अशीं अनेक काचगृहें एकेका कारखान्यांत असतात. त्या कारखान्यांत या काचगृहांच्या कामाचें पूर्व तयारीचें काम करणारीं माणसें व काचगृहांतून बाहेर आलेल्या काचेची पुढें विल्हेवाट लावणारीं माणसें असें इतर अनेक मजूरहि कारखान्यांत असतात.

## अनेक लहान धंद्यांचा एक मोठा धंदा

अनेक धंद्यांच्या जोडणीनेंहि एखादा कारखाना उभारला जातो. उदा. इंग्लंडमधील कांहीं काचकारखान्यांत मातीचे रांजण करण्याचीहि पोटशाखा आहे. कारण रांजण चांगले असतील तरच कांच चांगली होते. याप्रमाणेंच गारगोटीपासून कांच करणें हा धंदा कांच कापण्याच्या धंद्याशीं जोडलेला असतो. त्याला जोडूनच पितळेचे साचे करण्याचाहि धंदा असतो. काचेच्या निरनिराळ्या वस्तूंना जी धातुकामाची जोड द्यावी लागते तें धातुकाम या पितळेच्या कारखान्यांत केलें जातें. हे निरनिराळे लहान धंदे असे एकत्र आणले असतां मोठ्या कारखान्यांची कमीअधिक प्रमाणांत तीं भिन्नभिन्न खातीं होतात. पण तीं परस्परापासून अगदीं स्वतंत्र असतात. प्रत्येकाची श्रमविभागपद्धति वेगवेगळी असते. निरनिराळे कारखाने असे एकत्र आणण्यानें फायदा पुष्कळ होत असला तरी तेवढ्या एकत्र आणण्यानेंच या सर्व कारखान्याला एका धंद्याचें स्वरूप येत नाहीं. ती गोष्ट फक्त **यांत्रिक उत्पादन सुरू झालें म्हणजेच शक्य होतें.**

## यंत्राची सुरवात

हस्तव्यवसायी भांडवलशाहीच्या आरंभकाळीं विक्रीमालाच्या उत्पादनकार्याचा आवश्यक वेळ कमी करण्याचें तत्त्व मान्य झालें होतें. त्याबरोबरच मोठ्या प्रमाणावर अमलांत आणावयाच्या कांहीं साध्या प्रक्रियासाठीं यंत्रांचा उपयोगहि होऊं लागला होता. कागद करण्याच्या धंद्यांत अगदीं आरंभीं आरंभींहि चिंध्या फाडण्याचें काम यंत्राकडून केलें जाई. धातूच्या कारखान्यांत कच्च्या धातूंचीं ढेकळें फोडण्याचें काम यंत्रांनीं केलें जाई. सर्व यंत्रांचें मूलतत्त्व अशी जी पाणचक्की* ती रोमन साम्राज्यानेंच दिली होती. हस्तव्यवसायकाळानें कंपास, बंदुकीची दारू, टाइपानें छापण्याची कला, आपोआप चालणारें घड्याळ, इतक्या वस्तु दिल्या होत्या. त्यावेळीं एकंदरीनें श्रमविभागापेक्षां यंत्राला दुय्यम दर्जा देण्यांत आला होता. पण यंत्राचा जो तुरळक तुरळक उपयोग होत असे त्यामुळें गणीत शास्त्रज्ञांना यंत्रशास्त्र उत्पन्न करण्याला भूमिका व उत्तेजन चांगलेंच मिळालें.

## कारखाना म्हणजे सामुदायिक मजूर

अनेक पोटकामें करणारे मजूर मिळून जो हा सामुदायिक मजूर बनतो तो एक कारखानदारी युगांतलें यंत्रच आहे. एका मालाच्या

* यंत्राच्या विकासाच्या सगळ्या इतिहासाचें मूळ धान्य सडण्याच्या चक्की ( मिल ) पर्यंत पोचतें. इंग्लंडांत कारखान्याला अजून 'मिल्' म्हणतात. जर्मनींतील १९ व्या शतकाच्या पहिल्या दशकांतल्या यांत्रिक कारखान्यास 'मिल्' अशा अर्थाचाच शब्द लावला जातो. सर्व प्रकारच्या निसर्गशक्तीनें चालणाऱ्या यंत्रांनाच हा शब्द लावला जात नसून यांत्रिक स्वरूपाचें थोडें फार साहित्यहि ज्या कारखान्यांत वापरलें जातें तेथेंहि हाच शब्द वापरला जातो.

उत्पादकानें सर्वच प्रक्रिया एकट्यानेंच करावयाच्या म्हटल्या तर अनेक प्रकारचें काम त्याच्याकडून होणें अशक्य असतें. एका पोटकामांत त्याला फाजील शक्ति खर्चावी लागते. दुसऱ्या एखाद्यांत अधिक चातुर्य खर्चावें लागतें, तिसऱ्या एखाद्यांत अधिक लक्ष द्यावें लागतें. कोणाहि एका माणसाच्या अंगीं हे सर्व गुण सारख्या प्रमाणांत असूं शकत नाहींत. कारखानदारी उत्पादनांत निरनिराळ्या प्रक्रिया वेगवेगळ्या व स्वतंत्र झाल्या, एकमेकापासून अलग अलग करण्यांत येऊं लागल्या म्हणजे कामगारांची विभागणी होते, त्यांचें वर्गीकरण होतें आणि विशिष्ट अंगभूत गुणावरून त्यांचे गट पाडण्यांत येतात. त्यांच्या अंगचे विशेष गुण हाच श्रमविभागाचा मूळ पाया असतो. पण उलट एकदां कारखाना श्रमविभागाच्या पद्धतीनें सुरू झाला म्हणजे त्या मजूरांच्या अंगीं विशिष्ट शाखेस उपयोगीं पडणारे नवे गुण निर्माण होतात. अशा प्रकारें या कारखानारूपी सामुदायिक मजूराचें अंगीं सारख्याच श्रेष्ठतेचे व उत्पादनास अवश्य असे गुण निर्माण होतात. हे गुण तो विशिष्ट मजूरांना किंवा त्यांच्या गटांना त्या त्या विशिष्ट कामींच लावून उपयोगांत आणतो. एकेका मजूराच्या कामांत जो एकांगीपणा आलेला आहे तो सर्व मजूर मिळून एक सामुदायिक मजूर अशी कल्पना केली असतां या सामुदायिक मजूराचे बाबतींत नाहींसा होतो. एकच काम सतत करीत राहण्याच्या संवयीमुळें बिनचूक काम करणारें हत्यार असें स्वरूप त्या मजूराला येतें. आणि सबंध कारखानारूपीं यंत्राशीं त्याचा जो संबंध असतो त्यामुळें यंत्राचा एक अवयव जसा अगदीं नियमितपणें काम करतो तसा नियमितपणें हा मजूरहि काम करूं लागतो.

## अगदीं साध्या मजूरांचा वर्ग

या सामुदायिक मजूराला अगदीं साधीं तशीच भानगडीचींहि कामें

करायचीं असतात, उच्च दर्जाचीं व हलकींहि कामें करायचीं असतात. म्हणून त्याच्या अवयवांना म्हणजे व्यक्तिशः वेगवेगळ्या मजूरांना निरनिराळ्या दर्जाचें शिक्षण घ्यावें लागतें. आणि म्हणून त्यांचीं मूल्येंहि भिन्न भिन्न होतात. याप्रमाणें कारखानदारी ही श्रमशक्तीची एक भली मोठी श्रेणी निर्माण करतें. त्यांत मग एक मजूरीचें प्रमाण निर्माण होतें. उत्पादनाच्या प्रत्येक शाखेंत कांहीं अगदीं साधीं कामें असतात. कुणालाहि तीं करतां येतात. या लोकांना विशेष महत्त्वाच्या कामापासून वेगळें काढलें जातें. आणि त्यांचा एक स्वतंत्र वर्गच बनतो. म्हणून कारखान्यांनीं हस्तव्यवसाय काबीज केले म्हणजे बिनकसबी मजूरांचा एक स्वतंत्र वर्गच निर्माण होतो. जुन्या हस्तव्यवसायांत असा वर्गच नव्हता. मजूरांत उच्चनीच श्रेणी झाली म्हणजे कसबी आणि बिनकसबी असें वर्गीकरण होतेंच. बिनकसबी मजूरांच्या उमेदवारीचा खर्च मुळींच पडत नाहीं. आणि कसबी मजूरांच्या बाबतींत त्यांचें काम अधिक सोपें झाल्यामुळें कसब मिळविण्याचा खर्चहि कमी होतो. दोन्ही बाबतींत श्रमशक्तीचें मूल्य उतरतें. या प्रकारास पुढें एक अपवादहि निर्माण होतो. श्रमप्रक्रिया विभागल्या गेल्यानंतर अगदींच नवीन अशीं व्यापक स्वरूपाचीं कांहीं कामें निर्माण होतात. हस्तव्यवसायाच्या काळांत अशा कामास मुळींच जागा नसे. अथवा फार थोडी जागा असे.

## पोटकामांच्या पायऱ्या

कारखानदारीच्या उत्पादनांतील ज्या श्रमविभागपद्धतीचें येथवर वर्णन करण्यांत आलें ती इतिहासांत फार प्राचीन काळापासून चालत आलेल्या श्रमविभागपद्धतीचीच एक आवृत्ति होती. कारखानदारीपूर्वीच्या हस्तव्यवसायांतहि ती अस्तित्वांत होती. भांडवलशाहीनें

निर्माण केलेल्या श्रमविभागपद्धतींत जुन्या पद्धतींतले अनेक अवशेष आलेले होते. या नव्याजुन्यांचा एकमेकांवर परिणामहि होत असे. तथापि अतिप्राचीन कालापासून रूढ असलेली श्रमविभागपद्धति व भांडवलशाहीनें निर्माण केलेली श्रमविभागपद्धति या दोहोंत महत्त्वाचें अंतर आहे. निरनिराळ्या उत्पादनाच्या शाखा एका अव्यक्त रज्जूनें बांधल्या जातात. हें या दोन्ही पद्धतींतील साम्य कोणासहि मान्य करावें लागेल. कारण गुरें पाळणारा धंदेवाला कातडीं काढतो. कातडी कमावणारा तीं कमावतो, आणि चांभार त्यांचे बूट शिवतो. या एकंदर कामांत पहिली क्रिया ही दुसरीची पायरी आहे. प्रत्येक पायरी शेवटच्या ' बूट ' या पायरीकडे जात असून बूट हा या सर्व भिन्न भिन्न क्रियांचें फल होय. शिवाय गुरें पाळणाऱ्याला, कातडीं कमावणाराला, चांभाराला त्यांचीं त्यांचीं उत्पादनसाधनें पुरविणारे अनेक वेगवेगळे धंदेवाले असतात. पण गुरें पाळणारा, कातडें कमावणारा आणि बूट करणारा, या सर्वांच्या स्वतंत्र श्रमांना एकत्र जोडणारा रज्जू कोणता ? या प्रत्येकाचा माल हा विक्रीमाल आहे हें उघड आहे. उलट कारखान्यांतहि जो श्रमविभाग असतो त्याचें वैशिष्ट्य काय ? कारखान्यांत श्रमविभागपद्धतीखालीं पोटकाम करणारा प्रत्येक कामगार विक्रीमाल निर्माण करीत नाहीं. सर्व पोटकाम करणाऱ्या कामगारांनीं मिळून निर्माण केलेला एकच माल, तोच तेवढा विक्रीमाल होतो. एका समाजांतील निरनिराळ्या धंद्यांच्या मालांच्या क्रयविक्रयानें सामाजिक श्रमविभाग निर्माण होतो. उलट कारखान्यांतील श्रमविभाग अनेक मजूरांनीं आपली श्रमशक्ति भांडवलदाराला विकल्यानें निर्माण होतो. हा भांडवलदार ही श्रमशक्ति एकजूट करून उपयोगांत आणतो. कारखान्यांतील श्रमविभागांत एका भांडवलदाराच्या हातीं धनोत्पादनसाधनांचें केंद्रीकरण झालेलें असतें. उलट सामाजिक श्रमविभागांत विक्रीमाल

उत्पन्न करणाऱ्या अनेक उत्पादकांत धनोत्पादनसाधनें वाटलेलीं असतात.

## भांडवलदाराची मनोवृत्ति

कारखान्यांतील प्रमाणबद्धतेच्या पोलादी कायद्यानें निरनिराळ्या कामगारांना विशिष्ट कामेंच दिलीं जातात. पण कारखान्याबाहेरील जगांत निरनिराळीं धनोत्पादनसाधनें निरनिराळ्या लोकांना आलटून पालटून मिळण्याचा पुष्कळ संभव असतो. कारखान्यांतील श्रमविभागांत भांडवलदाराची सत्ता निर्विवादपणें स्थापित झालेली असते. त्याच्या मालकीचें कारखानारूपीं जें यंत्र त्या यंत्राचा प्रत्येक मजूर हा अवयव असतो. उलट सामाजिक श्रमविभागांत प्रत्येक विक्रीमालाचा उत्पादक जेव्हां एकमेकासन्निध येतो तेव्हां चढाओढ आणि परस्पर-स्वार्थांच्या दडपणानें होणारी सक्ती याहून कोणाचीहि सत्ता तो मानीत नाहीं. भांडवलदाराच्या मनाला कारखान्यांतील श्रमविभाग—म्हणजे एकएका मजूरानें आयुष्यभर एकाच प्रकारच्या कामास बांधून घेणें, श्रमाची उत्पादनक्षमता वाढविण्यासाठीं भांडवलाची त्यावर कायमची सत्ता स्थापणें हा सर्व प्रकार—अत्यंत प्रशंसनीय वाटत असतो. पण एकंदर समाजांतील उत्पादनाचें कार्य सामाजिक दृष्ट्या नियंत्रित करणें व विचारपूर्वक आंखून चालविणें ही गोष्ट, मालकी हक्क, स्वातंत्र्य, भांडवलदाराच्या वैयक्तिक कर्तृत्वास मुक्तसंचाराचा हक्क इत्यादि अतिशय पवित्र गोष्टींची पायमल्ली करणारी आहे, असें म्हणून भांडवलदार तिचा मोठ्या त्वेषानें धिक्कार करीत असतो. कारखानदारी पद्धतीचें अत्युत्साहानें समर्थन करणारे भांडवलदार हेच सर्व समाजांतील श्रमशक्तीचें संघटन केल्यास सगळाच्या सगळा समाज एक प्रचंड कारखाना होईल असें म्हणून त्याचा धिक्कार करीत असतात, हें भांडवलदार वर्गाचें एक आश्चर्यकारक वैशिष्ट्य होय.

## धंदेसंघ आणि भांडवलशाही

पूर्वी धंदेसंघांचे जे नियम असत त्या नियमाअनुसार उमेदवार व इतर कामगार एकेका मालकानें किती नेमावे हें ठरविलेलें असे. त्यामुळें धंदेसंघांतील धंदेवाल्याला भांडवलदार होतां येत नसे. तसेंच आपल्या हाताखालील कामगार आपल्या विशिष्ट धंद्याखेरीज दुसऱ्या धंद्यांत त्यास गुंतवितां येत नसत. व्यापारी भांडवलाचें धंदेसंघावर अतिक्रमण होतेसें दिसलें तर धंदेसंघांतील धंदेवाले या भांडवलाचा निकरानें प्रतिकार करीत. त्या काळीं स्वतंत्र असें भांडवल फक्त व्यापाऱ्यांचेंच असे. या व्यापाऱ्याला कोणताही माल खरेदी करतां येई, पण विक्रीमालाच्या स्वरूपांत श्रम खरेदी करतां येत नसत. समाजामध्यें व्यापाऱ्याला जें स्थान होतें तें एकंदर समाजानें त्यास मेहरबानीनें जिवंत राहूं दिलें होतें म्हणून होतें. धंद्यांत आपल्या भांडवलाचा शिरकाव व्यापाऱ्यास करतां येत नसे. धंदेसंघांना जर अधिक श्रमविभाग करण्याची गरज भासली तर विद्यमान संघांचेच प्रकाराअनुसार विभाग पाडण्यांत येत. अथवा जुन्या धंदेसंघांच्या शेजारीं नवे धंदेसंघ निर्माण करण्यांत येत. पण असें करतांना निरनिराळ्या हस्तव्यवसायांना एकाच श्रमगृहांत कोंडण्यांत येत नसे. आणि म्हणून धंदेसंघांनीं धंद्यांचें पृथक्करण करून, प्रत्येक धंदा वेगवेगळा स्वतंत्र करून हस्तव्यवसायी भांडवलशाहीच्या स्थापनेसाठीं अवश्य अशी परिस्थिति निर्माण केली खरी, पण एकाच श्रमगृहांत श्रमविभाग करण्याची पद्धति धंदेसंघांतून निर्माण होऊं शकली नाहीं. एकंदरीनें कारागीर आणि त्याचें धनोत्पादनसाधन, गोगलगाईचा शंख जसा नेहमीं तिच्या पाठीवर असतो त्याप्रमाणें, एकमेकास चिकटूनच राहिलीं. यामुळें कारागीर आणि धनोत्पादनसाधन यांचा वियोग व

घनोत्पादनसाधनांचें भांडवलांत रूपांतर, या हस्तव्यवसायी भांडवल-शाहीस आवश्यक असणाऱ्या गोष्टी निर्माण होऊं शकल्या नाहींत.

## कारखान्यांतील श्रमविभागाचें वैशिष्ट्य

समाजांत होणारा श्रमविभाग, विक्रीमालाच्या विनिमयानें उत्पन्न झालेला असो, अथवा नसो, समाजाच्या अत्यंत भिन्न भिन्न अशा संघटनामध्यें सुद्धां आढळून आलेला आहे. पण श्रमगृहांत होणारा श्रम-विभाग हा मात्र भांडवलशाही उत्पादन पद्धतीनेंच निर्माण केलेला आहे.

एकदां कारखानदारी सुरू झाली म्हणजे त्याच्या पुढील प्रत्येक नव्या श्रमविभागाचें पाऊल टाकण्यापूर्वी वैयक्तिक भांडवलदाराच्या हातीं असलेल्या भांडवलाची वाढ व्हावी लागते. आपण पूर्वीं पाहिलेंच आहे कीं मजूरांची जी कमींत कमी संख्या भांडवलदार नेमतो ती पूर्वीं स्थापन झालेल्या श्रमविभागानें त्यास आंखून दिलेली असते. (नुकतेच आपण टाईप करण्याचें जें उदाहरण घेतलें त्यांत एका टाईप घासणाराबरोबर दोन टाईप मोडणारे आणि चार टाईप तयार करणारे असावे लागतात असें आपणांस आढळून आलें. कारखान-दारास जर टाईप कारखाना चालवावयाचा असेल तर हे सात काम-गार त्याला नेमलेच पाहिजेत आणि धंदा वाढवावयाचा असेल तर कमींत कमी अशीं ७ माणसें नेमलींच पाहिजेत.) यामुळें हत्यारें वाढवावीं लागतात. श्रमसाहित्य वाढवावें लागतें. श्रमगृहें, भट्ट्या इत्यादि वाढवावीं लागतात. आणि विशेषत: कच्च्या मालाची वाढ करावी लागते. कामगारांच्या वाढीपेक्षांहि कच्च्या मालाच्या वाढीची गरज अधिक असते. कारण धंद्याचें प्रमाण वाढलें म्हणजे श्रमाची उत्पादनशक्ति वाढते. तेवढ्याच वेळांत अधिक कच्च्या मालाचा पक्का माल करण्याचें कामीं उपयोग होतो. हा कच्चा माल भांडवलदाराच्या

हातीं असावा लागतो. म्हणून कारखानदारीची वाढ ज्या प्रमाणांत होईल त्याच प्रमाणांत जीवनावश्यक सामुग्री आणि समाजांत असणारी धनोत्पादनसाधनें या सर्वांना भांडवलाचें रूप द्यावें लागतें.

"हस्तव्यवसायांचे श्रमविभागपद्धतीनें पोटविभाग करतां यावे यासाठीं समाजांत भांडवल ( लेखकानें येथें जीवनास आवश्यक व उत्पादनास आवश्यक अशा वस्तु असें म्हणावयास हवें होतें ) नुसतें तयार असून भागत नाहीं; तें भांडवलदारांच्या हातीं पुरेशा प्रमाणांत असावें लागतें. तरच त्यांना मोठ्या प्रमाणावर उत्पादनकार्य उभारतां येतें....श्रमविभाग जितका जितका अधिक होतो तितकी तितकी अमुक इतक्या मजूरांची नेमणूक अधिक प्रमाणांत करणें अवश्य होऊन हत्यारें, कच्चामाल वगैरे भांडवल अधिक प्रमाणांत लागूं लागतें" ( स्टॉर्च: कोर्स डी इकॉनॉ. पॉलिट्. : पॅरीस : एडिशन १ पृ. २५०-२५१ ).

## एकच अवयव असलेला राक्षस

साध्या सहकार्याप्रमाणें कारखानदारी ही भांडवलामुळेंच निर्माण होते. श्रमाच्या संघटनेमुळें जी नवी श्रमशक्ति निर्माण होते ती यामुळें भांडवलाची उत्पादनशक्ति असावी असें वाटतें. पण साधें सहकार्य आणि कारखानदारी यांतहि फरक आहे. साध्या सहकार्यानें वैयक्तिक कारागिराची काम करण्याची पद्धती बऱ्हंशीं बदलत नाहीं. पण कारखानदारीनें त्याच्या उत्पादनपद्धतींत पूर्णपणें क्रांति होते. श्रमशक्तीच्या मुळालाच कारखानदारी हात घालते. कामगाराच्या अंगीं जीं अनेक कर्तृत्वें असतात, जे अनेक उपजत गुण त्याच्या ठिकाणीं असतात ते सर्व नष्ट करून एका विशिष्ट कामाचेंच कौशल्य त्याच्या ठिकाणीं येते. शरीराला एखादाच अवयव असलेला माणूसरूपी राक्षस जन्मास यावा तशी या कामगाराची अवस्था होते. ज्याप्रमाणें लाप्लाटा संस्थानांत

नुसत्या कातड्यासाठीं अथवा चरबीसाठीं पशूच्या पशू ठार मारतात तसा हा प्रकार होय. श्रमविभागांतलें काम निरनिराळ्या कामगारांना वाटलें जातें इतकेंच नव्हे तर प्रत्येक माणूस हा एका मोठ्या कामाच्या एका विशिष्ट विभागास चालविणारी स्वयंभू शक्ति होतो. मेनेनियस अग्रिपा यानें शरीराचा एकेक विशिष्ट भाग असलेलींच माणसें आपल्या कल्पित कथांत दाखविलीं आहेत. ही असंभाव्य माणसें या श्रमविभागपद्धतींत जन्माला येतात. पहिल्यानें मजूराला विक्रीमाल उत्पन्न करण्याचीं स्वतःचीं साधनें उपलब्ध नसतात म्हणून तो आपली श्रमशक्ति भांडवलदाराला विकतो. पण आतां त्याची श्रमशक्ति ही भांडवलदाराला विकली गेल्याशिवाय काम करण्याचेंच नाकारते. ही श्रमशक्ति आतां यापुढें भांडवलदाराला विकली गेल्यानंतर श्रमगृहांत जी श्रमपरिस्थिति तिच्याभोंवतीं असतें तिच्यांतच राबूं शकते. कारखान्यांतल्या मजूराला स्वतंत्रपणें स्वभावतःच कांहीं करतां येणें अशक्य झाल्यामुळें भांडवलदाराच्या श्रमगृहाचा एक उपांग या नात्यानेंच आपली उत्पादनशक्ति तो आतां वाढवीत असतो. जो कामगार एखादा हस्तव्यवसाय अगदीं पूर्णपणें करूं शकत असेल तो आपला धंदा कोठेंहि करूं शकेल, आणि तेथें चरितार्थहि चालवूं शकेल. पण कारखानदारी मजूर हा कारखान्याचा फक्त एक अवयव असतो. कारखान्यांतील भाईबंदापासून त्यास अलग काढल्यास तो स्वतंत्रपणें आपला चरितार्थ चालवूं शकत नाहीं आणि म्हणून कारखान्यांत भांडवलदार-कारखानदार मजूरावर जो कोणताहि कायदा लादेल, तो त्या मजूरास पत्करावा लागतो " ( स्टार्च )

## कामगाराच्या वैयक्तिकतेचा नाश

पूर्वीं स्वतंत्र शेतकरी अथवा हस्तव्यवसायी याला जें ज्ञान, जी

अनुमानशक्ति, जी इच्छाशक्ति अगदीं कमी प्रमाणांत कां होईना वापरावी लागे, ती आतां फक्त सर्व कारखान्याच्या दृष्टीनें वापरावी लागते. श्रमविभागांतले कामगार, त्यांच्या उत्पादनाच्या ज्या विशिष्ट बौद्धिक शक्ति असतात त्या विसरून जातात. त्यांना नेमणाऱ्या भांडवलाच्या अंगीं त्या सर्व शक्ति आतां येतात, कारखान्यांतील श्रमविभागाचा एक परिणाम असा होतो, कीं, कामगाराच्या ठिकाणच्या उत्पादनासंबंधीच्या बौद्धिक शक्ति हिसकावून घेतल्या जाऊन त्या सर्व शक्ति त्याच्यावर सत्ता गाजविणाऱ्या मालकाच्या अंगभूत अशा प्रकारें कामगारासमोर उभ्या राहातात. कामगार व त्याच्या या शक्ति यांचा हा वियोग साध्या सहकार्याच्या वेळींच सुरू होतो. त्यावेळीं भांडवलदार हा व्यक्तिशः एकेका कामगाराला सांघिक श्रमाचें प्रतीक असा भासतो. हा वियोग कारखानदारींत वाढत जाऊन प्रत्येक कामगार हा विशिष्ट पोटकामच करणारा मजूर बनतो. हलीच्या औद्योगिक जगांत हा वियोग अगदीं पूर्णावस्थेस पोंचतो. या युगांत भौतिकशास्त्र ही एक शारीरिक श्रमापासून भिन्न अशी उत्पादनशक्ति होते. आणि शारीरिक श्रमाला भांडवलाच्या गुलामगिरींत राबवितें.

## बिनचूकपणास बेअकलीपणा हवा !

कारखानदारीमध्यें कारखानारूपीं जो सामुदायिक मजूर त्याची सामाजिक उत्पादनशक्ति वाढविण्यासाठीं,आणि भांडवलाचीही उत्पादन-शक्ति वाढविण्यासाठीं प्रत्येक मजूराची वैयक्तिक उत्पादनशक्ति नष्ट करणें अवश्य असते. “ उद्योगीपणाची व अंधश्रद्धेची अज्ञान ही माता आहे. विचारीपणा आणि कल्पनाशक्ति यांच्या हातून चूक होऊं शकेल. पण हात अथवा पाय हालविण्याची जी संवय आहे, ती विचार-शक्ति अथवा कल्पनाशक्ति या दोहोंपासूनहि स्वतंत्र आहे. म्हणून ज्या

ठिकाणीं मनाचा सल्ला कमींत कमी घेतला जातो, व श्रमगृह हें एक मोठें एंजिन कल्पून त्यांतील प्रत्येक कामगार हा त्या यंत्राचा एक अवयव आहे, असें मानलें जातें, तेथेंच कारखानदारी भरभराट पावते." (जे. डी. टकेट्–ए हिस्टरी ऑफ दी पास्ट अँड प्रेझेंट स्टेट् ऑफ लेबरिंग पॉप्युलेशन, लंडन १८४६ व्हॉ. १ पृ. १४९) खरोखर आठराव्या शतकांतील कांहीं कारखानदारांना धंद्यांतील गोप्य ज्यामध्यें आहे, अशा कांहीं प्रक्रिया अर्धवट वेड्यांच्या हातून करून घेणें पसंत पडत असे.

## श्रमविभाग म्हणजे शिरछेद

ॲडमस्मिथनें आपल्या 'वेल्थ ऑफ नेशन्स' या ग्रंथांत (१७७६ व्हॉ. ५ प्र. १ वि. २) कारखानदारीपासून माणसें कशीं खच्ची होतात याचें हुबेहुब चित्र काढलें आहे.

ॲडमस्मिथ लिहितो, "बहुतेक माणसांची बुद्धिशक्ति ही त्यांच्या सर्वसामान्य व्यवसायावरून बनत असते. ज्या माणसाचें सर्व जीवन अगदीं साध्या क्रिया करण्यांत गेलें त्याला आपली बुद्धि वापरण्याचा कधीं प्रसंगच आला नाहीं....आणि म्हणून तो माणूस जितका अज्ञ व मूर्ख होऊं शकेल तितका होतो."

केवळ बुद्धिच नव्हे, तर श्रमविभागांतल्या माणसाचें शरीरहि खच्ची होतें. आणि म्हणून औद्योगिक कारखानदारींतील-रोगविज्ञान-शास्त्राला जें आरंभाचें साहित्य लागतें तें या कारखानदारींतूनच मिळूं लागतें.

"एकाद्या माणसाची कामाच्या बाबतींत विभागणी करणें म्हणजे त्याला, खरोखर त्यानें गुन्हा केला असेल तर ही मृत्यूची शिक्षा देण्या-सारखेंच आहे आणि जर त्यानें गुन्हा केला नसेल तर त्याचा खून

केल्यासारखें आहे....श्रमविभाग करणें म्हणजे माणसांची कत्तल करणें होय," ( डी. डर्कहार्ट फॅमिलिअर वंडर्स लंडन १८५५ पृ. ११९)

## श्रमविभागाचें विशिष्ट रूप कसें ठरतें

श्रमविभागावर आधारलेलें सहकार्य म्हणजेच कारखानदारी आपोआप बनत जाऊन जन्म पावते. या कारखानदारींत थोडीशी सुसंगती उत्पन्न होऊन तिचा विस्तार झाला म्हणजे भांडवलशाही उत्पादनाची ती सर्वमान्य पद्धत बनते. इतिहासानें दाखवलें आहे कीं, कारखानदारी पद्धतींतला श्रमविभाग असेंच ज्याला म्हणतां येईल तो अनुभवानें व्यवस्थित स्वरूप धारण करतो. प्रत्यक्ष जे त्यांत भाग घेतात त्यांना त्याची जणूं कांहीं जाणीवहि नसते. एकदां तो अशा प्रकारें स्थापित झाला म्हणजे शतकानुशतकें आपलें ठाण मांडून बसतो. ज्या ज्या वेळीं या श्रमविभागाचें रूप पालटतें त्या त्या वेळीं बहुधा उत्पादन-साधनांत क्रांति झाल्यामुळेंच हें रूपांतर घडतें. आधुनिक कारखानदारी ज्या मोठमोठ्या शहरांत सुरू होते (मी येथें यांत्रिक कारखानदारीचा संबंध आणीत नाहीं ) तेथें या कारखानदारीसाठीं अवश्य असणारी मजूर वगैरे सर्व सामुग्री—कोणीतरी तिला एकत्र आणावी यासाठीं—जणूंकांहीं वाट पहात बसते. अथवा अशा शहरांतून पुस्तकें बांधण्यासारखीं हस्तव्यवसायाचीं कामें निरनिराळ्या लोकांना वांटून देऊन श्रमविभागाचें तत्त्व अमलांत येतें अशा बाबतींत निरनिराळ्या पोटकामांना माणसें किती किती लागतात हें साधारण एक आठवड्याच्या अनुभवावरून ठरूं शकते.*

* भांडवलदारानें विविध प्रकारच्या श्रमपद्धति निर्माण करण्यांत अगदीं स्वतंत्र अशी संशोधक प्रतिभा वापरली आहे असें मत हर राश्चरसारख्या जर्मन प्रोफेसर वर्गांत आढळून येतें. आणि म्हणून भांडवलदारांच्या अचाट

## पिळणूक वाढविणारी प्रगति

हस्तव्यवसायांत श्रमविभागाचा अवलंब झाल्यामुळें समाजांतील श्रमांत विशिष्ट प्रकारची संघटना निर्माण होते. आणि त्यामुळें त्याचवेळीं समाजांत नवीन उत्पादकशक्ति निर्माण होतात. या परिस्थितींत भांडवलशाही हाच उत्पादन प्रकार निर्माण होऊं शकतो. या भांडवलशाहींत श्रमविभागात्मक हस्तव्यवसायी उत्पादन हा वाढावा उत्पन्न करण्याची आणि मजूराला बळी देऊन भांडवलाचा आत्मविस्तार वाढविण्याची एक विशिष्ट पद्धति ठरते. यामुळें श्रमाची सामाजिक उत्पादनशक्ति जी वाढते, ती मजूराऐवजीं भांडवलदाराचा फायदा तर करतेच, पण हा फायदा करतांना वैयक्तिक मजूरांना ती एक प्रकारें पंगू बनवीत असते. भांडवलाची श्रमावर सत्ता चालावी यासाठीं अवश्य अशी नवी परिस्थिति ती निर्माण करते. म्हणून ही पद्धति एकपरी ऐतिहासिक दृष्ट्या विकास करणारी आहे असें दिसतें, तरी उलट मजूरांच्या पिळवणुकीची ही एक सुधारलेली पद्धति ठरते, हेंहि तितकेंच खरें आहे.

## अर्थशास्त्रास स्वतंत्र अस्तित्व

या हस्तव्यवसायी भांडवलशाहीच्या काळांतच अर्थशास्त्राला प्रथम स्वतंत्र शास्त्राचें रूप प्राप्त झालें. या अर्थशास्त्राच्या दृष्टीनें श्रमविभाग

मेंदूतून निघालेल्या या श्रमविभाग कल्पनेबद्दल भांडवलदारांना निरनिराळ्या परिमाणाची मजूरी" (व्हेरअस वेजेस्) देणें अवश्य आहे असें ते मानतात. वास्तविक श्रमविभागपद्धतींची कमी अथवा अधिक प्रमाणांत होणारी अम्मलबजावणी ही भांडवलदाराच्या कमी अथवा अधिक प्रतिमेवर अवलंबून नसून त्याच्या तिजोरीच्या कमी अथवा अधिक लांबीवर अवलंबून असते.

पद्धति हें अमुक इतक्या श्रमांच्या बळावर अधिक विक्रीमाल उत्पन्न करण्याचें, तो विक्रीमाल स्वस्त करण्याचें आणि भांडवलाचा संचय करण्याचें साधन ठरतें. या अर्थशास्त्रज्ञांच्या दृष्टीनें उत्पादनाचें परिमाण आणि विनिमयमूल्य वाढविणें हेंच आर्थिक व्यवहाराचें काम आहे. उलट प्राचीन आर्थिक विषयावरील लेखकांना वस्तूचे गुण व तिचें उपयोगमूल्य यांचेंच महत्त्व अधिक वाटे. श्रमविभाग-पद्धतीनें उत्पादनाच्या सामाजिक शाखा भिन्न भिन्न करण्यांत आल्यामुळें विक्रीमाल अधिक चांगला होऊं लागला. निरनिराळ्या व्यक्तींना आपल्या बुद्धीप्रमाणें व मनाच्या कलाप्रमाणें योग्य क्षेत्र निवडतां येऊं लागलें. आणि थोडेंसें तरी नियंत्रण असल्यावांचून कोठेंच कोणतेंहि चांगलें फळ निर्माण करणें अशक्य झालें.

## स्त्रिया व मुलें यांच्या राबवणुकीची शक्यता

हस्तव्यवसायी भांडवलशाहीच्या काळांत म्हणजे भांडवलानें हस्तव्यवसाय आपल्या नियंत्रणाखालीं घेतले त्याकाळीं, श्रमविभागपद्धतीचे जे विशेष गुण, त्यांच्या विकासास अनेक अडथळे असत. आपण मागें पाहिल्याप्रमाणें श्रमविभाग पद्धतीनें कामगारांची कसबी व बिनकसबी अशी अगदीं साधी विभागणी होते; त्याच वेळीं त्यांच्या उच्चनीच अशा श्रेणीहि निर्माण होतात. पण त्याकाळीं बिनकसबी कामगारांची संख्या कमी असते. श्रमविभाग पद्धतीमध्यें निरनिराळीं कामें, श्रमाचीं जिवंत हत्यारें असे जे कामगार त्यांच्या कमीअधिक शक्तीच्या व वयाच्या मानानें वाटलीं जातात. यामुळें स्त्रिया व मुलें यांनाहि कामावर राबवतां येते. पण पुरुष कामगारांच्या विशिष्ट संवयी आणि त्याचा प्रतिकार यामुळें श्रमविभागाच्या या पद्धतीस फार विघ्नें येतात. हस्तव्यवसायांची विभागणी झाल्यानें कामगाराला त्या त्या कामासाठीं

वाकबगार करण्याचा खर्च कमी होतो. यामुळें कामगाराचें मूल्यहि उतरतें. तरीपण एखादें अतिशय अवघड पोटकाम जें असेल त्याला अधिक दीर्घ कालाच्या उमेदवारीची आवश्यकता असते. आणि ज्या पोटकामाच्या बाबतींत अशा दीर्घकालीन उमेदवारीची आवश्यकता नसेल तेथें ही उमेदवारी दीर्घ काल झाली पाहिजे असा कामगार हट्ट धरतो. उदा. इंग्लंडांत उमेदवारांनें ७ वर्षे तयारींत घालवावी असा जो कायदा होता तो हस्तव्यवसायी भांडवलशाहीचा काल संपेपर्यंत अमलांत होता. आधुनिक यांत्रिक उद्योगधंदे सुरू होईपर्यंत हे कायदे नष्ट झाले नाहींत.

## हात कसबाची अडचण

हस्तव्यवसायी भांडवलशाहींत हातकसब हाच यशाचा मुख्य आधार असल्यानें कामगारांच्या उद्धटपणाशीं भांडवलदारांना नेहमीं झगडावें लागे. आणि म्हणून हस्तव्यवसायी भांडवलशाहीच्या सबंध काळांत कामगारांत शिस्तीची भावना नसल्याची तक्रार ऐकूं येई. १६ व्या शतकापासून तों आधुनिक यांत्रिक भांडवलशाही सुरू होईपर्यंतच्या काळांत भांडवलदाराला उपलब्ध असणाऱ्या मजूरांच्या सर्व श्रमवेळावर पूर्ण प्रभुत्व स्थापन करतां आलें नाहीं. आणि म्हणून कामगार अमुक एक प्रदेश सोडून जात अथवा अमुक एका प्रदेशांत येऊन रहात, त्याप्रमाणें भांडवलदाराला आपल्या धंद्याचें क्षेत्रहि बदलणें भाग पडत असे.

त्याचप्रमाणें या हस्तव्यवसायी भांडवलशाहीला सर्वच्या सर्व सामाजिक उत्पादन स्वतःकडे घेतां आलें नाहीं. अथवा उत्पादन पद्धतीची आमूलाग्र क्रांतिही करतां आली नाहीं. श्रमाचीं हत्यारें करण्याचें श्रमगृह निर्माण करणें ही या भांडवलशाहीची यशस्वी निर्मिती होय. या श्रमगृहामध्यें सर्व किचकट अशा प्रकारची त्यावेळीं रूढ

असलेलीं हत्यारें बनवण्यांत येत. या श्रमगृहांतहि श्रमविभागपद्धति असेच. त्यामध्यें यंत्रेंहि होऊं लागलीं. यंत्रें निर्माण होण्यापूर्वी कामगाराच्या वैयक्तिक कसबाच्या सत्तेची भांडवलावर एक प्रकारची बेडी पडलेली असे. ही बेडी यंत्रें निर्माण झाल्यामुळें गळून पडली.

## (३) यंत्रें आणि आधुनिक औद्योगिक उत्पादन•

यंत्राला भांडवलाच्या साहाय्यानें उपयोगांत आणण्याचा मुख्य हेतु, विक्रीमाल स्वस्त करणें आणि मजुराच्या चरितार्थसंपादनाचें मूल्य निर्माण करणारा श्रमदिवसांतला विभाग कमी करून मजूर ज्या बाकीच्या विभागांत मोफत काम करतो तो विभाग वाढविणें, हा होय. थोडक्यांत म्हणजे वाढावा उत्पन्न करणें हा यंत्रें वापरण्यांत भांडवलाचा हेतु असतो. हस्तव्यवसायी भांडवलशाहीच्या काळांत उत्पादनपद्धतींत जी क्रांति होते ती श्रमशक्तीच्या बाबतींत होते. आधुनिक यांत्रिक भांडवलशाहीच्या काळांत श्रमाच्या हत्यारांच्या बाबतींत क्रांति होते. म्हणून श्रमाच्या साध्या हत्यारांना यंत्रांचें रूप कसें देण्यांत आलें याचा विचार आपणांस प्रथम केला पाहिजे.

## हत्यार व यंत्र यांचें चुकीचें वर्गीकरण

गणिती आणि यंत्रज्ञ हें हत्याराला 'साधें यंत्र' व यंत्राला 'गुंतागुंतीचें हत्यार' असें म्हणतात. ह्या दोहोंत कांहीं महत्त्वाचा फरक आहे हें त्यांच्या लक्षांतच येत नाहीं. वस्तुस्थिति ही अशी आहे कीं प्रत्येक यंत्र हें निरनिराळ्या साध्या हत्यारांच्या जोडणीनें केलेलें असतें. मग या जोडणींत तीं हत्यारें कशींहि लपलेलीं असोत. पण आर्थिक दृष्टीनें पाहिलें तर एवढ्या खुलाशानें खुलासा होत नाहीं. हत्यार आणि यंत्र यांच्या

• कॅपिटल, खंड २, प्रकरण १५.

फरकाचा दुसरा एक खुलासा असा सांगण्यांत येतो कीं हत्याराची गतिशक्ति माणूस हीच असते. पण यंत्राची गतिशक्ति निवळ माणसाहून वेगळी म्हणजे उदाहरणार्थ, जनावर, पाणी, वारा इत्यादि असते. या मताप्रमाणें नांगर हा बैलांनीं ओढला जातो, म्हणून तो यंत्र ठरेल; पण नांगर हा बहुतेक सर्व प्राचीन कालखंडामध्यें दिसून येतो. क्लॉसेनचा वाटोळा हातमाग एकच कामगार चालवितो तरी एका मिनिटाला त्यांत ९६००० टाके विणले जातात. पण या मताप्रमाणें हा वाटोळा हातमाग हें नुसतें हत्यारच ठरेल. किंबहुना तें माणसानें चालविलें म्हणजे हत्यार आणि वाफेनें चालविलें म्हणजे यंत्र, असें या मताप्रमाणें म्हणावें लागेल. आणि ज्याअर्थीं जनावराची शक्ति उत्पादनाचें कामीं लावणें हा मानवी संशोधनाचा अतिप्राचीन प्रकार आहे त्याअर्थीं हस्तव्यवसायापूर्वींच माणसानें यांत्रिक उत्पादन सुरू केलें होतें असें अनुमान वरील मताअनुसार काढावें लागेल.

## यंत्राचे तीन विभाग

पूर्ण विकसित अशा कोणत्याहि यंत्रांत तीन भाग असतात. एक शक्ति निर्माण करणारें यंत्र, दुसरें शक्तिसंक्रामक यंत्र आणि तिसरें व शेवटचें कामगाराचें हत्यार ऊर्फ काम करण्याचें यंत्र. शक्ति निर्माण करणारें जें यंत्र असतें तें त्या सर्व यंत्रांत गति निर्माण करतें. हें यंत्र वाफेच्या एंजिनाप्रमाणें किंवा कॅलोरिक एंजिनाप्रमाणें अथवा इलेक्ट्रोमॅग्नेटिक यंत्राप्रमाणें आपली शक्ति आपणच निर्माण करते, अथवा पाणचक्कीनें अथवा पवनचक्कीनें नैसर्गिक शक्ति प्राप्त करून घेते. शक्तिसंक्रमणाचें यंत्र जें असतें त्यांत फ्लायव्हील्स्, शॅफ्टिंग, दाते असलेलीं चाकें, पुलीज्, स्ट्रॅप्स, दोऱ्या, पट्टे, पिनियन्स आणि निरनिराळ्या प्रकारची अरिंग्स् असतात; हें शक्तिसंक्रामक

यंत्र गतीचें नियंत्रण करतें. जरूर तेथें त्या गतीचें रूप बदलतें. उदा. गति जेथें सरळ असेल तेथें जरूरीप्रमाणें ती वर्तुळाकार करते, आणि शक्तीची विभागणी करून प्रत्यक्ष काम करणाऱ्या हत्यारांना ती जरूरीप्रमाणें वांटून देते. एकंदर यंत्रांतले पहिले जे दोन विभाग ते प्रत्यक्ष काम करणाऱ्या यंत्रांना कामांना लावण्यासाठीं असतात. काम करण्याच्या यंत्रानें ज्यावर श्रम करावयाचे ती वस्तु पकडून गतीच्या साहाय्यानें तिचें जरूर त्याप्रमाणें रूपांतर वगैरे केलें जाते. १८ व्या शतकांत जी ( यांत्रिक ) औद्योगिक क्रांति झाली ती या हत्याराच्या म्हणजे काम करण्याच्या यंत्रापासून झाली. आणि जेथें जेथें अजूनहि एखादा वैयक्तिक हस्तव्यवसाय अथवा हस्तव्यवसायी कारखाना असेल तेथें यांत्रिक उत्पादन सुरू करावयाचें झाल्यास प्रथम हें काम करण्याचें हत्यारच बदलावें लागतें.

## यंत्राचें पृथक्करण

काम करण्याच्या यंत्राचें सूक्ष्म परीक्षण केल्यास सामान्यतः हें काम करण्याचें यंत्र म्हणजे वैयक्तिक हस्तव्यवसायी अथवा श्रमविभागात्मक हस्तव्यवसायांतील कामगार जें हत्यार किंवा जें साहित्य वापरीत असे तेंच हें हत्यार बऱ्याचशा बदललेल्या परिस्थितींत असल्याचें दिसून येतें. सगळेंच्या सगळें यंत्र हेंहि जुन्या हस्तव्यवसायांतील हत्याराचीच थोडी फार बदललेली यांत्रिक आवृत्ति असते. वाफेच्या शक्तीनें चालणारा माग ही हातमागाची असलीच आवृत्ति होय. यंत्राच्या चौकटींत बसविलेले चात्या, सुया, करवती, सुऱ्या वगैरे विभाग जुने कामगाराच्या परिचयाचेच असतात. म्हणून ज्याला यंत्र यंत्र म्हणतात ती, कामगारांनीं पूर्वीं तसल्याच हत्यारांच्या साहाय्यानें ज्या प्रकारचें काम केलेलें असे तसलेंच काम एकदां गति मिळाल्यावर करणारी संघटना होय. ही

गतिशक्ति माणसापासून मिळाली असो, अथवा दुसऱ्या एखाद्या यंत्रानें दिलेली असो, या ठिकाणीं तो फरक महत्त्वाचा नाहीं. हत्यार हें माणसाच्या हातून काढून घेऊन एखाद्या यंत्रांत जोडलें म्हणजे यंत्र हें स्वतःच एक साधें हत्यार होऊन बसतें. हत्यार व यंत्र यामधील फरक ज्यावेळीं मनुष्य हाच गति देणारा असतो त्यावेळींहि ठळकपणें लक्षांत भरतो. एकदम किती हत्यारें त्यानें कामाला लावावीं ही गोष्ट त्याची स्वतःची जीं नैसर्गिक साधनें म्हणजे त्याच्या शरीराचीं इंद्रियें किती आहेत त्यावरून निर्णीत होत असते. जर्मनींत एका सूत कातणारानें दोन रहाट चालवावें म्हणजे एकदम दोन्ही हातांनीं व दोन्ही पायांनीं काम करावें असा प्रयोग करण्यांत आला. ही गोष्ट फारच कठीण होती. पुढें दोन सूत कातणाऱ्या चात्या लावलेलें एक ट्रेडल् बनविण्यांत आलें. पण दोन डोक्याचीं माणसें जशी क्वचितच् सांपडतील त्याप्रमाणें दोन धागे एकदम कातणारीं माणसेंहि क्वचितच मिळूं शकतात असें आढळून आलें. पण यंत्राच्या उपयोगाच्या सुरवातीपासून जेनी ही १२।१८ चात्या एकदम चालवी.आणि यांत्रिक हातमाग एकदम हजारों सुयांनीं काम करतो. हस्तव्यवसायी कारागीर हत्यारांची अगदीं थोडी संख्या वापरूं शकत असे. पण यंत्राचा उपयोग होऊं लागल्याबरोबर हें लहान संख्येचें बंधन ताडकन तुटून गेलें.

## यंत्रामुळें प्रचंड गतिशक्तिची गरज

हस्तव्यवसायी भांडवलशाहीच्या काळांत १७व्या शतकाच्या शेवटीं वाफेच्या एंजिनाचें जें स्वरूप होतें, आणि १७८० पर्यंत तें जसें टिकलें, त्यानें यांत्रिक भांडवलशाहीला जन्म दिला नाहीं. उलट यंत्रांचा शोध जेव्हां लागला त्यावेळीं वाफेच्या एंजिनांच्या स्वरूपांतहि जरूर अशी क्रांति झाली.

औद्योगिक क्रांतीचा आरंभ यंत्रानें होतो. एकच हत्यार वापरणाऱ्या मजूराची जागा हें यंत्र घेतें. तें अनेक हत्यारांनीं काम करतें. हीं सर्व हत्यारें कोणत्या तरी एका गतिशक्तीपासून गती मिळवणारी असतात. ("अनेक संघटित साधीं हत्यारें एकाच गतिशक्तीनें गतिमान केली म्हणजे त्या संघटनेस यंत्र म्हणतात." बॅबेज् लंडन : १८३२).

यंत्रांचा आकार वाढला, व काम करणाऱ्या यंत्रांची संख्या वाढली म्हणजे गतिशक्ति प्रचंड मिळवावी लागते. आणि मग ही गतिशक्ति नुसती मानवी असून पुरत नाहीं. अर्थात श्रम करणाऱ्या यंत्रांना मिळणारी गति एक मापानें व सतत मिळत रहावी यासाठीं मात्र माणसाची नियंत्रक म्हणून अवश्य गरज असते. नैसर्गिक शक्ति या आतां गति-शक्ति या नात्यानें माणसाची जागा घेतात. आणि म्हणून एकच गति-यंत्र एकदम अनेक श्रमयंत्रें चालवूं शकतें.

## यांत्रिक भांडवलशाहीचें मूलस्थान

म्यूल्स् आणि वाफेचीं एंजिनें एवढीच करण्याचा धंदा असलेले मजूर अस्तित्वांत येण्यापूर्वी म्यूल्स् आणि वाफेचीं एंजिनें अस्तित्वांत होतीं शिंपी हा धंदेवाईक म्हणून अस्तित्वांत येण्यापूर्वी लोक अंगावर कपडे घालीत होते. तसेंच हें आहे. व्हॅकॅन्सन्, आर्क राईट्, वॅट, इत्यादींनीं लावलेले शोध व्यवहारांत उपयोगी ठरले याचें कारण अगदीं हाताशीं यंत्रावर काम करणारे अनेक कसबी कारागीर मिळाले हें होय. हे कसबी कारागीर हस्तव्यवसायी-भांडवलशाहीच्या कालखंडानें निर्माण केले होते. शास्त्रीय शोधांची संख्या जशी वाढली आणि नवीन शोध-लेल्या यंत्रांची मागणी जशी वाढली तसतसा यंत्रें करण्याचा धंदा निरनिराळ्या शाखांत विभागला गेला आणि या यंत्रें करण्याच्या कार-खान्यामध्यें श्रमविभाग पद्धति अधिकाधिक वाढत गेली. आधुनिक

यांत्रिक भांडवलशाहीचें मूलस्थान आपणांस येथेंच सांपडतें. श्रमविभागात्मक हस्तव्यवसायी उत्पादनानें यंत्रें निर्माण केलीं. या यंत्रांच्या साहाय्यानें आधुनिक यांत्रिक उद्योगधंद्यांनीं वैयक्तिक हस्तव्यवसाय व श्रमविभागात्मक कारखानदारी हस्तव्यवसाय हे दोन्ही नष्ट करून टाकले. मुळांत कारखानदारीपद्धति ही अपूर्ण अशा पायावरच अपरिहार्यपणें उभारली गेली होती.

## यंत्राला आरंभीचे अडथळे

आधुनिक यांत्रिक कारखानदारीला जोंपर्यंत तिच्या यंत्राच्या वापरासाठीं माणसाची शक्ति व माणसाचें चातुर्य लागे, तिच्या विकासाला माणसाची शारीरिक शक्ति, दृष्टीची तीक्ष्णता, हाताचें कसब, वगैरे कारागिराच्या अंगचे गुण लागत, तोंवर तिच्या पूर्ण वाढीस अडथळेच येत गेले. पूर्वीचे हस्तव्यवसायी आपल्या अंगच्या या सर्व गुणांनीं फक्त अगदीं लहान अशीं हत्यारेंच वापरूं शकत असत. यंत्रें महाग असत हा यंत्रांच्या वाढीस अडथळा होताच. पण यंत्रांचा उपयोग करणाऱ्या कारागिरांची संख्या भराभर न वाढतां अगदीं सावकाश वाढणें शक्य होतें. यामुळेंच नव्यानव्या उत्पादनशाखांवर यंत्रांची स्वारी होणें भराभर शक्य झालें नाहीं. शिवाय आधुनिक यांत्रिक उत्पादनाचा विकास होता होता अशी एक वेळ आली कीं त्यावेळीं वैयक्तिक हस्तव्यवसाय व श्रमविभागात्मक हस्तव्यवसाय यांनीं दिलेली परंपरागत भूमिका, यांत्रिक विकासाला प्रतिबंधक ठरली. श्रमविभागात्मक हस्तव्यवसायाला न करावीं लागलेलीं किती तरी कामें यंत्रें निर्माण करण्याच्या कामांत उत्पन्न झालीं. हलींचा हायड्रॉलिक प्रेस्, आधुनिक पॉवर लूम अथवा आधुनिक कार्डिंग एंजिन हीं श्रमविभागात्मक हस्तव्यवसायांनीं निर्माण होणें कधींच शक्य नव्हतें.

## उत्पादनाच्या सर्व क्षेत्रांत क्रांति

उत्पादनपद्धतीच्या एका क्षेत्रांत मूलग्राही फरक झाला म्हणजे दुसऱ्या क्षेत्रांतहि तसाच फरक व्हावा लागतो. यंत्रानें सूत कातलें जाऊं लागल्यामुळें कापड विणण्याचें कामहि यंत्रांनीं करणें अवश्य झालें आणि या दोन्ही प्रकारच्या यांत्रिक क्रांतीमुळें कपडे धुणें, कपडे छापणें, कपडे रंगविणें वगैरे सर्व गोष्टींत यांत्रिक आणि रासायनिक क्रांति करावी लागली. त्याचप्रमाणें, सूत कातण्याच्या क्रियेंत क्रांति झाल्यानें सरकी काढण्याच्या यंत्राचाहि शोध लावावा लागला. आणि या शोधामुळेंच आज अवश्य झालेलें कापसाचें प्रचंड प्रमाणावरील पीक निर्माण करतां आलें. विशेषतः औद्योगिक कारखाने आणि शेती यांच्या पद्धतींत झालेल्या क्रांतीमुळें दळणवळण आणि वाहतुक यांच्या साधनांतहि क्रांति करणें अवश्य झालें. यांत्रिक कारखानदारीमध्यें उत्पादनाची प्रचंड घाई सुरू झाली, त्याचा विस्तार खूप झाला, मजूर आणि भांडवल यांची एका ठिकाणापासून दुसऱ्या ठिकाणीं अशी फेकाफेक सुरू झाली, साऱ्या जगाच्या बाजाराशी या यांत्रिक कारखानदारीचा संबंध येऊं लागला. या सर्व कारणामुळें श्रमविभागात्मक हस्तव्यवसायांच्या वेळची दळणवळणाचीं व वाहतुकीचीं साधनें हीं यांत्रिक कारखानदारीच्या प्रगतीस अडथळा करूं लागलीं. समुद्रांतून वाहतुक करण्याचीं जहाजें पूर्वीं करण्यांत आलींच होतीं. पण यांत्रिक कारखानदारीचें उत्पादन सुरू झाल्याबरोबर त्या उत्पादनाची सोय होईल अशा प्रकारें नद्यांतून जाणारीं वाफेचीं जहाजें महासागरांतून जाणारीं वाफेचीं जहाजें, रेल्वे, तारायंत्रें वगैरे हीं साधनें निर्माण झालीं. पण आतां लोखंडाचें डोंगरच्या डोंगर तापवावयाला हवे होते, ठोकायला हवे होते, कापायला हवे होते.

त्यांना भोकें पाडायचीं होतीं, त्यांना निरनिराळे आकार द्यायचे होते. यासाठीं या लोखंडाचा माल करण्यालाच प्रचंड यंत्रें लागूं लागलीं. तीं करण्यास श्रमविभागात्मक हस्तव्यवसाय हे अतिशयच अपुरे होते. म्हणून आधुनिक यांत्रिक उत्पादनपद्धतीला स्वतःच आपणाला हवीं तीं यंत्रें करावीं लागलीं.

## यांत्रिक हत्यारांचें प्रचंडत्व

आतां आपण श्रम करण्याचीं यंत्रें करणाऱ्या कारखान्यांतील यंत्राकडे लक्ष देऊं; तेथें पुन्हां माणसांनीं चालवावयाचीं हत्यारेंच फार मोठ्या प्रमाणांत दृष्टीस पडतात. तेथें भोकें पाडण्याचें एक यंत्र असतें. वाफेच्या एंजिनाच्या शक्तीनें त्याचा खिळा चालत असतो; त्यावांचून मोठीं मोठीं सिलिंडर्स, स्टीम एंजिन्स हायड्रॉलिक प्रेस, ह्या वस्तु होणेंच अशक्य आहे. यांत्रिक लेथ ही पायांनीं चालण्याच्या साध्या लेथचीच मोठी आवृत्ति आहे. रंधा मारणारें यंत्र हा एक लोखंडी सुतार आहे. मानवी सुतार लांकडावर हत्यारांनीं रंधण्याचें जें कार्य करतो तेंच हा लोखंडी सुतार लोखंडावर करीत असतो. लंडन व्हार्ज्मध्यें व्हेनियर कापणारें जें हत्यार आहे तो एक प्रचंड वस्तरा आहे. शिंपी ज्याप्रमाणें आपल्या कात्रीनें कापड कापतो तितक्या सहजपणें लोखंड कापणारें जें एक हत्यार आहे ती एक प्रचंड कात्री आहे. आणि वाफेच्या हातोड्याला जें डोकें असतें तें साध्या हातोड्याएवढें असतें पण हातोड्याचें वजन एवढें प्रचंड असतें कीं थॉरलाहि तें उचलतां आलें नाहीं. एक हातोडा ६ टन वजनाचा असून ३६ टन वजनाच्या एका ऐरणीवर ७ फूट उंचीवरून घाव घालीत असतो. ग्रॅनाईटची मोठी शिळा फोडून तिची पूड करणें म्हणजे या हातोड्याची केवळ लीला आहे. पण एवढें प्रचंड काम करूं शकणारा हा हातोड

अगदीं मऊ अशा लांकडांत अगदीं लहान असा खिळा लागोपाठ अगदीं हलके ठोके मारून बसवूं शकतो.

## सामुदायिकतेची अपरिहार्यता

साध्या सहकार्यांत आणि श्रमविभागात्मक सहकार्यांत वैयक्तिक हस्तव्यवसायिकाला सामुदायिक कामगारानें दडपून टाकलें ही गोष्ट परिस्थितींतील अपरिहार्य घटना आहे असें वाटण्याऐवजीं कांहींशी आकस्मिक आहे असें वाटतें. पण यांत्रिक उत्पादन सुरू झालें म्हणजे मजूरांना सामुदायिक श्रमानेंच काम करावें लागतें. ( याला अगदींच थोडे असलेले अपवाद पुढें येतील. ) म्हणून यांत्रिक उत्पादनामध्यें श्रमशक्तीचें जें सामुदायिक स्वरूप दिसून येतें तें यांत्रिक साधनामुळें अपरिहार्य ठरतें म्हणून येतें.

## यंत्रें श्रमजन्यच होत

सहकार्य व श्रमविभाग यांनीं जीं धनोत्पादनशक्ति वाढली त्या मुळें भांडवलदाराला कांहींहि तोशीस पडली नाहीं तें आपण पाहिलें आहे. सामाजिक श्रमापासून उत्पन्न झालेली ती नैसर्गिक शक्ति होय. तसेंच वाफ, पाणी, इ. भौतिकशक्ति उत्पादनाच्या कार्यास लावण्यांत आल्या असतां भांडवलदाराला कांहींहि तोशीस पोंचत नाहीं. पण ज्याप्रमाणें माणसाला श्वासोच्छ्वास करण्यास फुफ्फुसें लागतात त्याप्रमाणें या भौतिक शक्तीचा वापर करण्यासाठीं कांहींतरी साधन लागत असतें. हें साधन माणसांनीं आपल्या हातांनींच केलेलें असावें लागतें. पाण्याची शक्ति वापरण्यासाठीं पाणचक्की लागते. आणि वाफेची शक्ती वापरण्यासाठीं वाफेचें एंजीन लागतें. भौतिकशास्त्रांची बाब या नैसर्गिक शक्तीसारखीच आहे. लोहचुंबकाची सुई विजेच्या प्रवाहाच्या कक्षेंत ढळते हा सिद्धांत

अथवा लोहचुंबक हा लोखंडाला आकर्षून घेत असून त्याच्या भोवतीं विजेचा प्रवाह फिरत असतो हा सिद्धांत हे दोन्ही सिद्धांत एकदां शोधून काढले गेले म्हणजे त्यांच्या उपयोगाला एक पेनी सुद्धां खर्च येत नाहीं. परंतु तारायंत्र वगैरेसाठीं या सिद्धांतांचा उपयोग करतांना प्रचंड आणि किंमतीचें साहित्य लागत असतें. म्हणून जरी भौतिकशक्ति व शास्त्रें यांच्या प्रचंड शक्तींचा उपयोग उत्पादनाच्या कामीं भांडवलदारांनीं केला व त्यामुळें मजूरांची उत्पादनशक्ति खूप वाढविली हें सहज पटतें तरी ही शक्तिवर्धनाचीं साधनें श्रमशक्ति खर्च करूनच निर्माण केलीं गेलीं आहेत हें लक्षांत ठेवलें गेलें पाहिजे. स्थिर भांडवलाच्या कोणत्याहि घटकाप्रमाणें यंत्र हेंहि नवें कोणतेंहि मूल्य निर्माण करीत नाहीं. त्यांतून उत्पन्न होणाऱ्या मालांत त्या यंत्राचें मूल्य तेवढें संक्रमित होत असतें. आणि यंत्रें व सर्वच्या सर्व यंत्रपद्धति ( आधुनिक कारखानदारींतील श्रमाच्या हत्याराचे ठळक स्वरूप ) पूर्वींच्या वैयक्तिक हस्तव्यवसायांतील अथवा श्रमविभागात्मक हस्तव्यवसायांतील हत्यारापेक्षां मूल्यानें अधिक भारावलेली असते. त्यामुळें उत्पन्न होणारा माल अधिक स्वस्त होण्याऐवजीं स्वतःच्या मूल्याच्या प्रमाणांत ती तो अधिकच महाग करून टाकते.

## जितकी झीज तितकेंच मूल्य संक्रमण

येथें हें सांगितलें पाहिजे कीं यंत्र हें माल उत्पन्न करण्याचें काम करीत असतांना त्याची झीज जितकी होईल तितकेंच मूल्य उत्पन्न मालांत संक्रमित करीत असतें. म्हणून एखाद्या यंत्राचें सबंध मूल्य आणि वेळोवेळीं उत्पन्न होणाऱ्या मालांमध्यें संक्रमित होणारें अंशमूल्य यांमध्यें फारच फरक असतो. यंत्र जितकें अधिक काल टिकेल तितकें दरमालामध्यें संक्रमित होणारें यंत्राचें अंशमूल्य लहान असतें. श्रमाचें

कोणतेंहि हत्यार अथवा उत्पादनाचें साधन या सर्वांचें असेंच असतें. पण हत्याराचा वापर करणें आणि यंत्राची झीज होणें यांत फरक आहे. कारण यंत्र हें अधिक टिकाऊ साहित्याचें केलें असल्यामुळें पुष्कळ काळ काम करूं शकतें. शास्त्रीय नियमांनीं काटेतोलपणें तें वापरलें जात असल्यानें त्यांत काटकसर अधिक प्रमाणांत करतां येते. हत्यारापेक्षां यंत्राचें उत्पादनक्षेत्रहि फार मोठें असतें. ब्लॅकबर्नचें मि. बेनिस याचें एक व्याख्यान १८५८ त प्रसिद्ध झालें आहे. तो सांगतो, "यंत्राची १ अश्वशक्ति ४५० 'म्यूल' चात्या फिरवूं शकते, २०० 'थ्रोसल' चात्या फिरवूं शकते, ४० इंच रुंदीच्या कापडाचे १५ माग चालविते." एका दिवसाच्या राबणुकींत एक अश्वशक्ति वर सांगितलेलें हें सर्व काम करतें. यामुळें त्या यंत्राची जी झीज होते ती एक पौंडभर सुताला, अथवा १ यार्ड कापडाला अतिशयच थोडी होते. वर सांगितलेल्या वाफेच्या हातोड्याचे असेच आहे. त्याला लागणारा कोळसा आणि त्याची होणारी झीज त्यानें दररोज ठोकल्या जाणाऱ्या लोखंडाच्या प्रचंड ढिगाऱ्यावर वाटली जात असल्यामुळें १ हंड्रेडवेट लोखंडाच्या वाट्यास ही झीज फार थोडी येते. पण खिळे मारण्यासाठीं तो हातोडा वापरला तर मात्र त्या कामीं ही झीज म्हणजे मूल्य फारच खर्चीं पडेल.

## यंत्रानें स्वस्ताई वाढली

साधें सहकार्य व श्रमविभागात्मक सहकार्य यांचा विचार करतांना आपण असें पाहिलें आहे कीं, इमारती वगैरे उत्पादनास आवश्यक असणाऱ्या वस्तु सामुदायिकपणें वापरल्या जात असल्यामुळें त्यांची झीज कमी होत असते. आणि म्हणून उत्पन्न झालेल्या मालाची किंमत त्यामुळें फारशी वाढत नाहीं. पण यंत्राच्या उपयोगानें ही स्वस्ताई

आणखी वाढते. कारण काम करण्याचें यंत्र अनेकांकडून सामुदायिकपणें वापरलें जातें इतकेंच नव्हेतर या यंत्राला गतिशक्ति देणारें मोठें यंत्र आणि शक्तीचें संक्रमण करणारें यंत्र या दोहोंचाहि वापर सामुदायिकपणें अनेक यंत्राकडून केला जात असतो. अमुक वेळांत अमुक यंत्र अमुक इतक्या वेगानें आपलें मूल्य उत्पन्न मालांत संक्रमित करतें हें समजलें म्हणजे, किती वेळात किती मूल्य एखाद्या यंत्रानें उत्पन्न मालांस दिलें हें त्या यंत्राच्या एकंदर मूल्यावरून अजमावतां येतें. त्या यंत्राचे उत्पादनांत श्रम जितके कमी खर्च झाले असतील तितकें कमी मूल्य तें यंत्र उत्पन्न मालांत संक्रमित करीत असतें. हें मूल्यसंक्रमण जितकें कमी असेल तितकें तें यंत्र अधिक उत्पादनसामर्थ्याचें असतें आणि तितक्या अधिक प्रमाणांत त्याचा उपयोग समाजाला नैसर्गिक शक्तीसारखा होतो.

## यंत्राचें मूल्य किती

एखाद्या यंत्राच्या वापरानें जितके श्रम वांचतात तितकेच श्रम तें यंत्र उत्पन्न करण्याचे कामीं खर्च झालेले असतील तेथें एका ठिकाणीं व्हावयाचें श्रम दुसऱ्या ठिकाणीं झाले, यापलीकडे कांहींहि फायदा होत नाहीं. आणि म्हणून एखादा माल त्या यंत्रानें उत्पन्न केल्यास त्यानें श्रमहि कमी झाले नाहींत अथवा श्रमाची उत्पादनशक्तिहि वाढली नाहीं हें उघड आहे. तरीपण एखादें यंत्र करण्यास जितके श्रम खर्चीं पडतात, आणि त्या यंत्राच्या उपयोगानें जे श्रम वांचतात त्या दोन श्रमांतील फरक हा यंत्राचें मूल्य आणि तें यंत्र ज्या हत्याराची जागा पटकावील त्या हत्याराचें मूल्य यांमधील फरकावर अवलंबून नसतो. जोंपर्यंत यंत्राच्या निर्मितीसाठीं मजूरानें केलेले श्रम म्हणजे त्या यंत्रानें उत्पन्न केलेल्या मालांतल्या यंत्राचें संक्रमित झालेलें मूल्य हें हत्यारानें उत्पन्न केलेल्या मालांत माणसानें संक्रमित केलेल्या मूल्यापेक्षां

कमी असते, तोंवर हा फरक कायम राहणारच. म्हणून एखाद्या यंत्राची उत्पादनशक्ति ही तें यंत्र जेवढ्या मानवी श्रमशक्तीची जागा घेईल त्या श्रमशक्तीच्या उत्पादनशक्तीइतकी आहे असें मानलें जातें. एखाद्या यंत्रानें जेवढे श्रम वांचले जातात, तेवढे श्रम त्या श्रमाच्या मजूरीइतके असतात असें समजतां कामा नये. समजा, एका यंत्राला १५० माणसांच्या मजूरीइतकी म्हणजे १५००० डॉ. इतकी किंमत पडली. तें यंत्र इतक्याच माणसांना काढून टाकून त्यांचें काम उरकतें आहे. पण हें यंत्र सुरू होण्यापूर्वी १५० माणसें तोच माल करीत असतां जे १५००० डॉ. चें मूल्य त्या मालांत घालीत होते तितकें सगळें आतां मालांत घातलें जात नाहीं. मजूरांना दरसाल १५००० डॉ. मिळत. पण त्याच्या मोबदल्यांत ते अधिक मूल्य निर्माण करीत. त्यांची जागा घेणाऱ्या यंत्रास आतां १५००० डॉ. किंमत पडली; तर त्या यंत्रांत त्यासाठीं खर्च झालेले सर्व श्रम अंतर्भूत झाले. आतां मजूरांना मजूरी अथवा भांडवलदाराला वाढावा कोणत्याहि प्रमाणांत मिळालेला असो, पूर्वी १५० मजूराकरवीं जितकें मूल्य निर्माण होत असे, त्यापेक्षां कमी मूल्य या यंत्रांत अंतर्भूत झालें आहे हें खास. म्हणून जरी एखाद्या यंत्राला, जितक्या मजूरांची तें जागा घेईल, तितक्या मजूरांच्या मजूरीइतकी किंमत पडली, तरी त्यांत अंतर्भूत झालेले श्रम त्या यंत्रानें हाकालल्या जाणाऱ्या जिवंत श्रमापेक्षां कमी असतात.

## भांडवलदारी दृष्टि व कम्युनिस्ट दृष्टि

खरोखर माल स्वस्त करणें एवढाच जर हेतु असेल तर, जोंपर्यंत एखाद्या यंत्राच्या निर्मितीस त्या यंत्रानें हाकालल्या जाणाऱ्या श्रमशक्तीपेक्षां कमी श्रमशक्ति खर्च होते तोंवरच तें यंत्र वापरणें फायदेशीर

ठरेल. आकड्यांनीं हें विधान सिद्ध करूं. वर घेतलेल्या उदाहरणांत १५० मजूरांना दरसाल १५०००डॉ. मिळाले. आणि त्यांनीं ३०००० डॉ. चें मूल्य निर्माण केलें. अर्थात् वरकड मूल्य म्हणजे वाढावा त्यांनीं १००% निर्माण केला. आतां जोंपर्यंत या १५० मजूरांच्या जागीं आणावयाच्या यंत्राच्या निर्मितीस ३०००० डॉ.हून कमी किंमत पडेल तोंपर्यंतच समाजाला तें यंत्र फायदेशीर वाटेल. कारण त्याच्यापासून श्रम वांचतात. पण भांडवलदार असा हिशेब करीत नाहीं. तो १५० मजूरांनीं केलेल्या श्रमाबद्दल १५००० डॉ. देतो. आणि म्हणून १५००० डॉ. पेक्षां यंत्राला अधिक किंमत पडेल तर तो यंत्र निर्माण करणार नाहीं. (यावरून कम्यूनिस्ट समाजांत भांडवलदारी समाजापेक्षां फारच अधिक व्यापक प्रमाणावर यंत्रें वापरण्यांत येतील हें लक्षांत येतें.) प्रत्यक्ष दिली जाणारी मजूरी हीच भांडवलदाराच्या उत्पादनखर्चांत धरली जाते. एकाच श्रमाच्या परिमाणास निरनिराळ्या देशांत निरनिराळी मजूरी असूं शकते. ही मजूरी कित्येक वेळां श्रमशक्तीच्या मूल्याच्या खालींहि जाते, अथवा वरहि जाते, यामुळेंच इंग्लंडांत हल्लीं शोधण्यांत येणारीं यंत्रें इंग्लंडांत वापरलीं न जातां फक्त उत्तर अमेरिकेंत वापरलीं जातात. १६ व्या व १७ व्या शतकांत जर्मनींत शोधण्यांत आलेलीं यंत्रें हॉलंडमध्यें वापरण्यांत येत. आणि १८ व्या शतकांत फ्रान्समध्यें लागलेले शोध इंग्लंडांत वापरण्यांत येत.

## यंत्र नको, माणूस बरें

जुन्या राष्ट्रांमध्यें उद्योगधंद्याच्या एका शाखेंत यंत्र सुरूं केलें असतां बाकीच्या शाखांतील मजूरांची संख्या एकदम इतकी बेकार होई कीं मजूरीचे दर श्रमशक्तीच्या मूल्याच्याहि खालीं उतरत. आणि मग मजूराऐवजीं यंत्र वापरणें महाग पडून त्या शाखांत मजूरच वापरण्याचा

क्रम चालू राही. इंग्लंडांत लोकरीच्या कारखान्यांतील कांहीं शाखांत अलीकडे मुलें मजूर म्हणून नेमण्याचें कमी झालें आहे. कोठें कोठें तर मुलें मुलींच नेमत नाहींत. हे कां घडलें? कारण कारखान्यांच्या कायद्यांनीं मुलांचे दोन वर्ग केले. कांहींनीं ६ तास काम करावे व बाकीच्यांनीं ४ तास करावे; अथवा ५ तासाहून कोणीच अधिक काम करू नये असें ठरविण्यांत आलें. पण अर्धा दिवस काम करणाऱ्या मुलांना पूर्ण दिवस काम करणाऱ्या पुरुषापेक्षां कमी मजूरी मिळे म्हणून मुलांचे पालक मुलांना कामावर पाठवीनात. म्हणून अर्धा दिवस काम करणाऱ्या मजूरांची जागा यंत्रानें घेतली. खाणीमध्यें स्त्रियांना व १० वर्षाखालील मुलांना कामाला लावण्यास बंदी होण्यापूर्वीं भांडवलदारांना पुरुषांच्या बरोबर नैतिक रूढीच्या दृष्टीनें शक्य होईल तितक्या प्रमाणांत नागव्या स्त्रिया व मुली यांना कामावर लावणें सोइस्कर वाटे. वर सांगितलेला कारखान्याचा कायदा झाल्यावर असे मजूर नेमणें बंद होऊन त्या-जागीं यंत्रें वापरण्यांत येऊं लागलीं. अमेरिकन लोकांनीं दगड फोड-ण्याचें एक यंत्र शोधलें आहे. पण इंग्रज लोक ते वापरत नाहींत. कारण जो भुक्कड (रेच) माणूस हें काम करतो त्याला त्याच्या श्रमाबद्दल इतकी थोडी मजूरी मिळते कीं त्याचेऐवजीं यंत्रें वापरल्यानें कारखान-दाराला उत्पादनखर्च वाढेल. ( भुक्कड माणूस हा शब्द ब्रिटिश अर्थशास्त्र-ज्ञांनीं शेती मजूराला लावलेला आढळून येतो. ) इंग्लंडांत कालव्यांतल्या बोटी ओढण्यासाठीं घोडे न लावतां अजूनहि मधून मधून स्त्रिया लावतात. कारण घोडे व यंत्रें यांच्या निर्मितीचे श्रम गणितशास्त्रानें अचूक काढतां येतात. पण समाजांत गरजेहून अधिक असलेल्या स्त्रियांना जगविण्या-साठीं लागणाऱ्या मूल्याचा हिशेब करतां येत नाहीं, इतकें तें कमी असतें. आणि म्हणून यंत्राचें माहेरघर असें जें इंग्लंड त्या इंग्लंडांत मानवी श्रमशक्तीची जितकी उधळपट्टी होते तितकी जगांत कोठेंहि होत नाहीं.

# यंत्राचा कामगारांवर परिणाम : : : १०*

## (१) स्त्रिया व मुलें यांचे श्रम

यंत्रांनीं मनुष्याचें ताकदीचें काम जितक्या प्रमाणांत कमी होतें तितक्या प्रमाणांत ज्यांच्या शारीरिक शक्तीची पुरेशी वाढ झाली नाहीं, पण कर्मेंद्रियें मात्र चपळ आहेत अशा कमी शक्तीच्या मजूरांना कामावर लावणें शक्य होतें. म्हणून स्त्रिया व मुलें यांचे श्रम यांत्रिक भांडवलदारांनीं प्रथम कामीं लावले. श्रम आणि मजूर यांच्या जागीं आलेल्या प्रचंड यंत्रांचा उपयोग मजूरांची संख्या वाढविण्यासाठीं करण्यांत आला. मजूराच्या कुटुंबांतील प्रत्येक स्त्री-पुरुष अथवा मुलें भांडवलदारांच्या लगामीं खेंचण्यांत आलीं. भांडवलदारासाठीं प्रत्येकाला सक्तीनें राबावें लागे. यामुळें मुलांचें केवळ खेळणें बंद झालें एवढेंच नव्हे तर कुटुंबांतील व्यक्तीकडून कुटुंबाची घरांत जी मोफत सेवा होत असे तीही अशक्य झाली.*

---

* कॅपिटल, खंड २, प्रकरण १५.

* अमेरिकेंत यादवी झाली त्यामुळें कापसाच्या धंद्यावर संकट आलें असतां डॉ. एडवर्ड स्मिथ याला ब्रिटिश सरकारनें लॅंकशायर, चेशायर, व

## सर्व कुटुंबावर श्रमाची सक्ती

श्रमशक्तीचें मूल्य जें ठरतें तें वैयक्तिक प्रौढ मजूरांच्या चरितार्थास लागणाऱ्या आवश्यक वस्तूंच्या निर्मितीसाठीं लागणाऱ्या श्रमावरून ठरत नाहीं, तर त्याचें सर्व कुटुंबच्या कुटुंब पोसण्यासाठीं अवश्य असणाऱ्या वस्तु निर्मिण्यास लागणारे जे श्रम त्यावरून ठरतें. यंत्रानें कुटुंबांतील प्रत्येक मजूराला भांडवलशाहीच्या बाजारांत फेकल्यामुळें मजूराच्या श्रमशक्तीचा भाव उतरला. कुटुंबांतील ४ मजूरांची श्रमशक्ति खरेदी करण्यास जी मजूरी लागेल ती पूर्वी कुटुंबाचा जो मुख्य पालक त्याची श्रमशक्ति खरेदी करण्यास लागणाऱ्या मजूरीहून अधिक असेल; पण तिच्या मोबदल्यांत आतां १ कुटुंब जगावया-

---

आणखी काहीं ठिकाणें येथें कापूस कामगाराच्या आरोग्यविषयक परिस्थितीची पाहणी करण्यास पाठविलें होतें. तो आपल्या रिपोर्टांत सांगतो कीं आरोग्याचा प्रश्न व कामगारांच्या हकालपट्टीचा प्रश्न हे दोन मुद्दे सोडले तर कापूस धंद्यावर आलेल्या संकटापासून अनेक फायदे झाले आहेत. स्त्रियांना आतां अधिक फुरसत मिळत असल्यानें मुलांना ‘ गॉडफ्रेचे कॉर्डियल ’ हें विषारी औषध न देतां स्वत: प्यायला घेणें शक्य झालें आहे. त्यांना स्वैंपाक करावयाला शिकण्याइतका वेळ आतां मिळूं लागला आहे. दुर्दैव एवढेंच आहे कीं ज्यावेळीं शिजवायलाच कांहीं नाहींसें झालें त्यावेळीं त्यांना ही स्वैंपाकाची कला प्राप्त झाली. पण यावरून आपणाला एक गोष्ट कळून येते ती ही कीं भांडवलानें आत्मविस्ताराच्या कार्यासाठीं वास्तविक कुटुंबाच्या घरीं खर्च व्हायला हवे असे श्रमहि आपल्या उत्पादनासाठीं बळकावून घेतले. कापसाच्या धंद्यावर आलेल्या या संकटाचा उपयोग कामगारांच्या मुलींना शिवण्याच्या शाळेंत शिवणकाम शिकवण्यासाठींहि करण्यांत आला. सगळ्या जगासाठीं ज्या मुली सूत कातीत होत्या त्या मुलींना शिवणकाम शिकतां येण्याची संधि मिळण्यासाठीं एक अमेरिकन क्रांति आणि एक जागतिक आर्थिक संकट यावें लागलें.

साठीं ४ माणसांनीं नुसते श्रम करून भागत नाहीं, तर भांडवलदाराला वाढावा देण्यासाठींहि वरकड श्रम त्यांना करावे लागतात.

## मजूरांच्या जीवनांत क्रांति

" मजूरांची संख्या फारच वाढली, मोठ्या माणसांऐवजीं स्त्रिया आणि विशेषतः मुलें नेमून घेण्यामुळें ही संख्या वाढली. १३ वर्षांच्या ३ मुली, प्रत्येकीं आठवड्यास ६ शिलिंगपासून ८ शिलिंग मजूरीवर, आठवड्यास १८ ते ४५ शिलिंग मिळवणाऱ्या एका प्रौढ माणसाच्या जागीं नेमण्यांत येऊं लागल्या." ( क्रिन्से, : लॉजिक ऑफ पोलिटिकल इकॉनमी : लंडन १८४५ ) आजाऱ्यांची शुश्रुषा करणें, मुलांना पाजणें, वगैरे प्रकारची कांहीं कौटुंबिक कार्यें नाहींशीं करणें अशक्य होतें म्हणून भांडवलाकडून मुलांच्या माता अजिबात खरेदी केल्या गेल्यानंतर त्या मातांना आपल्या विशिष्ट कामासाठीं बदली नेमणें भाग पडलें. शिवणें, दुरुस्ती करणें, वगैरे जी घरगुती कामें तीं बंद होऊन तसल्या तयार मालाची खरेदी होऊं लागलीं. आणि म्हणून घरांतले श्रम जसजसे कमी होत गेले तसतसा पैशाच्या स्वरूपांतला खर्च वाढूं लागला. यामुळें कुटुंबपोषणाचा खर्च पैशाच्या स्वरूपांत वाढला जाऊन मजूरीच्या रूपानें पैशांचें वाढलेलें उत्पन्न खलास होऊं लागलें. तसेंच चरितार्थाच्या वस्तु काटकसरीनें वापरणें, माल बरावाईट पाहणें, या गोष्टी अशक्य झाल्या. *

* या वस्तुस्थितीची माहिती देणारे कितीतरी साहित्य 'चिल्ड्रेन्स एम्प्लॉयमेंट कमिशन' च्या इन्स्पेक्टरांचे रिपोर्ट आणि पब्लिक हेल्थ खात्याचे रिपोर्ट यांमध्यें सापडतें. अधिकृत अर्थशास्त्रज्ञांनीं मात्र हें सर्व साहित्य दडवून ठेवलें आहे.

## मजूर हा गुलामांचा व्यापारी

भांडवल हें मुलांना व वयांत न आलेल्या माणसांना खरेदी करीत असल्यामुळें मजूर आणि भांडवलदार यांच्या दरम्यान होणाऱ्या करारांतहि यंत्रानें क्रांति घडवली. पूर्वी कामगार स्वतःची श्रमशक्ति विकीत असे. ती त्याचा तो मालक म्हणून विकीत असे. आतां तो आपली बायको व मूल यांना विकतो. तो आतां गुलामांचा व्यापारी झाला आहे. पूर्वी अमेरिकन वृत्तपत्रांत नीग्रो गुलामांच्या मागणीसंबंधीं जाहिराती येत. तशाच स्वरूपाची मुलांच्यासंबंधाची मागणी यंत्रामुळें होऊं लागली. १८६४–६६ त चिल्ड्रेन्स् एम्प्लॉयमेंट कमिशननें प्रसिद्ध केलेल्या रिपोर्टामध्यें मुलांची विक्री करणाऱ्या मजूर-बापांची हकीगत दिलेली आहे. त्यांची वर्तणूक गुलामांच्या व्यापाऱ्यासारखी असे. काळीज थरारण्याइतकी ती क्रूर वाटते.

## वाढते बालमृत्यु

कुटुंबसंस्था अशा प्रकारें उध्वस्त झाल्यामुळें तिचा एक परिणाम असा झाला कीं लहानपणींच मजूरांचीं मुलें फार मरूं लागलीं. इंग्लंडचे जे नोंदणीजिल्हे करण्यांत आलेले आहेत, त्यापैकीं १६ जिल्ह्यांत, वर्षाखालील १ लक्ष जिवंत मुलांपैकीं ९ हजार मुलें सरासरीनें दरसाल मरतात. २४ जिल्ह्यांत १० हजारावर आणि ११ हजाराखालीं मरतात. ३९ जिल्ह्यांत ११-१२ हजार मरतात. ४८ जिल्ह्यांत १२-१३ हजार मरतात. २२ जिल्ह्यांत २० हजार मरतात. २५ जिल्ह्यांत २१ हजार, १७ जिल्ह्यांत २२ हजारावर, आणि ११ जिल्ह्यांत २३ हजारावर मरतात. तसेंच हू, वुल्व्हर हॅम्पट्न्, ॲश्टन्-अंडरलाइन आणि प्रीस्टन या जिल्ह्यांत २४ हजारांवर मरतात. नॉटिंग हॅम, स्टॉक पोर्ट, आणि ब्रॅड-

फोर्ड यांत २५ हजारावर, विस्बीच् मध्यें २६ हजार आणि मँचेस्टर मध्यें २६ हजारावर मरतात.

१८६१ त वैद्यकीय चौकशी अधिकाऱ्यानें असें सांगितलें आहे कीं मृत्युसंख्येच्या या प्रचंड वाढीचें कारण, इतर स्थानिक कारणें सोडून दिलीं तरी मुख्यतः स्त्रियांना घर सोडून दुसरीकडे कामाला जावें लागतें हें होय. मातांच्या गैरहजरीमुळें मुलांचें पोषण अपुरें होतें. त्यांना वाईट अन्न मिळतें, आणि झोपवण्यासाठीं अफू घातली जाते. याशिवाय मुलांची हेतुपूर्वक उपासमार होत असल्यामुळें आणि अफू-सारखीं विषें त्यांना घातलीं गेल्यामुळें आई आणि मूल यांचें दरम्यान, स्नेहसंबंध दुरावत जातात. ज्या शेतीप्रधान जिल्ह्यांत स्त्रियांची मजूर म्हणून नेमणूक अगदीं कमी प्रमाणांत होते, तेथें मृत्यूचें प्रमाणहि अगदीं कमी असतें.

## मुलांचा बौद्धिक ऱ्हास

भांडवलशाहीनें मुलांची व स्त्रियांची जी पिळणूक केली तीमुळें झालेल्या नैतिक अधःपाताचें वर्णन फ्रेड्रिक् एंजल्स व इतर लेखक यांनीं तपशीलवार केलें आहे. म्हणून त्या विषयाचा मी येथें नुसता उल्लेखच करतों. अपूर्ण बुद्धीच्या मुलांना वाढावा मिळविणारीं यंत्रें बनवल्या-मुळें त्यांच्या बुद्धीचा ऱ्हास झालेला आहे. पूर्वीं निसर्गतःच अडाणी असलेल्या मुलांचीं मनें संस्काररहितच असत. त्यामुळें त्यांची नैसर्गिक विकासशक्ती म्हणजे अंगचा सुपीकपणा, नष्ट झालेला नसे. पण कार-खान्यांतील मजूरमुलांच्या बुद्धीचा सर्वस्वी नाशच झाला होता. हा अनर्थ टाळण्यासाठीं पुढें १४ वर्षांखालील मुलांना नोकरीवर ठेवतांना प्राथमिक शिक्षण सक्तीनें दिलें पाहिजे असा कायदा करण्यांत आला. या कारखान्यासंबंधीं कायद्यांत शिक्षणासंबंधीचीं जीं कलमें असत त्यांची

भाषा अगदीं हास्यास्पद असे. त्या कलमांना कारखानदारांचा विरोध होता. आणि त्या कलमांची कैची चुकवण्यासाठीं कारखानदार अनेक युक्त्या योजीत. यावरून भांडवलदारांची भावना शिक्षणासंबंधीं कशी होती हें कळून येतें.

## शाळेचा फार्स

कायद्याप्रमाणें जी सक्ती होती तिचें स्वरूप असें:—

" मुलांना आठवड्यांतून अमूक दिवस आणि त्या दिवसापैकीं कांहीं ( ३ ) तास शाळा नांवाच्या चार भिंतीच्या इमारतींत कोंडलें जावें. आणि त्या मुलाला मजूर म्हणून नेमणाऱ्या मालकानें मुलाच्या मास्तरकडून अथवा मास्तरणीकडून मुलाच्या हजेरीचें सर्टिफिकेट घ्यावें. " १८४४ मध्यें कारखाना कायदा दुरुस्त झाला. त्यापूर्वी शिक्षक अथवा शिक्षकिणी यांना स्वतःलाच लिहितां येत नसल्यामुळें सर्टिफिकीटावर ते सहीऐवजीं फुल्या करीत, असे प्रकार अनेकदां घडत होते. " शाळा नांवाच्या या घाणेरड्या जागांतून मुलांना जीं सर्टिफिकीटें मिळत तीं कोणतेंहि शिक्षण न मिळतांच मिळत असत. ज्या शाळांत एखादा लायक शिक्षक असे, तेथें ३ वर्षांपासून अगदीं मोठ्या मुलापर्यंत शिकणाऱ्या मुलांची इतकी गर्दी त्या शिक्षकाभोंवतीं असे कीं शिकवण्याकडे त्याचें चित्तच लागत नसे. पण त्याचा चरितार्थ अगदीं दारिद्र्यानें कां होईना पण जो होऊं शके तो त्या जागेंत जितकी जास्तींत जास्त मुलें घोकंपट्टी करण्यास येऊं शकतील तितक्या मुलांपासून प्रत्येकीं मिळणाऱ्या पेनीनें होत असे. त्या शाळेंत उपकरणें अगदींच थोडीं असत; आणि पुस्तकें व इतर शिक्षणसाधनेंहि जवळ जवळ नसत. मुलें दाटीवाटीनें आणि गलगा करीत बसत असल्यामुळें त्यांचीं मनें निरुत्साही होत. मीं अशा अनेक शाळांना भेटी दिल्या

आहेत. तेथील मुलांच्या रांगांच्या रांगा कांहींच करीत नसलेल्या दिसत. आणि हजेरीपटावर मात्र हीं मुलें शाळेंत हजर आहेत व त्यांना शिक्षण मिळत आहे असें दाखल केलें जाई." ( हॉर्नर )

## कायद्यांतील खोटेपणा

भांडवलदार हे खोटेपणानें कायदा कसा झुगारून देत असत हें दाखवण्यासाठीं खालील उतारा देतों. छापखाने व इतर अशाच प्रकारचे धंदे यांत पुढील प्रमाणें नियम करण्यांत आला. "छापखान्यांत कामावर लावण्यापूर्वींच्या ६ महिन्यांत प्रत्येक मुलानें ३० दिवसपर्यंत व या ३० दिवसांत कमींत कमी १५० तास शाळेंत हजर असलें पाहिजे. तसेंच छापखान्यांत कामावर असतां दर ६ महिन्यांत कमींतकमी १५० तास त्या मुलानें शाळेंत हजर असलें पाहिजे. शाळेंत सकाळीं ८ पासून संध्याकाळीं ६ पर्यंत केव्हांहि हजर असावें. २ $\frac{1}{2}$ तासाहून कमी अथवा ५ तासाहून अधिक असणारी हजेरी १५० तासांत मोजली जाणार नाहीं." भांडवलशाहीनें या कायद्याच्या सक्तीची अम्मलबजावणी कशी केली असेल ? "सामान्यतः मुलें ३० दिवसपर्यंत सकाळीं व दुपारीं शाळेंत जातात. रोज कमींतकमी ५ तास शाळेंत असतात. आणि कायद्याची ही मुदत पूर्ण झाल्यानंतर म्हणजे भांडवलदारांच्या भाषेंत हजेरी भरल्यानंतर उरलेली ६ महिन्यांची मुदत पूर्ण होईपर्यंत मुलें छापखान्यांत जातात. ही मुदत संपल्यावर शाळेच्या हजेरीचा पुढला हप्ता भरणें अवश्य होतें. मग तीं मुलें पुन्हां शाळेंत जातात, व कायदेशीर हजेरीचें बुक भरलें कीं पुन्हां शाळा सोडतात....पुष्कळ मुलें एकदां एका शाळेंत गेल्यानंतर पुन्हां ५ महिन्यांनीं जेव्हां शाळेंत जातात तेव्हां प्रारंभीं शाळेंत जातांना त्यांची विद्या होती तेवढीच विद्या त्यांच्याजवळ उरलेली

असते. पूर्वी शाळेंत हजेरी देऊन जी विद्या मिळविली ती नंतरच्या छापखान्याच्या हजेरींत सगळी विसरून जाते....दुसऱ्या कांहीं छापखान्यांत मुलांच्या शाळेंतील हजेरीचा प्रश्न कामाच्या परिस्थितीवर अवलंबून ठेवलेला असतो. जे १५० तास मुलांनीं शाळेंत भरावयाचे असतात ते मधून मधून ३ ते ५ तासांच्या हप्त्यांनीं केव्हां केव्हां ६ महिनेपर्यंत भरले जातात .... उदा. १ दिवशीं मुलें सकाळीं ८ पासून ११ पर्यंत बसतात. आणखी एखाद्या दिवशीं दुपारीं १ पासून ६ पर्यंत असतात. पुन्हां पुढें कित्येक दिवसपर्यंत मूल शाळेंत न आलें तरी चालतें. पुढें केव्हां दुपारीं ३ ते ६ या प्रमाणें ३।४ दिवस अथवा आठवडाभर शाळेंत येतें. पुढें ३ आठवडे अथवा महिनाभर सुद्धां येईनासें होतें. पुढें अकस्मात केव्हां तरी येई, कांहीं तास बसे, आणि ज्या मालकानें त्यांना नोकरीवर नेमलें असेल त्यानें कामावर बोलावलें म्हणजे शाळा सोडून कामावर जाई. या प्रकारें शाळेंतून कामावर आणि कामावरून शाळेंत अशा थपडा खात मुलांच्या शाळेंतील १५० तासांची रडकथा पूर्ण होई." ( रेडग्रेव्हः इन्स्पेक्शन ऑफ फॅक्टरीज्चा रिपोर्ट, ३१ ऑक्टोबर १८५७ ).

श्रमविभागात्मक हस्तव्यवसायी कारखानदारीच्या काळांत भांडवलदारांच्या अनियंत्रित जुलुमाला कामगारानें केलेला विरोध यांत्रिक युगांत स्त्रिया आणि मुलें यांना कामगारवर्गांत सामील करून घेऊन भांडवलदारानें मोडून काढला.

## ( २ ) श्रमदिवस वाढविणें.

श्रमाची उत्पादनशक्ति यंत्रानें वाढतें, म्हणजे विक्रीमालाच्या उत्पादनासाठीं आतां यंत्रामुळें वेळ कमी लागूं लागतो. पण ही यंत्राची शक्ति हेंच, मनुष्याच्या स्वाभाविक शक्तींनीं कामाच्या वेळाला ज्या

मर्यादा घालून ठेवल्या आहेत त्या मर्यादांच्या पलीकडे पर्यंत कामाचा दिवस वाढवण्याचें साधन होऊन बसतें. एकीकडून या श्रमाचा दिवस वाढविण्याच्या प्रवृत्तीस अवश्य अशी परिस्थिति यंत्रामुळें निर्माण केली जाते. आणि उलट दुसऱ्याचे श्रम खाऊन टाकण्याची भांडवलदाराची भूक वाढविणारी नवी नवी लोभकारणेंहि याच यंत्रानें निर्माण केलीं जातात.

## यंत्राची झीज

यंत्रामध्यें श्रमाचीं हत्यारें हीं आपोआप चालणारीं होतात. मजूरानें कांहींहि साहाय्य न केलें तरी स्वतंत्रपणें हालचाल करणाऱ्या अशा त्या वस्तु असतात. यंत्रें हीं यामुळें औद्योगिक कारखानदारीच्या अखंड धावणाऱ्या शक्ती होतात. त्या यंत्राशीं काम करणाऱ्या माणसांचीं शारीरिक दुर्बलता अथवा इच्छेचें सामर्थ्य यामुळें जर या यंत्रांना कांहीं अडथळा झाला नाहीं तर तीं एकसारखें धनोत्पादन करीत राहतील. म्हणून या यंत्रांना होणारा विरोध कमींत कमी करण्याच्या धोरणानें भांडवलदार उत्साहित झालेला असतो.हा विरोध यंत्राचें काम अगदीं सहज होणारें असल्यानें कमी होतो. तसेंच स्त्रिया आणि मुलें जीं कामावर लावलीं जातात तीं प्रतिकार करणारीं नसल्यामुळेंहि विरोध कमी होतो.

यंत्र जितका अधिक काळ काम करील तितका अधिक माल निर्माण होतो. आणि यंत्रामुळें मालांत संक्रमित होणारें मूल्य जितक्या अधिक मालांत वाटलें जातें, तितकें त्यामुळें एक एका विक्रीमालामध्यें कमी कमी मूल्य संक्रमित होतें. रोजचा कामाचा दिवस जास्तींत जास्त वाढविण्याला भांडवलदाराला एवढें लोभकारण पुरेसें असतें.

यंत्राची जी झीज होते ती कामाच्या दिवसाच्या वाढीच्या प्रमाणांत वाढत नाहीं आणि जरी तशी वाढली तरी रोज १६ तासपर्यंत

याप्रमाणें ७ $\frac{1}{2}$ वर्षें जर एखादें यंत्र राबवत ठेवलें, तर रोज ८ तासाप्रमाणें १५ वर्षेंपर्यंत तें यंत्र राबवत ठेवलें असतां होणाऱ्या मूल्याइतकेंच मूल्य तें उत्पन्न करतें व तितकाच काळ राबतें. पण रोज १६ तासाप्रमाणें ७ $\frac{1}{2}$ वर्षे राबवल्यास ८ तासप्रमाणें १५ वर्षें राबण्याच्या निम्म्या काळांत यंत्राची पूर्ण किंमत भरून निघते. आणि म्हणून १५ वर्षांत जितका वाढावा भांडवलदाराला मिळाला असतां तितका वाढावा ७ $\frac{1}{2}$ वर्षांतच त्याला मिळून जातो.

यंत्राची होणारी झीज ही दोन प्रकारची असते. एक झीज यंत्राच्या उपयोगानें होते व दुसरी अनुपयोगानें होते. उदा. तरवार वापरल्यानें जशी झिजते तशी ती न वापरतां नुसती म्यानांत ठेवल्यानें गंजून झिजते. दुसऱ्या प्रकारें होणारी झीज ही निसर्गामुळें होणारी असून तिचें प्रमाण यंत्राच्या उपयोगाशीं व्यस्त असतें. जितका काळ यंत्र रिकामें पडून राहील तितका काळ पंचमहाभूतें त्याला खाऊन टाकतात.

## यंत्रांची नैतिक झीज

पण यंत्रांची ही जी भौतिक झीज त्याशिवाय नैतिक झीजहि होत असते असें आपणांस म्हणावें लागेल. कारण ( १ ) त्याच प्रकारचीं यंत्रें अधिक स्वस्त अशीं निर्माण केलीं जाण्यानें अथवा ( २ ) तेंच कार्य करणारीं अधिक कार्यक्षम अशीं यंत्रें निर्माण होऊन चढाओढीस आल्यानें पूर्वीच्या यंत्रांचें विनिमयमूल्य कमी होत असतें. या नव्या-पैकीं कोणतेंहि यंत्र कितीहि तरुण व उमेदीनें मुसमुसलेलें असो, त्याचें विनिमयमूल्य हें त्याच्या अंगांत ओतलेल्या श्रमावरून ठरत नसून वरील दोहोंपैकीं कोणतेंहि यंत्र पुनः निर्माण करण्यास लागणारी जी श्रमवेळ तीवरून ठरत असतें. म्हणून त्या यंत्राचें मूल्य थोडेफार उतरतेंच. या मूल्याइतका माल त्या यंत्रांतून निर्माण करण्यास काळ

जितका थोडा लागेल तितका त्याचा नैतिक अधःपात कमी होतो, आणि श्रमदिवस जितका मोठा असेल तितका हा काळ कमी लागतो. कारखानदारींत एकदां यंत्राचा उपयोग होऊं लागला म्हणजे तीं यंत्रें अधिक स्वस्त निर्माण करण्याचा एकसारखा धडाका सुरू होतो. आणि यामुळें यंत्रांच्या निरनिराळ्या भागांच्या विनिमयमूल्यावरच परिणाम होत नसून एकंदर यंत्राच्या विनिमयमूल्यावरहि त्याचा परिणाम होतो. म्हणून यांत्रिक उत्पादनाच्या पहिल्या पहिल्या दिवसांत श्रमदिवस लांबवण्याला हें कारण विशेष तीव्र असतें. *

## यंत्रामुळें कामाचा दिवस वाढतो

कामाचा दिवस अमुक इतक्या वेळाचा आहे असें धरलें, व इतर परिस्थिति सारखीच आहे असें समजलें म्हणजे दुप्पट कामगार कामावर लावावयाचे असल्यास यंत्रांत वगैरे गुंतवलेलें स्थिर भांडवल दुप्पट करावें लागतें, इतकेंच नव्हे तर कच्चा माल व साहाय्यक साहित्य यांतील स्थिर भांडवलहि दुप्पट करावें लागतें. पण मजूरांची संख्या न वाढवतां कामाचा दिवस जर वाढवला तर मात्र यंत्रें व इमारती यांवर घातलेल्या भांडवलांत मुळींच वाढ करावी न लागतां उत्पादन वाढूं शकतें. कामाचा दिवस वाढवला म्हणजे कोणत्याहि परिस्थितींत

* यंत्रांची सुधारणा इतकी जलद होत असे कीं, जें यंत्र करण्यास १२०० पौं. लागत तें थोड्याच दिवसांनीं विक्रीस काढल्यास, त्या जातीचीं नवीं यंत्रें तोंवर सुधारलेलीं असल्यानें, ६० पौं. स विकलें जाई... एकामागून एक सुधारणा इतक्या जलद होत कीं एकदां बांधण्यास सुरवात झालेलीं यंत्रें पूर्ण होण्यापूर्वीच दुसरी अधिक सुधारलेलीं यंत्रें निघालीं म्हणून हीं अर्धवटच सोडून देण्यांत येत. ( बॅबेज : लंडन : १८३२,) या वादळी धावपळीच्या दिवसांत हत्यारें करणाऱ्या कारखानदारानीं माणसांच्या पाळ्या करून ८ तासांचा दिवस २४ तासांचा केला.

(म्हणजे यंत्रें नसतील तरी ) हा फायदा घडतोच. पण प्रस्तुत उदाहरणांत (यांत्रिक उत्पादनांत ) हा फायदा विशेष ठळकपणें लक्षांत येतो. कारण यंत्रें वगैरे श्रमसाहित्यांत गुंतवलेलें भांडवल हें फार महत्त्वाचें असतें. कापसाचा एक कारखानदार मि. अॅश्वर्थ हा प्रो. नासाऊ डब्ल्यू. सिनीयर याला १८३७ त लिहतो : " एखादा मजूर जेव्हां आपलें फावडें खालीं ठेवतो, तेव्हां तें खालीं ठेवलेलें असतें तेवढ्या काळांत १८ पेन्सांचें भांडवल वाया जात असतें. आमच्या कारखानदारांपैकीं एखादा माणूस जेव्हां गिरणीबाहेर पडतो तेव्हां तो बाहेर असतो तेवढ्या काळांत १ लक्ष पौं. भांडवल निरुपयोगी करतो. १ लक्ष पौं. भांडवल एक क्षणभरहि स्वस्थ बसवलें गेल्यास केवढें नुकसान होईल याची कल्पना करा ! म्हणून आपल्या कारखान्यांतील एकाहि माणसानें काम सोडून बाहेर जाणें ही गोष्ट खरोखर अगदीं राक्षसी आहे." यंत्राच्या वाढत्या उपयोगामुळें कामाचा दिवस वाढविणें 'इष्ट' आहे ही गोष्ट प्रो. सीनियरला अॅश्वर्थनें दिलेल्या सुचनेवरून लवकरच पटली.

## अपवादात्मक नफा वाढविण्यासाठींही श्रमवेळाची वाढ

एखाद्या धंद्याच्या एखाद्या शाखेंत यंत्राचा उपयोग झाला म्हणजे त्यापासून होणाऱ्या मालाचें सामाजिक मूल्य हें त्याच्या वैयक्तिक मूल्यापेक्षां अधिक असतें. म्हणजेच या यंत्रापासून झालेल्या मालास, इतर तशाच धंद्यांत यंत्राशिवाय होणाऱ्या मालाला लागणाऱ्या श्रमापेक्षां कमी श्रम लागतात. पण मालाचें मूल्य जें ठरतें तें सामाजिक दृष्ट्या आवश्यक श्रमावरून ठरतें. प्रस्तुत मालाचें बाबतींत ( उत्पादनाच्या कामीं अमलांत आणलेलें यंत्र हें सर्वत्र रूढ झालेलें नसल्यामुळें ) यंत्राशिवाय केलेल्या मालावर झालेलें जे श्रम तेच यंत्रोत्पन्न

मूल्य ठरवितात. आणि म्हणून एकट्याच या यंत्रापासून झालेला माल त्याच्या ठिकाणीं असलेल्या मूल्याहून पुष्कळच अधिक किंमतीस विकला जातो. असें एकटेंच यंत्र आल्यापासून त्या जातीचीं यंत्रें सर्वत्र रूढ होईपर्यंतच्या संक्रमण काळांत हें यंत्र वापरणें हीं एक प्रकारची हक्कदारी होते. म्हणून त्यावर मिळणारा नफा हा अपवादात्मक असतो. आणि म्हणून पहिल्या प्रेमाचें हें पहिलें उन्ह कामाचा वेग जास्तींत जास्त वाढवून भांडवलदार जास्तींत जास्त उपयोगांत आणतो. नफ्याचे डोळ्यासमोर दिसणारे ढीग, त्याची नफ्याची क्षुधा अधिकाधिक भडकवीत असतात.

## चर भांडवलांत घट

यंत्राचा उपयोग अमुक एका धंद्यांत सार्वत्रिक होऊं लागला म्हणजे त्यापासून होणाऱ्या मालाचें सामाजिक मूल्य त्याच्या वैयक्तिक मूल्याच्या पातळीइतकें खालीं उतरतें. आणि मग यंत्रानें निरुपयोगी ठरविलेल्या श्रमपद्धतींतून वाढावा उत्पन्न न होता यंत्रावर केलेल्या श्रमांतूनच वाढावा निर्माण होतो हा सिद्धांत खरा ठरूं लागतो. वाढावा हा चर भांडवलापासून म्हणजे जिवंत श्रमशक्तीपासूनच निर्माण होतो, म्हणून भांडवलाच्या ज्या शाखेंत मजूरांची संख्या जास्त असते तेथें वाढावा जास्त निर्माण होतो, आणि ज्या शाखांत मजूरांची संख्या कमी असते त्यांत वाढावा कमी निर्माण होतो. पण यंत्राचा हेतु जिवंत श्रम म्हणजे मजूर कमी करून त्यांची जागा यंत्रानें घेणें हा असतो. यंत्रामुळें उत्पादनशक्ति वाढते, आणि माल स्वस्त होतो. कारण यंत्रोत्पन्न मालाच्या उत्पत्तींत श्रम कमी खर्च होतात. यामुळें माणसांच्या राहणीचा खर्च उतरतो; त्यामुळें श्रमशक्तीचें मूल्यहि उतरतें. पण हा सर्व परिणाम अमूक एका कारखान्यांतील मजूरांची संख्या कमी

करण्यानें होत असतो. किंवा वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे मजूरी देण्यासाठीं खर्च होणाऱ्या पूर्वींच्या चर भांडवलापैकीं कांहीं भाग यंत्रांची खरेदी व त्यांचा वापर यांत खर्चावा लागतो. म्हणजेच चर-भांडवलांतून कांहीं भाग काढून वाढावा उत्पन्न न करणाऱ्या स्थिर भांडवलांत तो घालावा लागतो. एक उदाहरण घेऊन याचा खुलासा करूं. यंत्राचा उपयोग होऊं लागण्यापूर्वीं २५ हजार डॉ. भांडवलापैकीं ४०% भांडवल मजूरांचीं हत्यारें व कच्चा माल यांत खर्च होई. व बाकीचे ६०% मजूरीकडे खर्च होई. यंत्राचा उपयोग होऊं लागल्यानंतर कारखान्याची उत्पादनशक्ति तिप्पट झाली. यामुळें मजूरांची मजूरी एकंदर भांडवलाच्या २०% पर्यंत उतरली आणि $\frac{२}{३}$ मजूर काढून टाकण्यांत आले. या काढून टाकलेल्या मजूरांच्या मजूरीइतकें भांडवल आतां यंत्रें व कच्चा माल यासाठीं अधिक खर्च होऊं लागलें.

## यांत्रिक उत्पादनांतील अंतर्विरोध

तथापि २४ मजूरांकडून जितका वाढावा निर्माण करून घेतां येईल तितका वाढावा २ मजूरांकडून, त्यांना कितीहि पिळलें तरी निर्माण होऊं शकणार नाहीं. या २४ माणसांपैकीं प्रत्येकानें जर आपल्या वरकड श्रमाचा १ तास १२ तासांनंतर मालकास दिला तर २४ माणसें २४ तासांचे वरकड श्रम मालकाला देतील. हे २४ तास हे २ माणसांचे सर्व श्रम होत. म्हणून वाढावा निर्माण करण्यासाठीं यंत्राचा उपयोग करण्यामध्यें या उपयोगांतच अंगभूत असा एक अंतर्विरोध उत्पन्न होत असतो. कारण यंत्रांचा हेतु व उपयोग मजूराकडून अधिक वाढावा मिळविणें हा असतो, पण उलट मजूरांची संख्या कमी केल्यावांचून वाढावा वाढूं शकत नाहीं. या अंतर्विरोधामुळेंच भांडवलदाराला, कमी केलेल्या मजूरांच्यामुळें वाढाव्याचें जें नुकसान होतें तें नुकसान

कामावर असलेल्या मजूराकडून भरून काढण्याइतका वाढावा अधिक मिळवण्यासाठीं कामाच्या दिवसाची वाढ अतिशयच करावी लागते. अर्थात असें करतांना तो हें हेतुपुरःसर करीत असेल असेंच नाहीं.

## आर्थिक विरोधाभास

भांडवलदारांनीं यंत्राचा उपयोग सुरूं केल्यामुळें कामाचा दिवस वाढवण्याला त्यांना नवें व बलवान लोभकारण उत्पन्न होतें आणि या प्रवृत्तीला येणारा अडथळा मोडून काढला जाईल अशा प्रकारें श्रमपद्धति बदलते. त्याबरोबरच अंशतः, मुलें व स्त्रिया यांना नोकरीवर नेमून आणि अंशतः यंत्राच्या उपयोगामुळें मजूरांना हाकलून देऊन, यंत्र हें समाजांत मजूरांची गरजेहून अधिक लोकसंख्या उत्पन्न करतें. यामुळें मजूरांना भांडवलाच्या सुलतानीपुढें निमूटपणें मान तुकवावी लागते. आणि म्हणून उद्योगधंद्यांच्या आधुनिक इतिहासांत श्रमदिवस वाढविण्याच्या कामीं कोणताही नैतिक अथवा नैसर्गिक असा येणारा अडथळा नष्ट केला जाण्याचा विलक्षण देखावा दृष्टीस पडतो. तसेंच यंत्र हें श्रमाचा वेळ कमी करण्याचें जें अतिशय बलवान साधन तेंच मजूर आणि त्याचें कुटुंबीय यांच्या आयुष्यांतला प्रत्येक क्षण, भांडवलदाराचें मूल्य वाढविण्यासाठीं, त्याच्या हवालीं करतें हा आर्थिक विरोधाभास प्रत्ययास येत असतो.

## वेळवाढीचा प्रचंड वेग

यंत्रांचा उपयोग आणि आधुनिक उद्योगधंदे यांचा उपयोग १८ व्या शतकाच्या शेवटल्या ३० वर्षांत होऊं लागल्यापासून श्रमदिवस वाढविण्याचा वेग डोंगरावरील प्रचंड शिळा जेवढ्या वेगानें खालीं यावी तितक्या जलद वाढूं लागला. कोणतेंहि नैतिक व नैसर्गिक

अडथळे, मजूराचें वय अथवा लिंग, दिवस अथवा रात्र या सर्वांचीं बंधनें इतकीं विस्कळित झालीं कीं १८६० मध्यें एका इंग्लिश जज्जाला दिवस कोणता आणि रात्र कोणती याचा निर्णय ठरवतांना फारच अक्कल खर्चावी लागली. " १८३३ त कारखान्यांचा कायदा होण्यापूर्वी ल्हान मुलांना सगळा दिवस सगळी रात्र, अथवा दिवसां व रात्रींही राबवून घेतलें जाई. " ( फॅक्टरी इन्स्पेक्शन रिपोर्ट ३० एप्रिल १८६० )

आतां आपण उद्योगधंद्यांच्या ज्या शाखांत मजूरांच्या पिळणुकीवर सध्यां ( १८६३-६५ ) कांहींच बंधन नाहीं, अथवा कालपरवापर्यंत बंधन नव्हतें अशा शाखांकडे वळूं.

## माणुसकीचा दगड झाला

१४ जानेवारी १८६० रोजीं नॉटिंगहॅम असेंब्ली रूम्समध्यें भरलेल्या सभेचा अध्यक्ष कौंटी मॅजिस्ट्रेट मि. बौढन् चार्लटन् आपल्या अध्यक्षीय भाषणांत म्हणाला, " फितीच्या ( लेस ) धंद्यांत उपासमार आणि यातना कांहीं लोकांना इतक्या भोगाव्या लागतात कीं सुधारलेल्या जगांत त्याला तोड नाहीं. ९।१० वर्षांच्या मुलांना त्यांच्या घाणेरड्या बिछान्यांतून पहाटे २।३ अथवा ४ वाजतां ओढून काढून १०।११ अथवा १२ तासापर्यंत काम करण्याची सक्ती केली जाते. त्यांचीं गात्रें गलित होतात, शरीर हेलपाटूं लागतें, चेहरे फिके पडतात. आणि त्यांच्या ठिकाणची माणुसकी दगडासारखी शून्य होऊं लागते. खरोखर ही परिस्थिति मनांत आणणेंहि भयंकर आहे......ज्या शहरांत माणसांचे कामाचे तास रोज १८ तासाइतके कमी करावेत असा अर्ज करण्यासाठीं सभा भरते त्या शहराबद्दल लोक काय म्हणताल ? " ( डेली टेलिग्राफ् १५ जानेवारी १८६० ) गेल्या २२ वर्षांत ( १८६० पूर्वीं ) स्टॅफोर्डशॅयर येथील भांडीकामाच्या

धंद्याची पार्लमेंटनें तीनदां चौकशी केली. सध्यां मी १८६० व १८६३ या सालांतल्या रिपोर्टांतूनच, पिळून घेतल्या जाणाऱ्या मुलांच्या कांहीं साक्षी सांगतो. मुलांच्या या साक्षीवरून, मोठीं माणसें आणि मुख्यतः मुली व स्त्रिया यांच्या परिस्थितीसंबंधानें, आणि ज्या धंद्याशीं तुलना करतां कापूस कातण्याचा धंदा हाही अतिशय आरोग्यकारक व सुखकारक धंदा ठरेल अशा रोगट व तापदायक धंद्यासंबंधानें कांहींशी कल्पना येईल.

## वय ९ वर्षें, काम १५ तास

वुइल्यम् वुड वय वर्षें ९; कामावर लागला तेव्हां ७ वर्षें १० महिन्यांचा होता. साच्यांत घातलेलीं भांडीं तो वाळवण्याच्या खोलीकडे नेई आणि तेथें भांडीं काढून साचे परत आणी. रोज सकाळीं ६ ला कारखान्यांत कामाला येई आणि रात्रीं ९ ला काम संपवून जाई. " मी आठवड्यांतून ६ दिवस रात्रीं ९ पर्यंत काम करतों. ७।८ आठवडे मी सतत असें करतों आहें. " ९ वर्षांच्या मुलाला रोज १५ तास काम! जे. मरे वय वर्षें १२; " मी चाक फिरवतो आणि सांचे चालवतो, सकाळीं ६ ला केव्हां केव्हां ४ ला ही येतो. काल सबंध रात्र व आतां सकाळीं ६ वाजेपर्यंत मीं काम केलें. परवा रात्रींपासून माझी पाठ आंथरुणाला लागली नाहीं, काल रात्रीं ८।९ मुलें काम करीत होतीं. त्यांपैकीं एका खेरीज बाकी सर्व जण पुन्हां कामास आले आहेत. मला ३ शि. ६ पे. मिळतात. रात्रीं काम करण्याबद्दल मला कांहींच मिळत नाहीं. गेल्या आठवड्यांत मी २ रात्रीं काम केलें. "

## वंश खुरटला

डॉ. ग्रीनहाऊ सांगतो कीं स्टोक ऑन् ट्रेंट आणि वुल्स्टँटन् या भागांतील भांड्याच्या धंद्याच्या क्षेत्रांत सरासरी आयुर्मर्यादा अतिशय

थोडी आहे. स्टोक् जिल्ह्यांत ३६·६% आणि वुल्स्टूँटन् जिल्ह्यांत ३०·४% २० वर्षांवरील प्रौढ माणसें कामावर लावलीं जातात. त्यांपैकीं स्टोक जिल्ह्यांतली निम्मीं माणसें आणि वुल्स्टूँटन् जिल्ह्यांतली मरणाऱ्यांपैकीं $\frac{२}{५}$ माणसें—जीं भांड्याच्या धंद्यांत असतात तीं—फुफ्फुसाच्या रोगानें मेलेलीं आहेत. हॅन्ले येथील डॉ. बूथराईड हा धंदेवाईक डॉक्टर लिहितो: “ भांडीं करणाऱ्या मजूरांच्या पिढ्या उत्तरोत्तर खुजा व दुर्बल होत चालल्या आहेत. ” मि. मॅक्बीन् हा दुसरा एक डॉ. लिहितो. “ २५ वर्षांपूर्वी मीं धंदा सुरू केला त्या-वेळीं असलेल्या परिस्थितीच्या मानानें आतां कामगारांची उंची आणि रुंदीही कमी झालेली दिसून येतें. ” डॉ. ग्रीनहाऊच्या १८६० मधील रिपोर्टमधून हीं विधानें घेतलीं आहेत.

## भांडी कामांतील रोगटपणा

१८६३ मधील कमिशनरांच्या रिपोर्टांत पुढील माहिती आहे. नॉर्थ स्टॅफोर्डशायर इन्फरमरीचा सीनिअर फिजिशियन डॉ. जे. टी. ऑरलीज् लिहितो: “ भांडीं-कामगारांचा सगळा वर्गच्या वर्ग, स्त्रिया आणि पुरुष दोघेहि शारीरिक आणि नैतिक दृष्टीनें ऱ्हास पावलेला दिसतो. ते खुजे झाले आहेत, त्यांच्या शरीराचा आकार वाईट आहे, छाती कुरूप आहे, ते अकालीं वृद्ध होतात, आणि खरोखर फार लवकर मरतात. त्यांच्या शरीरांतले रक्त नाहींसे झालेले असतें, अपचनाच्या व्यथेनें शरीर दुर्बल होतें, पित्ताशय आणि मूत्राशय हीं बिघडलेलीं असतात. न्यूमोनिया, थायसिस, ब्रॉकायटिस, दमा वगैरे छातीचे रोग त्यांना झालेले असतात. भांडीं-कामगारांचा दमा अथवा भांडीं-कामगारांचा क्षय म्हणून एक विशिष्ट रोगच त्यांच्यांत उत्पन्न झालेला आहे. गलग्रंथी, हाडें, अथवा शरीराचें इतर भाग यावर क्षयासारखा

एक विशिष्ट प्रकारचा रोग जवळ जवळ $\frac{2}{3}$ भांडी-कामगारांना जडलेला असतो.....या लोकांत याहून अधिक रोगराई पसरलेली नाहीं. याचें कारण शेजारच्या मुलुखांतून वरचेवर नवीं नवीं माणसें आणलीं जातात. आणि निरोगी अशा जमातीशीं या लोकांचे विवाहसंबंध होतात हें होय."

## मुलांच्या आरोग्याचा होम

वरील संस्थेचा माजी हौससर्जन मि. चार्ल्स पीअरसन कमिशनर लॉंज याला लिहिलेल्या पत्रांत सांगतो, "आकड्यांच्या पुराव्यावरून नव्हे तर समक्ष पाहिल्यावरून सांगतो कीं आईबाप अथवा मालक यांच्या धनलोभाचें समाधान करण्यासाठीं गरीब बिचाऱ्या मुलांच्या आरोग्याचा होम चालवलेला पाहून माझा संताप पुनःपुन्हां भडकला आहे." त्यानें भांडी-कामगारांच्या रोगांची चिकित्सा करून त्यांच्या कारणांची एक यादी दिली आहे. आणि सर्व कारणांचा समारोप करतांना 'श्रमाचे दीर्घतास' हें या सर्व कारणांचें सार आहे असें तो सांगतो. इंग्लंडांतील भांड्याच्या धंद्यासंबंधानें असलेली ही वस्तुस्थिति स्कॉटलंडमधील या धंद्यासंबंधानेंही इतकीच खरी आहे.

## कारखान्यांतील 'इन्फरनो'

१८३३ सालीं काडीला फॉस्फरस लावून आगकाड्या करण्याचा शोध लागला. तेव्हांपासून ल्यूसिफर काड्या करण्यांत येतात. १८४५ पासून इंग्लंडांत मुख्यतः लंडनच्या दाट वस्तीच्या भागांत आणि मँचेस्टर, बर्मिंगहॅम, लिव्हरपूल, ब्रिस्टल, नॉर्विच, न्यूकॅसल आणि ग्लासगो या शहरीं हा धंदा भराभर वाढत गेला. या धंद्याच्या वाढी-बरोबरच त्यांतील कामगारांत लॉकजॉ नांवाचा एक रोग बळावत गेला.

व्हीएन्नाच्या एका डॉक्टरानें हा रोग ल्यूसिफर मॅच कामगारांनाच होतो असा शोध लावला आहे. निम्मे कामगार १३ वर्षांखालील मुलें व १८ वर्षांखालील पुरुष असतात. हा धंदा त्याच्या रोगटपणामुळें आणि त्यांत घाण मारत असल्यामुळें इतका शिसारी आणणारा आहे कीं कामगारांतील फक्त अतिशय दरिद्री माणसें म्हणजे अर्धपोटी राहणाऱ्या विधवा वगैरे "आपली चिंध्या पांघरलेली अर्धपोटी आणि अशिक्षित मुलें" या धंद्यांत पाठवितात. १८६३ मध्यें कमिशनर व्हाईट यानें तपासलेल्या कामगारांपैकीं २७० माणसें १८ वयाखालील, ५० मुलें १० वयाखालील, १० मुलें ८ च वर्षांची आणि ५ मुलें तर ६ वर्षांचींच होती. कामाचे तास १२ पासून १४।१५ पर्यंत असत. रात्रीचें काम, भोजनाच्या अनियमित वेळा आणि फॉस्फरसनें भरलेल्या खोलींत जेवण हे प्रकार तेथें नेहमीं चालत. डँटेनें 'इन्फर्नो' काव्यांत वर्णन केलेल्या भयंकर परिस्थितीवर कडी करणारी परिस्थिति त्याला या कारखान्यांतून पहायला मिळाली असती.

कागदांचे पडदे करण्याच्या कारखान्यांत हलक्या दर्जाच्या कागदावर छापण्याचें काम यंत्रानें करण्यांत येई. उंची कागदावर तेंच काम हातानें करण्यांत येई. ऑक्टोबरच्या आरंभापासून एप्रिल अखेरपर्यंत कामाला विशेष जोर असतो. सकाळीं ६ पासून रात्रीं १० पर्यंत अथवा त्यानंतरही या ७ महिन्यांत अतिशय जलद व जोरदार काम चालतें.

## जेवणालाहि सुटी नाहीं

१८६२ त जी. ॲप्सडेन् साक्ष देतो: "माझा मुलगा ७ वर्षांचा असतां मी बर्फांतून त्याला खांद्यावर घेऊन कामावर पोंचवी व खांद्यावरून परत आणी. दिवसांतून १६ तास त्याला काम पडे....कित्येकदां तो यंत्रावर काम करीत असतांना मी गुढग्यावर उभा राहून

त्याला भरवीत असे. जेवण्यासाठींही त्याला कारखाना सोडतां येत नव्हता अथवा काम थांबवणें शक्य नव्हतें." मँचेस्टरमधील एका कारखान्याचा भागीदार—व्यवस्थापक स्मिथ हा लिहतो : "आम्ही (आम्हीं म्हणजे 'आमच्या'साठीं राबणारे मजूर) जेवणासाठींहि न थांबतां सतत काम करतों. म्हणून आमचें काम दुपारीं ४॥ लाच संपतें. त्यानंतरचा कामाचा वेळ हा जादा कामाचा असतो." (याचा अर्थ स्मिथ हा स्वतःहि १० $\frac{1}{2}$ तासांत जेवत नसेल काय?) "आम्ही (स्मिथ लिहितो) संध्याकाळीं ६ वाजण्यापूर्वीं बहुधा काम थांबवत नाहीं....मुलें आणि मोठी माणसें (१५२ मुलें व १४० प्रौढ माणसें) या सर्वांना गेल्या १८ महिन्यांत दर आठवड्यास ७ दिवस ५ तास अथवा ७८ $\frac{1}{2}$ तास काम पडलें आहे. चालू म्हणजे १८६३ सालीं मेच्या २ ता. स संपलेल्या ६ आठवड्यांत आठ दिवस अथवा ८४ तास काम पडलें." तरी हाच स्मिथ म्हणतो कीं "यंत्राचें काम हें कांहीं भारी काम नव्हे." उलट ब्लॉक प्रिंटिंगच्या धंद्यांतील मालक म्हणतात "हातानें करण्याचें कामहि यंत्राहून अधिक आरोग्यदायक असतें." एकंदरींत जेवणाच्या वेळेपुरतेंहि काम थांबण्याच्या सूचनेबद्दल कारखानदारांना अतिशय संताप येतो.

## रेल्वेला अपघात कां झाला

१८६६ च्या जानेवारींत लंडन कोरोनोरच्या ज्यूरीपुढे एक गार्ड, एक एंजीन ड्रायव्हर आणि एक सिग्नलमन् असे ३ रेल्वे कामगार उभे होते. रेल्वेचा एक फार मोठा अपघात होऊन शेकडों माणसें परलोकीं गेलीं होतीं. कामगारांनीं केलेली हेळसांड हें या अनर्थाचें कारण होते. तीघेहीजण एक सुरांत ज्यूरीला सांगत होते कीं "१०-१२ वर्षांपूर्वीं आम्हाला ८ तास काम करावें लागे. गेल्या ५-६ वर्षांत १४

१८, २० तासपर्यंत वेळ वाढविण्यांत आला. सुटीवर हिंडणारे प्रवासी आणि सहल करण्याकरतां जाणाऱ्या गाड्या यांच्या बोजामुळें ४० ते ५० तास अखंड काम आम्हांला करावें लागलें. आम्ही सामान्य माणसें आहोंत, आम्ही कांहीं सायक्लॉप्स् नव्हे. कांहीं एका वेळानंतर आमची श्रमशक्ति खुंटतेच, पेंग येतो, मेंदू विचार करीनासा होतो, डोळा पाहीनासा होतो." सन्मान्य ब्रिटिश ज्यूरीनें त्यांना खुनादाखल शिक्षा केली. आणि "भांडवलदारांनीं पुढील काळांत पुरेशी श्रमशक्ति खरेदी करावी, स्वतः चैन थोडी कमी करावी, अधिक स्वार्थत्याग दाखवावा, अधिक काटकसर करावी, आणि अशा रीतीनें पगारी मजूरांची पिळवणूक थोडी कमी करावी अशी सदिच्छा व्यक्त केली.*

---

* 'रेनॉल्ड्स् न्यूजपेपर' २० जानेवारी १८६६; दर आठवड्यास या पत्रांत मोठें क्षोभक मथळे घालून रेल्वेस घडलेल्या अनर्थांची यादी दिली जाई. यासंबंधानें नार्थ स्टॅफोर्डशायरचा एक मजूर लिहितो: "रेल्वेचा ड्रायव्हर आणि एंजिनांतला फायरमन हे दोघे जर सतत सावध नसतील तर काय अनर्थ घडेल हें कोणालाहि माहीत आहे. जो माणूस २९ ते ३० तास उघडया हवेवर विसाव्यावांचून काम करतो त्याचा सावधपणा अखेरपर्यंत टिकेल अशी अपेक्षा तरी कशी करावी? नेहमींच घडणाऱ्यापैकीं एक उदाहरण येथें देतो. एका फायरमननें सोमवारीं भल्या पहाटे काम सुरू केलें. ज्याला १ दिवसाचें काम म्हणतां येईल, इतकें काम त्यानें पुरें केलें त्यावेळीं १४ तास ५० मिनिटें इतकें त्याचें काम झालें होतें. पुढें चहा घेण्याइतकाहि वेळ मिळण्यापूर्वी त्याला पुन्हां कामावर बोलावण्यांत आलें...त्यानें २९ तास २५ मिनिटें अविश्रांत काम केलें. त्या सबंध आठवडयाचें त्याचें काम पुढीलप्रमाणें झालें:—बुधवार १५ तास, गुरुवार १५ तास ३५ मि., शुक्रवार १४ ता. ३० मि., शनवार १४ ता. १० मि., एकूण आठडयाचें त्याचें काम ८८ ता. ४० मि. झालें. या सर्व कामाकरतां त्याला फक्त ६ दिवसाचाच रोज मिळाला. यांत कांहींतरी चूक झाली असेल असें वाटून त्यानें '१ दिवसाचें काम म्हणजे

सर्व धंद्यांतल्या अनेक कामगारांतून टोप्या करणारा एक शिंपी, आणि लोखंडाचे घण मारणारा एक लोहार असे दोन कामगार आपण घेऊं. या दोघांच्या कामांत इतकी भिन्नता आहे कीं सर्वच माणसें भांडवलापुढें सारखींच लेखलीं जातात हें त्यावरून आपणांस कळून येईल.

## अतिश्रमानें मृत्यु

१८६३ च्या जूनच्या शेवटच्या आठवड्यांत 'केवळ जादा कामानें मृत्यू' अशा क्षोभक मथळ्याखालीं लंडनच्या दैनिकांतून एक पॅरिग्राफ आला होता. एका अतिशय मान्यता पावलेल्या दुकानाची मालकीण-एलिस् असें जिचें मोठें गोड नांव होतें-तिच्या हाताखालील २० वर्षे वयाची शिंपीण मेरी ॲनी वॉक्ले इच्या मृत्यूची ती हकीगत होती. पुनःपुन्हा सांगण्यांत येणारीच गोष्ट येथें पुन्हां सांगितलेली होती. ही मुलगी सरासरी रोज १० $\frac{1}{2}$ तास काम करी; आणि हंगामाच्या दिवसांत केव्हां केव्हां अखंडपणेंहि ३०।३० तास काम करी. तिची श्रमशक्ति थकव्यानें लुळी पडूं लागल्यास तिला थोडी कॉफी अथवा दारू देण्यांत येई. यावेळीं हंगाम अतिशय जोरांत होता. इंग्लंडांत नवीन आयात झालेल्या प्रिन्स ऑफ वेल्सच्या सन्मानासाठीं बड्या बड्या स्त्रियांचा मोठा नाच व्हायचा होता. त्या नाचासाठीं लागणारे भडक कपडे अगदीं डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्या घाईनें करायला हवे होते. मेरी ॲनी वॉक्ले हिनें सतत

आपण किती समजतां?' अशी अधिकाऱ्याकडे चौकशी केली. १३ तासांचा दिवस व ७८ तासांचा आठवडा असें त्याला उत्तर मिळालें. पण याहून अधिक म्हणजे १० ता. ४० मि. त्यानें जें काम केलें त्याचा पगार काय? असें म्हणून त्यानें बरीच हुजत घातली. तेव्हां शेवटी १० पेन्स देऊन त्याची बोळवण करण्यांत आली."

२६ $\frac{1}{2}$ तास काम केलें होतें. इतर ६० मुली तिच्याबरोबर सतत काम करीत होत्या. एका खोलींत ३० मुली काम करीत. प्रत्येक मनुष्याला श्वासोच्छ्वासास जितकी घनफूट जागा हवी त्याच्या $\frac{1}{3}$ घनफूट हवा त्या मुलींना मिळत होती. रात्रीं त्या मुली, कपडे ठेवण्यासाठीं निजण्याच्या खोलींत लाकडी फळयांच्या पडद्या घालून ज्या अगदीं लहान लहान जागा केल्या होत्या त्या प्रत्येकींत दोन दोन मुली निजत. हें शिंप्याचें दुकान लंडनमधील अतिशय सुधारलेलें दुकान मानलें जाई. मेरी वॉक्ले शुक्रवारीं आजारी पडली आणि रविवारीं मेली. पण आपलें काम न संपवतां ती मेली याचाच मॅडेम् हेली इला अचंबा वाटला. मि. केनिस् हा डॉक्टर तिला पाहण्यास फार उशीरा आला. कॉरोनरच्या ज्यूरीपुढील साक्षींत तो म्हणतो “ मेरी वॉक्ले कामाच्या खोलींत अतिशय गर्दी असतां तींमध्यें फार वेळ काम करून मेली. खोलींत हवा येण्यास अतिशय थोडा वाव होता. ” या डॉक्टराला जणूं कांहीं सभ्यतेचा चांगला धडा शिकवण्यासाठीं ज्यूरीनें निर्णय दिलाः—“ रोगी ही ॲपॉप्लेक्सीनेंच मेली असून गर्दी असलेल्या खोलींत तिनें फाजील काम केल्यानें रोग फार तर बळावला असेल. ”

## स्वतंत्र धंद्यांतही उपासमार

लंडन-हॉस्पिटलचा एक सीनिअर फिजिशियन डॉ. रिचर्ड्सन सांगतोः “ सर्व तऱ्हेच्या शिंपी कामाच्या स्त्रियांना तीन प्रकारचीं दुःखें आहेतः फाजील काम, अपूर्ण हवा, आणि वाईट अन्न अथवा वाईट पचनशक्ति हीं तीं दुःखें होत....पण या धंद्यांतील सर्वांत वाईट गोष्ट ही आहे कीं विशेषतः लंडनमध्यें या धंद्यांत हक्कदारी निर्माण झाली असून केवळ २६ भांडवलदारांच्या हातीं हा धंदा एकवटला आहे. या भांडवलदारांच्या शक्तीचा दुष्परिणाम सर्व

स्वतंत्र स्त्री-शिंपिणीवर होत असतो. एखाद्या शिंपिणीला जर थोडेसें गिऱ्हाईक मिळालें तर तें कायम ठेवण्यासाठीं चढाओढ इतकी तीव्र करावी लागते कीं घरांत जीव जाईपर्यंत तिला काम करावें लागतें. आणि हेंच फाजील काम तिला मदत करणाऱ्या एखाद्या मैत्रिणीवरहि लादावें लागतें. जर अशा रीतीनें स्वतंत्र धंदा तिला करतां आला नाहीं तर तिला एखाद्या भांडवलदाराच्या दुकानांत नोकरी करावी लागते. तेथें तिला काम कमी असतें असें नव्हे, पण तिची मिळकत निश्चित होतें. अशा परिस्थितींत ती निव्वळ गुलाम होते. सामाजिक परिस्थितींत होणाऱ्या बदलाबरोबर तिचीही फेकाफेक होते. घरांत एका लहानशा खोलींत अर्धवट किंवा पूर्ण उपासमारीनें रहावें, नंतर १५।१६ किंवा अरेरे ! केव्हां १८ तासहि दररोज काम करावें, काम करतांना भोंवतालची हवा तर केवळ असह्य असते. आणि अन्न चुकून चांगलें मिळालें तरी चांगली हवा न मिळाल्यामुळें तें पचूंच शकत नाहीं. अशा माणसावर केवळ वाईट हवेनें होणारा क्षय हा रोग चरत असतो." ( डॉ. रिचर्डसन : "वर्क अँड ओव्हर वर्क इन्" सोशल सायन्स रिव्ह्यू " १८ जुलै १८६३ )

## लोहाराचा धंदा

हाच रिचर्ड्सन् पुढें लिहितो, "केवळ शिंप्यांच्या खोल्यांतच जीव जाईपर्यंत काम करण्याची पद्धत आहे असें नव्हे, हजारों जागा अशा आहेत. "भरभराटलेला धंदा" जेथें जेथें चालतो अशा प्रत्येक जागीं हीच परिस्थिति आहे....नमुना म्हणून आपण लोहाराचा धंदा घेऊं. कवींचें म्हणणें जर खरें मानलें तर लोहारासारखा सहृदय, आनंदी, दुसरा कोणीहि माणूस नाहीं. तो सकाळीं लवकर उठून सूर्याच्याहि आधीं आपल्या ठिणग्या उडवतो. इतर कुणालाहि शक्य

होत नाहीं अशा आनंदानें तो खातो, पितो आणि झोपतो. नेमस्त काम तो करीत असून शारीरिक दृष्टया पाहिलें तर माणसाला मिळणाऱ्या उत्कृष्ट परिस्थितींत तो असतो. पण आपण त्याच्या मागोमाग आतां एखाद्या शहरांत जाऊं; त्या मजबूत माणसावर कामाचा किती ताण पडतो आणि त्यांच्यांत मृत्यू तरी किती अधिक घडतात ! मेरीलेबोनमध्यें दरसाल शेकडा ३१ याप्रमाणें लोहार मरत असतात. एकंदर देशांत प्रौढ माणसांच्या मरणाची जीं सरासरी संख्या आहे तीहून ११ नें अधिक लोहारांच्या मरणाची संख्या असते. हा धंदा म्हटला तर माणसाच्या कलेचा स्वयंस्फूर्त नमुना म्हणून त्यांत आक्षेपार्ह कांहींहि नाहीं. मानवी धंद्याची शाखा या दृष्टीनेंही त्यांत कांहीं गैर नाहीं. पण केवळ तो फाजील प्रमाणांत करून त्याला माणसाचा विध्वंसक बनवलें आहे. तो रोज अमुक इतके घण मारूं शकतो, अमूक इतकीं पावलें चालूं शकतो, अमूक इतके श्वास टाकूं शकतो, आणि सरासरी, समजा, ५० वर्षें जगूं शकतो, तर अशा या माणसाला तूं तुझ्या शक्तीच्या सव्वापट घण मार, सव्वापट अधिक चाल, सव्वापट अधिक श्वासोच्छ्वास कर, आणि अशा रितीनें तुझ्या एकूण आयुष्याचा सव्वापट काम मला दे, असें त्याला सांगितलें जातें. तो तसे श्रम करतो, पण त्याचा परिणाम काय होतो ? कांहीं मर्यादित काळ सव्वापट काम केल्यामुळें तो ५० ऐवजीं ३७ व्या वर्षींच मरतो.

## (३) श्रमाची तीव्रता

भांडवलदाराच्या हातांत यंत्रें आल्यामुळें कामाचा दिवस जो अवास्तव वाढविला जातो त्याची प्रतिक्रिया समाजावर होत असते. सामाजिक जीवनाच्या मुळालाच यामुळें धोका उत्पन्न होत असतो. यामुळें पुढें कायद्यानें कामाच्या दिवसाची मर्यादा ठरविली जाते

आणि अशी ही मर्यादा ठरविली गेल्यानें मजूराकडून करून घ्यावयाचें काम अधिक तीव्र वेगानें करून घेण्यांत येऊं लागतें.

## वाढावा वाढविण्यासाठीं यंत्रांची सुधारणा

यंत्राच्या उपयोगासंबंधानें एक गोष्ट उघड आहे कीं यंत्राचा उपयोग जसजसा वाढूं लागतो आणि निरनिराळ्या शाखांत काम करणारीं माणसें, यंत्राच्या वापरांत वाकबगार होतात, तसतसा कामाचा वेग आणि त्याची तीव्रता आपोआपच वाढत जाते. यंत्राचा वापर अर्धे शतकपर्यंत इंग्लंडांत झाला तेव्हां, कामाचा दिवस जसा वाढला तशी त्याबरोबर कारखान्यांतील श्रमाची तीव्रताही वाढत गेली. तरीपण वाचकांच्या लक्षांत एक गोष्ट स्पष्टपणें येईल कीं जेथें काम मधून मधून व आकस्मिकपणें न चालतां सतत रोजच्या रोज एकसारखें चालत असतें, अशा कारखान्यांत कामाचा दिवस वाढवणें, व त्याची तीव्रताहि वाढवणें या क्रमांत असा एक बिंदू येतो कीं या दोन्ही गोष्टी पुढें एकदम करतां येत नाहींत. कामाचा दिवस वाढवायचा असेल तर तीव्रता कमी करावी लागते. आणि तीव्रता वाढवायची असेल तर कामाचा दिवस कमी करावा लागतो. कामगारांची बंडखोरवृत्ति हळू हळू वाढूं लागून पार्लमेंटला कामाचे तास जेव्हां सक्तीनें कमी करावे लागले आणि कारखान्यांना कामाचा दिवस कायद्यानें ठरवून द्यावा लागला त्यावेळीं कामाचा दिवस वाढवून अधिक वाढावा निर्माण करणें अशक्य झालें. तेव्हां कारखानदारांनीं वाढावा वाढविण्यासाठीं भराभर यंत्रांची सुधारणा सुरू केली.

## थोड्या वेळांत अधिक वाढावा

यानंतर आतां वाढावा वाढविला जातो तो केवळ माल स्वस्त करून आणि त्यायोगें मालांतील श्रममूल्य कमी करूनच वाढविला

जात नाहीं तर श्रम तीव्र करून, म्हणजे श्रमशक्तीला अधिक ताणून तो वाढविला जातो. अमुक एका वेळांत पूर्वींहून अधिक काम श्रमशक्तीकडून करून घेतलें जातें. पूर्वीं १२ तासांत जितकें काम होत असे, म्हणजे जितकी श्रमशक्ति खर्च होई तितकें काम अथवा तितक्या श्रमशक्तीचा खर्च आतां तीव्रपणें काम केल्या जाणाऱ्या १० तासांत होत असतो. म्हणून पूर्वींच्या १ तासांत झालेल्या कामापेक्षां आतांच्या १ तासांत झालेल्या कामांत १/५ मूल्य अधिक असतें. श्रमाची उत्पादनशक्ति वाढविली गेल्यामुळें सापेक्ष वाढावा भांडवलदाराला मिळतोच. पण शिवाय पूर्वीं वाढावा ४ तासांत मिळत होता तो आतां ३ १/३ तासांत मिळतो. आणि मजूराच्या पगाराइतकें मूल्य पूर्वीं ८ तासांत निर्माण होत असे तें आतां ६ २/३ तासांतच निर्माण होतें.

आतां येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं श्रमाची तीव्रता वाढविली जाते कशी?

## दिवस लहान करण्यानें शिस्त वाढली

कामाचा दिवस लहान करण्याचा एक परिणाम नैसर्गिक नियमानुसारच होत असतो. तो नियम म्हणजे श्रम जितके कमी वेळ असावेत तितकी श्रम करणाऱ्याची कार्यक्षमता अधिक होऊं शकते हा होय. एखादा मजूर जितका कमी वेळ काम करील तितका अधिक तीव्रतेनें तो काम करूं शकतो. यामुळें कांहीं मर्यादेपर्यंत, कामाचा दिवस कमी करण्यानें होणारें नुकसान श्रमशक्तीला अधिक ताणून भरून काढतां येते. कामगार खरोखर आपली श्रमशक्ति अधिक खर्च करीलच याची दक्षता पगार देण्याच्या पद्धतीनें घेतली जाते. काम देणें हा यांतलाच एक प्रकार आहे. भांडीं तयार करण्यासारख्या ज्या धंद्यांत यंत्राचा उपयोग जवळ जवळ होतच नाहीं अशा धंद्यांत

कारखान्यांचे कायदे लागू झाल्यामुळें कामाचे दिवस लहान होताच कामांत नियमितपणा, एकसारखेपणा, शिस्त, सातत्य, आणि मेहनत या सर्व गोष्टींची वाढ झाली असें सरकारी रिपोर्टांत म्हटलें आहे. पण यंत्रें असणाऱ्या कारखान्यांत, कामगारानें भांडवलदाराच्या अंकित असणें आणि यंत्राची गरज यामुळें आधींच कडक शिस्त निर्माण झाली होती. तेव्हां कामाचा दिवस कायद्यानें लहान केल्यामुळें हा परिणाम आणखी विशेष प्रमाणांत घडून आला कीं नाहीं हें संशयास्पद होतें.

## वेळ कमी झाला, काम वाढलें

१८४४ मध्यें जेव्हां कामाचा दिवस १२ तासाहून कमी करण्यासंबंधानें पार्लमेंटांत चर्चा झाली तेव्हां सगळ्या कारखानामालकांनीं कबूल केलें कीं आपल्या कारखान्यांतील निरनिराळ्या खोल्यांत जे देखरेख करणारे अधिकारी आहेत ते मजूरांनीं वेळ वाया घालवूं नये याची काळजी घेतात. मजूरांच्या अंगची दक्षता आतां वाढवणें जवळ जवळ अशक्य आहे. आणि म्हणून यंत्रांचाहि वेग वगैरे वाढवणें अशक्य आहे. कामगारांची दक्षता वाढवून यापुढें उत्पादन वाढवणें शक्य होणार नाहीं." हें त्या मालकांचें विधान प्रत्यक्ष प्रयोगानें खोटें ठरलें. रॉबर्ट गार्डनर यानें प्रीस्टन येथील दोन मोठ्या कारखान्यांत २० एप्रिल १८४४ पासून कामाचे तास १२ ऐवजीं ११ केले. परिणाम १ वर्षानंतर असा दिसून आला कीं पूर्वी इतक्याच खर्चांत पूर्वीइतकाच माल पदरांत पडला. आणि मजूरांना मजूरीहि तितकीच मिळाली. ( अंगावर सोपवलेल्या कामाची मजूरी कायम राहिल्यामुळें त्यांची आठवड्याची मजूरी त्यांनीं आठवड्यांत उत्पन्न केलेल्या मालावर अवलंबून होती. ) विणकामाच्या खात्यांत निरनि-

राळ्या प्रकारच्या तऱ्हांचें कापड विणलें जाई, तेथें कामाच्या परिस्थितींत कांहींही फरक करण्यांत आला नाही. “ १८४४ च्या ६ जानेवारीपासून २० एप्रीलपर्यंत १२ तासाच्या दिवसाप्रमाणें प्रत्येक मजूराला आठवड्यास सरासरी १० शि. १२ पे. ( २.५३ डॉ. ) मिळत. पुढें २० एप्रिलपासून २९ जूनपर्यंत १२ तासाच्या दिवसाप्रमाणें मजूराला दर आठवड्याला सरासरी मजूरी १० शि. ३ $\frac{1}{2}$ पे. ( २.५० डॉ. ) मिळाली. येथें आपण पूर्वी १२ तासांत उत्पन्न करीत होतो त्यापेक्षां ११ तासांत अधिक उत्पादन करूं लागलों. केवळ कामगाराला अधिक दक्षतेनें कामावर लावून आणि त्याच्या वेळाची काटकसर करून हा फायदा मिळवला. कामगारांना तितकीच मजूरी मिळून १ तास अधिक फुरसत मिळाली, तर भांडवलदाराला तितकाच माल पदरांत पडून कोळसा, गॅस व इतर अनेक वस्तू यांचा एक तासाचा खर्च कमी झाला. असेच प्रयोग हॉरॉक्स आणि जॅक्सन यांच्या कारखान्यांतहि यशस्वितेनें करण्यांत आले. ( १८४४ तील रिपोर्ट )

## यंत्राचा वेग वाढविण्याचे विविध प्रकार

वरील प्रयोगांत नैतिक भावनेनें महत्त्वाचें काम केलें. कारखान्याच्या चौकशी–अधिकाऱ्याला कामगार सांगतात, आम्ही अधिक उत्साहानें काम करतों. रात्रीं लवकर निघून जातां येईल हें बक्षीस आमच्या डोळ्यांपुढें दिसत असतें. सगळ्या गिरणींत चपळाईचें आणि आनंदाचें वातावरण असतें. अगदीं लहान मुलापासून तों म्हाताऱ्यापर्यंत सर्व हुरूपांत असतात. आम्ही एकमेकांना पुष्कळ मदत करूं शकतों. ’ कामाचा दिवस कमी करणें ही गोष्ट सक्तीची झाली म्हणजे अमुक त्याच वेळांत पूर्वीहून अधिक काम कामगाराच्या हातून पिळून घेण्याचें

भांडवलदारास यंत्र हें महत्त्वाचें साधन होऊन बसतें. दोन मार्गांनीं ही गोष्ट घडवून आणतां येते. एक यंत्राचा वेग वाढवून, आणि दुसरा मार्ग कामगाराला पूर्वींहून अधिक यंत्रें एकदम वापरण्यासाठीं देऊन.

वाफेच्या एंजिनांत दुरुस्ती झाल्यानें पट्ट्याचा वेग वाढला आहे. त्याबरोबरच गतिशक्तीची अधिक काटकसर करून त्याच एंजिनानें कमी कोळशावर अधिक यंत्रें चालविलीं जाणें शक्य होऊं लागलें आहे. शक्तिसंक्रामक यंत्रामध्यें सुधारणा झाल्यामुळें यंत्रें घासणें कमी झालें असून या एका बाबतींत आधुनिक यंत्रें हीं जुन्या यंत्राहून फारच वेगळीं दिसतात. चाक फिरविणाऱ्या दांड्याचा व्यास आणि त्याचें वजन एकसारखें कमी करण्यांत येत आहे, कार्यकारी यंत्राचा आकार कमी करून त्याचा वेग व त्याची कार्यक्षमता हीं वाढविण्यांत येत आहेत. यांत्रिक शक्तीवर चालणारा आधुनिक माग हा यांचेंच उदाहरण होय. कांहीं ठिकाणीं यंत्राच्या सांगाड्याचा आकार वाढविण्यांत आला आहे. पण त्याबरोबरच त्या यंत्रांतील काम करणारे भागहि वाढविण्यांत आले आहेत. आणि अदृश्य असे कित्येक तपशीलाचे भाग सुधारून त्या यंत्राचा वेगहि वाढविण्यांत आला आहे.

१२ तासाइतका दिवस कमी करणारा कायदा इंग्लंडांत १८३२ त झाला. १८३६ त एक कारखानदार लिहितो "पूर्वीपेक्षां म्हणजे ३०।४० वर्षांपूर्वींपेक्षां हल्लीं कारखान्यांत काम अधिक होतें याचें कारण कामावर लक्ष दिलें जातें आणि कामहि अधिक चपळाईनें होतें हें होय. यंत्राचा वेग वाढविला गेल्यामुळें हें अधिक लक्ष व ही अधिक चपळाई यांची आवश्यकता उत्पन्न झाली."

## पिळणुकीच्या वाढीचें मोजमाप

१८४४ मध्यें लॉर्ड ॲश्लेनें हौस ऑफ कॉमन्स्‌मध्यें कागदपत्रांच्या आधारावर पुढील भाषण केलें. " यंत्रांच्या सुरवातीस मजूर जितके श्रम करीत त्याच्या तिप्पट श्रम हल्लीं ते करतात. यंत्रांमुळें लक्षावधि माणसांच्या स्नायूंनीं करावयाचें काम उरकलें जात आहे हें खरें, पण यंत्राच्या भयानक हालचालींनीं ज्यांचें जीवन नियंत्रित होत आहे त्या मजूरांचें काम या यंत्रानीं कित्येकपट वाढविलें आहे. .... १८२५ मध्यें ४० नंबरी सूत कातणाऱ्या म्यूलच्या एका जोडीमागें फिरणाऱ्या माणसास एकूण ८ मैल फिरावें लागे; दिवस १२ तासांचा धरून हा हिशेब आहे. १८३२ त दोन म्यूल्सच्या मागून सूत कातण्यासाठीं धावणाऱ्याला २० मैल व केव्हां केव्हां अधिकही चालावें लागे. १८२५ त प्रत्येक म्यूलवर सूत कातणारा रोज ८२० ताण टाकी. एकूण दोन म्यूलवर १६४० ताण तो टाकीत असे १८३२ त त्याच सूत कातणाऱ्याला १ म्यूलवर २२०० म्हणजे २ म्यूलवर ४४०० ताण टाकावे लागत. आणि या प्रत्येक बाबतींत खर्च होणारे श्रम तर अतिशयच होत. १८४२ मध्यें माझ्याकडे एक कागद पाठविण्यांत आला होता, त्यामध्यें तक्रार होती ती अशी कीं, वरील प्रकारच्या कामांत चालण्याचें जें अंतर असतें तेंच केवळ वाढलें नसून मालाची निपजहि कित्येकपट अधिक होत आहे. आणि मालनिष्पत्तीच्या उलट प्रमाणांत माणसें कमी झालीं आहेत. शिवाय हल्लीं कामावर घेतला जाणारा कापूस हा हलक्या दर्जाचा व म्हणून अधिक तापदायक असतो. .... कापूस पिंजण्याच्या खोलीमध्यें काम खूप वाढलें आहे. पूर्वीं २ माणसांत वाटून दिलें जाणारें काम हल्लीं १ माणूसच करतो. .... विणण्याच्या खोलींमध्यें पुष्कळ माणसें कामावर लावलेलीं

असतात. त्यांत बऱ्याचशा स्त्रिया असतात. गेल्या १० वर्षांत यंत्राचा वेग वाढल्यामुळें कामाची १०% वाढ झाली आहे. १८३८ सालीं १८००० पेळूंचें सूत दर आठवड्यास काढीत. १८४३ त तें २१००० झालें १८१९ मध्यें दर मिनिटाला मागावर ६० टाके घेतले जात असत, १८४२ त तेवढ्याच वेळांत १४० टाके घेतले जाऊं लागले यावरून श्रमाची वाढ झाली हें उघड दिसून येतें.

१८४४ पर्यंतच यंत्रासंगतीनें मजूराकडून केल्या जाणाऱ्या श्रमाची तीव्रता इतकी पुष्कळ वाढली होती. अर्थात त्यावेळीं १२ तासांची दिवसाची मर्यादा ठरविणाऱ्या कायद्याला कारखानदारांनीं विरोध करतांना कामाची तीव्रता याहून अधिक वाढविणें अशक्य आहे, आणि म्हणून कामाचे तास कमी केले असतां उत्पादनच कमी होईल अशी त्यांनीं तक्रार केली ती समर्थनीय वाटण्यासारखी होती. पण पुढें १८४७ त इंग्लंडमधील कापूस, लोकर, रेशीम, वगैरेंच्या कारखान्यांत १२ तासांचा दिवस कमी करून १० तासांचा करण्यांत आला. त्यानंतरच्या परिस्थितीकडे आपण थोडी नजर टाकूं.

## कामाचा दिवस कमी झाला तरी—

“थ्रॉसलवरील चातीचा वेग मिनिटाला ५०० फेऱ्या आणि म्यूलवरील चातीचा वेग मिनिटाला १००० फेऱ्याइतका वाढला आहे. म्हणजे थ्रॉसल चातीचा वेग १८३९ त मिनिटाला ४५०० फेऱ्या होता तो १८६२ त ५००० फेऱ्या झाला. आणि म्यूल चातीचा वेग मिनिटाला ५००० फेऱ्या होता तो ६००० झाला. मँचेस्टर-जवळील पॅट्रिक्रॉफ्ट येथला प्रसिद्ध सिव्हिल एंजिनियर जेम्स नॅस्मिथ यानें १८५२ मध्यें लेनॉर्ड हॉर्नर याला एक पत्र लिहलें असून १८४८–५२ या काळामध्यें वाफेच्या एंजिनांत झालेल्या दुरुस्तींचें

स्वरूप काय याची माहिती दिली आहे. तो लिहतो. “पूर्वीच्याच वजनाच्या वाफेच्या एंजिनापासून आम्हांला आतां कमींत कमी ५०% अधिक काम मिळतें. आणि पुष्कळ एंजिनें पूर्वीचींच असूनहि पूर्वी ५० अश्वशक्ति देत असत तींच आतां १०० अश्वशक्ति देतात....” “पूर्वीच्या एंजिनाची रचना सुधारली आहे, बॉयलरची रचनाहि सुधारली आहे. एंजिनची कार्यशक्ति वाढविण्यांत आली आहे. त्यामुळें पूर्वीचे १०० अश्वशक्ति देणारें एंजिन कितीतरी अधिक अश्वशक्ति देतें.”.... “मजूरांची संख्या पूर्वीइतकीच ठेवण्यांत आली असली तरी वाढलेल्या यंत्रांच्या प्रमाणांत आतां ती कमी ठरते”.... “१८५६ मधील रिपोर्टावरून लक्षांत येतें कीं कारखानदारीचा वेग वाढतो आहे. अश्वशक्तीच्या प्रमाणांत पूर्वी जितके मजूर लावले जात तितकेच हल्लींहि लावले जातात. पण त्या मजूरांच्या प्रमाणांत यंत्रांची संख्या मात्र वाढलेली आहे. पूर्वीच्याच वाफेच्या यंत्राला शक्तीची काटकसर करून व इतर अनेक उपायांनीं पूर्वीपेक्षां अधिक वजनाचीं यंत्रें चालविणें शक्य होतें. यंत्रांत सुधारणा झाल्यामुळें, कारखानदारीची पद्धति सुधारल्यामुळें, यंत्रांचा वेग वाढल्यामुळें व अशाच इतर अनेक कारणांनीं कामाचें परिमाणहि अधिक वाढविण्यांत आलें आहे.”

## वेळ कमी तरी काम वाढलें

“प्रत्येक प्रकारच्या यंत्रांत जी सुधारणा करण्यांत आली आहे तीमुळें त्याची उत्पादनशक्ति वाढली आहे. कामाचा दिवस कमी केल्यामुळेंच या सुधारणेस उत्तेजन मिळालें यांत शंका नाहीं. यंत्रांत झालेली सुधारणा आणि मजूराच्या श्रमाचा वाढविलेला ताण यांच्या संयोगानें, $\frac{1}{6}$ कमी झालेल्या दिवसांत पूर्वीइतकेंच काम होत राहिलें इतकें तरी खास.” ( रिपोर्ट्स )

१८४४ पासून १८५६ पर्यंतच्या ८ वर्षांत कामाचा दिवस १० तासांचा झाल्यामुळें ब्रिटिश कारखान्यांची प्रगति खूप झाली तरी-पण १८५६-६२ या सहा वर्षांत हा प्रगतीचा वेग आणखी वाढला.

उदा. रेशमाच्या कारखान्यांत पुढीलप्रमाणें परिस्थिति होती.

| | चात्या | माग | मजूर |
|---|---|---|---|
| १८५२ | १०९३७९९ | ९२६० | ५६१३१ |
| १८६२ | १३८८५४४ | १०७०९ | ५२४२८ |

वरील आकड्यांवरून—

चात्यांची वाढ २६.९%

मागांची वाढ १५.६%

मजूरांची घट ७%

याप्रमाणें वाढ—घट झाली असल्याचें दिसून येते.

लोकरीचा धागा काढण्याच्या गिरणींत

१८५०.... .... ८७५८३० चात्या

१८५६.... .... १३२४५४९ चात्या ( ५१.२% वाढ )

१८६२............ १२८९१७२ चात्या ( २.७% घट )

—याप्रमाणें चात्या होत्या.

आतां १८५६ चात्यांची संख्या जवळ जवळ जी दुप्पट झाली आहे पण जी १८६२ सालीं मात्र वाढली नाहीं, ती वजा केल्यास आपणांस असें दिसून येईल कीं १८५६ सालीं चात्या जवळ जवळ तितक्याच राहिल्या उलट १८५० नंतर चात्या व माग यांचा वेग मात्र दुप्पट करण्यांत आला.

लोकरीचें सूत काढण्याच्या गिरणींत

| | वाफेचे माग | मजूर | १४ वर्षांखालील मुलें |
|---|---|---|---|
| १८५० | ३२६१७ | ७९७३७ | ९९५६ |
| १८५६ | ३८९५६ | ८७७९४ | ११२२८ |
| १८६२ | ४३०४८ | ८६०६३ | १३१७८ |

यावरून १८५६ पेक्षां १८६२ सालीं मागांची संख्या वाढली तरी मजूरांची एकूण संख्या कमी झाली. आणि मुलांची संख्या मात्र वाढली. ( फॅक्टरी इन्स्पेक्शन रिपोर्ट १८६२ )

## काम वाढलें तरी खर्च उतरला

२७ एप्रील १८६३ रोजीं ब्रिटिश पार्लमेंटांत केलेल्या भाषणांत मि. फेरँड म्हणतो: " लँकेशॉयर अँड चेशायर यांतील १६ जिल्ह्यातर्फे मी बोलत असून त्यांतील प्रतिनिधींनीं मला कळविलें आहे कीं यंत्रांच्या सुधारणेमुळें कामाचें परिमाण एकसारखें वाढतें आहे. पूर्वीं १ माणूस व २ मदतनीस मिळून २ माग चालवीत, आतां १ माणूस मदतनिसाशिवाय ३ माग चालवितो, व कांहीं ठिकाणीं ४ मागहि चालवितो. पुराव्यावरून सिद्ध केलेली वस्तुस्थिति अशी आहे कीं १२ तास हे आतां १० तासांत खेचून भरण्यांत आले आहेत. गेल्या १० वर्षांत कारखाना-कामगाराचे श्रम किती भयंकर प्रमाणांत वाढले आहेत हें स्पष्टपणें दिसून येतें."

हल्लीं म्हणजे १८६७ सालीं १ कोष्टी ६० तासांच्या १ आठवड्यांत कांहीं एका गुणाचे, लांबीचे व रुंदीचे कापडाचे २६ तुकडे २ वाफेच्या मागावर विणतो. एवढ्याच वेळांत जुन्या मागावर त्याला

४ तुकडेहि विणतां येत नसत. १८५० नंतर कापडाचा एवढा तुकडा विणण्याचा खर्च ६८ सेंटवरून ११ सेंटवर उतरला.

" ३० वर्षांपूर्वी ( १८४१ ) ३ धागे चालविणाऱ्या एका सूत कातणाऱ्या मजूराला ३०० ते ३२५ चात्या असलेल्या २ म्यूल्सवर काम करावें लागे. त्याच मजूराला आज ५ मदतनीस घेऊन २२०० चात्या चालवाव्या लागतात, आणि सातपटींहून अधिक सूत तो काढतो." ( फॅक्टरी इन्स्पेक्टर रिपोर्ट १८७२ ).

## श्रमाच्या तीव्रतेचा आरोग्यावर आघात

याप्रमाणें १८४४ व १८५० या सालीं कामाचे तास कमी करण्याचे जे कायदे झाले त्यामुळें फायदा झाला असें फॅक्टरी इन्स्पेक्टर प्रत्येक रिपोर्टांत सांगतात. तथापि श्रमाची तीव्रता त्यामुळें इतकी वाढविण्यांत आली कीं कामगाराचें आरोग्य व त्याची कर्तृत्व-शक्ति यास अपाय झाला आहे अशीही तक्रार ते करतात. "कापसाच्या लोकरीच्या व रेशमाच्या बहुतेक गिरण्यांत गेल्या कांहीं वर्षांत यंत्रांचा वेग अतिशय वाढविण्यांत आल्यामुळें तीं यंत्रें चालविण्यासाठीं कामगारांच्या वृत्ती अतिशय क्षुब्ध केल्या जातात. त्यामुळें कामगारांना थकवा यावा इतकी ती क्षुब्धता तीव्र असते. डॉ. ग्रीनहाऊ यांनीं अलीकडील आपल्या एका रिपोर्टांत फुफ्फु-साच्या रोगानें मरणाऱ्या कामगारांची संख्या वाढते असल्याचें लिहिलें आहे. या वाढत्या मृत्युसंख्येचें कारण कामगारांचा हा वाढविला जाणारा क्षोभ होय असें मला वाटतें." ( फॅक्टरी इन्स्पेक्शन रिपोर्ट १८६१ ) कामाचे तास वाढविण्यास बंदी झाली म्हणजे त्यामुळें भांडवलदाराचें होणारें नुकसान भरून काढण्यासाठीं श्रमाची तीव्रता वाढविण्याकडे भांडवलदाराची प्रवृत्ति असते. यंत्रांत सुधारणा करून

मजुरास पूर्णपणें पिळून काढण्याचें तें उत्तम साधन होईल असें तो करतो. यामुळेंच पुन्हां कामाचे तास कमी करणें अवश्य होतें यांत मुळींच संशय नाहीं.

## (४) बुद्धीची घट व अपघातांची वाढ

### हस्तव्यवसायी कसबाचा पाया उखडला

हस्तव्यवसायी कारखानदारीचा म्हणजे यंत्रहीन कारखानदारीचा विचार करतांना आपण पाहिलें आहे कीं मजूराच्या वैयक्तिक कर्तृत्वावर, हत्यार वापरण्याच्या त्याच्या चातुर्यावर त्या कारखानदारींतलें काम अवलंबून असे. आणि अर्थात मजूरांच्या कौशल्यांतील कमी-अधिकपणामुळें मजूरांमध्यें उच्चनीच श्रेणी निर्माण होत. तसेंच आपण असेंहि पाहिलें कीं ही प्राथमिक कारखानदारी व आधुनिक यांत्रिक कारखानदारी यांमधील फरक कामगाराच्या हातांतील हत्यार यंत्रांत अडकवलें जातें यामुळें उत्पन्न होतो. यांत्रिक उत्पादनांत कच्च्या मालाचें रूपांतर कामगार करीत नसून, तें रूपांतर यंत्राकडून केलें जातें. यंत्राच्या कार्यावर देखरेख ठेवणें एवढेंच कामगाराचें काम राहतें. हत्याराच्या कर्तृत्वावर मानवी श्रमशक्तीनें जी मर्यादा घातलेली असते ती मर्यादा आतां नाहींशी होते. हस्तव्यवसायी कारखानदारींत कामगार जितका वेळ हत्यार चालवील, जितक्या तीव्रतेनें व चातुर्यानें तें चालवील, व त्यासाठीं जितकी ताकद खर्च करील तितकाच परिणाम घडून येत असे. आधुनिक कारखान्यांत एक कामगार दुसऱ्या कामगाराची यंत्रावर देखरेख करण्याची जागा सहज घेऊं शकतो. आणि यंत्र हें कामगार झोपला असतां अथवा जेवत असतांहि चालू शकतें. म्हणून हस्तव्यवसायी कारखानदारींत वैयक्तिक कसबाच्या ज्या आधारावर श्रमविभाग निर्माण करण्यांत आला होता तो पायाच आंत उखडला जातो.

आणि म्हणून विशिष्ट कौशल्याच्या हस्तव्यवसायी कारखानदारींतल्या मजूरांच्या उच्चनीच श्रेणी नष्ट होऊन आपोआप चालणाऱ्या यंत्रांच्या कारखान्यांत यंत्रांची सेवा करणाऱ्या मजूराकडून केलें जाणारें प्रत्येक प्रकारचें काम हें सारखेंच आहे असें मानण्याची प्रवृत्ति निर्माण होते. कामगाराच्या कौशल्यानें निर्माण होणाऱ्या कृत्रिम फरकाऐवजीं वय अथवा लिंग यामुळे होणारे नैसर्गिक फरक तेवढे आतां लक्षांत घेतले जातात.

## सामाजिक उत्पादन विरुद्ध भांडवलदारी उत्पादन

केवळ धंद्याच्या स्वरूपाच्या दृष्टीनें पाहतां यंत्रांनीं जुन्या पद्धतीचा श्रमविभाग याप्रमाणें आतां नष्टच करून टाकला आहे. तरीपण परंपरागत संवय म्हणून अजून तो कायम राहतो. आणि नंतर आतां मजूरांना पिळून काढण्यासाठीं अगदींच घाणेरड्या प्रकारांत त्याचें रूपांतर केलें जातें. पूर्वीं जेथें एकच एक हत्यार मजूराला आयुष्यभर चालवावें लागत असे तेथें आतां मजूराला अगदीं लहान वयापासून आयुष्याच्या अखेरपर्यंत एखाद्या यंत्राचा लहानसा भाग बनविणें हा यंत्राचा खरोखर दुरुपयोग होय. यामुळें त्याच्या पुनरुत्पादनाचा ( वंश-वृद्धीचा ) खर्च कमी केला जातो. इतकेंच नव्हे तर त्याला एकंदर कारखान्यावर नाइलाजानें अवलंबावें लागून त्यामुळेंच भांडवलवाल्याचा तो पूर्णपणें गुलाम बनतो. आणि म्हणून सामाजिक उत्पादनपद्धतीच्या विकासामुळें वाढणारी मजूराची उत्पादनशक्ति आणि भांडवलदाराकडून होणाऱ्या पिळणुकीमुळें मजूराची वाढणारी उत्पादनशक्ति यामध्यें आपण नेहमींच फरक करीत राहिलें पाहिजे.

## यंत्रामुळें कामगाराचा नाश

वैयक्तिक हस्तव्यवसायांत व हस्तव्यवसायात्मक कारखानदारींत कामगार हा हत्यार वापरतो. पण यांत्रिक कारखान्यांत यंत्र हें काम-

गाराला वापरतें. हस्तव्यवसायांत श्रमाच्या हत्यारांची हालचाल कामगाराच्या हातून होते. यांत्रिक कारखान्यांत यंत्राच्या हालचालीमागून कामगारास धावावें लागतें. हस्तव्यवसायी कारखानदारींत कामगार हे एका जिवंत यंत्राचे जिवंत अवयव असतात. यांत्रिक कारखान्यांत कामगारांच्यापासून स्वतंत्र असें एक निर्जीव यंत्र असतें. त्या निर्जीव यंत्राचा कामगार हा जिवंत अवयव होत असतो. " यंत्राची पुनःपुन्हा जी तीच तीच हालचाल होत असते तिच्यामुळें दगदगीचें आणि त्रासाचें तेंच तेंच काम अतिशय दुःखदायक होऊन तें कधींहि न संपणारें असतें. हे श्रम सिसिफरससारखे होत. थकलेल्या कामगाराच्या अंगावर एखाद्या मोठ्या शिळेप्रमाणें श्रमाचें ओझें पडलेलें असतें " ( एंजल्स ) कारखान्यांतील या कामानें मज्जातंतूंची शक्ति खतम् होते, स्नायूंची अनेक प्रकारचें काम करण्याची शक्ति नाहींशी होते, व बौद्धिक आणि शारीरिक हालचालींचें स्वातंत्र्य अल्पांशहि राहात नाहीं. काम जें केलें जातें तो एक प्रकारें छळच होतो. कारण यंत्र हें उत्सुकतेनें करण्याचें सर्व काम कामगाराच्या हातून काढून घेतें. पण त्याला स्वातंत्र्य मात्र देत नाहीं. शारीरिक श्रम व उत्पादनाचें बौद्धिक सामर्थ्य यांचा वियोग आणि भांडवलाच्या मजूरावर होणाऱ्या वर्चस्वांत या बौद्धिक शक्तींचें होणारें रूपांतर या गोष्टी यांत्रिक कारखानदारी झाली म्हणजे अगदीं कळसास पोंचतात.

## यंत्र श्रेष्ठ, कामगार क्षुद्र

यांत्रिक कारखान्यामध्यें प्रत्येक कामगार हा त्या कारखान्यांत वापरण्यांत येणारें भौतिक-शास्त्रीय पद्धति, प्रचंड शक्ति आणि खूप मानवी श्रम या सर्वांपुढें अगदीं क्षुद्र ठरतो. त्याचें चातुर्य अगदींच क्षुल्लक होऊन जाते. यंत्रांची शक्ति हीच सर्व श्रमशक्तीचा सांठा होते.

आणि ही एकवटलेली सर्व शक्ति मिळून अखेर त्या मालकाची शक्ति होते. या मालकाच्या डोक्यांत यंत्र आणि त्यावरील आपली हक्कदारी ही अगदीं अभेद्यपणें ठाव देऊन बसलेली असतात. ज्यावेळीं कामगाराशीं मालकाचें भांडण होतें त्यावेळीं तो त्यांना तिरस्कारपूर्वक सांगत असतो कीं " हे कामगारांनो, तुमच्याच कल्याणासाठीं ध्यानांत ठेवा कीं, चातुर्याच्या दृष्टीनें तुमचें काम हें अगदीं क्षुद्र आहे. तुमचें काम हें कुणालाहि झटदिशी शिकतां येण्यासारखें आहे. त्याला याहून पगार अधिक कधींहि मिळणार नाहीं. कसल्याहि सामान्य माणसाला अगदीं थोडें शिक्षण दिलें कीं तें जलद व भरपूर शिकतां येईल असें आहे....माझीं यंत्रें हीं तुमच्या श्रमापेक्षां आणि तुमच्या कौशल्यापेक्षां उत्पादन कार्यांत अधिक काम करीत आहेत. तुमचें काम अगदीं सामान्य मजूराला ६ महिन्यांचें शिक्षण दिलें म्हणजे सहज करतां येईल." ( दि मास्टर्स स्पिनर्स अँड मॅन्युफॅक्चरर्स डिफेन्स फंड रिपोर्ट : मँचेस्टर १८५४ मागाहून आपणांस दिसून येणार आहे कीं कामगाररूपी जिवंत यंत्रें ज्यावेळीं गमावण्याचा प्रसंग येतो त्यावेळीं हा मालक वेगळेंच गीत गातो. )

श्रमाचीं जीं साधनें ( यंत्रें ) यांची हालचाल अगदीं एकसारखी होऊं लागल्यामुळें मजूर हा यंत्राचा अंकित होतो. काम करणाऱ्या मजूरामध्यें सर्व वयाच्या स्त्रिया व पुरुष असतात. या यांत्रिक उत्पादनामध्यें एक प्रकारची करडी शिस्त निर्माण होते. यांत्रिक कारखानदारींत ही शिस्त अधिकाधिक पूर्णतेस पोंचत असते. त्यामुळें प्रत्यक्ष काम करणारे मजूर आणि त्यांच्यावर देखरेख करणारे अंमलदार अशी विभागणी होते. जणू कांहीं औद्योगिक सैन्यांतील खाजगी सैनिक आणि सार्जंट अशीच ही विभागणी असते. " आपोआप चालणाऱ्या यंत्रांच्या कारखान्यांत पहिली अडचण आली ती माणसांना

शिक्षण देण्याची. हयगयीनें काम करण्याची संवय सोडून देऊन गुंतागुंतीच्या यंत्राशीं नियमितपणें व सतत एका पद्धतीनें काम करण्याची संवय कामगारांना लावणें अवश्य होतें." ही अडचण लवकरच दूर केली जाऊन शिस्त निर्माण केली गेली. पूर्वी गुलामांच्या मालकाच्या हातीं जो चाबूक असे त्याची जागा आतां देखरेख करणाऱ्या माणसाच्या हातीं असलेल्या दंडाच्या हिशेबाच्या वहीनें घेतली. सगळ्या शिक्षा या दंड अथवा मजूरींत काट याच स्वरूपाच्या होतात. आणि कारखान्यांतील कायदेशीर न्याय देणाऱ्या अधिकाऱ्याची बुद्धि मजूरांच्या प्रत्येक कायदेभंगामुळें शक्य तर कारखानदारांचा, कायदे पाळले जाण्यापेक्षां अधिक फायदाच व्हावा असे निर्णय देते.

## आयुष्यभरच्या छळवादाचा शाप

"भांडवलदारांनीं कफल्लक मजूरांना ज्या गुलामगिरींत टाकलें आहे ती कारखान्यांतल्याइतकी स्वच्छ प्रकाशांत दुसरी कोठेंच दिसून येत नाहीं. कायदा व वस्तुस्थिति या दोनहि दृष्टींनीं कामगाराचें सर्व स्वातंत्र्य संपुष्टांत येतें. कामगारानें साडेपांच वाजतां कारखान्यांत आलें पाहिजे, तो थोडीं मिनिटें जरी उशीरा आला तरी त्याला शिक्षा होते. दहा मिनिटें उशीरा आला तर त्याला न्याहारीचा वेळ होऊन जाईपर्यंत कारखान्यांत येऊं देण्यांत येत नाहीं. यामुळें त्याचा $\frac{1}{4}$ दिवसाचा रोज बुडतो. त्याचें खाणें, पिणें, झोपणें, सर्व हुकुमाच्या शब्दासरशीं व्हावें लागतें....ती सुलतानी घंटा त्याला अंथरुणांतून उठविते, न्याहारी करतां करतां आणि जेवतां जेवतां पानावरून उठविते. कारखान्यांत तरी त्याची काय परिस्थिति आहे? तेथें मालक हा कायदा सांगणारा सर्वाधिकारी असतो. त्याला हवे ते नियम तो करतो. खुषीस येईल त्याप्रमाणें नियम बदलतो अथवा वाढवितो. आणि त्यानें या नियमा-

मध्यें कितीहि मूर्खपणा केलेला असला तरी कोर्ट मजूराला म्हणतें ' तूं खुषीनें त्याच्याशीं करार केला आहेस, तुला तो पार पाडला पाहिजे '....कामगाराला नवव्या वर्षापासून मरेपर्यंत या मानसिक व शारीरिक छळवादांत राहण्याचा जणूं शापच मिळालेला असतो. " ( फ्रेड्रिक एंजल्स ).

## कारखान्यांतील परिस्थिति

हें कारखान्यांतील काम कोणत्या भौतिक परिस्थितीमध्यें केलें जातें याचा आपण येथें उल्लेख करूं. कारखान्यांतील वातावरण कृत्रिम तऱ्हेनें बनविलेलें असतें. त्यांत मनस्वी धूळ असते. कान बहिरे होतात, आणि जीविताला व अवयवांना त्या गर्दीनें भरलेल्या यांत्रिक कारखान्यांत धोका किती असतो हें तर सांगतां पुरवतच नाहीं. ठराविक काळानंतर कारखान्यांतील या 'युद्धां' त यंत्रामुळें मेले किती व जखमी झाले किती यांच्या याद्याच प्रसिद्ध होत असतात. सामाजिक धनोत्पादनसाधनांची काटकसर कारखान्याच्या कृत्रिम जगांत पूर्णतेला नेलेली असते. भांडवलदाराकडून केली जाणारी काटकसर कामावर असतांना कामगाराच्या जीवनास अवश्य अशा वस्तु म्हणजे अवकाश, उजेड, हवा वगैरे गोष्टींच्या चोरीचें रूप धारण करते. कामगाराच्या शरीरास जें संरक्षण द्यावयाचें त्यांत काटकसर केली जाते. उत्पादनाच्या कार्यांत ज्या अपायकारक गोष्टी असतात त्यांना प्रतिबंध करणें हें काटकसरीच्या नांवाखालीं टाळण्यांत येतें आणि कामगाराच्या सुखासाठीं ज्या गोष्टी करावयाच्या त्याहि काटकसरीच्या नांवाखालीं टाळल्या जातात.

## अपघातांचे नवीन प्रकार

कारखान्यांच्या कायद्यांनीं यंत्रांच्या धोक्याविरुद्ध कामगारांना संरक्षण देऊन कामगारांचा फायदा केला होता. " पण त्यावेळीं नसलेले

असे अपघाताचे प्रकार नंतर उत्पन्न झाले. यंत्रांचा वेग वाढला हें अपघाताचें नवें महत्त्वाचें कारण होय. चाकें, रूळ, चात्या, धोटे ह्या सर्वांना अधिकाधिक वाढत्या वेगांत गती दिली जाते. तुटलेला धागा उचलण्यासाठीं बोटें आतां अधिक जलद व चतुराईनें चालवावी लागतात. आणि हयगयीनें अथवा निष्काळजीपणानें बोटें वापरलीं तर तीं तुटलीं जातात........आपलें काम भराभर उरकण्याच्या नादांत कामगारांना बरेचसे अपघात होतात. कारखान्यांत यंत्रसामुग्री अविश्रांतपणें चालत राहून तिनें माल निर्माण करावा ही गोष्ट कारखानदाराच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाची आहे. एक एक मिनिट यंत्र थांबणें म्हणजे नुसतें यंत्रशक्तीचेंच नुकसान नव्हे तर धनोत्पादनाचेंहि नुकसान होतें. कामगारावरील अंमलदारांचें हित, काम जास्तींत जास्त करून घेण्यावर अवलंबून असतें. यंत्र सारखें चालू ठेवणें यांत त्यांचा फायदा असतो. आणि म्हणून ते मजूरांना सारखे ‘ हाल्या ’ ‘ हाल्या ’ करीत असतात. त्याचप्रमाणें ज्या कामगाराला कामाच्या वजनावर अथवा कोणत्या तरी मापावर मजूरी मिळते त्यालाहि यंत्र एकसारखें चालू ठेवणें हें हिताचें असतें. म्हणून जरी प्रत्येक कारखान्यांत यंत्रें चालू असतां यंत्रांची साफसूफ करूं नये असे कायदे असले तरीही बहुतेक कारखान्यांत यंत्रें चालू असतांना त्यांची साफसफाई केली जाते........केवळ याच कारणामुळें गेल्या सहा महिन्यांत ९०६ अपघात झाले........रोजच्या रोज यंत्रांची साफसफाई जरी एकसारखी होत असते तरी यंत्रांच्या पूर्ण साफसफाईसाठीं शनिवार राखून ठेवलेला असतो. पण त्या दिवशीची मोठी सफाई सुद्धां बहुतेक यंत्रें चालू असतांनाच केली जाते........या साफसफाईसाठीं मजूरांना पैसा मिळत नाहीं. म्हणून ते ती शक्य तितकी झटपट उरकतात. आणि म्हणूनच इतर कोणत्याहि दिवसापेक्षां शुक्रवारीं आणि मुख्यतः

शनिवारीं अपघात अधिक घडतात. शुक्रवारीं घडणारे अपघात पूर्वीच्यावारीं घडणाऱ्या अपघातांच्या दैनिक सरासरीहून जवळ जवळ शेंकडा १२ अधिक असतात. आणि शनिवारी पूर्वीच्या पांच दिवसांच्या सरासरीपेक्षां २५ % अधिक होतात. शनिवारचे कामाचे तास ७$\frac{1}{2}$ च असतात व बाकीच्या दिवसांचे कामाचे तास १०$\frac{1}{2}$ असतात; तर या हिशेबानें तुलना केली असतां शनिवारचे अपघात पूर्वीच्या दिवसांच्या सरासरीपेक्षां ६५% अधिक असतात असें म्हणावें लागेल. ( फॅक्टरी इन्स्पेक्शन् रिपोर्टः १८६६ )

## बोटें तुटणें हे क्षुल्लक

३१ ऑक्टोबर १८५५ रोजीच्या लेनार्ड हॉर्नर यांच्या अधिकृत रिपोर्टांतून मी आणखी एक उतारा देतों. "कांहीं गिरणीमालक कांहीं अपघातासंबंधानें बेजबाबदारपणें बोलतात असें मी ऐकतों. उदा. एखादें बोट तुटलें तर त्यांना तें क्षुल्लक वाटतें. कामगारांचें दैनंदिन जीवन व भविष्य हें त्यांच्या बोटावर इतक्या प्रमाणावर अवलंबून असतें कीं बोटें तुटणें ही कामगाराच्या दृष्टीनें अगदीं जिव्हाळ्याची बाब आहे. मी जेव्हां जेव्हां अशा तऱ्हेची अविचारी विधानें ऐकतों त्यावेळीं मी त्यांना प्रश्न विचारतों कीं समजा, तुम्हांला अधिक कामगारांची जरूरी आहे. दोन कामगार तुमच्यापुढें नोकरीसाठीं अर्ज घेऊन पुढें आले आहेत, पण त्यांपैकीं एकाचा आंगठा आणि पुढलें बोट हीं तुटलीं आहेत, तर या दोन कामगारांपैकीं तुम्हीं कोणता पत्कराल? या प्रश्नाचें उत्तर मात्र ते कारखानदार अगदीं मीं अपेक्षिलेलें तेंच निर्भिडपणें देत..." तथापि एक गोष्ट कबूल केली पाहिजे कीं कारखाना कायद्याच्या अमलाखालीं जास्तींत जास्त काळ जे कारखाने राहिले व त्यामुळें ज्यांना सक्तीनें कामाचा दिवस

कमी करावा लागला व इतरही अनेक नियम पाळावे लागले अशा कारखान्यांत पुष्कळसे जुन्या काळचे दोष नाहींसे झाले. यंत्राची सुधारणा होत गेली म्हणजे इमारतींची कांहीं एका मर्यादेपर्यंत सुधारणा करावीच लागते. आणि कामगारांना या परिस्थितीचा सहजच फायदा मिळतो. ( फॅक्टरी इन्स्पेक्शन रिपोर्ट ३१ आक्टोबर १८७३ )

## ( ५ ) रोज मजूरांची उपासमार

### श्रमविभागाचा फायदा

भांडवलदार आणि रोज-मजूर यांचे मधील कलह हा भांडवलाच्या जन्माइतकाच जुना आहे. श्रमविभागात्मक कारखानदारीच्या काळांत तो अखंडपणें चालू होताच. परंतु त्या श्रमविभागात्मक कारखानदारीसंबंधानें लिहणारे लेखक श्रमविभाग पद्धतीकडे मजूरांची उणीव भरून काढण्याचें एक साधन या दृष्टीनें पाहतात. मजूरांना हाकून लावण्याचें साधन या दृष्टीनें पहात नाहींत. इंग्लंडांत आज ज्या कापसाचें सूत म्यूलसच्या साहाय्यानें ५ लक्ष माणसें काढतात तितक्या कापसाचें सूत काढण्यास जुन्या हातराहाटांचे काळीं १० कोटी माणसें लागत होतीं असें आपण समजूं. तेव्हां हल्लीं जीं यंत्रें हें काम करतात त्या यंत्रांनीं या १० कोटी माणसांना बेकार केलें अशी तक्रार करण्याचें कारण नाहीं. कारण इतकीं माणसें कधीं अस्तित्वांत नव्हतींच. पण उलट वाफेच्या शक्तीनें चालणाऱ्या हातमागानें ८ लक्ष कोष्ट्यांना सडकेवर हाकून लावलें असें जेव्हां आम्ही म्हणतों तेव्हां मात्र आम्ही प्रत्यक्ष जिवंत असणारीं इतकीं माणसें या हातमागांनीं हाकून लावून त्यांची जागा घेतली असें आमचें म्हणणें असतें. हस्तव्यवसायी कारखानदारीच्या काळांत श्रमविभागानें हस्तव्यवसायी श्रमाचें रूप पालटून टाकलें तरी पण हस्तव्यवसाय हा त्या

कारखानदारीचा आधार म्हणून अस्तित्वांत राहिलाच. नवीन मागसलेल्या वसाहतींतील बाजाराकडून येणारी मालाची वाढती मागणी मध्ययुगापासून मोठमोठ्या शहरांत जे धंदेवाले धंदे करीत आले होते त्यांच्याकडून भागवली जाऊं शकेना. त्याबरोबरच सरंजामी पद्धती मोडकळीस येऊं लागल्यामुळें शेतीवरून हाकालल्या जाणाऱ्या शेतकऱ्यांना या नवीन कारखानदारांनीं उत्पादन व्यवसायाचें नवें क्षेत्र उघडून दिलें. (श्रमविभागात्मक कारखानदारी हस्तव्यवसाय जे भांडवलदारांनीं नवीन काढले तेंच हें नवीन क्षेत्र होय.) म्हणून त्यावेळीं श्रमविभाग आणि सहकार्य हे प्रकार श्रमगृहांतून जे सुरू झालें त्याकडे, त्यापासून होणाऱ्या प्रत्यक्ष फायद्याच्या दृष्टीनें, कामगारांना ते उत्पादनाचे बाबतींत अधिक सामर्थ्यवान बनवितात, या दृष्टीनें पाहिलें जाई.

## यंत्रामुळें कामगाराचें विनिमयमूल्य घटलें

पण श्रमाचें हत्यार यंत्राचें स्वरूप पावलें म्हणजे तें ताबडतोब कामगाराशीं चढाओढ करूं लागतें. भांडवलाचा यंत्राच्या सहाय्यानें स्वयंविस्तार सुरूं झाला म्हणजे तो स्वयंविस्तार ज्या कामगाराचें चरितार्थसाधन यंत्रानें हिरावून घेतलें आहे अशा कामगारांच्या संख्येच्या वाढीशीं समप्रमाणांत होत असतो. कामगार जें हत्यार चालवीत असे तें यंत्राकडून चालवलें जाऊं लागलें म्हणजे श्रमशक्तीचें उपयोगमूल्य कमी होतें तसेंच तिचें विनिमय—मूल्यही कमी होतें. कागदी पैसा चलनांतून काढून टाकण्यांत आला म्हणजे तो जसा कोणीही घेत नाहीं त्याप्रमाणें कामगारालाही कांहींच भाव रहात नाहीं. यंत्रांनीं अशा प्रकारें फालतू ठरविलेला कामगारवर्ग म्हणजे भांडवलाच्या स्वयंविस्ताराला ज्या कामगारांची आतां गरज उरली नाहीं. ते कामगार वैयक्तिक हस्त-

व्यवसाय व श्रमविभागात्मक हस्तव्यवसाय यांचें यंत्राशीं जें विषम युद्ध सुरू असतें त्या विषम युद्धांत हस्तव्यवसायाचे बाजूनें लढून जेरीस येतात. किंवा सहजपणे ज्यांत नोकरी मिळेल अशा धंद्यांच्या शाखांत नोकरीस जाऊन तेथें गर्दी करतात. अथवा मजूरांच्या बाजारांत गर्दी करतात. आणि आपसांतील चढाओढीनें श्रमशक्तीची किंमत तिच्या मूल्यापेक्षांही कमी करतात. यंत्रांचा वापर होऊं लागल्यानें कामगारांना होणारीं दुःखें हीं थोडावेळ टिकणारीं आहेत असें एकप्रकारें त्यांचें समाधान करण्यांत येतें तर उलट अमूक एका सबंध उत्पादनाच्या क्षेत्रावर यंत्राला हळू हळू ताबा मिळत गेल्यामुळें त्याचा मजूरवर्गावर होणारा जो विध्वंसक परिणाम त्याची व्यापकता व तीव्रता एकंदरीनें कमी होते. पहिल्या युक्तीवादानें कामगारांचें जें सांत्वन करण्यांत येतें तें या दुसऱ्या प्रकारानें निरुपयोगी ठरते. यंत्रानें हळू हळू एखाद्या धंद्यावर पकड बसविली म्हणजे आपसांत चढाओढ करणाऱ्या कामगारामध्यें हालअपेष्टांचा कायमचा रोग तीं यंत्रें उत्पन्न करून ठेवतात. यंत्रांच्या उपयोगामुळें घडून येणारें संक्रमण जर भराभर झालें तर मात्र प्रचंड लोकसंख्येला त्याचें दुःख फारच तीव्रतेनें भासतें. इंग्लंडांत हातमाग चालवणाऱ्या कोष्टयांचा धंदा हळू हळू कित्येक दशकें नष्ट होत होत १८३८ मध्यें साफ ठार झाला. या कोष्टयांची दुःखकथा इतिहासांत अगदीं अद्वितीय इतकी भयंकर आहे. कित्येक उपासमारीनें मेले, आणि कित्येक कुटुंबें रोज ५ सेंट इतक्या कमी मजूरीवर जीव तगवून बराच काळ जिवंत राहिली होती. उलट इंग्लंडांतल्या कापसाच्या यंत्रांनीं हिंदुस्थानांत घडविलेला परिणाम एकदम अतिशय तीव्र होता. १८३४–३५ च्या रिपोर्टांत गव्हर्नर जनरल लिहितो "व्यापाराच्या इतिहासांत येथील लोकांच्या दुःखास तोड नाहीं. कोष्टयांच्या हाडांनीं हिंदुस्थानचीं मैदानें भाजून निघालीं आहेत."

## आधुनिक काळांतही यंत्रापासून अनर्थ

पण आधुनिक यांत्रिक कारखान्यांतही सतत यंत्रांची जी सुधारणा चालू असते तीपासून अशाच प्रकारचा परिणाम हल्लींही घडतो आहे. "यंत्रांच्या सुधारणेचा हेतु मानवी श्रम कमी करणें हा असतो." असें फॅक्टरी-इन्स्पेक्टर (१८५८ रिपोर्ट) म्हणतात. आजवर जीं यंत्रें हातांनीं चालवलीं जात त्यांना चालविण्यासाठीं भौतिक शक्तीचा उपयोग करण्याचा प्रकार हल्लीं रोज सुरू आहे.... यंत्रामध्यें जे किरकोळ फरक होत असतात त्यांचा हेतु या शक्तीची काटकसर करणें, काम अधिक चांगलें काढणें, तेवढ्याच वेळांत निघणाऱ्या कामाचें परिमाण वाढविणें अथवा एखादें मूल, एखादी स्त्री एखादा पुरुष यांच्या कामाची गरज नाहींशी करणें हा असतो. सकृद्दर्शनीं या गोष्टी महत्त्वाच्या वाटत नाहींत, पण त्यांचे परिणाम पुढें महत्त्वाचे होतात." (फॅक्टरी इन्स्पेक्शन रिपोर्ट १८५६) "ज्या ज्या वेळीं अमुक एका कामाला विशेष कसब आणि हाताची स्थिरता यांची गरज असते त्या त्या वेळीं असें काम शक्य तितक्या लवकर चतुर कामगाराच्या हातून काढून घेऊन एका विशिष्ट यंत्राच्या हवालीं केलें जातें. कारण कामगार कितीही चतुर असला तरी अनेक प्रकारचा अनियमितपणा त्याच्या हातून होत असतो. उलट यंत्र हें स्वयंसिद्धपणेंच इतकें नियमित असतें कीं एखादें मूलही त्याच्यावर देखरेख करूं शकतें." १८६० हें साल इंग्लंडांतल्या कापसाच्या धंद्याच्या भरभराटीचें कळसाचें साल होतें. त्यानंतरच्या तीन वर्षांत अमेरिकन यादवीमुळें ब्रिटिश गिरण्यांना एकदम खूप उत्तेजन मिळून यंत्रांची जी भराभर सुधारणा होत गेली तिची कल्पनाही कुणाला १८६० सालीं आली नसती.

## यंत्रानें खर्चाची बचत

इन्स्पेक्टरांच्या रिपोर्टांतील दोनच उदाहरणें या संबंधानें दिलीं असतां वस्तुस्थिति कळून येईल. " आमच्याजवळ पूर्वी ७५ कापूस पिंजण्याचीं यंत्रें होतीं. त्या ठिकाणीं आतां १२ च यंत्रें आहेत. पण काम परिमाणांत पूर्वीइतकें आणि गुणांतही निदान पूर्वीइतकें होतें. आठवड्याला १० पौंड ( ५० डॉ. ) मजूरी आम्ही वांचवतों. जो कापूस आम्ही खपवतों त्या कापसाच्या नासाडींत १०% बचत झाली आहे." मँचेस्टर येथील दुसऱ्या एका सूतगिरणींत मला सांगण्यांत आलें कीं यंत्राचा वेग वाढवून आणि यंत्रांत स्वयंचलनाच्या कांहीं नव्या पद्धति निर्माण करून एका खात्यांत $\frac{1}{4}$ कामगारांची संख्या कमी करण्यांत आली आहे, दुसऱ्या एका शाखेंत निम्म्याहून अधिक कामगार कमी झाले आहेत. आणि पिंजण्याच्या खोलींतील यंत्र बदलल्यामुळें कामगारांची संख्या कमी करतां आली आहे." दुसऱ्या एका सूत कातण्याच्या गिरणींत १०% मजूर कमी करण्यांत आले. मँचेस्टरमधील सूत-कारखानदार मेसर्स गिल्मोर सांगतात, " आमच्या ब्लोईंगरूम खात्यांत नवीं यंत्रें आणल्यानें मजूरी आणि कामगार-संख्या यांची $\frac{1}{3}$ इतकी काटकसर झाली आहे. दुसऱ्या दोन खात्यांत एकूण खर्च $\frac{1}{2}$ कमी झाला असून कामगारांची संख्याही $\frac{1}{3}$ कमी झाली आहे. सूत कातण्याच्या खोलींतही खर्च कमी झाला आहे. इतकेंच नव्हे तर आमचें सूत जेव्हां कापड-कारखान्यांत विणण्यासाठीं जातें तेव्हां तें आम्ही नवीन यंत्राच्या साहाय्यानें कातलेलें असल्यानें पूर्वीहून अधिक चांगलें ठरतें. कापड कारखानदाराला त्यापासून अधिक कापड विणतां येतें. आणि पूर्वीच्या सुतापासून झालेल्या कापडापेक्षां या यंत्राच्या सुतापासून झालेलें कापड अधिक स्वस्त पडतें." ( फॅक्टरी इन्स्पेक्शन रिपोर्ट ).

## ‘थोडा वेळ’ चें दुःख कायम झालें

अमेरिकन यादवीमुळें इंग्लंडांतील कापूस-कारखान्यांत यांत्रिक सुधारणा व तिचे परिणाम काय काय झाले हें पुढील कोष्टकावरून दिसून येईल.

| | कारखाने | वाफेच्या शक्तीवरील माग | चात्या | कामगार |
|---|---|---|---|---|
| १८५८ | २२१० | २९८८४७ | २८०१०२१७ | ३७९२१३ |
| १८६१ | २८८७ | ३९९९९२ | ३०३८७४९४ | ४५१५६९ |
| १८६८ | २५४९ | ३७९३२९ | ३२०००१४ | ३०१०६४ |

यावरून असें दिसून येईल कीं, १८६१ पासून १८६८ पर्यंत ३३८ कापूस-कारखाने नाहींसे झाले. वेगळ्या शब्दांत सांगायचें म्हणजे थोड्या भांडवलदारांच्या हातीं अधिक उत्पादनक्षम अशी मोठ्या प्रमाणावरील यंत्रसामुग्री एकवटली. वाफेवर चालणाऱ्या मागांची संख्या २०६६३ नीं कमी झाली. पण त्याबरोबरच या मागांतून निघणारा माल मात्र वाढला, याचा अर्थ मागांत सुधारणा होऊन त्यांतून माल निर्माण करण्याची शक्ति अधिक वाढली हा होय. चात्यांची संख्या १६१२५४१ नीं वाढली. उलट कामगारांची संख्या ५०५०५ नीं कमी झाली. यंत्राच्या उपयोगानें कामगारावर कोसळणारें दुःख हें ‘थोडा वेळ’ टिकणारें असतें असें कामगारांचें जें सांत्वन करण्यांत येत असे तें ‘थोडा वेळ’ चें दुःख या अमेरिकन कापूस धंद्यांतील अनर्थाचे प्रसंगीं इंग्लंडांत कापूसधंद्यांत भरभराट होऊन आतां कायमचेंच झालें. कारण यंत्राची प्रगति आतां भराभर होऊं लागली व ती सतत होत राहिली.

## यंत्र हें संप फोडण्याचें साधन

यंत्र हें कामगाराशीं चढाओढ करून त्याला नेहमीं मागें टाकतें इतकेंच नव्हें तर त्याला एकसारखें फालतू वर्गांत ढकलीत असतें. कामगारांचे संप दडपून टाकण्यास, भांडवलाच्या हुकूमशाही विरुद्ध कामगार मधून मधून जीं बंडें करतो तीं मोडण्यास यंत्र हें मोठें जबरदस्त हत्यार असतें. गॅस्केल सांगतो "वाफेचें एंजिन हें अगदीं पहिल्यापासूनच मानवी शक्तीचें शत्रु होतें. कामगार हे नवीनच जन्मास आलेल्या कारखानदारी पद्धतींत पेचप्रसंग निर्माण करण्याचा धाक घालून नवे नवे हक्क मागत; हे हक्क पायाखालीं तुडवण्यास कामगारांचा शत्रु असें जें वाफेचें एंजिन त्यानें खूप मदत केली." (मॅन्युफॅक्चरिंग पाप्यूलेशन ऑफ इंग्लंड १८३३) १८३० पासून कामगारांचीं बंडें हाणून पाडण्याच्याच हेतूनें भांडवलदाराच्या हातीं नवीन शोधरूपीं जीं हत्यारें देण्यांत आलीं त्यांचा खरोखर एक इतिहासच लिहितां येईल.

## कसबाची गरज संपली

वाफेचा घण शोधून काढणारा जो नॅस्मिथ् त्यानें १८५१ मध्यें एंजिनियरांचा मोठा व बराच काळ टिकलेला जो संप झाला त्यामुळें होणारें नुकसान भरून काढण्यासाठीं आपण यंत्रांत काय काय सुधारणा केल्या यासंबंधानें ट्रेड यूनियन कमिशनपुढें पुढील आशयाची साक्ष दिली आहे. "आधुनिक यांत्रिक सुधारणांचे एक ठळक वैशिष्टय हें आहे कीं, आपोआप चालणारीं हत्यारें ज्यांत आहेत अशीं यंत्रें आम्ही तयार करतों. हल्लीं प्रत्येक यांत्रिक कामगाराला आणि प्रत्येक मुलालाहि जें कांहीं करावें लागतें तें स्वतःच्या शरीरानें करावयाचें काम नसून यंत्राकडून केल्या जाणाऱ्या सुंदर कामावर देखरेख करणें

हेंच होय. स्वतःच्या अंगच्या कसबावरच अवलंबून राहणारा कामगार आतां अजिबात नाहींसाच झाला आहे. पूर्वी मी १ यंत्रज्ञ व त्याच्या बरोबर ४ मुलें नेमीत असें. पण आतां यंत्राची नवी जोडणी करतां आल्यामुळें मोठ्या माणसांची संख्या १५०० ऐवजीं ७५० केली आहे. यामुळें माझा नफा खूपच वाढला."

भांडवलशाहीचे पुरस्कर्ते असणारे जे अर्थशास्त्रज्ञ ते "जीं यंत्रें कामगारांच्या जागीं येतात तीं त्यावेळींच अपरिहार्यपणें त्याच माणसांना अन्यत्र कामांना लावतां यावें इतकें भांडवल खुलें करीत असतात." असें सांगतात.

## यांत्रिक सुधारणेबरोबर मजूरांची घट

समजा, एक भांडवलदार प्रत्येक मजूराला १५० डॉ. दरसाल मजूरी देऊन गालिच्याच्या एका कारखान्यांत १०० मजूर नेमतो. अर्थात मजूरीच्या कामीं दरसाल खर्च होणारें चरभांडवल १५००० डॉ. भरतें. आतां आणखी असेंही समजा कीं आपल्या मजूरांतले ५० मजूर कमी करून उरलेल्या ५० ना तो यंत्राला जुंपतो. या यंत्राचा खर्च त्याला ७५०० डॉ. येतो. उदाहरणांत भानगडी येऊं नयेत म्हणून आपण इमारती, कोळसा वगैरेंचा विचार सोडून देऊं. आतां पुन्हां असें समजा कीं दरसाल त्याला पूर्वी व आतांही १५००० डॉ.चा कच्चा माल लागे. माणसांच्या जागीं यंत्रें आल्यामुळें भांडवल कांहीं तरी खुलें झालें आहे का? माणसांच्या जागीं यंत्रें येण्यापूर्वी ३०००० डॉ. जो एकूण खर्च होई त्यांत अर्धे स्थिरभांडवल व अर्धे चरभांडवल असे. यंत्रें आल्यानंतर चरभांडवल २२५०० डॉ. झालें. (१५००० डॉ. कच्चामाल, ७५०० डॉ. यंत्रसामुग्री) आणि चरभांडवल ७५०० डॉ. झालें. आतां चरभांडवल

एकूण भांडवलाच्या निम्में असण्याऐवजीं चौथाई झालें आहे. आतां भांडवल खुलें होण्याऐवजीं अशा रीतीनें कुलुपबंद झालें आहे कीं श्रमशक्तीशीं त्याचा आतां विनिमय होतच नाहीं. चर हें स्थिर होऊन बसलें. इतर बाबी आहेत तशा धरून चाललें असतां ३०००० डॉ. जें भांडवल तें यापुढें ५० हून अधिक माणसांना रोजगार देऊं शकणार नाहीं. आणि यंत्रांत सुधारणा जसजशी होत जाईल तसतशी या माणसांची संख्या कमी कमी होत जाईल.

## यंत्रानें रोजगारी कशी घटते

पण समजा, नवीन आणलेल्या यंत्रांनीं जितक्या श्रमशक्तीची जागा घेतली तिच्यापेक्षां यंत्राचा खर्च कमी आहे. आतां काय होईल पहा. यंत्रांचा खर्च ७५०० डॉ. होण्याऐवजीं ५००० डॉ. झाला असें आपण समजूं. पूर्वीं जे १५००० डॉ. मजूरीदाखल देण्यांत येत. त्यांपैकीं आतां ७५०० डॉ. च हें काम करतात. ५००० डॉ. यंत्रासाठीं खर्च झाले आणि अर्थात २५००० डॉ. भांडवल खुलें झालें हें खरें आहे. आतां मजूरीचा दर बदलला नाहीं असें धरून चालल्यास हें भांडवल फार तर १६ माणसांना काम देऊं शकेल, ५० ना देऊं शकणार नाहीं. वास्तविक या २५०० डॉ. मधील कांहीं भांडवल कच्चा माल व हत्यारें वगैरेसाठीं खर्चावें लागणार असल्यानें १६ मजूरांनाही तें काम देऊं शकणार नाहीं.

## माणसांच्या जागीं यंत्र

पण आतां समजा कीं नवीन यंत्रें करण्याचे कारखाने निघाल्या-मुळें अधिक यंत्रज्ञांना रोजगार मिळाला. पण यामुळें ज्या गालिचा-कामगारांना सडकेवर हाकाललें जावें लागलें त्यांची नुकसानभरपाई होते का ? फार तर यंत्रें बनविण्याच्या कामांत कांहीं माणसांना

नोकरी मिळेल. पण यंत्राच्या वापरामुळें जीं माणसें हाकाललीं जातील त्यांचेपेक्षां यांची संख्या कमीच असणार. काढून टाकलेल्या कामगारांना पूर्वीं मजूरीदाखल देण्यांत येत असलेले जे ७५०० डॉ. त्यांनीं आतां यंत्राचें रूप धारण केलें आहे. ( १ ) यंत्रें बनविण्याच्या कामीं वापरण्यांत आलेल्या उत्पादनसाधनांचें मूल्य ( २ ) यंत्रें बनविणाऱ्या यंत्रज्ञांची मजूरी आणि ( ३ ) त्यांच्या ' मालकांना- मिळणारा वाढावा, मिळून हे ७५०० डॉ. होत म्हणजे या ७५०० डॉ. पैकीं आतां फक्त एक लहानसा भाग मजूरीच्या कामीं खर्च होतो. शिवाय यंत्रें हीं झिजून निरुपयोगी होईपर्यंत बदलावीं लागत नाहींत. म्हणून वाढत्या प्रमाणांत कायमचें यंत्रज्ञ कामावर ठेवतां यावें यासाठीं सर्व गालिचाकारखानदारांस मजूरांना काढून टाकून त्यांच्या जागीं यंत्रें आणावीं लागतात.

## भांडवल मुक्त करणें म्हणजे काय

वस्तुस्थिति अशी आहे कीं भांडवलशाहीचें समर्थन करणारे हे अर्थशास्त्रज्ञ भांडवल मुक्त करण्याची भाषा जेव्हां वापरतात तेव्हां त्यांचा आशय हा नसतोच. ज्या मजूरांना यंत्रानें बेकार करून टाकलेले असते त्या मजूरांचें चरितार्थसाधन मुक्त झालें असें म्हणणें हा त्यांचा आशय असतो. यंत्र हें वरील उदाहरणांत ५० माणसांना नोकरींतून मुक्त करून त्यांना दुसऱ्या कोणाकडे नोकरी मागायला लावतें इतकेंच नव्हे तर त्या ५० मजूरांचें चरितार्थसाधन म्हणजे ७५०० डॉ. हेंही त्या मजूरांच्या उपभोगापासून काढून घेतें, हें मान्य केलेंच पाहिजे. यंत्र उपयोगांत आलें कीं तें कामगारांचें चरितार्थसाधन हिसकून घेतें ही गोष्ट कळण्यास अगदीं साधी आहे. आणि हींत नवीन शोध असा कांहीं नाहीं. अर्थशास्त्राच्या परिभाषेंत ही घटना बोला-

वयाची म्हणजे यंत्र हें कामगारांचें चरितार्थसाधन मुक्त करतें. अथवा त्या चरितार्थसाधनाला भांडवलाचें रूप देतें, असें म्हणतां येईल. हा केवळ परिभाषेचा खेळ आहे. याहून यांत अधिक कांहीं नाहीं. (याचा साधा अर्थ यंत्र हें कामगारांचें चरितार्थसाधन काढून घेतें एवढाच आहे)

या अर्थशास्त्रीय तत्त्वाप्रमाणें हे ७५०० डॉ. चरितार्थसाधनाच्या रूपानें ५० मजूरांकडून खर्च केलें जाणारें भांडवल होतें. हे ५० मजूर आतां हाकालले गेले. मजूर हे आपली सक्तीची सुटी उपभोगूं लागतांच हें भांडवलही बेकार होऊन बसतें. पण उद्योग मिळेपर्यंत हें भांडवल कधींही स्वस्थ बसत नाहीं. याच ५० माणसांकडून उत्पादनाच्या व्यवसायांत आपला कोठें वापर होईल हें ठिकाण तें शोधीत असतें. आणि म्हणून आगें मागें भांडवल आणि कामगार एकत्र आल्यावांचून राहात नाहींत. मध्येंच उत्पन्न झालेल्या अडथळ्याचें निवारण होतें. यावरून कामगारांचीं दुःखेंहि जगांतील संपत्तीइतकींच अशाश्वत आहेत.

## यंत्रामुळें चौफेर बेकारी

बेकार झालेल्या कामगारांच्या दृष्टीनें पहावयाचें झालें तर ७५०० डॉ. किंमतीचें चारितार्थसाधन हें कधींच भांडवल नव्हतें. मजूरांच्यापुढें ७५०० डॉ. भांडवल जें येत असें तें नंतर यंत्रांत घातलेले ७५०० डॉ. होत. जरा सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास हे ७५०० डॉ. म्हणजे नंतर हाकून लावलेल्या ५० कामगारांनीं एका वर्षांत काढलेले ते गालिचेच होत. आणि हे ७५०० डॉ. मालाच्या म्हणजे गालिच्यांच्या रूपानें कामगारांना न देतां नगदरूपानें मजूरी म्हणून वाटले गेले. आतां पैसारूप धारण केलेल्या ह्या गालिच्यांच्या साहाय्यानें कामगारांनीं ७५०० डॉ. किंमतीची चरितार्थसंपत्ति खरेदी केली.

अर्थात ७५०० डॉ. ही जी त्यांना मजूरी मिळाली ती त्यांना भांडवल स्वरूपाची नव्हती तर मालाच्या स्वरूपाची होती. या मालाशीं त्यांचा संबंध रोजमजूराचा नसून गिऱ्हाइकाचा होता. यंत्रानें त्यांना नोकरींतून मोकळे केले, म्हणजे त्यांची खरेदीशक्ति काढून घेतली. यामुळें आतां हेच कामगार गिऱ्हाईक हें रूप धारण करण्यास असमर्थ झाले. अर्थात ते जो माल खरेदी करीत असत. त्या मालाचें तितकें गिऱ्हाईक कमी झालें. विक्रीमालाच्या एका क्षेत्रांत कमी झालेल्या या गिऱ्हाइकाची भरती दुसऱ्या क्षेत्रांत न होईल तर मालांचे बाजारभाव उतरतील. ही परिस्थिति कांहीं काळ राहिली, आणि अधिकाधिक व्यापक होऊं लागली तर या मालाच्या उत्पादनावर नियंत्रण येऊं लागतें. चरितार्थास आवश्यक अशा वस्तूंच्या उत्पादनावर पूर्वी जें भांडवल खर्च होत असे तें आतां दुसऱ्या क्षेत्रांत खर्च होतें. आणि यामुळें चरितार्थास आवश्यक अशा संपत्तीच्या उत्पादनक्षेत्रांत गुंतलेल्यापैकीं कांहीं मजूर नोकरींतून मुक्त होतात. एकंदरीत मुळांत यंत्र वापरण्याचा परिणाम होतो तो असा कीं उत्पादनाच्या ज्या क्षेत्रांत यंत्रांचा उपयोग होऊं लागतो त्या क्षेत्रांतील मजूर तर बेकार होतातच पण शिवाय ज्या क्षेत्रांत यंत्रें वापरण्यांत आलेलीं नाहींत त्याही क्षेत्रांतील मजूर बेकार होतात.

## श्रमविभागाचा कामगारावर दुष्परिणाम

खरी वस्तुस्थिति पुढीलप्रमाणें आहे. मजूरांना यंत्रानें श्रमगृहांतून हाकाललें म्हणजे मजूरांच्या बाजारांत ते फेकले जातात. तेथें भांडवलदारापुढें आधींच असलेल्या मजूरांत ते आणखी गर्दी करतात. यंत्रांचा हा परिणाम मजूरांना भरपाईदाखल आहे असें सांगितलें जातें, हा उल्लेख पूर्वी आलाच आहे. पुढें एका प्रकरणांत यंत्रांचा हा परिणाम म्हणजे मजूरावर होणारा भयंकर अत्याचार आहे असें दाखविण्यांत

येईल. तूर्त मी इतकेंच म्हणतों कीं ज्या मजूरांना यंत्रानें धंद्याच्या एका शाखेंतून हुसकून लावलें त्यांना धंद्याच्या दुसऱ्या एका शाखेंत खास नोकरी मिळेल. तशी ती त्यांना मिळाली व चरितार्थसाधनाशीं आपला पूर्वी असलेला संबंध त्यांना जर पुन्हां सुरू करतां आला तर ही गोष्ट नव्या व अधिक अशा भांडवलाच्या मध्यस्तीनेंच होत असतें. ज्या भांडवलानें त्यांना पूर्वी नोकरी दिली होती, व ज्याचें पुढें यंत्रांत रूपांतर झालें त्यानें मजूरांना रोजगार दिला असें म्हणतां येणार नाहीं. आणि अशी नोकरी मिळूनसुद्धां त्यांची दैना किती भयंकर असते. श्रमविभागाच्या तत्त्वानें एका विशिष्ट कामाखेरीज बाकीच्या सर्व कामांचे बाबतींत ते बिचारे पंगू झालेले असतात. आपल्या जुन्या कामाच्या बाहेरील क्षेत्रांत त्यांची किंमत अगदी क्षुद्र असते. दुसऱ्या कामामध्यें त्याला प्रवेश मिळत नाहीं. ज्या कांहीं थोड्या हलक्या प्रकारच्या कामांत त्याला प्रवेश मिळतो तेथें आधींच कमी पगारावर राबणाऱ्यांची गर्दी झालेली असते. धंद्यांच्या प्रत्येक शाखेकडे दरसाल लोकांचे थवेच्या थवे आकर्षिले जातात. त्यांतून रिकाम्या जागा भरल्या जातात. आणि या थव्यांचा उपयोग धंद्याचे वाढीसाठीं केला जातो. अमुक एका धंद्याच्या शाखेंत यंत्रें आलीं म्हणजे कांहीं मजूर बेकार होतात. त्याबरोबरच कांहीं शिलकी बेकारांना नव्या उत्पादनाच्या क्षेत्रांत वाव मिळतो. दरम्यान यंत्रानें नुकतेच बेकार केलेले कामगार संक्रमणकाळांत बहुतेक उपासमारीस बळी पडतात.

## धनाची वाढ, मजूर बेकार

कामगारांच्याकडून चरितार्थसाधन हिसकून घेण्याचें हें काम यंत्रें करतात असें म्हणतां येणार नाहीं हें निःसंशय खरें आहे. यंत्र हें या धनोत्पादनाच्या क्षेत्रांत शिरेल तेथें तें उत्पादन वाढवितें स्वस्त

करतें आणि उत्पादनाच्या इतर क्षेत्रांत उत्पन्न होणाऱ्या चरितार्थ-साधनाच्या प्रमाणांत प्रथम कोणताही बदल करीत नाहीं. म्हणून यंत्राचा उपयोग सुरू झाल्याबरोबर एकंदर समाजाजवळ यंत्राचा उपयोग होण्यापूर्वी जेवढें चरितार्थसाधन होतें, निदान तितकें तरी कायम राहतें. आणि मजूर मात्र यंत्रामुळें बेकार झालेले असतात. बेकार कामगारांनीं वार्षिक उत्पन्नांतला जो बराच भाग वाया घालवून टाकलेला असतो तो सध्यां बाजूस ठेवूं. भांडवलशाहीच्या समर्थनकार अर्थशास्त्रज्ञांनीं याच मुद्यावर भर दिला आहे.

## अर्थशास्त्रज्ञांचा दृष्टिकोन

त्यांच्या मतें भांडवलदारांनीं यंत्रांचा उपयोग केल्यामुळें अंतर्विरोध व वैरभाव जे निर्माण होतात ते यंत्रोपयोगाचे बाबतींत अपरिहार्य आहेत. ते कांहीं यंत्रांतून उत्पन्न होत नाहींत, तर भांडवलशाही पद्धतीनें यंत्राचा उपयोग होतो म्हणून होतात. यंत्रांचा स्वतंत्रपणें विचार केला असतां श्रमाचे तास कमी करणें हेंच त्याचें फळ आहे. पण भांडवलदाराच्या हातीं तीं यंत्रें गेलीं म्हणजे तीं यंत्रें श्रमाचा वेळ वाढवतात. यंत्राचा गुण आपल्यापरीं श्रम हलके करणें हा आहे. पण भांडवलदारानें यंत्र वापरलें म्हणजे तें श्रमाची तीव्रता वाढवतें. यंत्र आपल्यापरीं माणसाच्या सृष्टीवरील विजयाचें द्योतक आहे. पण भांडवल-दाराच्या हातीं तें असतां माणसाला तें सृष्टिशक्तीचा गुलाम बनवितें. आपल्यापरीं यंत्र हें उत्पादकाचें धन वाढवतें, पण भांडवलदाराच्या हातीं यंत्र हें उत्पादकाला दरिद्री बनवितें.

## ' भांडवलावाचून यंत्राचा वापर अशक्य '

वरील कारणामुळें व इतरही अशाच कांहीं कारणामुळें भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांच्या मतें निव्वळ यंत्रांचा विचार करतांना हे सर्व विरोध

निव्वळ सत्याभास आहेत. त्यांना प्रत्यक्ष सृष्टींत अथवा सिद्धांतांत मुळींच अस्तित्व नाहीं. इतकें बोलल्यानंतर मात्र भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञ अधिक विचार करण्याचा शीण आपल्या मेंदूला देत नाहींत. आपला विरोधक, भांडवलशाही ही यंत्राचा ज्या पद्धतीनें उपयोग करतो त्या पद्धतीला दोष न देतां, यंत्रालाच दोष देतो म्हणून तो मूर्ख आहे असें म्हणून हे अर्थ-शास्त्रज्ञ स्वतःचें समाधान मानून घेतात. भांडवलदारांनीं यंत्रांचा उपयोग करण्यामुळें थोडी फार अल्पकालीन गैरसोय होणार हें त्याला मान्यच आहे. पण कोणत्याही प्रश्नाला एक चांगली व एक वाईट बाजू असतेच. यंत्रांचा उपयोग करावयाचा तर तो भांडवलावांचून होणेंच अशक्य आहे. म्हणून यंत्राकडून कामगाराची जी पिळवणूक होत असते ती या अर्थशास्त्रज्ञांच्या मतें कामगाराकडून यंत्राची पिळणूक होते असें मानण्यासारखेंच आहे. आणि म्हणून जो कोणी भांडवल-दारांनीं यंत्राचा उपयोग केल्यानें घडून येणारी वस्तुस्थिति जगाच्या चव्हाट्यावर मांडतो तो कोणत्याही प्रकारें यंत्राच्या उपयोगाचा विरोधक असून सामाजिक प्रगतीचाही शत्रु आहे असें या अर्थ-शास्त्रज्ञांना वाटतें.

## ‘खून सुरीनें, मी नव्हें’

सुप्रसिद्ध बिल् साईक्स् यानें अशाच प्रकारचा युक्तिवाद केला होता. “ ज्यूरींतील सभ्य गृहस्थहो, या व्यापारी प्रवाशाचा गळा कापला गेला आहे हें खरें, पण तो कांहीं माझा अपराध नव्हे, सुरीचा अपराध आहे. या व्यापाऱ्याचा वध ही एक अल्पकालीन गैरसोय आहे. अशा क्षुल्लक गैरसोयीसाठीं सुऱ्या वापरणेंच बंद करावें काय? विचार करा, सुऱ्या जर वापरल्या नाहींत तर शेती आणि व्यापारधंदे चालतील कसे? वैद्यकीय शस्त्रक्रियेला सुरी नको काय? जेवणाच्या

टेबलावर सुरीची गरज नाहीं काय? तुम्ही सुरीच नाहींशी करून टाकणें म्हणजे मानवजातीला रानटीपणाच्या खोल दरींत ढकलण्यासारखें आहे."

## यंत्रामुळें रोजगारी वाढण्याची शक्यता

धंद्यांच्या ज्या शाखांत यंत्रांचा उपयोग होतो त्या शाखांत कामगार बेकार होतात, तरीपण दुसऱ्या कांहीं धंद्यांत यंत्रामुळें रोजगारी वाढूं शकेल. यंत्रांचा उपयोग होऊं लागल्यानंतर उत्पन्न झालेलें धन हें यंत्रोपयोगापूर्वीं उत्पन्न होणाऱ्या धनाइतकें तरी असतेंच. तेव्हां एकूण श्रम कमी झाले यांत शंका नाहीं. धनोत्पादनाचीं हत्यारें यंत्रें, कोळसा इत्यादींवर खर्च झालेले नवे श्रम हे, यंत्रानें एकूण कमी केलेल्या श्रमाहून कमीच असले पाहिजेत. असें न घडेल तर यंत्रानें उत्पन्न होणारा माल पूर्वीं शारीरिक शक्तीनें होणाऱ्या मालाइतका अथवा कदाचित त्याहूनही अधिक महाग पडेल. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं पूर्वीं मजूरांच्या हातानें जेवढा माल होत होता त्याहून कितीतरी अधिक माल आतां यंत्रानें होऊं लागतो. याचा परिणाम असा होतो कीं उत्पादनाच्या इतर शाखांतही मजूरांची संख्या वाढूं लागते. समजा, अमुक इतक्या मजूरांनीं हातमागांच्या साहाय्यानें १ लक्ष यार्ड कापड विणलें. नंतर यंत्र उपयोगांत येऊं लागलें. त्यामुळें कांहीं मजूर बेकार झाले. पण उरलेल्या मजूरांना आतां तेवढ्याच वेळांत ४ लक्ष यार्ड कापड विणतां येऊं लागलें. चौपट झालेल्या या उत्पादनांत आतां चौपट कच्चा माल आहे म्हणून तितका तो निर्माण करावा लागतो. त्याचप्रमाणें इमारती, कोळसा, यंत्रें या सर्वांना यंत्रांनीं बेकार केलेल्या मजूराहून कितीतरी अधिक मजूर आतां लागूं लागतात.

## नव्या कामगाराचा जन्म

म्हणून अमुक एका धंद्यामध्यें यंत्रांचा उपयोग सुरू झाला असतां त्याचा तात्कालिक परिणाम पहिल्या धंद्यास उत्पादनसाधनें पुरविणाऱ्या धंद्यांतील उत्पादन वाढण्यांत होतो. यामुळें किती अधिक मजूरांना रोजगार मिळेल ही गोष्ट यंत्रांनीं या दुसऱ्या धंद्यांचें किती क्षेत्र व्यापलें आहे, अथवा यंत्रें तें व्यापीत आहेत यावर अवलंबून राहील. कोळसा व धातु यांच्या खाणींत काम करण्याचें दुर्भाग्य असलेल्या माणसांची संख्या ब्रिटिश कारखानदारी पद्धति वाढल्यानंतर खूप वाढली. पण गेल्या कांहीं दशकांत खाणीमध्येंच नवीन यंत्रांचा उपयोग होऊं लागल्यामुळें खाणी-मजूरांची संख्या आतां कमी प्रमाणांत वाढत आहे. यंत्राबरोबर एक नवीन प्रकारचा कामगार जन्मास येत असतो. तो म्हणजे यंत्राचा निर्माता होय. कच्च्या मालासंबंधानें निःसंशय अनुभव असा आला कीं कापूस कातण्याचा धंदा भराभर वाढल्यामुळें अमेरिकेंत कापसाच्या पिकाला प्रचंड भरती आली. आफ्रिकेंतील गुलामांचा व्यापार वाढला, आणि त्याबरोबरच अमेरिकेंतील सरहद्दीवरल्या गुलामांचा व्यापार करणाऱ्या संस्थानांचा, गुलाम पोसून विकण्याचा धंदा बरकतीस आला. १७९० त अमेरिकेमध्यें गुलामांची पहिली खानेसुमारी करण्यांत आली. त्यावेळीं त्यांची संख्या ६९७००० भरली. १८६१ त ती जवळ जवळ ४०००००० झालीं होती. उलट इंग्लंडांत लोकरीचे कारखाने वाढले. त्यामुळें हळूं हळूं शेतजमिनीचें रूपांतर मेंढरें चारण्याच्या कुरणांत झालें. आणि त्यामुळें खेड्यांत शेतमजूर निकामी होऊन शहरांत त्यांची गर्दी जमली. आयर्लंडची लोकसंख्या गेल्या २४ वर्षांत निम्मी कमी झाली. आणि यावेळीं (१८६७) ही लोकसंख्या अजूनही

कमी होत आहे. आयर्लंडांतल्या जमीनदारांना शेतीऐवजीं मेंढ्यांची कुरणें करावयाची असल्यामुळें शेतमजूरांची गरज नाहीं. आणि शहरांतील लोकर-कारखानदारांना मजूरांची गरज आहे. असा दोघांचाही या प्रकारानें फायदा होत आहे.

## अंशतः यंत्र वापरलें जाण्याचा परिणाम

उत्पादनाच्या प्राथमिक अथवा मधल्या एखाद्या अवस्थेंत यंत्राचा उपयोग करण्यांत येतो. माल पूर्ण होण्यापूर्वी या अवस्थांतून त्याला जावें लागतें. ज्या या अवस्थेंत यंत्राचा उपयोग होतो त्या या अवस्थेंत यंत्रापासून पदरांत पडणारें फल फार मोठ्या प्रमाणांत पदरांत पडतें. पण या यंत्रानंतरच्या माल करण्याच्या अवस्था हस्तव्यवसायात्मक असूं शकतात. आणि यंत्रानें पदरांत टाकलेलें फल खूप असल्यामुळें माल पूर्ण होईपर्यंत पुढल्या पुढल्या अवस्थांतले संस्कार त्यावर करण्यासाठीं खूपच अधिक मजूरांची गरज लागते. उदा. यंत्रानें सूत कातलें म्हणजे हातमागावर विणणाऱ्या कोष्ट्यांना तें इतकें पुष्कळ आणि भरपूर प्रमाणांत मिळतें कीं, पहिल्या पहिल्यानें जेव्हां गिरणींचें सूत हातमाग चालविणाऱ्या कोष्ट्यांना मिळालें त्यावेळीं भांडवल न वाढवितांही भरपूर वेळ त्यांना काम करतां येऊं लागलें. त्यामुळें त्यांची मिळकत वाढली. म्हणून हातमाग चालविणाऱ्या कोष्ट्यांच्या धंद्यांत कोष्ट्यांची संख्या वाढतां वाढतां ती ८ लक्षावर गेली. आणि मग जेनी, थ्रॉसल व म्यूल इत्यादि सुंताच्या गिरणींतल्या यंत्रांनीं जन्मास घातलेल्या या ८ लक्ष कोष्ट्यांना वाफेवर चालणाऱ्या मागानें मागाहून पराभूत केलें. त्याचप्रमाणें कपडे करण्याचें साहित्य यंत्रांनीं खूप वाढविल्यामुळें हातशिंपी व हातशिंपिणी यांचीही संख्या वाढली.

पुढें शिवण्याच्या यंत्राचा शोध लागल्यावर त्यानें या वाढलेल्या हस्त-व्यवसायिकावर आपला हल्ला चढविला.

## उत्पादन जागतिक होतें

पहिल्यानें यंत्रामुळें चैनीच्या वस्तूंच्या धंद्यांत रोजगारीची वाढ होते. कारण त्यामुळें वाढावा वाढतो, तसेंच ज्यामध्यें वाढावा अंतर्भूत आहे असा मालहि भरपूर उत्पन्न होतो. त्या योगें भांडवलदार वर्गाची संपत्ति वाढत जाते. चरितार्थसाधनाची संपत्ति निर्माण करण्याकरतां लागणारा कामगारवर्ग सापेक्षतेनें कमी होत जातो. नवीन आणि चैनीच्या वस्तूंच्या लोकांच्या गरजा वाढत जातात. त्याबरोबरच चैनीच्या वस्तूंची संख्याही वाढत जाते. वेगळ्या शब्दांत सांगायचें म्हणजे चैनीच्या वस्तूंचें उत्पादन वाढतें, विविध आणि सुंदर वस्तूंची उत्पत्ति सुरू होतें तिचें कारण जगाच्या बाजारांचे परस्परांशीं जे नवे संबंध उत्पन्न होतात तें होय. हे नवे संबंध नव्या यांत्रिक उत्पादनपद्धतीमुळें होतात. स्वदेशांतल्या मालाऐवजीं परदेशांतल्या अधिकाधिक चैनीच्या वस्तु घेतल्या जातात. इतकेंच नव्हे तर स्वदेशी मालाच्या उत्पत्तीसाठीं लागणारा कच्चा माल घटकद्रव्यें उत्पत्तीसाठीं मधेंमधें लागणारें इतर साहित्य वगैरे सर्व वस्तु स्वदेशी मालाचीं उत्पादनसाधनें म्हणून परदेशाहून आणल्या जातात. जगाच्या बाजाराशीं हा जो संबंध येतो त्यामुळें वाहतुकीच्या धंद्यांत रोजगारी वाढते. या वाहतुकीच्या धंद्यांचेंही अनेक प्रकार होतात. १८६१ त इंग्लंड व वेल्स मिळून ९४६६५ खलाशी वाहतुक व्यापाऱ्यांच्या नोकरींत होते.

धनोत्पादनाचीं व चरितार्थाचीं साधनें एका बाजूनें वाढत असतात, तर दुसऱ्या बाजूनें मजूरांची संख्या सापेक्षतेनें कमी होत असते.

त्यामुळें कालवे, गोद्या, बोगदे, पूल वगैरे ज्या उपयुक्त वस्तूंचें फल फार दूर काळानें मिळत असते अशा वस्तूंच्या निर्मितीसाठीं मजूरांची मागणी होऊं लागते.

## मजूरांच्या सापेक्ष वाढीचा उपयोग

आधुनिक उद्योगधंद्यांची उत्पादनशक्ति खूपच वाढलेली आहे. त्यामुळें उत्पादनाच्या सर्व क्षेत्रांत श्रमशक्तीची पिळणूक अधिक व्यापक व अधिक तीव्र होत आहे. आणि त्याबरोबरच अनुत्पादक अशा व्यवसायांत कामगार वर्गांना वाढत्या प्रमाणांत रोजगारी मिळत आहे. यामुळें प्राचीन काळीं जसे घरोघर गुलाम असत तशा धर्तीचा घरगुती नोकरवर्ग वाढतो आहे. गडी, मोलकरणी, हुजऱ्ये वगैरे हे अशा प्रकारचे नोकर होत. १८६१ च्या खानेसुमारींत इंग्लंडच्या लोकसंख्येचे घटक खालीलप्रमाणें होते.

| | |
|---|---|
| शेती-मजूर | ११००००० |
| कापूस गिरण्यामध्यें गुंतलेले सर्व मजूर | ६४३००० |
| कोळसा व धातू यांच्या खाणींतील मजूर | ५६५००० |
| धातूंच्या कारखान्यांतील मजूर | ४००००० |
| घरगुती नोकरवर्ग | १२१०००० |

## कामगारांची संख्यावाढ, सापेक्ष घट

खाजगी घरांत ज्यांना नोकरी नाहीं असा एकही मजूर शेवटच्या सदरांत घेतलेला नाहीं. यंत्रानें पुष्कळ मजूर हाकालले जाऊन त्यांची जागा घेतली असली तरी अधिक गिरण्या बांधल्या जात असल्यानें जुने कारखाने, वाढवले जात असल्यानें, पूर्वी वैयक्तिक हस्तव्यवसायाच्या काळीं, अथवा श्रमविभागात्मक कारखानदारीच्या काळीं जितके मजूर

असत त्यांच्यापेक्षां एकंदर मजूरांची संख्या यंत्रांच्या काळीं फारच मोठी होत असते. उदा. जुन्या उत्पादनपद्धतींत २५०० डॉ. भांडवल घातलें गेलें असतां त्यांतील १००० डॉ. उत्पादन-साधनांत खर्च झाले व दर आठवड्यास दरमाणशीं ५ डॉ. याप्रमाणें १५०० डॉ. श्रमशक्तीसाठीं खर्च झाले असें समजूं. यंत्राचा उपयोग होऊं लागल्यापासून ५०० डॉ. च आतां श्रमशक्तीसाठीं खर्च होऊं लागले. अर्थात् $\frac{२}{३}$ कामगार हाकालले गेले. आतां धंद्याची जर वाढ होऊं लागली व एकंदर गुंतवलेलें भांडवल यंत्रामुळें बदललेल्या परिस्थितींत ७५०० डॉ. झालें तर त्यामुळें मजूरांची संख्या पुन्हां ३०० पर्यंत जाईल. यंत्राची सुरवात होण्यापूर्वी इतकेच मजूर होते असें आपण धरलें आहे. आतां जर हें भांडवल ७५०० वरून १०००० वर गेलें तर ४०० मजूर नोकरीवर नेमले जातील. प्रत्यक्ष आकड्यांनीं ही मजूरांची संख्या वाढली आहे. पण भांडवलाशीं तुलना करतां मजूरांची संख्या भांडवलाच्या प्रमाणांत म्हणजे सापेक्ष कमी झाली आहे. २५०० डॉ. भांडवलाला ३०० मजूर होते या मापानें १०००० भांडवलाला १२०० मजूर असायला हवेत. पण ४०० मजूरच नेमले गेले आहेत. अर्थात् ८०० मजूर सापेक्ष दृष्टीनें पाहतां कमीच झाले आहेत. प्रत्यक्षपणें कामगारांची संख्या वाढत असतां त्यांचें भांडवलाशीं सापेक्ष प्रमाण कमी होऊं शकतें हें यावरून दिसून येईल.

---

## नफ्याच्या दराची घट : : ११*

मजूरांची संख्या याप्रमाणें सापेक्षतेनें एकसारखी कमी होत असल्या-मुळें नफ्याच्या दरावर याचा एक विशिष्ट परिणाम होत असतो.

यंत्राचा हेतु ( प्राचीन काळच्या हत्यारांच्या शोधाच्या हेतू-प्रमाणेंच ) श्रम वांचविणें हा असतो. कमी श्रमांत पूर्वीइतकाच अथवा त्याहून अधिक माल यंत्राच्या साहाय्यानें निर्माण केला जातो. जिवंत माणसाचे श्रम अधिक उत्पादक केले जातात.

### स्थिर भांडवलाची वाढ, चराची घट

पण हें करतांना तितक्याच मजूरांनीं पूर्वीहून अधिक कच्चा माल आणि पूर्वीहून अधिक हत्यारें ( यंत्रें वगैरे, ) वापरावी लागतात. उदा. सूत कातणारा कामगार पूर्वीच्या दसपट सूत पूर्वीइतक्याच वेळांत यंत्राच्या साहाय्यानें कातती. तेव्हां तो दसपट कापूस वापरून टाकतो, आणि पूर्वीच्या हत्यारापेक्षां कितीतरी अधिक किंमतीचें यंत्रही वापरून टाकीत असतो. कोणतीही आर्थिक प्रगति विशेषतः यंत्रानें

* कॅपिटल, खंड ३, प्रकरण १३-१५.

होणारी प्रगति घडून येत असतां मजूराकडून वापरल्या जाणाऱ्या स्थिर भांडवलाचें परिमाण वाढत असतें. पण त्याबरोबरच याच प्रगती-मुळें नफ्याची शेकडेवारी म्हणजे नफ्याचा दर हाही कमी होत जातो. पुढील कोष्टकावरून या म्हणण्याचा खुलासा होईल. हिशेबाचें काम सोपें करण्यासाठीं पुढील उदाहरणांत वाढाव्याचा दर १००% धरला आहे. मजूर हे आपणाला मिळणाऱ्या मजूरीइतकें मूल्य आपल्या श्रमानें निर्माण करून पुन्हां तितकेंच मूल्य भांडवलदारासाठीं निर्माण करतात असें आम्ही समजतों आहों. चर भांडवल म्हणजे मजूरी १०० असली तर वाढावाही १०० होईल. आणि म्हणून हा वाढावा मजूरीच्या १००% होईल. पण १०० हा वाढावा नफा या दृष्टीनें कच्चामाल, यंत्रें वगैरेंत गुंतवलेलें स्थिर भांडवल कमी अधिक असेल त्याप्रमाणें कमी अधिक गणला जाईल.

पुढील कोष्टकांत सर्वत्र मजूरी १०० आहे असें धरून—

| स्थिर भांडवल | एकूण भांडवल | वाढावा | नफ्याचा दर |
|---|---|---|---|
| ५० | १५० | १०० | ६६$\frac{२}{३}$% |
| १०० | २०० | १०० | ५०% |
| २०० | ३०० | १०० | ३३$\frac{१}{३}$% |
| ३०० | ४०० | १०० | २५% |
| ४०० | ५०० | १०० | २०% |

## चर भांडवलाचें उतरतें प्रमाण

वरील कोष्टकावरून दिसून येतें कीं वाढावा सारखाच असतां एकूण भांडवलाच्या वाढीच्या प्रमाणांत नफ्याच्या दराची घट होत जाते. यंत्रांचा उपयोग व त्यांची वाढ होऊं लागल्यानंतर धंद्यांची ही जी तांत्रिक प्रगति होऊं लागते तीमुळें स्थिर भांडवल वाढत जाऊन त्या

प्रमाणांत चर भांडवल कमी होत जातें. आणि म्हणून त्याबरोबरच नफ्याचा दरही कमी होत जातो. पूर्वीइतकेच मजूर आणि पूर्वी-इतकीच श्रमशक्ति यांजकडून वाढत्या प्रमाणांत यंत्रें व कच्चामाल म्हणजे स्थिर भांडवल वापरून संपविलें जात असतें.

## सामर्थ्याची वाढ, नफ्याच्या दराची घट

उत्पन्न होणारा माल जसा अधिकाधिक स्वस्त होत जातो त्याबरोबरच स्थिर भांडवलाचें मूल्य वाढत चाललेलें असतें. उत्पादनाच्या प्राथमिक अवस्थामध्यें उत्पन्न मालाच्या कोणत्याही विभागांत जितके श्रम अंतर्भूत झालेले असतात त्यापेक्षां कितीतरी कमी श्रम, यंत्रांचा उपयोग वाढत्या प्रमाणावर होऊं लागल्यानें, वस्तूच्या तेवढ्याच विभागांत अंतर्भूत होतात. याप्रमाणें नफ्याचा दर कमी कमी होत जाणें हें भांडवलशाही उत्पादनाचें, म्हणजे श्रमशक्तीचें उत्पादन-सामर्थ्य वाढत जाण्याचें एक ठळक लक्षणच आहे. याचा अर्थ इतर कारणांनींही नफ्याचा दर थोडा फार काळ कमी होणारच नाहीं असा नव्हे. पण भांडवलशाही उत्पादन जसजसें वाढत जाईल तसतसा वाढाव्याचा जो सरासरी दर असेल तो नफ्याचा दर या नात्यानें कमी कमी होत जाणार हें भांडवलशाही उत्पादनाच्या अंगभूतच आहे. मजूरांनीं वापरावयाचीं जीं धनोत्पादनसाधनें त्यांच्या प्रमाणांत मजूरांची संख्या कमी होऊं लागली म्हणजे मजूराकडून जे श्रम भांडवलदारासाठीं मोफत केले जातात व ज्यांचा वाढावा होत असतो त्यांचें प्रमाण एकंदर भांडवलाशीं कमी होत जाणें अपरिहार्य ठरतें.

## वाढावा वाढला, नफ्याचा दर घटला

नफ्याचा दर एकसारखा कमी होत असला तरी एकंदर काम-गारांच्या संख्येची आणि त्यामुळेंच वाढाव्याच्या परिमाणाचीही वाढ

होत राहूं शकते. उदा. अमूक एका देशामध्यें मजूरांची संख्या २० लक्षापासून ३० लक्षाइतकी वाढविली, व अर्थात त्यांची एकूण मजूरीही तितक्याच प्रमाणांत वाढली, अर्थात त्याबरोबरच भांडवलदारासाठीं कामगार जे मोफत श्रम करतात तेही वाढले. आणि त्यामुळें वाढावाही वाढला. पण कामगारांच्या या वाढीबरोबर कामगारांच्या उत्पादन-शक्तीचीही जर वाढ होत गेली व त्यामुळें ३० लक्ष मजूरांनीं वापरावयाचें स्थिर भांडवल मुळच्या ४० लक्षापासून १ $\frac{1}{2}$ कोटीपर्यंत गेलें तर वाढलेला वाढावासुद्धां एकंदर भांडवलाच्या प्रमाणांत कमी झालेलाच दिसून येईल. हें कोष्टक खालीलप्रमाणें मांडूं.

प्रथम४०स्थि. + २० च = ६०; २० वाढावा; ३३ $\frac{1}{3}$ % नफा

दुसऱ्यादा१५०स्थि.+३०च.=१८०;३०वाढावा; १६ $\frac{2}{3}$ % नफा

यांत वाढाव्याची रक्कम दीडपट झाली आहे. तर नफ्याचा दर निम्मा झाला आहे. म्हणजे नफ्याची एकूण रक्कम ५०% नीं वाढली असतां एकंदर वाढलेल्या भांडवलाशीं नफ्याचें प्रमाण पुष्कळच कमी झालें आहे. म्हणून भांडवलानें नेमलेल्या मजूरांची संख्या म्हणजे त्यांच्याकडून केले जाणारे श्रम—व त्यांच्याकडून उत्पन्न केला जाणारा वाढावा यांची वाढ होत राहिली असतांही नफ्याचा दर मात्र कमी कमी होत जातो. ही घटना केवळ शक्य आहे एवढेंच नव्हे तर भांडवल-शाही उत्पादनपद्धतींत अपरिहार्यच आहे. (मधून मधून होणारे चढउतार येथें लक्षांत घेतलेले नाहींत.)

## एकूण नफ्याची वाढ

नफ्याचा दर कमी कमी होत जातो याच कारणासाठीं भांडवली उत्पादन एकसारखें वाढत न्यावें लागतें, हें आपणांस पुढील प्रकरणांत समजून येईल. प्रत्येक लहान-मोठ्या कारखान्यांत श्रमक्रिया वाढत्या

प्रमाणांत चालून भांडवलाचें परिमाणही एकसारखें वाढत रहावें लागतें. यामुळें व्यक्तिशः एकेक भांडवलदाराचें वर्चस्व अधिकाधिक कामगारावर वाढत जातें. आणि त्याचा नफ्याचा दर जरी कमी कमी होत असला तरी वाढाव्याचें त्याच्या पदरांत पडणारें परिमाण मात्र वाढतच जात असतें. ज्या कारणांनीं कामगारांची अधिकाधिक मोठी संख्या एकएका भांडवलदाराच्या हुकमतीखालीं येत असते त्याच कारणांनीं कच्चामाल, इतर साहित्य, यंत्रें, वगैरेंत गुंतवलें जाणारें स्थिर भांडवलही मजूरांच्या वाढीच्या मानानें अधिकच वाढत असतें.

## किंमतीशीं नफ्याचें व्यस्त प्रमाण

श्रमाची उत्पादनशक्ति वाढत असल्यामुळें, नफ्याचा दर कमी होत असला तरी नफ्याचें एकूण परिमाण वाढतच जातें, हा जो सिद्धांत वर सांगितला त्याच सिद्धांताचें दुसरेंही एक स्वरूप असें आहे कीं, मालाच्या किंमती कमी कमी होत असतां त्या मालांच्या पोटीं असणारा आणि त्यांच्या विक्रीनें पदरांत पडणारा नफाही किंमतीशीं व्यस्त प्रमाणांत वाढत जातो.

श्रमाची उत्पादनशक्ति एकसारखी वाढत जात असल्यामुळें सतत कमी कमी मजूरांकडून अधिकाधिक धनोत्पादनसाधनांचा वापर केला जात असतो. म्हणून एकूण उत्पन्न मालांपैकीं कोणत्याही विभागांत, म्हणजे विक्रीमालाच्या प्रत्येक नगांत श्रमपरिमाण कमी कमी होत असते, व अर्थात मालाची किंमतही उतरत जाते. पण विक्रीमालाचें एकूण परिमाण वाढत जातें. वर वर पाहतांही आपणांस असें दिसून येतें कीं, विक्रीमालाच्या प्रत्येक नगामागें नफाही कमी होत आहे, त्या नगाची किंमतही कमी होत आहे. मात्र एकूण विक्रीमाल जो सर्व भांडवलानें ( तें भांडवल एका व्यक्तीचें असो अथवा समाजाचें

असो ) निर्माण केला जातो तो वाढत आहे. हा जो देखावा वर वर पाहतांही दिसतो त्यावरून भांडवलदार हा राजीखुषीनें विक्रीमालाच्या प्रत्येक नगामागें नफा कमी घेत असतो, आणि एकूण मालाचें उत्पादन अधिक करून आपलें नुकसान भरून काढतो असें मानलें जातें.

## पण नफ्याचा दर घटला नाहीं

गेल्या ( १८६७ पूर्वीच्या ) ३० वर्षांत उत्पादनशक्तीची जी अफाट वाढ झाली आहे, व यंत्राखेरीजही जें अफाट कायम भांडवल वाढलें आहे तें लक्षांत घेतां नफ्याचा दर जितक्या वेगानें व प्रमाणांत कमी व्हावा तितक्या वेगानें व प्रमाणांत कमी झालेला नाहीं याचें आश्चर्य वाटतें. पण वस्तुस्थिति तशी आहे खरी. नफ्याचा दर कमी होण्याच्या स्वाभाविक प्रवृत्तीस विघातक अशीं कांहीं कारणें येथें असलीं पाहिजेत. यापैकीं महत्त्वाचीं कांहीं कारणें पुढीलप्रमाणें आहेत.

## वेळ वाढविण्याची संकुचित मर्यादा

नफ्याच्या दरांत जी घट होत असते त्यामुळें होणारें नुकसान भरून काढण्यासाठीं श्रमशक्तीची अधिक तीव्र पिळणूक करण्याचा प्रयत्न भांडवलदार करीत असतो. व्यक्तिशः प्रत्येक कामगाराकडून अधिक माल निर्माण करून घेतला पाहिजे, म्हणजेच श्रमाचा दिवस अधिक वाढवून आणि कामगाराच्या श्रमशक्तीवर अधिक ताण पाडून त्याच्यापासून अधिक मूल्य मिळविलें पाहिजे. कामाचा दिवस वाढविण्याचें कार्य यंत्रांच्या साहाय्यानें कसें केलें जातें हें मागील प्रकरणांत आलेंच आहे. पण असा दिवस वाढविण्यास बरीच संकुचित अशी मर्यादा पडणें अपरिहार्य असतें. रोज १२ तासप्रमाणें २ कामगार खपूं लागले तर जितका वाढावा निर्माण करतील तो २४ कामगार प्रत्येकीं २ तास खपून जितका वाढावा निर्माण करतील तितका असणार नाहीं. मग हीं दोन

माणसें नुसतीं हवेवर जगलीं व त्यांनीं कांहींही मजूरी घेतली नाहीं, असें मानलें तरी त्यांचा वाढावा कमीच राहील. अशा उपायांनीं नफ्याच्या दराची घट मर्यादित केली जाते, पण अजीबात नाहींशी होत नाहीं.

श्रमाची तीव्रता वाढवून व्यक्तिशः प्रत्येक कामगाराकडून मिळणारा वाढावा अधिक करण्याचा आणखी एक मार्ग म्हणजे कामगारांच्या एकूण संख्येंत घट करून मजूरीही श्रमशक्तीच्या मूल्याहून कमी करणें हा होय. नफ्याच्या दराची घट थांबविण्याचें हें जास्तीत जास्त महत्त्वाचें साधन होय.

## नफा वाढविण्यासाठीं भांडवलाची वाढ

पुढें अशी परिस्थिति निर्माण होते कीं, स्थिर भांडवलाचें मूल्य हें त्याच्या परिमाणाच्या वाढीच्या प्रमाणांत वाढत नाहीं. उदा. पूर्वीं सूत कातण्याच्या हातराहाटानें एक युरोपियन कामगार जितका कापूस कातीत असे त्यापेक्षां हल्लींचा यांत्रिक राहाटावर काम करणारा कामगार कितीतरी अधिक कापूस काततो. पण ह्या कापसांत गेलेलें मूल्य कापसाचें परिमाण वाढलें त्या प्रमाणांत वाढलेलें नसतें. यंत्र व स्थिर भांडवल यांचाही प्रकार असाच आहे. पण नफ्याच्या दराची घट थांबवून सर्वनाश टाळण्याचा अतिशय महत्त्वाचा उपाय म्हणजे भांडवलाची सतत वाढ करणें हा होय. आर्थिक उत्पादनाची प्रगति होतां होतां नफ्याचा दर २० टक्क्यावरून १० टक्क्यावर आला तर यापुढें कांहींही केलें तरी १०० भांडवलावर १० च वाढावा मिळेल अधिक मिळणें शक्य नाहीं. पण यामुळें होणारें नुकसान भांडवल दुप्पट करून भांडवलदार भरून काढूं शकतो. आणि यामुळें त्याच्या नफ्याचें परिमाण कायम राहतें. असें भांडवल वाढवून त्याला आपला नफा वाढविणेंही शक्य असतें.त्यासाठीं त्याला आणखी भांडवल घालावें लागतें.

# भांडवलाचा संचय : : : १२

## धनोत्पादनाचा अखंड क्रम*

कोणत्याही समाजाला धनाचा उपभोग थांबविणें जसें अशक्य असतें तसेंच धनाचें उत्पादन थांबविणेंही अशक्य असतें. त्याचप्रमाणें उत्पन्न मालांतील कांहीं भागाचें रूपांतर धनोत्पादन-साधनांत केल्यावांचून कोणत्याही समाजाला उत्पादनकार्य चालू ठेवतां येत नाहीं. इतर सर्व परिस्थिति आहे तशीच आहे असें धरून चाललें असतां धनाच्या पुनरुत्पादनाचा अत्यवश्य मार्ग म्हणजे एक वर्षाच्या उत्पादन क्रियेंत वापरून संपलेलीं श्रमाचीं हत्यारें, कच्चामाल, व इतर साहाय्यक साहित्य-इत्यादि प्रकारचीं धनोत्पादन-साधनें पहिल्या इतकीं निर्माण करून ठेवणें हाच होय. हीं धनोत्पादन-साधनें दरसाल उत्पन्न होणाऱ्या मालांतून काढून ठेवावीं लागतात. उत्पादन-क्रियेंत तीं पुन्हां वापरावीं लागतात. आणि म्हणून त्यांच्या अंगीं या उत्पादनाच्या प्रक्रियेस अवश्य असे गुण असावे लागतात.

---

* कॅपिट्ल, खं. २, प्रकरण २३

भांडवलशाही समाजांत सर्व धनोत्पादनसाधनें भांडवलाचें काम करतात. कारण त्या साधनांच्या मालकाला रोजमजूर नेमून त्यांच्यापासून वाढावा मिळविण्यास या भांडवलाचीच मदत होते. वास्तविक भांडवलदाराची इच्छा वाढावा एकदांच मिळवून टाकावा अशी नसून आपल्या भांडवलापासून सतत वाढावा मिळत जावा अशी त्याची इच्छा असते.

## मजूरच मजूरी निर्माण करतो

हा वाढावा भांडवलदार जर सालोसाल खाऊन टाकील तर दरसाल धनाचें अगदीं साधें पुनरुत्पादन होईल. तरी पण ह्या साध्या पुनरुत्पादनामुळें सुद्धां पुन्हांपुन्हां होणाऱ्या ह्या उत्पादनाचें स्वरूप बदलतें.

अमुक एका मुदतीसाठीं मजूरांची श्रमशक्ति खरेदी करणें ही गोष्ट उत्पादनक्रियेला पूर्वावश्य असते. परंतु मजूरानें आपली श्रमशक्ति पूर्ण वापरून टाकल्याशिवाय व त्या श्रमशक्तीचें मूल्य आणि वाढावा मालाच्या स्वरूपांत भांडवलाच्या मालकाच्या पदरांत पडल्याशिवाय मजूरास मजूरी मिळत नाहीं. म्हणून मजूर केवळ वाढावाच निर्माण करतो असें नव्हे तर मजूराला ज्यांतून मजूरी मिळते तो मजूरीफंडही कामगारच निर्माण करतो. प्रथम तो मालाच्या स्वरूपांत हा फंड निर्माण करतो, आणि मग मजूरीच्या स्वरूपांत हा फंड त्याच्याकडे परत येत असतो. जोंवर हा मजूरीफंड कामगार निर्माण करीत राहील तोंवरच त्याची नोकरी टिकूं शकते. मजूरी ही अशा प्रकारें कामगाराकडून सतत पुन्हांपुन्हां उत्पादन केल्या जाणाऱ्या धनाचाच एक अंश असते. भांडवलदार मजूरी ही पैशाच्या रूपांत देतो हें खरें तथापि मजूराच्या श्रमांतून निर्माण झालेल्या धनाचें रूपांतर असाच हा पैसा असतो. मजूराचे गेल्या आठवड्याचे अथवा गेल्या सालाचे जे श्रम

ते त्याची या आठवड्याची अथवा या सालाची मजूरी भागवितात. पैशाच्या मध्यस्तीमुळें आपणांत यासंबंधानें भ्रम होत असतो. पण एक भांडवलदार व एक मजूर असें लक्षांत न घेतां सर्व भांडवलदार व सर्व मजूरवर्ग आपण लक्षांत घेऊं तर आपला भ्रम अजिबात नाहींसा होईल. भांडवलदार मजूराला जो पैसा म्हणून देत असतात त्या वास्तविक हुकूमचिठ्ठ्या असतात. मजूरांनीं जो माल निर्माण केला आणि भांडवलदारांनीं जो आपल्या मालकीचा केला त्यांतला कांहीं मजूरांनीं घ्यावा असा हुकूम या चिठींत असतो. मजूर हे या हुकूमचिठ्या सतत जशा मिळवतात तशाच त्या परत भांडवलदार वर्गाकडे देत असतात. आणि त्याजपासून आपणच उत्पन्न केलेल्या मालाचा अंश परत घेत असतात. ह्या व्यवहाराचें सत्यस्वरूप, उत्पन्न मालाला विक्री-मालाचें स्वरूप दिलें जातें आणि पैशाशीं त्याचा विनिमय होतो यामुळें झाकलें जातें.

## आरंभीं भांडवल होतें

मजूरी ही भांडवलदाराच्या मालकीच्या मजुरी-फंडांतून दिली जाते हा भ्रम भांडवलशाही उत्पादनाची सर्व प्रक्रिया पुन्हापुन्हां धनोत्पादनाचें कार्य चालू असतांना आपण पाहिली म्हणजे नाहींसा होतो हें खरें. पण या उत्पादनप्रक्रियेस कोठेंतरी आरंभ झालेला असला पाहिजे. म्हणून आपण तूर्त असें धरून चालूं कीं, कोणे एके काळीं मजूराकडून मोफत श्रम न घेतांही भांडवलदाराजवळ पैसा उत्पन्न झाला. तो कसाही उत्पन्न झालेला असो, ही उत्पादनाची प्रक्रिया सतत चालू राहिली म्हणजे साध्या पुनरुत्पादनानेंही उत्पादन-व्यवहारांत आश्चर्यकारक पालट घडून येत असतात. त्यांचा परिणाम चर भांडवल व एकूण भांडवल या दोहोंवरही होत असतो.

## भांडवल खावून संपलें

५००० डॉ. भांडवलावर जर दरसाल १००० डॉ. वाढावा सुटेल आणि जर हा वाढावा दरसाल भोगून संपवला जाईल तर ५ वर्षांच्या शेवटीं ५ × १००० डॉ. = ५००० डॉ. इतकें धन भोगून संपेल. मूळ घातलेल्या भांडवलाइतकें हें संपलेलें धन होतें. या वाढाव्यापैकीं कांहीं भाग, समजा, निम्मा भोगला असता तर १० वर्षांच्या शेवटीं तितकेंच भांडवल भोगून संपलें असतें. १० × ५०० डॉ. = ५००० डॉ. इतका वाढावा १० वर्षांत भोगून संपला असता. सामान्य नियम असा कीं अमुक इतक्या वर्षांच्या शेवटीं, जितकें भांडवल आरंभीं घातलेलें असतें तितका वाढाव्यांतला अंश भोगून संपविला जातो. आपणास मोफत मिळालेल्या श्रमाचें फळ म्हणजे वाढावा आपण खाऊन टाकत असून मूळ भांडवल आपण कायम ठेवीत आहों असें भांडवलदार मानीत असतो. पण त्याचें स्वतःचें मत कांहींही असलें तरी त्यामुळें वस्तुस्थिति बदलत नाहीं. अमुक इतक्या वर्षानंतर त्याच्याजवळ जें भांडवलरूपीं मूल्य इतक्या वर्षांत जमलेलें असतें तें तितक्या वर्षांत मिळालेल्या वाढाव्याइतकें असतें आणि मूळच्या भांडवलाइतकें मूल्य त्यानें भोगून टाकलेलें असतें. त्याच्या हातीं असलेल्या भांडवलाचें परिमाण बदललेलें नाहीं. आणि त्यापैकीं एक अंश म्हणजे इमारती, यंत्रें वगैरे त्यानें धंदा सुरू केला त्यावेळीं अस्तित्वांत होत्या हें खरें. पण आपल्याला या ठिकाणीं भांडवलाच्या तपशीलाच्या स्वरूपांचा विचार करावयाचा नसून त्याच्या मूल्याचा विचार करावयाचा आहे. ज्यावेळीं एखादा मनुष्य आपल्या मालमत्तेइतकें कर्ज अंगावर घेऊन मालमत्तेची विल्हेवाट लावतो त्यावेळीं त्याची मालमत्ता म्हणजे त्याचें सर्व कर्ज हींच होय. भांडवल-

दाराची गोष्ट अशीच आहे. आपल्या मूळच्या भांडवलाइतकें धन त्यानें भोगून टाकलें याचा अर्थ त्याचें हल्लींचें भांडवल हें त्याला मोफत मिळालेल्या वाढाव्याचें बनलें आहे हाच होय. त्याच्या मूळच्या भांडवलाचा एक कणही शिल्लक राहिलेला नाहीं.

## मूळ भांडवलाच्या जागीं वाढावा येतो

म्हणून उत्पादनप्रक्रिया ही नुसती सतत चालू ठेवली अथवा वेगळ्या शब्दांत सांगावयाचें तर अगदीं साधें पुनरुत्पादन चालू ठेवलें तर लवकर अथवा उशिरा पण खात्रीनें प्रत्येक भांडवलाच्या जागीं भांडवलस्वरूप पावलेला वाढावा येऊन बसतो. जरी तें भांडवल पहिल्यानें भांडवलाच्या मालकानें स्वतःच्या श्रमानें निर्माण केलेलें असलें तरी लवकर किंवा उशिरा तें पैसा अथवा दुसऱ्या एखाद्या स्वरूपांत दुसऱ्याच्या मोफत मिळालेल्या श्रमाचें रूप घेतें.

## मजूर कायमचा कफल्लक

आपल्या पैशाला, दुसऱ्यांचे श्रम पिळून घेण्याचें साधन करण्यासाठीं भांडवलाचें रूप जेव्हां भांडवलदार देतो त्यावेळीं तो मजूरांच्या बाजारांत, ज्याचेजवळ उत्पादनाचें अथवा चरितार्थाचें असें कांहीं साधन उरलेलें नाहीं अशा मजूरासमोर उभा राहतो. भांडवलशाही उत्पादनाचा वास्तविक पाया आणि आरंभबिंदु हा आहे. पण केवळ आहे तेवढ्या परिमाणांत उत्पादनप्रक्रिया सतत चालू ठेवण्यानें म्हणजेच साध्या पुनरुत्पादनानेंही ही परिस्थिति पुन्हां पुन्हां निर्माण करतां येते. उलट उत्पादनाच्या प्रक्रियेमुळें भौतिक धनाला भांडवलाचें रूप सतत येत राहतें. हें भांडवल नवीन धनोत्पादनाचें साधन आणि भांडवलदाराच्या उपभोगाचेंही साधन होत असतें. पण मजूर मात्र

या उत्पादनप्रक्रियेंतून बाजूला होतो त्यावेळीं, आंत शिरतांना जसा कोराचाकोरा आंत शिरतो तसाच कोराचाकोरा बाहेर येतो. तो स्वतः धनाचें उगमस्थान आहे. पण आपल्यापासून उगम पावलेलें धन मालकींत घेण्याचें साधन मात्र त्याजजवळ नाहीं. ज्याअर्थी उत्पादनप्रक्रियेंत शिरण्यापूर्वीं त्यानें आपली श्रमशक्ति विकून टाकल्यामुळें त्याचे श्रम हे त्याच्या ताब्यांतून गेले आहेत, ते भांडवलदारानें आपल्या मालकींत आणले असून भांडवलांत अंतर्भूत केले आहेत, त्याअर्थीं उत्पन्न झालेला मालही भांडवलदाराच्याच मालकीचा होतो. हें सतत पुनरुत्पादन, मजूराला सतत मजूरच ठेवण्याचा हा प्रकार, भांडवलशाही उत्पादन-पद्धतीला अपरिहार्य असणारी अशी अवश्य परिस्थिति आहे.

## उत्पादक वापर व वैयक्तिक वापर

मजूर हा दोन प्रकारांनीं धनाचा वापर करीत असतो. धनोत्पादन करीत असतांना आपल्या श्रमानें तो उत्पादनाचीं साधनें वापरून टाकून धंद्यांत घातलेल्या भांडवलापेक्षां अधिक मूल्याच्या वस्तूंत त्यांचें रूपांतर करतो. हा त्यांचेकडून होणारा उत्पादक असा वापर होय. तसेंच भांडवलदाराकडून त्याच्या श्रमशक्तीचा होणारा वापरही हाच होय. उलट मजूर हा त्याला त्याच्या श्रमशक्तीच्या मोबदल्यांत दिल्या जाणाऱ्या पैशाचें चरितार्थ-साधनांत रूपांतर करीत असतो. हा त्याजकडून होणारा वैयक्तिक वापर (म्हणजे वैयक्तिक धनोपभोग) होय. यावरून मजूरांकडून होणारा उत्पादक वापर आणि वैयक्तिक वापर हे दोन्ही अगदीं भिन्न असतात असें दिसून येईल. उत्पादक-वापरामध्यें मजूर हा भांडवलाची गतिशक्ति म्हणून काम करीत असून हा वापर करीत

असतांना स्वतः मजूर भांडवलदाराच्या मालकीचा असतो. पण वैयक्तिक वापर करीत असतां (म्हणजे धनाचा उपभोग घेत असतां) तो आपला आपण मालक असतो. आणि उत्पादनप्रक्रियेच्या क्षेत्राबाहेरचें व स्वतःच्या जीवनाला आवश्यक असें हें उपभोगकार्य तो करीत असतो. पहिल्या म्हणजे उत्पादक वापरानें भांडवलदार जगत असतो. आणि दुसऱ्या म्हणजे वैयक्तिक वापरानें मजूर जगत असतो.

## यंत्राला कोळसा तसें मजूराला अन्न

मजूराला आपला वैयक्तिक वापर (म्हणजे वैयक्तिक धनोपभोग) हा उत्पादनकार्यांतील एक घटक बनवावा लागतो हें खरें. या दृष्टीनें स्वतःची श्रमशक्ति टिकवून धरण्यासाठीं तो स्वतःला जीवनार्थ अवश्य अशा वस्तु पुरवीत असतो. वाफेच्या एंजिनाला कोळसा आणि पाणी पुरवणें अथवा यंत्राला तेल लावणें यासारखेंच मजूराचें हें करणें होय, अर्थात् केवळ भांडवलशाही उत्पादन पद्धतींतच घडणारी गोष्ट ही आहे असें म्हणण्याचें मुळींच कारण नाहीं.

## नव्या श्रमशक्तीचें उत्पादन

आपण एक भांडवलदार आणि एक मजूर असा विचार न करतां एकंदर भांडवलदार वर्ग व एकंदर मजूर वर्ग असा विचार जर करूं लागलों, एकच उत्पादनाचा धंदा लक्षांत न घेतां एकंदर भांडवलशाही उत्पादन प्रत्यक्ष सामाजिक प्रमाणानें चाललेलें लक्षांत घेतलें तर याच परिस्थितीचें रूप अगदीं वेगळें दिसतें. आपल्या भांडवलाच्या कांहीं भागाचें रूपांतर श्रमशक्तींत करून भांडवलदार आपल्या एकंदर भांडवलाचें मूल्य वाढवीत असतो. तो एका धोंड्यानें दोन पक्षी मारतो. मजूरांकडून तो जें मिळवतो त्यापासूनच तो नफा मिळवतो

असें नव्हे तर मजूराला तो जें देतो त्यापासूनही तो नफा मिळवीत असतो. श्रमशक्तीच्या मोबदल्यादाखल जें भांडवल तो मजूराला देत असतो त्याचें मजूराच्या स्नायूंत, ज्ञानतंतूंत, हाडांत, मेंदूत वगैरेंत रूपांतर होऊन नवीन मजूरही त्यापासून निर्माण होत असतात. या प्रमाणें मजूर वर्गाकडून धनाचा जो वैयक्तिक वापर म्हणजे उपभोग शक्य तितक्या संकुचित मर्यादेंत केला जातो त्यामुळें, श्रमशक्तीच्या मोबदल्यांत दिल्या जाणाऱ्या भांडवलानें जें चरितार्थसाधन मजूरांना दिलें त्या चरितार्थसाधनाचे पुन्हां ताज्या श्रमशक्तींत रूपांतर होऊन ही ताजी श्रमशक्ति भांडवलदाराच्या हातीं पुन्हां वापरली जाण्यास सिद्ध असते.

## वैयक्तिक उपभोग हा उत्पादनाचा भाग

भांडवलदाराच्या उत्पादनप्रक्रियेस अवश्य असणाऱ्या धनोत्पादन साधनाचें म्हणजे मजूराचेंच हें उत्पादन व पुनरुत्पादन होय. म्हणून मजूर धनाचा जो एकंदरीनें वापर करतो तो त्यानें श्रमगृहांत केलेला असो, अथवा बाहेर केलेला असो, तो उत्पादन-प्रक्रियेचा भाग असो अथवा नसो तो वापर भांडवलाच्या उत्पादनाचा व पुनरुत्पादनाचा एक महत्त्वाचा घटक ठरतो. यंत्र चालू असतां अथवा थांबलेलें असतां त्याची घासपूस करणें ही क्रिया जशी भांडवलाच्या उत्पादनाची व पुनरुत्पानादची घटक आहे त्याप्रमाणेंच मजूराकडून कारखान्यांत अथवा कारखान्याबाहेर होणारा धनाचा उपभोग हाही त्याचा घटक असतो. मजूर हा चरितार्थ-साधन हें स्वतःच्या हितासाठीं वापरतो म्हणजे उपभोगतो, भांडवलदाराच्या सुखासाठीं उपभोगत नाहीं ही बाब अला-हिदा आहे. एखादें ओझ्याचें जनावर अन्न खातें तेव्हां त्यापासून त्याला स्वतःला आनंद होतो हें खरें असलें तरी तेवढ्यामुळें त्याचें अन्न

खाणें हें धनोत्पादन-प्रक्रियेचा भाग होत नाहीं असें नव्हे. मजूरांना पोसणें आणि त्यांचें पुनरुत्पादन करणें ही गोष्ट भांडवलाच्या पुनरुत्पादनास पूर्वावश्य परिस्थितिच आहे. पण ही गोष्ट घडवून आणण्याची जबाबदारी भांडवलदार हा मजूराच्या—आत्मरक्षण करणें व प्रजोत्पादन करणें या नैसर्गिक—प्रवृत्तींवर निर्धास्तपणें सोपवूं शकतो. मजूरानें धनाचा जो वैयक्तिक उपभोग घ्यावयाचा तो शक्य तितका कमी घ्यावा एवढी एक काळजी भांडवलदार घेत असतो. दक्षिण अमेरिकेंतील कांहीं मालक आपल्या मजूरांना सक्तीनें कसदार अन्न खायला लावतात, असा पाशवी अत्याचार करण्याचा प्रयत्न भांडवलदार करीत नाहीं.*

## उत्पादक आणि अनुत्पादक भोग

भांडवलदार आणि भांडवलदारी अर्थशास्त्रज्ञ म्हणजे भांडवलशाहीचें ध्येय सांगणारे भांडवलदारांचें प्रतिनिधि यांच्या मतें मजूरवर्ग

* " दक्षिण अमेरिकेंतील खाणींतल्या कामगारांचें रोजचें काम सगळ्या जगांतील कोणत्याही कामापेक्षां अधिक जड असेल. ४५० फूट खोल अशा खाणीच्या तळांतून १८० ते २०० पौंड वजनाच्या धातूचें ओझें या प्रत्येक मजूराला खांद्यावरून खाणीच्या पृष्ठ भागावर आणावें लागतें; त्यांना भाकर व वाटाणे खायला घालून जगवतात. स्वतः मजूरांना नुसती भाकर खाऊन जगण्यांतच आनंद वाटेल. पण नुसत्या भाकरीवर मजूर इतकें अवजड काम करूं शकत नाहींत असें दिसून आल्यावरून, घोड्याला ज्याप्रमाणें अगांत ताकद रहावी म्हणून कसदार अन्नाचा तोबरा देतात त्याप्रमाणें मालक लोक या मजूरांना सक्तीनें वाटाणे खायला घालतात. वाटाण्यांत भाकरीपेक्षां हाडांचें द्रव्य ( फॉस्फेट ऑफ लाईम ) अधिक असतें. " ( लायबिग : केमिस्ट्री इन् इट्स् अॅप्लिकेशन टु अॅग्रिकल्चर अॅंड फिजिऑलॉजी १८६२ )

कायमचा जिवंत राहण्याच्या दृष्टीनें आवश्य इतका मजूराकडून घेतला जाणारा धनोपभोग हाच खरा उत्पादक असतो. म्हणून भांडवलदाराला वापरण्यासाठीं पुरेशी श्रमशक्ति मिळावी या दृष्टीनें मजूराकडून हा धनोपभोग होणें अवश्यच असतें. पण याच्यापलीकडे केवळ स्वतःच्या सुखासाठीं मजूराकडून जो धनोपभोग घेतला जाईल तो मात्र अनुत्पादक उपभोग होय. ( जेम्स्‌मिलः इलेमेंट्स्‌ ऑफ पोलिटिकल इकॉनमी )

## स्वातंत्र्य देखाव्यामागें अदृश्य बंध

म्हणून सामाजिक दृष्टीनें पाहतां मजूरवर्ग हा प्रत्यक्ष श्रमप्रक्रियेंत नसतो त्या वेळींही सर्वसामान्य हत्याराप्रमाणेंच भांडवलाला जखडलेला एक अवयव असतो. तो ज्यावेळीं धनाचा वैयक्तिक उपभोग घेत असतो त्यावेळीं कांहीं एका मर्यादेपर्यंत भांडवलाच्या पुनरुत्पादन क्रियेचा केवळ एक घटक याच नात्यानें तो वागत असतो. मजूर हे जाणीवयुक्त हत्यारें असतात. पण या जाणीवयुक्त हत्याराकडून हा धनोपभोग छपविला जाऊं न देण्याची काळजी धनोत्पादनप्रक्रिया घेत असतेच. मजूरीच्या रूपानें खर्च केलें जाणारें जें भांडवल, त्याचा बनलेला माल असे जे मजूर त्यांचें भांडवलदाराच्या मालकीच्या संपत्तींत सतत रूपांतर केलें जात असतें. मजूराकडून वैयक्तिक उपभोग घेतला जातो त्यामुळें एकीकडून मजूरांचें जगणें व त्यांचें पुनरुत्पादन या दोन गोष्टी घडून घेत असतात.त्याबरोबरच चरितार्थ-साधनांच्या ( उपभोगानें होणाऱ्या ) संहारामुळें मजूरांच्या बाजारांत पुन्हां पुन्हां नवे कामगार येण्याची सोय होत असते. रोमन गुलाम हा बेड्यांनीं जखडलेला असतो. रोज मजूर हा अदृश्य अशा दोऱ्यांनीं बांधलेला असतो. वरचेवर मालक बदलण्यानें आणि कायदेशीर करारानें, त्याच्या स्वातंत्र्याचा देखावा कायम ठेवण्यांत येतो.

पूर्वी जरूर त्या त्या वेळीं स्वतंत्र मजूरावर आपला मालकी हक्क गाजविण्यासाठीं भांडवलदार कायद्याचा आश्रय करीत. उदा. इंग्लंडांत १८१५ मध्यें यंत्रावर नेमलेल्या यंत्रज्ञाला परदेशगमनास बंदी असून परदेशगमनाला शारीरिक शिक्षा व आर्थिक दंडही होत असे.

## कसबाची कायम तरतूद

कामगारांचें पुनरुत्पादन करण्याच्या जबाबदारीबरोबरच काम करण्याचें चातुर्य संपादन करणें आणि तें इतरांना शिकवणें हीहि जबाबदारी कामगारवर्गावर ओघानें येतें. कारण कारागिरीचें कसब कामगारांना एका पिढीकडून दुसऱ्या पिढीस द्यावें लागतें. असा कसबी कामगारवर्ग उत्पादनाचा घटक या नात्यानें आपल्याजवळ हक्कानें असावा याचें महत्त्व भांडवलदारास किती वाटत असतें ही गोष्ट, आर्थिक संकटामुळें कसबी कामगार गमावण्याची वेळ भांडवलदारास आली म्हणजे कळून येते. अमेरिकेमध्यें जेव्हां यादवी माजली आणि त्यामुळें कापसाचा प्रचंड दुष्काळ पडला तेव्हां लँकॅशयरमधील पुष्कळसे कामगार बेकार झाले ही गोष्ट प्रसिद्ध आहे. त्यावेळीं मजूरवर्गाकडून व समाजांतील इतर वर्गाकडूनही बेकार कामगारांना अमेरिकेस अथवा इतर वसाहतींत जातां यावें यासाठीं सरकारी मदत मिळावी अथवा खाजगी वर्गण्या जमवाव्या अशी मागणी करण्यांत आली. त्यावर २४ मार्च १८६३ या दिवशींच्या 'टाईम्स'मध्यें मँचेस्टर चेंबर ऑफ कॉमर्सचा एक माजी अध्यक्ष एडमंड पॉटर यानें एक पत्र लिहिलें. या पत्राचें वर्णन हौस ऑफ कॉमन्समध्यें 'कारखानदारांचा जाहीरनामा' असें अगदीं यथार्थपणें केलें गेलें होतें. त्यांतील कांहीं महत्त्वाचे उतारे खालीं देतों. भांडवलदाराचा मजूरांच्या श्रमशक्तीवर

मालकी हक्क असतो, ही गोष्ट या उताऱ्यांत अगदीं निःसंकोचपणें सांगितली आहे.

## कामगाराला देशांतराला बंदी

" त्याला " ( म्हणजे बेकार माणसाला )—" असें सांगण्यांत येत असावें कीं ' कापूस कामगारांचा पुरवठा हल्लीं फार आहे. तो निदान $\frac{1}{3}$ तरी कमी केला पाहिजे. म्हणजे बाकीच्या $\frac{2}{3}$ ना चांगली मागणी येईल. ' फालतू कामगारांना देशांतर करूं द्यावें, अशी लोकमताची मागणी आहे. पण मालकांना म्हणजे कापूस-कारखानदारांना आपला मजूरांचा पुरवठा अशा रीतीनें कमी होणें हें सहन होणार नाहीं. हा पुरवठा कमी होणें हें अन्याय्य आहे व धंद्याच्या दृष्टीनेंही गैर आहे असें त्यांना वाटेल व ते कदाचित रास्तही असेल; जर या मजूरांच्या देशांतरासाठीं जनतेनें फंड जमवणें हें योग्य असेल तर कारखानदारालाही आपली बाजू जनतेपुढें मांडण्याचा व या देशांतरास विरोध करण्याचा हक्क आहे. "

## एका पिढीचें नुकसान

यानंतर कापसाचा व्यापार हा किती उपयुक्त आहे हें सांगून पॉटर लिहितो : " या व्यापारानें आयर्लंडामध्यें फालतू असलेली कितीतरी लोकसंख्या व तशीच खेड्यांतील शेतीत असलेली फालतू लोकसंख्या शहरांत आणून कामास लावली. या धंद्याचा व्याप कितीतरी प्रचंड आहे. १८६० सालच्या निर्यात मालांत $\frac{2}{3}$ माल नुसत्या कापूस कारखान्याचा होता. बाजाराचें क्षेत्र वाढलें, विशेषतः हिंदुस्थानांतील बाजारक्षेत्र वाढलें आणि ६ पेन्सला १ पौंड या दरानें भरपूर कापूस मिळूं लागला म्हणजे थोड्याच वर्षांत हा व्यापार कितीतरी प्रचंड प्रमाणांत वाढेल. एक, दोन अथवा तीन वर्षांत या धंद्यांत भरपूर माल

निर्माण होऊं लागेल. म्हणून मी आतां असा प्रश्न विचारतों कीं हा धंदा जिवंत ठेवण्याला लायख आहे कीं नाहीं? या धंद्याचीं यंत्रें (पॉटर जिवंत मजूरांना यंत्रें संबोधून बोलत आहे.) व्यवस्थित ठेवणें योग्य आहे कां हीं यंत्रें फेकून देणें हा महामूर्खपणा आहे? कामगार हे कोणाची मिळकत नव्हेत, लँकेशयर आणि तेथील कारखानदार यांची ते मालमत्ता नव्हेत.पण दोघांचेंही ते सामर्थ्य आहेत. हे कामगार म्हणजे कारखानदारांची मानसिक व शिक्षित शक्ति होत. एकदां ही शक्ति नाहींशी झाली म्हणजे एक पिढीचा काळ संपेपर्यंत तिची जागा भरून येणार नाहीं. हे मजूर ज्या यंत्रावर कामें करतात त्यांतील पुष्कळशीं बदलून नवीं आणणें फायदेशीर ठरेल. दर १२ महिन्यालाही हीं यंत्रें बदलणें फायदेशीर होईल.*

## मजूरांच्या देशांतरानें प्रचंड नुकसान

श्रमशक्तीला देशांतर करण्यास उत्तेजन द्यावें अथवा परवानगी द्यावी पण भांडवलदाराची काय वाट! कामगारांतील चांगले चांगले

* ज्यावेळीं मजूरीचे दर उतरविण्याचा प्रसंग सर्वसामान्य परिस्थितींत येत असतो त्यावेळीं हेच भांडवलदार वेगळें गाणें गात असतात. सर्व भांडवलदार एक सुरांत म्हणतात "सर्व कारखाना कामगारांनीं एक गोष्ट स्वतःच्या हिताच्या दृष्टीनें लक्षांत ठेवावी कीं त्यांचें काम हें खरोखर अगदीं हलक्या दर्जाच्या कसबाचें असतें. तें कसब अगदीं सहज मिळवितां येतें. त्याला मजूरीहि भरपूर मिळतें. अगदीं थोडया शिक्षणानेंहि हें कसब प्राप्त होऊं शकतें. मालकांचीं यंत्रें (आतांच या यंत्रांची १२ महिन्यात वास-लात लावण्याची तयारी दाखवण्यांत येत आहे.) हींच कामगाराच्या कसबापेक्षां व श्रमापेक्षां अधिक महत्त्वाचें काम धनोत्पादनाच्याकामीं करतात. सामान्य मजूराला ६ महिन्यांचें शिक्षण दिलें तरी हें कसब प्राप्त होऊं शकतें." (एक पिढी गेली तरीहि कसबी कामगाराची जागा भरून निघत नाहीं असें आतांच पॉटर लिहीत आहे.)

कामगार जर काढून घेतलें तर कायम भांडवलाचा बाजारभाव कितीतरी कमी होईल. आणि हें भांडवल हातीं ठेवून हलक्या दर्जाच्या मजूरांच्या अगदीं तोकड्या पुरवठ्यावर उत्पादनव्यवसाय करणें शक्य होणार नाहीं. मजूरांची देशांतर करण्याची इच्छा आहे असें आम्हाला सांगण्यांत येतें. त्यांना अशी इच्छा व्हावी हें अगदीं साहाजिक आहे. मजूरांना कमी करा, कारखानदारींतील कामगारवर्ग कमी करून, मजूरीवर कारखानदाराकडून होणारा खर्च $\frac{1}{5}$ इतका अथवा ५० लाखापर्यंत कमी करून पहा म्हणजे या मजूरांच्यावरील वर्ग, जो लहान दुकानदारांचा वर्ग त्याचें काय होईल? आणि मजूरांच्या झोपड्यांना भाडीं कोठून मिळतील? आणखी वर चला. लहान शेतकऱ्याचें काय होईल? साधारण सधन मालक तसेंच मोठा जमीन-मालक या सर्वांचें कसें होईल? अर्थात देशांतील उत्कृष्ट कारागीर लोकसंख्येपैकीं बराचसा भाग परदेशी पाठवून व उत्पादक कारखानदारीचें पुष्कळसें मूल्य त्यायोगें कमी करून सर्व राष्ट्रांतील सर्व वर्गांना विघात करणारी अशी मजूरांच्या या देशांतरासारखी दुसरी एखादी सूचना असूं शकेल काय? उत्तम कामगार कारखाना-मालकांनीं अथवा जमीन-मालकांनीं गमवावा, त्यामुळें उरलेल्या मजूरांनाही नाउमेद वाटावें, आणि सगळें भांडवल व एका सबंध प्रांतांतलें सर्व मूल्य नाहींसें व्हावें याहून एखादी अधिक भयंकर गोष्ट असूं शकेल काय?"

## मजूरही यंत्रच!

कारखानदारांचा निवडक प्रतिनिधि असा हा पॉटर "यंत्राचे" दोन विभाग कल्पितो. त्यापैकीं एक विभाग नेहमीं कारखान्यांत असतो. आणि दुसरा विभाग रोज रात्रीं आणि रविवारीं सबंध

दिवसरात्र कारखान्याच्या बाहेर झोंपड्यांतून ठेवलेला असतो. एक विभाग निर्जीव असतो, दुसरा सजीव असतो. निर्जीव यंत्रें रोज रोज झिजत असतात व त्यांची किंमत कमी होत असते. पण त्यांतील बराचसा भाग सतत होणाऱ्या यांत्रिक प्रगतीमुळें इतका लौकर मागें पडत असतो कीं थोड्या महिन्यांनीं सुद्धां नवीं यंत्रें त्याच्या बदली आणणें फायदेशीर ठरतें. उलट जिवंत यंत्रें जितकीं अधिक काळ टिकतात तितकीं तीं कसब संचित झाल्यामुळें व तें पिढ्यानुपिढ्या संक्रमित झाल्यामुळें अधिक चांगलीं होतात. ' टाईम्स ' नें पॉटरला पुढीलप्रमाणें उत्तर दिलें.

" मि. एडमंड पॉटर यांच्या मनावर कापूस-धंदेवाल्यांच्या अगदीं अद्वितीय श्रेष्ठतेचा परिणाम इतका दृढ झालेला दिसतो कीं या धंदे-वाल्या वर्गांना जगवण्यासाठीं व त्यांचा धंदा कायम टिकवण्यासाठीं पॉटर हे कामगारांच्या इच्छेविरुद्धही ५ लक्ष कामगारांना एका मोठ्या नैतिक श्रमगृहांत कोंडून ठेवण्यास तयार झाले आहेत. पॉटर विचारतात 'हा धंदा जगविण्याच्या लायखीचा आहे काय ?' आमचें उत्तर असें कीं, जरूर टिकवावा. पण सर्व प्रकारच्या प्रामाणिक उपायांनीं टिकवावा. ' या धंद्याची यंत्रसामुग्री शाबूत ठेवण्याच्या लायखीची आहे काय ?' असा पॉटर यांचा आणखी एक प्रश्न आहे.

## हें स्फोटक ' यंत्र ' आहे

या प्रश्नाचें उत्तर देतांना आम्ही जरा घोटाळतों. 'यंत्र' हा शब्द पॉटर हे मानवी यंत्रास उद्देशून वापरीत आहेत. कारण ही यंत्र-सामुग्री आपण मालकी हक्काची म्हणून वापरूं इच्छीत नाहीं असें तें मोठ्या जोरदारपणें सांगतात. आम्ही कबूल करतों कीं हीं मानवी यंत्रसामुग्री शाबूत ठेवणें अवश्य आहे, अथवा शाबूत ठेवणें शक्य

आहे, असें आम्हाला वाटत नाहीं. याचा अर्थ आम्हांला तिची गरज वाटेपर्यंत तिला तेल लावून कुलुपांत बंद करून ठेवण्यासारखी ही यंत्रसामुग्री नव्हेच. मानवी यंत्रसामुग्रीला कितीही तेल-पाणी द्या, अथवा घासूनपुसून ठेवा, तिला काम नसलें कीं गंज येणारच. शिवाय मानवी यंत्रसामुग्री ही अशा प्रकारची असतें कीं आपोआपच आपल्या ठिकाणीं वाफ उत्पन्न करून घेऊन आपल्या या मोठ्या शहरामध्यें ती स्फोट करील अथवा बेतालपणें दंगा माजवूं लागेल.

## लोखंड, कोळसा व माणूस एकच

पॉटर, म्हणतात त्याप्रमाणें एकदां नाहीसे झालेले कामगार पुन्हां निर्माण करण्याला बराच वेळ लागेल हें खरें. तथापि यंत्रज्ञ आणि भांडवलदार केव्हांही हाताशीं असल्यास काटकसरी, कष्टाळू आणि उद्योगी माणसें पुष्कळच आपणांस मिळून हवे तितके उत्तम कामगार आपणांला उत्पन्न करतां येतील. 'एक दोन अथवा तीन वर्षांत,' पॉटर यांच्या मतें धंद्याची पुन्हां भरभराट होणें शक्य असल्यानें 'श्रमशक्तीला देशांतर करण्यास उत्तेजन देऊं नका अथवा परवानगीही देऊं नका' असें पॉटर आम्हांला सांगत आहेत. कामगारांना देशांतरास जाण्याची इच्छा होणें साहजिक आहे असें पॉटर म्हणतात. पण पॉटर यांच्या मतें कामगारांची इच्छा कांहीही असली तरी तिला न जुमानतां हे ५ लक्ष कामगार व त्यांच्यावर अवलंबून राहणारे त्यांचे ७ लक्ष आप्तइष्ट यांना कापसाच्या क्षेत्रामध्यें कोंडून ठेवण्यांत यावें. अर्थात पॉटर यांना असेंहि वाटत असेल कीं राष्ट्रानें त्यांना भिक्षेवर जगवावें, त्यांचा असंतोष सरकारी शक्तीनें दडपून टाकावा, आणि कधींतरी भविष्यकालांत कापूस-मालकांना त्यांची गरज लागेल म्हणून सरकारनें कालप्रतीक्षा करीत बसावें. जे लोक लोखंड, कोळसा

अथवा कापूस याप्रमाणेंच श्रम करणाऱ्या मजूरांशींही वागूं इच्छितात अशा लोकांपासून या बेटांतल्या महान लोकमतानें श्रमजीवी जनतेचें संरक्षण करण्याची वेळ आतां आली आहे."

## अखेर पॉटरनें जिंकली

'टाईम्स'चा हा लेख केवळ न्यायाची भावना व्यक्त करणारा होता. ज्या 'महान लोकमताचा' 'टाईम्स'नें उल्लेख केला तें मि. पॉटर याच्याच मताचें होतें. कारखान्यांतील जड यंत्राप्रमाणें मजूर हे मानवी यंत्रेंच आहेत असेंच त्या लोकमतास वाटे. मजूरांच्या देशांतरास पॉटर याच्या विनंतीप्रमाणें बंदीच करण्यांत आली. कापसाच्या मुलुखांत म्हणजेच पॉटरच्या भाषेंत बोलावयाचें तर 'नैतिक श्रम-गृहांत' या लोकांना कोंडण्यांत आलें आणि अजूनही ते लँकॅशायरच्या कारखानदारांचें सामर्थ्य' आहेत असेंच त्यांना वागवलें जातें. *

## श्रमशक्ति व श्रमसाधनें यांत कायमचा वियोग

म्हणून भांडवलशाही उत्पादनामुळें श्रमशक्ति आणि श्रमसाधनें यांमध्यें वियोग घडून येत असतो. मजूराची पिळणूक कायमची चालू

* पार्लमेंटानें मजूरांच्या देशांतरासाठीं मदतीदाखल एक फार्दिंगही दिला नाहींच पण उलट म्युनिसिपल कार्पोरेशन्सना त्या मजूरांना अर्धपोटीं राबवून घेतां यावें यासाठीं कांहीं अधिकार कायद्यानें दिले. पुढें ३ वर्षांनीं गुरांचा एक मोठा रोग फैलावला तेव्हां पार्लमेंटनें आपला नेहमींचा शिरस्ता मोडून लाखोपति अशा जमीनदारांची नुकसानभरपाई करण्या-साठीं लक्षावधि पौंड त्यांना बहाल केले. या जमीनदारांच्या शेतकऱ्यांचें अखेरीस नुकसानही झालें नाहीं. कारण रोगानें गुरें मेल्यामुळें निरोगी गुरांच्या मांसाचा भाव खूप वाढला व शेतकऱ्यांची चंगळ झाली.

ठेवण्यास आवश्यक अशी परिस्थिति या भांडवलशाही उत्पादनानें उत्पन्न केलेली असते. स्वतःचा जीव जगवण्यासाठीं मजूराला श्रम-शक्ति विकण्याची सक्ति या भांडवलशाही उत्पादनाकडून सतत केली जाते. आणि भांडवलदाराला स्वतः श्रीमान होण्यासाठीं श्रमशक्ति खरेदी करण्याचें सामर्थ्य या भांडवलशाही उत्पादनामुळेंच येत असतें. म्हणून मजूरांच्या बाजारांत भांडवलदार व मजूर हे अनुक्रमें गिऱ्हाईक व विक्रेते या नात्यानें समोरासमोर जे येत असतात ही कांहीं आकस्मिक घडणारी परिस्थिति आहे असें नव्हे. मजूराला स्वतःच्या श्रम-शक्तीचा विक्रेता या नात्यानें मजूरांच्या बाजारांत पुन्हां पुन्हां फेकण्याचा गुण या उत्पादन-पद्धतीतच आहे.

भांडवलशाही-उत्पादन हें आपल्या सतत चालणाऱ्या उत्पादनाच्या व पुनरुत्पादनाच्या प्रक्रियेंत केवळ विक्री-मालच निर्माण करीत नाहीं, केवळ वाढावाच निर्माण करीत नाहीं, तर एका बाजूस भांडवलदार आणि दुसऱ्या बाजूस रोजमजूर हा जो भांडवलशाही उत्पादन-संबंध त्याचेंही उत्पादन व पुनरुत्पादन करीत असते.

## ( २ ) वाढाव्याच्या साहाय्यानें भांडवलाची वाढ *

येथवर आपण भांडवलापासून वाढावा कसा निर्माण होतो याचें संशोधन केलें. आतां वाढाव्यापासून भांडवल कसें निर्माण होतें हें आपणास पहावयाचें आहे. वाढाव्याचा भांडवल म्हणून उपयोग करणें, वाढाव्याचें भांडवलांत रूपांतर करणें याला भांडवलाचा संचय असें म्हणतात.

---

* कॅपिट्‌ल, खं. २, प्रकरण २४

## वाढाव्याची खूण पैशावर नाहीं

प्रथम आपण वैयक्तिक भांडवलदाराच्या दृष्टीनें या व्यवहाराचा विचार करूं. समजा, एका सूत कारखानदारानें कारखान्यांत ५०००० डॉ. भांडवल घातलें. त्यांपैकीं $\frac{4}{5}$ म्हणजे ४०००० डॉ. भांडवल कापूस, यंत्रें वगैरेसाठीं काढून ठेवलें आणि $\frac{1}{5}$ मजूरीसाठीं काढलें. आतां दरसाल तो २४०००० पौंड. सूत म्हणजे ६०००० डॉ. मूल्य असलेला माल निर्माण करतो असें समजूं. वाढाव्याचा दर १००% आहे. वरकड मूल्य, ४०००० पौं. सूत हें जें निवळ उत्पन्न म्हणजे एकूण उत्पादनाचा $\frac{1}{6}$ त्यांत आहे. हाच वाढावा होय. याचीच किंमत १०००० डॉ. असून ती ४०००० पौं. सूत विकल्यानें वसूल होणार आहे. १०००० डॉ. म्हणजे १०००० डॉ. हा नुसता पैसाच डोळ्यापुढें धरला तर हा वाढावा असल्याची घाण कांहीं त्याला येत नाहीं. अथवा तो वाढावा असल्याची कोणतीही खूण त्या पैशावर सांपडत नाहीं. अमूक एक रक्कम मूल्य ऊर्फ वाढावा आहे असें आपणांस कळलें म्हणजे तें मालकांस मिळालें कसें याचा बोध होतो. पण या मूल्याचें अथवा पैशाचें विशिष्ट स्वरूप आपणांस कळलें तरी त्याचें सामान्य स्वरूप कांहीं तेवढ्यामुळें बदलत नाहीं.

## वाढाव्यांतून वाढावा निपजतो

इतर सर्व प्रकारची परिस्थिति बदललेली नाहीं असें धरून चालल्यास १०००० डॉ. ही जी अधिक रक्कम भांडवलदाराच्या हातीं आली तिचें भांडवलांत रूपांतर करण्यासाठीं तिचा $\frac{4}{5}$ म्हणजे ८००० डॉ. कापूस वगैरे खरेदी करण्यांत व $\frac{1}{4}$ म्हणजे २००० डॉ. अधिक सूत कातणारे खरेदी करण्यांत भांडवलदार खर्च करतो. या मजूरांना

मालकानें मजूरी दिल्यावर बाजारांत त्यांना त्यांच्या चरितार्थास अवश्य असणाऱ्या वस्तु विकत मिळूं शकतात. नंतर हे १०००० डॉ. नवें भांडवल सुताच्या गिरणींत काम करून आपल्यापरीं २००० डॉ. वरकडमूल्य निर्माण करतें.

भांडवलरूपीं मूल्य हें अगदीं पहिल्यानें पैशाच्या स्वरूपांत देण्यांत आलें होतें. ज्या २ लक्ष पौं. सुतामध्यें हें मूळ भांडवल गुंतवलें होतें तें सूत जर विकलें तर तें भांडवल आपलें मूळ स्वरूप धारण करतें. उलट वरकडमूल्य अथवा वाढावा हा मात्र एकूण उत्पन्नापैकीं एक ठराविक भाग असतो. आणि म्हणून मालविक्री झाल्यानंतर वाढाव्याचें मुळचें स्वरूप बदलतें. विक्रीच्या घटकेपासून भांडवलमूल्य आणि वाढावामूल्य हीं दोन्हीही पैसा या एकाच स्वरूपांत व्यक्त होतात. आणि त्यांचें भांडवलांत होणारें रूपांतर दोघांचेंही एकसारखेंच होत असतें. दोन्हीही भांडवलें भांडवलदार हा माल खरेदी करण्यासाठीं खर्चतो. त्यामुळें नवीन माल निर्माण करण्याच्या परिस्थितींत तो राहूं शकतो. मात्र यावेळीं पूर्वींहून अधिक व्यापक प्रमाणावर तो माल निर्माण करीत असतो. पण हा माल विकत घेतां यावा यासाठीं बाजारांत तो माल आगाऊ तयार असणें जरूर असतें.

## देवघेवीनें वाढ अशक्य

बाजारांत जो माल खरेदी करावयाचा असतो तो आगाऊ कोणी तरी उत्पन्न करावा लागतो. बाजारांत होणारा जो देवघेवीचा व्यवहार तो एकूण सर्व समाजाकडून होणाऱ्या वार्षिक उत्पादनांतील वैय्यक्तिक उत्पादनांची अदलाबदल करीत असतो. या व्यवहारामुळें फक्त एक वस्तु दुसऱ्या माणसाच्या हातीं जाणें एवढेंच कार्य होऊं शकतें. एकूण वार्षिक उत्पादनाची वाढ अथवा उत्पन्न झालेल्या

मालाच्या स्वरूपांत बदल हा बाजारांतील या देवघेवीमुळें होऊं शकत नाहीं.

दरसाल समाजाकडून जें उत्पादन होत असतें त्या उत्पादनाचें पहिलें कर्तव्य, भांडवलाचे जे घटक सालभरच्या वापरांत संपून गेलेले असतात ते सर्व घटक (म्हणजे तीं सर्व उपयोगमूल्यें) पुन्हां जागचे जागीं आणून ठेवणें हें होय. हीं उपयोगमूल्यें वजा जातां जें निव्वळ उत्पन्न राहील तेंच वरकडमूल्य; यांतच वाढावा असतो. हा वाढावा कशाचा बनलेला असतो? कदाचित भांडवलदार वर्गाच्या गरजा व वासना तृप्त करणाऱ्या या वस्तु असतील काय? खरोखर या अशा वस्तु असत्या तर वाढाव्याचा पैसा भांडवलदारांनीं अगदीं चाटून पुसून खाऊन टाकला असता.

## वाढाव्यांत नवीन भांडवलाचे घटक

श्रमक्रियेंत वापरतां येणारीं धनोत्पादन साधनें आणि मजूरांच्या चरितार्थास लागणारीं द्रव्यें यांच्याखेरीज दुसऱ्या कशाचेंही भांडवल बनविणें ही गोष्ट, चमत्कार करतां आल्यांवाचून, अशक्य आहे. आणि म्हणून दरसाल जे वरकडश्रम भांडवलदाराच्या हातीं येतात त्यांचा उपयोग धनोत्पादनसाधनें व चरितार्थसाधनें यांच्या उत्पादनाचें कामीं भांडवलदारास करावा लागतो. मूळ भांडवल पुन्हां उत्पन्न करण्यासाठीं जीं चरितार्थसाधनें व धनोत्पादनसाधनें निर्माण करावीं लागतात त्याहून अधिक साधनें निर्माण करण्याकडे या वरकड श्रमाचा विनियोग व्हावा लागतो. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे वाढाव्याचें भांडवल होऊं शकतें याचें कारण वाढावारूपीं उत्पादनांत नवीन भांडवलाचीं घटकद्रव्यें मुळांत असतातच हें होय.

## अधिक श्रमशक्तीची तरतूद

आतां ह्या घटक द्रव्यांना भांडवल म्हणून वापरतां यावें यासाठीं भांडवलदार वर्गाला अधिक मजूरांची गरज असते. कामावर लावलेल्या मजूरांची पिळवणूक अधिक तीव्र करून अथवा अधिक व्यापक करून जर वाढवितां आली नाहीं तर अधिक श्रमशक्ति उपलब्ध करून घेणें भांडवलदारास भाग पडतें. याची तरतूज भांडवलशाही उत्पादन-संघटनेनें आगाऊच करून ठेवलेली असते. कारण मजूरांना जी मजूरी देण्यांत येते ती केवळ त्यांच्या चरितार्थास पुरेल इतकीच होत नसून कामगारांची संख्या वाढविण्यासही ती त्यांना पुरत असते. दरसाल कामगार वर्गाकडून निरनिराळ्या वयाच्या मजूरांच्या स्वरूपांत ही जी अधिक श्रमशक्ति पुरवली जाते ती आपल्या धंद्यांत अधिक श्रमशक्ति म्हणून समाविष्ट करून घेणें हें भांडवलदारास अवश्य असतें. ही गोष्ट त्यानें त्याच्या वार्षिक उत्पादनांत मिळालेल्या वाढाव्याच्या साहाय्यानें केली म्हणजे वाढाव्याचें भांडवलांत रूपांतर करण्याचें काम पूर्ण होतें.

## भांडवल व वाढावा या उभयतांचीही वाढ

आपण पुन्हां आपल्या मूळच्या उदाहरणाकडे वळूं. जुन्या पौराणिक कथेचीच आवृत्ति येथें घडत आहे. अब्राहामचा मुलगा ऐझॅक, ऐझॅकचा मुलगा जेकॉब इत्यादि हाच प्रकार येथेंही आहे. मुळचें ५० हजार डॉ. भांडवल १० हजार डॉ. वाढावा देतें. त्याचें भांडवलांत रूपांतर होतें. हें जें नवीन १० हजार डॉ. भांडवल तें २ हजार डॉ. वाढावा देतें. त्याचेंही पुन्हां भांडवल होतें. हें दुसरें अधिक भांडवल होय. तेंही आपल्यापरी ४०० डॉ. वाढावा देतें. आणि अशा प्रकारें हा चेंडू पुढें पुढें फिरत चाललेला असतो.

या ठिकाणीं आपण वाढाव्याचा जो भाग स्वतः भांडवलदार उपभोगून संपवतो तो तूर्त विचारांतून सोडून देऊं. तसेंच तूर्त आपल्याला हें वाढाव्याचें भांडवल मूळ भांडवलांत मिसळलें जातें किंवा त्यापासून पृथक्पणें वापरलें जातें या मुद्दयाशींही कर्तव्य नाहीं. ज्या भांडवलदाराला हा वाढावा मिळाला तोच तो वापरतो कीं दुसऱ्याला वापरायला देतो हाही प्रश्न सध्यां आपण बाजूस ठेऊं. या ठिकाणीं आपण लक्षांत ठेवण्याची गोष्ट एवढीच कीं नवीन वाढाव्याला भांडवलाचें रूप दिलें जात असतां मूळचें भांडवलही स्वतःचें पुनरुत्पादन करीतच असतें व वाढावाही निर्माण करीत असतें. सर्व संचित भांडवलासंबंधानें असेंच घडतें.

मूळ भांडवल ५० हजार डॉ. गुंतवण्यानें उभें झालें होतें. भांडवलदाराला हें मुळचें भांडवल कोठून मिळालें ? 'स्वतः भांडवलदाराच्या व त्याच्या बापजाद्यांच्या परिश्रमानें' असें उत्तर भांडवलशाही अर्थशास्त्राचे पुरस्कर्ते एकमतानें घेतात.

## आधीं लूट मग खरेदी

तें कसेंही असो; तें कोठून मिळतें त्याचा इतिहास पुढें येणार आहे. पण निदान वाढावा म्हणजे जे १० हजार डॉ. त्या अधिक भांडवलासंबंधानें, आतां ते भांडवलदारानें स्वतःच्या परिश्रमानें मिळवले आहेत असें उत्तर देतां येणार नाहीं. हे १० हजार डॉ. कोठून आले हें आतां आम्हांला छान कळतें. वाढाव्याचेंच हें भांडवल बनविलें आहे. या मूल्यांतला एकही कण असा नाहीं कीं जो मोफत श्रमांतून निर्माण झालेला नाहीं. अधिक श्रमशक्ति आतां ज्या धनोत्पादन-साधनावर लावली जाणार आहे आणि या अधिक श्रमशक्तीचें मालक असे मजूर ज्या जीवन-सामुग्रीवर जगणार आहेत ती सर्व मजूर वर्गाकडून

भांडवलदार वर्गास जी देणगी मिळते तिचाच विभाग होय. भांडवलदार वर्ग हा या देणगींतलाच कांहीं विभाग खर्च करून अधिक श्रमशक्ति तिच्या भर किंमतीस विकत घेतो. म्हणजे ही सारख्याची सारख्याशीं देवघेव होते. तरीपण हा सर्व व्यवहार एखाद्या प्राचीन जेत्याच्या लबाडीसारखा आहे. एखादा जेता परमुलुखावर धाड घाली, तेथील लोकांच्या पैशाची लूट करी आणि मागाहून त्याच पैशांनीं त्या लोकांचा माल खरेदी करीत असे.

## मजूराकडून आपल्याच श्रमफलाची खरेदी

या अधिक भांडवलानें तें भांडवल निर्माण करणाऱ्या माणसास जर नोकरीवर लावलें तर ह्या नव्या उत्पादकानें मूळ भांडवलाचें मूल्य वाढवीत राहिलें पाहिजे इतकेंच नव्हे तर आपणच पूर्वीं केलेल्या श्रमाचें फळ, त्या फळामध्यें अंतर्भूत असलेल्या श्रमाहून अधिक श्रम करून, खरेदी केलें पाहिजे. भांडवलदार वर्ग आणि मजूरवर्ग यांमधील व्यवहार या दृष्टीनें या व्यवहाराकडे पाहिलें असतां अधिक नेमण्यांत आलेले मजूर हे पूर्वीं नेमलेल्या मजूराकडून मिळालेल्या मोफत श्रमाच्या साहाय्यानेंच नेमले गेले आहेत ही गोष्ट कायमच राहते. भांडवलदार आपल्या अधिक भांडवलानें एखादें यंत्र उभें करील त्यामुळें ज्यांनीं यंत्र निर्माण केलें तेच कामगार कदाचित बेकार होतील. त्यांच्या जागीं लहान मुलेंही येतील. अशा या प्रत्येक प्रक्रियेंत कामगार वर्ग हा स्वतःच दरसालच्या वरकड श्रमांनीं पुढील सालीं अधिक नेमावयाच्या मजूरासाठीं भांडवल निर्माण करीत असतो.

## मोफत श्रमांतून मोफत श्रम

१० हजार डॉ. हें जें अधिक भांडवल संचित झालें त्यासाठीं त्यापूर्वी भांडवलदाराच्या मालकीचें त्याच्या " प्राथमिक श्रमांनीं " निर्माण

झालेलें आणि त्यानें धंद्यांत गुतवलेलें ५० हजार डॉ. हें मूळ भांडवल असलेंच पाहिजे. त्यानंतर २ हजार डॉ. हें जें दुसरें अधिक भांडवल आहे त्याच्या पूर्वी त्यासाठीं १० हजार डॉ. संचित असले पाहिजेत. या १० हजार डॉ. मधील २ हजार डॉ. हा भांडवल बनवलेला वाढावा होय. नवीन जिवंत मोफत श्रम सतत पदरांत पाडून घेतां यावें यासाठीं भूतकाळांतील मोफत श्रमावर मालकी असणें एवढीच गोष्ट आतां यापुढें अवश्य आहे.

## विनिमय व्यवहारास कलाटणी

पूर्वी निर्माण केलेल्या वाढाव्याच्या साहाय्यानें नवें भांडवल वाढवीत जावें, त्यांतील कांहीं अंशानें नवीन श्रमशक्ति खरेदी करावी, (ही श्रमशक्ति तिचें पूर्ण मूल्य देऊन खरेदी केली असेंही आपण समजू) ही जी उत्पादनपद्धति येथवर आपण सांगितली तीमुळें धनाचें उत्पादन करणें आणि त्याचा प्रसार म्हणजे विक्री करणें यावर आजपर्यंत मालकीची संस्था आधारलेली असते ती आतां अगदीं उलट स्वरूप धारण करते. सारख्याशीं सारख्याचा विनिमय होणें ह्या घटनेस आतां एवढी कलाटणी मिळते कीं आतां विनिमय हा फक्त देखावा उरतो. कारण मजूरीच्या बदला जें भांडवल खर्च केलें जातें तें स्वतःच यापुढें दुसऱ्याच्या श्रमापासून बिन-मोबदला मिळवलेलें असतें. शिवाय हें भांडवल पुन्हां असेंच्या असें उत्पन्न करावें लागतें इतकेंच नव्हे तर त्यावर थोडासा वाढावाही उत्पन्न करावा लागतो. भांडवलदार आणि मजूर यांच्यामधील विनिमय हा एक नुसता देखावा होतो. देवघेवीच्या खऱ्या स्वरूपाचें सत्य त्यांत मुळींच नसतें. या देखाव्यानें सत्यस्थिति गूढ होऊन जाते. पुनःपुन्हां श्रमशक्तीचा जो क्रयविक्रय होतो हेंच आतां या देवघेवीचें स्वरूप होय.

## मालकी हक्काचा उगम पालटला

जें खरोखर घडतें तें असें:—भांडवलदार हा मालाच्या स्वरूपांत आधींच तयार असलेला इतरांच्या श्रमफलाचा अंश मोफत पुनःपुन्हां उपटतो. आणि त्याच्याच बदलां अधिकाधिक श्रमशक्ति खरेदी करीत असतो. अगदीं प्रथम मालकी हक्क हे माणसाच्या स्वतःच्या श्रमावर आधारलेले होते असें दिसतें. निदान कांहीं तरी अशी भूमिका धरून चालणें भाग असे. कारण समाजांत सारखेंच व्यक्तिस्वातंत्र्य असलेले, विक्रीमालाचे मालक एकमेकासमोर येत; आणि त्यांना दुसऱ्याचा विक्रीमाल हस्तगत करण्याचा उपाय स्वतःच्या विक्रीमालाचा त्याग करणें एवढाच असे. त्याग केलला विक्रीमाल पुन्हां निर्माण करावयाचा तो श्रमांनींच करावा लागे. पण आतां भांडवलदाराच्या हातीं जो मालकी हक्क येतो हा हक्क दुसऱ्याचे श्रम अथवा दुसऱ्याचा माल फुकट मिळविण्याचा हक्कच ठरतो. आणि उलट भांडवलदाराच्या या हक्कामुळें मजूराला आपण उत्पन्न केलेल्या मालावर हक्क स्थापन करणें अशक्य होतें.

आपण वर पाहिलें आहे कीं अगदीं साध्या पुनरुत्पादनांतही सर्व भांडवलाचें रूपांतर ( मग हें मूळचें भांडवल कसेंही मिळालेलें असो.) भांडवल बनविलेल्या वाढाव्यांत होत असतें. पण उत्पादनाला जो हा महापूर येत असतो त्या महापुरांत संचित झालेल्या प्रचंड भांडवलाच्या मानानें मुळचें भांडवल अगदीं अदृश्य होण्याइतकें क्षुद्र ठरतें. हें संचित होणारें भांडवल मूळ संचय करणाराच्या हातीं असो नाहींतर दुसऱ्या कोणाच्या हातीं असो, वाढाव्यांतूनच तें संचित होत असते.

एक गोष्ट उघड आहे कीं वाढाव्यापैकीं फक्त कांहीं भागाचेंच भांडवल होऊं शकतें. दुसरा भाग भांडवलदाराला जगवण्यासाठीं

खर्चावा लागत असतो. यांतला पहिला भाग जितका जितका मोठा असेल तितका दुसरा लहान असतो. भांडवलदार स्वतःसाठीं जितकें कमी खर्च करील तितका त्याचा संचय अधिक होईल.

## भांडवलशाहीचें समर्थन

भांडवलदाराचें ऐतिहासिक महत्त्व आणि त्याच्या अस्तित्वाचें ऐतिहासिक समर्थन सांगतां येतें तें हें कीं मानवजातीला 'धनोत्पादनासाठीं धनोत्पादन करण्याचें कार्य ' तो निर्दयपणें व सक्तीनें करायला लावतो. यामुळें तो समाजाच्या उत्पादनसामर्थ्याचा विकास करतो, आणि उच्च-उच्चतर प्रकारची समाजरचना करण्यासाठीं जी खरीखुरी आवश्यक भूमिका असते ती तो निर्माण करतो. ह्या उच्च समाज व्यवस्थेमध्यें प्रत्येक व्यक्तिमात्राचा पूर्ण आणि अनिर्बंध विकास करणें हें मुख्य तत्त्व असतें. शिवाय भांडवलशाही उत्पादनाच्या वाढीबरोबरच अमुक एका धंद्यांत घातलेलें भांडवल सतत वाढत ठेवण्याची जरूरी उत्पन्न होते. तसंच वैयक्तिक भांडवलदारामध्यें चढाओढ होत असल्यामुळें प्रत्येक भांडवलदाराला आपलें भांडवल केवळ टिकवण्याकरतांही वाढवीत ठेवावें लागतें. आणि एकसारखा संचय करीत राहिल्यावांचून भांडवलाची वाढ होऊंच शकत नाहीं.

---

# संचयाचा कामगारावर परिणाम : : : १३*

## मजूरी वाढीचें विशेष कारण

वाढाव्याच्या एका अंशाचें भांडवल करून तें अधिक भांडवल म्हणून वापरलें गेलें म्हणजे या अधिक भांडवलाला वेगळे मजूर लागतात हें अगदीं उघड आहे. इतर सर्व परिस्थिति आहे अशीच राहिली तर, तसेंच अमुक इतक्या धनोत्पादनसाधनासाठीं ( स्थिर भांडवलासाठीं ) अमुक इतकी श्रमशक्ति ( चर भांडवल ) लागते, असेंही मानलें तर अधिक भांडवलाच्या वापरासाठीं श्रमशक्तीची मागणी वाढेलच. भांडवल जितकें जलद वाढत जाईल तितकी जलद ही श्रमशक्तीची मागणीही वाढत जाईल. भांडवल हें दरसाल वाढावा निर्माण करतें. त्यांपैकीं एक भाग दरसाल मूळ मूल्यांत मिळविला जातो. हा वाढावा सालोसाल वाढत जातो. कारण संचय होत असल्यामुळें भांडवल एकसारखें वाढतें. नवे बाजार खुले होणें, समाजाच्या कांहीं नव्या गरजा उत्पन्न झाल्यामुळें भांडवल गुंतवण्यास कांहीं नवीं क्षेत्रें उत्पन्न होणें, अशा प्रकारचे विशेष उत्तेजन भांडवल खूप वाढ-

* कॅपिटल, खंड २, प्रकरण २५.

विण्यासाठीं मिळालें तर भांडवलदार आपला खाजगी खर्चही कमी करून खूपच अधिक वाढावा संचित करतो. अशा अनेक कारणामुळें भांडवलाचा संचय केव्हां केव्हां इतका प्रचंड होतो कीं मजूरांची संख्या त्या मानानें कमी पडते. आणि म्हणून मजूरीचे दर वाढतात.

## धनसंचयाबरोबर कफल्लकांची वाढ

वर गृहीत धरलेली परिस्थिति जर कायम राहील तर मजूरांची संख्या कमी पडून मजूरीचे दर वाढणें हें स्वाभाविकच होतें. कारण दरसाल पूर्वीच्या सालापेक्षां अधिक मजूर कामावर लावले जात असल्यामुळें लवकरच अथवा थोडे उशिरा अशी एक वेळ यावीच लागते कीं मजूरांचा जो एक रूढ पुरवठा असतो त्या मानानें धनसंचय हा अधिक होतोच. अर्थात् मजूरीचे दरही वाढतात. सगळ्या १५व्या शतकांत आणि १८व्या शतकाच्या उत्तरार्धांत या बाबतीत इंग्लंडांत बरीच तक्रार चालली असल्याचें ऐकूं येतें. मजूरवर्ग स्वतःचा सांभाळ करून वंश-वृद्धि ज्या परिस्थितींत करीत असतो ती परिस्थिति कमी अथवा अधिक अनुकूल कशीही असली तरी भांडवलशाही उत्पादनाचें मूळ स्वरूप तीमुळें मुळींच बदलत नाहीं. साध्या पुनरुत्पादनानें भांडवलदार व मजूर यामधील उत्पादनसंबंध नेहमीं निर्माण होत राहतोच. हा उत्पादनसंबंध धनसंचयामुळें वाढत जात असतो. एका टोकाला भांड-वलदारांची संख्या वाढते; भांडवलदार हे बडेबडे होत जातात. आणि दुसऱ्या टोकाला रोजमजूरांचीही संख्या वाढत जाते. म्हणून धन-संचया बरोबरच कफल्लकांचीही संख्या वाढत जाते असें म्हणावें लागतें.*

* अर्थशास्त्राच्या परिभाषेंत बोलावयाचें तर रोजमजूर हाच कफल्लक (प्रॉलेटॅरियन्) होय. त्याच्याच श्रमानें भांडवल निर्माण होतें व वाढत असतें. आणि भांडवलाला या रोजमजूराची सेवा नकोशी होताच तो रस्त्यावर हाकालला जात असतो.

१६९६ सालीं जॉन् बेलर्स लिहतोः “ एखाद्या धनिकाजवळ १०० एकर जमीन असली, १०० पौ. नाणें असलें आणि १०० गुरें असलीं, पण मजूर मुळींच नसले तर या धनिकाचा स्वतःचा दर्जा मजूराचाच नव्हे काय? मजूर हेच धनिकाची संपत्ति निर्मीत असल्यानें जितके मजूर अधिक तितकी धनिकांची संख्या अधिक वाटते. मजूर हे श्रीमंत वर्ग निर्माण होण्याच्या खाणीच होत.”

## श्रीमंतांना गरीबांची गरज

१७२८ त बर्ट्रँड डी मँडेव्हील लिहितो : “ मालमत्तेस पूर्ण संरक्षण असेल तर जगण्यासाठीं पैशाचीही तितकीशी गरज नाहीं. पण दरिद्री लोक मात्र अवश्य पाहिजेत. कारण त्यावांचून श्रम कोण करणार? गरीबांनीं श्रम करावयाचे तर त्यांना उपाशी मरूं न देणें भाग आहे. पण त्यांना शिल्लक टाकतां येईल असें मात्र कांहीं देऊं नये. निकृष्ट वर्गांतला एखादा माणूस पोटास चिमटा घेऊन स्वतःस आपल्या परिस्थितीतून वर नेईल तर त्याला तसें करूं द्यावें. इतकेंच नव्हे; समाजांत काय किंवा कुटुंबांत काय प्रत्येकानें काटकसरीनें वागावें हें निःसंशय शहाणपणाचें आहे. पण धनिक राष्ट्रांच्या हिताच्या दृष्टीनें पाहतां बहुतेक गरीब लोकांनीं कधींही निरुद्योगी तर राहूं नयेच, पण मिळेल तें धन सतत खर्चीत राहणें हें इष्ट असतें. रोज बिगारी करून त्यावरच जे जगतात त्यांना उपयुक्त कर्तृत्वाची प्रेरणा रोजच्या भुकेकडूनच मिळते. ही त्यांची भूक रोज शमवावी, पण त्यांची ददात कायमची कधींच घालवूं नये. तो मूर्खपणा होईल. तेव्हां मजूरांना उद्योगी राखण्याचा मार्ग म्हणजे त्यांना बेताचा पैसा देणें हाच होय. त्यांचा स्वभाव व संवयी या दृष्टीनें त्यास जितका पैसा जरूर असेल त्याहून फार कमी दिला तर तो चवताळेल अथवा

नाउमेद होईल; बरें जरूरीहून अधिक दिला तर तो मगरूर व उद्धट होईल. यावरून हें उघड होतें कीं जेथें गुलामगिरी नाहीं अशा स्वतंत्र राष्ट्रांत खरें धन म्हणजे श्रमजीवी गरीब वर्ग हाच होय. कारण गरीब लोक उत्पादनाचें कार्य तर करतातच, शिवाय सैन्य व आरमार यासाठीं लागणारा माणसांचा पुरवठा या गरीबांतूनच होतो. गरीबावांचून श्रीमंतांचे भोग चालू शकणारच नाहींत. आणि कोणत्याही देशाच्या मालाला किंमतच येणार नाहीं. उच्च वर्ग सुखी रहावा आणि अगदीं गरिबींतही लोक शांत रहावे यासाठीं बहुसंख्य लोक अशिक्षित आणि दरिद्री राहणें इष्ट आहे. माणसाच्या गरजा थोड्या असल्या म्हणजे त्या सहज भागवितां येतात. पण ज्ञान वाढलें कीं माणसाच्या गरजा सारख्या वाढूं लागतात."

मँडेव्हील हा प्रामाणिक व स्वच्छ विचाराचा मनुष्य होता. पण त्यावेळीं त्याला एक गोष्ट दिसली नाहीं ती ही कीं धनसंचयाच्या प्रक्रियेची जी एकंदर पद्धति आहे ती स्वतः भांडवलाच्या वाढी-बरोबरच श्रम करणाऱ्या दरिद्री लोकांची म्हणजे रोजमजूरांची वाढ करीत असते.

## मजूरीवाढीचें खरें स्वरूप

धनसंचयासाठीं पूर्वावश्य म्हणून जी परिस्थिति गृहीत धरली तीं मजूरांना अतिशय अनुकूल अशी गृहीत धरली. अशा परिस्थितीमध्यें भांडवलावर अवलंबून राहणें त्यांना कांहीसे सुसह होत असतें. त्यांनींच उत्पन्न केलेल्या वाढाव्याचा भाग एकसारखा वाढत जाऊन त्याचें सतत भांडवलांत रूपांतर होत जातें. आणि तो उत्तरोत्तर मजूरीच्या रूपानें कामगारांच्याकडे परत येत असतो. यामुळें त्यांना आपल्या उपभोगाचें क्षेत्र वाढवतां येतें. कपडे व सुखसोयीचें साहित्य

यावर त्यांना अधिक खर्च करतां येतो. आणि थोडा पैसाही शिल्लक टाकतां येतो. पण ज्याप्रमाणें थोडा अधिक चांगला कपडा घातला, अधिक चांगलें अन्न खायला मिळालें, अथवा थोडी चांगली वागवणूक मिळाली म्हणून गुलामाची कांहीं गुलामगिरी नाहींशी होत नाहीं, त्याचप्रमाणें वरीलसारख्या थोड्या अधिक चांगल्या परिस्थितीनें रोजमजूराच्या पिळणुकीचें स्वरूप बदलतें असें नाहीं. धनसंचय झाल्यामुळें मजूराची जी मजूरी वाढते तिचा अर्थ, रोजमजूरानेंच घडवलेली जी सोन्याची साखळी त्याच्या गळ्यांत बांधलेली असते, तिची लांबी थोडी वाढते, वजन थोडें कमी होतें, यामुळें तिचा ताण थोडा ढिला पडतो, इतकाच होय. मजूरी वाढणें म्हणजे मजूराकडून भांडवलदाराला जें मोफत श्रम दिले जातात त्याचें परिमाण फार तर थोडेंसें कमी होतें.

## मजूरीवाढीनें भांडवलदारास धोका येत नाहीं

पण ज्यायोगें भांडवलदारी पद्धतिच धोक्यांत येईल इतकें कमी हें परिमाण केव्हांच होत नाहीं. मजूरीचा दर वाढत राहिला तरी धनसंचयाच्या प्रगतीच्या आड ही मजुरीची वाढ येतेंच असें नाहीं. यांत आश्चर्यकारक कांहींही नाहीं. ॲडम स्मिथ १७७४ त लिहितो " नफे कमी झाले तरी मूळ सांठा वाढत जातो इतकेंच नव्हे तर पूर्वींहून अधिक जलदही तो वाढत जातो. लहान सांठा अधिक नफ्यानें वाढतो त्यापेक्षां मोठा सांठा कमी नफ्यानें अधिक जलद वाढत असतो." यावरून हें लक्षांत येईल कीं भांडवलदाराला मिळणारे मोफत श्रम कमी झाले तरी भांडवलाच्या विस्तारावर त्याचा प्रतिकूल परिणाम होत नाहीं. पण केव्हां केव्हां मजुरीचा दर वाढला म्हणजे धनसंचय कमी कमी होऊं लागतो. कारण नफ्याची प्रेरणा

कमी होतें, संचयाचा दर खालीं येतो. पण त्याबरोबरच धनसंचय फार होऊं लागल्यामुळें श्रमशक्तीची मागणी जी वाढलेली असते तीही कमी होते. आणि मजूरीचे दर पुन्हां उतरतात. भांडवलशाही संघटना आपल्या उत्पादनप्रक्रियेमध्यें जो अडथळा मध्येंच कांहीं वेळ उत्पन्न करते तो आपणच नाहींसा करून टाकते.

## मजूर वाढतात व कमी होतात काय ?

वरील चर्चेवरून आपल्या लक्षांत येईल कीं मजूरांच्या लोकसंख्येच्या वाढीचा दर सापेक्षपणें अथवा स्वतंत्रपणें कमी झाला म्हणून भांडवल हें मजूरांच्या मानानें अधिक झाल्यासारखें दिसतें असें नव्हे तर उलट भांडवल वाढल्यामुळें श्रमशक्ति ही त्या मानानें अपुरी पडूं लागते. तसेंच मजुरांची संख्या वाढली म्हणून त्यांच्या मानानें भांडवल कमी पडतें असें नव्हे तर भांडवल कमी होतें म्हणून मजूरांची संख्या अथवा मजूरीचा दर ही फाजील वाटूं लागतात. भांडवलाच्या संचयाचें स्वतंत्रपणें होणारे हे जे चढउतार त्यांचें प्रतिबिंब मजूरांच्या संख्येच्या सापेक्ष चढउताराच्या स्वरूपानें दिसत असतें. आणि म्हणून मजूरांच्या संख्येच्या चढउतारामुळें व्यस्त प्रमाणांत भांडवलाच्या संचयाचे चढउतार होतात असें वाटत असतें. भांडवलाचा संचय वाढतो अथवा कमी होतो त्यावेळीं ही घटना अनुक्रमें मजूरांची संख्या कमी झाली अथवा वाढली यामुळें घडून आली असें म्हणणें हें अगदीं चूक आहे.

## ‘स्थिर’ – ‘चर’ संबंधांत बदल

म्हणून मजूरीचे दर जे वाढतात ते सामाजिक संपत्ति वाढते म्हणून नव्हे, अथवा धंद्यांत गुंतलेल्या भांडवलाचें परिमाण वाढतें म्हणूनही नव्हे.

तर भांडवलाच्या संचयाची वाढ आणि त्या वाढीचा वेग यावर मजूरीचा दर वाढणें अवलंबून असतें. येथवरच्या आपल्या संशोधनांत श्रमशक्तीचें उत्पादनसामर्थ्य कायमच आहे, अमूक इतक्या उत्पादनाला अमूक इतकीच श्रमशक्ति सतत लागत आहे असें आपण धरून चाललों आहोंत. यामुळें स्थिर भांडवल (स्थि.) आणि चर भांडवल (च.) यांचा संबंधही कायमच राहतो असें आपण मानीत आहोंत. पण भांडवलशाही उत्पादनपद्धतीचें थोडें पृथक्करण केल्यास आपण गृहीत धरलेली ही गोष्ट चूक आहे हें कळून येईल.

मजूरांच्या श्रमशक्तीचें उत्पादनसामर्थ्य धनसंचयामुळें वाढत असते. ॲडम स्मिथ सांगतो, " ज्या कारणांनीं मजूरांचे दर वाढतात व धनाचा सांठा वाढतो त्याच कारणांनीं मजूरांची उत्पादनशक्तीही वाढत असते. त्यामुळें कमी श्रमांत अधिक काम होऊं लागतें." श्रमाच्या उत्पादनशक्तीची वाढ होऊं लागली म्हणजे अर्थातच तेवढ्याच श्रमाबरोबर पूर्वीहून अधिक उत्पादनसाधनें वापरलीं जातात. धनसंचयाचा क्रम चालू असतां स्थिरचर भांडवल-संबंधाचें प्रमाण बदललें जाऊन स्थिर भांडवलाबाबत धनाचा अधिक सांठा खर्च होतो आणि त्या मानानें श्रमशक्तीसाठीं कमी सांठा खर्च होतो.

उदा. आरंभीं उत्पादनसाधनासाठीं ५०% आणि श्रमशक्तीसाठीं ५०% भांडवल घातलें आहे असें आपण समजूं. पुढें श्रमशक्तीचें उत्पादनसामर्थ्य वाढल्यानंतर हें प्रमाण बदलून ८०% उत्पादन-साधनांत व २०%श्रमशक्तीसाठीं घातलें जाईल. स्थिर भांडवलामध्यें चर भांडवलाच्या मानानें वाढती वाढ होत जाणें हा सिद्धांत विक्री-मालाच्या पृथक्करणावरून प्रत्येक वेळीं ध्यानांत येतो. भूतकालीन किंमतीशीं वर्तमानकालीन किंमतीची तुलना केली अथवा एकाच वेळच्या

एका देशांतल्या किंमतींशीं दुसऱ्या देशांतल्या किंमतींचीं तुलना केली तर हा सिद्धांत कळूं शकतो.

## स्थिर भांडवलाच्या सापेक्षवाढीची उपपत्ति

स्थिर भांडवलाच्या मानानें चर भांडवल कमी होणें हा जो प्रकार यामुळें भांडवलाच्या भौतिक घटकांचे प्रमाण बदलत असते. उदा. आज सूत कातण्याच्या धंद्यांत $\frac{७}{८}$ स्थिर व $\frac{१}{८}$ चर भांडवल घातलेलें आहे. पण १८ व्या शतकाच्या आरंभीं हेंच प्रमाण अनुक्रमें $\frac{१}{२}:\frac{१}{२}$ असें होतें, असें मानलें तर उलट आज श्रमशक्तीकडून कच्चामाल, श्रमाचीं हत्यारें वगैरे जीं वापरली जातात तीं, तेवढ्याच श्रमशक्ती-कडून १८ व्या शतकाच्या आरंभीं जीं वापरलीं जात असत त्यापेक्षां कित्येक-शें पट अधिक आहेत. याचें कारण अगदीं साधें आहे तें असें कीं श्रमाची उत्पादनशक्ति वाढत असतां तिच्याकडून वापरली जाणारी उत्पादनसाधनें परिमाणांत वाढत असतात. इतकेंच नव्हे तर त्यांचें मूल्यही कमी होत असतें. म्हणून स्थिर भांडवल व चर भांडवल यांमधील अंतर जरी वाढत असतें तरी या स्थिर भांडवलाचें धनो-त्पादनसाधनांच्या ज्या परिमाणांत रूपांतर होत असतें, तें परिमाण आणि चर भांडवलाचें ज्या श्रमशक्तीच्या परिमाणांत रूपांतर होत असतें तें परिमाण यामधील अंतर अधिकच वेगानें वाढत असते.

धनसंचयाच्या प्रगतीमुळें चर भांडवलाचें स्थिर भांडवलाशीं असणारें प्रमाण जरी कमी होत असलें तरी त्यामुळें चर भांडवलाचें एकंदर परिमाण वाढूं शकत नाहीं असें नाहीं. समजा अमुक एक भांडवल ५०% स्थिर विभागांत आणि ५०% चर विभागांत प्रथम विभागलें आणि मागाहून स्थिर भांडवल ८०% करून चर भांडवल २०% पर्यंत उतरविलें. दरम्यान मुळचें ३० लक्ष डॉ. भांडवल

१० लक्ष डॉ. झालें तर त्या भांडवलाचा स्थिर घटकही परिमाणांत वाढलेला आहे असें दिसून येईल. कारण मुळांत स्थिर भांडवल १५ हजार डॉ. होतें तें आतां १८ हजार डॉ. झालें आहे. पण पूर्वी जेथें मजूरांची संख्या २०% नीं वाढवावयाची असल्यास एकूण भांडवल २०% वाढवावें लागत होतें, तेथें आतां मजूरांच्या वाढीच्या तिपटीनें भांडवलाची वाढ करावी लागूं लागली आहे.

## खाजगी धनाची वाढ अपरिहार्य

मागें एका ( ९व्या ) प्रकरणांत सामाजिक श्रमशक्तीच्या उत्पादन-सामर्थ्याची वाढ होण्यासाठीं मोठ्या प्रमाणावर सहकार्य होणें ही गोष्ट अवश्य असतें असें सांगितलें आहे. मोठ्या प्रमाणावर उत्पादन असेल तरच श्रमविभाग व श्रमसंयोग यांना अवश्य अशी संघटना करतां येते. आणि धनोत्पादनसाधनांचें केंद्रीकरण करून त्यांची काटकसर करतां येते; त्यामुळेंच स्वभावतःच अनेक मजूरांनीं मिळून वापरलीं पाहिजेत अशींच श्रमाचीं हत्यारें म्हणजे यंत्रसामुग्री निर्माण होतें. यामुळेंच उत्पादनाच्या कार्यासाठीं अफाट नैसर्गिक शक्ति उपयोगी लावतां येतात, वगैरे मुद्यांची तेथें चर्चा केली आहे; जेथें धनोत्पादन साधनें खाजगी व्यक्तींच्या मालकीचीं असतात, आणि म्हणून कारागीर हा विक्रीमाल स्वतः एकटा उत्पन्न तरी करतो अथवा त्याच्या मालकीचा स्वतंत्र धंदा नसल्यास आपली श्रमशक्ति दुसऱ्याला विकतो अशा उत्पादनव्यवस्थेंत सहकार्यामुळें खाजगी व्यक्तींचीं भांडवलेंच वाढत जाणार; जितक्या प्रमाणांत सामाजिक उत्पादनाचीं साधनें आणि सामाजिक चरितार्थाचीं साधनें यांचें भांडवलदाराच्या खाजगी मालकींत रूपांतर होत असतें तितक्या प्रमाणांत उत्पादनांत होणाऱ्या सहकार्यानें धनोत्पादनसाधनांच्या खाजगी मालकाची संपत्ति

वाढत जाते. माल हा विक्री माल म्हणूनच जोंवर उत्पन्न करायचा असेल तोंवर उत्पादनाचें प्रमाण मोठें होईल तें भांडवलशाही पद्धतीचेंच होईल. म्हणून भांडवलशाही उत्पादनपद्धतींत उत्पादनाचें कार्य चालण्यास विक्रीमालाच्या उत्पादकाच्या हातीं म्हणजे भांडवलदाराच्या हातीं भांडवलाचा कांहीं एक प्रमाणांत संचय असावाच लागतो. परंतु श्रमाचें सामाजिक उत्पादनसामर्थ्य वाढवण्याच्या ज्या पद्धति या भूमिकेवर अमलांत येतात त्या पद्धतीमुळेंच वाढावाही निर्माण होतो. आणि हा वाढावा पुन्हां आपल्यापरीं धनसंचयाला कारण होतो.

## संचयाबरोबर वाढाव्याचा वेगही वाढतो

म्हणून या पद्धति म्हणजे धनसंचयाचा वेग वाढवण्याच्याच पद्धति असतात. पुन्हां पुन्हां वाढाव्याला भांडवलाचें रूप देण्यानें उत्पादनाच्या प्रक्रियेंत भांडवलाची अधिकाधिक वाढ होत असते. यामुळें वर सांगितलेल्या उत्पादनपद्धतींत अधिकाधिक व्यापक प्रमाणावर वाढत्या संख्येच्या मजूरांची उत्पादनशक्ति वाढविण्यांत येत असते. आणि त्यामुळेंच वाढाव्याच्या उत्पादनाचा वेगही वाढतो. म्हणजे भांडवलशाही उत्पादनाच्या आरंभीं ज्याप्रमाणें कांहीं एक धनसंचयाचें परिमाण अवश्य असतें त्याचप्रमाणें उलट भांडवलशाही पद्धतीमुळेंच वाढाव्याचा वेगही वाढत असतो. धनसंचयाचा वेग वाढत असतांच भांडवलशाही उत्पादन-पद्धतीचीही वाढ होत असते. आणि भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या वाढीबरोबर भांडवलाचा संचयही वाढत असतो. या दोन्ही घटकांच्या एकमेकाच्या प्रगतीच्या चुरशींत एकूण भांडवलाचे स्थिरचरविभाग-संबंध बदलत जाऊन चर भांडवल हें स्थिर भांडवलाच्या मानानें कमी कमी होत जातें.

## भांडवलांचे तुकडे कां पडतात

भांडवल म्हटलें म्हणजे त्यांत कमीअधिक प्रमाणांत धनोत्पादन-साधनांचें केंद्रीकरण आणि त्या मानानें कमीअधिक मजूरावर सत्ता ह्या गोष्टी अवश्यपणें अस्तित्वांत असतातच. प्रत्येक धनसंचय हा नव्या धनसंचयाचें साधन होत असतो. भांडवलाचें काम करणारी संपत्ती एकसारखी वाढूं लागली म्हणजे तिच्या संचयामुळें वैयक्तिक भांडवलदाराच्या हातीं तिचें वाढतें केंद्रीकरण होत जातें. त्यामुळें उत्पादनपद्धतीचा पाया विस्तृत होत जातो. आणि त्याबरोबरच भांडवलशाही उत्पादनाच्या पद्धतिही अधिक व्यापक होत जातात. सामाजिक भांडवलाची जी ही वाढ होत असते ती अनेक वैयक्तिक भांडवलांनीं होत असते. त्याबरोबरच मुळच्या भांडवलांचें कांहीं भाग स्वतंत्र होऊन नव्या स्वतंत्र भांडवलाच्या रूपांत वावरूं लागतात. शिवाय भांडवलदारांच्या कुटुंबांत मिळकतीच्या वांटण्या होत गेल्यामुळें स्वतंत्र भांडवलाचे उद्योगधंदे निघण्यास विशेष मदत होते. म्हणून धन-संचयाची जसजशी वाढ होत जाते त्याबरोबरच भांडवलदारांची संख्याही कमीअधिक प्रमाणांत वाढत असते. धनसंचयाची वाढ आणि त्याबरोबरच त्याचें वाढतें केंद्रीकरण होत असतें तें अनेक ठिकाणीं होत असतें. पण प्रत्येक भांडवलाचें सामर्थ्य जें वाढत रहावें तें मात्र जुन्या भांडवलाचे तुकडे पडत चालल्यामुळें कमी होतें. म्हणून धनसंचय हा एका बाजूनें धनोत्पादन-साधनाचें केंद्रीकरण करीत असतो व मजूरवर्गावर सत्ता गाजवीत असतो. पण दुसऱ्या बाजूनें याच धनसंचयामुळें भांडवलांचे तुकडे पडून तीं एकमेकापासून दूरदूर जात असतात.

## विघटणाची प्रतिक्रिया केन्द्रीकरण

एकंदर सामाजिक भांडवलाचें हें जें वैयक्तिक भांडवलांत तुकडे पडत असतात, एक भांडवल जें दुसऱ्यापासून दूरदूर जात असते त्याची प्रतिक्रिया भांडवलाबद्दल वाटणाऱ्या आकर्षणानें होत असते. निर्माण झालेल्या भांडवलांचें केंद्रीकरण करणें, वैयक्तिक भांडवलांचें स्वातंत्र्य नष्ट करणें, एका भांडवलदाराला दुसऱ्यानें कफल्लक बनवणें, अनेक लहान भांडवलांचीं कांहीं थोडीं मोठीं भांडवलें बनवणें, हें त्या प्रतिक्रियेचें स्वरूप होय. धनसंचयाच्या प्रक्रियेहून ही प्रतिक्रिया वेगळी आहे. या प्रतिक्रियेच्या प्रक्रियेंत भांडवलाच्या वाढीचा संबंध नसून विद्यमान असलेल्या भांडवलाच्या वाटणींत व त्याच्या उपयोगांत फरक केला जात असतो. सामाजिक धनाची वाढ करणें एवढेंच या केंद्रीकरणाचें कार्यक्षेत्र नसतें. एका माणसाच्या हातीं भांडवलाचा प्रचंड सांठा होतो याचें कारण अनेकांच्या हातून भांडवल गमावलेलें असतें. भांडवलाचा संचय व त्यांचें केंद्रीकरण याहून हा प्रकार वेगळा असून याला भांडवलाचें एकत्रीकरण म्हणावें. चढाओढीचें युद्ध विक्रीमाल अधिकाधिक स्वस्त करीत नेण्यानें होत असतें. इतर परिस्थिति बदलली नाहीं असें धरून चाललें तर विक्रीमालाचा स्वस्तपणा श्रमाच्या उत्पादनशक्तीवर अवलंबून असतो. ही उत्पादनशक्ति धनोत्पादनाचें प्रमाण केवढें असेल त्यावर अवलंबून असते. म्हणून मोठे भांडवलदार लहान भांडवलदारांना पराभूत करतात.

## भांडवलशाहींतला अंतःकलह

तसेंच सर्वसामान्य परिस्थितींत भांडवलशाही धंदा उभारतां येण्यासाठीं भांडवलाचें जें कमींत कमी परिमाण अवश्य असतें तें भांडवलशाही उत्पादनपद्धतीची वाढ होऊं लागली म्हणजे वाढत जाते. म्हणून आधुनिक उद्योगधंद्यानीं जें क्षेत्र तुरळकपणें अथवा अपूर्णपणें

व्यापलें आहे, अशा क्षेत्रांत लहान लहान भांडवलें गर्दी करूं लागतात. येथें चढाओढीच्या युद्धांत अनेक लहान भांडवलदार ठार होतात. त्यांचीं भांडवलें अंशतः त्यांच्या जेत्यांच्या हातीं जातात आणि अंशतः नष्ट होतात. याशिवाय भांडवलशाही उत्पादनपद्धतींत पत ही एक नवीच संस्था निर्माण होते. चढाओढीच्या युद्धांतलें हें एक नवें व प्रबळ हत्यार असतें. शिवाय समाजांत इतस्ततः पसरलेला वैयक्तिक भांडवलदारांच्या अथवा भांडवलदारसमूहांच्या हातीं असलेला आणि वापरतां येण्याजोगा असा पैसा ही पतसंस्था अदृश्य अशा लगामांनीं खेचून एकत्र आणीत असते. भांडवलाच्या एकत्रीकरणाचें हें एक विशिष्ट यंत्र आहे. भांडवलाच्या संचयाच्या वाढीबरोबर भांडवलशाही उत्पादनपद्धतिही ज्या प्रमाणांत वाढत जाते त्या प्रमाणांत भांडवलाचें एकत्रीकरणही वाढत जाते. शिवाय खुद्द एकत्रीकरण हीच आपल्यापरीं भांडवलशाहीच्या वाढीला सर्वांत मोठी तरफ ठरते. भांडवलदारांना आपला धंदा वाढविण्यास मदत करून धनसंचयाची प्रक्रिया या एकत्रीकरण पद्धतीनें वाढत जाते. आणि औद्योगिक उत्पादन वाढविलें गेलें म्हणजे त्यापासून पुष्कळ भांडवलांच्या सहकार्याची व्यापक संघटना बनवतां येते.

## संयुक्त भांडवल ही धनसंचयाची तरफ

पण एक गोष्ट स्पष्ट आहे कीं भांडवलाचा संचय, म्हणजेच नव्या-नव्या वाढाव्याचें भांडवल बनून भांडवलाची होणारी जी वाढ ती भांडवलाच्या एकत्रीकरणापेक्षां कमी वेगानें होत असतें. कारण एकत्रीकरणाच्या प्रक्रियेंत भांडवलांच्या वाढीचा प्रश्न नसून विद्यमान भांडवलें एकत्र आणणें एवढाच प्रश्न असतो. कांहीं वैयक्तिक भांडवलांचा संचय होत राहूनच म्हणजे त्यांच्या नव्यानव्या वाढाव्यांचें भांडवल

होऊन मग रेल्वे बांधण्याइतकें तें वाढलें म्हणजे रेल्वे बांधावयाची असें ठरविलें गेलें असतें तर रेल्वे बांधली गेलीच नसती. संयुक्त भांडवली कंपन्यांच्या माध्यमामुळें भांडवलांचें एकत्रीकरण होऊन रेल्वे अविलंबानें बांधली जाऊं शकली. भांडवलाच्या एकत्रीकरणामुळें धन-संचयाचे परिणाम अधिक जलद घडून येऊं लागतात. तसेंच एकूण भांडवलाच्या स्थिरचरविभाग—संबंधांत फरक पडत जाऊन स्थिर भांडवलाच्या मानानें चर भांडवल कमी होत जाणें हें जें कार्य तेंही भांडवलाच्या एकत्रीकरणानें वाढत जात असते.

भांडवलाच्या एकीकरणानें रातोरात जी अनेक भांडवलांची प्रचंड मोट बांधली जाते, या मोटेंतील संयुक्त भांडवलही आतां भराभर वाढावा पिऊं लागतें. आणि त्यामुळें हें संयुक्त भांडवलही धनसंचयाची सामर्थ्यवान तरफ होते.

## नित्यक्रांतीची भूमिका

अशी अनेक वैयक्तिक भांडवलें एकत्र झालीं म्हणजे उत्पादनपद्धतींत एकसारखी क्रांति होण्याला आवश्यक अशी पूर्वभूमिका त्यामुळें सतत निर्माण होत असते. भांडवलशाही उत्पादनानें अजून पूर्णपणें ताब्यांत न आणलेल्या, फक्त तुरळकपणें प्रवेश केलेल्या क्षेत्रावरही भांडवशाही उत्पादनपद्धती आपला पूर्ण अंमल बसवूं लागते. त्याबरोबरच भांडवल-शाही उत्पादनापूर्वी उत्पन्न होऊंच शकलें नसतें असे कित्येक धंदे या उत्पादनपद्धतींत निर्माण होतात. तसेंच भांडवलशाही उत्पादनपद्धतींत जे धंदे चालू असतात त्या धंद्यांत मजूरांचें उत्पादनसामर्थ्य कृत्रिमपणें वाढवलें जातें. या सर्व बाबतींत मजूरांचें प्रमाण धनोत्पादन साधनांच्या मानानें एकसारखें कमी होत जाते. भांडवलाचा अधिकाधिक भाग धनोत्पादनसाधनें निर्माण करण्यांत खर्च होत असतो तर कमी कमी

भाग श्रमशक्तीसाठीं खर्च होत असतो. भांडवलाचें एकत्रीकरण जसें वाढेल, व उत्पादन-साधनांची कार्यक्षमता जसजशी वाढत जाईल तितक्या तितक्या प्रमाणांत मजूरांचें उत्पादनसाधनांच्या बाबतींतलें कर्तृत्व कमी कमी होत जातें. वाफेचा नांगर हा सामान्य नांगरापेक्षां उत्पादनसाधन या नात्यानें अतिशयच कार्यक्षम असतो. पण त्या नांगराला माणसांची मदत देण्यासाठीं जें भांडवल घातलेलें असतें तें सामान्य नांगराच्या बाबतींत घातलेल्या भांडवलापेक्षां फारच थोडें असतें.

## स्थिरचर-प्रमाणांत बदल

पहिल्यानें जुन्या भांडवलांत नव्या भांडवलाची नुसती भर पडत जाते. त्यामुळें कारखान्यांतील यंत्रांची वाढ होते आणि उत्पादन-पद्धतीची जी भौतिक परिस्थिति तिची एकसारखी क्रांति होत जाते. पण लवकरच स्थिरचरभांडवल संबंध बदलून उत्पादनसाधनांची जी वाढ होत जाते तीमुळें जुन्या भांडवलाचेंही क्षेत्र या नव्या सुधारलेल्या उत्पादनसाधनांकडून व्यापलें जातें. आणि म्हणून मुळच्या भांडवलानें उभी केलेलीं जुनाट उत्पादनसाधनें काढून टाकावीं लागतात.

भांडवलाच्या एकत्रीकरणानें जें नवें भांडवल जमत असते त्यामुळें भांडवलाचें परिमाण वाढून उत्पादनसाधनें अधिकाधिक सुधारलीं जातात व अर्थात मजूरांचें प्रमाण त्या मानानें कमी होत जाते. उलट मूळचें भांडवलही नव्या परिस्थितींत उत्पादनसाधनें सुधारून पूर्वी त्याच भांडवलानें नेमलेल्या मजूरांना दूरदूर लोटीत असते.

## संचयवेगाची वाढ

मजूरांच्या उत्पादनशक्तीची वाढ आणि त्यामुळेंच उत्पादन-साधनांच्या वाढीच्या मानानें मजूरांची होणारी घट या गोष्टी भांड-

वलाचा संचय जो होत जातो त्याहून अधिक वेगानें घटून येत असतात. कारण केवळ धनसंचय म्हणजे एकूण सामाजिक भांडवलाची स्वतंत्रपणें होणारी जी वाढ तिच्या बरोबरच अनेक वैयक्तिक भांडवलांचेंही एकीकरण होत जातें. आणि वाढलेल्या भांडवलांतील स्थिरचर-भांडवलसंबंध बदलल्यानें मूळच्या भांडवलांतीलही हा संबंध बदलत जातो. आणि म्हणून धनसंचय जसजसा वाढत जाईल तसतसें स्थिर भांडवलाचें चर भांडवलाशीं असलेलें प्रमाण बदलत जाते. हें प्रमाण अगदीं प्रथम १ : १ असलें तर आतां तें वाढत्या क्रमानें २ : १, ३ : १, ४ : १, ५ : १, ६ : १, ७ : १ असें वाढत जातें. भांडवलाची वाढ जसतशी होत जाते तसतसे एकंदर भांडवलाच्या $\frac{१}{२}$ ऐवजीं $\frac{१}{३}$, $\frac{१}{४}$, $\frac{१}{५}$, $\frac{१}{६}$, $\frac{१}{७}$ अशा उतरत्या प्रमाणांत श्रमशक्तीवर एकंदर भांडवलाचा अंश खर्च केला जातो. उलट $\frac{१}{२}$ ऐवजीं $\frac{२}{३}$, $\frac{३}{४}$, $\frac{४}{५}$, $\frac{५}{६}$, $\frac{६}{७}$, $\frac{७}{८}$ अशा वाढत्या प्रमाणांत उत्पादन-साधनावर भांडवलाचा खर्च होत जातो. श्रमाची मागणी ही एकंदर भांडवलाच्या परिमाणावरून ठरत नसून त्या भांडवलांतील फक्त चर घटकावरून ठरते. आणि एकूण भांडवलाची वाढ जसजशी होत जाईल त्या प्रमाणांत ही श्रमाची मागणी वाढत न जातां कमी कमी होत जाते.

## स्थिरचराचें व्यस्त प्रमाण

एकूण भांडवलाच्या परिमाणाशीं व्यस्त प्रमाणांत ही मागणी उतरत असते. आणि जितक्या वेगानें एकूण भांडवलाचें परिमाण वाढत जाते. तितक्या वेगानें श्रमाची मागणी उतरत जाते. एकूण भांडवलाचें परिमाण वाढतें त्याबरोबर एकूण भांडवलांतील घटक असे जें चर भांडवल म्हणजे श्रमशक्ति तिचेंही परिमाण वाढतेंच पण या परिमाणाची वाढ सतत कमी कमी प्रमाणांत होत असते. एकूण भांडवलाचा

एकदां वाढ झाल्यापासून पुन्हां दुसरी वाढ होईपर्यंतचा दरम्यानचा काळ हळूं हळूं लहान लहान होत जातो. या दरम्यानच्या काळांत भांडवलाचा संचय हा उत्पादन पद्धतीच्या साध्या विस्ताराचें स्वरूप घेतो. हा विस्तार उत्पादनाच्या यंत्रसामुग्रीची एकच एक पद्धति कायम ठेवून तीवर या दरम्यानच्या काळापुरता होत असतो. नवीन मजूरांना काम देण्यासाठीं इतकेंच नव्हे तर जुन्या भांडवलाच्या ( म्हणजे यंत्रसामुग्रीच्या वगैरे ) स्वरूपांत सतत फरक होत असल्या-मुळें मुळच्या असतील त्या मजूरांनाही काम पुरवण्यासाठीं एकूण भांडवलाच्या संचयाचा वेग सतत वाढवीत राहणें अवश्य असतें.

## भांडवलशाहींतील लोकसत्तेचा सिद्धांत

पण हा धनसंचयाचा व भांडवलाच्या एकत्रीकरणाचा वेग वाढला म्हणजे त्यामुळेंच स्थिरचरभांडवल संबंध बदलत जातो. चर भांडवल स्थिर भांडवलाच्या मानानें भराभर कमी होत जातें. एकूण भांडव-लाच्या वाढीबरोबर चर भांडवलाचें प्रमाण कमी कमी होत जातें आणि हें कमी होण्याचा वेग भांडवलाच्या वाढीच्या वेगापेक्षाही अधिक असतो; हें चर भांडवल कमी होणें म्हणजे एकूण भांडवलाच्या मानानें मजूरांची मागणी कमी कमी होत जाणें हा देखावा स्थिर भांडवल म्हणजे धनोत्पादन साधनें ज्या मानानें वाढत आहेत त्यापेक्षां अधिक वेगानें लोकसंख्या वाढत आहे असा दिसतो. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं भांडवलशाही उत्पादन पद्धतींतील या धनसंचयाच्या गुणामुळेंच भांडवलाच्या आत्मविस्तारासाठीं जेवढी लोकसंख्या पुरेशी असते त्यापेक्षां अधिक लोकसंख्या अस्तित्वांत राहूं लागते. किंवा वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे श्रम करणारे मजूर जे भांडवल निर्माण करतात त्याच्या संचयामुळें ते मजूर स्वतःच आपल्या हातानें

स्वतःची संख्या फालतु बनविणारीं साधनें निर्माण करीत असतात. हा लोकसंख्येचा सिद्धांत भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या बाबतींतच खरा ठरूं शकतो. खरोखर प्रत्येक ऐतिहासिक धनोत्पादनपद्धतीचे बाबतींत लोकसंख्येचा एक विशिष्ट सिद्धांतच खरा ठरत असतो. लोकसंख्येसंबंधींचा त्रिकालाबाधित व स्वतंत्र असा सिद्धांत फक्त वनस्पति आणि प्राणिसृष्टि यांना लागू असतो. त्यांच्या बाबतींतसुद्धां माणसानें हस्तक्षेप केला कीं हा सिद्धांत बदलूं शकतो.

## भांडवलशाहीचें राखीव सैन्य

भांडवलशाही उत्पादनपद्धतींत धनसंचय व धनाची वाढ होत असतां श्रम करणाऱ्या जनतेची फालतू लोकसंख्या उत्पन्न होत राहणें हें जसें अपरिहार्य असतें त्याचप्रमाणें उलट ही फालतू लोकसंख्याच भांडवलशाही-संचयाची तरफ होत असते. इतकेंच नव्हे तर भांडवलशाही उत्पादन पद्धतीच्या अस्तित्वाचीही ती पूर्वावश्य परिस्थिति असते. जणूं कांहीं भांडवलवाल्यांनी खायला घालून पोसलेले आणि ज्याची विल्हेवाट करण्याचा त्यांना हक्क आहे असें हें औद्योगिक सैन्यच असतें. लोकसंख्येच्या वाढीच्या प्रत्यक्ष मर्यादा कांहींही असल्या तरी भांडवलाच्या आत्मविस्तारासाठीं भांडवलाला ज्या नव्या गरजा उत्पन्न होतात त्यासाठीं त्याला पिळणुकीस नेहमीं हवीं असणारीं माणसें या राखीव सैन्यांतून केव्हांही मिळूं शकतात. धनसंचय आणि त्याबरोबरच वाढत जाणारी श्रमाची उत्पादनशक्ति यामुळें भांडवलाचें भराभर विस्तार पावण्याचें सामर्थ्यही वाढत जातें.

## दशवार्षिक आर्थिक चक्र

धनसंचयाच्या वाढीबरोबर सामाजिक संपत्तीस महापूर येऊं लागतो. तिचें अधिक भांडवलांत रूपांतर होतें. जुन्या उत्पादन-शाखांत हें

अधिक भांडवल धसमुसळेपणानें घुसतें. अर्थात् या जुन्या भांडवलाच्या बाजाराचें क्षेत्र वाढतें. किंवा जुन्या भांडवलाच्या वाढीमुळें रेल्वे वगैरे नव्या धंद्याच्या शाखा उत्पन्न होऊन त्यांतही हें भांडवल जात असतें. भांडवलाचा असा झपाट्यानें विस्तार होत असतां उत्पादनाच्या जुन्या शाखेंतून माणसें काढावीं लागूं नयेत पण नव्या शाखांच्या सर्व महत्त्वाच्या जागीं भराभर माणसें ठेवतां यावीत हें अवश्य असतें. फालतू लोकसंख्येंतून माणसांचा हा पुरवठा मिळतो. ज्याला दशवार्षिक आर्थिकचक्र असें म्हणतात असें आधुनिक उत्पादनपद्धतीचें जें विशेष लक्षण त्या काळामध्यें उत्पादनव्यवहार केव्हां केव्हां सामान्यपद्धतीनें चाललेला असतो, केव्हां उत्पादन अतिशय तीव्र असते, केव्हां अत्यंत तीव्र अशी संकटाची परिस्थिति उत्पन्न होते, केव्हां धंदा अगदीं थंडावलेला असतो. हीं सर्व अवस्थांतरें वरचेवर फालतू मजूरांची संख्या निर्माण होणें, कमी अथवा अधिक प्रमाणांत त्यांना व्यवसायांत गुंतवणें, आणि हे फालतू मजूर कमी झाले असतां त्यांची पुन्हां वाढ होणें, यावर अवलंबून असतात.

## अमर्याद सैन्याची जरूरी

आधुनिक उद्योगधंद्यांचें हें वैशिष्ट्य मानवी इतिहासाच्या पूर्वीच्या कोणत्याही अवस्थेंत अशक्य होतें. भांडवलशाहीच्या आरंभ काळींही तें शक्य झालें नाहीं. त्या काळीं एकूण भांडवलांतील स्थिर आणि चर घटकांचे संबंध अगदीं हळूहळूं बदलत असत. भांडवलाचा संचय जसजसा होत जाई तसतशी सामान्यतः मजुरांची मागणीही वाढत जाई. आधुनिक धनसंचयाच्या वेगाच्या मानानें त्यावेळच्या धनसंचयाचा वेग कमी होता. मजूरीला लावतां येण्यासारख्या मजूरांच्या संख्येस नैसर्गिक मर्यादा असल्यामुळें संचयाचा वेग वाढूं शकत नसे.

या नैसर्गिक मर्यादा भांडवलदाराकडून मुजोरीनें तोडल्या जात. त्यांची हकीगत पुढें येणार आहे. उत्पादनाचें प्रमाण आकस्मिकपणें वाढत गेले म्हणजे तें आकस्मिक कमीही होते. आकस्मिक कमी होण्या-मुळेंच त्याच्या वाढींत पुन्हां आकस्मिकता येतें. पण ही आकस्मिक वाढ लोकसंख्येची वाढ स्वतंत्रपणें न झाली असतांही फालतू मजूरांचा पुरवठा भरपूर मिळाल्यावांचून होत नाहीं. हा पुरवठा सतत मिळत राहण्याचा उपाय म्हणजे उत्पादन वाढत असतां मजूरांची गरज त्या प्रमाणांत कमी कमी लागावी अशी यंत्रसामुग्री वगैरे साधनें निर्माण करणें हा होय. त्यामुळें मजूरांची कांहीं संख्या नेहमीं उत्पादनाच्या व्यवसायांतून बाहेर हांकालली जाते. म्हणून आधुनिक उद्योग-धंद्यांच्या वाढीचें जें स्वरूप आहे तें श्रम करणाऱ्या मजूरांचा एक भाग नेहमीं पूर्णपणें किंवा अर्धवट बेकार करून टाकण्यानें बनलेलें आहे. लोक-संख्येच्या स्वाभाविकपणें होणाऱ्या वाढीमुळें भांडवलदाराच्या हातीं जेवढे फालतू मजूर हवी तशी विल्हेवाट करतां येण्याजोगें असतात तेवढ्यावर भांडवलदारी उत्पादन पद्धतीचें कधींही समाधान होत नाहीं. लोकसंख्येच्या वाढीची जी नैसर्गिक मर्यादा तिची पर्वा न करता फालतू औद्योगिक सैन्य भरपूर उभारतां येणें हें भांडवलशाही उत्पादनाच्या स्वैर हालचालीस अवश्य असते.

## कमी मजूराकडून अधिक श्रम

चर भांडवलाची वाढ अथवा घट ही रोजगारावर असलेल्या मजूरांच्या वाढीशीं अथवा घटीशीं समांतरच असते असें आपण येथवर गृहीत धरलें आहे. पण खरोखर भांडवलाच्या हुकुमांत मजू-रांची तीच संख्या असतां अथवा कमी झाली असतांही चर भांड-वलाचें परिमाण केव्हां केव्हां वाढूंही शकते. जेथें एखादा मजूर

मामुलीहून अधिक श्रम मालकाला देतो, आणि म्हणून त्याची मजूरी वाढते, तेथें असा प्रकार घडतो. या प्रकारांत श्रमाची किंमत तीच राहूं शकते, किंवा कमीही होते. मजूरीचा एकंदर खर्च जर जवळ जवळ सारखाच होईल तर अधिक मजूरांच्या पासून श्रम घेण्यापेक्षां कमी मजूरांच्यापासून अधिक मजूराइतके श्रम पिळून घेणें हें भांडवल-दाराच्या हिताचें असतें. कारण असें करण्यांत एकंदर मजूरांच्या-मानानें स्थिर भांडवलाचें प्रमाण आपोआपच कमी राहते. उत्पादनाचें प्रमाण जितकें अधिक व्यापक असेल तितकी कमी मजूरापासून अधिक श्रम घेण्याची भांडवलदाराची वासना तीव्र असते. धनसंचय वाढत जातो तसतशी ही वासना आणखी आणखी वाढत जाते.

## धनसंचयाचा उगम व फल

भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या विकासाबरोबरच श्रमाची उत्पादनशक्तिही वाढत जाते. ही उत्पादनशक्तीची वाढ धनसंचयाचें कारणही असतें आणि परिणामही असते. यामुळें भांडवलदाराला चर भांडवलाचें परिमाण न वाढवतां प्रत्येक श्रमशक्तीची पिळणूक अधिक तीव्रपणें करून अधिक श्रम पदरांत पाडून घेतां येतात हें आपण पूर्वीं पाहिलें आहे. तसेंच आपण हेंही पाहिलें आहे कीं भांडवलदार हा कसबी कारागिरांच्या जागीं बिनकसबी मजूर नेमून, पुरुषांच्या जागीं स्त्रिया नेमून, प्रौढांच्या जागीं मुलें नेमून तेवढ्याच भांडवलांत अधिक श्रमशक्ति खरेदी करीत जातो. आणि म्हणून धनसंचय जस-जसा वाढत जातो तसतसें अधिकाअधिक चर भांडवल हें मजूरांची संख्या न वाढवतां अधिकाधिक श्रम मात्र उत्पादनाच्या कामीं लावीत असते. आणि उलट चर भांडवल न वाढतांही तितक्याच श्रमशक्तीकरवीं अधिक श्रम उत्पादनाच्या कामीं लावीत असते.

तसेंच चांगल्या दर्जाचे पुष्कळसे मजूर काढून टाकून हलक्या दर्जाचे खूप मजूर कामावर लावण्यांत येतात.

## आळस विरुद्ध फाजील काम

धनसंचयाच्या वाढीबरोबर यंत्रसामुग्रींत जी क्रांति होत जाते तिच्याहूनही अधिक वेगानें हें फालतू मजूरांचें सापेक्ष प्रमाण वाढत जातें. चर भांडवलाचें प्रमाण स्थिर भांडवलाच्या मानानें जें कमी कमी होत असतें, त्याहीपेक्षां अधिक वेगानें फालतू मजूरांची संख्या वाढत असते. मजूरांची श्रमशक्ति ज्या प्रमाणांत वाढत असते त्याहून अधिक वेगानें मजूरांचा पुरवठा वाढवण्याचें कार्य भांडवल करीत असतें. रोजगारीवर असणाऱ्या मजूराकडून फाजील काम करून घेऊन ही राखीव सैन्याची गर्दी फुगवली जाते. आणि उलट हें राखीव सैन्य म्हणजे बेकार मजूर रोजगारी मिळविण्याच्या आपसांतील चढाओढीमुळें, भांडवलदाराच्या गुलामगिरींत आधींच असलेल्या मजूरावर, त्यांना फाजील कामाच्या सक्तीस मान तुकवायला लावण्यासाठीं, दडपण घालीत असते. मजूरांच्या कांहीं संख्येवर फाजील काम लादून बाकीच्यावर आळशीपणानें राहण्याचा जुलूम करणें आणि उलट आळशीपणाच्या जुलूमानें गांजलेल्यांनें रोजगारीवर असलेल्यांना फाजील काम करण्यास भाग पाडणें ही घटना वैयक्तिक भांडवलदाराची संपत्ति वाढवण्यास कारण होते. आणि सामाजिक धनसंचय जसजसा वाढत जातो तसतसें त्या प्रमाणांत राखीव सैन्याची वाढ करण्यासही हीच घटना कारण होते. मजूराकडून फाजील काम करून घेण्याचा हा प्रकार फालतू लोकसंख्या निर्माण करण्यास किती अवश्य असतो, हें इंग्लंडच्या उदाहरणावरून स्पष्ट झालें आहे. माणसांचे श्रम वांचविण्याचीं साधनें इंग्लंडजवळ केवळ प्रचंड आहेत

हें खरें; तरी पण उद्यां जर वैयक्तिक श्रम कांहीं एका हिशेबानें कमी केले आणि कामगारांचें वय, लिंग, त्याचा विशिष्ट वर्ग, वगैरे सर्व गोष्टी लक्षांत घेऊन एकूण श्रमांची योग्य प्रमाणांत वाटणी केली तर इंग्लंडांत आज असलेली मजूरांची संख्या हल्लीं चालू असलेल्या उत्पादन प्रमाणावर राष्ट्रीय उत्पादन चालू ठेवण्यासाठीं अपुरी पडेल. आज अनुत्पादक व कचऱ्यावारी वाया जाणारी मजूरांची प्रचंड लोकसंख्या उत्पादक बनवणें अवश्य आहे.

## मजूरीच्या दराची चढउतार

मजूरीच्या दरांचा एकंदरीनें विचार करतां असें म्हणावें लागतें कीं या औद्योगिक राखीव सैन्याची म्हणजे बेकार मजूरांची संख्या कमी अथवा अधिक होत जाईल त्याप्रमाणें मजूरीचे दर वाढतात अथवा कमी होतात. ही बेकारांची संख्याही वर जें दशवार्षिक आर्थिक चक्र सांगितलें त्या काळांत होणाऱ्या परिस्थितीच्या फेरबद्लावर अवलंबून असते. म्हणून मजूरींचें दर एकंदर मजूरांची लोकसंख्या कमीअधिक होण्यावर अवलंबून नसून एकंदर मजूरवर्गाची विभागणी रोजंदार व बेकार या दोन वर्गांत कशी होते, फालतू मजूरांची लोकसंख्या किती वाढते अथवा कमी होते, वेळोवेळीं रोजंदार किती राहतात अथवा बेकार होतात त्यावर अवलंबून असते. आधुनिक उद्योगधंद्यांत वर सांगितलेलें दशवार्षिक चक्र व त्यांतील अवस्थांतरें घडून येत असून, धनसंचयाची वाढ जसजशी होत जाते तसतसे एकंदर धंद्यांत अनियमित असे हेलकावे उत्पन्न होतात. हे हेलकावे भराभर एकामागून एक येऊं लागतात. अशा या भांडवलशाही पद्धतींत भांडवलाचें परिमाण वाढलें कीं सापेक्षतेनें मजूरांच्या बाजारांत मजूरांचा तुटवडा दिसावा आणि भांडवल कमी झालें म्हणजे

मजूरांच्या बाजारांत मजूरांचा फाजील पुरवठा दिसावा अशाप्रकारें मजुरांच्या पुरवठ्याचें नियंत्रण होत असतें.

## लोकसंख्येविषयीं चुकीचा सिद्धांत

पण " हें नियंत्रण भांडवलाच्या परिमाणानें न होतां मजूरांची संख्या स्वतंत्रपणें कमी झाली तर मजूरांचा तुटवडा पडूं लागतो आणि मजूरांची संख्या वाढली तर मजूरांचा पुरवठा वाढूं लागतो," अशी बतावणी करणारे सिद्धांती मोठे उमदे लोक असले पाहिजेत. या सिद्धांत्यांच्या मतें भांडवलाचा संचय वाढला कीं मजूरीचे दर वाढतात. मजूरीचे दर वाढले कीं त्यामुळें मजूरवर्गांना अधिक प्रजोत्पादनाची प्रेरणा होते. हा क्रम मजूरांच्या बाजारांत मजूरांची संख्या भरून वाहूं लागेपर्यंत चालतो. पुढें मजूरीचे दर उतरतात आणि मग उलट परिस्थिति उत्पन्न होऊं लागते. मजुरांची लोकसंख्या मजुरीचे दर कमीं होण्यानें हळूं हळूं थोडथोडी मरून जाते. यामुळें कांहीं दिवसांनीं भांडवल हें मजूरांच्या मानानें अधिक होतें. अथवा दुसरे कांहीं अर्थशास्त्रज्ञ म्हणतात त्याप्रमाणें मजूरीचें दर उतरले म्हणजे नफा वाढतो; त्यामुळें भांडवलाचा संचय भराभर होऊं लागतो. आणि मजूरीचे दर कमी असल्यामुळें मजूरांच्या लोकसंख्यावाढीवर आपोआप नियंत्रण बसतें. नंतर पुन्हां मजूरांच्या मागणीपेक्षां मजूरांची संख्या कमी झाल्यामुळें मजुरीचे दर वाढतात. त्यामुळें पुन्हां त्यांची लोकसंख्या वाढते. व याप्रकारें दुसरे चक्र सुरू होतें. भांडवलशाही विकासाचें काय सुंदर चित्र हें! मजूरीचे दर वाढल्यामुळें लोकसंख्येची वाढ होऊन, ही वाढलेली लोकसंख्या श्रम करण्यास समर्थ होण्याइतका काल जाण्यापूर्वी कित्येकवेळां कारखानदारी पद्धति व मजूरवर्ग यांचे अनेक लढे होऊन ते जिंकले जावे लागत असतात.

## वरील सिद्धांतांतली चूक

१८४९ पासून १८६० पर्यंत मजूरीचे दर अगदीं नाममात्र वाढले. त्यावेळीं इंग्लंडांतील शेतीच्या मुलुखांत धान्याचे भाव खूप उतरले. उदा. विल्टशायरमध्यें आठवड्याची मजूरी ७ शि. पासून ८ शि. पर्यंत चढली होती. डार्सेटशायरमध्यें ७ अथवा ८ शि. पासून ९ शि. पर्यंत चढली. ह्याचे कारण युद्धामुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितींत मालाची मागणी खूप वाढल्यामुळें शेतमालाचे भाव वाढले; त्यामुळें शेतींत खूप मजूरांना मागणी आली. रेल्वे, कारखाने, खाणी इत्यादींचीही वाढ झाली. मजूरीचे दर जितके कमी असतील तितके त्यांच्या वाढीचें प्रमाण डोळ्यांत भरण्याइतकें मोठें असतें. खरोखर प्रत्यक्ष वाढ अगदीं थोडी झाली असूनही प्रमाण मात्र अगदीं डोळ्यांत सलूं लागतें. उदा. आठवड्याची मजूरी २० शि. असली, आणि ती २२ शि. झाली तर ही वाढ १०% होते. पण ७ शि. मजूरी असली आणि ती जर ९ शि. झाली तर ही वाढ २८$\frac{४}{७}$% दिसते. कानाला ऐकायला ही शेकडेवारी मोठी छान लागते. याबद्दल सर्वत्र शेतकऱ्यांत ओरड चालूं झाली होती. आणि या मजूरांना अर्धपोटीं ठेवणाऱ्या मजूरीच्या दरासंबंधानेंही 'लंडन इकॉनमिस्ट' नें सर्व मजूरांच्या मजूरीच्या दरांत ही मोठी भरभक्कम वाढ होय, अशी बडबड मोठ्या गंभीरपणें चालवली होती. यावेळीं शेतकऱ्यांनीं काय केलें? मजूरांच्या मजूरींत जी मोठी छान वाढ झाली होती तीमुळें मजूरांची लोकसंख्या वाढून त्यामुळें पुन्हां मजूरीचे दर उतरेपर्यंत शेतकरी थांबले असतील काय? मुळींच नाहीं. त्यांनीं अधिक यंत्र सामुग्री वापरली आणि या यंत्रसामुग्रीचा वापर सुरूं होतांच मजूरांचे संख्येचें प्रमाण इतकें वाढलेलें दिसलें कीं, शेतमजूरांचे मजूरीचे

दर उतरविता येऊन शेतकऱ्यांना हायसें वाटलें. आतां शेतीमध्यें पूर्वींपेक्षां शेतकऱ्यांनीं अधिक भांडवल घातलें. आणि तें अधिक उत्पादक होईल अशा प्रकारें वापरलें यामुळें मजूरांची मागणी नुसती सापेक्षतेनें उतरली इतकेंच नव्हे तर स्वतंत्रपणेंही उतरली.

## अर्थशास्त्रज्ञांचा घोटाळा

मजूरीच्या दरांचा चढ–उतार ज्या नियमांनीं होत असतो, आणि उत्पादनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत मजूरांची वाटणी ज्या नियमांनीं होत असते, हे दोन्ही प्रकारचे नियम एकच असल्याचा घोटाळा वरील आर्थिक सिद्धांतांत करण्यांत आला आहे. उदा. अमुक एका उत्पादनाच्या क्षेत्रामध्यें विशेष अनुकूल परिस्थिति उत्पन्न झाल्यामुळें त्या क्षेत्रांत भांडवलाचा संचय अधिक होतो. सर्व निरनिराळ्या उत्पादनांच्या शाखांत जो सरासरी नफा होत असतो त्यापेक्षां या विशिष्ट क्षेत्रांतील नफा अधिक असल्यामुळें या क्षेत्राकडे अधिक भांडवल आकर्षिलें जातें. अर्थात त्या क्षेत्रांत मजूरांची मागणी वाढ आणि मजूरीचें दरही वाढतात. मजूरीचे दर वाढले म्हणजे अधिक मजुरांची संख्या या क्षेत्राकडे आकर्षिली जाते. आणि याप्रमाणें या क्षेत्रांत श्रमशक्तीची गर्दी होऊं लागली म्हणजे मजुरीजे दर पुन्हां उतरतात. ते एकंदर सरासरी दराच्या मर्यादेस येतात, आणि जर श्रमशक्तीची गर्दी विशेषच झाली असेल तर या सरासरीच्याही खालीं जातात. अशा वेळीं मग या क्षेत्रांत नवीन मजूर येण्याचे बंद होतात इतकेंच नव्हे तर या क्षेत्रांतून मजूर आतां बाहेरही जाऊं लागतात. अर्थशास्त्रज्ञाला याच देखाव्यांत मजुरीचे दर वाढल्यानें मजुरांची संख्या वाढते व मजुरीचे दर कमी झाल्यानें मजुरांची लोकसंख्या कमी होते असा कार्यकारण भाव दिसतो. त्याची चूक होते ती ही कीं,

उत्पादनाच्या अमुक एक विशिष्ट क्षेत्रांत लोकसंख्येच्या लंबकाचे जे हेलकावे त्याला दिसतात ते सर्व क्षेत्रांतल्या सर्व मजुरासंबंधींही खरे आहेत असें धरून तो चालत असतो. वास्तविक त्याला दिसणारें दृश्य हें, उत्पादनाच्या निरनिराळ्या शाखांच्या मजूरासंबंधींच्या कमीअधिक गरजाप्रमाणें मजूरांच्या होणाऱ्या वाढीचें असतें.

## बेकारांचा उपयोग

पूर्ण मंदीच्या काळांत अथवा सर्वसामान्य भरभराटीच्या काळांत औद्योगिक क्षेत्रांतील राखीव सैन्य म्हणजे जे बेकार मजूर ते प्रत्यक्ष रोजगारीवर असलेल्या मजुरांच्या मानगुटीवर दगड ठेवल्यासारखे ठरत असतात. फाजील उत्पादन ज्यावेळीं होत असते आणि मजूरांत क्षोभ उत्पन्न झालेला असतो अशा काळांत मजुरांच्या वाढत्या मागण्यांना या बेकार सैन्यामुळें आपोआप लगाम बसत असतो. म्हणून मजुरासंबंधींचा जो मागणी आणि पुरवठा यांचा सिद्धांत तो व्यवस्थितपणें कार्यक्षम होण्यासाठीं मजुरांची संख्या सापेक्षतेनें गरजेहून फालतू असणें अत्यवश्य आहे. मजुरांची लोकसंख्या अशी नेहमीं अधिक असली म्हणजे मागणी आणि पुरवठा या सिद्धांताचा अंमल मजुरांची भांडवलदाराकडून होणारी पिळणूक व भांडवलदारांची मजुरावरील सत्ता यास पूर्ण अनुकूल अशा प्रकारें होत असतो. भांडवलशाही उत्पादनाची संघटना एकंदर व्यवहाराची जुळणी जी करते ती भांडवल वाढत गेलें तरी मजूरांची मागणी तितक्या प्रमाणांत सरसकट वाढूं नये, अशा प्रकारें करीत असते.

## मागणी-पुरवठ्याची धरसोड

मजूर जितकें काम अधिक करतील, जितकें धन अधिक निर्माण करतील आणि आपली उत्पादनशक्ति जितकी अधिक वाढवतील तितक्या

प्रमाणांत भांडवलाचा विकास करणें हें मजूरांचें जें कार्य तें अधिकाअधिक धोक्यांत येतें ही गोष्ट मजूरांच्या लक्षांत येऊन तिचें रहस्यही त्यांना अवगत होऊं लागतें. मजूरांची लोकसंख्या भांडवलशाहीच्या गरजेपेक्षां अधिक झाली म्हणजे मजूरामजूरांची चढाओढ तीव्र होते हें मजूरांच्या ध्यानांत येतें. मग कामगार-संघटना वगैरे साधनांनीं रोजंदार व बेकार यांमध्यें नियमित सहकार्य निर्माण करून भांडवलशाही उत्पादनाचा मागणी आणि पुरवठ्याचा जो जड सिद्धांत त्याचे घातक परिणाम अजिबात नष्ट करण्याचा अथवा सुसह्य करण्याचा प्रयत्न ते करतात. मजूरवर्ग असें करूं लागले म्हणजे भांडवलदार व त्यांची खुशामत करणारे अर्थ-शास्त्रज्ञ यांची, मागणी आणि पुरवठा यांच्या त्रिकालाबाधित व पवित्र सिद्धांतावर हा अत्याचार होत आहे अशी ओरड सुरू होते. त्यांच्या मतें मागणी आणि पुरवठ्याचा सिद्धांत अगदीं सुरेलपणें चाललेला असतां बेकार आणि रोजंदार यांच्या संघटनेमुळें या सुरेलपणांत बदसूर निर्माण होतो. परंतु उलट मागसलेल्या वसाहतींत परिस्थिति प्रतिकूल असल्यामुळें औद्योगिक क्षेत्रांत बेकार सैन्य निर्माण करणें भांडवलदारांना अशक्य होतें. त्यामुळें मजूरवर्गाला गुलामाप्रमाणें भांडवलदारवर्गाच्या लगामीं रहावें लागत नाहीं. आणि मग अशा वेळीं मागणी आणि पुरवठा या पवित्र सिद्धांताविरुद्ध भांडवलदार व त्यांचे खुशामत्ये अर्थशास्त्रज्ञ हे स्वतःच बंड करून सरकारच्या जुलमी शक्तीनें मजूरांना लगाम घालतात. व त्यांना भांडवलदारांना सोयीस्कर अशाप्रकारें वाकवितात.

## भांडवलशाहींतलें भ्रमदर्शन

सापेक्षतेनें फालतु अशी मजूरसंख्या अनेक स्वरूपांत असूं शकते. प्रत्येक मजूर ज्यावेळीं पूर्ण बेकार अथवा अर्ध बेकार असेल तेव्हां

तो या फालतू वर्गांतच गणला जातो. कारखान्यांत अथवा इतर सर्व श्रमगृहांत जेथें जेथें यंत्राचा प्रवेश झालेला असतो अथवा आधुनिक श्रमविभागपद्धति अमलांत आलेली असते तेथें पुष्कळ मुलांना फक्त वयांत येईपर्यंतच कामावर लावण्यांत येते. प्रौढ वयांत हीं मुलें आलीं म्हणजे धंद्याच्या त्याच शाखांत फार थोड्यांना रोजगार मिळतो आणि बहुसंख्यांना अगदीं नियमितपणें हाकाललें जातें. यांतील कांहीं कामगार भांडवल कोठें देशांतरास गेलें तर त्याच्या बरोबर आपणही जातात. याचा एक परिणाम असा होतो कीं पुरुष लोकसंख्येच्या मानानें स्त्रियांची संख्या वाढते. भांडवलाचा संचय होऊं लागला म्हणजे या संचयाच्या प्रमाणांत मजूरांची लोकसंख्या नैसर्गिकपणें कधींच वाढत नाहीं. तरीपण प्रत्यक्ष व्यवहारांत भांडवलाच्या मानानें लोकसंख्या अधिक आहे असा देखावा नेहमीं दिसत असतो. हें श्रमस्वरूप दृश्य भांडवलशाहीच्या गतिक्रियेंत अंगभूतच आहे.

## मजूरांचा शारीरिक अधःपात

भांडवलशाहीला प्रौढ न झालेले असे तरुण मजूर पुष्कळ हवे असतात. एकीकडून मजूरांची संख्या पुरेशी नाहीं म्हणून ओरड चालू असते. पण त्याचवेळीं कित्येक हजार मजूर बेकार होतात. कारण श्रम–विभागपद्धतीनें प्रत्येक मजूराला एक विशिष्ट काम करण्याचेंच सामर्थ्य राहतें. व तेंच काम मिळणें नेहमीं शक्य नसल्यानें पुष्कळ लोक बेकार राहतात. शिवाय भांडवलाकडून मजूरांची श्रमशक्ति इतकी वेगानें पिळून घेतली जाते कीं मजूरांचें अर्धेअधिक आयुष्य संपण्यापूर्वींच त्याचा जीवनरस निपटून नाहींसा झालेला असतो. मग असें हे चिपाड बनलेले मजूर फालतू मजूरांच्या संख्येंत

पडतात, अथवा आपल्या मुळच्या उच्च दर्जावरून खालच्या दर्जास जातात. विशेषतः आधुनिक धंद्यांतल्या मजूरांतच अल्पायुषी माणसें आढळतात. मँचेस्टरचा मेडिकल हेल्थ ऑफीसर डॉ. ली सांगतो, " मँचेस्टरमधील वरिष्ठ मध्यम वर्गांतल्या माणसांचें सरासरी मृत्युवय ३८ वर्षांचें होतें. पण मजूरवर्गांचे सरासरी मृत्युवय फक्त १७ च होतें. लिव्हरपूलचें बाबतींत हे आकडे अनुक्रमें ३५ आणि १५ असे होते. यावरून सुखवस्तु वर्गाचें आयुष्य दरिद्री नागरिकांच्या आयुष्याच्या दुप्पटीहून अधिक होतें हें लक्षांत येईल. ( बर्मिंगहॅम सॅनिटरी कॉन्फरन्सच्या अनावरणप्रसंगींचे जे. चेंबरलेन, मेयर यांचें भाषण : १५ जाने. १८७५ )

## शेतीमजूरावर संकट

भांडवलशाही उत्पादन पद्धतीनें शेतीचें क्षेत्र व्यापलें म्हणजे जितक्या प्रमाणांत हें क्षेत्र भांडवलाकडून व्यापलें जाईल तितक्या प्रमाणांत शेतमजूरांच्या मागणीची संख्या उतरते, आणि शेतींत गुंतवलेलें भांडवल मात्र वाढत जातें. यामुळें शेतीवर अवलंबून असणाऱ्या लोकसंख्येंतील कांहीं भाग शहरी मजूर अथवा कारखानदारी मजूर होऊं पहात असतो. कारखानदारीच्या क्षेत्रांत फालतू मजूर मिळविण्याचा हा झरा नेहमीं वहात राहतो. अर्थात शहरामध्यें हा फालतू मजूरांचा झरा खेड्यांतून वहात येण्यापूर्वी प्रथम खेड्यांत फालतू मजूर अस्तित्वांत असणें अवश्य असतें. खेड्यांतून फालतू मजूर शहरांत जाण्याला वाव मिळाला म्हणजे मग खेड्यांत फालतू मजूरांची संख्या केवढी प्रचंड होती हें लक्षांत येतें. म्हणून शेती-मजूराची मजूरी अगदीं किमान मर्यादेवर येते आणि तो कंगालपणाच्या चिखलांत एक पाय रोंवून उभा असतो.

## शिकार होते तरी संख्या वाढते

या सापेक्ष फालतू मजूरांचा दुसरा एक प्रकार रोजंदार मजूरांतलाच असतो. यांना रोजगारी अतिशय अनियमितपणें मिळत असते. यामुळें भांडवलदारांना वाटेल तशी वापरता येईल अशा श्रमशक्तीचा कधींही न संपण्याएवढा खजिना उपलब्ध होत असतो. सर्वसामान्य मजूराच्या सरासरीच्या राहणीच्या खालीं या मजूरांची राहणी असते. यामुळें भांडवलदाराला व्यापक प्रमाणावर पिळणूक करण्याच्या नव्या शाखा काढतां येतात. जास्तींत जास्त वेळ काम घेऊन कमींत कमी मजूरीवर या मजूरांना राबविण्यांत येतें. "घरगुती उद्योगधंदे" हें या व्यापक पिळणुकीचें महत्त्वाचें क्षेत्र होय. या क्षेत्रांत लागणारे मजूर आधुनिक उद्योगधंद्यांत व शेतींत जे फालतू मजूर असतात त्यांतून घेतले जातात. विशेषतः प्रचंड उद्योगधंद्यामुळें ज्यांचे हस्तव्यवसाय बुडत आहेत अशा हस्तव्यवसायिकांना या घरगुती उद्योगधंद्यांत ओढण्यांत येतें. पण हे मजूर आपली लोकसंख्या इतर मजुरांच्या मानानें बरीच अधिक वाढवीत असतात. त्यांच्यांत जन्म व मृत्यू अधिक असतात. मजूरीचे दर कमी कमी असतां कुटुंबें अधिकाधिक मोठीं असतात आणि यामुळें कुटुंबाच्या मानानें चरितार्थ संपत्ति कमीकमीच असते. खरोखर रानटी माणसांना अथवा सुधारलेल्या भांडवलदारांनाही भांडवलशाहीचें हें वैशिष्ट्य अशक्यप्राय वाटेल. व्यक्तिशः दुर्बल अशा जनावरांची संख्या एकसारखी वाढत राहावी आणि परत त्यांची एकसारखी शिकार होत रहावी असे दृश्य या घरगुती धंद्यांतील मजूराकडे पाहून मनांत येते.

## कंगालांचा तीन प्रकारचा गाळ

सापेक्ष फालतू लोकसंख्येचा जो अगदीं गाळ असतो तो अतिशय

कंगाल अवस्थेंतच राहात असतो. पुंड, गुन्हेगार, वेश्या, वगैरे समाजाला " धोकादायक " वर्ग वगळून उरलेल्या कंगालांचा गाळ तीन प्रकारचा असतो. काम करण्यास समर्थ अशांचा पहिला वर्ग. इंग्लंडांतील कंगालांची आकडेवार माहिती नुसती वरवर पाहिली तरी प्रत्येक आर्थिक संकटाचे वेळीं कंगालांची वाढ होते. आणि व्यापाराची भरभराट होऊं लागतांच कंगाल कमी होतात असें आढळून येतें. पोरकी मुलें व कंगाल मुलें यांचा दुसरा वर्ग. औद्योगिक क्षेत्रांतल्या बेकार सैन्याचे हे उमेदवार असतात. १८६० सालच्या औद्योगिक भरभराटीच्या काळीं रोजंदार मजूरांच्या सैन्यामध्यें यांची भराभर भरती होते. तिसरा वर्ग नीतिभ्रष्ट अशा भिकारड्यांचा हे कोणतेंही काम करण्यास असमर्थ असतात. कोणत्याही परिस्थितीशीं जमतें करून घेणें त्यांना अशक्य असतें. कारण श्रमविभाग पद्धतीमुळें अमुक एका विशिष्ट शाखेंतच काम मिळणें शक्य असतें व त्यांना तें करतां येत नाहीं. आणि त्यांच्या दुर्दैवानें सर्वसामान्य कामगारांच्या-पेक्षां ते जगतातही अधिक. शेवटचा वर्ग हा उद्योगधंद्यांतील अपघातांना बळी पडलेल्यांचा असतो. धोक्याची यंत्रसामुग्री, खाणी, रासायनिक कारखाने वगैरेंच्या वाढीबरोबर यांची वाढ होत असते. शरीरास कांहींतरी व्यंग झालेले, एखादा रोग जडलेले असे मजूर व उद्योगधंद्यास बळी पडलेल्या विधवा यांचा यांत भरणा असतो. कंगालपणा हें रोजंदार मजूरांचें इस्पितळ होय, आणि औद्योगिक क्षेत्रांतील बेकारांच्या डोईवर लादलेली धोंड होय. सापेक्षतः फाजील अशी लोकसंख्या जी भांडवलशाहींत निर्माण होत असते. तींत या कंगालां-चाही समावेश होत असतो. ज्याप्रमाणें भांडवलशाहीं उत्पादनाला व भांडवलवाल्यांच्या संपत्तीच्या वाढीला फालतू लोकसंख्येची गरज असते त्याप्रमाणें त्यांतच या कंगालांचीही गरज असते. भांडवलशाही उत्पा-

दनाच्या आंगणांत त्यांचा प्रवेश होत असतो. पण त्यांचे पोषणाची जबाबदारी मुख्यतः आपल्या अंगावरून मजूरांच्या व कनिष्ठ मध्यमवर्गाच्या खांद्यावर कशी फेकून द्यावी ही कला भांडवलदारांना अवगत असते.

## भांडवलशाही बरोबरच बेकारीचीही वाढ

सामाजिक संपत्ति व प्रत्यक्ष व्यवहारांत गुंतलेलें भांडवल जितकें मोठें असेल, त्याचें सामर्थ्य जितकें अधिक असेल, आणि त्यामुळेंच मजूरांची एकूण संख्या व त्यांची उत्पादनशक्ति जितकी जास्त असेल तितके औद्योगिक क्षेत्रांतील बेकार सैन्य अधिक असतें. ज्या कारणांनीं भांडवलाची विस्तारशक्ति वाढत असते त्याच कारणांनीं भांडवलाच्या हातीं अधिकाधिक श्रमशक्ति येत असते. म्हणून धनोत्पादनसाधनें जशी वाढत जातात त्याचप्रमाणांत औद्योगिक क्षेत्रांतील बेकार सैन्यही वाढत जातें. पण हें राखीव बेकार सैन्य रोजंदार मजूरांच्या मानानें जितकें अधिक असेल तितक्या प्रमाणांत फालतू मजूरांची संख्या अधिक असते. आणि त्यांना श्रमाच्या यातना जितक्या कमी तितकें त्यांचें दुःख अधिक असतें. मजूरवर्गातील आळशी लोकांचे थर व बेकारांची संख्या जितकी अधिक तितका कंगालपणा अधिक असतो. भांडवलशाही धनसंचयाचा हा सर्व सामान्य सिद्धांत होय. इतर सर्व सिद्धांताप्रमाणें प्रत्यक्ष व्यवहारांत निरनिराळ्या परिस्थितींत तो थोडाफार बदलत असतो. पण त्याच्या पृथक्करणाची सध्यां आपणांस जरूरी नाहीं.

भांडवलाच्या गरजेप्रमाणें मजूरांनीं आपली लोकसंख्या ठेवावी हें शहाणपण शिकवणाऱ्या अर्थशास्त्रज्ञांचा मूर्खपणा आतां कोणासही सहजपणें समजणारा आहे. भांडवलशाही उत्पादन आणि भांडवलसंचय याच्या संघटनेमुळें भांडवल आणि त्याच्या गरजेप्रमाणें मजूरांची प्राप्ती यांची जुळणी नेहमीं होत असते. या जुळणीची पहिली आवश्यक

गोष्ट सापेक्ष फाजील लोकसंख्या अथवा औद्योगिक क्षेत्रांतले राखीव व बेकार सैन्य ही होय. याची अखेर फलश्रुति औद्योगिक क्षेत्रांतील रोजंदार कामगारांचें वाढतें दुःख आणि कंगालांची वाढती धोंड ही होय.

## भांडवलशाहीचा उलटा दृष्टिकोण

सामाजिक श्रमशक्तीचें उत्पादनसामर्थ्य वाढल्यामुळें सतत अधिकाधिक प्रमाणांत धनोत्पादन साधनें कामास लावतां येतात आणि मानवी शक्तीचा व्यय कमी कमी करतां येतो, हा जो सिद्धांत तो भांडवलशाही समाजामध्यें पुढील प्रमाणें मांडला जातो. श्रमाचें उत्पादनसामर्थ्य जितकें अधिक, जितका रोजगारीच्या साधनावर मजूरांचा बोजा अधिक तितकी मजूरांची जीवनपरिस्थिति अधिक कठीण होते. म्हणजे मजूरांना दुसऱ्याचें धन वाढविण्यासाठीं अथवा भांडवलाच्या आत्मविस्तारासाठीं स्वतःची श्रमशक्ति विकणें अवघड होत जातें. धनोत्पादन साधनें आणि श्रमाचें उत्पादनसामर्थ्य यांची वाढ धनोत्पादक लोकसंख्येपेक्षां अधिक वेगानें होत असते, ही वस्तुस्थिति भांडवलशाही दृष्टिकोनांत उलटी दिसत असते. म्हणजे भांडवलाला स्वतःच्या वृद्धीसाठीं, मजूरांच्या संख्येस राबवण्यासाठीं अनुकूल अशी परिस्थिति जितक्या लवकर वाढत असते त्याहून मजुरांची लोकसंख्या अधिक लवकर वाढत असावी असें वाटतें.

## मजूरांच्या दुःखाची वाढ

आपण ८ व्या व ९ व्या प्रकरणांत पाहिलेंच आहे कीं, श्रमाची सामाजिक उत्पादनशक्ति वाढविण्याचे जे उपाय भांडवलशाही उत्पादन पद्धतींत अमलांत येतात ते सर्व वैयक्तिक मजुरांचें नुकसान करून अमलांत आणलेले असतात. उत्पादनाच्या वाढीसाठीं वापरावयाच्या सर्व साधनांनीं मजुरावर ताबा मिळवलेला असतो व

मजुरांची पिळणूक चालविलेली असते. या भांडवलशाही उत्पादन पद्धतीनें मुळचा पूर्ण असलेला मनुष्य माणसाचा एक तुकडा होत असतो. एखाद्या यंत्राचा जणूं कांहीं एक अवयव या अवस्थेपर्यंत तो ढकलला जातो. त्याला त्याच्या कामांतली गोडी कांहींही वाटत नाहींशी होते. आणि संतापदायक अशा श्रमाचें स्वरूप त्याच्या कामाला येतें. भौतिकशास्त्रांना स्वतंत्र शक्तीचें स्वरूप आलें म्हणजे मजुराला आपल्या श्रमप्रक्रियांचे बाबतींत बौद्धिक विकासाला वावच रहात नाहीं. ज्या परिस्थितींत कामगार काम करीत असतो ती परिस्थिति भांडवलदार बिघडवून टाकतात. आणि मजूर कारखान्यांत काम करीत असतां अतिशय नीचपणाची म्हणून चीड आणणारी सुलतानी त्याजवर गाजविली जाते. त्याचें सर्व जीवन श्रम-जीवन केलें जातें. आणि त्याचीं बायकामुलें भांडवलशाही रण-गाड्याच्या चाकाखालीं ओढलीं जातात. वाढावा उत्पन्न करण्याच्या सर्व पद्धति या धनचंयाच्याही पद्धति असतात. आणि धनसंचयाची वाढ हेंही त्या पद्धति वाढविण्याचें एक साधन होऊन बसते. म्हणून धन-संचय ज्या प्रमाणांत वाढेल त्या प्रमाणांत मजुराची परिस्थिति, त्याचा पगार अधिक असो अथवा कमी असो, अधिकाधिक वाईट होत जाते. सापेक्ष फाजील लोकसंख्या अथवा औद्योगिक राखीव सैन्य याचा भांडवलाच्या संचयाशीं सम-तोल राखणारा जो सिद्धांत तोच मजुराला भांडवलाशीं घट्ट जखडून ठेवतो. भांडवलाचा संचय जसजसा वाढत जाईल तसतसा मजुरांच्या दुःखाचा संचयही वाढवीत नेण्याचें काम हाच सिद्धांत करीत असतो. समाजाच्या एकाटोकास धनसंचय होत असतां दुसऱ्या टोंकांस दुःख, यातना गुलामगिरी, अज्ञान, पशुता, नैतिक अधःपात इत्यादींची गर्दी होते.

---

# प्राथमिक धनसंचयाचें गुपित : : : १४*

## आरंभ कोठून ?

पैशाचें भांडवलांत रूपांतर कसें होतें हें आपण पाहिलें, तसेंच भांडवलांतून वाढावा कसा काढला जातो आणि वाढाव्यांतून परत भांडवल कसें काढलें जातें हेंही आपण पाहिलें आहे. पण भांडवलाचा संचय होता असें म्हटलें म्हणजे त्या संचयापूर्वी वाढावा अस्तित्वांत होता असेंही मानावें लागतें. वाढाव्यापूर्वी भांडवलशाही उत्पादनपद्धति असावी लागते. भांडवलशाही उत्पादन पद्धतीपूर्वी पुष्कळसें भांडवल आणि बरीचशी श्रमशक्ति विक्रीमाल उत्पन्न करणाऱ्यांच्या हातीं असावी लागते. हा सर्व युक्तिवाद एकाद्या दुष्ट चक्रव्यूहांत सांपडल्याप्रमाणें होत राहतो. यांतून बाहेर पडण्याचा मार्ग म्हणजे, भांडवलशाही धनसंचयापूर्वी प्राथमिक धनसंचय होता असें मानणें हा ठरतो. यालाच ॲडम स्मिथ 'पूर्वीचा संचय' (प्रीव्हियस ॲक्यु-

---

* कॅपिटल, खं. १, प्रकरण २६.

म्युलेशन ) असें म्हणतो. हा संचय भांडवलशाही उत्पादन पद्धतीनें निर्माण केलेला नसून भांडवलशाही पद्धतीचा तो आरंभ असतो.

## माणसाचें पहिलें पाप

अर्थशास्त्रामध्यें या प्राथमिक संचयाचें कार्य जें होत असतें तें धर्मशास्त्रांत प्राथमिक पापानें जें कार्य केलें आहे त्यासारखें असतें. आदामनें फळ खाल्लें आणि त्यामुळें मानव वंशावर पाप कोसळलें. प्राचीन काळची ही एक पौराणिक कथा आहे असें सांगितलें म्हणजे मानवी पापाचा उगम समजला असें मानण्यांत येतें. भूतकाळीं दोन प्रकारचीं माणसें होतीं. उद्योगी, बुद्धिमान, विशेषतः काटकसरी आणि मोठीं निवडक, अशा माणसांचा एक प्रकार होता; दुसरा प्रकार आळशी, पुंड, फाजील खर्चीक आणि गुंडागिरीनें जगणारे यांचा होता. धर्मांतल्या प्राथमिक पापाची जी पौराणिक कथा आहे त्या कथेंत माणसाच्या प्राथमिकपापामुळें कपाळाच्या घामांत भाकरी भिजवून खाण्याचें दुर्दैव माणसावर ओढवलें असें सांगितलें आहे; पण अर्थशास्त्रांतल्या प्राथमिक पापाच्या इतिहासावरून कांहीं थोड्या लोकांना मात्र कपाळाच्या घामांत भाकरी बुडवून खावी लागत नाहीं असें दिसून येतें. असो, तें जाऊं द्या. प्रस्तुत म्हणजे वर जे आपण भूतकाळांतल्या माणसांचे दोन प्रकार केले त्यांपैकीं पहिल्या प्रकारच्या माणसांनीं धनाचा संचय केला आणि उलट दुसऱ्या प्रकारच्या माणसांच्या जवळ कांहींच न उरल्यामुळें आपल्या अंगावरील कातड्याहून वेगळें असें विकण्याला त्यांच्याजवळ कांहींच राहिलें नाहीं. याप्रमाणें त्यांच्या प्राथमिक पापापासूनच प्रचंड बहुसंख्य समाजाच्या दारिद्र्यास सुरवात झाली. तेव्हांपासून त्यांनीं कितीही श्रम केले तरी आजवर श्रम विकण्याहून अधिक असें त्यांच्याजवळ विकण्याला

कांहींच नव्हतें. आणि पहिल्या प्रकारच्या मूठभर लोकांची मात्र संपत्ति जी वाढत गेली ती त्यांनीं काम करण्याचें बंद करून कितीतरी काळ लोटला तरी अजून सारखी वाढतेच आहे. असले नीरस पोरकट विचार रोजच्या रोज मालकी हक्काच्या समर्थनार्थ शिकवले जातात.

## मालकी हक्कांचें पोरकट समर्थन

उदाहरणार्थ थायर्स हा फ्रेंच मुत्सद्दी आपल्या मुत्सद्दीगिरीच्या गंभीरतेनें मोठें आत्मविश्वासपूर्वक फ्रेंच लोकांना हे विचार शिकवीत असे. पण ज्या ज्या वेळीं मालकी हक्काचा प्रश्न उपस्थित होतो त्या त्या वेळीं 'मालकी हक्काची हीच उपपत्ति समाजविकासाच्या सर्व अवस्थांत अशीच्या अशीच खरी होती ' हें लहान मुलांचें बौद्धिक अन्न सर्वांना पाजलें जातें. प्रत्यक्ष इतिहास पाहिला तर युद्धांत विजय मिळविणें, परक्यास गुलाम करणें, दरोडे घालणें, खून करणें, थोडक्यांत म्हणजे पाशवी शक्ति वापरणें, यांनींच धनसंचयाच्या कार्याला फार मोठी मदत केली आहे. अर्थशास्त्राच्या नाजूक इतिहासांत अनादि काळा-पासून धनसंचयाच्या कथा मोठ्या सत्शीलतेच्या असल्याचें वर्णिलेलें असतें. हक्क आणि श्रम हींच सर्वकाळीं श्रीमंतीचीं साधनें होती असें इतिहासांत सांगितलेलें असतें; अर्थात चालू सालीं मात्र असें घडलेलें नसतें येवढा अपवाद इतिहास सांगतो. पण ऐतिहासिक वस्तुस्थिति अशी आहे कीं प्राथमिक धनसंचयाचे मार्ग हे सत्शील-तेचें कधींच नव्हतें.

## भांडवलासाठीं आवश्य परिस्थिति

धनोत्पादनाचीं साधनें आणि चरितार्थसाधनें हीं ज्याप्रमाणें स्वतः भांडवल असतातच असें नाहीं त्याचप्रमाणें पैसा व विक्रीमाल हीही

स्वतः भांडवल असतातच असें नाहीं. त्यांचें भांडवलांत रूपांतर करावें लागतें. हें रूपांतर फक्त एका विशिष्ट परिस्थितींच करतां येतें. ही परिस्थिति म्हणजे अत्यंत भिन्न अशा प्रकारच्या विक्रीच्या दोन वस्तु घेऊन विक्रीसाठीं दोन भिन्न भिन्न विक्रेते समोरासमोर यावे लागतात. एका बाजूचा विक्रेता हा पैसा, धनोत्पादनाचें साधन, चरितार्थाचें साधन याचा मालक असतो. त्याच्याजवळ जीं मूल्यें असतात तीं दुसऱ्याची श्रमशक्ति विकत घेऊन त्याला वाढवावयाचीं असतात. दुसऱ्या बाजूस स्वतंत्र असे मजूर असतात; ते स्वतःची श्रमशक्ति विक्रीत असतात. हे मजूर स्वतंत्र असतात असें म्हटलें; ते दोन अर्थानें स्वतंत्र असतात. एक अर्थ म्हणजे ते स्वतः गुलाम अथवा बांधलेले मजूर म्हणजे स्वतःच धनोत्पादनाचें साधन नसतात, या अर्थानें स्वतंत्र असतात. आणि दुसरा अर्थ म्हणजे मालक शेतकऱ्यांना जसें स्वतःच्या जमीनी वगैरे मालकीचें धनोत्पादन-साधन असतें तसाही बंध यांना कांहीं नसतो, याही अर्थानें ते स्वतंत्र असतात. विक्रीमालाच्या बाजारांत परस्परापासून अत्यंत भिन्न असे दोन विक्रेते परस्परासमोर विनिमयासाठीं येणें ही गोष्ट भांडवलशाही उत्पादनाला प्राथमिक अशी आवश्यक परिस्थिति होय. आपल्या श्रमाचें फल प्राप्त करून घेण्याचें जें जें साधन असेल त्याच्यावर मजूरांची मालकी मुळींच असतां कामा नये हीं भांडवलशाही उत्पादनासाठीं पहिली आवश्यक गोष्ट आहे. भांडवलशाही उत्पादन पद्धति एकदां आपल्या पायावर उभी राहूं लागली म्हणजे मजूर आणि धनोत्पादन साधनांची मालकी यांमधील वियोग तीं कायम ठेवते इतकेंच नव्हे तर अधिक अधिक प्रमाणांत हा वियोग ती वाढवीत जाते. भांडवलशाही उत्पादन पद्धतीच्या विकासाचा जो मार्ग तो मजूरांपासून धनोत्पादनसाधन काढून घेत राहणें हाच असूं शकतो; याच पद्धतीनें

एका बाजूस सामाजिक चरितार्थाचीं व धनोत्पादनाचीं साधनें भांडवलांत रूपांतरित केलीं जातात आणि धनाच्या प्रत्यक्ष उत्पादकांना रोज—मजूर बनविलें जातें. ज्याला प्राथमिक धनसंचय असें म्हटलें जातें. तो अशा प्रकारें प्रत्यक्ष धनोत्पादकापासून धनोत्पादन साधन हिरावून घेण्याच्या पद्धतीनेंच जमविलेला असतो. तो प्राथमिक दिसतो याचें कारण तो भांडवल व तदनुषंगी उत्पादनपद्धति यांच्या इतिहासाच्या पूर्वकाळांतला असतो.

## सरंजामशाहींतून भांडवलशाहीची वाढ

भांडवलशाही समाजाची आर्थिक संघटना ही सरंजामदारी समाजाच्या आर्थिक संघटनेंतून वाढली आहे. सरंजामी समाज मोडून गेल्यावर भांडवलशाहीचीं बीजें अनिर्बंधपणें वाढूं लागलीं.

धनाचा प्रत्यक्ष उत्पादक भूदासअवस्थेंतून मोकळा झाला, गुलामगिरींतून सुटला, बांधील मजूरींतून सुटला, तेव्हांच त्याला आपल्या शरीराची विक्री करण्याचें स्वातंत्र्य मिळालें. मालविक्री करणारा विक्रेता हा जेथें बाजार असेल तेथें माल विकण्यास जातो, त्याप्रमाणें स्वतःची श्रमशक्ति विकण्यासाठीं बाजारांत जाण्याचें स्वातंत्र्य मजुरास मिळण्यास मध्ययुगीन धंद्यांच्या संघांचीं उमेदवार वगैरे नात्यानें कामगारावर असलेलीं बंधनें नाहींशीं होणें अवश्य होतें. म्हणूनच भूदासपद्धतींतून, धंदेसंघांच्या बंधनांतून मानव जातीची मुक्तता करण्याची ऐतिहासिक चळवळ झाली. भांडवलदारांना या चळवळीचे फक्त हें परोपकारी स्वरूप तेवढेंच ध्यानांत येतें. पण त्या चळवळीनें धनोत्पादकाला रोजमजूर बनविलें. हे नवीन स्वतंत्र झालेले लोक ज्या वेळेला त्यांचें धनोत्पादनसाधन आणि सरंजामी समाजव्यवस्थेंत त्यांच्या जीवनाला मिळालेली विविध प्रकारची

शाश्वती हिराऊन घेतली गेली त्या वेळींच, स्वतःच्या शरीराचे विक्रेते बनले. त्यांच्या मालकी हक्काच्या लुटीचा हा इतिहास मानव जातीच्या रक्तानें लिहिलेला आहे.

## नव्या बादशहांचें ध्येय

या औद्योगिक भांडवलवाल्यांना, या नव्या बादशहांना, जुने हस्त व्यवसायाचे संघ मोडून टाकावयाचे होते इतकेंच नव्हे तर धनोत्पादन साधनांचे मालक असे जे सरंजामदार त्यांनाही उधळून लावावयाचे होतें. या बाबतींत भांडवलवाल्यांनीं जी सामाजिक सत्ता मिळविली तिचें स्वरूप सरंजामदार व त्यांचे हक्क, आणि धंद्यांचे संघ व धनोत्पादनाच्या विकासावर या संघांच्या नियमानीं घातलेलीं बंधनें यांविरुद्ध झगडा करून मिळविलेल्या यशासारखें दिसतें. या धंदे-वाल्या वीरांनीं तरवारीच्या वीरांना ज्या परिस्थितीमुळें यशस्वीपणें पराभूत केलें ती परिस्थिति त्यांनीं मुळींच निर्माण केली नव्हती, पण प्राचीन काळीं रोमन लोकांनीं आपल्या अंकित माणसावर स्वामित्व मिळविण्यासाठीं जितकीं दुष्टपणाचीं साधनें वापरलीं होतीं तितकीं दुष्टपणाचीं साधनें यांनीं आपल्या विकासक्रमांत वापरलीं.

## भांडवलशाही कालखंडाची सुरवात

रोजमजूर व भांडवलदार या दोघांचाही आरंभ मजुराच्या दास्यापासून झाला. प्रगति झाली ती या दास्याच्या रूपांतरानें व सरंजामशाहीच्या पिळणुकीचें भांडवलशाही पिळणुकींत रूपांतर होण्यानें झाली. ही प्रगति लक्षांत येण्यासाठीं फार मागें जावयास नको. भांडवलशाही उत्पादनाचे थोडथोडे आरंभ १४व्या व १५व्या शतकांतही भूमध्यसमुद्रालतगच्या तुरळक तुरळक शहरांत दिसतात;

तरी पण भांडवलशाही कालखंड १६व्या शतकापासून झाला असेंच म्हणावें लागतें. ज्या ज्या ठिकाणीं भांडवलशाही उत्पादन नजरेस पडतें तेथें तेथें भूदासपद्धति फार पूर्वीं नष्ट झालेली असून, मध्ययुगांत झालेल्या विकासाचें निदर्शक अशीं जीं राजकीय दृष्ट्या स्वतंत्र शहरें त्यांचा अस्त होऊं लागलेला आढळतो.

प्राथमिक संचयाच्या इतिहासांत झालेली प्रत्येक क्रांति ही काल-प्रवर्तक असून भांडवलदार वर्गाच्या वाढत्या निर्मितीस त्या प्रत्येक क्रांतीचा तरफेसारखा उपयोग झाला आहे. पण या सर्वांपेक्षांही ज्या ज्या वेळीं प्रचंड लोकसमाजाला चरितार्थ-साधनापासून सक्तीनें व अकस्मात तोडून काढून नागडें उघडें मजुरांच्या बाजारांत फेकण्यांत आलें ते कालखंड ऐतिहासिक महत्त्वाचे होत. शेतमजूर व लहान शेतकरी यांना त्यांच्या जमिनींतून उठवून लावणें हा या भांडवलशाही पद्धतीचा पाया आहे. या नागवणुकीचा इतिहास निरनिराळ्या देशांत निरनिराळ्या स्वरूपांत दिसतो. त्याचा अनुक्रम वेगवेगळा आढळून येतो, निरनिराळ्या देशांत याचा कालही वेगळा असतो. इंग्लंड हें जें आपण उदाहरण घेत आहों तेथें मात्र हा नागवणुकीचा इतिहास अगदीं नमुनेदार पद्धतीनें घडून आलेला आहे.

---

# शेतीवरील जनतेची हकालपट्टी : : : १५*

## १५व्या शतकांतले मालक शेतकरी

इंग्लंडांत १४ व्या शतकाच्या शेवटीं शेवटीं भूदासपद्धति प्रत्यक्ष व्यवहारांत नाहींशीच झाली होती. १४ व्या शतकाच्या शेवटीं आणि त्याहून अधिक प्रमाणांत १५ व्या शतकामध्यें स्वतंत्र मालक शेतकऱ्यांची प्रचंड लोकसंख्या होती. अर्थात हा मालकी हक्क सरंजामशाहींतल्या अनेक हक्कांच्या नांवाखालीं झाकलेला असे. राजांच्या मोठमोठ्या जमीनी असून त्यावर पूर्वी बेलीफ असे; तो भूदासच असे, त्याला पुढें या स्वतंत्र शेतकऱ्यांनीं हाकून लावलें. शेतीवर जे मजूर होते ते अनेक प्रकारचे असत. कांहीं मालक शेतकरी फुरसतीच्या वेळांत मोठ्या इस्टेटीवर मजूरी करीत. कांहीं अगदीं स्वतंत्र मजूर होते. हे संख्येनें अतिशयच थोडे होते. पण त्यांनासुद्धां एकेक मशागतीयोग्य अशी झोपडी व तिच्याभोंवतीं ४ एकर रान

* कॅपिटल, खंड १, प्रकरण २७.

देण्यांत येत असे. शिवाय सार्वजनिक जमीनीचा वापर इतर शेतकऱ्यांच्या बरोबर यांनाहि मिळत असे. यांत त्यांच्या गुरांना वैरण मिळे, इमारत-लाकूड, जळण व कुरण यांचाहि लाभ होई. युरोपांतील सर्व राष्ट्रांत सरंजामी उत्पादनपद्धतीचा असा एक विशेष दिसून येतो कीं शेतजमीनीची विभागणी जास्तींत जास्त पोट-जमिनदारांत केलेली आढळून येते. ज्याप्रमाणें राजाला प्रजा जितकी अधिक तितकें त्याचें बळ अधिक त्याप्रमाणें मोठ्या सरंजामदाराला जितके पोटसरंजामदार अधिक तितकें त्याचें बळ अधिक असें मानण्यांत येई. जमीनीचा खंड किती मिळतो यावरून त्याचें सामर्थ्य ठरत नसे. म्हणून नॉर्मन लोकांनीं इंग्लंड जिंकल्यावर, मोठ्यामोठ्या सरदारांत (बॅरन्स) इंग्लंडचा प्रदेश विभागला गेला—त्यांतील एकेका सरदारांखालीं कोठें कोठें ९०० पर्यंत पोटसरदार असत—तरीपण एकंदर देशभर लहान लहान मालक शेतकरीच चोहोंकडे पसरले होते. फक्त मधून मधून ज्या मोठ्या जमीनी असत त्या राजाच्या मालकीच्या असत. यामुळें, व १५ व्या शतकांत ठळकपणें दिसून येणाऱ्या शहरांच्या वैभवामुळें, इंग्रज लोकांजवळ बरीच संपत्ति जमा झाली. चॅन्सेलर फॉर्टेस्क यानें या संपत्तीचें मोठें वक्तृत्वपूर्ण वर्णन केलें आहे. पण ही संपत्ति भांडवलशाही संपत्ति होऊं शकली नाहीं.

## कफल्लकांची उत्पत्ति

भांडवलशाही उत्पादन पद्धतीचा जिनें पाया घातला त्या क्रांतीचा आरंभ १५व्या शतकाच्या शेवटल्या ३० वर्षांत व १६व्या शतकाच्या पहिल्या १० वर्षांत झाला. त्यावेळीं सरदारांचीं सैन्यें मोडून टाकलीं गेल्यामुळें मजूरांच्या बाजारांत कफल्लकांच्या झुंडीच्या झुंडी फेकण्यांत आल्या. सरंजामदारांचीं हीं सैन्यें घरोघर आणि

किल्ल्याकिल्ल्यांतून रिकामी अडगळ झाली होती असें सर जेम्स स्टुअर्ट यानें म्हटलें आहे. राजाची सत्ता त्यावेळीं जी विकास पावली ती भांडवलशाही विकासक्रमांतच विकास पावली होती. सरंजामदारांची आपणाभोंवतालची कैंची काढून टाकून पूर्ण अनियंत्रित व्हावें या इच्छेनें राजानें सरंजामदारांचीं हीं सैन्यें भराभर बरखास्त केलीं हें खरें. पण केवळ राजाची इच्छा एवढेंच याला कारण नव्हतें. राजा व पार्लमेंट यांच्याशीं मुजोरीनें लढतांना सरंजामदारांनीं शेतकऱ्यांना जमीनीवरून हुसकून लावून कफल्लकांचा फार मोठा वर्ग निर्माण केला. वास्तविक या शेतकऱ्यांना त्या जमिनीवर सरंजामदारासारखाच हक्क होता. पण तो सरंजामदारांनीं जुमानला नाहीं. तसेंच सार्वजनिक जमीनीहि या सरदारांनीं लुबाडल्या. फ्लँडर्समध्यें लोकरीच्या मालाची भरभराट झाल्यामुळें इंग्लंडांत लोकरीचा भाव वाढला, यामुळें जमीनीवरून शेतकऱ्यांना हुसकून लावण्यास सरंजामदारांना उत्तेजन मिळालें.

## सुवर्णयुगांतून लोहयुगांत

प्रचंड सरंजामी युद्धांत जुना उमराव वर्ग उध्वस्त झाला होता. नव्या उमरावांना जुने संस्कार कांहींही राहिले नव्हते. ते स्वतः आपल्या नव्या परिस्थितीचें अपत्यच होते. पैसा हें सर्वश्रेष्ठ सामर्थ्य आहे हें त्यांना पटलें होतें. आणि म्हणून शेतजमिनीला मेंढरें चरण्याच्या जमिनीचें रूप द्यावें ही त्यांची एकसारखी मागणी होती. 'डिस्क्रिप्शन ऑफ इंग्लंड' या पुस्तकांत हॅरिसननें, लहान शेतकऱ्यांना जमिनींतून हाकलून दिल्यामुळें खेड्यापाड्यांचा विध्वंस कसा होत आहे याचें वर्णन केलें आहे. "या लुटारूंना त्यांची काय पर्वा!" शेतकऱ्यांचीं घरें आणि मजूरांच्या झोपड्या मोडून टाकण्यांत आल्या होत्या अथवा मोडकळीला लागल्या होत्या. हॅरिसन लिहतो, "जुन्या

खेड्यांतले जुने पुरावे शोधले तर कांहीं कांहीं खेड्यांत १७।१८ तर कोठें २० घरेंहि उध्वस्त केलेलीं आहेत....लोकांच्या सुखसोयीचीं साधनें आजच्या इतकीं कमी कधींच नव्हतीं. लहान मोठीं शहरें, सर्व अथवा निम्मीशिम्मी मोडून गेलीं आहेत. तुरळक एखादें शहर लोकसंख्येनें वाढलेलें असेल. मेंढरें चारण्याला कुरण पाहिजे म्हणून शहरें मोडून टाकण्यांत आलीं आहेत. आतां त्या शहरांत सरदारांच्या खेरीज कोणी रहातच नाहीं....” या जुन्या इतिहासकारांच्या तक्रारी कांहींशा अतिशयोक्तीच्या आहेत खऱ्या. पण उत्पादनसाधनांत त्यावेळीं होत असलेल्या क्रांतीनें त्यावेळच्या लोकांच्या मनावर काय परिणाम होत होता तो यावरून खराखुरा कळतो. चॅन्सेलर फोर्टेस्क व थॉमस मूर या दोघांच्या लेखनाची तुलना केली असता १५ व्या व १६ व्या शतकाच्या दरम्यानचें अंतर केवढें मोठें आहे हें कळून येतें. थॉर्नटन्नें म्हटलें आहे तें अगदीं खरें कीं इंग्लिश मजूरांना त्यांच्या सुवर्णयुगांतून लोहयुगांत, दरम्यान मुक्कामहि न करतां, एकदम खेंचण्यांत आलें.

## अधिकारी भ्याले

सरकारी कायद्याचे अधिकारी या क्रांतीनें अगदीं भयभीत झाले. ‘राष्ट्राची संपत्ति’ हेंच राज्यसंस्थेचें अंतिम कर्तव्य मानावें इतक्या उच्च संस्कृतीच्या भूमीवर अजून सरकारचें न्यायशास्त्र आरूढ झालेलें नव्हतें. ७ व्या हेन्रीच्या इतिहासांत बेकन लिहितो, “जमिनींतून शेतकऱ्यांना हाकून लावण्याचा प्रकार त्यावेळीं (१४८९) फार वरचेवर होऊं लागला. शेतकऱ्यांचीं कुटुंबें लावून शेतजमिनीची मशागत करावी लागे. पण त्या शेतांना मेंढरें चारण्याच्या कुरणाचें स्वरूप दिल्यामुळें अगदीं थोड्याशा धनगरांवर कार्यभाग उरकूं लागला. कित्येक वर्षांचें, तसेंच

सर्व आयुष्यभर काम करणारे खंडकरी हुसकले जाऊन त्या जमिनी जमिनदारांनीं आपल्या मालकीच्या केल्या. यामुळें जनतेचा ऱ्हास झाला, त्यामुळें शहरांचा ऱ्हास झाला, धर्ममंदिरें खालावलीं, धर्ममंदिरांचे कर कमी झाले....यामुळें झालेली गैरसोय राजानें आणि पार्लमेंटनें मोठ्या प्रशंसनीय प्रकारानें भरून काढली." ७ व्या हेन्रीच्या अमदानींतील १४८९ च्या कायद्यानें कमींतकमी २० एकर जमीन ज्यांना आहे अशा शेतकऱ्यांचीं घरें मोडूं नयेत असें ठरविण्यांत आलें.

## सरकारी इलाज

आठव्या हेन्रीच्या अमदानींतील २५ व्या कायद्यानें वरील कायद्याचें पुनरुज्जीवन केलें. या कायद्यांत असा उल्लेख आहे कीं कित्येक मोठीं शेतें, गुरांची व विशेषतः मेंढ्यांचीं मोठमोठीं खिल्लारें अगदीं थोड्या लोकांच्या मालकींत आलीं आहेत. यामुळें जमीनीचा खंड फार वाढला असून जमिनीची मशागत अगदींच कमी झाली आहे. धर्ममंदिरें व कित्येक घरें पाडण्यांत आलीं आहेत. प्रचंड लोकसंख्येजवळून त्यांचें व त्यांच्या कुटुंबाच्या चरितार्थाचें साधन हिसकून घेण्यांत आलें आहे. आणि म्हणून या कायद्यानें ऱ्हास पावूं लागलेल्या शेतीच्या वसाहती पुन्हां बांधाव्या आणि शेतजमीन व कुरणें यांचें एक विशिष्ट प्रमाण ठरवावें अशी तरतूद केली. १५३३ तल्या एका कायद्यांत कांहीं मालकाजवळ २४००० मेंढरें असल्याचा उल्लेख असून त्यांनीं यापुढें २००० मेंढरेंच ठेवावींत असें त्या कायद्यांनीं फर्माविलें आहे. पण ७ व्या हेन्रीनंतर १५० वर्षेपर्यंत लहान शेतकऱ्यांना जमिनींतून हुसकून लावण्याविरुद्ध लोकांनीं केलेली ओरड आणि सरकारनें केलेले कायदे सारखेच निष्फळ ठरले. बेकननें न कळत या निष्फळतेचें कारण

दिलें आहे. ‘ एसेज्–सिव्हिल अँड मॉरल ’ ( एसे नं. २९ ) मध्यें बेकन लिहितो, “ शेतकऱ्यांची शेती व घरें अमुक एका दर्जाचीं करणें ही ७व्या हेन्रीनें योजिलेली युक्ति अतिशय परिणामकारक व प्रशं-सनीय होती. कोणाहि शेतकऱ्याला गुलामगिरी पत्करावी न लागतां पुरेशी संपत्ति जमवून राहतां यावें इतकीं जमीन त्याला मिळेल आणि शेतीचा नांगर भाडोत्री मजूराच्या हातीं न जातां मालक शेतकऱ्याच्या हातीं राहील अशी ७ व्या हेन्रीची तरतूद होती. ”

## संक्रमण काळ

पण भांडवलवाल्याला काय हवें होतें? जनता अधःपातास चालली आहे, गुलाम झाली आहे, भाडोत्री झाली आहे आणि त्यांच्या मजुराचें साधन भांडवलांत रूपांतरित झालें आहे हें त्यांना हवें होतें. या संक्रमण काळांत शेतमजुरांना पूर्वी देण्यांत आलेली ४ एकर जमीन त्या मजुराकडे रहावी अशी धडपड कायद्यानें केली, आपल्या झोपडींत शेतकऱ्यानें पोटभाडेकरी घेऊं नयेत अशी त्या शेतकऱ्याला बंदी करण्यांत आली. १ ल्या जेम्सच्या कारकीर्दींत ( १६२७ ) फ्रॉंट मिलच्या रोजर क्रोकरला फ्रॉंटमिलच्या जमिनीवर जिच्या भोंवतीं कायमची ४ एकर जमीन नाहीं अशी झोपडी बांधल्याबद्दल शिक्षा करण्यांत आली. १ ल्या चार्लसच्या अमदानींत ( १६३८ त ) जुन्या कायद्यांची व विशेषतः या ४ एकर जमिनीच्या कायद्याची बजावणी करण्यासाठीं कमिशन नेमण्यांत आलें होतें. क्रॉमवेलच्या वेळींहि लंडन पासून ४ मैलांच्या आंत ४ एकर जमीन ज्याला जोडलेली नसेल असे घर बांधून देण्यांत येत नसे. १८ व्या शतकाच्या प्रथमार्धांत शेत-मजुराच्या झोपडीला २ एकर जमीन जोडलेली नाहीं अशी एक तक्रार मांडण्यांत आलेली दिसते. हल्लीं पाहिलें तर अशा मजुराच्या

झोपडीला अगदीं छोटीशी बाग असेल, अथवा झोपडीपासून दूर अंतरावर कां होईना थोडीशी जमीन असेल तर तो भाग्यवान गणला जाईल. डॉ. हंटर लिहितो, " जमिनदार आणि शेतकरी येथें हातांत हात घालून एकजुटीनें राबतात, प्रत्येकाच्या झोपडीला जर कांहीं एकर जमीन देण्यांत आली तर मजूर हे फार स्वतंत्र होतील. "

## गरीबीस कायद्याची मान्यता

१६ व्या शतकांत जनतेच्या या नागवणुकीच्या पद्धतीस धर्म-सुधारणेच्या चळवळीनें ( रेफर्मेशन ) नवें व भयंकर उत्तेजन मिळालें. धर्मपीठांच्या इस्टेटी हिसकून घेण्यानेंही या कार्यास मदत झाली. धर्मसुधारणेच्या काळीं कॅथॉलिक चर्च हें इंग्लंडांतील पुष्कळशा जमिनीचे सरंजामी मालक होते. धर्ममंदिरांचीं वतनें खालसा केल्यानें धर्म-मंदिरांतले सेवक कफल्लक मजूर बनले. धर्मपीठांच्या इस्टेटी राज-घराण्यांच्या आवडत्या व लोभी लोकांना पुष्कळ प्रमाणांत देण्यांत आल्या. किंवा जमिनींच्या खरेदीविक्रीवर नफेबाजी करणाऱ्या शेतकऱ्यांना व नागरिकांना अगदीं थोड्या किंमतींत विकण्यांत आल्या. त्यांनीं सदर जमिनीवर असलेल्या आनुवंशिक पोटखंडकऱ्यांना हुसकून लावून सगळीं शेतें एकट केलीं. चर्चला मिळणारा जो धार्मिक कर त्यांतला कांहीं भाग गरीबांना कायद्यानें मिळे, तोही मुकाट्यानें जप्त करून टाकण्यांत आला....एलिझबेथ राणीच्या राज्याच्या ४३ व्या वर्षी इंग्लंडांत दारिद्र्याला कायद्यानें मान्यता मिळून गरिबांचा कायदा-पुअर लॉ पास झाला. " या कायद्याच्या कर्त्यांना कायद्याचीं कारणें सांगण्याची लाज वाटली असावी, कारण कायद्याचा नेहमींचा शिरस्ता मोडून त्यांनीं या कायद्यास हेतुवाक्य ( प्रीॲंबल ) घालण्याचेंच टाळलें.

## मालक शेतकरी खलास

पहिल्या चार्लस्च्या १६व्या कायद्याच्या ४थ्या प्रकरणांत हा 'पुअर लॉ' कायम करण्यांत आला. खरोखर पुढें १८३४ मध्यें या कायद्याचें स्वरूप अधिकच कठोर करण्यांत आलें. धर्मसुधारणेच्या चळवळींचें तात्कालिक परिणाम जे झाले ते तितकेसे टिकाऊ नव्हतें. धर्मपीठांची मिळकत ही जमिनदार वर्गाच्या परंपरागत सत्तेचा धार्मिक आधार होती. ही धर्मपीठांची मिळकत उध्वस्त होतांच जमीनदारांची परंपरागत सत्ताही पुढें फार काळ टिकली नाहीं. १७व्या शतकाच्या शेवटच्या दशकांतहि स्वतंत्र शेतकरी वर्गाची संख्या खंडकऱ्याच्यापेक्षां पुष्कळ अधिक होती. क्रॉम्वेलच्या सगळ्या शक्तीचा हे लोक आधार होते. आणि मेकॉलेनें कबूल केल्याप्रमाणें हे शेतकरी लोक दारुड्या धर्मगुरूंच्यापेक्षां अधिक नीतिमान असत. खेड्यांतील लहान लहान भिक्षुकांना त्यांच्या वरिष्ठ धर्मगुरूंनीं टाकून दिलेल्या रखेल्यांच्याशीं लग्नें करावीं लागत, असें मेकॉलेनें नमूद केलें आहे. १७५० च्या सुमारास हे मालक शेतकरी जवळ जवळ नाहींसे झाले होते. आणि १८व्या शतकाच्या शेवटच्या दशकांत शेतमजुरांची सार्वजनिक जमीनही अजिबात नाहींशीं झाली होती. या ठिकाणीं आम्ही शेतींतल्या क्रांतीची आर्थिक कारणें तूर्त बाजूस ठेवून, या क्रांतीसाठीं बळजोरी वापरण्यांत आली एवढेंच सांगत आहों.

स्टुअर्ट घराणें पुन्हां गादीवर आल्यानंतर जमीन-मालकांनीं जमीन बळकावण्यासाठीं कायदेशीर उपाय योजिले. बाकीच्या युरोप खंडांत कायद्याचीही परवा करण्यांत आली नाहीं. सरंजामदारांची जमीन-मालक या नात्याचीं सर्व कर्तव्यें त्यांनीं रद्द करून टाकलीं. जमीन मालक या नात्यानें सरकारी नोकरीचीं कामें जीं त्यांना करावीं लागत तीं

त्यांनीं रद्द केलीं. आणि यामुळें सरकारचें झालेलें नुकसान भरून देण्यासाठीं शेतकऱ्यांवर व इतर सामान्य जनतेवर त्यांनीं कर लादले. आधुनिक पद्धतीचे मालकी हक्क आपणांस या मिळकतींत आहेत असें ते सांगूं लागले. वास्तविक त्यांचे हक्क हे सरंजामी हक्क होते.

## दौलतीखालीं लुटीचा पाया

इंग्लंडांत झालेल्या 'कीर्तिशाली क्रांती'नें वुइल्यम ऑफ ऑरेंज याला इंग्लंडांत राजा केलें, त्याप्रमाणें जमिनदार आणि वाढावा लुबाडणारा भांडवलदार यांनाही सत्ताधारी केलें. आजवर त्यांनीं केलेल्या जमिनीच्या चोऱ्या विनयशीलपणें केल्या होत्या. पण आतां भयंकर प्रमाणांत सरकारी जमिनी चोरून त्यांनीं आपला नवा कालखंड सुरू केला. या सरकारी मिळकती अगदीं क्षुद्र किंमतीला विकण्यांत आल्या अथवा कांहीं कांहीं मिळकती तर खाजगी मालकींत सरळ सामील करण्यांतच आल्या. हें करतांना कायद्याचा उपचार अगदीं थोडाही पाळण्यांत आला नाहीं. आज इंग्लंडच्या उमरावांच्या ज्या अगदीं बादशाही दौलती आहेत त्यांचा पाया सरकारी जमिनी वरील प्रमाणें कपटानें ज्या घेतल्या गेल्या आणि धर्ममंदिरांच्या दौलतींची जी लूट केली गेली त्यांनींच घातला गेला. ( क्रॉम्वेलनें केलेल्या क्रांतींत या उमरावांच्या मिळकती थोड्याफार खालसा झाल्या होत्या. ) लुटीस भांडवलदार वर्गानें जी अनुकूलता दर्शविली तिच्या अनेक कारणांपैकीं एक असें होतें कीं त्यांना जमिनीची खरेदी–विक्री अनिर्बंधपणें व्हावयाला हवी होती. मोठ्या प्रमाणांत शेती करून शेतीची आधुनिक पद्धति त्यांना अमलांत आणावयाची होती आणि शेतमजूरांचा पुरवठा हवा तितका केव्हांही हाताशीं असणें त्यांना जरूर होतें शिवाय जमीन मिळविलेले हे नवे सरदार नव्या बँकवाल्यांचें स्वाभा-

विकपणेंच मित्र होते. या बँकवाल्यांचा नुकताच जन्म झाला होता. तसेंच मोठमोठ्या धंदेवाल्यांशींही या जमीनमालकांचें सख्य असे. या धंदेवाल्यांची भरभराट संरक्षक-जकातीवर अवलंबून होती. हे इंग्लिश भांडवलदार केवळ स्वतःच्या स्वार्थाच्या दृष्टीनें वागत होते.

सार्वजनिक जमीन ( म्हणजे सरकारी जमीन नव्हे ) ही प्राचीन ट्यूटन लोकांची संस्था होती. सरंजामशाहीच्या पांघरुणाखालीं ती ह्या वेळ पावेतों जीव धरून राहिली होती. ही सार्वजनिक जमीन कशी लुबाडली गेली हें आपण पाहिलेंच. त्यावेळीं शेतजमिनींचीं कुरणें करण्यांत आलीं. १५ व्या शतकाच्या अखेरीस ही लुबाडणूक सुरू झाली ती १६ व्या शतकांतही चालू राहिली. पण त्यावेळीं ही लुबाडणूक केवळ वैयक्तिक अत्याचारानें चालू असून न्यायसंस्था निरनिराळ्या कायद्यांच्या साहाय्यानें १५० वर्षेपर्यंत या लुबाडणुकीशीं सतत झगडत होती. १८ व्या शतकांत या संबंधानें जी प्रगति झाली ती अशी कीं कायदाच आतां या सार्वजनिक म्हणजे लोकांच्या जमिनी चोरण्याचें साधन बनला. अर्थात फार मोठे शेतकरी कायद्या-खेरीज आपल्या इतर लहानसहान साधनांच्या बळावर लुबाडणूक करीत होतेच. या चोरीचा पार्लमेंटरी प्रकार म्हणजे सार्वजनिक जमिनींना खाजगी मालकीचीं कुंपणें कायद्याच्या बळावर घालण्यांत आलीं हा होय. सरदारवर्गानें लोकांच्या जमिनी पार्लमेंटाच्या हुकुमानें निरनिराळ्या सरदारांच्या नांवें केल्या हें या कायद्याचें स्वरूप होतें. सर एफ्. एम्. एडन् यानें आपली बाजू मांडतांना आपलाच बचा-वाचा मुद्दा खोडून काढला आहे. सार्वजनिक जमिनी या जमिन-दारांच्या मोठ्या खाजगी मालकीच्या आहेत. कारण सरंजामदारांची जागा आतां या जमिनदारांनीं घेतली असें तो म्हणतो. तरी पण सार्वजनिक जमिनींना खाजगी मालकीचीं कुंपणें घालण्यासाठीं पार्ले-

मेंटचा कायदा पाहिजे असें हा पुन्हां म्हणतोच. म्हणजे ह्या जमिनी सार्वजनिक मालकीच्या आहेत अशी एक प्रकारें कबुलीच देऊन पार्लमेंटच्या बळावर त्या बळकावाव्या असें हा स्पष्टपणें सुचवीत आहे. शिवाय ज्या गरिबांच्या जमिनी काढून घेतल्या जातील त्यांना पार्लमेंटनें नुकसानभरपाई द्यावी असेंही तो सुचवितो.

## चोऱ्यांनीं मजूर मिळविले

स्वतंत्र शेतकऱ्यांची जागा हंगामी कुळांनीं घेतली. वर्षावर्षाच्या वहिवाटीचे करार करण्यांत आले. हे शेतकरी जमीनमालकांच्या लहरीअनुसार केव्हांही काढून टाकतां येणें शक्य असून तो अगदीं गुलामांचा घोळका होता. सार्वजनिक जमिनींच्या या पद्धतशीर चोरीनें एक महत्त्वाची गोष्ट केली ती अशी कीं १८व्या शतकांत भांडवली शेतें म्हणून जीं शेतें उदयास आलीं तीं या चोऱ्यांतून जमा झालीं होतीं. या चोऱ्यांनींच शेतीवरील शेतकऱ्यांना हुसकून लावून म्हणजे 'स्वतंत्र करून' औद्योगिक कारखान्यांना मजूर मिळवून दिले.

## कुंपणें घालण्याचे दुष्परिणाम

तरी पण १९व्या शतकाला राष्ट्रीय संपत्ति व जनतेचें दारिद्र्य हीं दोन्ही एकरूप आहेत हें जितक्या चांगल्या प्रकारें पटलें होतें तितकें १८व्या शतकाला पटलें नव्हतें. म्हणून त्या वेळच्या अर्थशास्त्रीय वाङ्मयांत सार्वजनिक जमिनींना कुंपणें घालण्याच्या कायद्यावर अगदीं कडाडीचे हल्ले झालेले दिसून येतात. माझ्यासमोर ऐतिहासिक साधनांचा जो ढिगारा पडला आहे त्यांतून कांहीं थोडे उतारे देतो. त्यावेळच्या परिस्थितीवर या उताऱ्यांनीं झगझगीत प्रकाश पडेल. संतापाच्या भरांत एक लेखक लिहितो "हर्टफर्डशायरमधील कित्येक तालुक्यांत ५० ते १५० एकर जमिनींतील २४ शेतें एकत्र

करून त्यांचीं ३ शेतें बनविण्यांत आलीं. "नार्दन्टनूशायर आणि लीस्टरशायर यांतील सार्वजनिक जमिनींना कुंपणें घालण्याचें काम फार मोठ्या प्रमाणावर झालें. मोठमोठ्या शेतजमिनींची कुरणें बनविण्यांत आलीं. त्यामुळें दरसाल जेथें १५०० एकर जमिनींत नांगर चाले तेथें आतां फक्त ५० एकर जमीन नांगराखालीं येत आहे. जुनीं वस्तीचीं घरें उध्वस्त झालीं असून त्यांच्या खुणा आतां धान्याचीं मोडकीं पेवें, गुरांचे पडके गोठे या अवशेषांत उरले आहेत. खेड्याच्या खुल्या मैदानावर जेथें १०० घरें होतीं व १०० कुटुंबें रहात तेथें आतां ८।१० घरें उरलीं आहेत........४।५ धनवान कुरणमालकांनीं २५।३० मोठ्या शेतकऱ्यांची जमीन आणि तितक्याच लहान शेतकऱ्यांची जमीन हिसकून घेऊन तिला कुंपण घालावें हा प्रकार नेहमीं घडणारा होता. सार्वजनिक जमिनींना कुंपणें घालण्याच्या या प्रकारानें शेतकऱ्यांचीं कुटुंबेंच्या कुटुंबें व त्यांचीं नोकर अथवा आश्रित असलेलीं इतर कुटुंबें देशोधडीस लागलीं आहेत." केवळ साध्या जमिनीच पड पडल्या असें नव्हे तर सर्व गांवानें मशागत केलेल्या अथवा गांवाला खंड देऊन खाजगी शेतकऱ्यांनीं मशागत केलेल्या जमिनी शेजारच्या जमिनदारांनीं कुंपणें घालण्याच्या कायद्याचें निमित्त करून हिसकून घेतल्या. "खुल्या जमिनी आणि मशागतीनें सुधारलेल्या जमिनी यांना कुंपणें घातल्यासंबंधानें मी आतां बोलतों आहे. या कुंपणें घालण्याच्या प्रकाराचें समर्थन करणाऱ्यांनींही कबूल केलें आहे कीं शेतकरी व त्यांचीं खेडीं यांना उठवून लावण्यांत आल्यामुळें शेतीची मक्तेदारी वाढते, शेतमालाचे भाव वाढतात, लोकसंख्या कमी होते; आणि पड पडलेल्या जमिनींवर कुंपणें घालण्याचा जो प्रकार हल्लीं चालू आहे त्यामुळें गरीबांचे चरितार्थसाधनही लुबाडलें जाऊन त्यांचें जीवन खडतर होत आहे. या

ओसाड जमिनीमुळेंही नव्या जमीनदारांची वाढलेली अफाट शेती आणखी वाढत आहे."

## शेतकऱ्याचा मजूर झाला

डॉ. प्राईस् लिहितो "या जमिनीवरील पूर्वीच्या शेतकऱ्यांचें वर्णन पुढीलप्रमाणें करण्यांत येई. 'शेतीवर आणि सार्वजनिक जमिनींत मेंढ्या, कोंबड्या, व डुकरें पाळून त्यावर हीं माणसें उपजीविका करतात म्हणून त्यांना बाजारांत कांहीं खरेदी करावें लागत नाहीं.' पण आतां या जमिनी कांहीं थोड्या मोठ्या शेतकऱ्यांच्या हातीं गेल्या म्हणजे जमिनींतून उठवून लावलेल्या शेतकऱ्यांना लोकांसाठीं राबून पोट भरावें लागेल. त्यांना लागणाऱ्या प्रत्येक वस्तूसाठीं त्यांना आतां बाजार पहावा लागेल...यामुळें धनोत्पादनाच्या कामीं अधिक श्रम-शक्ति उपयोगांत येईल हें खरें; कारण श्रम करणारावर सक्ति अधिक होईल....शहरें आणि धंदेवाले यांची वाढ होईल. कारण रोजगारी मिळविण्यासाठीं शहराकडे लोक धांवतील. शेती कोंडण्याच्या या प्रकाराचा हा परिणाम होणार आहे. गेलीं कित्येक वर्षें हा परिणाम होत आलाच आहे."

## चरितार्थगरजेहून कमी मजूरी

या कुंपणें घालण्याच्या प्रकाराचा ( एन्क्लोजर्स ) परिणाम एकंदरीनें कसा झाला यासंबंधानें डॉ. प्राईस सांगतो "खालच्या दर्जाच्या लोकांची परिस्थिति बहुतेकांचे बाबतींत अधिक वाईट झाली. ते मुळचे लहान लहान शेतकरी होते, पण आतां रोजमजूर व भाडोत्री झाले. आणि त्याबरोबरच चरितार्थसाधन मिळविणें हेंही त्यांना अवघड होऊन गेलें." खरोखर सार्वजनिक जमिनी हिसकून घेऊन तद्द्वारां शेतीच्या व्यवसायांत जी क्रांति करण्यांत आली, तिचा शेतमजुरावर

इतका भयंकर परिणाम झाला कीं सर एफ्. एम्. एडन याच्या मताप्रमाणें सुद्धां १७६५–८० या कालांत या मजुरांची कमींत कमी मजूरी पोट भरण्यास त्यांना हवे त्याहूनही कमी झाली. म्हणून गरीबांच्या कायद्यांतून यांना पोटभरीसाठीं मदत देणें भाग पडलें. प्राइस सांगतो, "जीवनाला अगदीं जरूर जें लागेल त्याहून अधिक मजुरी त्यांना कधींच मिळत नसे."

## 'राष्ट्रां'त मजूर अंतर्भूत नाहींत

डॉ. प्राईसचा एक विरोधक कुंपणें घालण्याच्या प्रकारांचें समर्थन करतांना लिहितो "लोकसंख्या या खेड्यांतून नाहींशी झाली ही गोष्ट कांहीं महत्त्वाची नाहीं, कारण शेतकरी खुल्या जमिनींत आतां आपले श्रम फुकट दवडीत नाहींत. जर लहान लहान शेतकऱ्यांना एकत्र आणून आपण त्यांचा लोकांसाठीं काम करणाऱ्या मजुरांचा तांडा बनविला तर अधिक श्रमशक्ति उपयोगांत येते. राष्ट्राला त्यापासून फायदा होतो." (पण या 'राष्ट्रां'त या मजुरांचा मात्र समावेश नाहीं!) "राष्ट्रानें ही गोष्ट इच्छिण्यासारखी आहे. कारण एकाच शेतावर अनेक शेतकऱ्यांचे संयुक्तश्रम उपयोगांत आणले गेल्यास धन अधिक निर्माण होते. या मजुरांना मजुरीवर लावणाऱ्या धंदेवाल्याला अधिक फायदा उरतो. त्यामुळं शेतीच्या धंद्यांची वाढ होते. हा धंदा ही राष्ट्राच्या संपत्तीची खाण आहे. मजुरांच्या संयुक्त श्रमानें जितक्या प्रमाणांत धान्याची निपज अधिक होईल तितक्या प्रमाणांत राष्ट्राचें धन वाढेल."

## अत्याचाराकडे शास्त्रज्ञांचें दुर्लक्ष

भांडवलशाही उत्पादनपद्धतीचा पाया घालण्यासाठीं "पवित्र मालकी हक्कावर" अगदीं निर्लज्ज असा झालेला हा अत्याचार अवश्य

होता असें दिसून येताच या अत्याचाराकडे अर्थशास्त्रज्ञ किती निर्विकार चित्तानें पहातात हें सर एफ्. एम्. एडन या परोपकार बुद्धीच्या टोरी लेखकाच्या लिहिण्यावरून दिसून येतें. १५व्या शतकाच्या शेवटच्या ३० वर्षांपासून १८व्या शतकाच्या अखेरीपर्यंत लोकांच्या जमिनी बळकावण्यामुळें सर्रास ज्या चोऱ्या, जे अत्याचार झाले त्या पासून सर एफ. एम्. एडन पुढील गोड अनुमान काढतो. " शेत-जमीन व कुरणजमीन यांमध्यें योग्य प्रमाण निर्माण करणें जरूर होतें. १४व्या शतकांत आणि १५व्या शतकाच्या बऱ्याच काळांत १ एकर कुरण आणि २।३ अथवा ४ एकर शेतजमीन असें प्रमाण असे. १६व्या शतकाच्या मध्यास हें प्रमाण २ एकर कुरण आणि २ एकर शेतजमीन इतकें कमी करण्यांत आलें. पुढें २ एकर कुरण व १ एकर शेतजमीन असें प्रमाण होवून अखेरीस ३ एकर कुरण व १ एकर शेतजमीन एथपर्यंत हें प्रमाण उतरविण्यांत आलें. हेंच प्रमाण अगदीं न्याय्य होय."

१९व्या शतकांत शेतीचा मजूर आणि सार्वजनिक जमीन यांचे-मध्यें कांहीं नातें होतें याचीही माणसांना विस्मृति पडली. अलीकडला काळ राहोच, पण ३५११७७० एकर सार्वजनिक जमीन १८०१ पासून १८३१ या काळामध्यें लोकांच्याकडून पार्लमेंटाच्या युक्त्यांनीं लुबाडून सरदारांना देण्यांत आली, त्याबद्दल शेतकऱ्यांना १ फार्दिंग तरी नुकसानभरपाई देण्यांत आली आहे काय?

## इस्टेटी मुक्त केल्या

शेतकऱ्यांच्यापासून जमीनी हिसकून घेण्याचा अगदीं अखेरचा प्रकार म्हणजे " इस्टेटी मुक्त करणें " (क्लिअरींग ऑफ इस्टेट्स्) या नांवानें प्रसिद्ध असलेला. याप्रकारानें माणसें सरळ हाकून लावण्यांत आलीं.

इंग्रजांनीं वापरलेल्या आजपर्यंतच्या सर्व पद्धतींनीं हे इस्टेटी मुक्त करण्याचेंच काम केलें. ज्या ठिकाणीं आतां स्वतंत्र शेतकरी हुसकून लावण्यास उरलेच नव्हते तेथें झोपड्या खाली करण्यांत आल्या, यामुळें ज्या जमिनीवर शेतकरी आतां उपरी कुळें म्हणून राबत त्या जमिनीवर राहण्याला झोपडीही उरली नाहीं. पण या इस्टेटी मुक्त करण्याच्या प्रकाराचा खरा व योग्य अर्थ काय हें आपणांस स्कॉटलंड-मधल्या पठारावरील विलासशाली अशा लोकांच्या वसाहतींतदिसून येतें. तेथें हा प्रकार अगदीं पद्धतशीरपणें अमलांत आला. एका झपाट्यांत सगळ्या इस्टेटी तेथल्या शेतकऱ्यांना हाकून लावून ' मुक्त' करण्यांत आल्या. ( आयर्लंडांत कित्येक खेडींच्या खेडीं एकदम निर्मनुष्य करण्यांत आलीं. स्कॉटलंडमध्यें एकेका तडाख्यांत जर्मनींतील एकेका संस्थानाएवढा मुलूख ' मुक्त ' करण्यांत आला.

## महापुरुष मालक झाले

या पठारावरील सेल्ट नांवाच्या टोळ्यांचे गट असत. प्रत्येक गट ज्या जमिनीवर वसलेला असे त्या जमिनीचा तो मालक असे. त्या गटाचा जो प्रतिनिधी म्हणजे ' महापुरुष ' ( ग्रेट मॅन ) हा त्या सर्व जमिनीचा नाममात्र मालक असे. इंग्लंडची राणी ही ज्या अर्थानें इंग्लंडच्या सर्व जमिनीची मालक गणिली जाईल त्याच अर्थानें हा ' महापुरुष ' त्या जमिनीचा मालक असे. ब्रिटिश सरकारनें ज्यावेळीं या महापुरुषांचीं अंतर्गत युद्धें आणि सखल प्रदेशावर त्यांच्या नेहमीं होणाऱ्या स्वाऱ्या थांबविल्या त्यावेळीं या गटांच्या मुख्यांनीं आपला परंपरागत चोऱ्यांचा धंदा अजिबात थांबविला नाहीं, त्यांनें फक्त त्यांनीं रूप बदललें. स्वतःच्या अधिकारांतच त्यांनीं त्या सर्व जमिनींची मालकी स्वतःकडे घेतली. यामुळें टोळ्यांतील लोकांशीं त्यांचीं भांडणें

सुरूं झाल्यानें या 'महापुरुषांनीं' त्या टोळ्यांतील लोकांना बेशक जमिनीवरून हुसकून लावलें. "इंग्लंडच्या राजानें आपल्या प्रजेला इंग्लंडच्या जमिनीवरून समुद्रांत हाकून लावल्यासारखाच हा प्रकार होता," असें प्रो. न्यूमन म्हणतो. २ऱ्या जेम्सच्या नातवाच्या शेवटल्या बंडानंतर ही क्रांति सुरूं झाली. सर जेम्स स्टुअर्ट आणि जेम्स अँडरसन यांच्या लेखनांत या क्रांतीच्या पहिल्या पहिल्या अवस्थेचा उल्लेख आढळतो. हाकून लावलेल्या गॉल नांवाच्या टोळ्यांना १८व्या शतकांत देशांतर करण्याची बंदी झाली. त्यांनीं ग्लासगो व इतर कारखानदारीच्या शहरीं नाइलाजानें जावें हा या बंदीचा हेतु होता.

## डचेस ऑफ् सदर्लंड

१९व्या शतकांत इस्टेटी 'मुक्त' करण्याचें धोरण कसें होतें याचें डचेस् ऑफ सदरलंड इचें एक उदाहरण दिलें असतां पुरें होईल. या बाईला काटकसर शास्त्र चांगलें येत असे. अधिकारावर येतांच तिनें आपल्या इस्टेटींत अगदीं मूलग्राही सुधारणा करण्याचा निश्चय केला. तिच्या इस्टेटीची लोकसंख्या आजवर हकालपट्टी होत होत १५००० वर आलीच होती. त्या इस्टेटींत तिनें मेंढरें घालण्याचें ठरविलें. १८१४ पासून १८२० पर्यंत ही १५००० लोकसंख्या म्हणजे ३००० कुटुंबें अगदीं पद्धतशीरपणें हाकून लावून निर्मूल करण्यांत आलीं. त्यांचीं सर्व खेडीं मोडून जाळून टाकण्यांत आलीं. त्यांच्या जमिनींचीं कुरणें करण्यांत आलीं. ब्रिटिश सैनिकांनीं या हकालपट्टीस मदत करतांना त्या रहिवाशांशीं मारामाऱ्या केल्या. एक बाई आपली झोपडी सोडीना, तेव्हां तिला त्या झोपडींत जिवंत जाळण्यांत आलें. अशा प्रकारें या डचेस् ऑफ सदरलंड या बड्या बाईनें

प्राचीन काळापासून स्थानिक टोळ्यांच्याकडे असलेली ७९४००० एकर जमीन बळकावली. तिनें या हाकून लावलेल्या लोकांना समुद्र-काठीं, प्रत्येक कुटुंबाला २ एकर याप्रमाणें ६००० एकर जमीन देऊन टाकली. ही ६००० एकर जमीन त्यावेळेपर्यंत अगदीं ओसाड पडलेली होती. तिच्या मालकांना तीपासून कवडीचेंही उत्पन्न होत नसे. पण या डचेसनें उदार होऊन या टोळ्यांना दर एकरी २ शि. ६ पेन्स खंड देणें भाग पाडलें. शतकानुशतकें या बाईच्या पूर्वजांसाठीं या टोळ्यांनीं आपलें रक्त सांडलें होतें त्याची ही फेड होती. चोरलेल्या या सर्व जमिनींचे या बाईसाहेबांनीं २९ भाग पाडले, आणि त्यांत मेंढ्या घालून प्रत्येक भागावर फक्त एक कुटुंब नेमलें. हीं कुटुंबेंसुद्धां इंग्लंडच्या शेतांतील नोकरांची आणलेलीं होतीं. १८३५ सालीं १५००० गॉल लोकांची जागा १३१००० मेंढ्यांनीं घेतली होती. उरलेल्या रानटी टोळ्या समुद्रकिनाऱ्यावर हाकालल्या गेल्या तेथें त्यांनीं मच्छीमारीनें आपली उपजीविका करण्याचा प्रयत्न केला. " पाण्याखालीं आणि पाण्याबाहेर राहूं शकणाऱ्या प्राण्याप्रमाणें ते आपलें जीवन घालवीत. पाण्यांतून अर्धें आणि पाण्याबाहेर अर्धें पण दोन्ही मार्गांनीं मिळून चरितार्थास लागेल त्याच्या अर्धें अन्न मिळवूनच ते आपली गुजराण करीत. " असें एका इंग्रज लेखकानें म्हटलें आहे.

## किनाऱ्यावरूनही गॉल हाकालले

पण आपल्या ' महापुरुषा ' बद्दल त्यांना जी विभूतिप्रियता वाटे तिचें प्रायश्चित्त त्यांना याहूनहि कठोरपणें घ्यावें लागलें. ते मारीत असत त्या माशांचा वास त्यांच्या ' महापुरुषां 'च्या नाकापर्यंत गेला. यांत कांहीं तरी नफा आहे असा या ' महापुरुषांना ' संशय आला.

आणि त्यांनीं लंडनमधील मोठ्या मच्छिमारी व्यापाऱ्यांना समुद्रकिनारे खंडानें दिले. गॉल टोळ्यांची ही दुसरी हकालपट्टी होय.

## हरणें आलीं माणसें हाकलली

शेवटीं मेंढरांच्या कुरणांचेंहि शिकारीच्या हरणांना ठेवण्याच्या जंगलांत रूपांतर करण्यांत आलें. इंग्लंडांत खरींखुरीं जंगलें नाहींत हें सर्वांना माहीत आहे. या जंगलांतील हरणें अगदीं पाळीव जनावरासारखीं गरीब व लंडनच्या पाटलासारखी लठ्ठ असतात; आणि म्हणून शिकार करण्याच्या या उमद्या हौसेला स्कॉटलंड हीच अखेरची एक जागा होती. १८४८ त सॉमर्स लिहितो " स्कॉटलंडच्या या पठारावर पावसाळ्यानंतर उकिरड्यावर उगवणाऱ्या छत्र्यांप्रमाणें जंगलें उगवत आहेत. ' गाइक ' च्या एका बाजूस ' ग्लेन्फेशी' नांवाचें नवीन जंगल निर्माण झालें आहे. दुसऱ्या बाजूला ' आर्डव्हेरीकी ' हें जंगल आलें आहे. त्याच दिशेनें ' ब्लॅकमाऊंट ' नांवाचें ओसाड जमिनीवर उभें केलेलें जंगल आहे. पूर्वेपासून पश्चिमेपर्यंत ॲबर्डीनजवळून आवॅनच्या खडकापर्यंत आपल्याला आतां जंगलामागून जंगलें आढळतात. या पठाराच्या दुसऱ्या भागांत ' लॉच आर्चे'ग ग्लेनगॅरी, ग्लेन मॉरिसन इत्यादि जंगलें आहेत. ज्या ठिकाणीं लहान लहान शेतऱ्यांचीं कुटुंबें रहात अशा मोठ्या दऱ्यांतून मेंढरें सोडण्यांत आलीं आहेत. त्या शेतकऱ्यांना अधिक ओसाड मुलुखावर पोट भरण्यास हाकलण्यांत आले. आतां ही मेंढरें नाहींशीं करून तेथें हरणें सोडण्यांत येत आहेत. आणि या हरणामुळें ओसाड जमिनीवर हाकलले गेलेल्या शेतकऱ्यांना त्याहून ओसाड अशा जमिनीकडे जावें लागणार आहे. आतां कमालीचें दारिद्र्य त्यांच्यावर कोसळेल. हरणांचीं जंगलें आणि माणसें दोन्हीं एकत्र कशी जगणार?

कोणीतरी एकानें मागें हटलेंच पाहिजे. आजवरच्याप्रमाणें पुढील २५ वर्षांत अशींच जंगलें वाढलीं तर एकूण एक गॉल या भूमींतून पार नाहींसे होतील....स्कॉटलंडच्या या पठारावर कांहीं जमीन-मालकांनीं जंगलउभारणीचा हा जो प्रकार चालू केला आहे तो कर्तृत्वाच्या महत्त्वाकांक्षेनें...शिकारीच्या हौसेनें केला आहे....पण दुसऱ्या कांहीं व्यवहारी जमीनमालकांनीं हरणांचा व्यापार केवळ नफ्याचे दृष्टीनें सुरू केला आहे. कारण जमिनीचें कुरण करून त्यांत मेंढ्या सोडण्यापेक्षां पुष्कळ, जमिनींचीं जंगलें करण्यासाठीं एखादी डोंगराची रांग खुली सोडणें हें अधिक फायदेशीर होऊं लागले. शिकारीचा जो हौशी असेल तो हरणें सोडून जंगल वाढविण्यासाठीं खिशांत असेल तेवढा सर्व पैसाही देण्याची पर्वा करीत नसे....नॉर्मन राजांच्या धोरणानें जेवढा जुलूम झाला असेल तितका सर्व जुलूम या पठारावरील लोकांवर झाला. हरणांना रान अधिकाधिक मिळत गेलें तर माणसांना जमीन अधिकाधिक कमी होत गेली....लोकांचे स्वातंत्र्याचे हक्क एकामागून एक नाहींसे करण्यांत आले. अजूनही जुलूम रोजच्यारोज वाढत आहे....लोकांची हकालपट्टी करण्याचें कार्य जणू कांहीं एखाद्या तत्त्वनिष्ठेनें जमीनमालकांनीं चालविलें आहे. जणू कांहीं शेतीच्या दृष्टीनें आवश्यक अशीच ही गोष्ट आहे. अमेरिका व ऑस्ट्रेलिया येथें झाडें व झुडपें जशीं तोडण्यांत येतात तशीं माणसें येथें हाकून लावण्यांत येत आहेत. आणि हें हकालपट्टीचें कार्य अगदीं शांतपणें एखाद्या धंद्यासारखें चाललें आहे."

## हे सत्शीलतेचे प्रकार

चर्चच्या जमिनींची, सरकारी जमिनींची व सार्वजनिक जमिनींची फसवणुकीनें लुबाडणूक, सरंजामदार व रानटी टोळ्या यांच्या जमिनी

बळकावून भयंकर अत्याचाराच्या बळावर खाजगी मालकींत त्यांचें करण्यांत आलेलें रूपांतर हेंच तें सत्शीलतेचे ( आयडिलिक ) म्हणून गणले गेलेले प्राथमिक धनसंचयाचे मार्ग होत. त्यांनीं भांडवली शेतीसाठीं शेती जिंकून तिचेंच भांडवल केलें. नंतर त्याच योगानें शहरांतील धंद्यासाठीं कायद्याचें मुळींच संरक्षण नसलेल्या अशा कफल्लक मजूरांचा आवश्य इतका पुरवठाही निर्माण केला.

---

## कफल्लकांविरुद्ध झालेले कायदे : : : १६*

### गुंडगिरीस भर आला

सरंजामदारांचीं सैन्यें मोडण्यांत येऊन आणि जमिनीवरून शेतकऱ्यांना हुसकण्यांत येऊन जीं हीं स्वतंत्र माणसें निर्माण करण्यांत आलीं तीं सगळींच्या सगळीं भराभर नव्या कारखान्यांत गुंतवलीं जाणें शक्य होईना. उलट परंपरागत राहणीची संवय असलेलीं हीं माणसें नवीन परिस्थितीच्या शिस्तींत एकदम बसवितां येईनात. यामुळें त्यांचें घोळकेच्या घोळके भिकारी, लुटारू अथवा गुंड झाले. ही गुंडगिरी कांहींशी त्यांच्या अंगींच होती. परिस्थितीच्या प्रेरणेनेंही कांहींसा हा गुण त्यांच्या अंगीं आला. म्हणून १५व्या शतकाच्या शेवटीं आणि सबंध १६ वें शतकभर पश्चिम युरोपांत गुंडगिरीविरुद्ध भयंकर अत्याचारी कायदे करण्यांत आले. हल्लींच्या कामगारांच्या प्राचीन पूर्वजांवर लादलेल्या सक्तीच्या गुंडगिरीबद्दल व दारिद्र्याबद्दल त्यांनाच उलट ही शिक्षा करण्यांत आली. ‘ राजीखुषीनें ’ गुन्हेगार

* कॅपिट्ल, खंड १, प्रकरण २८.

झालेले असें यांना कायद्यानें संबोधलें गेलें. आपल्या पूर्वीच्या धंद्यावर हे इच्छा असेल तर केव्हांही जाऊं शकतील असें कायदा मानीत होता. पण जुने धंदे उरलेच नव्हते हें कायद्याच्या गांवींही नव्हतें.

## क्रूर शिक्षा

८ व्या हेन्रीच्या कारकीर्दींत इंग्लंडांत या कायद्यांना सुरवात झाली. ८ व्या हेन्रीचा १५३० चा कायदा सांगतोः—म्हातारे आणि काम करण्यास असमर्थ अशा भिकाऱ्यांना भिकेचा परवाना देण्यांत यावा, आणि जे ताकतवान गुंड असतील त्यांना फटके मारण्यांत यावे अथवा तुरुंगांत घालण्यांत यावे. त्यांना गाड्यांच्या मागें बांधावें, रक्त वाहूं लागेपर्यंत चाबूक मारावेत. आणि नंतर आपल्या जन्मभूमीस अथवा पूर्वी ३ वर्षेंपर्यंत तो जेथें असेल तेथें परत जाण्याची शपथ त्यास घ्यायला लावावी, आणि श्रम करून पोट भरीन असें वदवावें. काय भयंकर दुर्दैव हें ! ८ व्या हेन्रीच्या २७व्या कायद्यांत याच कायद्याची पुनरुक्ति असून त्यांत आणखी कांहीं कलमें घालण्यांत आलीं. गुंडगिरीकरतां दुसऱ्यांदा पकडण्यांत आल्यास पूर्वीइतकेच फटके मारावेत आणि त्याच्या कानाचा तुकडा काढण्यांत यावा; तिसऱ्यांदा तो गुन्हेगार सांपडल्यास तो निगरगट्ट गुन्हेगार आहे व जनतेचा शत्रू आहे असें ठरवून त्यास ठार मारण्यांत यावें.

## शहरी गुलामगिरी

६ वा एडवर्डः—याच्या अमदानीच्या १ल्या वर्षांत म्हणजे १५४७ त केलेल्या एका कायद्यांत असें म्हटलें आहे कीं, जर कोणी काम करण्याचें नाकारील तर ज्यानें त्याच्यावर आळशी म्हणून

फिर्याद केली असेल, त्याचा गुलाम होण्याची शिक्षा त्याला देण्यांत यावी. या मालकानें आपल्या गुलामाला भाकरी, पाणी, हलकी दारू व उष्टें मांस खाऊं घालावें. त्याला कोणतेंही काम करावयाला लावण्याची सक्ति करण्याचा मालकाला हक्क आहे. तें काम कितीही किळसवाणें असो. तें करून घेण्यासाठीं मालकानें चाबूक व साखळदंड यांचा खुशाल उपयोग करावा. हा गुलाम जर १५ दिवस गैरहजर असेल तर त्याला आयुष्यभर गुलामगिरींत ठेवावें आणि त्याच्या कपाळावर अथवा पाठीवर 'S'('Slave') असा शिक्का मारण्यांत यावा. तो तीनदां पळून गेल्यास डाकू म्हणून त्याला ठार मारण्यांत यावें. मालक त्याला विकूं शकतो, दान देऊं शकतो किंवा गुराप्रमाणें भाड्यानें देऊं शकतो. गुलामानें मालकाविरुद्ध वर्तन केल्यास त्यास ठार मारण्यांत यावें. न्यायाधिकाऱ्यांच्याकडे तक्रार येतांच त्यांनीं या गुंडांना अटक करावी, ३ दिवसपर्यंत एखादा गुंड रिकामटेकडा राहिल्याचें आढळून आल्यास त्याला त्याच्या जन्मप्रदेशीं नेऊन लाल तापलेल्या लोखंडानें त्याच्या छातीवर 'V' ( व्हॅगबाँड ) असा छाप मारावा आणि त्यास बेड्या घालून रस्त्यावर अथवा दुसरे कुठंतरी कामास लावावें. या गुंडानें आपला 'जन्मप्रदेश खोटा सांगितल्यास याच ठिकाणचा व येथल्या लोकांचा अथवा गांवसंस्थेचा गुलाम त्याला करून त्याच्यावर 'S' असा शिक्का त्यावर मारावा. या गुंडाचीं सर्व मुलें घेऊन जाण्याचा नागरिकांना हक्क आहे. तेथें त्यांनीं त्यांना—मुलांना—२४ वर्षे-पर्यंत आणि मुलींना २० वर्षेपर्यंत उमेदवार म्हणून ठेऊन घ्यावें; ते जर पळून गेले तर या वयापर्यंत ते मालकाचे गुलाम म्हणून राहतील, म्हणजे मालक त्यांना बेड्या घालूं शकेल किंवा योग्य वाटल्यास चाबूक मारूं शकेल. प्रत्येक मालकाला आपल्या गुलामाच्या मानेस त्याची ओळख पटावी आणि तो पळून जाऊं नये यासाठीं लोखंडी

पट्टा घालण्याचा अधिकार आहे. या भयंकर कायद्याच्या शेवटच्या भागांत असें सांगितलें आहे कीं, जो गांव अथवा जीं माणसें गरीबांना अन्न-पाणी देतील त्यांना या गरीबांना कामाला लावण्याचा हक्क आहे. इंग्लंडांत, १९व्या शतकाच्या बऱ्याच भागांत 'राऊंड्स्मेन' या नांवानें हे शहरी गुलाम ठेवण्यांत आले होते.

## ठार मारण्यास परवाना

एलिझबेथ १५७२:—१४ वर्षांवरील बिगरपरवाना भिकाऱ्यांना फटके मारण्यांत येऊन त्यांच्या कानावर शिक्का मारावा; त्यांना कोणी २ वर्षे नोकरीवर ठेऊन घेण्यास तयार असल्यास मात्र शिक्षेची माफी मिळावी. भिकेचा गुन्हा पुन्हां करणारा माणूस १८ वर्षांचेवर असेल, आणि त्यास कोणी २ वर्षें नोकरीस ठेवून घेण्यास तयार नसेल तर त्यास ठार करण्यांत यावें. तिसऱ्यांदा गुन्हा केल्यास डाकू म्हणून त्यास निर्दयपणें ठार मारावें. एलिझबेथनें १५९७ त आणखी एक असाच कायदा केला.

१ ला जेम्स:— भीक मागत भटकणाऱ्या माणसाला ठक व गुंड म्हणून जाहीर करावे. न्यायाधिकाऱ्यांनीं त्यांना जाहीरपणें फटके मारून पहिल्या गुन्ह्यादाखल त्याला ६ महिन्यांची व दुसरा गुन्हा असेल तेव्हां २ वर्षांची कैदेची शिक्षा करावी. तुरुंगांत असतां न्यायाधिकाऱ्याला वाटेल तितक्या वेळां आणि वाटेल तितक्याप्रमाणांत त्यांना फटके मारण्यांत यावेत. जो सुधारूं शकणार नाहीं आणि भयंकर आहे अशा ठकाच्या डाव्या खांद्यावर R ( Rogue ) असा शिक्का मारून त्यास सक्तमजूरीवर पाठवावे, आणि पुन्हां तो भिक्षेस जातांना दिसल्यास दया न दाखवितां त्यास ठार करावें. हे कायदे १८व्या शतकाच्या मध्यापर्यंत अस्तित्वांत होतें.

फ्रान्समध्यें असेच कायदे होते. १७ व्या शतकाच्या मध्याच्या सुमारास पॅरीसमध्यें गुंडांची एक पेठच बसविण्यांत आली होती. १६ व्या लुईच्या कारकीर्दीच्या आरंभीं एका वटहुकुमानें ( १७७७ जुलै १३ ) १६ ते २० वर्षें वयाच्या चांगल्या प्रकृतीच्या माणसास चरितार्थाचें कांहीं साधन नसलें अथवा तो कांहीं धंदा करीत नसला तर त्याला जहाजावर कामावर पाठवावें असें ठरविण्यांत आलें. अशाच प्रकारचे कायदे हॉलंडमध्यें होते....

शेतीवरील लोकांना याप्रमाणें प्रथम जुलमानें शेतीवरून हुसकण्यांत आलें, घरादारांतून घालवून लावण्यांत आलें, व अशा प्रकारें त्यांना गुंड बनविल्यावर भयंकर क्रूर अशा कायद्यांनीं, चाबूक मारून, शिक्के देऊन व छळ करून मजूरी पद्धतीच्या शिस्तीच्या चौकटींत बसविण्यांत आलें.

## ' नैसर्गिक ' पूर्वीचें कृत्रिम

समाजाच्या एका टोकाला मजुरी करून घेण्याची परिस्थिति भांडवलाच्या रूपानें एकत्र करणें आणि दुसऱ्या टोंकास स्वतःच्या श्रमशक्तीखेरीज विकून टाकण्याला ज्यांच्याजवळ कांहींच नाहीं अशा माणसांची गर्दी जमविणें एवढीच तयारी भांडवलशाहीच्या आरंभास पुरत नाहीं. त्यांनीं आपली श्रमशक्ति खुषीनें विकावी अशी परिस्थिति निर्माण करण्यानेंही भागत नाहीं. भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या विकासक्रमांत शिक्षणानें, परंपरेनें व संवयीनें भांडवलशाही उत्पादन पद्धति ही एक नैसर्गिक पद्धति आहे असें मानणारा मजूरवर्ग निर्माण होत असतो. भांडवलशाही उत्पादनपद्धतीची संघटना एकदां पूर्ण विकसित झाली म्हणजे तिला होणारा सर्व विरोध ती हाणून पाडते. मजूरांची जरूरीहून अधिक लोकसंख्या कायमपणें निर्माण होत

राहिल्यामुळें मागणी व पुरवठा हा नियम मजुरांस लागू होऊन भांडवलशाहीला अवश्य अशा पातळींत मजुरीचा दर राहतो. आर्थिक संबंधांची निर्दयपणें होणारी सक्ति मजूराला भांडवलवाल्याच्या लगामीं ठेवते. अशा परिस्थितींतही प्रत्यक्ष मानवी सत्तीचा म्हणजे आर्थिक परिस्थिती पलिकडल्या सत्तीचा उपयोग होत असेच. पण तो केवळ अपवादात्मक असे. सामान्यतः "उत्पादनाचे जे नैसर्गिक कायदे" म्हणजे भांडवलावर मजुराचें जीवन अवलंबून असण्याची परिस्थिति ही मजुरास अडकवून ठेवण्यास पुरे होई. मजुरास भांडवलावर अवलंबून राहण्याची ही परिस्थिति उत्पादन पद्धतीनेंच निर्माण केली असून ती मुळेंच तिची शाश्वतीही झाली. पण भांडवलशाहीच्या अगदीं आरंभ कालीं अशी "नैसर्गिक" परिस्थिति नव्हती. आपल्या उदयकालांत भांडवलवाल्यांना मजुरीचें नियंत्रण करण्यासाठीं सरकारी सत्तेची गरज होती व ती सत्ता त्यांनीं वापरलीही. नफा मिळविण्याच्या कामास जरूर इतक्या मर्यादेंत मजुरीचे दर ठेवणें, कामाचा दिवस वाढविणें आणि मजुरास कांहीं एका मर्यादेपर्यंत परावलंबी ठेवणें या गोष्टी भांडवलदारांनीं कायद्यानें घडविल्या होत्या. भांडवलशाहीचा प्राथमिक धनसंचय म्हणून जो म्हणतात तो जमविण्यास ही बाब अत्यवश्य होती.

## मजूरांचा पुरवठा कमी

१४व्या शतकाच्या उत्तरार्धांत जो मजूरवर्ग निर्माण झाला त्यावेळीं व त्यानंतरच्या शतकांत तो लोकसंख्येंत फार थोडा होता. त्याचें संरक्षण स्वतंत्र मालक शेतकऱ्यांनीं खेड्यांतून आणि धंद्यांच्या संघांनीं शहरांतून फार चांगल्या प्रकारें केलें होतें. खेड्यांत व शहरांत मालक व मजूर सामाजिक दृष्ट्या अगदीं जवळजवळ असत. मजूराचा भांडवलाशीं दुय्यम मानलेला दर्जा केवळ औपचारिक असे. उत्पादन-

पद्धतीला भांडवलशाहीचें असें विशिष्ट स्वरूप प्राप्त झालेलें नव्हतें. चर भांडवल हें स्थिर भांडवलापेक्षां वरिष्ठ दर्जाचें असे. म्हणून भांडवलाचा संचय जसजसा वाढूं लागला तसतशी रोजमजूरांची मागणी वाढली. पण रोजमजुरांचा पुरवठा मात्र मागणी इतक्या जलद होईना. पुढील काळांत राष्ट्रीय संपत्तीचा बराचसा जो भाग भांडवलाच्या संचयांत समाविष्ट होत असे तो आरंभीच्या काळांत बहुतेक मजूरांच्या चरितार्थांतच फस्त होऊन जाई.

## अधिक मजूरी घेतल्यास कैद

रोजमजुरीसंबंधाचे कायदे ३ऱ्या एडवर्डच्या कारकीर्दींत (१३४९) 'मजूरांचे कायदे' या नांवानें सुरूं झाले. अगदीं प्रथमपासून त्यांचा हेतु मजूरांची पिळणूक हाच होता. त्या कायद्यांची प्रगति झाली त्यावेळींही ती मजूरांना विरोधी अशाच प्रकारें होत गेली. १३५० त फ्रान्समध्येंही असाच कायदा झाला. इंग्लंड व फ्रान्स या दोन्ही देशांतील कायदे बरोबरच होत होते, व त्यांचा हेतुही एकच असे.... वर उल्लेखिलेला ३ऱ्या एडवर्डच्या कारकीर्दींतील मजुरांचा कायदा ब्रिटिश हौस ऑफ कॉमन्सच्या तांतडीच्या मागणीमुळें करण्यांत आला. मोठ्या भोळेपणानें एक टोरी लिहितो "पूर्वीं गरीब लोक इतकी पुष्कळ मजुरी मागत कीं त्यामुळें उद्योगधंदे व संपत्ति यांनाच धोका येई. पुढें आतां गरीबांची मजूरी इतकी खालीं गेली आहे कीं त्यामुळेंच धंदे व संपत्ति यांना तितकाच किंवा अधिक धोका उत्पन्न झाला आहे. अर्थात हा धोका वेगळ्या प्रकारानें होणार आहे." शहरांना आणि खेड्यांना किरकोळ कामासाठीं व रोजच्या नियमित कामासाठीं मजूरीचा एक दर ठरविण्यांत आला. शेतीच्या मजूरांनीं सालाची नोकरी शेतीवर पत्करावी. शहरी मजूरांनीं खुल्या बाजारांत नोकरी मिळवावी.

कायद्यानें ठरविलेल्या मजूरीच्या दराहून अधिक मजूरी दिल्यास देणाऱ्याला कैदेची शिक्षा होत असे. पण अधिक मजूरी घेणाऱ्याला देणाराहूनही अधिक कडक शिक्षा होई. ( एलिझबेथच्या कारकीर्दींतील उमेदवारांच्या कायद्याच्या १८ व्या व १९ व्या कलमान्वयें कायद्यांत ठरलेल्याहून अधिक मजूरी देणाऱ्यास १० दिवसांची कैद असे. व ती घेणारास २१ दिवसांची कैद असे. ) १३६० सालीं या शिक्षा वाढविण्यांत आल्या. आणि मालकांना मजूराकडून शारीरिक शिक्षेच्या जोरानें काम पिळून घेण्याचा हक्क मिळाला. गवंडी, सुतार वगैरे कामगार एकमेकांत संघटना करीत, करार करीत, शपथा घेत; अशा प्रकारें मजूरांनीं एकमेकास बांधून घेण्याचे प्रकार बेकायदा ठरविण्यांत आले. १४व्या शतकापासून १८२५ पर्यंत मजूरांची संघटना हा अत्यंत घाणेरडा गुन्हा समजण्यांत येई. कामगारसंघटनेविरुद्ध असलेले कायदे १८२५ त रद्द झाले. मजूरासंबंधीच्या १३४९ तील कायद्याच्या व तदनुषंगिक रूढी वगैरेंच्या बुडाशीं असलेली भावना काय होती हें कमाल मजुरी किती असावी हे कायद्यानें ठरविलें, पण किमान मजूरी किती हें मात्र कायद्यानें ठरविलें नव्हतें यावरून कळून येतें.

## परिस्थिति बदलली तरी कायदे उरले

१६ व्या शतकांत मजूरांची परिस्थिति अधिकच वाईट झाली होती. पैशाच्या रूपानें मजूरी वाढली खरी पण पैशाची किंमत कमी होऊन मालाचे भाव ज्या प्रमाणांत वाढले त्या प्रमाणांत मजूरीची वाढ झाली नाहीं. मजूरी वास्तविक कमी झाली असा याचा अर्थ होतो. तरी पण कमाल मजूरीची मर्यादा ठरविणारे कायदे आणि "ज्याला कोणीही नोकरीवर ठेवीत नाहीं" त्याचा कान कापणें, त्याच्यावर शिक्का मारणें वगैरे प्रकार कायम होते. एलिझबेथच्या

उमेदवारांच्या कायद्यानें न्यायाधिकाऱ्यांना त्या त्या सालाची परिस्थिति आणि मालांचे बाजारभाव लक्षांत घेऊन मजूरीचे दर ठरविण्याचा अधिकार मिळाला. १ल्या जेम्सनें हे कायदे कोष्ट्यांना सूत काढणाऱ्यांना व इतर सर्व शक्य त्या मजूरांना लागू केले. २ऱ्या जॉर्जनें ते धंदेवाल्यांनाही लावले. भांडवलशाहीपद्धतीची कारखानदारी पूर्ण वाढल्यावर मजूरीसंबंधीचे हे कायदे पुढें अव्यवहार्य व अनवश्यक झाले. पण त्या वेळींही जुन्या शस्त्रागारांतील कायद्याचें हें शस्त्र सत्ताधारी वर्गाला अजिबात सोडून द्यावेसें वाटलें नाहीं. लंडनमधील व लंडनच्या आसपास असलेल्या फिरत्या शिंप्यांना २ शि. ७$\frac{1}{2}$ पेन्साहून अधिक रोज देऊं नये हा २ऱ्या जॉर्जचा कायदा, रेशीमविणाऱ्या कोष्ट्यांचे मजूरीचे दर न्यायाधिकाऱ्यांनीं ठरविण्याचा ३ ऱ्या जॉर्जचा कायदा अजूनहि कायम होता. मजूरांच्या मजूरीसंबंधानें न्यायाधिकाऱ्यांनीं ठरविलेले दर हे बिगरशेत मजूरांनाही योग्य आहेत कीं नाहीत हें ठरविण्याचा अधिकार १७०६ सालींही दोन वरिष्ठ जज्जांना असे. १७९९ त पार्लमेंटनें एक हुकूम काढून एलिझबेथवेळच्या एका कायद्यानें व १६६१ आणि १६७१ या सालीं झालेल्या दोन कायद्यांनीं स्कॉटलंडांतील खाणीं मजूरांचे मजूरीचे दर आकारले जावेत असें ठरविलें. दरम्यान परिस्थिति किती बदलली होती हें पार्लमेंटांत पूर्वीं कधींही न घडलेल्या एका प्रकारानें दिसून आलें.

## संघटनास्वातंत्र्य लढ्यानें मिळालें

ब्रिटिश हौस ऑफ कॉमन्समध्यें पूर्वींच्या ४०० वर्षांत फक्त कमाल मजूरीचे दरच ठरवीत असत. पण १७९६ त व्हिटब्रेड यानें किमान मजूरीचा कायदा सुचविला. पिट्टनें त्याला विरोध केला. पण

गरीबांची परिस्थिति अत्यंत निर्दयपणाची झाली आहे अशी त्यानें कबूलीही दिली. शेवटीं १८१३ मध्यें मजूरीच्या नियंत्रणाचे कायदे रद्द करण्यांत आले. त्यावेळीं हे कायदे ठेवणें ही हास्यास्पद विसंगति होती. कारण भांडवलदार हा आपल्या खाजगी नियमांनीं कारखान्याचे नियंत्रण करी आणि शेतमजूरांचा मजूरीचा दर गरिबाच्या कायद्यांनीं मजूरांना मिळणारा पैसा जमेस धरून किमान ठेवीत असे. मालक व मजूर यांचे दरम्यान परस्परांस नोटीस देणें वगैरे जे करार मदार असतात व ज्यांचा भंग केला असतां मालकावर फक्त दिवाणी फिर्याद होते आणि करारभंग करणाऱ्या मजूरावर फौजदारी फिर्याद होते ते मजूरासंबधीचे कायदे आज ( १८७३ ) पूर्णपणें अमलांत आहेत. १८२५ सालीं कामगारसंघटनेविरुद्ध असलेले रानटी कायदे जे रद्द झाले ते मजूरांच्या संतापामुळें रद्द झाले. त्यावेळींसुद्धां ते सर्व रद्द झाले नाहींत. त्यांचे कांहीं सुंदर विभाग १८५९ पर्यंत शिल्लक होते. अखेरीस २९ जून १८७१ रोजीं झालेल्या पार्लमेंटच्या कायद्यानें कामगार संघटनांना मान्यता देऊन संघटनाविरोधी कायदे निःशेष केले गेले. पण त्याच दिवशीं अत्याचार, धमकी व उपद्रव यासंबंधीच्या एका दुरुस्ती—कायद्यानें पूर्वीचीच अवस्था नव्या स्वरूपांत निर्माण केली. पार्लमेंटरी कायद्याच्या या पळवाटीनें सर्वसामान्य जनतेसंबधीच्या कायद्यांतून मजूरांना कांहीं विशेष बाबतींत वेगळें काढण्यांत आलें. संप अथवा टाळेबंदी यासंबंधानें मजूर जे उपाय करीत त्यांच्या न्याय्यान्याय्यतेसंबंधाचा अर्थनिर्णय करण्याचा अधिकार मालक वर्गांना देण्यांत आला. त्यापूर्वीं २ वर्षे त्याच हौस ऑफ कॉमन्सनें व त्याच ग्लॅडस्टननें मजूरांना इतर नागरिकांच्याहून कांहीं बाबतींत वेगळें मानून शिक्षा देण्याचें एक बिल आणलें होतें. पण ग्लॅडस्टनचें हें बिल दोन वाचनांपलीकडे गेलेंच नाहीं. ती बाब एकसारखी

लांबणीवर टाकण्यांत आली. अखेरीस त्या थोर लिबरल पक्षानें टोरी पक्षाशीं सहकार्य करून ज्यांनीं यांना अधिकारावर चढविलें होतें त्यांच्यावरच उलटण्याचें धैर्य दाखविलें. एवढ्या विश्वासघातानेंही समाधान न होऊन सत्ताधारी वर्गाची सेवा करण्यास नेहमीं सिद्ध असणाऱ्या ब्रिटिश जज्जांना 'गुप्त कटा'विरुद्ध असलेले जुने कायदे उकरून काढून मजूरसंघटनाविरुद्ध त्या कायद्यांची बजावणी करण्याचा अधिकार दिला. या सर्व इतिहासावरून आपणाला दिसून येतें कीं ब्रिटिश पार्लमेंटानें, ५०० वर्षेपर्यंत निर्लज्जपणाच्या अहंकारानें कामगारांना दडपून व स्वतःच मजूरांविरुद्ध भांडवलदार संघटना करून मग कामगारांच्या दडपणामुळें नाइलाज झाल्यावर संप व कामगार-संघटना याविरुद्ध असलेले कायदे रद्द केले.

## फ्रेंच क्रांतींतही संघटनेस विरोध

फ्रेंच राज्यक्रांतीच्या अगदीं पहिल्या वादळी दिवसांतहि फ्रेंच भांडवलदारांनीं, मजूरांनीं नुकताच मिळविलेला संघटनेचा हक्क हिरावून घेण्याचें धाडस दाखविलें. १४ जून १७९१ च्या हुकुमानें कोणतीहि कामगारसंघटना ही 'स्वातंत्र्याच्या व मानवी हक्कांच्या घोषणेच्या विरुद्ध आहे.' त्या गुन्ह्याबद्दल ५०० लिव्हर्स दंड व्हावा व १ वर्षपर्यंत नागरिकत्वाचे हक्क रद्द करण्यांत यावेत असें ठरविण्यांत आलें. भांडवलदार व मजूर यांमधील तंटा भांडवलदाराला अवश्य इतक्या मर्यादेंत ठेवणारा हा सरकारी कायदा अनेक क्रांत्या आणि अनेक राजवटी आल्या व गेल्या तरी उरला होता. फ्रेंच राज्यक्रांतींतील 'रेन ऑफ् टेरर' या नांवानें प्रसिद्ध असलेला जो दहशतकाल त्यांतही हा कायदा कायम होता. अगदीं अलीकडे पिनलकोडांतून हा कायदा नष्ट झाला. भांडवलदारांनीं या सत्ता

बळकाविण्याच्या कायद्यासंबंधानें जी बतावणी केली होती त्या बतावणीइतका त्यांचा खरा स्वभाव दाखविणारी दुसरी कोणतीच गोष्ट नसेल. या कायद्यावरील सिलेक्टकमिटीचा रिपोर्टर चॅपेलिअर लिहितो, “ मजूरीचे दर थोडेसे अधिक हवेत असे धरून चालूं....चरितार्थाला अत्यावश्यक अशा गोष्टी नसल्या तर अगदीं गुलामगिरीसारखें जें परावलंबित्व येतें तें टळण्याइतपत मजूरी पाहिजे हें कबूल. ”तरी पण स्वतःच्या स्वार्थासाठीं मजूरांना कोणताही करार करूं नये. तसेंच ‘ जवळ जवळ गुलामगिरीसारखें असलेलें पूर्ण परावलंबित्व ’ एकजुटीनें वागून कमी करून घेऊं देतां कामा नये. कारण खरोखर त्यांना जर असें करूं दिलें तर ‘ आपल्या मालकांचें म्हणजे हल्लींच्या कारखानदारांचें स्वातंत्र्य ते हिरावून घेतात, ’ शिवाय जुन्या कार्पोरेशन्स ज्या नव्या फ्रेंच राज्यघटनेनें मोडल्या व त्यांच्या जागीं हे नवे क्रांतिकारक मालक आले त्यांच्या सत्तेविरुद्ध आतां कामगारानीं संघटना करून झगडणें म्हणजे नव्या फ्रेंच राज्यघटनेनें रद्द केलेल्या कार्पोरेशन्स पुन्हां अस्तित्वांत आणण्यासारखेंच होतें. किती वाईट गोष्ट ही !

---

## 'भांडवलदार शेतकरी कोठून आला ?' : १७*

कायद्याचें संरक्षण नसलेले असे कफल्लक मजूर सक्तीनें कसे निर्माण करण्यांत आले, अत्याचारी कायद्यांनीं त्यांना रोजमजूर कसे बनविण्यांत आले, भांडवलाच्या संचयाचा वेग वाढविण्यासाठीं राज्य-सत्तेनें मजूरांच्या पिळणुकीचे कायदे करून निर्लज्जपणें आपल्या सत्तेचा उपयोग कसा केला या गोष्टी आपण येथवर पाहिल्या. पण एक प्रश्न उरतो तो असाः—भांडवलदार हा मुळांत आला कोठून ? कारण लहान शेतकऱ्यांना जमीनींतून हुसकून लावण्यामुळें प्रत्यक्षपणें मोठा जमीन-मालक निर्माण होईल; भांडवलदार शेतकरी कसा निर्माण होईल ?

### भांडवलदार शेतकऱ्याचा जन्मक्रम

भांडवलदार शेतकऱ्यापुरतेंच बोलावयाचें तर अगदीं बोट दाखवून आपणांला त्याचें कारण सांगतां येईल. कित्येक शतकापासून हळू हळू

* कॅपिटल, खंड १, प्रकरण २९.

त्याची वाढ होत गेली आहे. भूदास आणि लहान स्वतंत्र मालक शेतकरी हे निरनिराळ्या अनेक प्रकारांनीं जमीन धारण करीत. अर्थात् त्या परिस्थितींतून त्यांची मुक्तता अगदीं निरनिराळ्या आर्थिक परिस्थितींत झाली. इंग्लंडांत 'बेलीफ' हा मूळचा भूदास असलेला शेतकरी अशा प्रकारचा होता. जुन्या रोमन साम्राज्यांतील 'व्हिलिकस' सारखी या 'बेलिफा'ची अवस्था संकुचित होती इतकाच फरक. १४व्या शतकाच्या उत्तरार्धांत त्याच्या जागीं एक नवा शेतकरी आला. त्याला जमीन-मालक बीं-बियाणें, गुरें व हत्यारें पुरवी. त्याचा दर्जा कुळाहून फारसा वेगळा नव्हता. तो फार तर आपल्या हाताखालीं मजूर नेमीत असे. हाच कुळांत व याच्यांत फरक. लौकरच तो शेतकरी जमिनीचा अर्धवट मालक होतो. शेतीच्या साधनसामुग्रीपैकीं तो स्वतः निम्मी देतो व मालक निम्मी देतो. शेतीचें जें उत्पन्न येईल त्या उत्पन्नाची ते दोघे आधी ठरलेल्या करारांतील हिश्याप्रमाणें वाटणी करून घेतात. इंग्लंडांत हा प्रकार बराच लौकर मावळला. आणि खराखुरा भांडवलदार शेतकरी जन्मास आला. तो शेतीवर मजूर लावून व स्वतःचेंच भांडवल घालून त्याची वाढ करूं लागला. नफ्यांतला कांहीं भाग पैशांत किंवा मालाच्या रूपांत खंड म्हणून तो जमीन-मालकाला देई. १५व्या शतकामध्यें स्वतंत्र लहान शेतकरी व कांहीं मालकीची शेती व कांहीं मजूरी करणारे शेतकरी यांची संख्या बरीच होती तोंवर भांडवलदार शेतकरी आणि त्याचें शेत या दोघांची आर्थिक स्थिति अगदीं किरकोळ असे. १५व्या शतकाच्या शेवटल्या ३० वर्षांत जी शेतीची क्रांति सुरू झाली आणि १६व्या शतकाच्या शेवटल्या दशकापर्यंत जी चालली त्या क्रांतीनें एकंदर शेतकरी समाज भराभर दरिद्री होत गेला आणि हा भांडवलदार शेतकरी तितक्याच वेगानें श्रीमंत होत गेला.

## शेतांत सोन्याचें पीक

सार्वजनिक जमिनी हिरावून घेतल्या गेल्यामुळें या भांडवलदार शेतकऱ्याचीं गुरें मुळींच खर्च न पडतां खूप वाढली. त्यापासून त्याला पुष्कळ व अधिक चांगलें खत मिळूं लागलें. जमीन सुधारण्यास या खताचा उपयोग झाला. १६व्या शतकांत आणखी एक फार महत्त्वाची बाब त्याच्या पदरांत पडली. त्या काळीं शेतीचे करार दीर्घकालीन म्हणजे केव्हां केव्हां ९९ वर्षांचे असत. १६व्या शतकांत सोनें, रुपें, तांबें इत्यादि मौल्यवान धातूंची किंमत एकसारखी कमी होत गेली. त्याबरोबर पैशाचीहि किंमत तशीच उतरली आणि यामुळें या भांडवलदार शेतकऱ्याच्या शेतांत अगदीं सोन्याचें पीक आले. वर सांगितलेली मजूरी कमी होण्याचीं कारणें आहेत त्या खेरीज मजूरी उतरण्यास हेंही एक कारण झालें. म्हणून मजूरींतला कांहीं भाग आतां शेतीच्या नफ्यांत जमा होऊं लागला. धान्य, लोकर, मांस, वगैरे शेतीच्या सर्व मालाच्या किंमती एकसारख्या वाढत गेल्या. यामुळें या भांडवलदार शेतकऱ्याला स्वतः कोणतेंहि प्रयत्न न करतां आपलें भांडवल वाढवितां आलें. आणि जमिनींचा खंड सोनें, चांदी महाग होती त्या वेळच्या पैशांत कायम ठरविला गेला असल्यामुळें मालाच्या स्वरूपांत खंड कमी झाला. याप्रमाणें एका बाजूस मजूराला आणि दुसऱ्या बाजूस जमीन मालकाला चाट देऊन हे भांडवनदार शेतकरी सधन झाले. अर्थात १६व्या शतकाच्या शेवटीं त्या परिस्थितीच्या मानानें सधन असा भांडवलदार शेतकरी वर्ग इंग्लंडांत होता यांत कांहींच आश्चर्य नाहीं.

# शेतीच्या क्रांतीचा धंद्यावर परिणाम : : १८*

## ' ईश्वराचा प्रसाद '

शेतींतून शेतकऱ्यांना, शेती हिसकून घेऊन, हाकून लावण्याचा प्रकार मधें मधें थांबला तरी पुनः पुनः उद्भवून पुष्कळ वर्षे चालू राहिला. त्यामुळें आपण वर पाहिल्याप्रमाणें उद्योगधंद्यांना शहरांतील उद्योगसंघांच्या बंधनांत मुळींच नसलेले असे मजूर पुष्कळ मिळाले. ही परिस्थिति इतकी भाग्याची होती कीं " व्यापाराचा इतिहास " या ग्रंथांत ए. अँडरसन् हा वयोवृद्ध लेखक या मजूरवाढीस ईश्वराचा प्रसाद असें लेखतो. प्राथमिक धनसंचयाच्या या विषयाशीं आपण आणखी थोडें थांबू. जॉफ्रे सेंट हिलेअर या शास्त्रज्ञानें हवा ही एका ठिकाणीं दाट होते तेव्हां ती आधी दुसरीकडे विरळ झालेली असते असें म्हटलें आहे. त्याप्रमाणेंच स्वतंत्र व स्वावलंबी शेतकरी एका ठिकाणीं विरळ होत गेला यामुळेंच औद्योगिक मजुरांची गर्दी शहरांत झाली. या प्रकाराचा आणखी एक मोठा फायदा भांडवलदार

---

* कॅपिट्ल, खं. १, प्रकरण ३०.

शेतकऱ्याला मिळाला. शेतीची मशागत—पद्धति सुधारली. मजूरांची संख्या कमी झाल्यामुळें त्यांच्यांत सहकार्य अधिक झालें. धनोत्पादन-साधनांचें केंद्रीकरण झालें. आणि यामुळें मजुरांची संख्या कमी होऊन सुद्धां जमीनीचें उत्पन्न अधिक वाढलें. शेतीमजुरांची पिळणूक अधिक तीव्रतेनें झाली इतकेंच नव्हे तर या रोजमजूरांच्या ज्या खाजगी जमीनी असत त्याहि भांडवलदार शेतकरी खंडानें घेऊं लागले.

## कफल्लक शेतकरी मजूर झाला

ज्याप्रमाणें शेतीवरील कांहीं लोकसंख्या जशी मुक्त झाली त्याचप्रमाणें जुनें चरितार्थाचें साधनही मुक्त झालें. त्याचें आतां चर भांडवलांत रूपांतर झालें. जमीन हिसकून घेतल्यानें कफल्लक झालेला शेतकरी परिस्थितीच्या प्रवाहांत अवश झाला. आतां औद्योगिक भांडवलदाराकडून म्हणजे नव्या मालकाकडून मजुरीच्या रूपानें त्याला आपलें मूल्य विकत घेणें भाग पडलें. धंद्यास लागणाऱ्या कृषिजन्य कच्च्या मालाचीही अशीच परिस्थिति झाली. त्याचेंच भांडवलांत रूपांतर झालें. उदाहरणार्थ असें समजा कीं २ऱ्या फ्रेड्रिकच्या काळीं लोकरीचा धागा काढणारे वेस्टफालियांतले जे शेतकरी त्यांपैकीं कांहींच्या जमिनी हिसकून घेऊन त्यांची हकालपट्टी करण्यांत आली. बाकीच्या राहिलेल्यांना मोठ्या भांडवलदार शेतकऱ्याचें रोजमजूर बनविण्यांत आले. यावेळीं लोकर कांतणें आणि विणणें यांचें मोठे धंदे निघाले. त्यांत शेतीपासून 'मुक्त' केलेल्या कफल्लक शेतकऱ्यांना मजूर बनविण्यांत आले.

## समाजक्रांति कशी झाली

आतां काय होते पहा. लोकर पूर्वीसारखीच दिसत तिचा तंतू सुद्धां बदललेला नाहीं. पण त्या लोकरींत एक नवा सामाजिक प्राण उत्पन्न

झाला. आतां ही लोंकर मालक—कारखानदाराच्या स्थिर भांडवलाचा विभाग झाली. पूर्वी अनेक लहान उत्पादकांच्या हातीं ती विभागलेली होती. ते स्वतःच शेती करीत आणि आपल्या कुटुंबीयांच्या साह्यानें ते लोकरीचा धागा विणीत असत. प्रत्येक ठिकाणीं थोडथोडा धागा उत्पन्न होई. आतांही लोकर एका भांडवलदाराच्या हातीं एकवटली. तो आतां दुसऱ्यांना तिचा धागा काढण्यास व विणण्यास मजूर म्हणून नेमतो. पूर्वींच्या काळीं लोकरीचा धागा काढण्याचें कामीं जो अधिक वेळ खर्च होई त्याचें फळ अनेक शेतकरी कुटुंबांना नेहमींहून अधिक धाग्याच्या रूपानें मिळत असे. कदाचित २रा फ्रेड्रिक हा तें कर म्हणूनही घेत असेल. पण आतां थोड्या भांडवलदारांना त्यापासून नफा मिळतो. चात्या आणि माग पूर्वी सगळ्या मुलुखभर पसरलेली असत. आतां तीं सर्व कांहीं थोड्या प्रचंड मजूरखान्यांत एकवटलीं आहेत. तेथेंच मजूर आणि कच्चा माल हींहि एकवटलीं आहेत. चात्या, माग, कच्चा माल, या सर्वांचें आतां रूपांतर होत आहे. स्वतंत्र कोष्टयांचें व सूत काढणाऱ्यांचें चरितार्थाचें साधन हें स्वरूप आतां त्यास राहिलें नसून उलट त्यांच्यावरच हुकमत गाजविण्याचें आणि त्यांच्या अंगांतून मोफत श्रम शोषून घेण्याचें साधन हें स्वरूप त्याला आलें आहे. हे मोठे कारखाने आणि हीं मोठीं शेतें पाहाणाऱ्याच्या लक्षांत एक गोष्ट येत नाहीं कीं कित्येक लहान लहान उत्पादन केंद्रें एका कढईत टाकून, शेंकडों लहान स्वतंत्र शेतकऱ्यांना नागवून यांची उभारणी झाली आहे. तरी पण लोकांची उपजतबुद्धि चुकत नव्हती. फ्रेंचराज्यक्रांतीचा सिंह जो मिराबो त्याचें काळीं मोठ्या कारखान्यांना ‘ अनेक छोट्या कारखान्यांचा एकत्र केलेला मोठा कारखाना ’ असेंच लोक म्हणत असत.....

शेतकऱ्यांच्या जमिनी काढून घेऊन त्यांना हाकून लावल्यामुळें कारखान्यांना मजूर मिळाले त्यांचे चरितार्थसाधन व श्रम करण्याचें साधन कारखानदाराच्या हातीं आलें, इतकेंच नव्हे तर त्यानें स्वदेशांत मालाला बाजारही दिला.

## नवा बाजार मिळाला

खरोखर लहान शेतकऱ्यांना ज्या घटनांनीं मजूर बनविलें व त्यांचे चरितार्थसाधन व श्रम यांना भांडवलाचे प्रकार बनविले त्यांनींच त्या भांडवलाच्या मालाला घरचा बाजारही मिळवून दिला. पूर्वीं शेतकऱ्यांचीं कुटुंबें चरितार्थसाधन व कच्चामाल उत्पन्न करीत व त्याचा ते बहुतेक स्वतःच उपभोगहि घेत. पण आतां हा कच्चा माल आणि चरितार्थाचें साधन याला विक्रीमालाचें स्वरूप आलें आहे. आतां मोठा भांडवलदार शेतकरी कच्चा माल कारखानदारांना विकतो. पूर्वीं सूत, रेशमी कापड, लोकरीचें हलकें कापड या सर्वांचा कच्चा माल लहान शेतकरी कुटुंबांना सहजासहजीं मिळत असून ते स्वतःच पक्का माल तयार करीत. पण आतां या सर्वांना कारखानी मालाचें स्वरूप आलें असून तालुक्या-तालुक्यांना हा माल आतां खपतो. पूर्वीं हे लहान शेतकरी तुरळक तुरळकपणें सर्व देशभर पसरलेले असत. ते कारागिरांचे गिऱ्हाईक असून त्यांना शोधीत कारागिरांना देशभर हिंडावें लागे. पण आतां कारखान्यांच्या भांडवलानें एकत्र केलेल्या प्रचंड बाजारास हे कारागीर येतात. याप्रमाणें स्वावलंबी शेतकऱ्यास शेतींतून काढून त्याच्या उत्पादनसाधनापासून त्याचा वियोग केला जातो. त्याबरोबरच खेड्यांतील घरगुती धंदेही बुडविले जातात. आणि शेती-व्यवसाय व कारखानदारी ही वेगळीं वेगळीं होतात. खेड्यांतील घरगुती धंदे मारण्यानेंच भांडवलशाही उत्पादनपद्धतीला स्वदेशांत

बाजार मिळवितां येणें शक्य आहे. तथापि कारखानदारीच्या काळांत हें मूलग्राही अवस्थांतर पूर्णपणें करतां आलें नाहीं.

## हस्तव्यवसायांचें संकुचित सामर्थ्य

वाचकांना येथें आठवेल कीं, ज्याला हस्तव्यवसायाची कारखानदारी म्हणतां येईल तिला राष्ट्रीय उत्पादनाचें सर्व क्षेत्र जिंकतां येत नाहीं. तिचा आधार शहरांतील हस्तव्यवसाय व खेड्यांतील घरगुती धंदे हाच राहतो. एका विवक्षित शाखेंत या प्रकाराचा विध्वंस हस्तव्यवसायी कारखानदारीस करतां आला तरी दुसऱ्या एखाद्या शाखेंत त्याला त्यास उत्तेजन द्यावें लागतें. कारण त्याला कांहीं एका मर्यादेपर्यंत लहान हस्तव्यवसायापासूनच कच्चामाल घ्यावा लागतो. याप्रमाणें या हस्तव्यवसायी कारखानदारीमुळें लहान खेडुतांचा एक नवा वर्ग निर्माण होतो. तो शेतीचा व्यवसाय हा पुरवणी-दाखल करतो. आणि कारखानदाराची मजूरी करणें हा त्याचा मुख्य व्यवसाय होतो. आपला माल हे लोक स्वतः अथवा व्यापाऱ्यांमार्फत कारखानदाराला विकतात. इंग्लंडच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यास जो एक घोटाळा पडत असतो त्याचें हें, प्रमुख नव्हे पण अवांतर असें, कारण आहे. १५व्या शतकाच्या शेवटल्या ३० वर्षा-पासून खेड्यांतील शेतीवर भांडवलदार शेतकऱ्याचें आक्रमण होत आहे, आणि लहान शेतकरी देशोधडीस लागत आहेत अशा तक्रारी त्याला ऐकूं येतात. उलट हेच शेतकरी कमी संख्येनें पण पुन्हां लहान शेतीवर अधिक वाईट परिस्थितींत आलेले दिसतात. याचें मुख्य कारण असें आहे कीं, इंग्लंड हें एका काळीं मुख्यतः धान्य पिकवी. दुसऱ्या काळीं मुख्यतः गुरांची जोपासना करीत असे. यामुळें शेती करणाऱ्या शेतकऱ्यांचें प्रमाण कमीअधिक होई. आधुनिक यांत्रिक

उद्योगधंद्यानें मात्र यंत्रांच्या स्वरूपांत भांडवलशाही शेतीचा कायमचा पाया घातला. शेतींतील लोकसंख्येस समूळ नागविलें, आणि खेड्यांतील धंद्यांचें मूळ जें सूत काढणें व विणणें तें उपटून टाकून खेड्यांतील धंदे व शेती यांचा कायमचा वियोग केला.आणि याप्रमाणें या यांत्रिक कारखान्यांनींच सगळ्याच्या सगळा स्वदेशी बाजार औद्योगिक भांडवलासाठीं काबीज केला.

---

# औद्योगिक भांडवलदार कोठून आला : १९*

## भांडवलाचीं दोन रूपें

भांडवलदार शेतकरी जसा हळूहळू वाढला तसा औद्योगिक भांडवलदार हळूहळू वाढला नाहीं. लहान लहान धंदे-संघांच्या मालकांनीं लहान व स्वतंत्र कारागिरांनीं आणि कांहीं मजूरांनीही हळूहळू रोजमजूरांना हाताशीं धरून व त्यांना पिळून स्वतःस प्रथम लहान भांडवलदार व मागाहून मोठें भांडवलदार बनविलें हें खरें. भांडवलशाही उत्पादनाच्या बाळपणांत असे प्रकार घडले. मध्ययुगीन शहरांची वाढ होत असतां खेड्यांतून निसटून आलेले जे भूदास असत त्यांत आधीं निसटून आलेला मागाहून आलेल्यास नोकर ठेवीत असे. ही गोगलगायीची प्रगति १५व्या शतकांत नवे भौगोलिक शोध लागून जो जागतिक बाजार उत्पन्न झाला त्याला पुरे पडणारी नव्हती. पण मध्यमयुगानें भांडवलाचे दोन प्रकार आधुनिक काळास दिले होते. निरनिराळ्या सामाजिक आर्थिक रूपांतरांनीं ते परिणत होत होते.

* कॅपिटल, खंड १, प्रकरण ३१.

भांडवलशाही उत्पादनाच्या कालखंडापूर्वी सावकाराचें भांडवल व व्यापाऱ्याचें भांडवल अशीं दोन रूपें त्यास आलीं होतीं.

## भांडवलदार सर्वसत्ताधीश

"सध्यां समाजाची सर्व संपत्ति पहिल्यानें भांडवलदाराचे हातीं जाते....तो जमिनमालकाला, खंड देतो, मजूराला मजूरी देतो, सरकार व धर्म-मंदिर यांना त्यांचे कर देतो, आणि इतकें देऊन टाकूनही स्वतःजवळ मजूरांच्या श्रमानें उत्पन्न झालेलें धन एकसारखें वाढत्या प्रमाणांत ठेवतो. समाजांतील सर्व संपत्तीचा भांडवलदार हाच पहिला मालक आहे असें म्हणावें लागेल. कोणत्याही कायद्यानें या धनावर त्याला मालकी हक्क दिलेला नाहीं. भांडवलावरचें व्याज घेऊन ही परिस्थिति घडवून आणली आहे....आश्चर्य हें कीं युरोपांतील सर्व न्यायाधिकाऱ्यांनीं सावकारीविरुद्ध कायदे करून भांडवलदाराच्या या धनसंचयास अडविण्याचा प्रयत्न केला होता....मांडवलदाराची राष्ट्रांतील सर्व संपत्तीवर पूर्ण सत्ता अशा प्रकारें निर्माण होणें हा मालकी हक्काच्या स्वरूपांत फार मोठा पालट होता. खरोखर कोठल्या कायद्यानें हा फरक झाला ?" असें दि नॅचरल अँड आर्टिफिशिअल राईट्स् ऑफ प्रॉपर्टी कॉंट्रास्टेड ( १८३२ ) या पुस्तकाचा हॉडस्किन् हा त्यावेळीं अनामिक असलेला लेखक लिहितो. या लेखकानें ध्यानांत ठेवावयाला हवें होतें कीं, क्रांत्या या कायद्यानें होत नाहींत.

## शहराशहरांचीं भांडणें

शहरांत धंद्यांच्या संघांची आणि खेड्यांत सरंजामी कायद्यांचा अडथळा असल्यानें सावकारी आणि व्यापार यांपासून उत्पन्न झालेलें पैशाच्या स्वरूपांतलें भांडवल कारखानदारी मांडवलांत रूपांतरित होऊं

शकलें नाहीं. पण पुढें सरंजामी समाजघटना मोडली आणि खेड्यांतील शेतकऱ्यांच्या जमिनी काढून घेतल्या जाऊन कांहींची खेड्यांतून हकालपट्टी झाली यामुळें हा अडथळा दूर झाला. भांडवलदारांचें नवे कारखाने जे निघाले ते समुद्रालतगच्या बंदरांत आणि जुन्या म्युनिसिपालिट्या व त्यांच्या हद्दीतले धंदेसंघ यांच्या नियंत्रणापलीकडील मुलखांत स्थापन झालें. म्हणून इंग्लंडांत मोठ्या कार्पोरेशन्स असलेल्या शहरांचे नवीन कारखानदारी असलेल्या शहरांशीं निकराचें भांडण चाललेलें असे.

## गुलाबी सुप्रभात !

अमेरिकेंत सोनें आणि रुपें सापडूं लागलें. तेथील रानटी लोकांना नष्ट करून टाकण्यांत आले अथवा गुलाम करण्यांत आले. अथवा खाणींतच गाडून टाकण्यांत आले. ईस्ट इंडीज जिंकून त्यांची लूट करण्याच्या क्रियेस सुरवात झाली. आफ्रिकेंत काळ्या लोकांना पकडून गुलाम करण्यांत येऊं लागलें. अशा या प्रकारांनीं भांडवलशाही कालखंडाची गुलाबी सुप्रभात सुरू झाली. प्राथमिक धनसंचयाचा मुख्य ओघ असल्या या सच्छील ( आयडिलिक ) कृत्यांनीं झाला. त्यांच्या पाठोपाठ युरोपियन राष्ट्रांचीं व्यापारी युद्धें सुरू होऊन सगळ्या भूगोलावर तीं होऊं लागलीं. स्पेनविरुद्ध हॉलंडनें केलेल्या बंडानें या युद्धांना सुरवात झाली. पळून गेलेल्या स्टुअर्ट राजघराण्याविरुद्ध केलेलीं युद्धें याच प्रकारचीं अधिक मोठ्या प्रमाणावरील युद्धें होत. चीनमध्यें जी अफुयुद्धें चालू आहेत तीं याच जातीचीं होत.

## पाशवी शक्ति ही सुईण होय

प्राथमिक धनसंचयाचा वेगवेगळा वेग स्पेन, पोर्तुगाल, हॉलंड,

फ्रान्स, इंग्लंड या देशांत याच कालक्रमानें वाढला. १७ व्या शतकाच्या शेवटीं इंग्लंडांत पद्धतशीर संघटना झाली. वसाहती, राष्ट्रीय कर्ज, आधुनिक करपद्धति आणि संरक्षकपद्धति याची एकजूट करण्यांत आली. या सर्व पद्धति अंशतः पाशवी बलावर आधारलेल्या होत्या. मागासलेल्या वसाहती जिंकण्याचा प्रकार उदाहरणादाखल म्हणून सांगतां येईल. पण या सर्व प्रकारांत समाजाचें केंद्रीभूत व संघटित असें जें राज्यसत्ताबल तें वापरण्यांत येत असे. कृत्रिम उष्णतेचीं घरें बांधून ज्याप्रमाणें झाडें भराभर वाढवितात त्याप्रमाणें सरंजामी उत्पादनपद्धतीचें रूपांतर अगदीं थोड्या संक्रमण काळांत भांडवलशाही पद्धतींत करण्यासाठीं राज्यसत्तेचा उपयोग केला जाई. कोणत्याहि जुन्या समाजव्यवस्थेच्या गर्भांत असलेली नवी समाजव्यवस्था जन्मास येतांना पाशवीशक्तीनें सुइणीचें काम केलें आहे. ही पाशवी शक्तीही आर्थिक सत्ताच आहे.

## वसाहती जिंकण्याची पद्धति

ख्रिस्ती लोकांची वसाहती जिंकण्याची पद्धति कशी असते हें सांगतांना ख्रिस्तीधर्मांतला पंडित असा डब्ल्यू हौविट् लिहितो— " या ख्रिश्चन नामधारी लोकांनीं जगांतील प्रत्येक मुलुखांत आणि त्यांनीं जिंकलेल्या प्रत्येक जमातीवर जे रानटी अत्याचार केले तितके क्रूर अत्याचार कितीही क्रूर, कितीही अडाणी आणि कितीही निर्लज्ज व निर्दय अशा कोणाही लोकांनीं पृथ्वीच्या पाठीवर आजतागायत केले नाहींत. " हॉलंडच्या वसाहतींतील राज्यकारभाराचा इतिहास ( हॉलंड हें १७ व्या शतकांत भांडवलशाही राष्ट्रांत अग्रगण्य राष्ट्र होतें. ) " विश्वासघात, लाचलुचपत, कत्तली आणि हलकटपणा यांनीं भयंकर प्रमाणांत भरलेला आहे. जावा बेटांत पाठविण्या-

साठीं गुलाम हवेत म्हणून माणसें चोरून नेण्याइतकें भयंकर कृत्य ते करीत. या माणूस चोरांना या कार्यासाठीं पद्धतशीर शिक्षण देण्यांत येई. माणूस चोर, दुभाषी, आणि गुलाम विकणारा दलाल हे या धंद्यांतील मुख्य एजंट असत. एतद्देशीय राजे हे मुख्य विक्रेते होते. चोरलेलें तरूण लोक सेलिबिस बेटांतल्या अंधारी तळघरांत टाकले जात. त्यांची पुरेशी संख्या झाली म्हणजे गुलामांच्या जहाजावरून त्यांना पाठविण्यांत येई. एक सरकारी रिपोर्ट सांगतो, " उदाहरणार्थ मकास्सर हें एक शहर घेतलें तर तें गुप्त तुरुंगांनीं भरलें आहे. हे तुरुंग एकाहून एक भयंकर आहेत. लोभ आणि जुलूम यांचे बळी असे यांतील कैदी आप्तइष्टापासून हिसकून आणण्यांत आले असून लोखंडी बेड्यांनीं जखडून या दुर्दैवी प्राण्यांना या तुरुंगांत गर्दीनें कोंडलेले असतें. " मलाक्का जिंकून घेण्यासाठीं डच लोकांनीं पोर्तुगीज गव्हर्नराला फितूर केले. त्यानें १६४१ मध्यें डचांना आपल्या शहरांत घेतलें. हे डच सैन्य शहरांत येतांच ते ताबडतोब त्या गव्हर्नराच्या घरीं गेले. व त्या सैन्यानें त्याचा खून पाडला. २१८७५ पौंड त्या गव्हर्नराच्या विश्वासघाताबद्दल त्याला लाच म्हणून द्यायचें होतें तें या सैन्यानें वांचविलें. जिथें जिथें यांनीं पाय ठेवला तिथें तिथें विध्वंस आणि लोकसंख्येचा नाश हें फळ त्या प्रदेशास मिळालें. जावा बेटांतील बजुवांगी या प्रांतांत १७५०त ८०००० लोकसंख्या होती. १८११ त ही लोकसंख्या फक्त १८००० राहिली. किती गोड हा व्यापार !

## शून्यांतून सृष्टि

ईस्ट इंडिया कंपनीनें हिंदुस्थानांत राज्यसत्ता स्थापन केली त्याखेरीज चहाच्या व्यापाराचा मक्ता मिळविला व चीनचाही सर्व-

सामान्य व्यापार आणि युरोप व पूर्वेकडील प्रदेश यांच्या दरम्यान मालाची नेआण करणें याची हक्कदारी मिळविली ही गोष्ट प्रसिद्धच आहे. पण हिंदुस्थानांतील किनाऱ्यावरला व्यापार बेटाबेटांमधला व्यापार आणि हिंदुस्थानांतला अंतर्गत व्यापार याची हक्कदारी कंपनीच्या वरिष्ठ अधिकाऱ्याकडे असे. मीठ, अफू, सुपारी व इतर अनेक प्रकारचा माल या गोष्टी संपत्तीच्या कधींहि न संपणाऱ्या खाणीसारख्या होत्या. कंपनीचे वरिष्ठ अधिकारी वाटेल तशी किंमत ठरवीत व तेथल्या दुर्दैवी हिंदूंना लुटीत असत. या खाजगी व्यापारांत गव्हर्नर जनरलहि भाग घेई. त्याचे वशिल्याचे लोक त्याच्याकडून कंत्राटें मिळवीत. ह्या कंत्राटांच्या शर्ती अशा असत कीं शून्यांतून हे कंत्राटदार सोनें निर्माण करीत. परीस लोखंडाला लावून सोनें करतात. असा समाज आहे. यापेक्षांही ह्या कंत्राटदारांची हुषारी मोठी म्हटली पाहिजे. उकिरड्यावरल्या छत्र्या जशा एका दिवसांत उगवून मोठ्या होतात तशा, कांहींही नव्हतें तेथें अकस्मात दौलती उत्पन्न झाल्या. १ शिलिंगही न खर्च करतां हा प्राथमिक धनसंचय चालू होता.

## हिंदुस्थानची लूट

वॉरन हेस्टिंग्सच्या खटल्यांत अशीं उदाहरणें ढीगच्या ढीग आहेत. त्यातलें हें एक उदाहरण पहा. सुलीव्हन नांवाच्या एका माणसाला हिंदुस्थानांतील एका भागांत तो सरकारी कामासाठीं चालला असतां एक कंत्राट देण्यांत आलें. तो भाग अफूच्या मुलुखापासून फार दूर होता. म्हणून सुलीव्हननें बिन्न नांवाच्या एका माणसाला तें कंत्राट ४०००० पौंडाला विकलें. बिन्ननें त्याच दिवशीं तिसऱ्या एकाला तें ६०००० पौंडाला विकलें. आणि अशी विक्री होत होत अखेरच्या खरीददाराला कंत्राटाची किंमत अतिशय पडूनही प्रचंड

नफा उरलाच. कंपनीपुढें ठेवलेल्या एका यादींतील उल्लेखाप्रमाणें कंपनीच्या नोकरांनीं १७५७–६६ चा काळांत ६० लक्ष पौंड हिंदी लोकांकडून देणगीदाखल घेतले होते. १७६९ व १७७० यांचे दरम्यान ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं सगळा तांदूळ एकदम खरेदी करून तो खूप अधिक किंमतीनें विकला व कृत्रिम दुष्काळ निर्माण केला. १८६६ त एका ओरिसा प्रांतांत १० लक्षांहून अधिक हिंदू मेले. तरीपण उपाशी मरणाऱ्या लोकांना अत्यवश्य असणाऱ्या वस्तूंच्या किंमतीहि अवास्तव वाढवून कंपनीची तिजोरी फुगविण्यांत आली....

## श्रीमंती व गरीबी या दोहोंची वाढ

अशा कृत्रिमपणें या वसाहतींनीं व्यापार व नौकानयन यांची वाढ केली. ल्यूथरच्या 'मक्तेदार संस्था' ( सोसायटीज् मोनोपोलिया ) या भांडवलाच्या केंद्रीकरणास मोठ्या सामर्थ्यवान असें साधन होत्या. नवीन उदयास येऊं लागलेले जे हस्तव्यवसायी कारखाने त्यांच्या मालासाठीं या वसाहतींनीं बाजार मिळविला. आणि बाजारांची हक्क-दारी मिळाल्यानें धनसंचय अधिकाधिक प्रमाणांत होत गेला. युरोपा-बाहेर उघड उघड लूट मारणें, माणसांना गुलाम करणें, खून करणें इत्यादि प्रकारांनीं जमविलेले खजिने मातृभूमीकडे वहात आले, व तेथें त्यांचें भांडवल झालें. हॉलंडनें अगदीं प्रथम ही वसाहत-साम्राज्याची पद्धति पूर्ण विकसित केली १८४८ त हे हॉलंडचे व्यापारी वैभवाच्या कळसास पोहोंचले होते. " हिंदुस्थानाकडील व्यापार आणि युरोपच्या अग्नेय व नैऋत्य यांमध्यें चालणारा व्यापार याची हॉलंडकडे एकट्याची मालकी होती. हॉलंडचा मच्छीमारीचा धंदा, जहाजांचा धंदा आणि कारखाने, इतर कोणत्याही राष्ट्रांपेक्षां अधिक भरभराटलेले होते.

सगळ्या युरोपांत जेवढें भांडवल असेल त्यापेक्षांही हॉलंडच्या प्रजासत्ताकाचें सर्व भांडवड अधिक महत्त्व पावलें होतें." असें गुलिच् लिहितो. गुलिच् एक गोष्ट लिहायला विसरला कीं हॉलंडच्या वैभवाचा कळस झालेल्या या १६४८ सालांतच हॉलंडमधील जनता तिच्या शक्तीहून अधिक राबवली जात होती. युरोपांतलीं सर्व राष्ट्रें एक केलीं तरी त्यांच्याहिपेक्षां हॉलंडची जनता अधिक दरिद्री होती. आणि तिच्यावर पाशवी जुलूम अधिक होत होता.

आज औद्योगिक वर्चस्व असलें म्हणजे व्यापारी वर्चस्व मिळतेंच. हस्तव्यवसायी कारखाने होते त्यावेळीं व्यापारी वर्चस्व असलें म्हणजे त्या योगानें औद्योगिक वर्चस्व मिळे. वसाहतीवरील साम्राज्यांना त्यावेळीं विशेष महत्त्व असण्याचें कारण हें. ईश्वरानें वाढावा मिळविणें हेंच मानव जातीचें ध्येय आहे असेंच जणूं या ख्रिस्ती राष्ट्रास सांगितलें होतें.

## राष्ट्रीय कर्जाचा जन्म

जिनोआ व व्हेनीस येथें मध्ययुगांत राष्ट्रीय कर्जाची पद्धति असल्याचें आढळून येतें. तीच या हस्तव्यवसायी कारखानदारीचे काळांत बाकीच्या युरोपांत पसरली. अंकित वसाहती, त्यांचा समुद्रावरून होणारा व्यापार आणि व्यापारी युद्धें यांनीं राष्ट्रीय कर्जाची आवश्यकता उत्पन्न केली. हॉलंडमध्यें पहिल्यानें राष्ट्रीय कर्ज पद्धति सुरू झाली. राज्यसंस्था अनियंत्रित राजाची असो, अथवा प्रजासत्ताक असो, कोणत्याहि देशांत भांडवलशाही कालखंडावर या राष्ट्रीय कर्जसंस्थेचा आरंभाचा छाप आहे. आधुनिक जनतेच्या सामुदायिक मालकींत राष्ट्रीय म्हणून गणल्या गेलेल्या संपत्तीचा जो भाग येत असतो. तो हा राष्ट्रीय कर्जाचाच होय. आणि यावरून अगदीं स्वाभाविकपणें

'एखादें राष्ट्र श्रीमान् असेल तितकें त्याचें कर्ज अधिक असतें' हें तत्त्व निर्माण झालें आहे. सार्वजनिक पत म्हणजे राष्ट्रीय कर्ज हें भांडवलशाहीचें ब्रीद आहे. हें राष्ट्रीय कर्ज वाढत चाललें म्हणजे राष्ट्रीय कर्जावर जो माणूस अविश्वास दाखवील तो येशु ख्रिस्तावर अविश्वास दाखविण्यासारखा अक्षम्य गुन्हा करतो असें मानलें जातें.

## आधुनिक बँकशाही

प्राथमिक धनसंचयाला हें राष्ट्रीय कर्जही फार जोरदार तरफ आहे. जादूच्या कांडीप्रमाणें हें राष्ट्रीय कर्ज वांझोट्या पैशाला शतपुत्रा अशा भांडवलाचें रूप देतें. पण खाजगी धंद्यांत किंवा सावकारीत पैसा गुंतवतांना जो त्रास व जो धोका असतो, तो या भांडवलांत मुळींच असत नाहीं. हें ऋणको सरकार खरोखर कांहींही देत नाहीं. कारण कर्ज म्हणून जें तें घेतें त्याचे सार्वजनिक कर्जरोखे लोकांना तें देते. हे कर्जरोखे चलनी नोटाप्रमाणें वटवितां येतात. आणि लोकांच्या हातीं या रोख्यांचा पैशासारखाच व्यवहार चालतो. या कर्जरोख्यामुळें मालकांना घरबसल्या आळशीपणानें तनखा मिळूं लागतो. बँकवाल्यांना सरकार व जनता यांच्या दरम्यान दलाली करून पैसा जमविता येतो. व्यापारी खाजगी कारखानदार वगैरे पुष्कळांना आभाळांतून पैसा पडावा त्याप्रमाणें या राष्ट्रीय कर्जांतला अगदीं आयता वाटा मिळत असतो. या सर्व गोष्टींशिवाय राष्ट्रीय कर्जाचा आणखी एक परिणाम म्हणजे संयुक्त भांडवली कंपन्या निघूं लागतात. निरनिराळे कर्जाचे दस्तऐवज सर्रास पैशासारखे वापरले जाऊं लागतात. दस्तऐवज व नगद यांच्या देवघेवींत व्यापाऱ्यांना बट्टा मिळूं लागतो. आणि अर्थातच रोख्यांच्या खरेदी विक्रीची जुगारी म्हणजे आधुनिक बँकशाही सुरू होते.

### ऋणको बँकशहा झाला

मोठमोठ्या बँका आरंभीं राष्ट्रीय नांव धारण करणाऱ्या असल्या तरी खाजगी धंदेवाल्यांच्या होत्या. ते सरकारच्या मदतीस सिद्ध असत आणि सरकारनें दिलेल्या सवलतीच्या जोरावर सरकारला पैसे देऊं शकत. यावरून या बँकांची पत वाढतां वाढतां जशी कदाचित् बुडूं शकेल, तसेंच राष्ट्रीय कर्जही बुडूं शकेल, अशाच अवस्थेंत तें वाढत आलें आहे. १६९४ त बँक ऑफ इंग्लंड स्थापन झाली. तेव्हांपासून बँका व राष्ट्रीय कर्ज यांचा पूर्ण विकास झाला आहे. बँक ऑफ इंग्लंडनें ८ टक्क्यानें सरकारला कर्ज देण्यास सुरवात केली. त्याच पैशांतून चलन तयार करून चलनी नोटांच्या रूपानें लोकांना बँकेनें कर्ज द्यावें असा अधिकार पार्लमेंटानें बँकेस दिला. मालाच्या देवघेवीचीं बिलें सोडविणें, मालखरेदीसाठीं आगाऊ पैसे देणें व सोनें रुपें खरेदी करणें यासाठीं या नोटा वापरण्यास बँक ऑफ इंग्लंडला परवानगी मिळाली. लवकरच या बँकेनें कर्जरूपानें निर्माण केलेला हा पैसा याच बँक ऑफ इंग्लंडनें सरकारला परत कर्जरूपानें दिला आणि त्याच पैशांत राष्ट्रीय कर्जावरील व्याजही लोकांना दिलें. बँकेनें एका हातानें पैसा देऊन दुसऱ्या हातानें अधिक घेतला; एवढ्यानेंच भागलें नाहींतर पैसा घेतां घेतां सगळ्या राष्ट्राची कायमची सावकारही तीच राहिली. हळू हळू देशांतील सर्व सोन्यारुप्याचा सांठा या बँक ऑफ इंग्लंडजवळ जमला आणि व्यापारी पतीचें केंद्रस्थानही तीच बँक झाली. हें बँकशहा, दलाल, कर्जरोख्यांची देवघेव करणारे वगैरे हे नवे प्राणी अकस्मात जन्मास आल्यानें तत्कालीन समाजावर काय परिणाम झाला हें बोलिंगब्रोकसारख्या लेखकांच्या लिहिण्यांत पहावयास मिळतें.

## भांडवलाची निर्यात

राष्ट्रीय कर्जाच्या संस्थेबरोबर आंतरराष्ट्रीय कर्जांची संस्था निर्माण झाली. या आंतरराष्ट्रीय कर्जपद्धतींत पुष्कळदां प्राथमिक धनसंचय गुप्तपणें होत असतो. याप्रकारें व्हेनिसमधील चोरून पैसे साठविण्याची पद्धति हॉलंडमधल्या भांडवली संपत्तीचा गुप्त पाया झाली होती. व्हेनीसनें आपल्या उतरत्या काळांत मोठमोठ्या रकमा हॉलंडला कर्जाऊ दिल्या. हॉलंड व इंग्लंड यांच्याही बाबतींत पुढें हेंच घडलें. १८ व्या शतकाच्या आरंभीं डच कारखानदार मागें पडले. व्यापार आणि उद्योगधंदे यांत हॉलंड हें पहिल्या प्रतीचें राष्ट्र राहिलें नाहीं. आणि म्हणून १७०१ पासून १७७६पर्यंत हॉलंडचा प्रतिस्पर्धी जें इंग्लंड त्याला कर्ज देणें हाच हॉलंडचा मोठा धंदा होता. आज इंग्लंड व अमेरिका यांचें दरम्यान हेंच चालू आहे. पुष्कळसें भांडवल अमेरिकेमध्यें आज दिसतें तें कोठून आलें तें कळत नाहीं. तें काल इंग्लंडांत होतें. आंग्लभूमीच्या पुत्रांच्या रक्ताचें तें बनलें होतें.

## कर वाढीची अपरिहार्यता

राष्ट्रीय कर्जाला सरकारी महसूल हा तारण असतो. सरकारचे इतर सर्व खर्च भागून शिवाय या राष्ट्रीय कर्जावरील व्याजही त्या महसूलामधून भागावें लागतें. अर्थात आधुनिक करपद्धति ही या राष्ट्रीय कर्ज पद्धतीचा एक पूरक अवयवच आहे. या राष्ट्रीय कर्जामुळें सरकारला अवांतर खर्च भागवितां येतो. कर देणाऱ्या जनतेलाही तावडतोब या खर्चाचा भार लक्षांत येत नाहीं. पण त्याचा परिणाम म्हणून कर हे वाढतातच. उलट एका मागून एक कर्जांचें डोंगर वाढूं लागले म्हणजे कर वाढत जातात म्हणून ते टाळण्यासाठीं सरकार पुन्हां कर्जें काढीत राहतें. याप्रमाणें आधुनिक सरकारी जमाखर्च-

पद्धतींत आपोआप कर्ज व कर वाढत जाण्याचा दोष अंगभूतच आहे. ही जमाखर्चपद्धति चरितार्थाच्या वस्तूवर कर लादण्याच्या तत्त्वावर आधारली आहे. यामुळें हे जिन्नस महाग होत जातात. यावरून फाजील करवाढ होणें ही गोष्ट एक आनुषंगिक बाब नसून तें मुख्य तत्त्व आहे हें लक्षांत येईल. हॉलंडमध्यें या पद्धतीचा प्रथम आरंभ झाला. हॉलंडचा देशभक्त डी विट् यानें 'मॅक्झिमम्स' नांवाच्या ग्रंथांत मजूरांला नम्र, काटकसरी, उद्योगी करण्यास आणि श्रमाच्या ओझ्याखालीं वाकविण्यास हीं पद्धति अतिशय चांगली आहे असें म्हटलें आहे. अर्थात् मजूराच्या परिस्थितीवर विध्वंसक परिणाम या पद्धतीनें घडतो ह्या मुद्याशीं आपणाला सध्यां कर्तव्य नाहीं. लहान शेतकरी, कारागीर थोडक्यांत म्हणजे खालच्या मध्यम वर्गांतील सर्व लोक यांना सक्तीनें कफल्लक बनविण्यांत येतें एवढ्याच मुद्याकडे तूर्त आपणांस लक्ष वेधावयाचें आहे. फाजील करवाढीच्या पद्धतीचा परिणाम मजूरवर्गावर विध्वंसक होतो या मुद्याचें बाबतीत भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांतही दुमत नाहीं. संरक्षक कर लादणें ही या फाजील करपद्धतीची एक अंगभूतच बाब असून तीमुळें लोक अधिकच कफल्लक होतात.

जनतेला कफल्लक बनवून संपत्तीस भांडवलाचें रूप देण्याच्या कामांत या राष्ट्रीयकर्जानें आणि राष्ट्रीय जमाखर्च पद्धतीनें फार मोठी कामगिरी केली असल्यानें कॉबेट्, डबलडे वगैरे कित्येक लेखकांनीं जनतेच्या दारिद्र्याचें कारण राष्ट्रीय कर्ज व करपद्धति हीच होत असें म्हटलें आहे. पण तें चुकीचें आहे.

## राज्यकर्ते धंद्यांचे बनले

स्वदेशी धंद्यांना जकातीनें संरक्षण देण्याची ही पद्धति कारखानदार निर्माण करणारी, स्वतंत्र मजूरांना कफल्लक बनविणारी आणि राष्ट्रांतील

धनोत्पादनाचें व चरितार्थाचें जें साधन त्याला भांडवल बनविणारी अशी असते. मध्ययुगीन उत्पादनपद्धतीचें आधुनिक उत्पादनपद्धतींत सक्तीनें झटकन रूपांतर करण्यास या संरक्षण पद्धतीची मदत होते. या संरक्षण पद्धतीच्या अद्भुत शोधाचें पेटंट घेण्यासाठीं युरोपीयन राज्यकर्त्यांनीं एकमेकांस फाडून खालें. हे राज्यकर्ते वाढावा मिळवणाऱ्या धंदेवाल्यांचे एकदां सेवक बनल्यावर त्यांनीं स्वतःच्या सर्व प्रजेला अप्रत्यक्षपणें संरक्षक करांनीं आणि प्रत्यक्षपणें माल निर्यातीस देणग्या देऊन सेवक बनविलें. इतकेंच नव्हे तर आपल्या अंकित राष्ट्रांतील सर्व धंदेही वाढावा मिळविणाऱ्या आपल्या कारखानदाराच्या हितासाठीं उध्वस्त करून टाकले. इंग्लंडनें आयर्लंडांतील लोकर कारखानदारांना नष्ट केले तें याचेंच उदाहरण होय. कोलबर्टचें उदाहरण गिरवून युरोपखंडांत ही पद्धति अधिक सोपी करण्यांत आली. युरोपखंडांत भांडवलशाहीचें प्राथमिक भांडवल सरकारी खजिन्यांतूनच आलें. मिरॅबो आक्रोश करतो " युद्धापूर्वी सॅक्सनीच्या कारखानदारीचें वैभव जें प्रचंड होतें त्याचें कारण शोधण्याला खोल इतिहासांत कशाला बुड्या मारतां? खुद्द राज्यकर्त्यांनीं १८ कोटींचें कर्ज काढलें होतें. हाच त्या वैभवाचा उगम होय."

## यांत्रिक धंद्यांचा जन्मकाल

वसाहतींत राज्यस्थापना, राष्ट्रीय कर्जें, फाजील कर, संरक्षक जकाती, व्यापारी युद्धें इत्यादि हस्तव्यवसायी कारखानदारीची हीं छोटीं छोटीं बाळें यांत्रिक उद्योगधंद्यांच्या प्राथमिक अवस्थेत प्रचंड प्रमाणांत वाढूं लागतात. या यांत्रिक उद्योगधंद्यांचा जन्म निरपराध्यांच्या कत्तलींच्या दुंदुभींनीं साजरा होतो. सरकारी आरमाराप्रमाणेंच कारखानदारीलाही वर्तमानपत्रांतील झब्बूशाहीकडून पाठबळ देण्यांत येत असे. सर एफ्.

एम्. एडन याला, शेतजमिनींतून शेतकऱ्यांना १५व्या शतकाच्या शेवटच्या ३० वर्षांपासून त्याच्या काळापर्यंत हाकून लावण्यांत आलें होतें याचा, मोठा आनंद होई. भांडवलदारी शेतीची स्थापना करण्यासाठीं आणि शेतजमीन व कुरणें यांचे दरम्यान योग्य प्रमाण ठेवण्यासाठीं शेतकऱ्यांची ही हकालपट्टी अवश्य होती असें त्यानें लिहिलें आहे. पण हस्तव्यवसायी कारखानदारीचें रूपांतर यांत्रिक कारखानदारीमध्यें करण्यासाठीं आणि भांडवल व श्रमशक्ति यांचेमध्यें समप्रमाण स्थापन करण्यासाठीं मुलें चोरणें, मुलांना गुलाम करणें वगैरे ज्या किळसवाण्या गोष्टी करण्यांत आल्या, त्या संबंधानें मात्र एफ्. एम्. एडन हा आर्थिक दृष्टिकोन स्वीकारीत नाहीं. तो लिहितो "लोकांनीं खरोखर आतां विचार करायला हवा. लोकांच्या झोपड्या व धंद्यांचीं घरें, यांतून एखादा कारखाना चांगला चालावा यासाठीं मुलें पळवून न्यावीं काय? त्या मुलांना रात्रीं कामाला लावून त्यांची झोपही काढून घ्यावी काय? झोप ही सर्वांना तर हवींच पण मुलांना तर सर्वांत जास्त हवी. निरनिराळ्या वयाचे व स्वभावाचे स्त्रीपुरुष एके ठिकाणीं आणून व्यभिचार व दुराचार वाढतील अशाच प्रकारें त्यांना कामास लावण्यांत यावें, यानें राष्ट्राच्या अथवा व्यक्तीच्या सुखांत भर पडणार आहे काय?"

## मुलांचा अमानुष छळ

फील्डन लिहितो "डर्बीशायर, नॉटिंगहॅमशायर आणि विशेषतः लॅंकशायर येथें नवीन संशोधलेलीं यंत्रें ज्या कारखान्यांत सुरू करण्यांत आलीं ते कारखाने पाणचक्कीवर चालवितां यावे यासाठीं नद्यांच्या काठीं बांधण्यांत आले, तेथें त्यावेळीं शेंकडों माणसांची गरज उत्पन्न झाली. शहरापासून हे प्रदेश अतिशय दूर होते. लॅंकशायरला तर

त्यावेळीं मुळींच वस्ती नसून मुलूख अगदींच ओसाड असल्यानें माणसांची फारच गरज लागली. तेथें लहान मुलांचीच गरज फार होती. यामुळें लंडन, बर्मिंगहॅम व इतर ठिकाणच्या निरनिराळ्या श्रमगृहांतून उमेदवार मिळविण्याची रूढीच पडली. कित्येक हजार चिमुकलीं दुर्दैवी मुलें उत्तरेंत पाठविण्यांत आलीं. ७ पासून १४ या वयांतलीं हीं सारीं मुलें होतीं. मालक या उमेदवारांना कपडे घाली, खाऊं घाली आणि कारखान्याजवळच्या उमेदवारगृहांत राहून घेई. या मुलांच्या कामावर देखरेख करण्यास निरीक्षक असत. मुलांना जास्तींत जास्त राबवण्यांतच मुलांचें हित असे. कारण मुलांच्याकडून जितकें अधिक काम करून घ्यावें तितका त्यांना अधिक पगार मिळे. अर्थात क्रूरपणा हा याचा अगदीं स्वाभाविकच परिणाम होता.... अनेक कारखानदारीच्या विभागांत विशेषतः बहुधा सर्वांत अधिक गुन्हेगार अशा माझ्या लँकशायर विभागांत कारखानदारांच्या हवालीं केल्या गेलेल्या या निरपराधी व अनाथ बालकावर काळीज फाटून जाईल असे अत्याचार होत. अतिश्रमांनीं त्यांनीं मरणाच्या दारीं जावें इतका त्यांचा छळ होई....त्यांना फटके मारीत, बेड्या घालीत, आणि छळ करण्याच्या नव्या नव्या युक्त्या अमलांत आणल्या जात....कामावर असतां त्यांना फटके तर मारण्यांत येतच; पण बरचेवर उपाशी ठेवण्यानें त्यांच्या हाडांचा सापळा झालेला होता.... कांहीं कांहीं मुलांनीं तर आत्महत्येचा आश्रय केला. डर्बीशायर, नॉटिंगहॅमशायर, लँकशायर या पूर्वी सौंदर्य व प्रेम यांनीं भरलेल्या दऱ्या आतां जनतेच्या दृष्टीस न पडतां राहून तेथें छळ आणि खून यांचे शोकमय वातावरण पसरलें. कारखानदारांचे नफे ढिगांनीं वाढत होते. पण यांनीं समाधान पावण्याऐवजीं त्यांच्या लोभाची आग अधिकच भडकत होती. आपणांस अमर्याद नफा मिळत रहावा यासाठीं त्यांनीं आणखी

एक युक्ति योजली. रात्रपाळ्या त्यांनीं सुरू केल्या. दिवसा एका टोळीकडून काम घेतल्यानंतर रात्रभर दुसऱ्या टोळीकडून काम घेण्यांत येऊं लागलें. रात्रीं जे कामावर जात त्यांच्या अंथरुणावर दिवसा काम करणारे झोंपत. आणि रात्रीं काम करून उजाडतां घरीं येणारीं मुलें दिवसा कामावर जाणाऱ्यांनीं सोडलेल्या अंथरुणांत दिवसभर झोपत. लँकशायरमध्यें अशी एक परंपराच आहे कीं तेथें बिछाने कधींही थंड होत नाहींत."

## गुलामांच्या व्यापाराचें महाकाव्य

हस्तव्यवसायी कारखानदारीच्या काळांत भांडवलशाही उत्पादन वाढत असतां युरोपांतल्या लोकमतानें उरली सुरली लाज आणि विवेकशक्ति सोडून दिली होती. ज्या ज्या दुष्ट गोष्टींनीं भांडवलशाहीचा धनसंचय होत होता त्यासंबंधानें युरोपांतील राष्ट्रं बेफिकीर असत. ए. अँडरसन यानें लिहिलेलें 'अॅनल्स ऑफ कॉमर्स' हें पुस्तक उदाहरणादाखल पहा. यूट्रेचच्या तहामध्यें इंग्लंडनें स्पॅनिश सरकार-पासून नीग्रो गुलामांची ने-आण करण्याचा हक्क मिळविला, याचें अँडरसननें या पुस्तकांत कौतुक केलें आहे. आजवर ही ने–आण आफ्रिका व इंग्लिश वेस्ट इंडीज् यांचे दरम्यानच होई. आतां ब्रिटिश जहाजांना आफ्रिका व स्पॅनिश अमेरिका यांचें दरम्यानही वाहतुक करतां येऊं लागली. यामुळें १७४३पर्यंत स्पॅनिश अमेरिकेला दरसाल ४८०० नीग्रो पुरविण्याचा हक्क मिळाला. जकात चूकवून माल नेण्याच्या इंग्लंडच्या धंद्यावरही यानें चांगलें पांघरूण पडलें. या गुलामांच्या व्यापारावर लिव्हरपूल लठ्ठ झालें. लिव्हरपूलचा प्राथमिक धनसंचय या पद्धतीनें झाला होता. आणि आजची लिव्हरपूलची शिष्ट-मान्यता ही गुलामांच्या व्यापाराचेंच महाकाव्य आहे. याच व्यापाराच्या

काळीं लिव्हरपूलनें मोठी साहसी वृत्ति धारण केली होती. त्यामुळेंच लिव्हरपूलचा व्यापार आजच्या वैभवास चढला. " लिव्हरपूलच्या या शौर्यानें जहाज बांधणें व जहाजें चालविणें या धंद्यांत शेंकडों कामगारांना धंदा दिला असून ब्रिटिश मालाला मागणीही खूप वाढविली आहे." असें ' ऐकीन ' लिहितो. लिव्हरपूलनें गुलामांच्या व्यापारांत १७३० मध्यें १५ जहाजें गुंतवली होती. तीं १७५१ त ५३, १७६० त ७४ , १७७० त ९६ व १७९२ त १३२ अशीं वाढविलीं.

## रक्त आणि घाण यांत भांडवलाचा जन्म

इंग्लंडांत कापसाच्या धंद्यांत मुलांची गुलामगिरी सुरू झाली, त्याप्रमाणें अमेरिकेंतही मुलांच्या घरोघर होणाऱ्या पिळणुकीचें रूपांतर पद्धतशीर व्यापारी पिळणुकींत झालें. खरोखर युरोपांत मजूरदारांची जी प्रच्छन्न गुलामगिरी होती तिला अमेरिकेंत अगदीं उघड-उघड गुलामगिरीचा आधार हवाच होता. भांडवलशाहीचें त्रिकालाबाधित असे नैसर्गिक कायदे स्थापित करण्यासाठीं, मजूर आणि श्रम करण्याची परिस्थिति यांचा पूर्ण वियोग करण्यासाठीं, साधन एका सामाजिक धनोत्पादनाचें आणि चरितार्थाचें टोंकास भांडवलांत रूपांतरित करून आधुनिक समाजव्यवस्थेचें कृत्रिम फल असे कफल्लक मजूर दुसऱ्या टोंकाला उभे करण्यासाठीं, इतका सर्व खटाटोप करण्यांत आला. ऑगर म्हणतो, " पैसा जन्माला येतांना त्याच्या गालावर एक रक्ताचा अंगचाच डाग असतो. " पण भांडवल जन्माला येते तें पायापासून डोक्यापर्यंत रक्तानें आणि घाणीनें बरबटलेलें, रोमा-रोमांतून रक्त आणि घाण वहात राहणारें, असेंच जन्माला येतें.

# धनसंचयाची ऐतिहासिक प्रवृत्ति : : : २०*

## वैयक्तिक मालकीचा विध्वंस

एकंदरींत मग भांडवलशाही धनसंचयाच्या उगमाचा हा जो इतिहास आपण पाहिला त्याचें स्वरूप कोणतें ? या धनसंचय पद्धतीनें जितक्या प्रमाणांत गुलाम व भूदास यांचे प्रत्यक्षपणें मजूरांत रूपांतर केलें जात नाहीं तितक्या प्रमाणांत प्रत्यक्ष धनोत्पादन करणारांनाच यामुळें कफल्लक केलें जातें. व्यक्तीच्या श्रमावर आधारलेल्या खाजगी मालकीचा विध्वंस हें याचें स्वरूप होय. ज्या खाजगी मालकींत श्रमाचें साधन आणि श्रम करण्याला आवश्यक अशी बाह्य परिस्थिति ही खाजगी व्यक्तीच्या हातीं असते ती खाजगी मालकी सामुदायिक मालकीचा प्रतियोग ( अँटीथेसिस ) होय. पण ह्या खाजगी व्यक्ति स्वतः श्रमजीवी असतील किंवा नसतील त्याप्रमाणें खाजगी मालकीचें स्वरूप वेगवेगळें होतें. खाजगी मालकीच्या स्वरूपांत ज्या असंख्य निरनिराळ्या छटा दिसतात त्या श्रमजीवी असणें व नसणें या दोन

* कॅपिटल, खंड १, प्रकरण ३२.

टोकांच्या दरम्यान असणाऱ्या निरनिराळ्या अवस्थांस अनुसरून असतात. लहान हस्तव्यवसाय शेतीचा असो किंवा कारागिरीचा असो कष्ट करणाऱ्या माणसाची त्याच्या हत्यारावर मालकी हा त्या व्यवसायाचा पाया असतो. सामाजिक धनोत्पादनाच्या विकासास आणि कष्ट करणाऱ्या माणसाच्या व्यक्तिविकासास लहान व्यवसायाची अत्यवश्यकता असते. गुलामगिरीच्या अवस्थेंत, भूदास पद्धतीच्या अवस्थेंत आणि अशाच इतर मानवी पारतंत्र्यांच्या अवस्थांत लहान व्यवसाय असतातच. पण ज्यावेळीं कष्ट करणारा माणूस हा आपल्या श्रमसाधनाचा स्वतः मालक असून तीं श्रमसाधनें स्वतः चालवितो त्यावेळींच हे लहान व्यवसाय भरभराटतात. माणसाची सर्व हिंम्मत त्यांचे ठिकाणीं खर्च होते आणि ते व्यवसाय अगदीं पद्धतशीरपणें चालतात.

## भांडवलाच्या इतिहासाचा प्रस्ताव

लहान व्यवसायांच्या भरभराटीस लहान शेतकऱ्यानें मशागत करावयाची जमीन त्याच्या मालकीची असणें अवश्य असतें व कारागीर या नात्यानें कष्ट करणाऱ्या माणसाचीं हत्यारें त्याच्या मालकीचीं असणें अवश्य असतें. या उत्पादन पद्धतींत जमिनींचे तुकडे निरनिराळ्या लहान लहान मालकाकडे असून धनोत्पादनाचीं साधनें निरनिराळ्या मालकांत चोहोंकडे वाटलेलीं असतात. या पद्धतींत धनोत्पादन साधनांचें केंद्रीकरण होत नाहीं, तसेंच पण कारागिरांचें सहकार्य अथवा एकाच उत्पादनव्यवसायांत श्रमविभाग होत नाहीं. समाजानें सृष्टीची शक्ति नियंत्रित करून तिला उत्पादनाच्या कामीं लावणें आणि समाजाच्या उत्पादनसामर्थ्याची पूर्ण वाढ करणें हेंही या लहान उत्पादनपद्धतींत शक्य नसतें. ही लहान उत्पादनपद्धति मानवी इतिहासाच्या अगदीं प्राथमिक अवस्थेंतल्या बंधनांत व संकुचित

क्षेत्रांत वावरणाऱ्या समाजामध्येंच नांदूं शकते. पेकर म्हणतो तें अगदीं खरें कीं हीच उत्पादनपद्धति कायमची नांदूं देणें म्हणजे " सगळ्या जगाला क्षुद्र अवस्थेंत कायमचें राहण्याचा हुकूम करणें होय; " या पद्धतीचा विकास होतां होतां ती आपल्या विनाशाची भौतिक साधनें उत्पन्न करते. ही विनाशसाधनें उत्पन्न झालीं म्हणजे समाजाच्या अंतःकरणांत नव्या शक्ती व नवे मनोविकार उत्पन्न होतात. पण जुनी सामाजिक संघटना त्यांना आडवून दडपून टाकीत असते. म्हणून ती जुनी समाजसंघटना उध्वस्त करावी लागते, व तशी ती उध्वस्त केली जातेही. तिचा विध्वंस म्हणजे वैयक्तिक मालकींतल्या व तुरळकपणें पसरलेल्या धनोत्पादन-साधनांचें सामाजिक केंद्रीकरण, बहुसंख्यांच्या लहान लहान मिळकतींचे अगदीं थोड्यांच्या प्रचंड मालकींत रूपांतर, प्रचंड लोकसंख्येची जमिनीच्या मालकींतून, चरितार्थाच्या साधनांतून व श्रमसाधनांच्या मालकीपासून हकालपट्टी, इत्यादि प्रकारची बहुसंख्य समाजाची भयानक व दुःखद नागवणूक हा भांडलाच्या इतिहासाचा प्रस्ताव होय.

## पिळणुकीवर आधारलेली नवी मालकी

यामध्यें पाशवी शक्तीचा उपयोग करणाऱ्या अनेक पद्धति अमलांत येतात. त्यांपैकीं आपण भांडवलाच्या प्राथमिक धनसंचयाच्या क्रमांत अगदीं ठळक ठळक अशा पद्धति ज्या होत्या तेवढ्यांचेंच अवलोकन केलें. प्रत्यक्ष धनोत्पादकांचे मालकी हक्क अत्यंत निर्दय अशा गुंडगिरीनें हिसकावून घेतले गेले. ही नागवणूक अत्यंत नीच, क्षुद्र व घाणेरड्या अशा वासनेच्या प्रेरणेनें केली होती. स्वतःच्या श्रमानें मिळविलेली खाजगी मालकी, म्हणजे अनेक वेगवेगळ्या स्वतंत्रपणें श्रम करणाऱ्या व्यक्ति आपापल्या भिन्न भिन्न परिस्थितींत कष्ट

करून जी खाजगी मालकी निर्माण करतात ती खाजगी मालकी भांडवलशाही खाजगी मालकीनें नष्ट केली जाते. ही नवी म्हणजे भांडवलशाही खाजगी मालकी नाममात्र स्वतंत्र अशा इतरांच्या श्रमाच्या पिळणुकीवर म्हणजे रोजमजूरीवर आधारलेली असते.

## मालकी पद्धतीच्या मृत्यूची घंटा

अशा प्रकारें रूपांतर होत होत जुनी समाजव्यवस्था वरपासून खालपर्यंत सडून गेली, कष्ट करणाऱ्यांना कफल्लक मजूर बनविण्यांत आलें, त्यांचीं श्रमसाधनें भांडवलांत रूपांतरित केलीं, आणि अशा प्रकारें भांडवलशाही पद्धति आपल्या पायावर उभी राहूं लागली म्हणजे मग ताबडतोब श्रमाचे अधिकाधिक सामाजीकरण, जमीन व धनोत्पादनाचीं इतर साधनें यांचा सामुदायिकपणें वापर, म्हणजेच धनोत्पादनसाधनांचें सामुदायिकपणांत रूपांतर, तशीच लहान लहान मालकांची नागवणूक या सर्वांनाच एक नवें रूप येतें. आतां ज्याची नागवणूक करावयाची तो प्राचीन काळचा स्वतःसाठीं कष्ट करणारा कारागीर नव्हे; तर अनेक मजूरांना पिळणारा जो भांडवलदार त्याचीच नागवणूक आतां करायची असते. ही नागवणूक भांडवलशाही उत्पादन पद्धतीच्या अंगभूत सिद्धांतानें म्हणजे भांडवलाच्या केंद्रीकरणानेंच होत असते. एक भांडवलवाला दुसऱ्या पुष्कळशा भांडवलवाल्या बांधवांना चढाओढींत ठार करतो. अशा प्रकारें थोड्या भांडवलवाल्याकडून पुष्कळ भांडवलवाल्यास कफल्लक केलें जाऊन संपत्तीचें केंद्रीकरण थोड्याथोड्यांच्या हातीं होत असतां संपत्त्युत्पादनाचें कार्य वाढत्या प्रमाणांत मजूरांच्या सहकारितेनें होऊं लागतें. त्याचबरोबर संपत्त्युत्पादनाचीं उपकरणें अधिकाधिक शास्त्रशुद्ध केलीं जातात. जमिनीची मशागत अधिकाधिक पद्धतशीरपणें होऊं लागते. मजूरांचीं हत्यारें, सहकारितेनेंच

वापरतां येतील असें रूप धारण करूं लागतात. सामुदायिक श्रमामुळें संपत्त्युत्पादनसाधनांची काटकसर होते. जगाच्या बाजारांत जगांतील सर्व माणसें खेचलीं जातात. आणि म्हणून भांडवलशाही वाढत्या प्रमाणांत आंतरराष्ट्रीय स्वरूप धारण करते. उत्पादनसाधनें अधिकाधिक कार्यक्षम होत असतात, चढाओढीच्या बळावर थोडे भांडवलवाले इतरांस पराभूत करून भांडवलशाही समाजांतले सर्व फायदे गिळंकृत करतात. अशा प्रकारें या भांडवलशाही सुलतानांची संख्या कमी कमी होत असतां दुसऱ्या बाजूस दारिद्र्य जुलूम, गुलामगिरी, अधःपात व पिळणूक हींही वाढत असतात. पण त्याचबरोबर कामगारवर्गाचा संतापही तीव्र होत असतो. या वर्गाची संख्या वाढत असते, त्यांच्यांत शिस्त उत्पन्न होत असते.भांडवलशाही-च्या विशिष्ट उत्पादन प्रकारामुळेंच त्यांच्यांतही संघटना निर्माण होत असते. भांडवलाच्या केंद्रीकरणामुळें जी उत्पादनपद्धती सुधारत गेली तिची वाढ यापुढें त्याच भांडवलाच्या अतिकेंद्रीकरणाच्या अडसरा-पुढें खुंटते. धनोत्पादन साधनांचें केंद्रीकरण व संपत्तीचें सामुदायिक उत्पादन या दोहोंची वाढ इतकी पुष्कळ होते कीं यापुढें भांडवल-शाहीच्या कवचांत ती मावूं शकत नाहींत. म्हणून मग तें कवच फुटतें. भांडवलशाही मालकी पद्धतीच्या मृत्यूची घंटा वाजूं लागते. ज्यांनीं जगास कफल्लक केले तेच शेवटीं कफल्लक होतात.

## विनाशाचा विनाश

भांडवलशाहींतील संपत्तीची वाटणी करण्याची पद्धति ही भांडवल-शाही उत्पादनपद्धतीचा परिणाम असून या वाटणी पद्धतीनें भांडवल-शाहीची मालकीपद्धति निर्माण होते. भांडवलशाहीपूर्वींच्या हस्त-व्यवसाय पद्धतींतील मालकी ही त्यावेळच्या उत्पादन साधनांचा

जो मालक, त्यानें श्रम करून माल निर्माण करण्यावर, म्हणजे त्याच्या श्रमावर अवलंबून असते. या मालकीचा विनाश ( निगेशन ) म्हणजे भांडवलशाही मालकी होय. पण भांडवलशाही उत्पादन पद्धतींतच, सृष्टिधर्म जसे अनिवार असतात तशा अनिवारपणें, या उत्पादन-पद्धतीचा विनाश उत्पन्न होतो. हाच विनाशाचा विनाश होय. यामुळें श्रमकरणारांची खाजगी मालकी त्यांच्या हत्यारावर म्हणजे यंत्रें वगैरे उत्पादनसाधनावर निर्माण होत नाहीं. तर भांडवलशाहीच्या अमदानींत सहकारितेनें संपत्ति निर्माण करण्याची जी पद्धति पडली त्या भूमिके-वर सहकारितेनें उत्पादन चालू राहून जमीन व इतर धनोत्पादनसाधनें खाजगी मालकींत राहतात व भोग्य संपत्ति मात्र उत्पादकाला मिळतें.

वैयक्तिक श्रमजीवनापासून उत्पन्न झालेली व चोहोंकडे इतस्ततः पसरलेली लहान लहान स्वरूपाची जी खाजगी मालकी तिचें रूपांतर भांडवलशाही खाजगी मालकींत होणें ही प्रक्रिया स्वाभाविकच अति-शय चेंगट, अत्याचारी आणि अवघड आहे. भांडवलशाही खाजगी मालकी ही व्यवहारतः सामुदायिक उत्पादनावर आधारली असल्यानें तिला खाजगी मालकीचें रूप देणें इतकें दीर्घकालीन, अवघड व अत्याचाराचें होत नाहीं. पहिल्या प्रकारांत मूठभर गुंडांनीं बहुसंख्य जनतेची मालकी हिरावून घ्यावयाची होती. दुसऱ्या प्रकारांत बहुसंख्य जनतेनें मूठभर लोकांची मालकी हिरावून घ्यावयाची असते.

---

## पैसा : : : २१*

विक्रीमाल आपल्या पायांनीं कांहीं बाजारांत चालत जाऊं शकत नाहीं. अथवा स्वतःचा विनिमय करूं शकत नाहीं. म्हणून विक्रीमालाच्या पालकाकडे म्हणजे मालकाकडे आपण लक्ष देऊं. विक्रीमालाच्या मालकाला स्वतःला आपल्या मालाचें तात्कालिक उपयोगमूल्य कांहींही नसतें. तसें असतें तर त्यानें तो माल बाजारांत आणलाच नसता. इतरांना या विक्रीमालाचा उपयोग असतो. स्वतः विक्रीमालाच्या मालकाला त्या मालाचें जें उपयोगमूल्य असतें तें विनिमयमूल्याचा तो माल हा साठा असतो या अर्थानें होय.* या दृष्टीनें

* कॅपिटल, खंड १, प्रकरण २-३.

* "कारण प्रत्येक वस्तूचा उपयोग दुहेरी असतो. एक उपयोग वस्तूच्या अंगभूत असतो. दुसरा अंगभूत नसतो. पायातली वहाण पायांत घालतां येते हा तिचा एक उपयोग, आणि तिचा विनिमय होऊं शकतो हा तिचा दुसरा उपयोग होय. दोन्हीहि वाहणेचे उपयोगच होत. कारण जो माणूस वहाण दुसऱ्याला देऊन आपणाला हवें असणारें अन्न त्याज-

तो माल त्याचें विनिमयाचें साधन असतो. म्हणून ज्या वस्तूचें उपयोगमूल्य त्याला हवें असेल ती वस्तु मिळविण्यासाठीं तो आपल्या विक्रीमालाचा त्याग करण्यास तयार होतो. सर्व विक्रीमाल हा त्याच्या मालकांना उपयोगमूल्य नसून तिऱ्हाइतांना उपयोगमूल्य असतो. म्हणून प्रत्येक विक्रीमाल एकाच्या हातून दुसऱ्याच्या हातीं जावा लागतो. हा जो एकाच्या हातून दुसऱ्याच्या हातीं जाण्याचा प्रकार तोच विनिमय होय.

## विनिमयाचें ऐतिहासिक स्वरूप

एखादी उपयुक्त वस्तु तिच्या मालकाच्या गरजेहून अधिक होईल तेव्हां तिची विक्री ही शक्य होते. विक्री घडते तेव्हां खरेदीविक्री करणाऱ्या माणसांनीं आपापल्या मालासंबंधानें त्या त्या मालाचे आपण खाजगी व स्वतंत्र मालक आहोंत अशी भूमिका घ्यावयाची असते. पण ही परस्परस्वतंत्र असण्याची परिस्थिति सामुदायिक मालमत्तेवर आधारलेल्या प्राचीन समाजांत अशक्य होते. मग हा प्राचीन समाज पितृप्रधान कुटुंबसंस्थेचा असो, प्राचीन हिंदी ग्रामसंस्था असो, अथवा पेरू देशांतील 'इन्का' नांवाची राज्यसंस्था असो; अशा समाजव्यवस्थेंतील व्यक्ति आपल्या विक्रीमालाची देवघेव करूं शकत नसत. अशा जमातींच्या सरहद्दीवर प्रथम मालाचा विनिमय सुरू होई. एका जमातीचा दुसऱ्या जमातीशीं अथवा एका जमातींतील व्यक्तीचा दुसऱ्या जमातींतील व्यक्तीशीं संबंध येई तेथें विनिमय प्रथम सुरू

---

पासून घेतो तोंहि वाहणेचा वहाण याच नात्यानें उपयोग करीत असतो. पण हा उपयोग स्वाभाविक आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण वहाण ही काहीं विनिमयाच्या हेतूनें बनवलेली नाहीं."

(ॲरिस्टॉटल: डी. रिपब्लिका)

होई. मालाचा विनिमय करण्याची रूढी एकदां स्थापित झाली म्हणजे ती जमातीच्या अंतर्गत व्यवहारांतही सुरू होते. प्रथमतः वस्तूंचा विनिमय ज्या प्रमाणांत होत असतो तें प्रमाण कसेंतरी अभावितपणें ठरत असतें. दरम्यान विदेशीय उपयुक्त वस्तूंची कायम गरज हळू हळू निर्माण होऊं लागते. वरचेवर पुन्हां पुन्हां मालाचा विनिमय होऊं लागला म्हणजे ती एक मामुली सामाजिक क्रिया होते. आणि म्हणून कांहीं काळानें कांहीं माल श्रम करून केवळ विनिमयासाठींच निर्माण करणें अवश्य होऊं लागते. तेव्हांपासून उपभोगण्याकरतां उत्पन्न केलेल्या वस्तूंचा उपयोग आणि विनिमयासाठीं उत्पन्न केलेल्या वस्तूंचा उपयोग यांमधील फरक दृढावत जातो. वस्तूचें उपयोगमूल्य विनिमयमूल्यापासून भिन्न होत जातें. उलट वस्तूंचा विनियोग ज्या प्रमाणांत होतो तें प्रमाण त्यांच्या उत्पादनावर अवलंबून राहतें. रूढीनें अमुक वस्तू अमुक मूल्याची असा तिच्यावर शिक्का बसत असतो.

प्रत्येक विक्रीमालाचा मालक स्वतःची गरज भागविणारें उपयोग-मूल्य जिच्या ठिकाणीं आहे अशी वस्तु मिळविण्यासाठीं आपली वस्तु देऊन टाकण्यास उत्सुक असतो. पण तितकेंच मूल्य असलेल्या दुसऱ्या एखाद्या वस्तूशींही तो स्वतःच्या वस्तूचा विनिमय करण्यास तयार होईल. मग याच्या वस्तूचा त्या दुसऱ्या वस्तूच्या मालकाला उपयोग नसला तरी याला त्याची फिकीर वाटणार नाहीं. पण व्यव-हारांत असं घडणें अशक्य होतें. कारण आपण जो माल दुसऱ्याला देऊं त्याचा उपयोग त्या दुसऱ्याला नसल्यास ते दुसरे लोक आपली वस्तु देऊन ही निरुपयोगी वस्तू घेणार नाहींत. आणि म्हणून उपयुक्त वस्तूंचा विनिमय रूढ होणें अवश्य असेल तर अमुक वस्तु अमक्या वस्तूबदलीं मिळते एवढेंच घडणें पुरे नसून सर्व विक्रीमालांशीं ज्या एकटीचा विनिमय करतां येईल अशी वस्तु उपलब्ध झाली पाहिजे.

वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे विनिमयाचें सर्वसाधारण माध्यम उत्पन्न झालें पाहिजे.

## ‘पैशा’चा विकास

ही अडचण व ती निवारण्याची सोय दोन्ही एकदमच निर्माण होतात. व्यापार वाढूं लागला म्हणजे विक्रीमालाचे मालक निरनिराळ्या वस्तूशीं आपापल्या मालाचें मूल्य तोलत असतात. निरनिराळ्या विक्रीमालाचे मालक आपापल्या मालाचा विनिमय एका एकजिनसी मालाच्या साहाय्यानें करूं लागतात. व अशी रूढी निर्माण होते. ही एकजिनसी वस्तु अनेक इतर विक्रीमालांच्या विनिमयाचे—मर्यादित कक्षेंत कां असेना—माध्यम बनत असल्यामुळें ती वस्तु सर्वसामान्य सामाजिक विनिमयमाध्यमाचें स्वरूप धारण करतें. हें तिचें स्वरूप ज्या सामाजिक संबंधांतून निर्माण होतें, तो सामाजिक संबंध संपला म्हणजे तें स्वरूप नष्ट होतें. केव्हां हें माध्यमाचें स्वरूप एका विक्रीमालाला येतें तर पुन्हां केव्हां दुसऱ्या एखाद्याला येतें. आणि प्रत्येकाचें माध्यमत्व हें थोडा वेळ टिकत असतें. पण विनिमयाचा व्यवहार जसजसा अधिकाधिक वाढत जातो तसतसें हें माध्यमाचें स्वरूप कांहीं विशिष्ट विक्रीमालांनाच कायम राहून त्या मालांना “पैसा” हें स्वरूप दृढपणें प्राप्त होतें. पैसा हा सर्व निरनिराळ्या विक्रीमालाच्या विनिमयाचें माध्यम म्हणून सर्व विक्रीमालाच्या मालकांनीं मानलेला असतो. आणि त्याचा ते तसा नेहमीं उपयोगही करतात. अगदीं पहिल्यानें विनिमयाचें माध्यम म्हणून जी वस्तु निवडली जाते ती केवळ तवकलीनें निवडली जाते. तरीपण पुढील दोन परिस्थिति या निवडीच्या बाबतींत कांहींशा निर्णायक ठरतातच. बाहेरून आयात होणाऱ्या अतिशय महत्त्वाच्या वस्तूंना हें पैशाचें स्वरूप येत असतें. अथवा

गुराढोरासारखी स्वदेशी अतिशय महत्त्वाची आणि देवघेव करतां येण्या-सारखी जी वस्तु असेल तिला हें पैशाचें स्वरूप येतें. प्राचीन भट-कणाऱ्या टोळ्यांनीं पैसा या माध्यमाचा विकास केला. कारण त्यांची सर्व भौतिक संपत्ति जंगम मालाच्या स्वरूपांत असल्यानें तिची प्रत्यक्ष देवघेव करतां येत असे. आणि त्यांचा जीवनक्रम असा होता कीं विदेशीय जमातीशीं त्यांचा सतत संबंध येत गेल्यामुळें मालाची देव-घेव करणें त्यांच्या जीवनालाच आवश्यक असे. माणूस ज्यावेळीं गुलाम होऊं शकत असे त्याकाळीं माणसानें माणसाचा अगदीं प्राथमिक अवस्थेंत पैशासारखा उपयोग केला आहे. पण जमीनीचा मात्र या कामीं त्यानें कधींच उपयोग केलेला नाहीं. बरीचशी विकसलेली समाज-व्यवस्था म्हणजे जी भांडवलशाही तींतच ही कल्पना उत्पन्न होणें शक्य झालें. १७व्या शतकाच्या शेवटच्या ३० वर्षांत ही कल्पना प्रथम उदय पावली. आणि राष्ट्रीय प्रमाणांत ती कल्पना पहिल्यानें व्यवहारांत आणण्याचा पहिला प्रयत्न फ्रान्सच्या भांडवलशाही क्रांतींत झाला.

## पैशाचे अवश्य गुणधर्म

विनिमयाचा व्यवहार हा जितक्या प्रमाणांत स्थानिक मर्यादांचें बंधन तोडून जातो तितक्या प्रमाणांत पैशाचें स्वरूप हें सार्वत्रिक दृष्टीनें समाजोपयोगी अशा वस्तूलाच प्राप्त होऊं लागतें. या प्रकारचा माल म्हणजे मूल्यवान धातू होत. पैशाचें काम जर प्रत्येक वस्तूच्या कोणत्याही परिमाणाशीं समानता दाखवणें हें असेल, आणि त्या नात्यानें कोणत्याही मालाचें विनिमयमूल्य पैशानें दर्शविणें इष्ट असेल तर ज्या वस्तूचा कोणताही अंश मूळ वस्तूंतले गुण तसेच्या तसे दाखवूं शकेल अशी वस्तू पैशाकरतां घ्यावी लागते. उलट ज्याअर्थीं मूल्यांच्या लहानमोठ्या परिमाणांतलें अंतर हें केवळ संख्यात्मक असतें

त्याअर्थी "पैसा" याकामीं वापरण्यांत येणारी वस्तु वाटेल तितक्या प्रमाणांत विभाज्य असून हे विभागलेले तुकडे वाटेल तसे जोडताही आले पाहिजेत. सोनें आणि रूपें यांच्या ठिकाणीं स्वभावतःच हे सर्व गुणधर्म असतात.

सोनें म्हणजे पैसा अशी जरी आपणांस नेहमीं जाणीव असते आणि म्हणून दुसऱ्या सर्व प्रकारच्या मालाशीं जरी सोन्याचा विनिमय होऊं शकतो तरी पण १०पौं. वजनाचें सोनें हें किती किंमतीचें असतें हें एवढ्यावरून कळतच नाहीं. इतर कोणत्याही विक्रीमालाप्रमाणें पैसा हाही एक विक्रीमालच असून इतर मालाशीं तुलना केल्यावांचून आपल्या कोणत्याही परिमाणाचें मूल्य त्याला सांगतां येत नाहीं. हें मूल्य त्या वस्तूच्या उत्पादनाला लागणारा जो श्रमवेळ त्यावरून ठरतें. आणि ज्या दुसऱ्या कोणत्याही वस्तूच्या उत्पादनास तितकाच श्रमवेळ लागतो त्या दुसऱ्या वस्तूवरून या वस्तूचें मूल्य निर्णित होतें. जेथें या वस्तु प्रत्यक्ष निर्माण होतात तेथें त्या वस्तूंच्या ऐनजिनसी देवघेवीनेंच त्यांच्या सापेक्ष मूल्यांचें परिमाण निश्चित होतें. पैसा या नात्यानें ही वस्तु ज्यावेळीं बाजारांत अवतरून चोहोंकडे वहिवाटींत येते, त्यावेळीं तिचें मूल्य निश्चित झालेलेंच असतें.

## पैसा हा मूल्यमापक

या सर्व ग्रंथांत सोपेपणासाठीं सोनें हेंच पैसास्वरूप पावलेला विक्रीमाल असें मी धरून चालत आहें.

पैशाचें पहिलें प्रमुखकार्य म्हणजे विक्रीमालांना आपापलीं मूल्यें सांगतां येण्याचें साधन पुरवणें, आणि त्या विक्रीमालांचीं निरनिराळीं परिमाणें एकाच वस्तूच्या नांवानें दर्शविणें हें होय. पैसा या वस्तूनें

देवघेवीच्या वस्तूंच्या गुणाकडे दुर्लक्ष करून परिमाणाच्या दृष्टीनें विनिमय करावयाच्या वस्तूंची तुलना केली पाहिजे. अशा दृष्टीनें मूल्याचें सार्वत्रिक मापक होण्याचें कार्य पैसा करतो. आणि केवळ हें कार्य सोन्याला करतां येतें म्हणून सोनें हें पैसा होतें.

पैसा असतो म्हणून अनेक विक्रीमालांत सामान्यमूल्य निर्माण होऊं शकते असें नव्हे, तर उलट अनेक विक्रीमालांत समानमूल्य असतें म्हणून पैसा अस्तित्वांत येतो. प्रत्येक विक्रीमाल हा मूल्य या नात्यानें फलद्रूप झालेले माणसाचे श्रमच असतो. आणि म्हणूनच अनेक विक्रीमाल हे समानमूल्य होऊं शकतात. अमुक एका विशिष्ट मालाच्या साहाय्यानें त्यांचें मूल्य मोजतां येतें आणि म्हणून या विशिष्ट मालाला त्यांच्या मूल्यांचें मापक म्हणजे पैसा हें स्वरूप येतें. श्रमवेळ हीच वस्तूच्या अंगभूतच असते. पैसा हा या श्रमवेळेचें म्हणजे मूल्य-मापकाचें दृश्य स्वरूप होय.

## मूल्य व किंमत

एखाद्या विक्रीमालाचें मूल्य सोन्यांत सांगणें म्हणजे तें पैशांत सांगितलेलें मूल्य अथवा किंमत होय. १ टन लोखंड = २ औंस सोनें असें एक समकिरण मांडलें कीं आतां सामाजिकदृष्ट्या लोखंडाचें मूल्य रीतसर सांगितल्यासारखें होतें. म्हणजे या समीकरणानें इतर सर्व वस्तूशीं सापेक्षतेनें लोखंडाची किंमत सांगितली जाते. कारण इतर सर्व वस्तूंचें मूल्यही सोन्यांतच दर्शविलें जातें. पण पैसा या वस्तूला स्वतःला मात्र कांहीं किंमत नाहीं. नाहींतर पैशाशींच पैशाची तुलना करण्याची पाळी येईल.

वस्तूंची पैशांत सांगितलेली किंमत ही वस्तूंच्या मूल्याप्रमाणें त्यांच्या गोचर शरीरापासून भिन्न असते. म्हणून वस्तूची किंमत ही केवळ

काल्पनिक होय. पण मूल्य जरी अदृश्य असतें तरी लोखंड, रेशीम, धान्य या वस्तूंच्या अंगीं तें अस्तित्वांत असतेंच. सोन्याशीं त्याची बरोबरी दाखवून हें मूल्य काल्पनिक दृष्ट्या दृश्य केले जातें. १ टन लोखंडाचें मूल्य अथवा वेगळ्या शब्दांत सांगायचें म्हणजे १ टन लोखंडांत अंतर्भूत असलेल्या मानवी श्रमांचें परिमाण हें तितकेच श्रम अंतर्भूत असलेल्या पैसारूप पावलेल्या वस्तूच्या परिमाणावरून दर्शवावयाचें असतें.

## बाजारव्यवहाराचें स्वरूप

आतां आपण एखाद्या विक्रीमालाच्या, मालकाबरोबर, समजा रेशमी कापड विणणाऱ्या कोष्ट्याबरोबर जेथें त्याच्या मालाचा विनिमय होतो तेथें म्हणजे बाजारांत जाऊं. त्याच्या २० यार्ड कापडाला १० डॉ. ही किंमत आहे असें समजा. तो आपलें २० यार्ड कापड १० डॉ. ला विकतो. आणि नंतर तो एक जुन्या चालीचा सज्जन माणूस असल्यानें १० डॉ. किंमत देऊन कुटुंबासाठीं एक बायबल खरेदी करतो. रेशमी कापड हा या कोष्ट्याच्या दृष्टीनें केवळ एक विक्रीमाल आहे, मूल्याचा तो एक साठा आहे; हा साठा तो सोनें घेऊन दुसऱ्याला देऊन टाकतो. हें सोनें कापडाच्या मूल्याचें प्रतीक असतें. हें सोनें तो पुन्हां बायबल नांवाच्या दुसऱ्या विक्री-मालाची खरेदी करण्यासाठीं देऊन टाकतो. हें बायबल त्याच्या घरांत त्याच्या कुटुंबीयांना ज्ञानदान करणारी उपयुक्त वस्तु म्हणून प्रवेश करते. हा सर्व विनिमय-व्यवहार परस्परविरुद्ध दिसणाऱ्या पण परस्पर-पूरक अशा दोन रूपांतरांनीं घडून येत असतो. पहिल्यानें कोष्ट्याच्या विक्रीमालाचें पैशांत रूपांतर होतें. आणि मागाहून पुन्हां तो कोष्टी पैशाचें बायबलरूपी विक्रीमालांत रूपांतर करतो. कोष्ट्याच्या दृष्टीनें

विक्री आणि खरेदी या ज्या दोन गोष्टी घडतात, त्यामध्यें ऐक्य असतें. अखेर खरेदी करण्यासाठीं तो आधीं विक्री करीत असतो.

कोष्ट्याच्या दृष्टीनें या एकंदर व्यवहाराचें स्वरूप म्हणजे त्याच्या जवळचें रेशमी कापड जाऊन त्याच्या हातीं बायबल आलें हें होय. मूळच्या विक्रीमालाऐवजीं त्याच्या हातीं आतां तितक्याच मूल्याची वेगळी उपयुक्त वस्तु आलेली असते. याप्रमाणेंच तो आपली चरितार्थाचीं व धनोत्पादनाचीं साधनें स्वतःला प्राप्त करून घेत असतो. त्याच्या दृष्टीनें पाहतां त्याच्या श्रमापासून निर्माण झालेल्या वस्तु दुसऱ्या कोणाच्या तरी श्रमानें निर्माण झालेल्या वस्तू मिळविण्यासाठीं तो देऊन टाकतो, हे या सर्व व्यवहाराचें फळ असतें.

## विनिमयामुळें होणारा फरक

म्हणून वस्तूंचा विनिमय झाला म्हणजे त्यांच्या स्वरूपांमध्यें खालील प्रमाणें फरक होतो.

विक्रीमाल — पैसा — विक्रीमाल

(वि.मा.—पै.—वि.मा.)

ज्यांचा विनिमय झाला त्या विक्रीमालांच्या पुरतेंच बोलायचें तर या व्यवहाराचे स्वरूप वि. मा.—वि. मा. असें होतें. एका विक्रीमालाशीं दुसऱ्या विक्रीमालाचा विनिमय होत असतो. फलरूप झालेल्या सामाजिक श्रमाचा विनिमयाच्या साहाय्यानें हा प्रकार झालेला असतो. हें प्रसार फल पदरांत पडलें म्हणजे ही क्रिया संपते.

एक विक्रीमाल खरेदी करण्यासाठीं जो पैसा उपयोगीं पडला तो पैसा दुसरा विक्रीमाल आधीं विकून मिळवला होता.

## खरेदींतून विक्री व विक्रींतून खरेदी

आपण आतां असें गृहीत धरूं कीं ज्या १० डॉ. ला कोष्ट्यानें आपलें कापड विकलें ते १० डॉ. हें १ क्वार्टर गव्हाचें रूपांतर होय. कापडाची विक्री ( वि.मा.—पै. ) होतांच गव्हाची खरेदी ( पै—वि.मा. ) झाली. पण कापडाची विक्री ही अशा एका प्रक्रियेची आरंभीची क्रिया आहे कीं तिचा शेवट बायबलाची खरेदी यासारख्या अगदीं विरुद्ध स्वरूपाच्या व्यवहारानें होत असतो. उलट कापडाची खरेदी ही, विरुद्ध स्वरूपाच्या म्हणजे गव्हाच्या विक्रीच्या व्यवहारानें सुरू झालेली एक क्रिया संपवीत असते. वि.मा.—पै ( कापड-पैसा ) ही वि.मा.–पै.–वि.मा. ( कापड-पैसा-बायबल ) या व्यवहाराची पहिली अवस्था होय. ती पुन्हां पै—वि.मा. ( पैसा-कापड ) या स्वरूपांत दुसऱ्या एका व्यवहाराची वि.मा.—पै—वि.मा. ( गहूं-पैसा-कापड ) या व्यवहाराची अखेरची अवस्था होय. म्हणून एका विक्रीमालाचें पैशांत रूपांतर करणें म्हणजे दुसऱ्या एका विक्रीमालांत पैशाचें रूपांतर करणेंच होय. ( सोनें व रुपें प्रत्यक्ष निर्माण करणारे लोक मात्र याला अपवाद असतात. हीं माणसें आपल्या मालाचा म्हणजे सोन्यारुप्याचा विनिमय दुसऱ्या मालाशीं करीत असतात. पण हें सोनेंरुपें त्यांनीं दुसरा एखादा माल विकून मिळविलेलें नसतें तर खाणींतून काढून मिळविलेलें असतें )

उलट दिशेनेंही असेंच घडत असतें. आपल्या कोष्ट्याच्या दृष्टीनें पाहतां त्याच्या मालाचें म्हणजे कापडाचें जीवन बायबलाबरोबर संपतें. कारण कापड विकून मिळालेलें १० डॉ. खर्चून बायबल घेतलेलें असतें. पण समजा, बायबलाच्या विक्रेत्यानें त्याला मिळालेलें १० डॉ. ब्रँडी खरेदी करण्यासाठीं खर्च केले. येथें पै.—वि.मा. ही जी वि.मा-पै.-वि.मा.

( कापड—पैसा—बायबल ) या व्यवहाराची शेवटची अवस्था ती स्वतः पुनः वि.मा.-पै-वि.मा. ( बायबल-पैसा-ब्रँडी ) या दुसऱ्या व्यवहाराची पहिली अवस्था असते. एका विशिष्ट मालाच्या उत्पादकाजवळ तेवढाच माल विक्री करण्यासाठीं असतो. हा माल तो बहुधा खूप परिमाणांत विकत असतो. पण त्यापासून त्याला जी किंमत येते त्या किंमतीचें विभाग पाडून त्याला त्या विभागाच्या साहाय्यानें अनेक वस्तूंची खरेदी करावी लागते. आणि म्हणून एका मालाच्या विक्रीपासून विविध मालांची खरेदी निर्माण होते. एका विक्रीमालाचें अगदीं अखेरचें जें रूपांतर असतें तें दुसऱ्या अनेक मालांचें पहिलें रूपांतर असतें.

प्रत्येक विक्रीमालानें आपली विक्री व त्यामागून होणारी दुसऱ्या विक्रीमालाची खरेदी याशीं जें वर्तुळ बनविलेलें असतें तें दुसऱ्या अनेक विक्रीमालांच्या वर्तुळांत गुंतलें असतें. तें वेगळें काढतां येऊं शकतच नाहीं. अशा सर्व वर्तुळांची बेरीज म्हणजेच विक्रीमालांचा प्रसार व त्यांची समाजांत वाटणी होय.

## पैशानें होणाऱ्या विनिमयाचें वैशिष्ट्य

विक्रीमालांचा याप्रकारें जो प्रसार होत असतो तो प्रत्यक्ष मालाच्या ऐनजिनसी विनिमयाहून केवळ बाह्य रूपांत भिन्न नसतो तर त्याचें मर्मही वेगळें असतें. घडणाऱ्या घटनांचा केवळ अनुक्रम पाहिला तरी ही गोष्ट कळून येईल. कोष्ट्यानें खरोखर आपला माल असें जें कापड तें, दुसऱ्याचा माल म्हणजे जें बायबल, त्याच्या बदली देऊन टाकलें. पण या व्यवहाराचा हा अर्थ त्याच्यापुरता खरा आहे. बायबलाचा विक्रेता हा बायबलापेक्षां स्वतःच्या पोटाला उबारा देईल अशी वस्तु अधिक पसंत करतो. या बायबलाच्या विक्रेत्यानें आपण बायबलाचा विनिमय

कोष्ट्याच्या कापडाशीं केला आहे हा मुद्दा कल्पनेंतही कधीं आणला नाहीं. तसेंच कोष्ट्यानें आपल्या कापडाचा विनिमय गव्हाशीं झाला आहे ही कल्पना कधींच मनांत आणली नाहीं. 'ब' चा विक्रीमाल 'अ' च्या विक्रीमालाची जागा घेत असतो. पण 'अ' आणि 'ब' हे कांहीं आपापल्या मालांचा आपसांतच विनिमय करीत नाहींत. विक्रीमालांचा विनिमय या प्रकारें झाला असता तो ऐनजिनसी देवघेवींत, अपरिहार्यपणें येणारी सर्व स्थानिक व वैयक्तिक बंधनें तटातट तोडून टाकतो, आणि सामाजिक श्रमापासून उत्पन्न झालेल्या विक्रीमालांचा प्रसार वाढवीत नेतो हें दिसून येतें. तसेंच सामाजिक संबंधांचें सगळेंच्या सगळें जाळें या प्रकारच्या विनिमयामुळें विनिमय करणाऱ्यांच्या नियंत्रणाच्या पलीकडे जातें, हीही गोष्ट येथें लक्षांत येते. शेतकऱ्यानें आपले गहूं विकले म्हणूनच केवळ कोष्ट्याला आपलें कापड विकतां आलें, कोष्ट्यानें आपलें कापड विकलें म्हणूनच बायबल विकणाऱ्याला बायबल विकतां आलें, या बायबल विकणाऱ्यानें अमरत्व देणारें हें तीर्थ ( बायबल ) विकलें म्हणूनच त्याला दारू गाळणाऱ्याकडून दारू विकत मिळूं शकली; इत्यादि याप्रकारें हा मालाचा प्रसार होत असतो.

## पैशाची व्यवहारांतील नित्यता

म्हणून ज्याप्रमाणें ऐनजिनसी देवघेवीचा व्यवहार उपयोगमूल्यांनीं आपल्या जागा व मालक बदलले असतां निकालांत निघतो त्याप्रमाणें हा अप्रत्यक्ष विनिमयाचा व्यवहार एवढ्यावर संपत नाहीं. या विनिमयामध्यें पैसा हा जो माध्यम म्हणून शिरत असतो तो विक्रीमालांच्या रूपांतरांचें चक्र संपून ( बाहेर निघाला ) म्हणजे नाहींसा होत नाहीं, विनिमय-व्यवहारानें विक्रीमाल अनेकांच्या हातांतून जात असतां

वेळोवेळीं विक्रीमालांनीं रिकाम्या केलेल्या जागा भरून काढण्यां-साठीं पैशाला भराभर धांवावें लागतें. उदा. कापडाचें पूर्ण रूपांतर कापड, पैसा, बायबल, या प्रकारें झालें. त्यावेळीं पहिल्यानें कापड विनिमयव्यवहारांतून कायमचें नाहींसें झालें. त्याची जागा पैशानें घेतली. नंतर बायबल विनिमयव्यवहारांतून नाहींसें झालें. आणि पुन्हां पैशानें त्याची जागा पकडली. ज्यावेळीं एक विक्रीमाल दुसऱ्या विक्रीमालाची जागा घेत असतो त्यावेळीं पैसा हा विक्रीमाल तिसऱ्याच कोणाचा तरी हात पकडून बसतो. घाम ज्याप्रमाणें शरीराच्या छिद्रां-छिद्रांतून बाहेर येतो त्याप्रमाणें विक्रीमालाच्या विनिमय व्यवहाराच्या प्रत्येक छिद्रांतून पैसा निसटून बाहेर येत असतो.

## चलनव्यवहार म्हणजे काय

पैसा हा विक्रीमालांच्या विनिमयव्यवहारांचा मुनीम आहे. या नात्यानें तो विनिमयव्यवहारांचें माध्यम म्हणून काम करीत असतो. कोणत्याही श्रमोत्पन्न मालाची विक्रीच्या व्यवहारानें होणारी हालचाल ही वि.मा–पै.–वि.मा. अशी वर्तुळाकार असते. कारण एका विक्रीमालाच्या स्वरूपांतील मूल्यानें ही प्रक्रिया सुरू होते, आणि दुसऱ्या विक्रीमालाच्या तितक्याच मूल्यानें ती प्रक्रिया संपते. उलट पैशाचा प्रवास हा मात्र वर्तुळाकार असत नाहीं. आणि होणें शक्यही नाहीं. व्यवहारामध्यें पैसा जेथून निघतो तेथें पुन्हां परत येत नाहीं. तर निघण्याच्या बिंदूपासून तो दूर दूर जात असतो. जोंपर्यंत विक्रेता हा आपल्या पैशालाच चिकटून राहतो तोंपर्यंत, हा पैसा म्हणजे त्याच्या विक्रीमालाचें रूपांतरच असल्यामुळें त्याच्या विक्रीमालाचें कार्य अर्धेंच होऊन बसतें. पण जेव्हां तो आपल्या विक्रीमालाचें कार्य परिपूर्ण करतो म्हणजे मिळालेल्या पैशांनीं कांहीं विक्रीमाल खरेदी

करतो तेव्हां त्याच्या हातीं आलेला पैसा आपली जागा सोडून निघून जातो. कोष्टयानें बायबल खरेदी केल्यानंतर आणखी कापड विकलें असतें तर त्याच्या हातीं पैसा परत आला असता हें खरें, पण हा पैसा परत येणें ही गोष्ट पहिले २० यार्ड कापड विनिमयव्यवहारांत ढकललें म्हणून झाली असें नव्हे. पहिल्या व्यवहारानें कोष्टयाच्या हातीं आलेला पैसा बायबल विकणाऱ्याच्या हातीं गेला. कोष्टयानें आपला आणखी माल जेव्हां विनिमयव्यवहारांत ढकलला तेव्हां त्याच्या हातीं पुन्हां पैसा आला. पण ही नवी विनिमयक्रियाही पूर्वीच्या विनिमय क्रियेप्रमाणेंच संपणार. म्हणून विक्रीमालांच्या विनिमयव्यवहारामुळें पैशाला प्रत्यक्षपणें जी गती मिळते ती गति त्याला सुरवातीच्या बिंदूपासून एकसारखी दूरदूर नेत असते. अर्थात् एका विक्रीमालाच्या मालकाच्या हातून तो दुसऱ्या विक्रीमालाच्या मालकाच्या हातीं जातो. यालाच पैशाचा चलनव्यवहार म्हणतात.

## खरेदीविक्रींतील पैशाचा प्रवास

पैशाच्या गतीचें हें जें एकांगीं स्वरूप दिसतें तें विक्रीमालाच्या गतीच्या दोनअंगीं व्यवहारामुळें उत्पन्न होतें, ही गोष्ट चटकन लक्षांत येत नाहीं. विक्रीमालाच्या विनिमयव्यवहाराचा स्वभावच असा असतो कीं त्याचें स्वरूप वास्तविक असतें त्याच्या उलटें दिसत असतें. विक्रीमालाचें पहिलें रूपांतर (वि.मा.—पै.) ही कांहीं केवळ पैशाचीच गती नसून तो विक्रीमालाचाही प्रवास आहे हें उघड दिसतें. उलट दुसऱ्या रूपांतरांत (पै.—वि.मा.) आपणांला फक्त पैशालाच प्रवास घडला असें दिसतें. विनिमय व्यवहाराच्या पहिल्या अवस्थेंत विक्रीमाल हा पैशाची जागा घेतो. आणि नंतर विक्रीमाल हा उपयुक्त वस्तु या नात्यानें उपभोगाच्या क्षेत्रांत जात असल्यानें विनिमयव्यवहारांतून तो

अजिबात बाहेर पडतो. (विक्रीमालाची विक्री लागोपाठ एकसारखी होत चालली असली तरी शेवटच्या विक्रीनंतर तो विक्रीमाल विनिमयव्यवहारांतून बाहेर पडून उपभोगाच्या क्षेत्रांत जातो.) विनिमय-व्यवहारांतून बाहेर गेलेल्या विक्रीमालाच्या जागी आतां आपल्याला त्याचें मूल्यरूप म्हणजे पैसा हें मिळालेलें असतें. नंतर हें मूल्य विनिमयव्यवहाराच्या दुसऱ्या अवस्थेंत शिरतें. अर्थात् यावेळीं त्यानें सोन्याचें रूप धारण केलेलें असतें. याप्रमाणें विनिमयव्यवहाराचें सातत्य फक्त पैशानेंच कायम टिकविलेलें असतें. आणि जो प्रवास केवळ विक्रीमालाच्या दृष्टीनें पाहतां परस्पर-विरुद्ध अशा दोन दिशांनीं झालेला दिसतो तो पैशाच्या दृष्टीनें पाहतां एकच प्रवास दिसतो. हा पैसा नव्या नव्या विक्रीमालांच्या नव्या नव्या जागा एकीमागून एक पकडीत असतो. आणि म्हणून विक्रीमालांच्या विनिमय-व्यवहारानें म्हणजे एका विक्रीमालाच्या जागीं दुसरा विक्रीमाल आल्यानें जो परिणाम घडत असतो तो विक्रीमालांच्या रूपांतरानें घडतोसा दिसत नसून पैशाच्या कर्तृत्वानें घडतो असें दिसतें. विक्रीमाल हा जणू कांहीं आपल्यापरीं पूर्ण गतिहीन आहे आणि पैसाच केवळ त्यांना गति देतो असें दृश्य उत्पन्न होत असते. विक्रीमालाला पैशाकडून ही जी गति मिळत असते ती पैसा हा स्वतः एका दिशेनें जातो तर विक्रीमालाला दुसऱ्या दिशेनें ढकलतो अशी मिळते. म्हणून जरी पैशाचा प्रवास हा केवळ विक्रीमालांच्या विनिमय-व्यवहाराचें व्यक्त स्वरूप आहे तरी पण विक्रीमालाचा विनिमयव्यवहार हा केवळ पैशाच्या प्रवासामुळें होतो असें वाटत असतें.

प्रत्येक विक्रीमाल हा जेव्हां विनिमय-व्यवहारांत पहिलें पाऊल टाकतो आणि आपलें पहिलें रूपांतर करून घेतो त्यावेळीं तो विनिमय व्यवहारांतून बाजूला जाऊन दुसऱ्या मालाला आपली जागा देतो.

उलट पैसा हा विनिमय व्यवहाराचें माध्यम या नात्यानें नेहमीं विनिमय-व्यवहाराच्या क्षेत्रांतच फेऱ्या घालीत राहतो. म्हणून या विनिमय-क्षेत्रामध्यें नेहमीं पैसा किती रहात असतो हा प्रश्न येथें उत्पन्न होतो.

## विनिमयव्यवहारांत पैशाचें आवश्य परिमाण

कोणत्याही राष्ट्रांत कोणत्याही एका विशिष्ट काळीं दररोज विक्रीमालांचें अनेक क्रयविक्रय होत असतात. आणि आपण विचार करीत आहोंत त्या विनिमय व्यवहारांत पैसा व विक्रीमाल हे ज्याअर्थी प्रत्यक्षपणें समोरासमोर येत असतात, त्याअर्थीं सर्व विक्रीमालांच्या किंमतीइतका पैसा विनिमयव्यवहाराच्या क्षेत्रांत विनिमय साधन म्हणून असला पाहिजे हें आगाऊच ठरलेलें असतें. जर सोन्याच्या मूल्यांत चढ अथवा उतार झाल्यानें एकंदर विक्रीमालाच्या किंमती अनुक्रमें उतरल्या अथवा वाढल्या तर चलनव्यवहारांत असलेल्या पैशाचें परिमाण तितक्याच प्रमाणांत उतरलें पाहिजे अथवा चढलें पाहिजे. सोनें व रुपें यांच्या नव्या साठ्याचा शोध लागल्यामुळें जे परिणाम घडले त्याचे १७व्या शतकांतील कांहीं अर्थशास्त्रज्ञांनीं विशेषतः १८वे शतकांतील अर्थशास्त्रज्ञांनीं एकांगीं निरीक्षण केल्यानें सोनें व रुपें यांची चलनांत वाढ झाल्यामुळें विक्रीमालांचे बाजारभाव वाढले असें चुकीचें अनुमान या अर्थशास्त्रज्ञांनीं काढलें. वस्तुस्थिति अशी होती कीं सोनें व रुपें काढणें अधिक सोपें झाल्यानें त्यांचें मूल्य उतरलें. अर्थात त्याप्रमाणांत मालांच्या किंमती वाढल्या. आणि अधिक किंमतीच्या मालाला विनिमय व्यवहारासाठीं अधिक पैसा लागूं लागला. यापुढें आपण सोन्याची किंमत अमुक इतकी निश्चित आहे असें धरून चालूं.

आतां आपण आणखी असें धरून चालूं कीं प्रत्येक विक्रीमालाची किंमत ही निश्चित आहे. अर्थात विनिमय–व्यवहारांत जितका विक्री-माल असेल त्यावरून एकंदर विक्रीमालाच्या किंमतींची बेरीज ठरेल. जर १ क्वार्टर गव्हाला १० डॉ. पडले, तर १०० क्वा. गव्हाला १००० डॉ. पडतील, २०० क्वा. गव्हाला २००० डॉ. पडतील. इत्यादि; आणि गव्हाची जागा घेणारा पैसा गव्हाचें परिमाण वाढलें म्हणजे वाढत गेला पाहिजे. एवढें साधें गणित कळण्याला मेंदूला शीण देण्याची मुळींच गरज नाहीं.

विक्रीमालांचें एकूण परिमाण जर कायम राहिलें तर त्या मालांच्या किंमतींच्या चढउतारांच्या प्रमाणांत विनिमयव्यवहारांतील पैशाचें प्रमाण बदलत असतें. विक्रीमालांची किंमत बदलली, म्हणजे वाढली अथवा कमी झाली तर त्याबरोबर पैशाचें परिमाण वाढतें अथवा कमी होतें. विक्रीमालांच्या किंमतींत होणारा फरक हा त्यांच्या मूल्यांत होणाऱ्या फरकामुळें होवो, अथवा बाजारभावांत होणाऱ्या घालमेलीमुळें होवो, विनिमय-व्यवहारांतील पैशाच्या परिमाणावर या किंमतीच्या पालटाचा होणारा परिणाम सारखाच असतो.

एकाच वेळीं होणाऱ्या क्रयविक्रयासंबंधानें हा नियम खरा आहे. पण लागोपाठ होणाऱ्या क्रयविक्रयासंबंधानें मात्र खरा नव्हे.

उदा. पुढील प्रकारचे विक्रीमाल एकदम विकले गेले आहेत असे समजा. १ क्वा. गहूं, २० यार्ड कापड, १ बायबल, आणि ४ ग्या. ब्रँडी. यांतील प्रत्येक मालाची किंमत जर १० डॉ. असेल तर ४० डॉ. विनिमय व्यवहारांत ढकलले गेले पाहिजेत हें उघड आहे. पण उलट वर सांगितलेले हेच विक्रीमाल पुढीलप्रमाणें रूपांतरांच्या साखळींतलें अनुक्रमानें दुवे आहेत असें समजाः–१ क्वा. गहूं–१० डॉ.–२० यार्ड कापड–१० डॉ.–१ बायबल–१० डॉ.–४ ग्या. ब्रँडी–१० डॉ. ही

साखळी आपण वर पाहिलीच आहे. या साखळींत १० डॉ. हे एकूण ४ दां प्रवास करतात. यामुळें ४० डॉ. ऐवजीं त्यांचा $\frac{1}{4}$ म्हणजे १० डॉ. एवढाच पैसा चार विक्रीमालांच्या एकामागून एक अशा होणाऱ्या विनिमयव्यवहारास लागतो. अमुक एका वेळांत एकच रक्कम जितके अधिक प्रवास करील,—याचाच अर्थ, चलनाचा वेग जितका अधिक असेल—तितकी विनिमयव्यवहाराला पैशाची रक्कम कमी लागते. म्हणून विनिमयव्यवहाराचें माध्यम या नात्यानें लागणाऱ्या पैशाच्या विशिष्ट नाण्यांचें परिमाण हें एकूण विक्रीमालांच्या किंमतीच्या बेरजेला त्या नाण्याकडून होणाऱ्या प्रवासांच्या संख्येनें भागलें असतां येणाऱ्या भागाकाराइतकें असतें.

$$\frac{\text{विक्रीमालांच्या किंमतींची बेरीज}}{\text{विशिष्ट नाण्यांच्या प्रवासांची संख्या}} = \text{विनिमयव्यवहारांत माध्यम या नात्यानें असणाऱ्या पैशाच्या नाण्यांचें परिमाण.}$$

सामान्यतः हा सिद्धांत खरा ठरतो. म्हणून नाण्यांनीं आपापल्या परी केलेल्या सर्व प्रवासांची बेरीज जर वाढली तर विनिमयव्यवहारांतील त्यांची एकूण संख्या कमी होत असतें. जर त्यांचे प्रवास कमी झाले तर त्यांची संख्या वाढत असते. चलनाचा सरासरी वेग मध्यम मर्यादेत असतांना चलनाचें परिमाण विनिमयव्यवहारांत अमुक इतकें असावें लागतें, असें ठरवितां येत असल्यामुळें अमुक इतकी "५–डॉ." नाणीं काढून घेऊन व तितक्या संख्येच्या ५ डॉलरांची खरेदीविक्रीबिलें व्यवहारांत सोडून काम भागवितां येते. सगळ्या बँकवाल्यांना ही युक्ति परिचयाची आहे.

ज्याप्रमाणें पैशाचा विनिमयव्यवहारांत होणारा प्रसार हा विक्रीमालांच्या विनिमयव्यवहारांचा परिणाम व त्यांचें प्रतिबिंब असतो,

त्याचप्रमाणें पैशाच्या प्रवासाचा जो वेग तोही विक्रीमालांच्या विनिमयव्यवहाराच्या वेगाचें प्रतिबिंब असतो. या उलट सिद्धांत मात्र खरा नव्हे. विनिमयव्यवहारांत पैशाचा प्रवास जर खुंटला तर विक्रीमालाचा व्यवहार खुंटल्याचें तें लक्षण असतें. हा व्यवहार कां खुंटला हें नुसत्या विनिमय–व्यवहारावरून कळत नाहीं. सामान्य लोकांना चलन कमी झालें म्हणजे पैशाचे व्यवहार कमी झालेले दिसतात. त्यामुळें त्यांना माध्यम या नात्यानें विनिमयव्यवहारांत राबणारा पैसाच कमी झाला आहे असें वाटत असतें. *

अमुक एका काळांत विनिमयव्यवहाराचें माध्यम या नात्यानें पैशाचें परिमाण किती असावें हें विनिमयव्यवहारांत आलेल्या एकूण विक्रीमालांच्या किंमतींची बेरीज आणि त्या विक्रीमालांच्या विनिमय-व्यवहारांचा वेग यावरून ठरत असते. पण विनिमयव्यवहारांत असलेल्या एकूण विक्रीमालांच्या किंमतींची बेरीज ही मालांचें एकूण परिमाण तसेंच व्यक्तिशः प्रत्येक मालाची किंमत यावरून ठरत असतें. किंमतींची परिस्थिति, विनिमयव्यवहारांतील विक्रींचें परिमाण आणि पैशाच्या चलनाचा वेग या सर्वांमध्यें निरनिराळ्या प्रमाणांत बदल होत असून एकांतला कमीपणा दुसऱ्याच्या अधिकपणानें भरून निघत असतो. म्हणून दीर्घकाळाचा विचार केला असतां विनिमयव्यवहारांतील पैशाच्या परिमाणाची जी सरासरी असते तीहून पैशाचें परिमाण

* विक्रीमालांची उत्पत्ति आणि त्यांचा विनिमयव्यवहार कमी झाला असत त्याचें कारण माध्यम या नात्यानें वावरणारा पैसा अपुरा पडला हें आहे असें जें लोकास वाटत असतें तो त्याचा भ्रम होय. तरीपण चलननियंत्रणव्यवहारांत कायद्यानें हस्तक्षेप केल्यास विनिमय व्यवहारांत मंदी येऊं शकतें हें निःसंशय खरें आहे.

फारसें कमी किंवा फारसें अधिक सहसा होत नाहीं. अर्थात औद्योगिक आणि व्यापारी संकटांचे काल हे मात्र अपवाद होत.

## पैशाच्या परिमाणावरून किंमती ठरतात काय

विनिमयव्यवहारांत असलेल्या पैशाच्या परिमाणावरून मालांच्या किंमती ठरतात आणि देशांत सोनें रुपें या मूल्यवान धातूंचें एकंदर परिमाण किती असतें यावरून पैशाचें परिमाण ठरतें ही दोन्ही मतें चुकीचीं होत. ज्यांचें असें मत होतें त्यांचें तें मत बनण्याचें कारण पैसा जेव्हां बाजारांत येतो तेव्हां त्याला मूल्य नसतें आणि विक्रीमाल बाजारांत येतो तेव्हां त्याला किंमत नसतें असा त्यांचा चुकीचा समज होता हें होय. तसेंच मूल्यवान धातु व विक्रीमाल एकदां बाजारांत आले म्हणजे अमुक इतक्या विक्रीमालाला अमुक इतक्या मूल्यवान धातु मिळूं शकतात असाही एक त्यांचा चुकीचा समज होता.

## नाणें व त्यांतील धातु

पैसा हा नाण्याचें रूप घेतो त्याचें कारण तो विनिमयव्यवहाराचें माध्यम म्हणून वावरावा लागतो हें होय. विक्रीमालांच्या किंमतींचें प्रतीक म्हणून आपण सोन्याचें अमुक एक वजन जें मनांत धरत असतों तें प्रत्यक्ष नाण्याच्या स्वरूपांत अथवा अमुक इतक्या मापाच्या सोन्याच्या तुकड्याच्या स्वरूपांत विक्रीमालाच्या समोर येऊन बसावें लागतें. म्हणून नाणें व सोन्याची लडी यांमध्यें जो फरक असतो तो फक्त आकाराचा असतो. सोनें हें एका आकारांतून दुसऱ्या आकारांत केव्हांही जाऊं शकतें. पण सोनें हें टांकसाळींतून नाणें या रूपांत बाहेर पडतें न पडतें तोंच वितळण्याऱ्या कढईच्या रस्त्यालाही तें लागतें. नाणीं व्यवहारांत वावरूं लागलीं म्हणजे कमी

अधिक प्रमाणांत झिजत असतात. जेवढ्या वजनाच्या नाण्याला अमुक एक नाणें म्हणून नांव दिलेलें असतें त्याचे तें वजन हळूहळू प्रत्यक्ष व्यवहारांत कमी होतें आणि नांव मात्र कायम राहतें. म्हणून एकाच नावाच्या नाण्यांचीं मूल्यें प्रत्यक्ष व्यवहारांत कमी अधिक होत असतात. कारण त्यांची झीज कमी अधिक झाल्यामुळें त्यांचीं वजनेंही कमीअधिक होतात. यामुळें सोनें हे ज्या वस्तूंची किंमत म्हणून मानलें जातें त्याचें तें खरोखर समानद्रव्य म्हणून राहूं शकत नाहीं. म्हणून नाणीं हीं प्रत्यक्ष आरंभीं ज्या वजनाचीं असतात व म्हणून त्यांना जें नांव दिलें जातें त्या वजनाचें तें फक्त प्रतीक म्हणून धरून चालण्याकडे विनिमयव्यवहाराची प्रवृत्ति असते. या वस्तुस्थितींतच, अजिबात धातूचीं नाणीं रद्द करून त्याच्या जागीं तेंच काम करणारी दुसरी कांहीं तरी वस्तु येण्याचा संभव अंतर्भूत आहे. सोनें व रुपें यांची अगदीं लहान किंमतीचीं नाणीं पाडण्याचें कामीं स्वाभाविकपणेंच फार अडचणी येतात. अगदीं आरंभीं कमी किंमतीच्या धातु याच मूल्यमापनासाठीं घेतल्या जात. पहिल्यानें तांबें घेतलें जाई. पुढें सोन्याच्या आधीं रुपें हें मूल्यमापक झालें. सोनें हें या कामावर शेवटीं लागलें. अधिक मूल्यवान धातु चलन म्हणून वापरूं लागल्यावर कमी मूल्यवान धातु चलन म्हणून मागें पडतें. या सर्व वस्तुस्थितीवरून चांदी, तांबें वगैरे धातूंनीं इतिहासकाळांत सोन्याच्या नाण्याचें कार्य केलें आहे असें दिसून येतें. ज्या मुलुखांत नाणीं भराभर लोकांच्या हातांतून खेळत राहतात आणि त्यांची झीज विशेष प्रकारें होते अशा मुलुखांत सोन्याऐवजीं चांदी आणि तांबें यांचीं नाणीं व्यवहारांत फार असतात. अगदीं लहान प्रमाणावर जेथें खरेदीविक्रीचा व्यवहार सतत चालू असतो तेथेंच ही गोष्ट विशेष घडते. चांदीनें व तांब्यानें कायमपणेंच सोनेंनाण्याचें उच्चाटन करूं नये

त्यासाठीं कायदे करून अमुक इतक्या परिमाणापेक्षां कमी चांदी व तांबें असलेलीं नाणीं असावीं असें ठरवून देण्यांत येतें.

## पैसा हा प्रतीक आहे

चांदी व तांबें यांची मर्यादित परिमाणांतलीं हीं नाणीं केवळ खुणेदाखल (टोकन्) असतात. तीं अमर्यादपणें कायदेशीर चलन नव्हेत. नाण्यांत त्यांचें वजन किती असावें हें कायद्यानें कांहीं तरी ठरवून दिलेलें असतें. चलनव्यवहारांत त्यांची झीज सोनें नाण्यापेक्षांही जलद होत असतें. म्हणून चलनव्यवहारांत त्यांच्या हातून जें कार्य होत असतें त्याचा त्यांच्या स्वतःच्या वजनाशीं अगर मूल्याशीं कांहींच संबंध नसतो. सोनें नाण्याचें विनिमयमाध्यम म्हणून जें कार्य होत असतें तें त्या नाण्यांत असलेल्या सोन्याच्या मूल्यापासून पूर्ण स्वतंत्रपणें होत असतें. आणि म्हणूनच कागदीं नोटासारख्या ज्या वस्तु जवळ जवळ बिनमोल असतात त्याही नाण्यांची जागा घेऊं शकतात. पैसा हें खरोखर एक प्रतीक आहे. त्याचें हें प्रतीकत्व धातूच्या नाण्यांत कांहींसें प्रच्छन्न असतें, तर कागदी पैशांत अगदीं उघड दिसत असतें.

येथें आम्ही फक्त ज्याचा विनिमयव्यवहारांत स्वीकार केला पाहिजे अशी सक्ति असते अशा कागदी पैशासंबंधानेंच बोलत आहों. हा कागदी पैसा मुळांत धातूच्या नाण्याच्या कल्पनेंतूनच निघाला. पण सरकारी कागदी पैशाखेरीज खासगी पतीवर आधारलेला जो कागदी पैसा असतो तो विशिष्ट परिस्थितीवर आधारलेला असतो. त्याची चर्चा यावेळीं आम्हीं करण्याचें टाळलें आहे.

## धातूचें चलन व कागदी चलन

सरकार कागदाच्या तुकड्यावर ५ डॉ. २० डॉ. असे वेगवेगळ्या गणनेचे छाप मारून त्यांना विनिमयव्यवहारांत ढकलीत असते.

जितक्या प्रमाणांत हे कागदी तुकडे त्यावर छापलेल्या किंमतीइतक्या सोन्याची जागा घेतात तितक्या प्रमाणांत पैशाच्या व्यवहाराचें नियंत्रण ज्या नियमांनीं होतें त्याच नियमांनीं या कागदीं पैशाचेंही होतें. कागदीं पैसा जितक्या सोन्याचें प्रतीक असतो त्या सोन्याच्या प्रमाणावरूनच त्या कागदीं पैशाच्या विनिमयव्यवहाराचा नियम ठरत असतो. असा नियम अगदीं सोप्या शब्दांत पुढील प्रमाणें सांगतां येईल. 'सोन्याचीं हीं कागदीं प्रतीकें विनिमयव्यवहारांत न ढकलतां जर सोनेंच स्वतः ढकललें तर जितकें सोनें विनिमयव्यवहारास लागेल त्याहून अधिक कागदी पैसा व्यवहारांत सोडतां कामा नये.' आतां विनिमयव्यवहाराला एकूण सोन्याच्या परिमाणाची जी सरासरी अवश्य असते त्या सरासरी रेषेच्या केव्हां थोडें खालीं, केव्हां थोडें वर प्रत्यक्ष व्यवहारांतल्या सोन्याचें परिमाण जात असतें. पण अमुक एका देशांत सरासरीच्या खालीं हें परिमाण ज्या बिंदूपर्यंत जातें तो अखेरचा बिंदु अनुभवानें सहज ताडतां येईल. हें जें विनिमय-व्यवहारास लागणाऱ्या सोन्याचें कमींत कमी परिमाण, त्या परिमाणांत असलेलीं नाणीं वरचेवर झिजून कमी होत असतात व त्यांच्या जागीं नवीं येत असतात. म्हणजे हें कमींत कमी परिमाणहि वरचेवर बदलत असतें.तरीपण त्यामुळें विनिमयव्यवहाराचें सातत्य कांहीं बिघडत नाहीं. आणि म्हणून या सोन्याच्या पैशाऐवजीं त्याचीं कागदी प्रतीकें वापरांत आणणें शक्य होतें. उलट जर विनिमयव्यवहाराचे सर्व प्रवाह आज कागदी चलनानें पूर्ण भरून टाकले तर विनिमयव्यवहारांतील विक्रीमालांच्या परिमाणांत अकस्मात चढउतार झाल्यामुळें हा कागदी पैसा गरजेहून अधिक होऊन अगदीं वाहून जाऊं लागेल. त्यामुळें मग मूल्यमापक असें प्रमाण कांहींच राहणार नाहीं. कागदी पैशानें आपली मर्यादा जर उल्लंघिली तर म्हणजे प्रत्यक्ष व्यवहारांत त्या कागदी पैशावर छापलेल्या किंम-

तीचीं सोन्याचीं नाणीं जितकीं लागतील त्याहून अधिक कागदी पैसा होईल तर त्या कागदी पैशाची नापत तर होईलच, शिवाय विक्री-मालांच्या विनिमय-व्यवहारास जितकें सोनें नाणें लागेल तितक्या किंमतीचाच एकूण तो कागदी पैसा आहे असें मानलें जाईल. त्या सर्व कागदी पैशावर छापलेली एकूण किंमत कितीही अधिक असली तरी तितकी ती मानली जाणार नाहीं. समजा चलन-व्यवहारास जितका पैसा हवा त्याहून दुप्पट कागदी चलन झालें तर तशा स्थितींत ५डॉ. हें नांव पाव औंस सोन्यास न मिळतां अर्धा-पाव औंस सोन्यास दिलें आहे असें लोक मानतील. पूर्वीं जीं मूल्यें ५ डॉ. नीं व्यक्त केलीं जात तीं आतां यापुढें १० डॉ. नीं व्यक्त होऊं लागतील.

## धनसंचय हा पैशाचा उपयोग

विक्रीमालांच्या विनिमयव्यवहाराच्या अगदीं आरंभापासूनच, आपल्या मालाचें जें पहिलें रूपांतर तें पकडून ठेवण्याची गरज व तीव्र वासनाही उत्पन्न झाली. आणि म्हणून विक्रीमाल हा दुसऱ्या मालाच्या खरेदीसाठीं विकला न जातां त्याचें पैशांत रूपांतर करण्यासाठीं विकला जाऊं लागला. यामुळें पैसा हा विनिमय-व्यवहार करण्याचें केवळ साधन असतां मालाचें पैशांत रूपांतर करणें हें विक्रीव्यवहाराचें ध्येयच होऊन बसलें. पैसा हा साठ्याच्या रूपांत घट्ट होऊन बसूं लागला आणि मालविक्री करणारा हा पैशाचा संचयकार झाला.

विक्रीमालाचा विनिमय-व्यवहार सुरू झाल्याच्या आरंभीं आरंभीच्या दिवसांत भोगून उरलेल्या उपयुक्त वस्तूंचा पैसा केला जात असे. म्हणून सोनें व रुपें यांचें अस्तित्व हेंच गरजेहून अधिक असलेल्या संपत्तीचें सामाजिक निदर्शक होऊं लागलें.

## सोनें रुपें साठविण्याची प्रवृत्ति

विक्रीमालाचें उत्पादन उत्तरोत्तर जसें अधिक होऊं लागलें तसतसें विक्रीमालाच्या उत्पादकाला माल खरेदी करतां येण्याचें जें सामाजिक अभिवचन म्हणजे सोनें तें आपल्या कबजांत ठेवणें भाग पडूं लागलें. त्याच्या गरजा त्याला नेहमीं जाणवूं लागत तसतसा इतरांचा विविध विक्रीमाल त्याला खरेदी करावा लागे. त्याच्या जवळच्या मालाच्या उत्पादनांत त्याचा बराच वेळ गेलेला असे, आणि त्या मालाच्या विक्रीसाठीं त्याला बराच वेळ लागून हें उत्पादन व ही विक्री विशिष्ट परिस्थितीवरही अवलंबून असत. म्हणून नित्यव्यवहारास ज्या विक्रीमालांची खरेदी त्याला करावी लागे तीसाठीं त्यानें पूर्वी केव्हांतरी खरेदी मुळींच न करतां नुसती विक्रीच केलेली असली पाहिजे; म्हणजे त्यानें सोन्याचा अथवा रुप्याचा माल विक्रीच्या साधनानें संचय केलेला असला पाहिजे. या प्रकारें विनिमयाच्या सर्व व्यवहारांत सोन्यारुप्याचे संचय कमीअधिक प्रमाणांत नेहमीं होत असतात. विनिमय-मूल्य अमुक एका विक्रीमालाच्या स्वरूपांत साठवून ठेवतां येण्याच्या शक्यतेमुळें सोन्याबद्दलचा लोभ जन्म पावतो. विनिमयव्यवहार वाढत जात असतां पैशाचें सामर्थ्यही वाढतें. एखाद्या विक्रीमालाचा मालक अगदीं रानटी माणूस असो, अथवा पश्चिम युरोपांतला शेतकरी असो त्याच्या दृष्टीनें मूल्य हें मूल्याचें प्रतीक अशी जी वस्तु तद्रुपच असतें. आणि म्हणून सोनें आणि रुपें हें जें मूल्याचें स्वरूप त्याचा साठा वाढविणें म्हणजेच मूल्य-संचय वाढविणें असें त्याला वाटत असतें.

## सोन्याच्या साठ्याचा उपयोग

सोनें हें पैसा म्हणून मान्यता पावलें जायचें असेल तर तें प्रत्यक्ष विनिमय-व्यवहारांत येऊं देतां कामां नये. तसेंच त्याचा उपभोग-

साधन म्हणूनही वापर होतां कामा नये. म्हणून सोन्याचा साठा करणारा माणूस आपल्या सुवर्णदेवतेच्या चरणीं आपल्या ज्या आधिभौतिक वासना त्यांचा त्याग करीत असतो. संयमाचा जो धार्मिक आदेश त्याबरहुकुम तो मनापासून वागत असतो. उलट विनिमय-व्यवहारामध्यें त्यानें मालाच्या स्वरूपांत जितकें मूल्य ढकललें असेल त्याहून अधिक मूल्य त्याला विनिमय-व्यवहारांतून काढून घेतां येत नाहीं. तो स्वतःच्या श्रमानें जितकें अधिक उत्पन्न करतो तितकें त्यास अधिक विकतां येतें. म्हणून कष्ट, काटकसर आणि लोभ हे त्याचे तीन मूलभूत सद्गुण असून जास्तींत जास्त विकावें आणि कमींत कमी खरेदी करावें हें त्याच्या अर्थशास्त्राचें सगळें सार असतें.

सोन्यारुप्याचा साठा करण्याची ही जी लोभ-प्रवृत्ति तिच्या-बरोबरच सोनें रुपें बाळगण्याची रसिकतेची प्रवृत्तिही उत्पन्न होत असते. सुसंस्कृत समाजाची संपत्ति वाढूं लागली म्हणजे ही रसिक-तेची प्रवृत्तिही वाढत जाते. अशा प्रकारें पैशाचें काम ज्याला करा-वयाचें नाहीं अशा सोन्यारुप्याचा बाजार एकीकडून सतत वाढत असतो. तर उलट हाच सोन्यारुप्याचा संचय सामाजिक अस्वस्थतेच्या काळीं अथवा आर्थिक संकटाचे काळीं उपयुक्त धन प्राप्त करून घेण्याचें एक गुप्त साधन या स्वरूपांत रहात असतो.

धन साठवून ठेवण्याचे अनेक हेतु असतात. धन साठविण्याचा पहिला उपयोग पुढीलप्रमाणें असतो. विक्रीमालाच्या विनिमयव्यवहाराचें क्षेत्र सतत कमी अधिक होत असतें; या व्यवहाराचा वेगही कमी अधिक होत असतो; या क्रमांत चलनांतील पैशाचें परिमाणही कमी अधिक होत असतें हें आपण पूर्वीं पाहिलेंच आहे. म्हणून या पैशाच्या परिमाणाच्या अंगीं विस्तार आणि संकोच सहन करण्याचा लवचिकपणा असावा लागतो. एखादी वेळ अशी येते कीं, त्यावेळीं विनिमयव्यवहाराला नाणें

अधिक ओढून घेण्याची गरज उत्पन्न होते, तर दुसऱ्या एखाद्या काळीं चलन-व्यवहारांतून पैसा काढून टाकणें इष्ट असतें. चलन-व्यवहारांत असणाऱ्या एकूण पैशाचें परिमाण केव्हांहि जास्तींत जास्त अवश्य इतक्या मर्यादेपर्यंत करतां यावें यासाठीं कोणत्याही देशांतील सोनें आणि चांदी यांचें परिमाण नाणें करण्यासाठीं जास्तींत जास्त जितकें लागेल त्याहून अधिक असावें लागतें. सोन्या-चांदीचे जे साठे केले जातात त्यापासून हें कार्य होत असतें. या साठ्यामुळें जरूर लागेल तेव्हां पैशाचा पुरवठा करणें आणि गरज कमी होतांच चलन-व्यवहारांतून पैसा काढून घेणें या गोष्टी शक्य होतात आणि बँकांतून पैसा फाजील परिमाणांत साठण्याचें टळतें.

## कर्ज-प्रकाराची उत्पत्ति

विक्रीमालाचा विनिमयव्यवहार जसजसा वाढत जाईल तसतशी विक्रीमालाची विक्री आधीं व्हावी, त्यानंतर थोडा काळ जावा आणि मग किंमत वसूल व्हावी अशी परिस्थिति उत्पन्न होऊं लागतें. याची कांहीं अगदीं साधीं उदाहरणें सांगितलीं म्हणजे हें सहज समजेल. कांहीं वस्तूंच्या उत्पादनाला खूप वेळ लागतो तर दुसऱ्या कांहींना कमी वेळ लागतो. तसेंच निरनिराळ्या वस्तूंची उत्पत्ति वर्षांतील निरनिराळ्या ऋतूंतच होऊं शकते. एखादा विक्रीमाल ज्या गांवच्या बाजारांत येतो त्याच गांवांत तो तयार झालेला असतो, तर दुसरा त्या बाजारांत येण्यापूर्वी दूरचा प्रवास करून आलेला असतो. त्याच गांवच्या मालाचा मालक आपला माल ताबडतोब विकण्यास तयार असेल. पण दूर गांवच्या मालाच्या मालकास जर हा माल खरेदी करायचा असला तर तो कांहीं त्याचवेळीं खरेदी करण्यास तयार असेल असें नाहीं; देवघेवीचे व्यवहार सतत त्याच त्याच

माणसांचे दरम्यान होऊं लागले म्हणजे विक्रीव्यवहार हा उत्पादन पद्धतीच्या परिस्थितीनें आपोआप नियंत्रित होत असतो. उलट घरासारख्या विक्रीमालाचा उपयोग हा कांहीं विशिष्ट काळासाठीं विकलेला असतो. या ठिकाणीं घराच्या गिऱ्हाइकाला त्या काळाच्या शेवटीं गिऱ्हाईक या नात्यानें त्या मालाचें पूर्ण उपयोगमूल्य पदरांत पडतें. म्हणून अशा व्यवहारांत गिऱ्हाईक माल खरेदी करतें त्यावेळींच त्याची किंमत न देतां मागाहून देत असतें. विक्रेता हा गिऱ्हाइकाचा सावकार होतो. गिऱ्हाईक विक्रेत्यांचें ऋणको होत असतें. अशाप्रकारें पैशाला एक नवें कार्य उत्पन्न होतें. कर्जाची देवघेव करणें हें तें कार्य होय.

## सावकार-ऋणको संबंध

ह्या ठिकाणीं सावकार व ऋणको हें जें नातें उत्पन्न झालें तें अगदीं साध्या विनिमयव्यवहारानें निर्माण झालें आहे. या विनिमयव्यवहाराच्या स्वरूपांत फरक झालेला असल्यामुळें विक्रेता व गिऱ्हाईक यांना अनुक्रमें सावकार व ऋणको हीं नवीं नावें मिळतात. म्हणून अगदीं सुरवातीस विक्रेता व गिऱ्हाईक हीं स्वरूपें जितकीं चंचल व उलटसुलट होण्यासारखीं असतात त्याचप्रमाणें सावकार व ऋणको हीं स्वरूपेंही असतात. पण सावकार व ऋणको यांमध्यें जो विरोध आहे तो विक्रेता व गिऱ्हाईक यांमधील विरोधाइतका सुखकारक नाहीं. सावकार व ऋणको हीं स्वरूपें विक्रीमालाच्या विनिमय-व्यवहाराचा संबंध न येताही निर्माण होऊं शकतील. प्राचीन जगांत सावकार व ऋणको यांमधील झगड्यामुळेंच वर्गयुद्धें निर्माण होत. रोमन साम्राज्यामध्यें प्लेबियन (खालच्या वर्गांतले लोक) ऋणको या वर्गयुद्धांत ठार होऊन त्यांची जागा गुलामांनीं घेतली. मध्ययुगांत ऋणको झालेल्या सरंजामदारांचा नाश होऊन हीं

वर्गयुद्धें संपलीं. त्यांच्या राजकीय सत्तेची आर्थिक भूमिका नष्ट झाली व त्याबरोबरच त्यांची राजकीय सत्ताही ढांसळली. पण या काळांत सावकार व ऋणको यांच्या दरम्यान जो पैशाचा संबंध असे तो संबंध या दोन वर्गांच्या आर्थिक परिस्थितींतील अतिशय खोल अशा प्रकारचा जो विरोध त्याचेंच प्रतिबिंब होता.

## पैसा हें काल्पनिक साधन

आतां आपण पुन्हां विक्रीमालाच्या विनिमयव्यवहाराकडे वळूं. विक्रीमाल आणि त्याची किंमत असणारा पैसा हीं आतां दोन्ही एकदम दिसत नाहींत. आतां पैसा हा विकलेल्या विक्रीमालाची किंमत ठरवून त्यायोगें त्याचें मूल्यमापन करतो. विक्रीच्या करारांत जी किंमत ठरते तीमुळें ऋणकोनें अमुक एका ठरलेल्या दिवशीं सावकाराला किती पैसे द्यावे हें ठरवून दिलेलें असतें. पैशाचा दुसरा उपयोग म्हणजे माल खरेदी करण्याचें तो एक काल्पनिक साधन होतो. या वेळीं तो प्रत्यक्ष अस्तित्वांत नसतो. गिऱ्हाइकानें दिलेल्या वचनाच्या रूपांत तो वावरत असतो. तरी पण या काल्पनिक अवस्थेंतही एकाच्या हातांतील विक्रीमाल दुसऱ्याच्या हातीं पोंचविण्याचें त्याला सामर्थ्य असतें. किंमत ज्या दिवशीं देऊन टाकावयाची असेल त्या दिवशींपर्यंत किंमत देऊन टाकण्याचें साधन म्हणजे पैसा हा विनिमय-व्यवहारांत अवतरत नाहीं. फक्त त्या दिवशीं तो विक्रेत्याच्या हातून गिऱ्हाइकाच्या हातीं जात असतो. विनिमय-व्यवहारांतून विक्रीमाल अजिबात बाहेर हाकलला गेल्यानंतर त्याच्या किंमतीचा पैसा हा विनिमय-व्यवहारांत अवतरत असतो. यावरून विनिमय-व्यवहार हा पैशामुळें अमलांत येतो हें खरें नसून फक्त पैशामुळें तो संपतो असें दिसून येईल.

## विक्रीमालांचें रूपांतर

विक्रेत्यानें आपल्या विक्रीमालाचें रूपांतर पैशांत जें केलें तें आपली एखादी गरज त्या पैशामुळें भागवतां यावी म्हणून केलें. सोन्याचांदीचा साठा करणाऱ्यानें साठा केला तो आपला माल पैशाच्या स्वरूपांत ठेवतां यावा म्हणून केला, आणि ऋणकोनें साठा केला तो आपणांला पूर्वी खरेदी केलेल्या मालाची किंमत देऊन टाकतां यावी म्हणून केला. जर त्यानें ही किंमत दिली नाहीं तर त्याचा माल लिलावांत निघेल. यावरून पैसा हें विक्रीव्यवहाराचें ध्येय असतें, आणि सामाजिक गरजेमुळें विनिमयव्यवहारांतूनच या पैशाचा जन्म होतो हें आतां लक्षांत येईल.

गिऱ्हाईक आपल्या मालाचें रूपांतर पैशांत करण्यापूर्वी आपल्या पैशाचें रूपांतर मालांत करीत असतो. वेगळ्या शब्दांत सांगायचें म्हणजे तो प्रथम विक्रीमालाचें दुसरें रूपांतर करतो आणि मग पहिलें करीत असतो. उलट विक्रेत्याचा माल विनिमयव्यवहारांत शिरून आपली किंमत वसूल करतो. पण हीं वसूली फक्त पैशाच्या स्वरूपांतील कायदेशीर हक्क याच स्वरूपाची असते. त्या विक्रीमालाचें पैशांत रूपांतर होण्यापूर्वीं त्याचें विक्रीमालांत रूपांतर होत असतें. त्याचें पैशांत रूपांतर होतें तें कांहीं काळानंतर मग होतें.

## माल किंमत व कर्ज

विनिमयव्यवहाराच्या अमुक एका कालांत ज्या देण्यांची मुदत भरत असते तीं देणीं विकून टाकलेल्या मालांच्या किंमतींचीं प्रतीकें असतात. ही देण्याची रक्कम भरण्यासाठीं जितक्या पैशाची जरूरी असते तो पैसा मिळणें ही गोष्ट चलनाचा वेग किती आहे त्यावर

अवलंबून असते. हा चलनाचा वेग दोन प्रकारच्या परिस्थितीवर अवलंबून असतो. ऋणको आणि धनको यांच्यामधील संबंधांची एक साखळीच बनलेली असते; अशी कीं **अ** हा ज्यावेळीं स्वतः धनको या नात्यानें आपल्या **ब** या ऋणकोकडून पैसा परत घेतो त्यावेळीं तो ताबडतोब आतां स्वतः ऋणको या नात्यानें आपला धनको जो **क** त्याला पैसा परत देत असतो. असें हें चक्र एकसारखें चालत असतें. दुसरी परिस्थिति म्हणजे देणीं देऊन टाकण्याच्या ज्या निरनिराळ्या मुदती त्या होत. मागें आपण मालांची खरेदीविक्री एकसारखी कशी होत जाते त्याची साखळी वर्णन केली. त्याहून किंमतीच्या देवघेवींची साखळी अगदी वेगळी असते. विनिमय-माध्यम असा जो पैसा त्याच्या चलनव्यवहारामुळें विक्रेता व गिऱ्हाईक यांच्यामधील संबंध केवळ व्यक्त होतो असें नव्हे; हा संबंध विनिमय-व्यवहारांत उत्पन्न होतो, पण तेवढ्यापुरताच टिकतो. उलट खुद्द पैशाच्या देवघेवींमुळें व्यक्त होणारा संबंध हा सामाजिक संबंध असतो. आणि तो पूर्वीपासून अस्तित्वांत असतो.

## किंमतीची विल्हेवाट

किंमतीच्या विल्हेवाटीचा व्यवहार जितक्या प्रमाणांत एक-एका जागीं केंद्रीभूत होऊं लागतो तितक्या प्रमाणांत किंमतीच्या विल्हेवाटीच्या विशिष्ट पद्धति निर्माण होऊन त्याच्या विशिष्ट संस्थाही स्थापन होतात. मध्ययुगामध्यें लिऑन्स या शहरीं असलेल्या पेढ्या हें काम करीत. **ब** कडून **अ** ला असलेलें येणें तसेंच **क** कडून ब ला आणि परत अ कडून **क** ला असलेलें येणें, या सर्वांना एकमेकासमोर आणलें आणि एकमेकांच्या देण्यांची फिटंफाट केली म्हणजे, संपतें. शेवटीं फक्त एकटेंच देणें उरतें. एका

केंद्रांत देण्यांचे व्यवहार जितके अधिक प्रमाणांत असतील तितकी शेवटच्या देण्याची शिल्लक एकूण सर्व व्यवहारांशीं प्रमाणांत कमी असतें. आणि म्हणून विनिमय-व्यवहारामध्यें विनिमय माध्यम असा जो पैसा त्याचें परिमाण कमी असलें तरी पुरतें.

## पैशाचें परिमाण कसें ठरतें

अमुक एका कालांत चलनव्यवहारांत असलेला पैसा किती असतो याचा आपण विचार केला तर पैशाच्या चलनाचा वेग अमूक आहे असें गृहीत धरून हें समीकरण पुढीलप्रमाणें मांडतां येईल.

वसूल करावयाच्या किंमतींची बेरीज

अधिक एकूण देणें असलेल्या रकमांची बेरीज

उणें एकमेकांशीं फिटंफाट होणाऱ्या देणें रकमा

उणें चलनाचें एकच नाणें जितके वेळां विनिमयाचें काम करतें त्यावेळांची संख्या.

बरोबर चलन व व्यवहारांत असलेला पैसा

उदा. एक शेतकरी १० डॉ. ला आपला गहूं विकतो. या ठिकाणीं १० डॉ. हे विनिमयव्यवहाराचें माध्यम होतात. हा शेतकरी एका कोष्ट्याचें कापडादाखल देणें लागत असतो. या देण्याची मुदत जेव्हां भरते तेव्हां तो शेतकरी गव्हाबद्दल मिळालेल्या १० डॉ. नीं तें देणें भागवून टाकतो. म्हणून यावेळीं ते पूर्वींचेंच १० डॉ. देणें देऊन टाकण्याचें साधन या नात्यानें उपयोगीं पडतात. नंतर तो कोष्टी रोख पैसे देऊन बायबल खरेदी करतो. तीच रक्कम पुन्हां एकदां विनिमयाचें माध्यम म्हणून उपयोगी पडते. असा हा प्रकार सतत चालूं शकतो. म्हणून अमुक एका दिवशीं चलनांत असलेल्या पैशाचें परिमाण आणि

विनिमयव्यवहारांत असलेल्या एकूण मालांचें परिमाण यांचें दरम्यान कोणताही प्रमाणसंबंध असूं शकत नाहीं. विनिमयव्यवहारांतून अजिबात बाहेर निघून गेलेल्या विक्रीमालांचें प्रतीक असणारा पैसा चलन म्हणून वावरत असतो. उलट विनिमयव्यवहारांत वावरणाऱ्या विक्रीमालांचें प्रतीक असणारा पैसा, पुढल्या एका ठरलेल्या दिवसापर्यंत दृश्य स्वरूपांत अवतरतही नाहीं. शिवाय दररोज काढली जाणारीं कर्जें आणि त्या प्रत्येक दिवशीं मुदत भरत असणारीं देणीं यांचीं परिमाणें अगदींच भिन्न असूं शकतात.

## श्रीमंतीची कल्पना बदलली

पैसा हा कर्जफेडीचें साधन म्हणून जें काम करतो त्यामुळें पतीच्या पैशाचा जन्म होतो. खरेदी केलेल्या विक्रीमालांच्या किंमतींच्या कर्जाचीं दाखलपत्रें, हीं कर्जें दुसऱ्यांना देऊन टाकण्यासाठीं, विनिमय व्यवहारांत वापरण्यांत येत असतात. हा पतीचा व्यवहार जितका जितका अधिक व्यापक होत जातो तितकें तितकें पैशाचें देणीं देऊन टाकण्याचें साधन हें कार्यही वाढत जातें.

कर्जें देऊन टाकण्याचें माध्यम हें जें पैशाचें कार्य तें जसजसें विकसत जाईल तसतशी देण्यांच्या मुदती संपणाऱ्या तारखेस एकूण देण्यांची जी बेरीज असेल तितका पैसा देऊन टाकण्यासाठीं पेढ्यांतून पैसा साटवून ठेवण्याची गरज वाढूं लागत असते. सोनेंरुपें साठवणें ही संपत्ति मिळविण्याची एक जुनी पद्धति होती. पण सुसंस्कृत समाजव्यवस्था वाढूं लागली म्हणजे सोनें साठविण्यानें श्रीमंत होता येतें हा समज नाहीसा होतो. उलट देणीं देऊन टाकण्यासाठीं, देणीं देऊन टाकण्याचें साधन असा जो पैसा त्याची गंगाजळी बनविणें हीच आतां श्रीमंत होण्याची पद्धत बनते.

---

# भांडवलाचा वर्तुळाकार प्रवास : : : २२*

पैशाचें सारसर्वस्व काय हें आपणांस पूर्वी समजलें आहे. सर्व विक्रीमालांच्या विनिमय-मूल्याचें तो भौतिक गोचर स्वरूप असतो. याचाच अर्थ पैसा हा सर्व विक्री-मालामध्यें अंतर्भूत असलेल्या मानवी श्रमाचें प्रतीक असतो. तसेंच विक्री-मालांच्या साध्या विनिमय व्यवहारांत पैशाचें कार्य काय असतें हेंही आपण पाहिलें आहे. आतां पैसा हा भांडवलाचें जें स्वरूप धारण करतो त्या स्वरूपांत पैसा हा काय असतो याची आपण तपासणी करूं.

## पैसारूपी भांडवलाचें स्वरूप

असें करतांना आपण एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, 'भांडवल' या शब्दाचा अर्थ वरकडमूल्य निर्माण करणाऱ्या कांहीं मूल्यांची बेरीज असा आपण करीत असतों. म्हणून पैसारूपी भांडवल म्हणजे वाढावा निर्माण करण्याच्या कामीं लावलेला पैसा होय. विक्रीमालाच्या उत्पत्तींत वाढावा कसा निर्माण होतो हे आपण

---

* कॅपिटल, खंड २, प्रकरण १, २, ३, ४.

पाहिलें आहे. अर्थात् पैसारूपीं भांडवल हें विक्रीमालाच्या उत्पादनाच्या कामींच वापरलें पाहिजे. आणि म्हणून पैसारूपीं भांडवल हें विक्री-मालाचीं उत्पादनसाधनें व श्रमशक्ति यांच्या खरेदीसाठीं उपयोगांत आणलें पाहिजे. नंतर उत्पादनाची प्रक्रिया सुरू होते; ती संपली म्हणजे तीपासून हातीं आलेलें फल, गुंतलेला भांडवलाचा पैसा परत मिळविण्यासाठीं तसेंच उत्पन्न केलेल्या वाढाव्याचा पैसा करण्यासाठीं, विकावें लागतें.

## पैशाचा प्रवास

यावरून पैशाचा प्रवास जो चक्राकार होत असतो असें दिसून येतें तो तीन अवस्थांतून होत असतो.

प्रथमावस्था : भांडवलदार हा विक्रीमालाच्या व मजूरांच्या बाजारांत गिऱ्हाईक म्हणून येतो. तेथें त्याच्या पैशाचें विक्रीमालांत रूपांतर होतें आणि अशा प्रकारें त्याच्या चक्राकार प्रवासाची प्रथमा-वस्था संपते : पैसा–विक्रीमाल ( पै—वि.मा. )

द्वितीय अवस्था : प्रथमावस्थेंत विकत घेतलेला विक्रीमाल उत्पा-दनाच्या कार्यासाठीं खर्च होतो, उत्पादनकार्यामध्यें तो संपविला जातो. अधिक मूल्यवान विक्रीमाल हें फल या द्वितीयावस्थेपासून प्राप्त होतें.

तृतीय अवस्थाः—आतां भांडवलदार विक्रेता म्हणून बाजारांत येतो. तेथें त्याच्या विक्रीमालाचें पैशांत रूपांतर होतें, व विक्री मालाच्या चक्राकार प्रवासाची द्वितीय अवस्था येथें पुरी होते–विक्री माल—पैसा ( वि.मा.—पै. )

भांडवलरूपी पैशानें पुरें केलेलें हें वर्तुळ पुढील सूत्रांत व्यक्त करतां येईल.

पै.—वि.मा.....उ....वि.मा.,—पै., वरील सूत्रांत दिलेल्या टिंबा-वरून चक्राकार गती मध्यंतरि कांहीं वेळ कुंठित झाली आहे असें समजावयाचें आहे; वि.मा. ‘ आणि पै. ’ यांचा अर्थ वि.मा. म्हणजे विक्रीमाल आणि पै. म्हणजे पैसा यांत वाढ झाली आहे. वाढ जितकी झाली असेल तितका तो वाढावा होय.

वरील तीन अवस्थांपैकीं उत्पादनाची जी अवस्था तिचें तपशीलवार पृथक्करण पूर्वीं केलें आहेच. आतां पहिल्या व तिसऱ्या अवस्थांची चर्चा करावयाची. ही चर्चा करतांना किरकोळ अथवा आकस्मिक अशा सर्व परिस्थिति आपण विचारांत घ्यावयाच्या नाहींत. विक्रीमाल हा त्याचें जें मूल्य आहे तेवढ्यालाच विकला जातो व त्याच्या विक्रीची परिस्थिति सर्वदा सारखीच असते असें आपण धरून चालूं. तसेंच विनिमय-व्यवहाराची क्रिया चालू असतां मूल्यांत जे फरक होत असतील तेंही आपण येथें विचारांत घ्यावयाचे नाहींत.

## पैसा–विक्रीमाल

वरील तीन अवस्थांपैकीं पहिली जी अवस्था (पै.—वि.मा.) ही भांडवल या नात्यानें हातीं येणारा पैसा खर्चून विक्रीमाल खरेदी करणें ही असते. पण या विक्रीमालाचें स्वरूप कसेंही असलें तरी चालेल असें नव्हे. त्यांना कांहीं विशिष्ट गुण असावेच लागतात—हा विक्रीमाल धनोत्पादन करणारा व मजूरांना जगविणाराही असावा लागतो. तसेंच या विक्रीमालापासून उत्पन्न होऊं शकणारें धन आणि मजूर हे परस्परोपयोगी असावे लागतात. जे मजूर मजूरीनें लावावयाचे त्या मजूराकडूनच धनोत्पादनासाठीं वापरलीं जाऊं शकतील अशीं तीं धनोत्पादनसाधनें असावीं लागतात. श्रमशक्तीसाठीं आपण **श्र.** हें अक्षर घालूं. आणि धनोत्पादनसाधनें यासाठीं **ध. सा.** हीं अक्षरें

घालूं. आतां भांडवलरूपीं जो पैसा ( पै. ) त्याचे दोन भाग होतात. एक भाग श्रमशक्ति खरेदी करतो, आणि दुसरा भाग श्रमशक्तीस अनुरूप अशीं धनोत्पादनसाधनें खरेदी करतो. पुढील सूत्रानें आपण हाच अर्थ व्यक्त करूं.

पै.—वि.मा. } श्र. / ध. सा.

येथें **श्र.** आणि **ध.सा.** हीं दोन्हीं केवळ गुणांतच परस्परांस अनुरूप असून भागत नाहीं तर परिमाणांतही परस्परांस अनुरूप असावीं लागतात. **ध. सा.** हे **श्र.** ला कामावर जुंपण्यास पुरेसें असावें लागतें. **श्र.** कडून जें फाजील काम करून घ्यावयाचें तेंहि याच **ध. सा.** च्या साहाय्यानें करून घेणें शक्य व्हावें लागतें. उदा. श्रमशक्तीचें रोजचें मूल्य ७५ सेंट आहे असें गृहीत धरलें तर व हे ७५ सें. मूल्य मजूरांच्या ५ तासांच्या श्रमानें उत्पन्न होतें असें मानलें तर मागें चर्चिलेल्या भांडवलशाही उत्पादनाच्या सिद्धांता-प्रमाणें पाहतां ७५ सें. ही मजूरी ५ तासांहून अधिक तासांच्या— समजा १० तासांच्या श्रमाची असावी लागते. ५० कामगारांशीं उत्पादनाचा करार केला असें समजा; या ५० कामगारांनीं रोज ५०० तासांचें काम मालकाला द्यावें, अर्थात् यांपैकीं २५० तासांचें काम हे फाजील श्रम म्हणजे मजूरी न दिलेले मोफत श्रम होतील. अर्थात् ५० श्रमशक्ति खरेदी करणाऱ्या या भांडवलदारानें जीं धनोत्पादनसाधनें ( **ध. सा.** ) खरेदी करावयाचीं तीं २५० तासाला पुरणारींच नव्हेत तर ५०० तास पुरणारीं साधनें खरेदी करावीं लागतात. म्हणून श्रमशक्ति ( **श्र** ) आणि धनोत्पादनसाधनें ( **ध. सा.** ) या दोहोंच्या खरेदीसाठीं भांडवलदाराला भांडवलरूपीं पैशाची जी विभागणी करावी लागते त्या विभागणीचें प्रमाण याप्रमाणें निश्चित

ठरतें. अशी खरेदी केल्यानंतर भांडवलदार हा **ध. सा.** आणि **श्र** यांचा उपयुक्तमाल उत्पन्न करण्यासाठींच व्यय करतो, इतकेंच नव्हें तर वाढावा निर्माण करण्यासाठींही जरूर असणाऱ्या साधनांचा व्यय करीत असतो. त्याचें पैसारूपीं भांडवल हें उत्पादक भांडवल असतें.

## उत्पादनक्रियेंतील भांडवलशाही संबंध

श्रमशक्तीची खरेदी (पै.—श्र.) ही या प्रक्रियेंतील महत्त्वाची बाब आहे. कारण श्रमशक्तीचा उपयोग केल्यानेंच वाढावा निर्माण होत असतो. पै.—ध.सा. याची गरज केवळ खरेदी केलेली श्रमशक्ति गतिमान करण्यासाठींच आहे; म्हणून श्रमशक्तीची खरेदी (पै.—श्र.) करतांना पैशाचा मालक आणि श्रमशक्तीचा मालक हे जरी केवळ विक्रेते आणि गिऱ्हाईक या नात्यानेंच एकमेकासमोर येत असतात तरी या विनिमयव्यवहारामध्यें दोघांचें भांडवलशाही नातें अंतर्भूत असतें. खरोखर भांडवलदारानें स्वतःच्या पैशाचा भांडवल म्हणून उपयोग करण्यापूर्वीं इमारती, यंत्रें, वगैरे धनोत्पादनसाधनांच्या खरेदी-साठीं पैसा खर्च केलेला असतो. मागाहून त्याला श्रमशक्ति खरेदी करतां येईल. कारण श्रमशक्ति त्याच्या हातीं येतांच धनोत्पादन-साधनें (ध.सा.) हीं श्रमशक्तीचा (श्र.) तावडतोब उपयोग करतां येण्यासाठीं तेथें हजर असलीं पाहिजेत. भांडवलदार हा श्रमशक्ति खरेदी करतो त्या वेळीं तो धनोत्पादनसाधनांचा आधींच मालक झालेला असतो. म्हणून भांडवलदार आणि मजूर यांमधील भांडवल-शाहीसंबंध—वर्गीयसंबंध अस्तित्वांत आलेलाच असतो. इतकेंच नव्हे तर श्रमशक्तीच्या खरेदीविक्रीसाठीं भांडवलदार आणि मजूर हे एकमेकासमोर येतात तेव्हांच हा संबंध गृहीत धरलेला असतो. आणि हा संबंध अस्तित्वांत येतो याचें कारण चरितार्थाचीं साधनें

आणि धनोत्पादनसाधनें ही मजूरांच्या आटोक्याबाहेर असल्यामुळें मजूरांना आपली श्रमशक्ति राबविण्यासाठीं भांडवलदाराला विकणें अवश्य होते हें होय. उत्पादनाच्या प्रक्रियेमध्यें असणारा हा भांडवलशाही संबंध तेथें व्यक्त होतो, याचें कारण तो विनिमय-व्यवहाराच्या प्रक्रियेंत सर्वत्र असतो. विक्रेता व गिऱ्हाईक जेथें जेथें एकमेकासमोर येतात अशा सर्व अगदीं मूलभूत आर्थिक परिस्थितींत हा संबंध असतोच. वेगळ्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे भांडवल-शाही समाजांतील सर्व प्रकारच्या वर्गीय संबंधांत हा भांडवल-शाही संबंध असतोच.

## विक्रीमालाचें पैशांत रूपांतर

उत्पादनाची एखादी प्रक्रिया संपली म्हणजे एखाद्या विक्रीमालाचें (वि.मा.) अमुक इतकें परिमाण समजा १०००० पौं. सूत आपल्या पदरांत पडतें; हें एकूण मूल्य उत्पादनाची प्रक्रिया सुरू करतांना आपल्या हातीं असलेल्या विक्रीमालाच्या मूल्यापेक्षां अधिक आहे. उत्पन्न झालेला विक्रीमाल हा भांडवलस्वरूपी असतो ही गोष्ट या वाढलेल्या मूल्यावरून कळते. असा हा विक्रीमाल आतां विकून टाकावा लागतो. कारण जोंवर तो बाजारांत पडून आहे तोंवर उत्पादन-प्रक्रिया थबकून राहते. मालाच्या रूपांत असलेल्या या भांडवलाचें रूपांतर जितक्या लवकर पैशांत होऊं शकेल तितक्या लवकर हेंच भांडवलरूपी मूल्य अधिक प्रमाणांत नवीन माल व नवीन मूल्यें निर्माण करण्याचें कामीं वापरतां येईल. तसेंच वाढलेला सर्व विक्री-माल (वि.मा. ) खपून गेला पाहिजे. त्यांतला अंशसुद्धां विकला न गेला अशा स्थितींत पडून राहतां कामा नये. सगळें १० हजार पौंड सूत विकलें गेलें म्हणजेच त्याचें सर्व भांडवलरूपी मूल्य आणि

वाढावामूल्य यांचें पैशांत रूपांतर होतें. विक्रीनंतर म्हणजे विनिमय व्यवहाराच्या शेवटीं भांडवलरूपी मूल्य पहिल्यानें उत्पादनक्रियेंत प्रविष्ट होतांना ज्या रूपांत होतें त्या रूपांत पुन्हां प्रवेश करते आणि पुन्हां पैसारूपीं भांडवल वर सांगितलेल्या निरनिराळ्या अवस्थांतून पुन्हां प्रवास करते.

विक्रीमालाची विक्री ( वि.मा.—पै. ) संपली म्हणजे मुळचें भांडवलमूल्य आणि वाढावामूल्य एकमेकास चिकटून राहून विनिमय-व्यवहाराच्या शेवटीं पदरांत पडणाऱ्या पैशाच्या रूपानें व्यक्त होत असतात. यांतील मूळ भांडवल आणि वाढावा हीं दोन्ही वेगवेगळीं करणें अथवा न करणें ही गोष्ट भांडवलदाराच्या इच्छेप्रमाणें करतां येते. वाढावामूल्य हें मूळच्या भांडवलमूल्यांत नवीन उत्पादनासाठीं मिळविणें न मिळविणें अथवा अंशतः मिळविणें या गोष्टी उत्पादन-प्रक्रिया भांडवलदाराला चालवितां यावी यासाठीं नेहमीं शक्य असाव्या लागतात.

वर सांगितलेल्या सर्व अवस्थांतून भांडवल हें आपोआप व विना-हरकत लागोपाठ जात राहील तरच भांडवलाचा हा सर्व उत्पादन-व्यवहार व विनिमयव्यवहार चालू शकतो. उलट भांडवलाचा हा जो उत्पादन-व्यवहार व विनिमयव्यवहार त्याच्या प्रक्रियेच्या कांहीं अंगभूत गुणांवरच मागें सांगितलेल्या निरनिराळ्या अवस्थांत भांडवलाची गति कांहीं काल स्थगित होणें अथवा न होणें हें अवलंबून असतें.

## भांडवलाचे आवर्त

भांडवलाच्या आवर्तावरून ( सर्क्युलेशन ) धनोत्पादन व भांडवलाचा आवर्त याचा निकट संबंध कळून येतो. आवर्ताच्या पहिल्या अवस्थेंत-उत्पादनप्रक्रियेंत ज्या स्वरूपानें भांडवलास राबतां येईल

तें स्वरूप त्याला धारण करतां येण्यासाठीं विक्रीमालाचा सर्वसामान्य विनिमय व्हावा लागतो. आणि तिसऱ्या अवस्थेंत भांडवलाला आपलें विक्रीमालाचें स्वरूप फेंकून देऊन टाकतां येण्यासाठींहि वरील प्रकारचाच सर्वसामान्य विनिमय व्हावा लागतो. हें विक्रीमालाचें स्वरूप फेंकून देऊन पैशाचें स्वरूप धारण केल्याशिवाय भांडवलास पुन्हां आपला आवर्त सुरू करतां येत नाहीं. तसेंच 'एक' भांडवल या नात्यानें भांडवलाचा जो आवर्त होत असतो त्यापासून वाढाव्याचा होणारा आवर्त अलग काढतां यावा यासाठीं वर सांगितलेला सामान्य विनिमय व्हावा लागतो.

आणि म्हणून पैसारूपीं भांडवलाचा आवर्त हें औद्योगिक भांडवलशाहीचें अतिशय ठळक व तितकेंच एकांगीं असें स्वरूप असतें. या प्रक्रियेमध्यें औद्योगिक भांडवलाचा हेतु म्हणजे मूल्याची वाढ अथवा पैशाचा संचय हा, कमी किंमतीला माल खरेदी करून तो जास्त किंमतीला विकावा या स्वरूपांत व्यक्त होत असतो. पहिली अवस्था जी मालखरेदी (पै.—वि.मा.) तिच्यामध्यें उत्पादक भांडवलाचें विक्रीमालाच्या बाजारांतून मिळविलेले घटक आपणास कळून येतात. तसेंच भांडवलशाही उत्पादनपद्धति ही विनिमयव्यवहारावर म्हणजे व्यापारावर अवलंबून असल्याचें दिसून येतें. पैसारूपी भांडवलाचा आवर्त म्हणजे केवळ विक्रीमालाचें उत्पादनच नव्हे. हें उत्पादन भांडवलाच्या एकंदर आवर्तामधून होत असतें. धनोत्पादन म्हटलें म्हणजे त्याबरोबर भांडवलाचा आवर्त गृहीतच धरावा लागतो.

## आवर्तांतून संचय

जी श्रमशक्ति भांडवलदार खरेदी करतो तिचें मोल त्याला दरएक अथवा दर दोन आठवड्यांच्या शेवटीं द्यावें लागतें. धनोत्पादन-

साधनांची बाब याहून वेगळी असते. त्यांच्या बाबतींत खरेदीची तारीख आणि किंमत देऊन टाकण्याची तारीख वेगळी असूं शकते. म्हणून पैसारूपीं भांडवलाचा कांहीं भाग मालखरेदीची (पै.–वि.मा.) प्रक्रिया पूर्ण करण्यासाठीं खर्चावा लागतो. बाकीचा पैशाच्या स्वरूपांत कायम राहतो. म्हणून भांडवलाच्या आवर्ताच्या गरजेमुळेंच पैशाचा साठा करणें अवश्य होत जातें. आवर्तांतून काढलेला सर्व पैसा साठ्याचें रूप घेतो. यामुळेंच पैसारूपीं भांडवलाचें कार्य नियमितपणें चालण्यासाठीं पैशाचा साठा करणें अवश्य होतें.

## यांत्रिक उत्पादनाची नियमित वाढ

दुसऱ्या एका मार्गानेंही पैशाचा साठा होत असतो. भांडवलाच्या संचयावरील प्रकरणांत आपण पाहिलें आहे कीं, प्रत्येक वेळीं उत्पन्न होणारें वाढावामूल्य हें मुळच्या भांडवलांत पुनः पुन्हां मिळविलें जातें. त्यामुळें एकाच उत्पादनाचें क्षेत्र वाढविलें जातें अथवा नव्या कोणत्या तरी ठिकाणीं भांडवली व्यवहार सुरू केला जातो. पण हें घडून येण्यासाठीं हें भांडवल अमुक इतक्या परिमाणाचें असावें लागतें. म्हणजे अमुक इतक्या मजूरांना मजूरी देण्यास व त्या मजूरांना गुंतविण्यासाठीं जरूर लागणाऱ्या धनोत्पादनसाधनांची खरेदी करण्यास अवश्य इतकें तें असावें लागतें. कारण यांत्रिक उत्पादन किती प्रमाणांत वाढवावें ही गोष्ट अनियमित असूं शकत नाहीं. यांत्रिक साधनांच्या विशिष्ट गुणामुळें अमुक इतक्या प्रमाणांतच वाढ करणें शक्य होतें. भांडवलाच्या एका आवर्तापासून उत्पन्न झालेला वाढावा जर पुरेसा नसेल तर तो साठवून ठेवावा लागतो. उत्पादनाचें प्रमाण अमुक इतकें वाढविण्यासाठीं जरूर इतका वाढावा मिळेपर्यंत भांडवलाचे अनेक आवर्त चालू ठेऊन वाढावा साठवीत रहावें लागतें.

दरम्यान हा वाढावा साठ्याच्या रूपांत आवर्तक्रियेंतून बाहेर असा स्थगित राहिलेला असतो. सुप्त सामर्थ्यवान असें हें पैसारूपी भांडवल असतें. भांडवलाचें काम करण्याचें सामर्थ्य याच्या ठिकाणी आहे, पण अजून तें काम करीत नाहीं अशीही त्याची अवस्था असते.

आपल्या भांडवलदारानें विकलेल्या मालाची किंमत जर ताबडतोब दिली जावयाची नसून कांहीं लहान अथवा मोठ्या मुदतीनंतर द्याव-याची असेल तर उत्पन्न झालेल्या वाढाव्याच्या ज्या अंशाचें रूपांतर पैशांत व्हावयाचें असतें त्याचें तें ताबडतोब पैशांत न होतां पैशा-संबंधीच्या हक्कांत होतें; अथवा दुसऱ्या एखाद्या मूल्यावर मिळणाऱ्या मालकी हक्कांत होतें. हें दुसरें मूल्य गिऱ्हाइकाच्या हातीं आलेलेंही असेल, अथवा भावी काळांत मिळण्याचा हक्कच फक्त त्याला मिळाला असेल.

## वाढाव्याचें भांडवलांत रूपांतर

पैशाच्या रूपांत जो वाढावा हातीं येत असतो त्याचें भांडवल-मूल्यांत पुन्हां रूपांतर करावयाचें कीं नाहीं ही गोष्ट अनेक बाबींवर अवलंबून असतें. केवळ पैशाच्या रूपांत वाढावा अस्तित्वांत आहे एवढ्यामुळेंच त्याचें भांडवलमूल्यांत रूपांतर होऊं शकत नाहीं. वाढाव्याच्या पैशाचें जर दुसऱ्या एका धंद्यांत भांडवल व्हावयाचें असेल तर तो पैसा या नव्या धंद्यासाठीं कमींतकमी भांडवल म्हणून जितकी रक्कम लागते तितका तरी असावा लागतो. इतकेंच नव्हेतर मूळ धंद्यांतील भांडवलाची वाढ करावयाची असतांही कांहीं एक कमींतकमी रकमेनेंच ही वाढ करावी लागते. उदा. सूत कातणाऱ्याला आपल्या चात्या जर वाढवावयाच्या असतील तर त्याला कापूस पिंज-ण्याचीं यंत्रें व इतर अनेक प्रकारचें साहित्य अमूक इतक्या मर्यादे-

पर्यंत वाढवावेंच लागतें. शिवाय कापसाचा खर्च, मजूरी यांचीही वाढ एकंदर धंद्याच्या वाढीबरोबर होतच असते. जोंपर्यंत पैशाच्या स्वरूपांत उत्पन्न झालेला वाढावा या किमान मर्यादेपर्यंत पोचत नाहीं तोंपर्यंत मूळ भांडवलाचा आवर्त पुनःपुन्हां होत राहून वाढाव्यांत भर पडत जावी लागते. चालू धंद्यांतील यंत्रसामुग्रींत फरक करावयाचा असला, उदा. सूत कातण्याच्या यंत्रांत अधिक उत्पादनक्षमता आणण्यासाठीं त्यांत सुधारणा करावयाची असली तरीसुद्धां सुधारणा केल्यानंतर सूत कातण्याचें साहित्य, कापूस पिंजण्याची यंत्रसामुग्री वगैरे सर्वांची वाढ करावी लागते. अशा प्रकारें वाढावा हा दरम्यानच्या काळांत फक्त अधिकाधिक साचत राहतो.

## मूळच्या मूल्यांत वाढ

एकदां उत्पादनाची क्रिया पूर्ण झाली म्हणजे व्यापारी हा उत्पन्न झालेला विक्रीमाल विकून टाकण्यासाठीं व्यापाराच्या प्रवाहांत सोडून देतो. या विक्रीमालांच्या अंगीं त्यांच्या उत्पादनाच्या सुरवातीस भांडवलदारानें खरेदी केलेल्या मूल्याहून ( **श्र÷ध.सा.** ) अधिक मूल्य असतें. अशा प्रकारें तो आपल्या मालाची विक्री करून मूळ उत्पादनांत गुतवलेल्या पैशापेक्षां अधिक पैसा पदरांत पाडून घेतो. पण हा गोष्ट त्यास करतां येतें याचें कारण उत्पादनाच्या आरंभी त्यानें जितकीं मूल्यें व्यापाराच्या प्रवाहांतून काढून घेतलेलीं असतात त्याहूच अधिक मूल्यें तो आतां व्यापाराच्या प्रवाहांत टाकतो हें होय. * आपण फक्त औद्योगिक भांडवलदारापुरताच विचार करीत आहोंत. हा

* औद्योगिक भांडवलदार याचा अर्थ शेतीच्या, कारखानदारीच्या, खाणीच्या वगैरे क्षेत्रात जो उत्पादनाचें काम करतो तो. व्यापारी, बँकर अथवा जमीनमालक वगैरे हे येथें उत्पादक म्हणून अभिप्रेत नाहीत.

मांडवलदार उत्पादनाच्या आरंभीं जितकीं मूल्यें व्यापाराच्या प्रवाहांतून काढून घेतो म्हणजे खरेदी करतो त्याहून अधिक मूल्यें तो व्यापाराच्या प्रवाहांत हटकून टाकतो.

बाजारांत हा औद्योगिक मांडवलदार जितकीं मूल्यें ढकलतो तितकींच जर उत्पादनाच्या आरंभा त्यानें बाजारांतून काढलेलीं असतीं तर त्याच्या भांडवलांत कधींच वाढ झाली नसती. त्यानें खरोखर खरेदीच्या किंमतीहून अधिक किंमत विक्रीपासून मिळविली पाहिजे. तोही अधिक किंमत मिळवूं शकतो याचें कारण उत्पादनप्रक्रिया चालू असतां कमी मूल्याच्या मालास त्यानें अधिक मूल्याचें रूप दिलेलें असतें हें होय. उत्पादनाच्या आरंभीं त्यानें खरेदी केलेल्या मूल्यांच्यापेक्षां उत्पन्न केलेल्या विक्रीमालाचें मूल्य जितक्या प्रमाणांत अधिक असेल तितक्याच प्रमाणांत त्याचा फायदा वाढत असतो. अर्थात उत्पादनाच्या आरंभीं त्यानें खरेदी केलेलीं मूल्यें आणि उत्पादनाच्या शेवटीं त्यानें विक्रीस आणलेलीं मूल्यें यांचा समतोल ठेवावा अशी इच्छा तो कधींच करणार नाहीं. उलट मूळ खरेदी केलेल्या मूल्यापेक्षां विक्रीसाठीं तयार केलेलीं मूल्यें हीं जास्तीत जास्त अधिक करण्याचाच तो प्रयत्न करील.

## ध.सा.चें आवश्यक प्रमाण

एका भांडवलदारासंबंधानें घडणारी ही गोष्ट सर्व भांडवलदार वर्गासंबंधानेंही अशीच घडते. मूळ उत्पादनाच्या कार्यासाठीं खरेदी करावयाच्या मूल्याचें ( ध.सा. ) परिमाण किती असावें एवढाच प्रश्न येथें आपण चर्चेस घेऊं.

आपण पूर्वी पाहिलेंच आहे कीं उत्पादक मांडवल ( उ. भा. ) हें धनोत्पादनसाधनें ( ध. सा. ) व श्रमशक्ति ( श्र ) या दोहोंच्या

खरेदींत विभागलें जातें. आणि म्हणून नुसत्या धनोत्पादनासाठीं जो विभाग खर्च होतो तो एकूण भांडवलापेक्षां कमी असतो व उत्पादनप्रक्रियेच्या शेवटीं उत्पन्न झालेल्या विक्री मालाच्या परिमाणाहून तो फारच कमी असतो.

श्रमशक्तीची मागणी धनोत्पादनसाधनांच्या मागणीपेक्षां प्रमाणांत उत्तरोत्तर कमी कमी होत जाते, हें आपण मागें २२व्या प्रकरणांत भांडवलसंचयाच्या चर्चेंत पाहिलेंच आहे.

मजूर हा आपल्या मजूरीपैकीं बराच भाग चरितार्थ साधनांत-अत्यवश्य चरितार्थसाधनांत खर्चीत असतो. अर्थात भांडवलदाराची श्रमशक्तीसाठीं जी मागणी असते ती अप्रत्यक्षपणें मजूरवर्गाला उपभोगा-साठीं लागणाऱ्या वस्तूंचीच असते. ही मागणी चरभांडवलाइतकीच असते. ती कदाचित, मजूरांनीं आपली मजूरी कमी करून घेतल्यास-कमीही असूं शकेल.

याप्रमाणें पाहतां भांडवलदार उत्पादनाच्या आरंभीं ज्या विक्री मालाची मागणी करीत असतो तीं 'स्थिर भांडवल अधिक चर भांडवल' यापेक्षां अधिक असूं शकणार नाहीं. उत्पादन प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर बाजारांत तो जो पुरवठा आणीत असतो तो मात्र स्थिरभांडवल+चरभांड-वल वाढावा ( स्थि. भा.+च. भा.+वा. ) इतका असतो. नफ्याचा दर जितका अधिक असेल म्हणजे वाढावा भांडवलाच्या सापेक्षतेनें जितका अधिक असेल तितक्या प्रमाणांत भांडवलदारानें बाजारांत विक्रीस आणलेला मालाचा पुरवठा हा त्यानें उत्पादनाच्या आरंभीं खरेदी केलेल्या मालाहून अधिक असतो.

## एकाचें धन तें दुसऱ्याचें साधन

धनोत्पादनसाधनासाठीं त्याची जी मागणी असते ती एकूण

भांडवलाच्यापेक्षां कमी असते हें आपण विसरतां कामा नये. आतां हीं धनोत्पादनसाधनें (ध. सा.) या भांडवलदाराला पुरविणारा व सामान्यतः याच्याच सारख्या परिस्थितींत असलेला दुसरा एक भांडवलदार तितकेंच भांडवल घालून धंदा करतो आहे अशी आपण कल्पना करूं. अशा परिस्थितींत पहिल्या भांडवलदारानें केलेली धनोत्पादनसाधनांची (ध. सा.) मागणी ही दुसऱ्या भांडवलदारानें उत्पन्न केलेल्या एकूण मालाहून कमी असेल हें उघड आहे. असा हा दुसरा भांडवलदार एकच नसून तसे अनेक असतात असें म्हटलें तरी हीं वस्तुस्थिति पालटूं शकत नाहीं. आमच्या पहिल्या भांडवल-दाराचें भांडवल २५० डॉ. आहे असें समजूं; यांतलें स्थिर भांडवल २०० डॉ. असेल. अर्थात त्यानें धनोत्पादनसाधनें विकणाऱ्या सर्व भांडवलदाराकडे २०० डॉ. ची मागणी केली असेल. हे सर्वजण मिळून प्रत्येकीं २५० डॉ. भांडवलावर सारखाच नफा घेऊन ३०० डॉ. मूल्य असलेलीं धनोत्पादनसाधनें बाजारांत आणतात. या पुरवठ्या-पैकीं फक्त $\frac{२}{३}$ इतक्याच मालास आपला पहिला भांडवलदार मागणी घालीत असतो. आणि त्याची सर्व मागणी म्हणजे धनोत्पादनसाधनें व श्रमशक्ति यांचें एकूण मूल्य तो बाजारांत आपल्यातर्फे जो पुरवठा विक्रीसाठीं आणीत असतो त्याच्या $\frac{४}{५}$ इतकें असतें.

भांडवलदारानें जर आपलें सर्व वाढावामूल्य खाऊनच टाकलें व आपलें उत्पादनकार्य मुळच्याइतक्या भांडवलानेंच करीत रहावयाचें ठरविलें तर त्या एकाच परिस्थितींत उत्पादनाच्या आरंभीं त्यानें केलेली मालाची मागणी व उत्पादनाच्या शेवटीं त्यानें निर्माण केलेला मालाचा पुरवठा हीं दोन्ही सारखी असूं शकतील. पण तरीसुद्धां भांडवलदार या नात्यानें तो उत्पादनाच्या पूर्वीं जितक्या मूल्याची मागणी करील तें मूल्य उत्पादनानंतर तो बाजारांत विक्रीसाठीं आणील त्या मूल्याच्या

$\frac{४}{५}$ इतकेंच असेल.आपली भांडवलदाराची भूमिका सोडून देऊन सामान्य माणसाप्रमाणें उरलेला $\frac{१}{५}$ (आपण येथें गृहीत धरल्याप्रमाणें) तो भोगून टाकीत असतो.

## गंगाजळीं अवश्य

पण आपण गृहीत धरलेली ही गोष्ट मुळीं अशक्यच आहे. मालाच्या किंमतींत नेहमीं बदल होत असतो. खरेदीला अथवा विक्रीला योग्य भाव मिळविण्यासाठीं अनूकूल कालाची वाट पहात रहावें लागतें. अर्थात् यासाठीं भांडवलदाराला भांडवलाचा कांहीं भाग गंगाजळी करून ठेवावा लागतो. तसेंच भांडवलाचें क्षेत्र वाढविणें आणि आपल्या धंद्यांतील यंत्रांची आजतागायत सुधारणा करीत राहणें यासाठींही त्याला भांडवलाचा संचय करून ठेवावा लागतो.

भांडवलाचा संचय व्हावा यासाठीं वाढाव्यांतील कांहीं पैसा त्याला साठा म्हणून ठेवावा लागतो. त्याला नवीन भांडवलाचें रूप देण्याला अवश्य इतकें कमींत कमी परिमाण त्याचें होईपर्यंत हा साठा वाढत असतो. तोंपर्यंत अर्थातच भांडवलदाराची उत्पादनसाधनांची मागणी वाढत नाहीं. पैसा स्थगित होऊन बसतो. बाजारांत माल विकून आलेला हा जो पैसा त्या पैशाइतका दुसरा कोणताही माल आतां बाजारांतून पुन्हां बाहेर न काढतां हा पैसा आपल्या जागीं नुसता बसून राहतो.

अर्थात येथें आपण पतीच्या व्यवहाराचा विचार करीत नाहीं. एखादा भांडवलदार आपला धन संचय जसजसा वाढत जाईल तसा तसा तो बँकेमध्यें व्याजानें ठेव म्हणून ठेवीत असतो. हा पतीचा व्यवहार सध्यां विचारांतून बाजूस ठेवूं.

भांडवलाचा एक आवर्त पुरा होण्यासाठीं लागणारा सर्व वेळ म्हणजे धनोत्पादन आणि उत्पन्न धनाची विक्री या दोहोंस मिळून लागणारा वेळ होय.

## एकूण उत्पादन काल

प्रत्यक्ष भांडवलावर श्रम करण्यांत जो वेळ खर्च झालेला असतो त्याचा येथें उत्पादनकालांत अंतर्भाव केलेला आहे. पण एकूण उत्पादनकाल हा या प्रत्यक्ष श्रमकालापेक्षां बराच अधिक असतो. एकंदर उत्पादनाच्या प्रक्रियेंत श्रमकार्यामध्यें खंड पडूं शकतात. ज्या वस्तूवर श्रम करावयाचे असतात त्या वस्तूवर या दरम्यानच्या काळांत कोणतेही श्रम करावे न लागून केवळ भौतिक परिस्थितीचाच त्यावर परिणाम घडत राहतो. उदा. पेरलेलें बी आपोआप रुजत असतें, दारू तळघरामध्यें आंबत असतें. तसेंच कातडें वगैरे सारख्या श्रमक्रियेसाठीं लागणाऱ्या ज्या वस्तु त्यांच्या रासायनिक क्रिया चालू असतात. भांडवलदाराच्या हातीं पुष्कळशा कच्च्यामालाचा पुष्कळ सांठा हाताशीं तयार ठेवावा लागतो. शिवाय हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं यंत्रें वगैरे जी श्रमसाधनें तीं उत्पादनक्रियेच्या एकूण काळांत कांहींही उत्पन्न न करतां ऐदीपणानें पुष्कळ वेळ घालवीत असतात.

हें सर्व आळसांत पडून राहिलेलें भांडवलच म्हटलें पाहिजे. हें भांडवल असें ऐदी पडून राहिल्याच्या काळांत त्यावर जी कांहीं श्रमक्रिया होऊं शकते, उदा. हा सर्व माल नीट जतन करून ठेवण्याचें काम मजूराला करावें लागतें तितक्या प्रमाणांत ते श्रम उत्पादक श्रम होत. ते वाढावाही निर्माण करतात. कारण रोजमजूर या नात्यानें अशा सर्व मजूरांना कांहीं काम विनामोबदला करावें लागतेंच. उलट उत्पादनक्रियेमध्यें जे खंड पडत असतात त्या खंडकालांत धनो-

त्पादनसाधनापासून मूल्यही निर्माण होत नाहीं आणि वाढावाही निर्माण होत नाहीं. एवढ्याच साठीं रात्रीं कारखान्यांत काम करण्याची मजूरावर सक्ती होत असते.

श्रम ज्या वस्तूवर करावयाचे त्या वस्तूवर श्रम करतांना मध्यें खंड पाडावाच लागतो. उदा. लाकूड वगैरे काम वाळावें लागतें. या खंडकाळांत त्यापासून मूल्य अथवा वरकडमूल्य कांहींही निर्माण होत नाहीं.

याप्रमाणें श्रमवेळापेक्षां उत्पादनवेळ हा अनेक कारणांनीं अधिक असूं शकतो असें सांगतां येईल. अशा या खंडकालांत धनोत्पादन साधनावर श्रमक्रिया होऊंच शकत नाहीं. अर्थात त्यापासून वाढावा निघूंच शकत नाहीं. आणि म्हणूनच श्रमवेळेहून एकूण उत्पादन क्रियेचा वेळ जो अधिक असतो तो अधिकपणा शक्य तितका कमी करण्याची खटपट भांडवलदार करीत असतात.

उत्पादनाच्या वेळाखेरीज भांडवलाला व्यापाराचा आवर्त करून परत येण्यासही वेळ लागत असतो. यांत विक्रीमाल अथवा वाढावा कांहींही निर्माण होत नाहीं. हा व्यापाराचा आवर्त जितका अधिक काळ होईल त्याच्या व्यस्त प्रमाणांत वाढावा उत्पन्न होत असतो. उलट या व्यापारी आवर्ताची वेळ कमीअधिक करणें हें भांडवल-दाराला जितकें अधिक शक्य होतें तितका त्याला वाढावा अधिक वाढवितां येतो. आणि याच देखाव्यामुळें वाढावा हा व्यापारांतून उत्पन्न होतो हा खोटा समज अधिक दृढ होत असतो.

---

## व्यापारी व्यवहार : : : २३*

### (१) खरेदी आणि विक्री

विक्रीमाल हा त्याच्या मूळ मूल्यालाच विकला जातो असें आपण गृहीत धरलें आहे. येथें आपणांस विक्रीमालाचें मूल्य पैशांत रूपांतरित करणें व पैशाचें विक्रीमालाच्या मूल्यांत रूपांतर करणें याची चर्चा करावयाची आहे. विक्रीमाल हा मूळ मूल्याला विकला न गेला तरी पैशाच्या रूपांत रूपांतरित झालेलीं मूल्यें हीं पूर्वीं असतात तितकींच राहतात. कारण एकंदर खरेदीविक्रीच्या जमाखर्चांत एका बाजूस मूल्य अधिक झालें तर दुसऱ्या बाजूस तेवढें वजा होत असतें.

विक्रीमालाच्या मूल्याचें पैशांत रूपांतर करण्यास वेळ व श्रमशक्ति लागत असते. पण ही नवीन मूल्य निर्माण करण्यास लागत नसून एका मूल्याचें दुसऱ्या मूल्यांत रूपांतर करणें शक्य व्हावें म्हणून वेळ व श्रमशक्ति यांची गरज असते. येथें हेंही लक्षांत ठेवलें पाहिजे कीं खरेदीविक्रीव्यवहारांत प्रत्येकजण विकलेल्याहून अधिक मिळविण्याचा

* कॅपिटल, खंड २, प्रकरण २३.

प्रयत्न करीत असतो. तरीपण त्यावरून अखेर हिशेब बदलत नाहीं. देवघेवदारांचे श्रम या अधिक मिळविण्याच्या दुष्ट हेतूमुळें अधिक वाढतात. पण त्यामुळें मूल्यांत वाढ मुळींच होत नाहीं. कोर्टामध्यें एखाद्या वस्तूच्या मालकी संबंधीं दावा लागला असतां कोर्टातल्या कायदेशीर भांडणानें जसें वादग्रस्त वस्तूचें मूल्य वाढत नाहीं तसेंच हें आहे. म्हणून विक्रीमालाचे मालक हे भांडवलदार नसून स्वतःच प्रत्यक्ष निर्माते असले तर मालखरेदीविक्रीसाठीं त्यांनीं खर्चलेला वेळ हा त्यांच्या एकूण श्रमवेळेंतून वजा करावा लागतो. याच कारणासाठीं प्राचीन काळीं व मध्ययुगांतही खरेदीविक्रीचा व्यवहार हा जत्रांच्या वेळीं केला जात असे.

## व्यापारानें मूल्य वाढत नाहीं

जो भांडवलदार खरेदीविक्रीच्या कामासाठीं आपल्याऐवजीं दुसरीं माणसें नेमतो त्याच्या व्यवहारांत खरेदीविक्रीस फार महत्त्वाचें स्थान प्राप्त होतें. तो ज्या अर्थी दुसऱ्यानें उत्पन्न केलेला माल अधिक प्रमाणांत घेत असतो, त्या अर्थी स्वतःचा मालही त्याला अधिकाधिक प्रमाणांत विकावा लागतो, आणि त्याबरोबरच स्वतःच्या मालाच्या उत्पादनाचीं साधनेंही त्याला अधिकाधिक प्रमाणांत खरेदी करावीं लागतात. खरेदीविक्री व्यवहार हा आधीं अथवा नंतर केव्हांच नवीन मूल्य निर्माण करूं शकत नाहीं. खरेदीविक्रीनें मूल्य निर्माण होतें हा भ्रम व्यापारी भांडवलाच्या अस्तित्वामुळें निर्माण होत असतो. त्या भांडवलाची चर्चा आपण पुढें करूं. पण आरंभापासून एक गोष्ट स्पष्टपणें कळून येते ती ही कीं श्रमविभागाच्या तत्त्वाचा अवलंब करून स्वतःचें भांडवल असलेला एखादा व्यापारी अनेक भांडवल-दारांच्या विक्रीमालाची विक्री करण्याचें पत्करील तर तेवढ्यामुळें तो

सर्वांना पृथक्पृथक्पणें खरेदीविक्री करण्यासाठीं लागणारा जो वेळ तो पुष्कळ कमी करूं शकेल. सर्वांची खरेदीविक्री अशा प्रकारें आपणाकडे घेणारा हा व्यापारी म्हणजे खरेदीविक्रीचें एक यंत्रच होय. यंत्राप्रमाणेंच तो शक्तीचा वृथा होणारा व्यय टाळतो आणि उत्पादनवेळ कमी करतो. तरीपण अशा व्यवहारानें मूळच्या मूल्यांत कांहींही फरक होत नाहीं. व्यापारव्यवहार कांहीं मूल्यनिर्माता होऊं शकत नाहीं.

## अनुत्पादक श्रम

व्यापारी हाही भांडलवलदार असतो व त्याचें व्यापारी भांडवल हें इतर कोणाही भांडवलदाराच्या भांडवलासारखें असतें. याची चर्चा आपण पुढें करूं. तूर्त असें गृहीत धरूं या कीं वर सर्व व्यापाऱ्यांची खरेदीविक्री करण्याचें पत्करणारा व्यापारी म्हणून जो सांगितला तो 'एजंट' असून कारखानदारांनीं त्याची श्रमशक्ति एजंट या नात्यानें खरेदी केली आहे. ज्याप्रमाणें सूत कातणारा मजूर अथवा औषधाच्या गोळ्या बांधणारा मजूर कारखान्यांत काम करून पोट भरतो त्याप्रमाणें हा एजंटही खरेदीविक्रीचे श्रम करून पोट भरत असतो. भांडवलशाही व्यवहाराला अवश्य असेंच एक काम तोही करीत असतो. इतरासारखेच श्रम तोही करीत असतो. तरीपण त्याच्या श्रमाचें जें फळ त्यापासून मूल्य निर्माण होऊं शकत नाहीं अथवा कोणतेंच कांहीं उत्पादन होऊं शकत नाहीं. अनुत्पादक श्रमांना उत्पादक श्रमाचें रूप देण्याचें उपयुक्त कार्य तो करतो असें नसून प्रत्येक निरनिराळ्या व्यापाऱ्यांनीं प्रत्येकी खरेदीविक्री व्यवहार केल्यानें जे खूप अनुत्पादक श्रम झाले असते त्यांचें परिमाण फक्त कमी करण्याचें काम तो करतो. आणखीही थोडें पुढें जाऊं. आपण त्याला एक रोजमजूर समजूं. वाटल्यास थोडा अधिक पगार मिळविणारा मजूर समजूं. पण

पगार कितीही अधिक मिळो, आपल्या वेळापैकीं कांहीं भाग तो कांहींच पगार न घेतां मोफत काम करतो हें खास. कदाचित त्याला रोज ८ तासांची मजूरी मिळत असेल. आणि काम १० तास करावें लागत असेल. हें जें त्यानें २ तास विनामोबदला म्हणजे फाजील काम केलें तें २ तासांचें काम अथवा मोबदला घेऊन केलेलें ८ तासांचें काम या दोहोंपासूनही मूल्य निर्मिति मुळींच होत नाहीं. पण खरेदी-विक्री व्यवहाराचा एकंदर खर्च त्यानें १० पैकीं २ तास मोफत काम केल्यामुळें $\frac{1}{5}$ नीं कमी झाला. या एजंटाला नेमणाऱ्या भांडवल-दाराच्या मालाच्या खरेदीविक्रीचा जो खर्च तो त्या भांडवलदाराच्या वट्ट उत्पन्नांतून वजा केला पाहिजे. पण या एजंटानें २ तास मोफत श्रम केल्यामुळें तितक्या प्रमाणांत हा खर्च आतां कमी वजा करावा लागेल.

या खरेदीविक्री व्यवहारावर खर्च होणारा वेळ हा व्यापार व्यवहाराच्या एकूण खर्चांत समाविष्ट केला पाहिजे. पण या व्यवहारांमध्यें देवघेव झालेल्या मूल्यांत यानें मुळींच भर पडत नाहीं. एखाद्या उत्पन्न मालाचा एक भाग खरेदीविक्रीच्या यंत्रांत रूपांतरित करावा व त्यानें बाकीच्या भागाची खरेदीविक्री करावी असेंच हें आहे. हें यंत्र तयार होतें तेव्हां तें उत्पन्न झालेल्या मालांत घट करतें. यंत्र या नात्यानें तें व्यवहारांत खर्च होणारी मानवी श्रमशक्ति कमी करीत असेल. तरी पण अखेरीस हें यंत्र म्हणजे व्यापारव्यवहारांतील खर्चाचाच एक भाग होय.

## (२) जमाखर्च

खरेदीविक्री व्यवहारामध्यें ज्याप्रमाणें श्रमवेळ खर्च होत असतो तसाच जमाखर्च ठेवण्यांतही श्रमवेळ खर्च होत असतो. त्यासाठीं पेन्सिल, शाई, कागद, डेस्क, ऑफीस, वगैरे प्रकारचा खर्चही लागत

असतो. या जमाखर्चाची परिस्थितिही खरेदीविक्रीच्या व्यवहारा-सारखीच आहे.

## जमाखर्चही अनुत्पादक

जोंपर्यंत विक्रीमालाचा वैयक्तिक उत्पादक आपला जमाखर्च नुसता डोक्यांत ठेवतो अथवा धनोत्पादक श्रमास लागणारा जो वेळ, त्या वेळांनंतर वेगळ्या वेळांत केव्हां केव्हां टिपून ठेवतो, तोंपर्यंत त्याचा जमाखर्चावर खर्च होणारा वेळ त्याच्या एकूण श्रमांतून वजा केला पाहिजे. तसेंच कागद वगैरे जीं साधनें तो जमाखर्चासाठीं वापरतो तीं-सुद्धां तो वापरीत असलेल्या सर्व साधनांतून वजा केली पाहिजेत. कारण जमाखर्चाचा वेळ व त्याचीं साधनें हीं उत्पादक वेळ व साधनें यांत मिसळतां येणार नाहींत. जमाखर्चाचें कार्य एखाद्या उत्पादन-क्षेत्रांत केवढेंही मोठें असो, आणि जमाखर्चाच्या कामीं विशेषज्ञ लावलेले असोत, तरीसुद्धां जमाखर्चाची बाब ही उत्पादक बाब ठरूं शकत नाहीं.

अतिप्राचीन अशा हिंदुस्थानच्या ग्रामव्यवस्थांतून शेतीच्या व्यवहारासाठीं एक हिशेबनीस असे. त्या ग्रामसंस्थांत सगळ्या जमा-तीसाठीं हिशेबाचेंच काम करणारा हा अधिकारी असे. अशा रीतीनें श्रमविभाग पद्धतीचा अवलंब करून म्हणजे साऱ्या गांवचे जमाखर्च ठेवण्याचें काम एका माणसाकडे देऊन वेळ, श्रम, व खर्च वांचवला जातो. परंतु धनोत्पादन आणि त्याचा जमाखर्च या दोन बाबी अगदीं भिन्न राहतातच. जहाजावरील माल आणि त्या मालाची कप्तानानें केलेली यादी या दोन्ही गोष्टी कांहीं एक नव्हत. एकूण समाजांतला जो हा हिशेबनीस त्याची श्रमशक्ति ही एकंदर समाजाच्या उत्पादन-प्रक्रियेंतून बाजूस काढली जाते. त्याच्या कार्यानें समाजाला जो खर्च

सोसावा लागतो तो त्याच्या कार्यांतून परत मिळत नाहीं. तर एकंदर समाजाच्या उत्पादनांतून तो वजा करावा लागतो. दीर्घकालाचा विचार केल्यास भांडवलदारानें नेमलेला हिशेबनीस आणि हिंदी ग्रामपंचायतीनें नेमलेला हिशेबनीस ( म्हणजे कुलकर्णी ? ) या दोघांचीहि परिस्थिति सारखीच ठरते.

## जमाखर्चाची आवश्यकता कशी वाढते

तरीपण जमाखर्चाची प्रक्रिया आणि खरेदीविक्रीची प्रक्रिया यांमध्यें थोडासा फरक आहेच. जमाखर्चाची जरूरी उत्पन्न होते याचें कारण भांडवलशाही समाजांत श्रमोत्पन्न माल हा सर्व विक्री-माल असतो हें होय. पण उत्पादनाची पद्धति ही आपलें भांडवल-शाही स्वरूप बदलून दुसरें सामाजिक स्वरूप घेईल तेव्हां खरेदी-विक्री व्यवहार अजिबात नाहींसाच होईल. पण जमाखर्चाचें काम जितक्या प्रमाणांत उत्पादन-प्रक्रियेचें नियंत्रण करूं शकेल आणि थोडक्यांत एकंदर उत्पादनव्यवहारांचें स्वरूप दाखवूं शकेल तितक्या प्रमाणांत जमाखर्चाची गरज समाजाला असतेच. उत्पादनाचें वैय-क्तिक स्वरूप नष्ट होऊन त्यास अधिकाधिक सामाजिक स्वरूप येऊं लागलें कीं जमाखर्चाची गरज अधिकाधिक वाढत जाते. म्हणून भांडवलशाहीपूर्वींच्या छोट्या छोट्या हस्तव्यवसायपद्धतीस जमा-खर्चाची गरज जितकी होती त्यापेक्षां भांडवलशाहीच्या मोठ्या प्रमा-णावर होणाऱ्या उत्पादनांत जमाखर्चाच्या गरजेचें प्रमाण अधिक होतें. आणि एकंदर समाजाकडूनच उत्पादन होऊं लागलें म्हणजे भांडवलदारी उत्पादनपद्धतीपेक्षांही या सामाजिक उत्पादनास जमा-खर्चाची गरज अधिक असेल. परंतु हें जमाखर्चाचें काम जसजसें केंद्रीभूत होत जाईल तसतसा त्याचा खर्चही कमी कमी होत जातो.

## (३) पैशासाठीं होणारा खर्च

समाजांत जें उपभोगाचें कार्य चालू असतें त्या कार्यात पैशासाठीं वापरला जाणारा विक्रीमाल उपभोगून संपविला जात नाहीं. पैशासाठीं वापरल्या जाणाऱ्या वस्तूची निर्मिती करण्याचें जे सामाजिक श्रम हे अशा प्रकारचे आहेत कीं ते केवळ खरेदीविक्रीचें साधनच निर्माण करतात. हा पैसा एकदां निर्माण करण्यासाठीं सामाजिक संपत्तीचा कांहीं भाग अनुत्पादक स्वरूप धारण करतोच. पण शिवाय एकदां तयार करण्यांत आलेला पैसा वापरानें झिजत असल्यानें त्याची झीज वरचेवर भरूनही काढावी लागते. भांडवलशाही पद्धतीनें ज्या राष्ट्रांची विशेष प्रगति झालेली असते त्या राष्ट्रांत पैशाची झीज भरून काढण्याचा हा खर्च फार महत्त्वाचा असतो. कारण पैशाचें स्वरूप धारण करणाऱ्या धनाचें परिमाण फारच मोठें असतें. उत्पादनव्यवहार हा सामुदायिक असतो म्हणूनच सोनें—चांदी या पैशाचें काम करणाऱ्या वस्तु समाजाला मोठ्या खर्चाच्या होत असतात. श्रमोत्पन्न विक्रीमाल या नात्यानेंच समाजाला त्यांचा खर्च पडलेला असतो. आणि केवळ खरेदीविक्री व्यवहाराचें कामीं वाया घालविण्याचें सामाजिक धन असें त्याचें स्वरूप असतें.

## (४) साठवण्याचा खर्च

धनाचें उत्पादन आणि पुनरुत्पादन हें कार्य अखंडपणें चालू रहावयाचें तर अमुक इतक्या परिमाणांत धनोत्पादनसाधनें बाजारांत नेहमीं उपलब्ध असावीं लागतात. उत्पादनाचें साहित्य केव्हांही हाताशीं असावें लागतें. तसेंच मजूरालाही आपलें बरेचसें चरितार्थ-साधन बाजारांत केव्हांही मिळावें लागतें. या कार्यासाठीं इमारती व विक्रीमालाचे साठे अवश्य असतात. म्हणजे या कार्यांत स्थिरभांडवल

गुंतवून ठेवावें लागतें. तसेंच विक्रीमालाचे साठे करण्यासाठीं जे मजूर लागतात त्यांच्या श्रमशक्तीची मजूरी द्यावी लागते. सौदे चालू असतांच्या काळांत विक्रीमाल सडत किडत असतो, हवेचे दुष्परिणाम त्यावर होत असतात, त्यांचें रक्षण करण्यासाठीं अधिक भांडवल घालावें लागतें. या भांडवलाचा उपयोगही अंशतः श्रमशक्तीकडे व अंशतः श्रमसाधनाकडे करावा लागतो.

खरेदीविक्री व्यवहारांतला हा जो खर्च तो वर सांगितलेल्या इतर खर्चाहून वेगळा आहे. कारण तो अंशतः विक्रीमालाच्या मूल्यांत भर टाकीत असतो. विक्रीमाल साठवून ठेवण्यासाठीं होणारा खर्च हा त्या विक्रीमालाचें पैशांत रूपांतर होण्यासाठीं लागणारा जो वेळ त्या वेळामुळें होत असेल तर तो वरीलपैकीं ( १ ) ते ( ३ ) या सदरांत पडेल. असें करतांना विक्रीमालाच्या मूल्यांत वाढ केली जाते अथवा तें मूल्य तसेंच राहतें. त्या मालावर जर या साठवण्याच्या अवस्थेंत श्रम करावे लागले तर त्याचा उपयोगमूल्यावर परिणाम होऊं शकतो व म्हणून त्याचें विनिमयमूल्यही वाढतें. ( जमाखर्च, खरेदी विक्री वगैरे क्रियांनीं उपयोगमूल्यावर परिणाम केला जात नाहीं हें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. ) या साठवण्याच्या कार्यांत उपयोगमूल्य वाढत नाहीं हें खरें, उलट कमी होतें. पण या कमी होण्याला मर्यादा असते. तें अजिबात नष्ट होत नाहीं. मालाचें अंगभूत मूल्यही वाढत नाहीं. पण नवीन श्रम त्यामध्यें ओतले जातात.

## ( ५ ) वाहतुक

येथें खरेदीविक्रीव्यवहारांतील मालाचे गठ्ठे बांधणें, वर्गीकरण करणें वगैरे प्रकारच्या तपशीलाच्या खर्चाचा विचार करण्याचें कारण नाहीं. यासर्वासंबंधानें सामान्य सिद्धांत असा कीं विक्रीमालाचें नुसतें

रूप बदलण्यामुळें होणारा खरेदीविक्रीव्यवहारांतला खर्च विक्री-मालाच्या मूल्यांत वाढ करीत नाहीं. विक्रीमालाचें फक्त रूप बदलण्याचे हे खर्च असतात. एकूण उत्पादनखर्चाच्या अनुषंगानें हे खर्च उत्पन्न होतात. वाढाव्यांतून ते भरून काढले पाहिजेत. एकंदर भांडवलशाही वर्गाच्या दृष्टीनें विचार करतां हा खर्च वाढाव्यांतून वजा करावा लागतो. मजूराला स्वतःचीं चरितार्थसाधनें खरेदी करण्यासाठीं खर्च करावा लागणारा वेळ हा जसा फुकट जाणारा वेळ असतो तसाच भांडवलदाराचा हा वाया जाणारा खर्च असतो. परंतु वाहतुकीचा खर्च मात्र महत्त्वाचें कार्य करीत असतो. म्हणून त्याचा थोडासा विचार येथें केला पाहिजे.

विक्रीमाल प्रत्यक्ष शरीरानें जागचा न हालतांही त्याचा खरेदी-विक्रीरूपी प्रवास होऊं शकतो. तसेंच वस्तूंची खरेदीविक्री न होताही त्यांची वाहतुक होऊं शकते. उदा. अनें बला घर विकलें, अर्थात घर हें यावेळीं विकलें गेलें पण जागचें हाललें नाहीं. कापूस, लोखंड यासारखी जंगम विक्रीमूल्यें जागचीं न हालतांच अनेक सट्टेबाजाकडून दहा दहा, बारा बारा वेळां खरेदीविक्री केली जातात. अशा व्यवहारांत हालचाल जी होते ती विक्रीमालाची नसून विक्रीमालाच्या मालकी हक्काची होत असते.

उत्पन्न झालेला माल हा वाहतुकीनें वाढत नाहीं. कित्येक वेळां वाहतुकीनें वस्तूच्या नैसर्गिक गुणांत जो फरक केला जात असतो तो वस्तूचा उपयोग वाढविण्यासाठीं केला जात नाहीं. उलट सामान्यतः त्यापासून अपाय होत असतो. तो अपरिहार्यही असतो. पण वस्तूचें उपयोगमुल्य पदरांत पडण्यासाठीं त्याचा उपभोग शक्य व्हावा लागतो. आणि वस्तूचा उपभोग होण्यासाठीं ती तिच्या जागेवरून हलवावी लागते. म्हणजे वाहतुक हे उत्पादनाची प्रक्रिया पूर्ण कर-

ण्याचें साधन आहे असें ठरतें. अशा प्रकारें वाहतुकीच्या कार्यांत गुंत-वलेलें उत्पादक भांडवल हें वाहातुक केलेल्या विक्रीमालाचें मूल्य वाढवीत असतें. अंशतः वाहतुकीचें जें साधन त्याचें मूल्य आणि अंशतः वाहतुक करणाऱ्या मजूरांच्या श्रमाचें मूल्य अशा दोन मूल्यांची विक्रीमालांत वाढ होते. मजूरांच्या श्रमामुळें मूल्याची जी वाढ होते ती, सर्व भांडवलशाहीं उत्पादनपद्धतींत घडते त्याप्रमाणें ज्याची मजूरी दिली आहे अशा श्रमाचें मूल्य आणि मजुरी न दिलेल्या श्रमाचें मूल्य अशा दोन भागांत विभागलेलें असतें.

उत्पादनाच्या प्रत्येक शाखेंत ज्यावर श्रम करावयाचें त्या वस्तूची वाहतुक, मजूरांच्या हत्यारांची वाहतुक, आणि त्या उत्पादनास लागणाऱ्या श्रमशक्तीची वाहतुक वगैरेचें कार्य एकंदर उत्पादनांत फार महत्त्वाचें असतें. उदा. पिंजण्याच्या खोलींतून सूत कातण्याच्या खोलींत कापूस न्यावा लागतो. कोळसा खाणीच्या तळांतून पृष्ठ भागा-वर आणावा लागतो. कारखान्यांत तयार झालेला पक्कामाल विक्रीमाल या नात्यानें दूर ठिकाणीं न्यावा लागतो. हें दृश्य कारखान्यांतील वाहतुकीसारखेंच पण मोठ्या प्रमाणावर घडणारें होय. कारखान्यांत माल उत्पन्न होत असतां उत्पादनाच्या एका अवस्थेंतला माल त्याच्या पुढील प्रक्रियासाठीं उत्पादनाच्या दुसऱ्या क्षेत्रांत न्यावा लागतो. आणि माल पूर्ण झाला म्हणजे तो उत्पादनाच्या क्षेत्रांतून उपभोगाच्या क्षेत्रांत न्यावा लागतो. माल इतक्या अवस्थांतून गेला म्हणजे मगच तो उपभोगाला योग्य होतो.

---

## व्यापारी भांडवल आणि व्यापाऱ्याचें कार्य : २४*

उत्पादनाच्या कामीं जें जें मांडवल गुंतवलें जातें त्या सर्व भांडवलानें तयार झालेल्या विक्रीमालाचें रूपांतर पुन्हां पैशांत केलें पाहिजे आणि पैशाचें रूपांतर पुन्हां धनोत्पादनसाधनें आणि श्रमशक्ति यांत केलें पाहिजे. वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे या मांडवलानें सतत खरेदीविक्रीचें कार्य चालू ठेवलें पाहिजे. स्वतःचें स्वतंत्र भांडवल ठेऊन खरेदीविक्रीचा व्यवहार जे व्यापारी करतात ते कारखानदारी मांडवलदारांचें हें खरेदीविक्रीचें कार्य वांचवीत असतात.

समजा, एका व्यापाऱ्याजवळ १५ हजार डॉ. आहेत. त्यांनीं तो ३० हजार यार्ड कापड एका कापडकारखानदाराकडून घेतो. तो १०% नफा घेऊन हे ३० हजार यार्ड कापड विकतो. या विक्रीनें हातीं आलेला पैसा तो पुन्हां कापडखरेदींत घालतो आणि पुन्हां कापड विकतो. विकण्याकरतां खरेदी करणें ही क्रिया तो पुनः पुन्हां करतो. दरम्यान तो स्वतः मात्र कांहीं उत्पन्न करीत नाहीं.

---

* कॅपिटल, खंड ३, प्रकरण १६-१७.

## व्यापारी काय करतो

कापडकारखानदाराच्या दृष्टीनें पाहिल्यास त्याच्या मालाचें मूल्य त्याला व्यापाऱ्याच्या पैशानें मिळालें आहे. मूळची परिस्थिति कोणत्याही प्रकारें बदलली नाहीं असें आपण धरून चालूं, तर मग तो कारखानदार या पैशानें पुनःपुन्हां सूत, कोळसा, श्रमशक्ति वगैरे खरेदी करून माल उत्पन्न करण्याचें कार्य चालू ठेवतो.

पण कारखानदाराच्या दृष्टीनें जरी कापडाची विक्री झाली असली तरी त्या कापडाच्या दृष्टीनें त्याची विक्री झालेली नाहीं. अजून विकावयाचा माल याच नात्यानें तें बाजारांत पडून आहे. फक्त मालक बदलला याहून कापडांत कोणताच वेगळा बदल झाला नाहीं.

आपण असें समजूं कीं कारखानदारानें नवें ३० हजार यार्ड कापड निर्माण केलें पण तोंवर व्यापाऱ्याला पहिलें ३० हजार यार्ड कापड विकतांच आलें नाहीं; असें झालें असतां या व्यापाऱ्याला दुसऱ्यांदा माल खरेदी करतां येत नाहीं. कारखानदाराजवळ आणखी पैसा असल्यामुळें तो माल निर्माण करण्याचें काम चालू ठेवील हें शक्य आहे. पण एक गोष्ट खरी कीं हें उत्पादन कार्य या वेळीं तरी मुळच्या भांडवलानें होणें शक्य नाहीं. या ठिकाणीं आपणांस व्यापाऱ्याचें कार्य केवळ मालविक्री करणें एवढेंच असतें ही गोष्ट ध्यानांत येते. जर व्यापाऱ्यानें हें काम केलें नसतें तर तें कारखानदारालाच करावें लागलें असतें, स्वतंत्र व्यापाऱ्याच्या अभावीं कारखानदारानें खरेदीविक्रीच्याच कामासाठीं एखादा मनुष्य ठेवला असता हें लक्षांत येण्यास वेळ लागत नाहीं.

जर कापड कारखानदाराला अगदीं अखेरच्या गिऱ्हाइकाला म्हणजे प्रत्यक्ष मालाच्या उपभोक्त्याला माल पोचेंपर्यंत थांबावें लागलें असतें तर त्याचें पुनरुत्पादनाचें काम खंडित झालें असतें. किंवा उत्पादनाचें क्षेत्र कमी करून पैशाचा बराच साठा त्याला जवळ ठेवावा लागला असता. भांडवलाची ही विभागणी व्यापाऱ्यानें भांडवलशाहीच्या व्यवहारांत हस्तक्षेप केला तरी टळत नाहीं. पण व्यापारी नसेल तर पैशाचा साठा बराच वाढवावा लागतो आणि उत्पादनाचें क्षेत्रही तितक्या प्रमाणांत कमी करावें लागतें. तसेंच व्यापारी आपलें काम करीत असल्यामुळें कारखानदार खरेदीविक्रीचा आपला वेळ वांचवून उत्पादनप्रक्रियेच्या देखरेखींत आपला वेळ खर्च करतो.

## व्यापारी भांडवलाची कामगिरी

व्यापाऱ्याचें भांडवल आपली कक्षा ओलांडणार नसेल तर पुढील तीन गोष्टी घडून येतील असें आपण धरून चालूं शकतो.

( १ ) श्रमविभाग तत्त्वानुसार व्यापाऱ्यानें केवळ खरेदीविक्रीच्या कामीं गुंतवलेलें जें भांडवल तें, कारखानदारानें हा खरेदीविक्री व्यवहार आपल्या हातीं घेतला असतां तर त्यासाठीं जेवढें भांडवल वापरलें असतें, त्या भांडवलापेक्षां पुष्कळच कमी असतें.

( २ ) व्यापारी केवळ हें खरेदीविक्रीचेंच काम करतो यामुळें कारखानदाराच्या मालाला चटकन पैशाचें रूप देतां येतें. इतकेंच नव्हे तर विक्रीमालालाही कारखानदाराच्या हातून गिऱ्हाईक मिळालें असतें त्यापेक्षां अधिक लवकर व्यापाऱ्याच्या हातून मिळतें.

( ३ ) जें भांडवल उत्पादनाच्या कामीं खर्च होतें त्याच्याशीं तुलना करून व्यापारी भांडवलाचा आपण विचार केला असतां व्यापारी भांडवलाचा आवर्त ( रोटेशन ) होण्यानें एका शाखेंतील अनेक भांडवलांचे आवर्त तर होतातच, पण शिवाय अनेक शाखांतील अनेक भांडवलांचे आवर्तही होत असतात. जर एखाद्या कापड-व्यापाऱ्यानें एक कापड विकलें आणि दरम्यान मुळच्या कापड-कारखानदारानें नवें कापड तयार केलें नसलें तर व्यापारी तोंपर्यंत दुसऱ्या एखाद्या कारखानदाराचें कापड विकत घेऊन तें विकून टाकतो; किंवा पहिलें कापड विकल्यावर पुन्हां कापड तयार नसल्यास रेशीम खरेदी करून तें विकून टाकतो.

अशा प्रकारें एकच व्यापारी भांडवल अमुक एका उत्पादन-शाखेंत गुंतवलेल्या अनेक भांडवलांचे आवर्त घडवून आणतें. आणि यामुळें व्यापारी भांडवलाच्या साहाय्यानें कारखानदाराजवळचा खर्च झालेला पैशाचा साठा पुन्हां त्याच्या हवालीं करतें. एखाद्या व्यापाऱ्यानें एखाद्या शेतकऱ्याचें धान्य खरेदी करून विकलें म्हणजे त्या विक्रीच्या पैशानें तो दुसऱ्या एखाद्या शेतकऱ्याचें धान्य खरेदी करून पुन्हां विकूं शकतो. पण एकेका शेतकऱ्याच्या भांडवलाचा आवर्त मात्र त्याच्या उत्पादनाचा काळ १ वर्षाचा असल्यामुळें १ वर्षानेंच होऊं शकतो.

व्यापारी भांडवल जितक्या लवकर एकेक आवर्त पुरा करतें तितक्या प्रमाणांत व्यापाराच्या कामीं खर्च होणाऱ्या भांडवलाचा भाग कमी कमी असतो. उलट एकेक आवर्त होण्यास या भांडवलाला वेळ जितका जितका अधिक लागेल तितकें तितकें हें भांडवल मोठें असावें लागतें.

आपण वर पाहिलेंच आहे कीं खरेदीविक्री-व्यवहारानें मूल्य अथवा वरकड मूल्य यांत भर मुळींच पडत नसून उलट मूल्य आणि वरकडमूल्य यांच्या निर्मितीवर मर्यादाच पडतात. कारखानदारांनीं हा खरेदीविक्री व्यवहार करण्याऐवजीं व्यापाऱ्यांनीं केला तरीही त्यांत कोणताही फरक होत नाहीं. माल साटवून ठेवणें, माल आगाऊ देणें, त्याची वाहतूक करणें, वर्गीकरण करणें, किरकोळीनें विकणें वगैरे प्रकार हे व्यापाराच्या कक्षेंत येत असले तरी ते उत्पादनाच्या प्रकाराचेच विभाग असल्यानें व्यापारांत त्यांचा विचार करण्याचें कारण नाहीं.

## व्यापारी भांडवलावरील नफ्याचा उगम

खरेदी करून परत विकण्यासाठीं माल खरेदी करणें एवढेंच व्यापाराचें कार्य होय हें लक्षांत घेतां व्यापारी भांडवल हें मूल्य अथवा वरकडमूल्य निर्माण करीत नाहीं, तर उपलब्ध असलेल्या विक्री-मालाचें पैशांत रूपांतर करण्याचें साधन म्हणून कार्य करीत असतें. हें कबूल केलें पाहिजे. तरीपण सरासरी नफा त्या कार्याला मिळायला हवाच. उत्पादनाच्या कामीं जें भांडवल गुंतवलेलें असतें त्यापेक्षां या व्यापारी भांडवलास अधिक नफा मिळेल तर कांहीं उत्पादक भांडवल व्यापारी क्षेत्रांत येऊन पडेल. उलट व्यापारी भांडवल उत्पादक भांडवला-पेक्षां कमी नफा देईल तर व्यापारी भांडवलाचा कांहीं भाग उत्पादक भांडवलांत येऊन पडेल. दुसऱ्या कोणत्याही भांडवलापेक्षां व्यापारी भांडवल हें चटकन् आपली जागा बदलूं शकतें हा त्याचा एक विशेष गुण आहे.

व्यापारी भांडवल हें स्वतः कोणताच वाढावा निर्माण करूं शकत नसल्यामुळें सरासरी नफ्याच्या रूपानें व्यापारांत जो वाढावा मिळत असतो तो एकंदर उत्पादक भांडवलाच्या वाढाव्याचाच एक भाग

असतो असें म्हणावें लागतें. पण व्यापारी भांडवल असा हा वाढा-ऱ्याचा वाटा स्वतःला कसा मिळवून घेतें हा प्रश्न आतां येथें उद्‌भवतो.

विक्रीमालाचें जें मूल्य असेल त्याहून अधिक किंमतीला तो माल विकून व्यापारी नफा मिळवीत असतात, हा समज शुद्ध भ्रम आहे.

व्यापारी जो माल विकतो त्या मालाच्या किंमतींतूनच त्याला आपला नफा मिळवितां येतो हें उघड आहे. तसेंच त्याला जो हा नफा मिळतो तो नफा मालखरेदीच्या किंमतीहून मालविक्रीची किंमत जितकी अधिक असते तितकाच असूं शकेल हेंही उघड आहे.

माल खरेदी केल्यापासून त्याची विक्री होईपर्यंतच्या काळांत त्यावर कांहीं जादा खर्च केला असणें शक्य आहे. असें असेल तेव्हां खरेदी-किंमतीपेक्षां विक्रीकिंमत जितकी अधिक असेल तितका तो सर्व नफा असणार नाहीं. सध्यां आपल्या विवेचनाच्या सोयीसाठीं खरेदीविक्रीच्या दरम्यान मालावर कोणताही जादा खर्च होत नाहीं असें आपण धरून चालूं.

आतां प्रश्न असा कीं व्यापाऱ्यानें मालाला जी किंमत दिली असेल त्याहून अधिक किंमतीला तो आपला माल विकूं शकतो कसा ?

धनोत्पादन करणारा जो भांडवलदार त्याच्या बाबतींतलें आपण या प्रश्नाचें उत्तर देऊन टाकलेंच आहे. त्यानें उत्पन्न केलेल्या मालाची त्याला पडलेली किंमत म्हणचे उत्पादनाच्या कार्यांत त्यानें वापरून टाकलेलें स्थिर भांडवल+चर भांडवल होय. या बेरजेंत सरासरी नफा मिळवला म्हणजे कारखानदाराच्या दृष्टीनें त्याच्या मालाची विक्री-किंमत ठरते. हिलाच आपण " उत्पादनाची किंमत " असें म्हटलें आहे. विक्रीमाल म्हणून उपलब्ध असलेल्या सर्व वस्तूंच्या किंमतींची बेरीज आपण केली तर ही बेरीज सर्व विक्रीमालांच्या खऱ्या मूल्या-इतकी असेल. म्हणजे त्या विक्रीमालांत अंतर्भूत असलेल्या एकूण

श्रमाइतकी ती बेरीज असेल. तेव्हां सध्यांच्या आपल्या चर्चेपुरतें बोलावयाचें तर कारखानदारांच्या सर्व विक्रीमालांची एकूण किंमत ही त्या विक्रीमालांच्या मूल्याइतकी असते. म्हणजेच या विक्रीमालांत अंतर्भूत असलेल्या श्रमाइतकी ती असते. उलट भांडवलदाराला पडलेली मूळ किंमत ही फक्त जेवढ्या श्रमाची मजूरी त्यानें दिली असेल तेवढीच असते.

परंतु विक्रीमालांची देवघेव करणारा जो व्यापारी त्याच्या बाबतींत असें घडत नाहीं. तो स्वतः माल उत्पन्न करीत नसून कारखानदारानें * त्याला जो माल विकला त्या मालाच्या विक्रीचें कार्य तसेंच पुढें चालू ठेवतो. मालविक्री होण्याचे पूर्वींच कारखानदाराचें हातीं मालाच्या स्वरूपांत वाढावा जमलेला असतो. विक्रीच्या कार्यानें तो फक्त वाढाव्याचें पैशांत रूपांतर करतो. व्यापाऱ्याला आपला माल विकून नफा मिळवावा लागतो. हा नफा कारखानदारानें लावलेली विक्रीची किंमत व्यापारी आणखी वाढवील तरच त्याला मिळेल. ज्याअर्थी सर्व विक्रीमालांच्या उत्पादनांच्या किंमती मिळून सर्व विक्रीमालांच्या एकूण मूल्याइतक्याच असतात त्याअर्थीं विक्रीमालांच्या ज्या खरोखर किंमती असतील त्याहून अधिक किंमतीला ते सर्व माल विकूनच व्यापाऱ्याला फायदा मिळवितां येणें शक्य आहे.

व्यापाऱ्यानें लादलेली ही अधिक किंमत वरवर पाहतां खरी वाटते. पण या वस्तुस्थितीकडे थोडें सूक्ष्मपणें पाहिल्यास हा भ्रम आहे असें

---

* वाचकांच्या हें लक्षांत आलेंच असेल कीं 'धनोत्पादन करणारा भांडवलदार' या लांबट शब्द योजण्याऐवजीं आम्ही 'कारखानदार' हा शब्द वापरीत आलों आहों. या शब्दानें जमीनीचें मालक वगैरेही जे जे कोणी भांडवल घालून धनोत्पादन करीत असतील ते ते सर्व वर्ग अभिप्रेत आहेत.

दिसून येतें. (येथें प्रश्न उत्पन्न होतो तो वैयक्तिक बाबींचा नसून एकंदर सरासरीचा होत असतो.)

व्यापारी हा जर आपला माल उत्पादनाच्या किंमतीपेक्षां १०% अधिक किंमतीनें विकील तर त्याला १०% नफा होईल असें आपण कां धरून चालतों? कारण कारखानदारानें व्यापाऱ्याला उत्पादनाच्या किंमतीला माल विकला असें आपण धरून चाललों आहों. पण येथें पुन्हां आपण ध्यानांत ठेवलें पाहिजे कीं उत्पादनाची किंमतही उत्पादनाचा खर्च अधिक सरासरी नफा यांबरोबर असते. याचा अर्थ असा कीं व्यापारी भांडवलाचा पृथक विचार न करतां जो सरसकट सर्व भांडवलावर नफा ठरेल त्याचाच अंतर्भाव असलेल्या उत्पादन किंमतीला कारखानदार व्यापाऱ्याला माल विकतो असें आपण धरून चालत आलो आहों. नफ्याचा सर्व सामान्य दर ठरवण्योंच कामीं व्यापारी भांडवल कांहींच कार्य करीत नाहीं असें आपण धरून चाललों आहों. पण हा समज अगदींच चुकीचा आहे.

आतां असें समजूं कीं एका वर्षांत उत्पादकभांडवल म्हणून ७२० डॉ. स्थिर भांडवल + १८० डॉ. चरभांडवल मिळून ९०० डॉ. (आकडे हजारांचे समाजावेत) आहे. वाढाव्याचा दरही १००% आहे; अर्थात उत्पन्न झालेल्या मालाची किंमत ७२० स्थि. भां. + १८० च. भां. + १८० वा. = १०८० आहे. नफ्याचा दर एकंदर भांडवलाचे बाबतींत अर्थातच १८०/९०० म्हणजे २०% पडतो. हा नफ्याचा सरासरी दर होय. पण आतां आपण आणखी असें समजूं कीं उत्पादनाच्या कामीं आपणाला ९०० भांडवल लागलें असतां त्याच मालाच्या व्यापाराच्या कामीं आपणांस १०० डॉ. भांडवल लागतें. नफ्याचा दर अर्थातच दोन्ही भांडवलांत सारखाच आहे. हें व्यापारी भांडवल १००० या एकूण भांडवलाच्या १/१० आहे. आणि

म्हणून १८० या वाढाव्याचा $\frac{१}{१०}$ नफा त्याला मिळतो. याचा परिणाम असा होतो कीं बाकीचें जें $\frac{९}{१०}$ भांडवल असतें, त्याच्या वाट्याला आतां फक्त १६२ च उरतात. म्हणजे ९०० वरही आतां १८% च नफा पडतो. आणि म्हणून कारखानदारानें उत्पन्न केलेला सर्व विक्रीमाल व्यापाऱ्याला जो विकला तो ७२० स्थि. भां + १८० च. भा. + १६२ वा. = १०६२ एवढ्यालाच विकला असें ठरतें. आणि व्यापाऱ्यानें आपलें १८% आपल्या १०० भांडवलांत मिळवले म्हणजे तो आपला माल १०६२+१८=१०८० याला विकतो असें ठरतें. ही विक्रीची किंमत त्या विक्रीमालांच्या मूल्याइतकीच असते. व्यापारी हा आपला नफा विक्रीमालांच्या खरेदीविक्रीच्याव्यवहारांतून त्याला पडलेल्या खरेदीकिंमतींत वाढ करण्यानें मिळवितो.

अशा प्रकारें व्यापारी भांडवलाचें हें एकंदर भांडवलाशीं जें प्रमाण असेल तितक्या प्रमाणांत तें नफ्याचा दर ठरविण्यास साहाय्यभूत होत असतें. व्यापारी भांडवलावर जो नफा मिळतो तो भांडवलाच्या सरासरी दरांत आपण वर अंतर्भूत केला आहेच.

म्हणून उत्पादक भांडवलदार केवळ उत्पादक या नात्यानें ज्या वेळीं आपला माल व्यापाऱ्याला विकत असतो त्यावेळीं तो विक्रीमालाच्या खऱ्या उत्पादनकिंमतीहून कमी किंमतीला तो विकत असतो. अथवा विक्रीमालांच्या एकूण मूल्यांची जर आपण बेरीज लक्षांत घेतली तर त्याहून कमी किंमतीला हा उत्पादक वर्ग आपला माल व्यापाऱ्याला विकीत असतो. वरील उदाहरणांतला व्यापारी त्याला डॉ. १०० किंमतीला पडलेला माल ११८ डॉ. ला विकून १८% नफा मिळवितो. पण त्यानें खरेदी केलेला विक्रीमाल १०० किंमतीचा नसून ११८ किंमतीचा असल्यामुळें तो व्यापारी विक्रीमालाच्या मूल्याहून अधिक किंमतीला आपला माल विकतो असें ठरत नाहीं.

एका दृष्टीनें पाहतां हा व्यापारी कामगार इतर रोजमजूराप्रमाणें एक रोज मजूरच असतो. या व्यापाऱ्याचें भांडवलही दोन प्रकारचें असतें. एका प्रकारानें त्याची व्यापारी पेढी उभारलेली असते. आणि दुसऱ्या प्रकारानें म्हणजे चर भांडवलानें हा व्यापारी आपणांस लागणारी श्रमशक्ति विकत घेत असतो. हे मजूर तो खाजगी कामासाठीं घेत नसून व्यापारांत त्यानें गुंतवलेलें जें भांडवल त्या भांडवलाचा उपयोग करण्यासाठीं नेमीत असतो. अर्थात त्यानें खरेदी केलेल्या श्रमशक्तीचें मूल्य म्हणजे त्याच्या मजूरांची मजूरीही, कारखानदारी मजूरांच्या मजूरीप्रमाणेंच, त्या श्रमाच्या फळावरून ठरत नसून खर्च होणाऱ्या श्रमशक्तीची भरपाई करण्यासाठीं जो खर्च लागेल त्यावरून ठरत असते.

## व्यापारी मजूर व कारखानदारी मजूर

पण व्यापारी व कारखानदार अथवा व्यापारी भांडवल आणि कारखानदारी भांडवल या दोहोंमध्यें जो फरक असतो तोच व्यापारी मजूर व कारखानदारी मजूर यांमध्यें राहणारच. कारण व्यापारी हा विक्रीमालाच्या विक्रीचा केवळ अडत्या म्हणून काम करतो. स्वतः मूल्य अथवा वाढावा कांहींही निर्माण करीत नाहीं. अर्थात व्यापारी मजूरही वाढावा निर्माण करूं शकत नाहींत....( कारखानदारी मजूराप्रमाणें येथेंही आपण मजूरांची मजूरी ही श्रमशक्तीच्या मूल्यावरून ठरते व अर्थातच व्यापारी हा मजूरांच्या श्रमफलांतून आपला वाटा काढून घेत नाहीं असें गृहीत धरलें आहे. )

या व्यापारी मजूरांच्या बाबतींत ते आपल्या मालकाला, स्वतः प्रत्यक्ष वाढावा निर्माण करीत नसूनही, नफा कसा मिळवून देतात या प्रश्नाचें उत्तर देणें मोठेसें कठीण नाहीं. वर आपण व्यापारी नफा

कोठून निर्माण होतो यासंबंधानें जी चर्चा केली त्यांत या प्रश्नाचें उत्तर आलेंच आहे. ज्याप्रमाणें उत्पादक भांडवलदार म्हणजे कारखानदार मालांत अंतर्भूत असलेलें पण मोफत मिळालेले श्रम विकून नफा मिळवितो त्याप्रमाणें व्यापारी हा कारखानदाराला मोफत मिळालेल्या श्रमाची अंशतः किंमत देऊन ते सर्व मोफत मिळालेले श्रम खरेदी करतो, आणि या सर्व मोफत श्रमाबद्दल मालविक्रीचें वेळीं भर किंमत घेऊन स्वतः नफा मिळवितो. उत्पादक भांडवल हें प्रत्यक्षपणें मोफत श्रम खिशांत घालून वाढावा निर्माण करतें. आणि व्यापारी भांडवल हें दुसऱ्यानें उत्पन्न केलेल्या वाढाव्याचा अंश स्वतःच्या खिशांत घालतें. व्यापाऱ्याला नफा किती व्हावा ही गोष्ट निरनिराळ्या व्यापाऱ्यांच्या बाबतींत प्रत्येकाचें खरेदीविक्रीचें भांडवल किती असेल यावर अवलंबून असते. आणि त्याच्या मजूरांचे मोफत श्रम त्याला जितके अधिक मिळतील तितकें त्याचें भांडवल अधिक मोठें असतें. व्यापारी भांडवलदाराला ज्या विशिष्ट कार्यानें नफा मिळतो तें कार्य त्यानें आपल्या मजूराकडेच बहुतेक सोंपवलेलें असतें. या मजूरांचे श्रम जरी वाढावा उत्पन्न करीत नाहींत तरी भांडवलदाराला वाढावा खिशांत घालण्यास मदत करतात. व्यक्तिशः भांडवलदाराच्या दृष्टीनें विचार केल्यास त्याला या फरकाचें महत्त्व कांहींच नसतें. असे मोफत श्रम हेंच त्या भांडवलदाराचें नफ्याचें साधन असतात. असें न घडेल तर व्यापारी व्यवहार मोठ्या प्रमाणावर केला जाणेंच शक्य नाहीं. भांडवलशाही भूमिकेवर एरवी व्यापार-धंदा होणारच नाहीं. उत्पादक मजूराचे मोफत श्रम हे ज्याप्रमाणें आपल्या मालकाला प्रत्यक्ष वाढावा निर्माण करून देत असतात त्याप्रमाणेंच या वाढाव्याचा कांहीं भाग व्यापारी मजूरांचे मोफत श्रम हे व्यापारी भांडवलदाराला मिळवून देत असतात.

व्यापारी मजूरासंबंधानें खरी अडचण असतें ती पुढील प्रकारची असते. स्वतः व्यापाऱ्याचा मजूर कोणतेंच मूल्य निर्माण करीत नाहीं. फक्त उपलब्ध असणाऱ्या वाढाव्यांतील कांहीं भाग तो आपल्या मालकास मिळवून देतो. तर मग हा व्यापारी भांडवलदार मजूरांना ज्या चरभांडवलांतून पैसे देतो त्या चरभांडवलाची अवस्था कोणती असते? हें चर भांडवल म्हणजे त्यानें गुंतवलेले व्यापारी भांडवलच काय? तसें नसेल तर नफ्याचा दर हा सर्वत्र समतोल राहतो हा सिद्धांत खोटा ठरेल. जर १५० भांडवल गुंतवून १०० भांडवलच गुंतवलें असें समजावयाचें असेल तर कोणता भांडवलदार असें भांडवल गुंतवील? उलट त्याचें चरभांडवल हिशेबांत घ्यावयाचें म्हटलें तर व्यापारी-भांडवलाच्या स्वरूपाशीं ही गोष्ट विसंगत वाटते. कारण व्यापारी भांडवल हे आपला नफा दुसऱ्याची श्रमशक्ति उत्पादनाच्या कामीं लावून मिळवीत नाहींत तर केवळ खरेदीविक्रीनें मिळवीत असतें.

## लहान व्यापारी-भांडवलाचे परिणाम

जर प्रत्येक व्यापारी स्वतःच्या श्रमानें जेवढें भांडवल व्यापारांत गुंतवून परत वसूल करतां येईल तेवढेंच बाळगील तर पुष्कळसें व्यापारी-भांडवल वाया जात राहील. अशा रीतीनें व्यापारी भांडवल हें, उत्पादनाचें क्षेत्र वाढत जाईल तसतसें, अधिकाधिक वाया जात राहील. यामुळें या दोन प्रकारच्या भांडवलांत वाढती विसंगती दिसूं लागेल. उत्पादनाच्या प्रक्रियेंत भांडवल जितक्या प्रमाणांत केंद्रीभूत होईल तितक्या प्रमाणांत व्यापारी भांडवल वाया जात राहील. त्यामुळें उत्पादक भांडवलदाराला आपला पुष्कळसा वेळ, श्रम व पैसा व्यापारी व्यवहारावरच खर्चावा लागेल. कारण १०० व्यापाऱ्या-ऐवजीं १००० व्यापाऱ्याशीं त्याला व्यवहार करावा लागेल. आणि

व्यापारी व्यवसाय कारखानदारीपासून अलग काढल्यामुळें जो फायदा व्हावयाचा तो बऱ्याच प्रमाणांत नष्ट होईल. त्यामुळें नुसता व्यापारी खर्च वाढेल असें नव्हे तर मालाचें वर्गीकरण, मालाची ने-आण वगैरे इतरही व्यापारी क्षेत्रांतला खर्च वाढेल. उत्पादक भांडवलाच्या दृष्टीनें हा विचार झाला.

आतां व्यापारी भांडवलाच्या दृष्टीनें विचार करूं. प्रथम केवळ व्यापारी कार्यच घेऊं. लहान आकड्यांचा हिशेब करण्याला जेवढा वेळ लागतो त्याहून अधिक वेळ मोठ्या आकड्यांचा हिशेब करण्याला लागत नाहीं. प्रत्येक १० डॉ. चा सौदा, असे १० सौदे करण्यास जेवढा वेळ लागेल त्यापेक्षां २५० डॉ. चा एकच सौदा करण्यास कमी वेळ लागतो. एका मोठ्या पेढीशीं व्यवहार करतांना पत्रें, तिकीटें, कागद वगैरेंची जी गरज लागेल त्याच्या दसपट गरज लहान लहान १० व्यापाऱ्याशीं व्यवहार करतांना लागते. व्यापारी पेढींत श्रमविभाग मर्यादित कां होईना पण असतो. एकजण हिशेबनीस असतो. दुसरा खजिनदार असतो, तिसरा पत्रव्यवहार करणारा असतो, चवथा माल-खरेदीदार असतो, पांचवा विक्रेता असतो, सहावा फिरिस्ता, असतो, इत्यादि प्रकारच्या या श्रमविभागानें श्रमाची बचत होते. यामुळें घाऊक व्यापारामध्यें गुंतलेले व्यापारी कामगार हे एकंदर धंद्याच्या मानानें फारच असतात. कारण उद्योगधंद्यापेक्षां व्यापारामध्यें एखादें कार्य लहान प्रमाणावर केलें अथवा मोठ्या प्रमाणावर केले तरी श्रम व वेळ तितकाच खर्च होत असतो. (म्हणून इतिहासामध्यें उद्योगधंद्यापेक्षां व्यापारांत केंद्रीकरण अधिक पूर्वी झालेलें दिसून येईल.) यानंतर स्थिर भांडवलाच्या खर्चाचा विचार करावा लागतो. लहान लहान शंभर कचेऱ्या एका मोठ्या कचेरीपेक्षां अधिक खर्चाच्या होतात तसेंच शंभर लहान लहान कोठारापेक्षां एक मोठी वखार कमी खर्चाची

असते. वहातुकीचा खर्च व्यापाऱ्याच्या धंद्यांत जो देतो तो व्यापार लहान लहान प्रमाणावर केला असतां अधिक वाढत जातो.

उत्पादक भांडवलदाराला त्याच्या खरेदीविक्रीचा व्यवहार लहान लहान प्रमाणावर होईल तर अधिक श्रम व अधिक मजूरी खर्चावी लागते. मोठ्या प्रमाणांत होणाऱ्या व्यापारांत वापरलेलें भांडवल जर लहान लहान व्यापाऱ्यांत वाटलें गेलें तर त्यामुळें त्याचें परिमाण वाढवावें लागतें. तेवढाच व्यापार व त्या व्यापारांतलीं तितकींच कार्ये पार पाडण्यासाठीं मजूरांची अधिक मोठी संख्या लागते. तितक्याच मालाची खरेदीविक्री करण्याकरतां मोठ्या व्यापाऱ्यापेक्षां अनेक लहान व्यापाऱ्यांना खूप अधिक भांडवल लागतें. मालाच्या खरेदीविक्रींत गुंतवलेल्या व्यापारी भांडवलाला आपण **बी** ( ठळक ) म्हणूं. आणि व्यापारामध्यें गुंतवलेल्या मजूरांना द्यावयाच्या मजूरीच्या चरभांडवलाला 'बी' म्हणूं. जर **बी** हें भांडवल लहान लहान एकेका व्यापाऱ्याचें असतें, आणि त्याच्या व्यापारांत 'बी' मुळींच नसता म्हणजे त्यानें मजूर मुळींच लावले नसते तर **बी** + 'बी' ही बेरीज या लहान व्यापाऱ्याच्या **बी** पेक्षां कमी झाली असती.

पण आपण अजून आपली खरी अडचण निवारली नाहीं.

व्यापाऱ्यानें मालविक्री केली असतां त्याला जी किंमत येईल ती किंमत **बी** + 'बी' यावर जो सरासरी नफा यायला हवा तो देण्याइतकी असली पाहिजे. येथें वाचक घोटाळ्यांत पडेल. मालविक्रीची किंमत मालाच्या मूल्याइतकी असतें असें आपण धरून चाललों आहोंत. व्यापारी भांडवल म्हणजे **बी** हें एकंदर भांडवलाच्या सरासरी नफ्यांतला वाटा कसा मिळवितें हें आपण पाहिलेंच आहे. मालविक्रीच्या किंमतींत हा सरासरी नफा असतोच, पण 'बी'ची परिस्थिति काय असते ? मजूरांना देण्यासाठीं जें 'बी' भांडवल खर्च

केलें त्यावरचा नफा बीच्या नफ्याहून भिन्न अशा प्रकारें कसा मिळतो? खरोखर 'बी' वरील नफा हा मालविक्रीची किंमत कृत्रिमपणें वाढवून मिळवलेला असावा असें वाटतें. पण आपण येथें हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं बी + 'बी' ही बेरीज ज्याच्या संगतींत 'बी' नाहीं अशा बीपेक्षां लहान असते. बीच्या सहकार्यानें एकंदर भांडवलावर जो सरासरी नफा मिळविलेला असतो तो 'बी'वरील नफा हिशेबांत घेण्यासही पुरेसा असतो.

पण मालविक्रीची किंमत ही नुसता 'बी'वरील नफा मिळविण्या-इतकी असण्यानें भागत नसून तिनें 'बी' म्हणजे व्यापारी मजूरांना दिलेली मजूरी भरून काढण्याचें काम केलें पाहिजे. आणि अडचण खरी आहे ती येथेंच आहे.

मालविक्रीची किंमत ही मालाच्या मूल्याइतकी असते असें मानलें तर आपण चर्चा करीत आलों आहों, त्या भांडवलशाहीच्या सर्व अवस्था लक्षांत घेतां या विक्रींतून मालाचा मूळ खर्च आणि व्यापारी भांडवल व त्यावरील नफा या सर्वांची भरपाई होते. आणि यामध्यें मिळणारा व्यापारी नफा हा व्यापाऱ्यानें मजूरांना दिलेल्या मजूरीवर नफा मिळण्यासही पुरेसा असतो. परंतु येथें प्रश्न असा कीं व्यापाऱ्याचें चरभांडवल म्हणजे त्यानें मजूरीदाखल केलेला खर्च हा विक्रीकिंमतींत कसा अंतर्भूत होतो? व्यापारी हा मजूर कामावर नेमतो व त्याचा पगार देतो एवढ्याचमुळें कृत्रिमतेनें हा मजूरीचा खर्च विक्रीच्या किंमतींत तो अंतर्भूत करूं शकतो काय? किंवा आपल्या नफ्यांतूनच त्यानें हीं मजूरी द्यावी आणि तितक्या प्रमाणांत आपला नफा कमी करून घ्यावा असें घडतें काय?

व्यापारी हा 'बी' भांडवलानें जें खरेदी करतो तें केवळ व्यापारी श्रम असतात, मालाला पैशाचें स्वरूप देणें आणि पैशाला मालाचें

स्वरूप देणें हें तें काम असतें असें आपण धरून चाललों आहोंत. आणि म्हणून हे श्रम मूल्याचें फक्त रूपांतर करतात, मूल्य निर्माण करीत नाहींत असें आपण समजतों आहों. पण असले श्रम न केले गेले तर व्यापारी भांडवल आपलें कार्य करूंच शकणार नाहीं आणि अर्थात त्यामुळें एकूण भांडवलाच्या नफ्याचा सरासरी दर नियंत्रित करण्याचें काम त्याला करतां येणार नाहीं, समाजांतील एकूण भांडवलावरील नफ्याचा वाटाही त्याला मिळणार नाहीं.

आतां आपण **बी** हें १०० आहे असें धरूं. तसेंच 'बी' हे १० आहे आणि नफ्याचा दर १०% आहे असें समजूं. (येथें आपण धंद्याच्या इतर खर्चाचा विचार बाजूस ठेऊन आपलें हिशेबाचें काम सोपें करूं. कारण या इतर खर्चाचा आपल्या समोरील अडचणींशीं कांहींही संबंध नाहीं. व्यापाऱ्याचें स्थिरभांडवल हें फार फार तर कारखानदारानें स्वतःच व्यापाराचें काम केलें असलें तर त्याच्या व्यापारी भांडवलाइतकें असेल अथवा कदाचित कमीही असेल.)

व्यापाऱ्यानें कोणीही मजूर नेमले नाहींत अर्थात 'बी'चा खर्च त्याला नाहींच. तरीपण मजूरांनीं करावयाचें काम करावें लागणारच. व्यापाऱ्याला तें स्वतःच करावें लागेल. **बी** (१००) च्या खरेदीविक्रीसाठीं व्यापाऱ्याला आपला वेळ घालवावा लागेल, त्याचा सर्व वेळ तो यांत घालवतो असें आपण समजूं. अर्थात 'बी'नें उल्लेखिलेल्या कामाचा खर्च नफ्यांतून मिळेल. अर्थात यासाठीं दुसरें एक १०० व्यापारी भांडवल आहे असें गृहीत धरावें लागतें. हें दुसरें **बी** (१००) विक्रीमालाच्या विक्रीच्या किंमतींत अंतर्भूत होऊं शकत नाहीं. पण याचप्रमाणें १०% नफा हाही त्यांत अंतर्भूत होऊं शकणार नाहीं. म्हणजे आतां व्यापाराच्या दोन प्रक्रिया आपल्यासमोर येतात. १०० हें मूळ भांडवल

बरोबर २००. हे दोनशेंचा माल खरेदी करतात व + २० नफा मिळून २२० होतात. हें अर्थात अशक्य होय.

व्यापारी भांडवल हें वास्तविक उत्पादक भांडवलांतून अलग काढलेलें भांडवल असतें म्हणून हीं दोन भांडवलें अजून भिन्न झालेलीं नाहींत अशा अवस्थेमध्यें आपण वरील प्रश्नाचें उत्तर शोधण्याचा प्रयत्न करूं. खरोखर वस्तुस्थिति अशी असते की उत्पादक भांडवलदार हाही आपल्या कचेरींत व्यापारी मजूर नेमीत असतोच. म्हणून आपण प्रथम 'बीं' ही जी मजूरी हा कारखानदार स्वतः देतो तिचा विचार करूं.

कारखानदाराच्या एकंदर कारखान्याच्या मानानें त्याची ही व्यापारखात्याची कचेरी अतिशय लहान असते. उत्पादनाचा व्याप वाढत जाईल त्या प्रमाणांत उत्पादकभांडवल मालविक्री होऊन पुनः-पुन्हां परत वसूल होण्यासाठीं व्यापारी व्यवहाराचें क्षेत्र वाढलें पाहिजे. उत्पन्न झालेल्या मालाची विक्री आणि कच्च्या मालाची खरेदी तसेंच एकंदर व्यवहाराचा हिशेब ठेवणें या कार्यासाठीं व्यापारशाखेचें कार्य वाढलें पाहिजे. या व्यापारव्यवहारांत किंमतींचा हिशेब इतर सर्व प्रकारचा हिशेब, आर्थिक व्यवस्था, पत्रव्यवहार इत्यादि गोष्टींचा समावेश होत असतो. या कार्यासाठीं व्यापारी मजूर नेमणें अवश्य होतें. हीं माणसें म्हणजेच कारखानदाराची व्यापारशाखेची कचेरी असते. नोकरांना जी मजूरी दिली जाते ती सामान्य मजुरांना दिलेल्या मजुरीसारखीच असते तरी उत्पादक मजुरांसाठीं खर्च केलेल्या चर भांडवलाहून ती भिन्न असते. कारखानदाराला व्यापारशाखेकडे ही जी मजूरी खर्चावी लागते त्यामुळें त्याच्या वाढाव्यांत भर पडत नाहीं. अशा प्रकारचा सर्व खर्च त्याचा नफ्याचा दर मात्र कमी करीत असतो. वाढावा कांहीं वाढवीत नाहीं. आणि म्हणून कारखानदार हा

असला खर्च शक्य तितका कमी करण्यासाठीं झटत असतो. उत्पादक भांडवल हें अशा प्रकारें आपल्या उत्पादक मजूरांहून वेगळ्या दृष्टि-कोनानें व्यापारशाखेकडील मजूरांशीं वागतें. इतर परिस्थिति कायम आहे असें धरून चाललें असतां उत्पादक मजूरांची संख्या जितकी अधिक तितकें मालाचें उत्पादन अधिक. आणि वाढावा अथवा नफाही तितक्या प्रमाणांत अधिक होत असतो. उलट मालाची उत्पत्ति जितकी अधिक होईल तितकी, मूल्य आणि वाढावा पैशाच्या स्वरूपांत वसूल करण्यासाठीं, मालविक्रीही अधिक करावी लागते. अर्थात् यामुळेंच कचेरीखर्च ( सापेक्षतेनें नव्हे तरी एकंदरीनें ) वाढत असतो. आणि यामुळें श्रमविभागाचा अवलंब होऊन व्यापारी भांडवल उत्पादक भांडवलांतून वेगळें निघतें. अशा या कचेरीखातीं म्हणजे व्यापारखातीं खर्च होणारा पैसा नफ्यांतूनच वसूल केला जातो ही गोष्ट, व्यापारशाखेंतील अधिकाऱ्यांना पगाराऐवजीं अंशतः नफ्यांतली भागी दिली जाते, यावरून उघड होते. व्यापारी व्यवहार पुष्कळ होतो म्हणून पुष्कळ मूल्य निर्माण होतें असें नव्हे तर उलट फार मोठ्या प्रमाणावर मूल्यनिर्मिती होत असते, म्हणून त्याची खरेदीविक्री, हिशेब वगैरे संबंधींचे व्यापारी व्यवहार मोठ्या प्रमाणावर करण्याची आवश्यकता उत्पन्न होत असते. खरेदीविक्रीव्यवहारा-संबंधींच्या इतर खर्चांचेंही असेंच आहे. खूप मालाचें वजन करणें, त्याचें माप करणें, गठ्ठे बांधणें, वाहतूक करणें या सर्व व्यवहारासाठीं आधीं खूप माल उत्पन्न व्हावा लागतो. गठ्ठे बांधणें, वाहतूक करणें यासाठीं जितके श्रम करणारे लोक उपलब्ध असतील त्यांना तें काम करण्यास अवश्य इतका माल निर्माण केला जात नसून माल निर्माण केला गेला म्हणजे त्याला अवश्य इतके गठ्ठे बांधणारे, वाहतूक करणारे मजूर नेमले जात असतात.

व्यापारी मजूर हा प्रत्यक्षपणें वाढावा निर्माण करीत नाहीं. त्याच्या श्रमशक्तीची किंमत ही त्या श्रमशक्तीच्या मूल्यावरून म्हणजे तिच्या उत्पादनखर्चावरून ठरत असते. पण त्या श्रमशक्तीचा उपयोग तिच्या मूल्याच्या निर्मितीपुरताच होत नाहीं. इतर सर्व मजूराप्रमाणें श्रमशक्तीच्या मूल्यनिर्मितीस लागणाऱ्या वेळाहून अधिक वेळ त्या श्रमशक्तीचा वापर केला जातो. म्हणून व्यापारी मजूर हा आपल्या भांडवलदारास पैशाच्या स्वरूपांत जितका नफा मिळवून देतो त्या नफ्याच्या प्रमाणांत या मजूराची मजूरी असतेच असें नाहीं. भांडवलदाराला या मजूरासाठीं जो मजूरीचा खर्च पडतो आणि या मजूरापासून तो जें मिळवितो त्या दोहोंचीं परिमाणें अगदीं वेगळीं असतात. मजूराचें कांहीं श्रम त्याला मोफत मिळतात; यामुळें वाढाव्याचें पैशांत रूपांतर करण्याचा भांडवलदाराला पडणारा जो खर्च तो मजूर कमी करीत असतो. व्यापारी मजूर हा अधिक पगार मिळविणाऱ्या वर्गातला मजूर असतो. त्याच्या अंगीं विशेष गुण असल्यानें तो सर्वसामान्य मजूराहून अधिक उच्च दर्जाचा असतो. कचेरींतच घडणाऱ्या श्रमविभागामुळेंही हें दृश्य निर्माण होत असतें. यामुळें त्या कामगाराच्या अंगीं एकाच प्रकारचे विशेष गुण निर्माण होत असतात. कामगाराची जी एकांगी कर्तबगारी वाढत असते त्यामुळें व्यापाऱ्याला खर्च कांहींच पडत नाहीं. कारण या कामगाराची ही कर्तबगारी तो रोज रोज तेंच तेंच काम करीत राहण्यानेंच वाढत जाते. त्याचा कामाचा वेग वाढत असतो, व गुणही वाढत असतात. श्रमविभागपद्धति वाढत गेल्यानें आपोआपच ही प्रगती होत जाते. दुसरी गोष्ट अशी कीं व्यापारी कामगाराला आवश्यक असें प्राथमिक ज्ञान, व्यापारासंबंधीच्या चालचलाऊ कामाची माहिती, विदेशी भाषांचें ज्ञान या सर्वांचा सतत प्रसार होत आहे. शिक्षणाच्या अधिक सोयी

कमी खर्चांत वाढत आहेत. शास्त्रीय प्रगति होत आहे. शिक्षण-पद्धतीही सुधारत आहेत. भांडवलशाही उत्पादन जसजसें वाढत आहे तसतसें व्यावहारिक शिक्षणही वाढत आहे. शिक्षणाचा प्रसार झाला म्हणजे पूर्वीं जीं माणसें व्यापार शाखेंत नसून जुनाट पद्धतीनें जीवनक्रम हाकीत होतीं अशीं माणसें व्यापारशाखेंत येऊं लागतात. बौद्धिक शिक्षण सार्वत्रिक होण्यानें व्यापारी धंद्यांतही उमेदवारांची गर्दी होऊन चढाओढ तीव्र होत जाते. म्हणून कांहीं अपवाद वगळ-ल्यास व्यापारी कामगारांच्या श्रमशक्तीचें मूल्य भांडवलशाही उत्पा-दनाच्या विकासाबरोबरच कमी होत जातें. त्यांची मजूरीही उतरते. पण त्याबरोबरच त्यांच्या श्रमाची वाकबगारी मात्र वाढत जाते.*

उत्पादक भांडवलाशीं व्यापारी भांडवलाचा जो संबंध असतो तो लक्षांत घेऊन व्यापाराचा विचार केला असतां त्यापासून वाढावा निर्माण होत नाहीं हें सहज लक्षांत येतें. कारखान्याच्या व्यापारी शाखेच्या कचेरीचा खर्च हा नफा कमी करीत नाहीं असें कोणीच म्हणणार नाहीं. वरवर पाहतां घाऊक व्यापाऱ्याच्या बाबतींत ही

* फ्रेड्रिक एंजल्सनें लिहिलेली टीप: “ १८६५ मध्यें मार्क्सनें हा मजकूर लिहिला होता. व्यापारी कामगारासंबंधाची त्याची ही भविष्यवाणी आज ( १८९४ ) शेकडों जर्मन कारकुनाच्या उदाहरणानें खरी ठरली आहे. तीन तीन, चार चार भाषा येणारे जर्मन कारकून लंडनच्या रोखे बाजारांत आठवड्याला २५ शि. पगारासाठीं अर्ज करतात. आणि तरीही त्यांना रोजगार मिळत नाहीं. ही मजूरी एखाद्या यंत्रज्ञाला मिळणाऱ्या मजूरीहून कमी असते. ’ मार्क्सनें “ कॅपिटल ”च्या वरील मजकुराचें हस्तलिखित लिहिल्यानंतर दोन पानें कोरी जागा टाकली आहे. त्यावरून याविषयाची त्याला पुन्हां केव्हा तरी अधिक चर्चा करावयाची असावी असें दिसते.

गोष्ट खोटी वाटते. त्याच्या बाबतींत व्यापार व्यवहाराचें भांडवल फारच मोठें असतें. कारण निरनिराळ्या कारखान्यामध्यें असणाऱ्या व्यापारी कचेऱ्यांचें काम स्वतंत्रपणें व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्याला करावें लागतेंच. शिवाय एकूण सर्व व्यापारांच्यासाठींही करावयाचें जें खरेदीविक्रीचें काम तेंही हा व्यापारी करीत असतो. पण अशाप्रकारें स्वतंत्र धंदा म्हणून व्यापारी व्यापार करीत असला तरी तेवढ्यामुळें एकंदर वस्तुस्थिति मुळींच बदलत नाहीं. कारखानदाराच्या कारखान्यांत व्यापारीशाखा म्हणजे खरेदीविक्रीची शाखा असो अथवा व्यापारी हा एक स्वतंत्र व्यवसायी असो त्याच्या हातून होणारा खर्च हा अनुत्पादक खर्च आहे असेंच उत्पादक भांडवलदाराला वाटत असते. स्वतः व्यापाऱ्याला आपल्या व्यवहारांत होणारा खर्च हा नफ्याचें साधन आहे असें वाटतें. कारण समाजांतील एकूण भांडवलावर मिळणाऱ्या सरासरी नफ्यांतला वाटा व्यापाऱ्याला मिळत असून तो त्याच्या खर्चाच्या प्रमाणांत त्याला मिळत असतो. अर्थात व्यापारी भांडवलदाराच्या दृष्टीनें त्यानें गुंतवलेलें भांडवल हें उत्पादक भांडवल होय. आणि म्हणून त्यानें मजूरीस लावलेले व्यापारी मजूरही त्याच्या दृष्टीनें उत्पादक मजूर होत.

---

## व्यापारी भांडवल व मालाची किंमत : : २५*

१ पौंड साखरेचा उत्पादनखर्च जर ५ डॉ. असेल तर व्यापारी ५०० डॉ.ला १०० पौं. साखर खरेदी करील. हा माल जर तो खरेदी करून १ वर्षात विकील व सरासरी नफ्याचा दर १५% असेल तर ५०० डॉ. वर तो ७५ डॉ. किंमत अधिक आकारील. व १ पौंड साखरेची विक्रीची किंमत ५·७५ डॉ. घेईल. पण १ पौंड साखरेची उत्पादन किंमत जर २५ सें.इतकी उतरेल तर त्या व्यापाऱ्याला ५०० डॉ.ला २००० पौं. साखर मिळेल, आणि मग तो ती साखर २८·३ सें.ला १ पौंड या दरानें विकेल. दोन्ही दरांत वार्षिक नफा ७५ डॉ.च राहील. पहिल्या दरांत त्याला १०० पौंड साखर विकावी लागेल तर दुसऱ्या दरांत त्याला २०० पौंड साखर विकावी लागेल एवढाच फरक. ( येथें आम्ही साठवणें, वाहून नेणें वगैरेचा खरेदी-विक्री व्यवहारांतला खर्च विचारांत न घेतां निवळ खरेदीविक्रीचाच विचार करतों आहों. )

---

* कॅपिटल, खंड ३, प्रकरण १८.

उत्पादनाचा खर्च पुष्कळ आहे अथवा थोडा आहे या गोष्टीचा नफ्याच्या दराशीं कांहींच संबंध येत नाहीं. तथापि प्रत्येक पौंडाच्या खरेदी-किंमतीवर व्यापारी हा स्वतःच्या नफ्यासाठीं विक्रीच्या वेळीं जी अधिक किंमत आकारतो ती किंमत आकारतांना उत्पादनाचा खर्च किती हा मुद्दा व्यापाऱ्याच्या दृष्टीनेंही निर्णायक असतो.

पूर्वी डच ईस्ट इंडिया कंपनीच्या वेळीं व्यापाऱ्यांना मक्ते दिले जात. आणि या व्यापारी मक्त्याच्या बळावर ते उत्पादनाच्या क्षेत्रांतही मक्तेदारी उत्पन्न करीत. ही मक्तेदारी लक्षांत न घेतां खुल्या व्यापाराच्या परिस्थितीचा आपण विचार करीत आहों. अशा खुल्या व्यापारांत एखाद्या व्यापाऱ्याला खूप विक्रीमालावर अगदीं थोडा नफा घेणें अथवा अगदीं थोड्या मालावर खूप नफा घेणें याचें पूर्ण स्वातंत्र्य असतें असें मानणें हा मूर्खपणा होय. कारण विक्री-मालाच्या उत्पादनाची जी किंमत ती ठरविणेंही त्याच्या हातीं नसतें तसेंच नफ्याचा सरासरी दर ठरविणेंही त्याच्या हातीं नसतें. ( येथें आपण सर्वसामान्य व्यापाराचा विचार करीत आहों. सट्टेबाजीचा विचार करीत नाहीं. )

म्हणून उत्पादक भांडवल आणि व्यापारी भांडवल यांमधील फरक आतां पुढीलप्रमाणें सांगतां येईल. उत्पादक भांडवलाचा आवर्त जितका लवकर लवकर घडून येईल तितका तितका त्या-पासून उत्पन्न होणाऱ्या नफ्याचा संचय वाढेल. एखाद्या धंद्यांत जी अनेक लहान मोठीं भांडवलें घातलेलीं असतात, त्या भांडवलांनीं उत्पादनाच्या कार्यांत जें कमीअधिक प्रमाणांत कार्य केलें असेल त्यावरून त्यांचा नफा वाटला जात नसून त्या भांडवलांचे आकार जसे कमीअधिक असतील त्या प्रमाणांत त्यांना नफा वाटला जातो. हा नफा सरासरी नफ्याच्या दराचा हिशेब करून त्या अनुसार

वाटला जातो. परंतु एकूण उत्पादक भांडवलाचे आवर्त जितके अधिक होतील तितका नफ्याच्या दर ( इतर परिस्थिति कायम आहे असें धरून चालून ) मोठा असेल. अर्थात् एकूण नफाही पुष्कळ असेल.

पण व्यापारी भांडवलाचे बाबतींत ही परिस्थिति वेगळी असते. व्यापारी भांडवलाचा नफ्याचा दर अमुक एक इतका ठरलेला असतो. एका बाजूनें उत्पादक भांडवलावर येणाऱ्या नफ्यानें तो ठरतो. आणि दुसऱ्या बाजूनें एकूण व्यापारी भांडवल उत्पादक भांडवलाच्या मानानें किती आहे यावरूनही तो ठरत असतो. या व्यापारी भांडवलाचे आवर्त जितके होतील तितका त्यांचा या व्यापारी भांडवलाच्या एकूण भांडवलाशीं असणाऱ्या संबंधावर निर्णायक परिणाम होत असतो. कारण व्यापारी-भांडवलाचे आवर्त जितके जलद होतील तितका त्याचा आकार स्वतंत्रपणें व सापेक्षतेनेंही लहान असतो. ( समाजांत उपलब्ध असलेल्या एकूण भांडवलाशीं तुलना करतां हा आकार लहान असतो. )

समाजांत उपलब्ध असलेल्या एकूण भांडवलाशीं त्याच समाजांतील व्यापारी भांडवलाचें प्रमाण अमुक इतकें आहे असें धरून चाललें असतां व्यापाराच्या निरनिराळ्या शाखेंतील भांडवलांचे आवर्त कमी अथवा अधिक झाले तरी व्यापारी भांडवलावर मिळणारा एकूण नफा अथवा सर्वसामान्य नफ्याचा दर यांत कमीअधिकपणा येत नाहीं. व्यापाऱ्याचा नफा हा मालरूपीं भांडवलाचे जे आवर्त घडवून आणतो त्यावर ठरत नसून हे आवर्त घडवून आणण्यासाठीं तो जे पैसारूपीं भांडवल देत असतो त्या पैशाच्या परिमाणावर ठरत असतो. नफ्याचा वार्षिक सरासरी दर जर १५% असला आणि व्यापाऱ्यानें जर ५०० डॉ. भांडवल घातलें असलें तर त्याचें भांडवल दरसाल १ आवर्त करीत असल्यास त्याला त्याचा माल ५७५ डॉ. ला

विकावा लागेल. जर त्याच्या भांडवलानें वर्षात ५ आवर्त केले तर तो ५०० डॉ. ला खरेदी केलेला माल प्रत्येक वेळीं ५१५ डॉ. किंमतीला व याप्रमाणें वर्षातून ५ वेळां विकेल. म्हणजे २५०० डॉ. चा माल २५७५ डॉ. ला तो साऱ्या सालांत विकेल. पण यावरून दरसाल दरशेंकडा १५ हाच नफ्याचा दर त्याच्या पदरांत पडतो. असें जर न घडतें व व्यापारी भांडवलानें जितके आवर्त करावे तितक्या प्रमाणांत त्याचा नफा वाढावा असें झालें असतें तर उत्पादक भांडवलापेक्षां व्यापारी भांडवलांत नफा अधिक पडला असता. सरासरी नफ्याचा जो सिद्धांत तो त्यानें बाधित झाला असता.

व्यापाराच्या निरनिराळ्या शाखांतील भांडवलांच्या आवर्तांचा होणारा परिणाम मालांच्या विक्रीकिंमतीवर असा प्रत्यक्षपणें होत असतो. दरसाल व्यापारी भांडवलांचे आवर्त जितके अधिकाधिक जलद होत जातील तितकी प्रत्येक वेळीं मालाची विक्रीकिंमत कमी प्रमाणांत वाढविली जाईल.

व्यापारी विक्रीमालाची किंमत उत्पादन खर्चावर जी अधिक आकारीत असतो तिची शेकडेवारी व्यापारी भांडवलाचे आवर्त जितके कमीअधिक असतील त्याप्रमाणें अनुक्रमें अधिककमी होत असते. उदा. वार्षिक सरासरी नफ्याचा दर १५% आहे असें समजा. जर व्यापारी भांडवलाचा १ आवर्त १ वर्षात झाला तर मूळ किंमतींत १५% वाढ व्यापारी करील. पण १ वर्षात ५ आवर्त झाले तर ३% वाढ होईल.

व्यापारी भांडवलाहून औद्योगिक भांडवलाची बाब या आवर्तासंबंधानें भिन्न असते. समाजांत एकूण उपलब्ध असलेल्या औद्योगिक भांडवलाचे आवर्त कितीही जलद किंवा उशीरा होवोत त्याचा उत्पन्न

होणाऱ्या मालाच्या मूल्याच्या परिमाणावर कांहींच परिणाम होत नाहीं. अर्थात समाजांतील सर्व भांडवलाचा विचार न करतां अमुक एका विवक्षित भांडवलाच्या आवर्तांचा विचार केला तर त्याचे आवर्त जितके जलद अथवा उशीरा होतील तितक्या प्रमाणांत त्यांचा मूल्यावर व वाढाव्यावर परिणाम होतोच. कारण श्रमशक्ति त्याप्रमाणांत अधिक अथवा कमी वापरली जाते. समाजांतील सर्व भांडवलांचे आवर्त, जलद अथवा उशीरा होण्याचा परिणाम उत्पन्न मालाच्या मूल्यावर होत नाहीं ही गोष्ट लक्षांत येत नाहीं; कारण निरनिराळ्या मालांची उत्पादनकिंमत आपण लक्षांत घेतों तेव्हां त्या मालांच्या मूल्यावर त्या त्या मालांच्या भांडवलांच्या आवर्तांच्या जलद अथवा उशीरा होण्याचा परिणाम झालेला दिसून येतो. पण याचें कारण निरनिराळ्या मालांच्या उत्पादन किंमती ( मागें आपण चर्चिलेल्या सिद्धांताअनुसार ) त्यांच्या मूल्याहून भिन्न असतात. पण वेगवेगळ्या मालांचा विचार न करतां एकंदर सर्व उत्पादनपद्धतीचा आपण विचार केला, म्हणजे एकंदर औद्योगिक भांडवलानें निर्माण केलेल्या सर्व विक्रीमालांचा विचार केला तर आपणाला एकंदर सर्व भांडवलाचे आवर्त जलद अथवा उशीरा होण्याचा परिणाम मालांच्या मूल्यावर होत नाहीं हें लक्षांत येईल.

याप्रमाणें समाजांतील एकूण उत्पादक भांडवलाच्या आवर्तांच्या मालाच्या मूल्यावर काय परिणाम होतो याचें सूक्ष्म परीक्षण करूं लागलें म्हणजे विक्रीमालाचें मूल्य त्यांत अंतर्भूत असलेल्या श्रमवेळेवरून ठरतें. या अर्थशास्त्रांतल्या सर्वसामान्य अशा मूलभूत सिद्धांताकडे आपण परत येतों. पण व्यापारी भांडवलाच्या आवर्तांच्या व्यापारी नफ्यावर होणाऱ्या परिणामाचा विचार करूं लागलें म्हणजे मालांचे बाजारभाव ठरविणें ही गोष्ट व्यापाऱ्यांच्या केवळ इच्छेवर

अवलंबून असते असा समज होतो. अमुक इतका नफा दरसाल मिळवायचाच असा निश्चय व्यापारी करतात, म्हणून ते मालाच्या अमूक इतक्या किंमती ठेवतात असें वाटतें. उदा० १५% नफा दरसाल मिळवायचा असें ठरवून वर्षांतून पांच वेळां व्यापारी–भांडवलाचा आवर्त घडवून आणतांना प्रत्येक वेळीं खरेदीच्या किंमतीवर ३% वाढ व्यापारी करीत असतो असें आपण समजत असतों. अशा प्रकारें खरेदीविक्रीच्या व्यवहारानें मालाच्या किंमती ठरत असतात. कांहीं मर्यादेपलीकडे उत्पादनावर किंमती अवलंबून असत नाहींत अशी समजून असते.

व्यापारी, रोखेबाजारांतील सट्टेवाले, बँकवाले वगैरे सर्वांचा समज असा असतो पण तो साफ खोटा आहे. उलट कारखानदारांच्या ज्या समजुती असतात खऱ्या असूनही त्या, मालाच्या खरेदीविक्रीच्या व्यवहाराच्या विशिष्ट स्वरूपामुळें आणि व्यापारी व कारखानदार या दोघांच्या भांडवलामिळून सरासरी नफ्याचा दर ठरत असल्यामुळें, खोट्या ठरत असतात. कारखानदाराचें चढाओढीसंबंधीचें जें मत असतें तेंही चुकीचें असतें. मूल्य आणि वाढावा अमुक इतक्या मर्यादेपर्यंत असणार हें ठरून चुकलें म्हणजे सगळ्या निरनिराळ्या भांडवलांच्या मूल्यांचें रूपांतर उत्पादनकिंमतींत व मागाहून व्यापारी किंमतींतही कसें होत असतें, व सर्व वाढाव्याचें रूपांतर सरासरी नफ्यांत कसें होत असतें हें सहज लक्षांत येईल. परंतु मूल्य आणि वाढावा यांची ही मर्यादा लक्षांत आल्यावांचून चढाओढीमुळें नफ्याचा सर्वसामान्य दर एकाच पातळींत कां येतो, ही पातळी अमुक इतकी विशिष्टच कां असते, खालीं अथवा वर कां असत नाहीं, उदा. १५% नफ्याचा दर कां व्हावा आणि १५००% कां होऊं नये हें समजूं शकत नाहीं. चढाओढीमुळें नफ्याचा दर सरसकट एकाच पातळीवर

येईल. पण ही पातळी कोणती असेल हें चढाओढ ठरवूं शकत नाहीं. ( ही पातळी कोणती हें वस्तूंत अंतर्भूत असलेली श्रमवेळच ठरवते. ) म्हणून व्यापारी भांडवलाच्या दृष्टीनें भांडवलाच्या आवर्तावरूनच मालांच्या किंमती ठरत असतात असें वाटतें.

एकच औद्योगिक भांडवल ( इतर सर्व परिस्थिति विशेषतः त्या भांडवलाचा स्थिरचर संबंध कायम आहे असें धरून चालून ). एका वर्षांत दोन आवर्तांऐवजीं चार आवर्त करील तर त्यापासून दुप्पट वाढावा व अर्थात नफाही तें मिळवील. या भांडवलाची जी सुधारलेली उत्पादनपद्धति असेल तिची एकप्रकारें राखीव हक्कदारीच या भांडवलाला मिळालेली असेल तर या भांडवलाचे आवर्त भराभर घडवून आणण्याचें कार्य त्याला सहज करतां येतें. व्यापाराच्या निरनिराळ्या शाखांतल्या निरनिराळ्या भांडवलांच्या आवर्तांचें वेगवेगळे परिणाम त्या भांडवलांच्या वेगवेगळ्या नफ्यांत दिसून येतात. कारखानदारांच्या मालरूपी भांडवलाच्या आवर्तांचा नफ्यावर होणारा परिणाम हा व्यापाऱ्याच्या पैसारूपीं भांडवलाच्या आवर्ताशीं व्यस्त प्रमाणांत असतो. आणि म्हणून किरकोळ मालविक्री करणाऱ्या व्यापाऱ्याला ‘ आपल्या भांडवलाचे खूप आवर्त करावेत आणि प्रत्येक वेळीं नफा थोडथोडा घ्यावा ’ हें एक मोठें उच्च तत्त्व आहे असें वाटत असतें.

अमुक एका धंद्यामध्यें गुंतवलेल्या सर्व भांडवलांच्या सर्व आवर्तांच्या सरासरी संबंधानें हा सिद्धांत खरा ठरतो हें लक्षांत ठेवलें पाहिजे. अ आणि ब हे एकाच शाखेंतले दोन व्यापारी आहेत. व्यक्तिशः त्यांच्या भांडवलाचे आवर्त सर्व भांडवलाच्या सरासरी आवर्ताहून कमी अथवा अधिक होतील. पण त्याचमुळें इतर व्यापाऱ्यांच्या भांडवलांचे आवर्त अनुक्रमें अधिक अथवा कमी होतील. पण ह्या भिन्नतेमुळें त्या शाखेंतील एकंदर भांडवलाच्या आवर्तांच्या

सरासरीवर कांहींच परिणाम होत नाहीं. निरनिराळ्या भांडवलांच्या आवर्तांची भिन्नता ही व्यक्तिशः त्या त्या व्यापाऱ्यांच्या हिताहिताची निर्णायक असते. चढाओढीनें कित्येक वेळां नफ्याच्या सरासरी दराखालीं न जातां, पण इतर चढाओढवाल्यांच्यापेक्षां कमी किंमतीनें एखाद्या व्यापाऱ्याला आपला माल विकावा लागतो. ज्या परिस्थितीमुळें आपल्या भांडवलांचे आवर्त अधिक जलद घडवून आणतां येतील अशी परिस्थिति—उदा. मालविक्री करण्यास उत्तम अशी एखादी इमारत—तो जास्त भाडें देऊन खरेदी करील. आणि इतरांच्याहून जो अधिक नफा त्याला मिळतो त्यांतल्या कांहीं भागाचें घरभाड्यांत रूपांतर करील.

---

# व्यापारी भांडवलाचा ऐतिहासिक विकास : २६*

नफ्याचा सर्वसामान्य दर कसा ठरतो या गोष्टीचा निवळ शास्त्रीय दृष्टीनें विचार केला असतां, उत्पादक भांडवल हें त्याचें आरंभस्थान आहे, व निरनिराळ्या उत्पादक भांडवलांच्या चढाओढीनें हा दर ठरत असतो असें वाटतें. व्यापारी भांडवलानें बऱ्याच उशीरां पुढें येऊन या नफ्याचा दर ठरण्याच्या प्रक्रियेंत "दुरुस्ती" केली, तिला पूर्णता आणली, अथवा तिच्यांत बदल केला असावा असा समज होतो. पण ऐतिहासिक दृष्टीनें पाहतां वस्तुस्थिति याच्या अगदीं उलट आहे.

आपण आतांपर्यंत केलेल्या चर्चेवरून एक गोष्ट उघड होते कीं खाणी काम, शेती, गुरें पाळणें, कारखानदारी, मालांची वाहतुक यासारखीं कामें करणाऱ्या उत्पादक भांडवलाप्रमाणें व्यापारी भांडवल उत्पादक असतें असें मानणें हें चूक आहे. प्रत्येक भांडवलाला आपला माल विकतांना आणि कच्चामाल खरेदी करतांना व्यापारी भांडवलाची

* कॅपिटल, खंड ३, प्रकरण २०.

कामें स्वत:साठीं करावीं लागतातच, यावरूनही व्यापारी भांडवल हें उत्पादक भांडवल नव्हे ही गोष्ट लक्षांत येईल. व्यापारी भांडवल हें उत्पादक भांडवलापासून अलग काढलेलें व म्हणून स्वतंत्र भांडवल असतें. तें विक्रीमालाचें रूपांतर पैशांत व पैशाचें रूपांतर विक्रीमालांत करण्याचें कार्य करीत असतें.

येथपर्यंत आपण व्यापारी भांडवलाचा जो विचार केला तो भांडवलशाही पद्धतीच्या दृष्टीनें व तिच्या कक्षेपुरताच केला. तथापि केवळ व्यापारच नव्हे तर व्यापारी भांडवलही भांडवलशाही पद्धतीहून प्राचीन आहे. ऐतिहासिकदृष्ट्या व्यापारी भांडवल हें सर्वांत अधिक प्राचीन असें स्वतंत्र भांडवल होय.

व्यापारी भांडवलाचें कार्य सतत मालाची खरेदीविक्री आणि विनिमय करीत राहणें एवढेंच असल्यानें या व्यापारी भांडवलाच्या अस्तित्वाला मालाच्या साध्या देवघेवीचा व पैशाचा व्यवहार अस्तित्वांत असावा लागतो. प्रत्यक्ष ऐनजिनसी देवघेवीचे व्यवहारही अस्तित्वांत असावे लागतात. याहून अधिक सुधारलेल्या परिस्थितीची मात्र मुळींच गरज नसते. विक्रीमालाचा पुरवठा करणारी उत्पादन-संघटना अगदीं प्राचीन ग्रामसमाजाची असो, अथवा गुलामगिरीची असो, अथवा स्वतंत्र शेतकऱ्याची असो, अथवा भांडवलशाहीची असो; तसेंच सर्वच्या सर्व उत्पन्न होणारा माल विक्रीसाठीं येणारा असो, अथवा उत्पादकांच्या गरजेहून अधिक उरेल तेवढाच माल विक्रीसाठीं येणारा असो; असल्या कोणत्याही उत्पादनव्यवस्थेंत मालाची खरेदीविक्री ही व्हावीच लागते, म्हणजे मालांचा विनिमय व्हावाच लागतो. या खरेदीविक्रीचें म्हणजे विनिमयाचें माध्यम व्यापारी भांडवल हें असतें.

व्यापाऱ्याच्या हातीं खरेदीविक्रीसाठीं किती माल येत असतो ही गोष्ट उत्पादनपद्धति कोणती असेल त्यावर अवलंबून आहे. उत्पादनपद्धति पूर्ण विकसित अशा भांडवलशाहीची असली म्हणजे जवळ जवळ उत्पन्न होणारा प्रत्येक माल विक्रीमालच असतो. कोणीही स्वतःच्या चरितार्थासाठीं स्वतः माल निर्मीत नाहींत. अर्थात या भांडवलशाहींत व्यापाऱ्याच्या हातीं खरेदीविक्रीसाठीं जास्तींत जास्त माल येऊन पडत असतो. उलट उत्पादनपद्धति कोणतीही असो व्यक्तिशः उत्पादकाला ज्या गरजा असतील त्याहून अधिक माल निर्माण करण्याचें उत्तेजन व्यापारामुळें उत्पादकाला मिळत असतें. अधिक माल निर्माण करून व तो विकून धनाचा साठा करावा, अथवा अधिक उपभोग घ्यावा अशी ईर्षा उत्पादकाचे ठिकाणीं व्यापारामुळें उत्पन्न होत असते. म्हणून जेथें जेथें व्यापार अस्तित्वांत असेल तेथें उत्पादनप्रक्रियेवर अधिकाधिक प्रमाणांत विनिमयमूल्याचा ठसा उमटला जात असतो.

ज्या समाजामध्यें विक्रीमालाचा विनिमय घडवून आणण्याचें कामीं व्यापारी हा मध्यस्थ म्हणून काम करीत असतो, ती समाजव्यवस्था कोणतीही असो, त्या व्यापाऱ्याची दौलत ही पैशाच्या स्वरूपांत असते आणि त्याचा पैसा भांडवलाचेंच काम करीत असतो. म्हणजे थोड्या पैशाचा अधिक पैसा करणें, वाढावा मिळवीत राहणें हें काम त्याचा पैसा करीत असतो. व्यापारी मालाचा विनिमय घडवून आणण्याचें कामीं जो पैसा गुंतवीत असतो त्याचा हेतु थोड्या पैशाचा अधिक पैसा करणें हाच असतो. ही गोष्ट केवळ भांडवलशाही समाजव्यवस्थे पुरतीच खरी नसून कोणत्याही प्राचीन समाजव्यवस्थेसंबंधानें तितकीच खरी आहे. विनिमयाच्या अनेक प्रक्रियांतील, पैसा देऊन विक्रीमाल घ्यावा ( पै.–वि. मा. ) आणि विक्रीमाल विकून अधिक पैसा मिळवावा

( वि.मा.–पै. ) या विविध प्रक्रिया एकाच रूपांतराच्या म्हणजे पैशाचा अधिक पैसा करण्याच्या ( पै.–पैं. ) निरनिराळ्या अवस्था आहेत. व्यापारी भांडवलाचा स्वाभाविक अवस्थाक्रम म्हणजे पै.–वि.मा.–पैं. ( पैसा–विक्रीमाल–अधिकपैसा ) हा असतो. एक उत्पादक जेव्हां दुसऱ्या उत्पादकाशीं प्रत्यक्षपणें आपल्या मालाचा विनिमय करीत असतो त्या वेळचा क्रम व्यापाऱ्याच्या क्रमाहून वेगळा म्हणजे वि.मा.--पै.--वि.मा. (विक्रीमाल–पैसा–विक्रीमाल ) असा असतो. कारण व्यापाऱ्याचा अंतिम हेतु थोड्या पैशाचा अधिक पैसा करणें हा असून आपसांत विनिमय करणाऱ्या उत्पादकांचा हेतु उपभोग-मूल्यांची अदलाबदल करणें एवढाच असतो.

उत्पादनपद्धति जितकी मागासलेली असेल तितका प्रत्यक्ष उत्पादकाजवळ पैसा कमी असतो. आणि व्यापाऱ्याच्या हातीं पैशाच्या स्वरूपांतील धन पुष्कळ असतें. व्यापाऱ्याचें हें पैसारूपीं धन व्यापारी भांडवल म्हणून पुढें येतें.

## तेव्हां आणि आतां

अशा प्रकारें भांडवलशाही समाजव्यवस्थेपूर्वी भांडवलाला व्यापार हें एकच खरें कार्य व त्याचें खरें ध्येय होतें. उत्पादनपद्धति ही प्रत्यक्ष उत्पादकांना चरितार्थसाधनें पुरविणारी होती. यामुळें भांडवलाला उत्पादनाचें कांहींच कार्य पडत नसे. त्याकाळीं व्यापारी भांडवलाहून दुसरें भांडवल अस्तित्वांतच नसे. पण आजच्या भांडवलशाही कालखंडांत भांडवल हें उत्पादनकार्याचा ताबा घेते. आणि उत्पादनपद्धतींत बदलही करते. यामुळें व्यापारी कार्य हें भांडवलाची एखादें विशिष्ट कार्य होऊन राहून भांडवलाचीं इतर स्वरूपें व कार्य व्यापाराच्या बरोबरच अस्तित्वांत राहतात.

## भांडवलशाहीपूर्वी व्यापाऱ्याचें अस्तित्व

यांप्रमाणें इतिहासामध्यें भांडवलानें उत्पादनपद्धतीचा ताबा घेण्यापूर्वी कित्येक वर्षें व्यापारी भांडवल अस्तित्वांत कां होतें हें सहज समजूं शकतें. उलट वस्तुस्थिति इतिहासदृष्ट्या अशी आहे कीं भांडवलशाही उत्पादनपद्धति उत्पन्न होण्यासाठींही कांहीं मर्यादेपर्यंत व्यापारी भांडवलाची प्रगति झालेली असली पाहिजे. याचें पहिलें कारण असें कीं भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या जन्मापूर्वी अवश्य असणारा केंद्रीकृत पैसा हा व्यापारी भांडवलानेंच निर्माण होतो. तसेंच दुसरें कारण असें कीं भांडवलशाही उत्पादनापूर्वी मालाची वाटणी प्रत्यक्ष उपभोक्त्या गिऱ्हाइकामध्यें एकदम न करतां घाऊक व्यापारामध्यें होण्याचा प्रघात उत्पन्न झालेला असावा लागतो. व्यापारी भांडवल अस्तित्वांत आल्यानेंच ही गोष्ट शक्य होते. म्हणून भांडवलशाही उत्पादनपद्धतीपूर्वी व्यापारी हा अस्तित्वांत यावाच लागतो. तो स्वतःच्या वैयक्तिक गरजा भागविण्यासाठीं माल खरेदी करीत नसून अनेकांच्या गरजा भागवण्यासाठीं मालांची खरेदीविक्री करणारा मध्यस्थ असा तो असतो. व्यापारी भांडवलाची वाढ होऊं लागली म्हणजे उत्पादनप्रक्रियेवर अधिकाधिक प्रमाणावर विनिमयमूल्याचा ठसा उमटूं लागतो. याचाच अर्थ उत्पन्न होणारा माल अधिकाधिक प्रमाणांत विक्रीमालाचें स्वरूप धारण करीत असतो. पण केवळ व्यापारी भांडवलाच्या विकासानेंच एका उत्पादनपद्धतींतून दुसरी उत्पादनपद्धति निघेल हें मात्र अशक्य होय. पुढें या प्रश्नांची चर्चा यावयाची आहे.

## व्यापाऱ्याची प्रतिगामी प्रवृत्ति

भांडवलशाही उत्पादनपद्धतींत व्यापारी भांडवलाचें पूर्वींचें स्वतंत्र अस्तित्व नष्ट होऊन एकंदर समाजांतील भांडवल जें गुंतवलें जातें

त्यांपैकीं भांडवल गुंतविण्याचा एक विशिष्ट प्रकार असें स्वरूप या व्यापारी भांडवलास येत असते. तसेंच नफा सारखा होण्याच्या भांडवलशाही उत्पादनाच्या प्रवृत्तीमुळें व्यापारी नफ्याचा दरही सरासरी नफ्याच्या मर्यादेला येऊन बसतो. आणि अशा प्रकारें व्यापारी भांडवल हें आतां उत्पादक भांडवलाचा केवळ एजंट म्हणून काम करतें. व्यापारी भांडवलाच्या विकासाबरोबरच जी विशिष्ट सामाजिक परिस्थिति निर्माण झाली होती ती आतां मुळींच निर्णायक ठरत नाहीं. उलट ज्या ज्या ठिकाणीं अजूनही व्यापारी भांडवल हें प्रभावी आहे तेथें आतां अगदीं प्राचीन समाजव्यवस्था अस्तित्वांत आहे. एका राष्ट्रांतही निरनिराळ्या दोन स्थळांत हा फरक दिसून येतो. उदा. जेथें केवळ व्यापारी शहरेंच आहेत असें भाग आणि ज्या शहरांत कारखानदारी पुढारलेली आहे असें भाग यांमध्यें तीव्र फरक दिसल्या-वांचून रहात नाहीं. इंग्लंडच्या आधुनिक इतिहासांत ज्याला व्यापारी वर्ग असें यथार्थतेनें म्हणतां येईल तो वर्ग आणि व्यापारांतच पुढारलेलीं शहरें हीं प्रतिगामी असून जमीनदार व बँकवाले यांच्या साहाय्यानें प्रगतिपर अशा औद्योगिक भांडवलदारास विरोध करतात. लिव्हरपूल हें व्यापारासाठीं प्रसिद्ध असलेलें शहर मँचेस्टर व बर्मिंगहॅम या कारखान-दारीच्या व प्रगतिपर अशा शहरांना राजकारणांत विरोध करतें. इंग्लंडांत धान्यावरील आयात जकातीचे कायदे रद्द झाल्यानंतर मग व्यापारी आणि बँकवाले यांनीं औद्योगिक भांडवलदारांचें वर्चस्व कबूल केलें.

व्यापारी भांडवलाला स्वतंत्र अस्तित्व असलें व तें भांडवलच प्रभावी असलें तर उत्पादनावर अजून भांडवलाची पकड बसली नाहीं असा याचा अर्थ होय. यावरून व्यापारी भांडवलाची स्वतंत्र वाढ होणें ही गोष्ट एकंदर समाजाच्या सर्वांगीण आर्थिक विकासाशीं व्यस्त प्रमा-णांत असते हें लक्षांत येईल.

## हॉलंडचें वैभव कसें वाढलें

व्हेनीस, जिनोआ, हॉलंड इ. ठिकाणच्या वाहतुकीच्या व्यापारावरून वरील दृश्य खरें असल्याचें दिसून येतें. या शहरांनीं व देशांनीं जो वाहतुकीचा व्यापार केला त्या व्यापारांत त्यांच्या स्वदेशाच्या मालाची निर्यात फारच थोडी असेल. त्यांना मुख्यतः व्यापारांत जो नफा मिळेल तो आर्थिक दृष्ट्या मागसलेल्या समाजांच्या मालांच्या खरेदीविक्रीपासून व अर्थात व्यापारी मार्गानें या दोनही देशांची पिळणूक करून मिळत असे.* येथें आपणांला उत्पादन-पद्धतीपासून अजिबात सुटे असे निर्भेळ व्यापारी भांडवल पहावयास मिळतें. व्यापारी भांडवलाचा जो आरंभ झाला तो मुख्यतः या परिस्थितींतूनच झाला. पण ही मालाची नेआण करण्याची हक्कदारी

* "व्यापारी शहरांतले नागरिक धनोत्पादक अशा धनवान शहरापासून भारी किंमतीच्या चैनीच्या वस्तू खरेदी करीत. आणि त्या बड्या जमीन-दाराना विकून त्या जमिनदाराच्या गर्विष्ठपणास खुलवीत असत. हे जमिनदार हावरेपणानें या मूल्यवान वस्तु घेत आणि त्याबदला आपल्या इस्टेटींतून वाटेल तितका कच्चा माल या व्यापाऱ्यांना घेऊं देत. अशा प्रकारें त्या वेळच्या युरोपांतला व्यापार, आर्थिक उत्पादनांत पुढारलेल्या एका मुलुखांतला माल दुसऱ्या मागासलेल्या मुलुखांत नेऊन तेथला कच्चामाल पुढारलेल्या मुलखांत पोंचवणें या प्रकारचा, असे. ही अभिरुचि एकंदर समाजात अधिकाधिक वाढून सार्वत्रिक झाली व पक्क्या मालाला मागणी वाढली तेव्हा व्यापारी शहरांतील नागरिकांनीं आपला मालखरेदीचा खर्च कमी करण्यासाठीं मागणी असलेल्या मालांचे कारखाने आपल्या नियंत्रणाखालीं आपल्याच देशांत काढले." (अॅडम स्मिथ् वेल्थ ऑफ् नेशन्स्: बुक ३ चॅ. ३)

आणि त्यायोगें केला जाणारा व्यापार या दोन्ही गोष्टी त्या त्या देशांची आर्थिक परिस्थिति सुधारत चालली कीं नाहींशा होतात.

## व्यापारी हा मध्यस्थ

सकृद्दर्शनी, उत्पन्न झालेला माल जर त्याच्या मूल्याला विकला जाईल तर व्यापारी नफा होणें अशक्य आहे असें वाटतें. व्यापाराचा सिद्धांत 'स्वस्त घ्या आणि महाग विका' असा आहे. सारख्या मूल्याशीं अदलाबदल करा असा नाहीं. अगदीं पहिल्यानें किती मालाचा किती मालाशीं विनिमय व्हावा ही गोष्ट निवळ तवकलीची असते. मालांचा विनिमय सतत होऊं लागला म्हणजे व अर्थात विनिमयासाठींच मालाची उत्पत्ति होऊं लागली म्हणजे हळू हळू ही परिस्थिति नाहींशी होते. पण तरी सुद्धां प्रत्यक्ष उत्पादक हा प्रत्यक्ष उपभोक्त्याला जेव्हां माल विनिमयानें देतो त्यावेळीं ही तवकलीची परिस्थिति पहिल्या पहिल्यानें नाहींशी होत नाहीं. उत्पादकांच्या मालांचा विनिमय मध्यस्ताच्या म्हणजे व्यापाऱ्याच्यामार्फत होऊं लागला म्हणजे मात्र तवकलीची परिस्थिति राहात नाहीं. व्यापारी हा पैशाच्या स्वरूपांत किंमती एकमेकांस ताडून पाहतो आणि दोन किंमतींतला फरक खिशांत टाकतो.

प्राचीन काळीं बरेच प्रगति पावलेले असे जे स्वतंत्र व्यापारी असत त्यांचा व्यापार अनेक धनोत्पादक समाजामध्यें त्यांच्या त्यांच्या मालाची नेआण व खरेदीविक्री करून चालत असे. हे उत्पादक समाज मागासलेले असल्यानें व्यापारी हे त्यांच्या मालाच्या खरेदीविक्रीसाठीं मध्यस्ताचें काम करीत.

## व्यापाराचें समाजावर प्रभुत्व

भांडवलशाही समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत म्हणजे पश्चिम युरोपांत मध्ययुगामध्यें व्यापारानें उद्योगधंद्यावर प्रभुत्व स्थापलेलें

आढळतें. आधुनिक जगांत याच्या उलट प्रकार आहे. ज्या दोन समाजांच्या मालांचा विनिमय व्यापारामुळें होतो त्या समाजावर त्या व्यापाराचा परिणाम होतोच. व्यापार हा वाढत्या प्रमाणांत उत्पादनाला विनिमयमूल्याच्या कक्षांत आणतो. कारण त्या त्या समाजांतील व्यक्तींना जे उपभोगाचे जिन्नस व चरितार्थाचे जिन्नस मिळावयाचे ते आतां वाढत्या प्रमाणांत प्रत्यक्ष उत्पादनापासून मिळेनातसे होऊन विक्रीमालाच्या विक्रीपासूनच मिळणें शक्य होऊं लागतें. यामुळें प्रत्यक्ष चरितार्थासाठीं व उपभोगासाठीं माल उत्पन्न करावा ही जुनी परिस्थिति नाहींशी होऊन विक्रीसाठीं माल निर्माण करावा अशी नवी परिस्थिति निर्माण होते. यामुळें पैशाचा व्यवहार वाढत जातो. यामुळें व्यापार हा त्या त्या समाजास जरूर असलेल्याहून अधिक अशा उत्पन्न झालेल्या मालावर आपला ताबा बसवतो, इतकेंच नव्हेतर हळूहळू सर्व उत्पादन पद्धतीवरच हल्ला चढवून उत्पादनाच्या एकीमागून एक अशा सर्व शाखा आपल्या लगामीं आणतो. अर्थात व्यापाराचें जुन्या समाजाचें स्वरूप बदलून टाकण्यासारखें हें जें वर्चस्व तें बव्हंशीं त्या त्या उत्पादक समाजाचें स्वरूप कसें असेल त्यावर अवलंबून राहतें.

## व्यापारी लुटारू होते

निरनिराळ्या मागासलेल्या अशा उत्पादक समाजांच्या मालांची मध्यस्थ या नात्यानें देवघेव करणें एवढेंच कार्य जोंवर व्यापारी भांडवल करीत असतें तोंवर व्यापारी भांडवलाचा नफा हा केवळ फसवाफसवी सारखा असलेला दिसतो, इतकेंच नव्हेतर वस्तुस्थितिही खरोखर फसवाफसवीचीच असते. जेथें जेथें व्यापारी भांडवलाला अद्वितीय प्रभुत्व प्राप्त होतें तेथें खरोखर हें भांडवल लूटमारच करीत असतें. या व्यापारी भांडवलाच्या विकासकालांत प्राचीन काळीं व आधुनिक

काळींही लूटमार, चांचेगिरी, माणसें पळवून त्यांना गुलाम करणें, मागसलेल्या मुलुखावर जुलूम करणें असले प्रकार घडले आहेत. प्राचीन कार्थेज व रोम येथें हेंच झालें. व्हेनीस्, पोर्तुगॉल, हॉलंड, वगैरे ठिकाणच्या व्यापाऱ्यांनीं हेंच केलें.

## व्यापारी भांडवलाचे परिणाम

व्यापारी भांडवलाचा जसजसा विकास होत जातो तसतशी सर्वत्र विनिमयमूल्यें उत्पन्न करण्याकडे उत्पादनाची प्रवृत्ति होत जाते. त्याचप्रमाणें उत्पादनाचें प्रमाण व विविधता वाढवून त्याला जागतिक स्वरूप देण्याचें काम व्यापाराच्या विकासामुळेंच होत असते. पैशालाही त्यामुळेंच जागतिक पैशाचें स्वरूप येतें. याप्रमाणें उपयोगमूल्यें निर्माण करण्याचे उत्पादन प्रकार निरनिराळ्या स्वरूपांत जेथें जेथें असतात तेथें तेथें त्या त्या उत्पादन संघटनांचें स्वरूप कमीअधिक प्रमाणांत बदलून टाकण्याचें कार्य व्यापार करीत असतो. या जुन्या उत्पादक समाजांची संघटना ज्या प्रमाणांत कमीअधिक मजबूत असेल त्याच्या व्यस्त प्रमाणांत त्या संघटनेचें रूपांतर करण्यांत व्यापाऱ्याला यश येतें. तसेंच व्यापारानें जुन्या समाजाचें मूळचें रूप नष्ट केलें तरी त्यास नवें स्वरूप कोणतें यावयाचें ही गोष्ट केवळ व्यापारानें ठरत नसून मूळची उत्पादनसंघटना कशी असेल त्यावर ही गोष्ट अवलंबून असते. प्राचीन काळीं व्यापार व व्यापारी भांडवलाचा विकास यांचा परिणाम निश्चितपणें गुलामगिरींत होत असे. पहिल्यानें कित्येक ठिकाणीं फक्त चरितार्थापुरती संपत्ति उत्पन्न करण्याच्या भूमिकेवर जी कौटुंबिक गुलामगिरी होती तिचें रूपांतर व्यापारी भांडवलानें वाढावा निर्माण करण्याच्या गुलामगिरींत केलें. उलट आधुनिक काळांत व्यापारी भांडवलाच्या विकासामुळें भांडवलशाही उत्पादनपद्धति निर्माण होत आहे. अर्थात व्यापारी

भांडवलाचे हे परिणामसुद्धां केवळ व्यापारी भांडवलाच्या विकासाहून अन्य कारणामुळेंही घडून येत असत हें उघड आहे.

## रानटी टोळ्यांतही व्यापाराची वाढ

खेड्यांतील शेतीस जोडलेले घरगुती उद्योगधंदे नाहीसे होऊन शहरी धंदे सुरू झाले व अशा प्रकारें शेती आणि उद्योगधंदे यांची फारकत झाली म्हणजे शहरी उद्योगधंद्यांच्या मालाला सहजच विक्री-मालाचें स्वरूप येतें. आणि आरंभापासूनच त्यांच्या विक्रीसाठीं व्यापाराच्या मध्यस्तीची गरज उत्पन्न होते. येथून व्यापाराचा विकास हा शहरी जीवनाच्या प्रगतीवर अवलंबून असतो व उलट शहरांची वाढ ही व्यापाराच्या प्रगतीवर अवलंबून राहते. तरीपण व्यापाराची प्रगति व औद्योगिक प्रगति ही एकमेकांच्या साहाय्यानें कितपत होऊं शकतात हें इतर अनेक प्रकारच्या भिन्न भिन्न परिस्थितीवर अवलंबून राहते. रोमन प्रजासत्ताकांच्या पुढल्या पुढल्या काळांत रोमचें व्यापारी भांडवल खूपच प्रगति पावलें होतें, पण त्या प्रमाणांत औद्योगिक वाढ मुळींच झाली नव्हती. उलट कॉरिंथमध्ये आणि ग्रीसच्या दुसऱ्या कांहीं शहरांत व आशियामायनरमध्येंही व्यापाराची जशी वाढ झाली तशीच उद्योगधंद्यांची वाढ झालेली होती, उलट शहरांच्या विकासाची परिस्थिति जेथें मुळींच नाहीं अशा रानटी टोळ्यांत व्यापाराची भावना आणि व्यापारी भांडवलाचा विकास पुष्कळ असल्याचें दिसून येईल.

## क्रांत्यांचा व्यापारावर परिणाम

१६व्या व १७व्या शतकांत पुष्कळसे भौगोलिक शोध लागल्या-मुळें व्यापारांत ज्या अनेक क्रांत्या झाल्या, व ज्यामुळें व्यापारी भांडवलाचा भराभर विकास होत गेला त्यामुळें सरंजामी समाजाचें रूप बदलून भांडवलशाही उत्पादनपद्धति अस्तित्वांत आली ही गोष्ट

निःसंशय खरी आहे. ( आणि यामुळेंच अगदीं मूलभूत असे अनेक चुकीचे ग्रह निर्माण झालेले आहेत. ) व्यापाराचा जागतिक स्वरूपांत अकस्मात झालेला विस्तार खरेदीविक्रीच्या व्यवहारांत आलेल्या विक्रीमालांची विविधता, आशियांतील माल व आशियांतील संपत्ति तसेंच मागसलेल्या राष्ट्रांतील सत्ता आपल्या हातीं घेण्याबाबत युरोपियन राष्ट्रांत झालेली स्पर्धा वगैरे सर्व गोष्टींची, उत्पादनपद्धतीवर सरंजामशाहीनें घातलेलीं बंधनें तोडून टाकण्यास, फार मदत झाली. तथापि हस्तव्यवसायी कारखानदारी ही जी हल्लींच्या उत्पादनपद्धतीची प्राथमिक अवस्था तिचा विकास ज्या ठिकाणीं मध्ययुगानें अनुकूल परिस्थिति निर्माण केली होती तेथेंच झाला. उदा. हॅलंड व पोर्तुगाल यांची तुलना केली असतां ही गोष्ट लक्षांत येईल.* आणि जर १६ व्या शतकांत व अंशतः १७ व्या शतकांतही व्यापाराचा अकस्मात् झालेला विस्तार आणि जगाचें हातीं आलेले नवे बाजार यामुळें जुनी उत्पादनपद्धति नष्ट होऊन भांडवलशाही

* हॉलंडच्या प्रगतीस इतर अनेक गोष्टी कारण होत्या खऱ्याच; तथापि मच्छीमारी, हस्तव्यवसायी कारखानदारी, शेती, वगैरे गोष्टी या प्रगतीची विशेष प्रभावी कारणें ठरल्या. १८व्या शतकांतील लेखकांनीं ही वस्तुस्थिति स्पष्ट करून सांगितली होती. पूर्वी आशियाशीं चालू असलेला व्यापार, प्राचीन काळचें व्यापारी दळणवळण आणि मध्ययुगांतील व्यापार याचे मानवी उन्नत्तीच्या दृष्टीनें असलेलें फार मोठें महत्त्व पुरेसें लक्षात घेतलें जात नाहीं, अशी पूर्वी एक तक्रार असे. उलट हल्लीं व्यापाराचें हें महत्त्व फार फाजील प्रमाणात मानलें जात आहे. पण हें चुकीचें मत दुरुस्त करण्यासाठीं १८ व्या शतकाच्या आरंभीं इंग्लंडचा असलेला आयात निर्यात व्यापार आणि सध्यांच्याकाळीं ( १८६५ ) असलेला आयात निर्यात व्यापार याची तुलना करून पहावी. त्यावेळीं इंग्लंडचा आयात निर्यात व्यापार हा कोणत्याही प्राचीन व्यापारी राष्ट्रांच्या व्यापारापेक्षां मोठा होता.

उत्पादनपद्धति निर्माण झाली असली तर ही गोष्ट एकदां भांडवलशाहीपद्धति अमलांत आल्यानंतर तिच्या भूमिकेवर व्यक्त प्रमाणांत झाली. या आधुनिक उत्पादनपद्धतीचा पाया जागतिक बाजार हाच आहे. उलट भांडवलशाही उत्पादन पद्धतीच्या अंगभूत असलेला गुण म्हणजे उत्पादनाचें प्रमाण एकसारखें वाढवीत नेण्याची जी आवश्यकता तीमुळें जागतिक बाजाराचा सतत विस्तार करीत न्यावा लागतो. यामुळें, व्यापार हा उद्योगधंद्याच्या क्रांतीस कारण होत नसून उद्योगधंदे हे व्यापाराच्या क्रांतीस कारण होतात हें स्पष्ट होतें. हल्लीं व्यापारांत जें प्रभुत्व मिळतें तें प्रभुत्व आधुनिक उद्योगधंद्यांत एखाद्या देशास किती प्रभुत्व आहे तेवढ्या प्रमाणांतच मिळूं शकतें. इंग्लंड व हॉलंड यांची उदाहरणादाखल तुलना केल्यास ही गोष्ट सहज कळून येते. प्रमुख व्यापारी राष्ट्र या नात्यानें हॉलंडचा जो मोठा दर्जा होता तो हळू हळूं कमी होत आला याचें कारण उत्तरोत्तर व्यापारी भांडवलाला औद्योगिक भांडवलाहून कमी दर्जाचें स्थान मिळत गेलें.

## हिंदुस्तान चीनवर भांडवलशाहीचें आक्रमण

व्यापारामुळें जुन्या समाजव्यवस्थेचें जें रूपांतर होत होतें त्याला भांडवलशाहीपूर्वीच्या उत्पादनपद्धतीच्या मजबूत संघटनेनें निरनिराळ्या देशांत कसा विरोध झाला त्याचा इतिहास इंग्लंडचा हिंदुस्थान व चीन यांशीं जो संबंध आला त्याच्या इतिहासांत पहावयास मिळतो. हिंदुस्थान व चीन यांसारख्या देशांमध्यें लहान प्रमाणावरील शेती व घरगुती उद्योगधंदे यांचा संयोग हीच उत्पादनपद्धतीची भूमिका होती. हिंदुस्थानांत विशेषतः जमिनीच्या सामुदायिक मालकीवर आधारलेली ग्रामसंस्था असे. ही ग्रामसंस्था हाच चीनमधील आर्थिक संघटनेचा मूळ प्रकार होता. हिंदुस्थानांत इंग्रजांनीं राजकीय व आर्थिक

दडपण एकदम वापरून स्वतःला राज्यकर्ते व जमिनीच्या खंडाचे मालक असे दोन्हीही दर्जे मिळविले. आणि त्यांच्या साहाय्यानें या छोट्या छोट्या ग्रामसंस्था उध्वस्त करून टाकल्या. या बाबतींत इंग्रजांच्या व्यापारानें हिंदुस्थानच्या या उत्पादनपद्धतीवर विध्वंसक परिणाम घडविला असें दिसत असलें तर त्याचें कारण इंग्रजांच्या मालाच्या किंमती कमी असत हें होय. इंग्रजांच्या स्वस्त कापडापुढें देशी सुताचे व विणकामाचे धंदे ठार झाले व ग्रामसंस्थांच्या चिंधड्या झाल्या. हा जुन्या समाजाचा विध्वंस हा अगदीं हळू हळू व क्रमाक्रमानें होत होता. चीनमध्यें प्रत्यक्ष राजकीय दडपण इंग्रजांना प्रत्यक्षपणें अमलांत आणतां आलें नाहीं आणि म्हणून तेथें त्यांना यशही कमी आलें. हिंदुस्थान व चीन या देशांतील शेती व उद्योग-धंदे यांच्या संयोगाची जी उत्पादनपद्धति तींत श्रम व वेळ यांची बचत होत असल्यामुळें आधुनिक उद्योगधंद्यांच्या आक्रमणास या जुन्या उत्पादनपद्धतीनें निकरानें टक्कर दिली.

## सरंजामींतून संक्रमण

सरंजामी उत्पादपद्धतींतून पुढील उत्पादनपद्धतींत जें संक्रमण होतें तें दोन प्रकारांनी होत असतें. उत्पादक हा स्वतः व्यापारी आणि भांडवलदार होतो; हा पहिला प्रकार. हा अगदीं क्रांतिकारक प्रकार होय. अथवा व्यापारी हाच उत्पादनपद्धतीचा ताबा घेतो; हा दुसरा प्रकार होय. हा दुसरा प्रकार ऐतिहासिक दृष्टीनें कितीही महत्त्वाचा मानला जावो—उदा. १७ व्या शतकांत इंग्लिश कापड व्यापारी कापड करणाऱ्या स्वतंत्र कोष्ट्यांना लोकर विकत व त्यांच्या-पासून कापड खरेदी करीत—अशा प्रकारें कोष्ट्यावर त्यांचें नियंत्रण असलें तरी जुन्या उत्पादनपद्धतीचें रूपांतर करणें या व्यापाऱ्यांना

फारसें शक्य झालें नाहीं. उलट स्वतःच्या अस्तित्वासाठीं स्वतंत्र कोष्टयांना जगविणें त्यांना अवश्य होऊन बसे. उदा. १९व्या शतकाच्या मध्यापर्यंत फ्रान्सच्या रेशमाच्या धंद्यांत कारखानदार हा नाममात्र कारखानदार होता. वस्तुतः तो केवळ व्यापारी होता. कोष्टयांना त्यांचें काम पूर्वीप्रमाणें आपापल्या लहान घरकुलांत करूं देणें त्याला भाग पडत असे. तो स्वतः फक्त व्यापाराचें काम करी आणि त्याला खरेदीविक्रीसाठीं लागणारा जो माल तो तयार करण्याचे श्रम हे कोष्टी वगैरे करीत असत. रिबनचे कारखाने, लेसचे कारखाने आणि ऱ्हाईन नदीच्या कांठचे रेशमी कापडाचे कारखाने यासंबंधानेंही हीच वस्तुस्थिति होती. ही परिस्थिति भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या विकासास अडथळा आणणारी असून तिच्या विकासाबरोबर नाहींशी होत असते. व्यापारामुळें जुनी उत्पादनपद्धति नष्ट तर होत नाहींच, उलट ती श्रम करणाऱ्या कफल्लक मजूराची परिस्थिति प्रत्यक्ष भांडवलशाही उत्पादनांतल्या मजूराच्या परिस्थितीपेक्षां अधिक वाईट करून टाकते, आणि जुनी मागासलेली उत्पादनपद्धति ठेवून सुद्धां मजूरांच्या श्रमांतला वाढावा मात्र व्यापारी गिळून टाकतो.

## हस्तव्यवसायिकाचें दैन्य

हीच गचाळ परिस्थिति कांहीं किरकोळ भेद सोडल्यास लंडनच्या फर्निचरच्या धंद्यांत आजही (१८६५) असल्याचें दिसून येतें. या फर्निचरच्या धंद्यांत अनेक शाखा एकमेकापासून भिन्न अशा झालेल्या आहेत. एका शाखेंत फक्त खुर्च्याच होतात. दुसरींत टेबलें होतात, इ. पण हे सर्व व्यवसाय जुन्या हस्तव्यवसाय पद्धतीनें केले जातात. त्या प्रत्येकावर एक मालक असतो व त्याच्या हाताखालीं कांहीं थोडे उमेदवार असतात. तरी पण एकंदर उत्पादन

इतकें व्यापक असतें कीं खाजगी गिऱ्हाइकासाठीं त्या धंदेवाल्याकडून माल तयार केला जाऊं शकत नाहीं. फर्निचर विकणाऱ्या दुकान-दारांना लागणारा माल हे हस्तव्यवसायांची तयार करीत असतात. दर शनिवारी हे धंद्यांचे मालक या दुकानांत जाऊन आपला माल विकतात. तेथें हा माल विकणारा मालक आणि तो दुकानदार हे दोघे, सावकाराच्या दारीं इस्टेट गहाण टाकून कर्ज मागणारा ऋणको व त्याचा सावकार जशी हुजत घालतात अशी, किंमतीबाबत हुजत घालतात. या हस्तव्यवसायिकांना दर आठवड्याला पुढील आठवड्याच्या धंद्यासाठीं कच्चा माल खरेदी करणें व मजुरांची मजूरी देणें यासाठीं पैसा हवा असल्यानें आठवड्याच्या आठवड्याला माल विकून टाकण्यावांचून त्याला गत्यंतर नसतें. अशा परिस्थितींत हे व्यवसायिक स्वतः एका बाजूस व्यापारी व दुसऱ्या बाजूस आपले मजूर या दोहोंच्या दरम्यान केवळ मध्यस्थच असतात. व्यापारी हा खरा भांडवलदार असतो. आणि वाढाव्यांतला पुष्कळसा भाग तोच खिशांत टाकतो. पूर्वीं अगदीं छोटे छोटे खेड्यांतले हस्तव्यवसाय होते. त्यांना हस्तव्यवसायी कारखानदारीचें स्वरूप आलें तेव्हां अशीच परिस्थिति झाली होती. अशा लहान श्रमगृहांतून हत्यारांची जसजशी सुधारणा होत गेली तसतसें आधुनिक उद्योगधंद्याकडे त्यांचें संक्रमण होत गेलें. पहिल्यानें जें यंत्र हातानें फिरवलें जात असे तें आतां वाफेनें फिरवलें जाऊं लागलें. अगदीं अलीकडे ( १८६५ ) इंग्लंडच्या मोज्याच्या धंद्यांत हा प्रकार घडून आलेला आहे.

## संक्रमणाचे तीन मार्ग

याप्रकारें होणारें हें संक्रमण तीन मार्गांनीं होत असतें. पहिल्यानें व्यापारी हा प्रत्यक्ष औद्योगिक उत्पादक होतो. व्यापारांतूनच ज्या

औद्योगिक शाखा निघाल्या आहेत. विशेषतः परदेशांतून व्यापाऱ्यांनीं ज्या चैनीच्या वस्तूंचा कच्चा माल व तो उत्पन्न करणारे मजूर आणले तो पहिला प्रकार होय. उदा. १५व्या शतकांत इटलींतल्या व्यापाऱ्यांनीं कॉन्स्टँटिनोपलमधून चैनीच्या वस्तूंचा कच्चा माल व मजूर आणले. दुसरा प्रकार म्हणजे व्यापारी हा लहान हस्तव्यवसायिकाला, आतांच वर सांगितल्याप्रमाणें, जेथें निवळ मध्यस्थ बनवितो अथवा व्यक्तिशः एकेकट्या उत्पादकापासून व्यापारासाठीं माल खरेदी करतो तो प्रकार; ह्या उत्पादकाला तो नांवापुरताच स्वतंत्र राहूं देतो. त्याच्या उत्पादन पद्धतींत मुळींच बदल घडवून आणीत नाहीं. तिसरा प्रकार म्हणजे औद्योगिक उत्पादक हा स्वतः व्यापारीही बनून व्यापारासाठीं मालाची ठोक उत्पत्ति करीत राहतो हा प्रकार.

मध्ययुगामध्यें व्यापारी हा धंदेसंघांनीं उत्पन्न केलेला विक्रीमाल अथवा शेतकऱ्याचा विक्रीमाल विक्रीला नेत असे. व्यापारी हा स्वतः औद्योगिक उत्पादक होई, अथवा त्याहून अधिक म्हणजे हस्तव्यवसायिकाला विशेषतः खेड्यांतल्या लहान धंदेवाल्याला आपणांला हवा तो माल उत्पन्न करण्यासाठीं श्रम करायला लावणें हेंच तो अधिक पसंत करी. उलट उत्पादक हाही व्यापारी होत असे. उदा. व्यापाऱ्याकडून थोडथोडी लोकर घेत राहून व्यापाऱ्याला लागणारें कापड आपल्या उमेदवारांच्या साहाय्यानें विणीत राहण्याऐवजीं कोष्टी हा स्वतःच लोकर व धागा खरेदी करून स्वतः तयार केलेला माल व्यापाऱ्याला विकून टाकी. यानंतर कापड विणणारा कोष्टी हा अमुक एका व्यापाऱ्यासाठीं अथवा अमुक एका गिऱ्हाइकासाठीं माल निर्माण न करतां एकंदर जागतिक व्यापारासाठीं माल निर्माण करूं लागला. आतां उत्पादक हाच व्यापारी असतो. अगदीं आरंभीं धंदेसंघटनांना खेड्यांतील घरगुती धंद्यांना व जमिनदारी पद्धतीच्या

शेतीला भांडवलशाही उत्पादनाचें स्वरूप देण्यासाठीं व्यापाराच्या अस्तित्वाची गरज होती. व्यापार हा मालाला बाजार निर्माण करीत होता, धंद्याला कच्चा माल व साहाय्यक साहित्य पुरवीत होता. व यामुळें व्यापारानें व्यापारावरच आरंभापासून आधारलेल्या उत्पादनाच्या शाखा निर्माण केल्या. हस्तव्यवसायी कारखानदारी व विशेषतः आधुनिक यांत्रिक उद्योगधंदे यांचा कांहीं एका मर्यादेपर्यंत विकास होतांच, आतां त्यांनींच आपले बाजार खुले करून घेतले. हे बाजार त्यांनीं आपल्या विक्रीमालानें जिंकलें. आतां व्यापार हा औद्योगिक उत्पादनाचा नोकर होतो. कारण सतत बाजाराचें क्षेत्र वाढवीत राहणें हें औद्योगिक उत्पादनाला अपरिहार्यच होऊन बसतें. उपलब्ध असलेल्या बाजारावरून प्रचंड प्रमाणांत उत्पादन चालणाऱ्या कार-खान्यांतला माल वाहून जाऊं लागतो. आणि अधिकाधिक बाजार मिळविण्याचा तगादा हा माल करींत असतो. हें प्रचंड उत्पादन व्यापारानें मर्यादित नसतें. कारण व्यापार हा फार तर विद्यमान मागणीचा निदर्शक असूं शकेल. पण हें प्रचंड उत्पादन मागणीपेक्षां पुरवठा वाढवीत असते. उत्पादन करणाऱ्या भांडवलाचें परिमाण आणि मजूरांच्या उत्पादनशक्तीचा विकास यांनींच फक्त या प्रचंड उत्पादनाला मर्यादा बसत असते. उत्पादक भांडवलदाराला जागतिक बाजार सतत डोळ्यापुढें दिसत असतो. स्वतःला उत्पादनाचा होणारा खर्च आणि स्वदेशांतच नव्हे तर परदेशांतल्या बाजारांत आपल्या मालाला येणारी किंमत यांची तो सतत तुलना करीत असतो. भांडवलशाहीपूर्वीं ही तुलना करण्याचें काम व्यापारावर पडे, आणि म्हणून व्यापारी भांडवल हें औद्योगिक भांडवलावर वर्चस्व गाजवीत असे.

---

# औद्योगिक व्याज व नफा : : : २७*

भांडवलशाही उत्पादनपद्धतींत पैशाचा भांडवलासारखा उपयोग होऊन त्याच्या मूळच्या मूल्याहून अधिक मूल्यांत त्याचें रूपांतर केलें जातें. (पैसा हा शब्द येथें मूल्यांच्या बेरजेचें स्वतंत्र प्रतीक अशा अर्थानें वापरला आहे. तो प्रत्यक्ष पैशाच्याच स्वरूपांत असेल अथवा विक्रीमालाच्या स्वरूपांत असेल.) मजूराकडून अमुकइतकें श्रम मोफत घेणें व ते आपल्या मालकींत आणणें हें भांडवलदाराला शक्य होतें. अशा प्रकारें पैशाला एक नवें उपयोगमूल्य प्राप्त होतें. नफा उत्पन्न करणें हें तें उपयोगमूल्य होय. पैशानें ही भूमिका पत्करली म्हणजे तोही एक विक्रीमाल होत असतो. अर्थात तो एक विशिष्ट प्रकारचा असतो.

दरसाल २०% हा नफ्याचा सरासरी दर आहे असें समजूं. एका माणसाजवळ २५ डॉ. आहेत. तर तो या रकमेचे सालअखेर ३० डॉ. करील, या माणसानें हे २५ डॉ. स्वतः न वापरतां जर

* कॅपिटल, खंड ३, प्रकरण २१, २२, २३,

दुसऱ्याला दिले व दुसऱ्यानें त्यांचा भांडवलासारखा उपयोग केला तर पहिल्या माणसानें दुसऱ्या माणसाला ५ डॉ. नफा मिळविण्याचें साधन मिळवून दिलें असा याचा अर्थ होय. हें साधन मिळविण्यासाठीं दुसऱ्या माणसानें पहिल्या माणसाला म्हणजे २५ डॉ. च्या मालकाला आपल्या नफ्यांतील कांहीं भाग—समजा १·२५ डॉ. दिला तर त्यानें २५ डॉ. चे २५ डॉ. च्या मालकाला दिले असें म्हणतां येईल. नफ्यांतला हा जो भाग दुसऱ्या माणसानें पहिल्या माणसाला दिला त्यालाच व्याज म्हणतात. नफ्यांतल्या एका विशिष्ट भागाला हें एक स्वतंत्र नांव आहे. येथें एक गोष्ट स्पष्ट आहे कीं, २५ डॉ. वर पहिल्या माणसाची जी मालकी आहे त्या मालकीमुळें पहिल्या माणसाला आपल्या २५ डॉ नीं उत्पन्न केलेल्या नफ्यांतला एक हिस्सा म्हणजे व्याज मिळवितां येतें. जर या पहिल्या माणसानें दुसऱ्या माणसाला २५ डॉ. दिलेच नसते तर या दुसऱ्या माणसाला नफा मिळविताच आला नसता.

## व्याज कां मिळतें ?

येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं पहिला माणूस म्हणजे पैशाचा भांडवलदार, दुसऱ्या म्हणजे औद्योगिक भांडवलदाराला खरोखर काय देतो ? तो खरोखर काय विकतो म्हणून त्याला हें व्याज मिळतें ?

कोणत्याही सर्वसामान्य विक्रीमध्यें खरोखर काय विकलें जातें ? जी वस्तु विकली जाते तिचें मूल्य देऊन टाकलें जात नाहीं, कारण मूल्याचें या विक्रीव्यवहारांत फक्त रूप बदलतें. जो माल विकतो त्याच्या हातांत त्या मालाचें मूल्य वेगळ्या स्वरूपांत राहतेंच. अर्थात विक्रेते आपल्या गिऱ्हाइकाला जें कांहीं विकतो तें त्या मालाचें उपयोगमूल्य होय.

पण आपला पैशाचा भांडवलदार (म्हणजे सावकार) आपल्या गिन्झाइकाला आतां जें विकतो, तें पैशाचें कोणतें उपयोगमूल्य? मूळ मूल्य अबाधित राहूं देऊन शिवाय वाढावा निर्माण करणें हें जें पैशाचें सामर्थ्य तेंच त्याचें उपयोगमूल्य होय. इतर कोणत्याही विक्रीमालाचें बाबतींत त्यांचें उपयोगमूल्य हें केव्हां तरी भोगून संपवायाचें असतें. म्हणजे विक्रीमालरूपी जी वस्तु ती तिच्या मूल्यासुद्धां केव्हांतरी अजिबात नष्टच होते. पण आपण ज्याला भांडवल असें म्हणतो त्या विक्रीमालाला कांहीं विशेष गुण आहेत. उपयोगमूल्य या नात्यानें त्याचा उपयोग केला असतां त्याचें मूल्य आणि वरकड मूल्य हीं कायम राहतात इतकेंच नव्हे तर वाढतातही.

आतां औद्योगिक भांडवलदार (म्हणजे ऋणको) पैशाच्या भांडवलदाराला देतो तें काय देतो? कर्ज म्हणून जें भांडवल त्यानें घेतलें त्याची किंमत कोणती? त्या भांडवलाच्या साहाय्यानें जो नफा उत्पन्न होतो त्या नफ्याचा एक भाग हा औद्योगिक भांडवलदाराकडून पैशाच्या भांडवलदाराला दिला जातो.

## भांडवल व विक्रीमाल यांतील फरक

नफ्यांतला किती भाग व्याज म्हणून दिला पाहिजे? आणि निवळ नफा म्हणून किती उरायला पाहिजे? वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे कर्ज म्हणून घेतलेल्या भांडवलाची किंमत किती द्यावी? बाजारांतील कोणत्याही मालाची किंमत जशी चढाओढीनें ठरते तशीच चढाओढीनें म्हणजे मागणी-पुरवठ्याच्या सिद्धांतानें या कर्जाची किंमत ठरेल. परंतु बाजारांतील इतर विक्रीमाल आणि भांडवल हा विक्रीमाल यांमध्यें असलेला एक फरक येथें स्पष्ट दिसतो. सर्वसामान्य विक्रीमालाबाबत बाजारांत मागणी आणि पुरवठा यांचा समतोल

असेल तेव्हां मालाची किंमतही उत्पादनकिंमतीइतकी ' मूळ खर्च अधिक सरासरी नफा ' इतकी असते. म्हणजे अशा परिस्थितींत चढाओढीचा उपसर्ग न लागतां भांडवलशाहीउत्पादनपद्धतीच्या अंगभूत नियमांनींच विक्रीमालांची किंमत ठरत असते. कारण मागणी आणि पुरवठा यांच्यांत जे चढउतार होतात त्यावरून उत्पादन-किंमतीहून बाजारभाव कमीअधिक होत आहेत एवढीच गोष्ट कळून येत असते. उत्पादनकिंमतीपासून बाजारभाव जे वर अथवा खालीं चढत असतात त्यांची नेहमीं कांहीं एका लांब मुदतीचा विचार केला तर वजावाट होत असते. आणि सर्व विक्रीमालांचे सरासरी बाजारभाव हे उत्पादनकिंमतीइतके असतात. मजूरीच्या बाबतींतही हीच गोष्ट आहे. श्रमशक्तीची मागणी व पुरवठा यांचा जर समतोल असेल तर मागणी व पुरवठा यांचा कांहींही परिणाम न होतां मजूरी ही श्रमशक्तीच्या मूल्याइतकी राहते.

पैशाच्या स्वरूपांतील भांडवलाच्या व्याजासंबंधानें मात्र परिस्थिति वेगळी असते. येथें मागणी-पुरवठ्याच्या सर्वसामान्य नियमापासून व्याजाचे दर खालीं अथवा वर किती चळतात ही गोष्ट चढाओढीनें ठरत नसून, उलट चढाओढ हाच व्याजाचे बाबतींत सर्वसामान्य नियम असतो. व्याजाचा " नैसर्गिक " दर म्हणून कांहीं असूंच शकत नाहीं. व्याजाच्या दराच्या नैसर्गिक मर्यादा म्हणून कांहीं प्रकार अस्तित्वांतच नाहीं.

## व्याजाची किमान मर्यादा अशक्य

व्याज हें नफ्याचा एक भाग असतें. नफ्याचा एक भाग पैशाच्या भांडवलदाराला व्याज म्हणून दिला पाहिजे असें आपण धरून चाललों आहांत. हा भाग जास्तींत जास्ती किती याची मर्यादा नफ्या-

नेंच ठरविली आहे. पैशाचा भांडवल म्हणून उपयोग करणारा जो भांडवलदार त्याचा नफा शून्य होईल इतकें व्याज जास्तींत जास्त तो देऊं शकेल. असे अपवादात्मक प्रसंग असतीलही, कीं जेव्हां हें व्याज नफ्यापेक्षां अधिक असेल. पण अर्थात तें नफयांतून दिलें जाणार नाहीं. मूळ मुद्दलांतून द्यावें लागेल. तूर्त आपण सगळाच्या सगळा नफा हेंच व्याजाचें जास्तींत जास्त परिमाण समजूं. अर्थात देखरेखीचें वेतन या कमाल व्याजांतून वगळावयाचें आहे. त्याची चर्चा पुढें येईल. या व्याजाच्या दराची किमान मर्यादा ठरवितां येणेंच अशक्य आहे. ती कितीही कमी होईल. पण लगेच विरुद्ध परिस्थिति निर्माण होऊन तो व्याजाचा दर वाढूं शकतो.

कोणत्याही देशांत व्याजाचा सरासरी दर किती असावा हें कोणत्याही कायद्यानें ठरवितां येत नाहीं; अर्थशास्त्रज्ञ ज्या अर्थानें 'नफ्याचा एक नैसर्गिक दर असतो व मजुरीचा एक नैसर्गिक दर असतो' असें म्हणतात त्या अर्थानें व्याजाचा नैसर्गिक दर असूं शकत नाहीं. नफ्याचा सरासरी दर अमुक एक आहे असें धरून चालल्यास मागणी आणि पुरवठा यांचा समतोल आहे या परिभाषेस या पैसारूपी भांडवलाच्या बाबतींत कांहींही अर्थ नाहीं. सावकार आणि ऋणको या दोघांच्यामध्यें भांडवलाचे बाबतींत मागणीपुरवठ्याचा समतोल झाला असतांना व्याजाचा दर ३%, ४%, ५% च कां व्हावा याला कांहींच कारण नाहीं.

## व्याजाचा दर निश्चित असतो

व्याजाचा सरासरी दर हा कोणत्याही सर्वसामान्य सिद्धांताप्रमाणें ठरत नाहीं असें कां ? या प्रश्नाचें उत्तर व्याजाच्या विशिष्ट स्वरूपांतच

आपणास कळून येतें. व्याज हें सरासरी नफ्याचा एक भाग असतें. हा नफा सावकार व ऋणको यांनीं कसा वाटून घ्यावा हें केवळ तवकलीनें ठरविलें जातें. एकाद्या संयुक्त भांडवली धंद्याच्या भागीदारांना नफा किती टक्के वाटावा हें ठरविण्याचा जसा कोणताही सिद्धांत नाहीं तसाच सावकार व ऋणको यांचेमध्यें नफ्याची वाटणी करण्यालाही नैसर्गिक सिद्धांत नाहीं.

तरीपण नफ्याचा जो सर्वसामान्य दर अमुकवेळीं समाजांत विद्यमान असतो त्यापेक्षांही व्याजाचा दर हा अधिक सारखा, निश्चित व स्पष्ट असतो.

## नफ्याच्या दराचा दीर्घकाल सारखेपणा

व्याजाचा दर हाही अखेरीस नफ्याच्या दरांतूनच ठरत असल्यानें नफ्याच्या सर्वसामान्य पातळींतच तो येणें हें अपरिहार्य आहे. धंद्यांच्या विशिष्ट शाखांत नफ्याचे दर विशिष्ट परिमाणाचे असतात. अथवा व्यक्तिशः कांहीं भांडवलदारांना जादा नफा मिळत असतो. पण व्याजाचा दर विशिष्ट नफ्याच्या दरावरून ठरत नसून नफ्याच्या सर्वसामान्य दरावरून ठरत असतो.

ऋणकोनें घेतलेल्या कर्जासाठीं तारण जें कांहीं दिलें असेल, अथवा कर्जाची जी मुदत असेल तीवरून व्याजाचा दर ठरतो हें खरें आहे. पण त्या त्या वेळीं कर्जाच्या त्या त्या प्रकारापुरता व्याजाचा दर हा सारखाच असतो.

प्रत्येक देशांत विशिष्ट दीर्घ काल लक्षांत घेतला असतां व्याजाचा सरासरी दर एका विशिष्ट मर्यादेइतका असतो. कारण नफ्याचा सर्वसामान्य दर दीर्घकालानेंच बदलतो. धंद्याच्या विशिष्ट क्षेत्रांतले नफ्याचे दर वरचेवर कमीअधिक होत असले तरी त्यांची अखेरीस

वजावाट होत असते. त्यामुळें दीर्घ काळपर्यंत सर्वसामान्य नफ्याच्या दरास बाध येत नाहीं.

## भांडवलाचा थारे पालट

बाजारांतील नफ्याच्या दरामध्यें एकसारखे चढउतार होत असतात. त्यासंबंधानें क्षणोक्षणीं व्याजाचा एक विशिष्ट दर आहे असें मानावें लागतें. कारण बाजारांत प्रत्यक्ष धंद्यांत गुंतलेलें भांडवल आणि धंद्यांत गुंतवण्यासाठीं कर्जाऊ मिळूं शकणारें भांडवल यांची नेहमीं चढाओढ चालते. आणि मग कर्जाऊ म्हणून मिळूं शकणाऱ्या भांडवलाचा पुरवठा आणि अशा भांडवलासाठीं बाजारांत असणारी मागणी यांच्या संबंधावरून प्रत्येक वेळीं व्याजाचा दर ठरत असतो. ही भांडवल उभारण्याची पद्धति जशी विकसत जाते, तसतशी तीसंबंधीची सत्ता केंद्रीभूत होऊन कर्जाऊ मिळूं शकणाऱ्या भांडवलावर कांहीं थोडीं माणसें सर्व सत्ता मिळवितात व सगळेंच्या सगळें भांडवल अकस्मात बाजारावर टाकतात. याचा परिणाम व्याजाच्या दरावर होत असतो. नफ्याचा जो सर्वसामान्य दर तो अमुक इतक्या मर्यादेवर असतो ही गोष्ट विशेष महत्त्वाची नसून हा नफ्याचा दर ही एक प्रवृत्ति आहे ही गोष्ट महत्त्वाची आहे. नफ्याचे जे निरनिराळे विशेष दर असूं शकतील त्या दरांना सरासरी दराच्या रेषेकडे खेचणें व कमीअधिक दरांची अखेरीस वजावाट करणें ही ती सरासरी नफ्याच्या दराची प्रवृत्ति होय. निरनिराळ्या भांडवलदारांत पैशाच्या बाजारामध्यें जी चढाओढ चालते ती ज्या धंद्यामध्यें नफ्याचा दर सरासरी दराच्या खालीं बराच काळपर्यंत गेला असेल त्यांतून भांडवल काढून ज्या धंद्यांत नफ्याचा दर सरासरी दराच्यावर गेला असेल त्यांत भांडवल घालणें अथवा ज्या धंद्यामध्यें नफा सरासरी दराच्यावर मिळत असेल

त्या सर्व धंद्यांत कमीअधिक प्रमाणांत अधिक भांडवल घालणें या स्वरूपाची असते. कांहीं धंद्यांत नवीन भांडवल येते तर दुसऱ्या कांहीं-तून भांडवल निघत असतें.

## व्याजाच्या दराचा नेमकेपणा

नफ्याचा सरासरी दर हा अमुक इतका ठरवून दिल्यासारखा दिसत नाहीं, पण उलटसुलट बाजूनें होणाऱ्या चढउतारांच्या वजावाटीनें येणारा जो समतोल त्यावरून ठरत असतो. हा समतोल सूक्ष्म निरी-क्षणानें काढावा लागतो. व्याजाचे दराच्या बाबतींत वस्तुस्थिति याहून निराळी असते. व्याजाचा दर हा एका विशिष्ट क्षेत्रापुरता तरी सरासरी ठरलेला व सर्वांना ठामपणें माहीत असा असतो. औद्योगिक भांडवल व व्यापारी भांडवल या दोन्ही मिळूनही हा सरासरी दर ठरतो. रोखेबाजारांच्या रिपोर्टांत व्याजाचा सरासरी दर जितका नेमका सांगितलेला असतो तितक्या नेमकेपणानें हवामानखात्याच्या रिपोर्टांत बॅरॉमीटर व थर्मामीटर यांची नोंदही केली जात नाहीं. रोखे बाजारांच्या या रिपोर्टांत अमुक एका या अथवा त्या भांडवलाचा दर सांगितला नसून कर्जाऊ देतां येणाऱ्या सर्व भांडवलाचा व्याजाचा दर सांगितलेला असतो.

## भांडवलाच्या विविधतेचा नाश

पैशाच्या बाजारांत सावकार आणि ऋणको हे प्रत्यक्ष समोरासमोर येतात. विक्रीमालाचें स्वरूप पैसा हें एकच असतें. धंद्यांच्या निर-निराळ्या शाखांत घालावयाच्या भांडवलांचे जे विविध प्रकार त्यांतील विविधता नाहींशी होऊन पैसा या एकजिनसी स्वयंभू मूल्याच्या स्वरूपांत भांडवल येथें अवतरतें. धंद्यांच्या निरनिराळ्या शाखांतली

चढाओढही येथें थांबते. भांडवलाच्या दृष्टीनें या सर्व शाखा पैशाची सावकारी या एकाच शाखेंत विलीन होतात. पैसा धंद्याच्या कोणत्या शाखेमध्यें गुंतवला जाणार आहे याचीही फिकीर तेथें भांडवलदार करीत नाहीं. पैशाच्या बाजारांत येणारें सर्व भांडवल हें एका संबंध वर्गाचें असतें. आणि मागणी व पुरवठा यांच्याच संबंधांत तें व्यक्त होत असतें.

## भांडवलाचें केन्द्रीकरण

येथें आणखी एक गोष्ट सांगून ठेवली पाहिजे ती ही कीं, आधुनिक उद्योगधंद्यांचा जसजसा विकास होत जाईल तसतसें पैशाच्या बाजारांतील भांडवल उत्तरोत्तर अमुक एका भांडवलदाराचें आहे या स्वरूपांत पुढें येत नसून तें वाढत्या प्रमाणांत केंद्रीभूत होऊन बँकवाल्यांच्या ताब्यांत जातें. आणि उत्पादनाच्या क्षेत्रांत जितका फुटीरपणा असतो तितका फुटीरपणा या भांडवल-बाजारांत न राहतां बँकवाले हे सर्व सामाजिक भांडवलाचे प्रतिनिधी म्हणूनच वावरूं लागतात. याचा परिणाम असा होतो कीं, कर्जाऊ मिळण्यासारखें जें भांडवल असतें त्याच्यापुढें या बँकवाल्यांचें प्रचंड वर्चस्व मागणीच्या रूपानें येऊन बसतें. आणि तसेंच स्वतः हे बँकवाले कर्जाऊ देण्याचें भांडवलही एकगठ्ठा बाजारांत आणून उभे करतात.

सर्वसामान्य नफ्याचा दर अस्पष्ट स्वरूपांत व्यक्त होत असतांना व्याजाचा दर तेवढा निश्चित स्वरूपांत कां दिसतो याचीं कांहीं कारणें वरीलप्रमाणें होत. हा व्याजाचा दर कमीअधिक होतच नाहीं असें नाहीं, पण तो सर्वच ऋणकोंना कमीअधिक होत असतो. यामुळें त्या ऋणकोंच्या दृष्टीनें तो अमुक इतका कायम असतो असेंच म्हणावें लागतें.

नफ्याचा अमुक एक भाग हा निवळ नफा आणि दुसरा भाग व्याज ही विभागणी केवळ संख्यात्मक आहे. पण या संख्यात्मक विभागणीचें रूपांतर व्याज आणि नफा अशा गुणात्मक विभागणींत कसें झालें ? वेगळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे जो भांडवलदार भांडवल कर्जाऊ न काढतां स्वतःचेंच भांडवल धंद्यांत घालतो तोही आपल्या वट्ट नफ्यांतला अमुक एक भाग व्याज आहे असें कसें मानतो ? तसेंच कर्जाऊ घेतलेलें आणि खुद्द मालकांचें असें जें सर्व भांडवल त्या भांडवलाची विभागणी व्याज देणारा विभाग व निवळ नफा देणारा विभाग अशी कशी करायची ?

( नफ्याचें प्रत्येक संख्यात्मक वर्गीकरण हें गुणात्मक होतेंच असें नव्हे. उदा. संयुक्त भांडवली धंद्याच्या भागीदारांत नफ्याची जी विभागणी करतात ती संख्यात्मक असते, पण गुणात्मक असत नाहीं. )

## व्याज व नफा

जो उत्पादक भांडवलवाला कर्ज काढून भांडवल मिळवीत असतो त्याच्या एकूण नफ्याचे दोन भाग करण्यांत येतात. सावकाराला त्यानें द्यावयाचें व्याज हा एक भाग; आणि व्याज देऊन टाकल्यानंतर उरणारा भाग तो त्याचा नफा. आतां एकूण नफा कितीही ठरलेला असो व्याजाचा सर्वमामान्य दर हा मात्र ठरून गेलेला असून नफा मिळण्याच्या आधीं इतकेंच नव्हे तर उत्पादनाची क्रिया सुरू होण्या-पूर्वींही हा दर अमूक इतका आहे असें माहीत असते अथवा कायदे-शीर करारानें ठरविण्यांतही आलेलें असतें. म्हणून उत्पादक भांडवल-दाराला नफा किती मिळावयाचा ही गोष्ट एकूण व्याज किती यावरून ठरत असते. म्हणून व्याज हें भांडवलदाराला व्यापार अथवा उद्योग-धंदा यांत भांडवल गुंतवल्यामुळें मिळतें असें वाटत असतें. व्याज

वजा जातां नफ्याचा जो भाग उरतो व जो औद्योगिक उत्पादकाला अथवा व्यापाऱ्याला मिळतो तो धंदेवाला या नात्यानें त्याला मिळणारा नफ्याचा भाग या स्वरूपाचा असतो.

मागें आपण पाहिलेंच आहे कीं नफ्याचा दर म्हणजे अर्थातच एकूण नफा हा केवळ वाढाव्यावरच अवलंबून नसून धनोत्पादन-साधनांच्या किंमती उत्पादनाच्या अगदीं अपवादात्मक अशा पद्धति, स्थिरभांडवलांत केली जाणारी काटकसर, इत्यादि अनेक गोष्टीवर तो एकूण नफा अवलंबून असतो. उत्पादनाच्या किंमतीवर ज्याप्रमाणें एकूण नफा अवलंबून असतो त्याप्रमाणेंच तो धंद्याला विशिष्ट प्रकारें अनुकूल वेळ मिळण्यावर, तसेंच धंदेवाला किती चतुराईनें उत्पादनाच्या किंमतीहून अधिक अथवा कमी मालाची खरेदीविक्री करतो त्यावरही एकूण नफा अवलंबून असतो.

## व्याज हें अकर्तृत्वाचें फळ

धंदेवाला भांडवलदार पैसेवाल्या भांडवलदाराला जें व्याज देत असतो तें अशा प्रकारें भांडवलाचा मालक या नात्यानें त्याला मिळत असतें असें दिसतें. याउलट धंदेवाला या नात्यानें धंदेवाल्याला नफ्याचा जो भाग मिळत असतो तो धंद्यांत अथवा व्यापारांत तो जो व्यवहार करतो त्यामुळें मिळत असतो. भांडवलदाराच्या दृष्टीनें व्याज हें भांडवलाच्या अंगींच उत्पन्न होतें; कारण पैशाचा भांडवलदार व्याज मिळविण्यासाठीं प्रत्यक्ष काम असें कांहींच करीत नाहीं. पण धंदेवाल्याला मिळणारा नफा हा मात्र तो जें प्रत्यक्ष काम करतो त्या कामाचें फळ म्हणून मिळत असतो. धंदेवाल्याचा नफा हें फळ त्याच्या वैयक्तिक कर्तृत्वाचें असतें आणि पैशाच्या भांडवलदाराचें व्याज हें फळ त्याच्या अकर्तृत्वाचें असते.

## एकूण नफ्याचे काल्पनिक भाग

अशा प्रकारें एकूण नफ्याचे दोन भाग करण्यांत येतात. जणूं कांहीं दोन निरनिराळ्या उगमांतूनच ते निघाले आहेत अशा प्रकारें हे भाग केले जातात. प्रत्येक भाग निश्चित व परस्परापासून स्वतंत्र मानला जातो. या दोन भागांची ही निश्चितता व त्यांचें स्वतंत्र अस्तित्व हें सर्व भांडवलाबाबत व भांडवलदारवर्गाबाबत स्वयंसिद्ध असल्याचें मानलें जातें. अमुक एका भांडवलदारानें जें भांडवल धंद्यांत घातलें तें त्यानें कर्जाऊ घेतलें असो, अगर नसो, कोणत्याही भांडवला-वरील जो एकूण नफा त्याचें व्याज आणि नफा असे दोन गुणात्मक स्वतंत्र विभाग केले जातातच आणि या दोहोंचेंही परिमाण स्वतंत्र सिद्धांतानें ठरत असतें. जो भांडवलदार स्वतःच्या भांडवलावर धंदा करतो, आणि जो कर्जाऊ भांडवल घेऊन धंदा करतो ते दोघेही आपल्या एकूण नफ्याचें व्याज आणि धंद्याचा नफा असे दोन भाग करतातच. ज्याचें भांडवल स्वतःचें असतें तो आपणच आपला साव-कार म्हणून नफ्यांतला व्याजाचा वाटा काढून घेत असतो. आणि धंद्याचा नफा म्हणून एकूण भांडवलाचा जो दुसरा भाग उरतो तो कोणताही भांडवलदार धंदेवाला म्हणून घेत असतो. या दोन भागांच्या बाबतींत भांडवलाचेंही दोन भाग होत असतात. एक भाग मालकीचें भांडवल हा असतो. तें उत्पादनाच्या कक्षेबाहेर रहात असतें आणि त्यावर व्याज येतें. दुसरा भाग उत्पादनाच्या प्रक्रियेंत सांपडलेला असतो, यावर धंदेवाल्याचें व्याज येतें. ( अशी लोकांची समजूत असतें. )

व्याज देणारें भांडवल आणि स्वतः व्याजही भांडवलशाही उत्पा-दनाच्या इतकेंच नव्हेतर भांडवल आणि नफा यांच्या कल्पनांच्याही

पूर्वीपासून इतिहासांत अस्तित्वांत आहे. आणि म्हणून व्याज उत्पन्न करणारें जें भांडवल तेंच श्रेष्ठ दर्जाचें भांडवल होय असें लोकांना वाटत असतें. याच कारणासाठीं व्याज हें खास पैशावर मिळणारें भाडें असतें अशी लोकांची प्राचीन काळापासून समजूत आहे. पैशाचा भांडवल म्हणून उपयोग केला जावो अथवा न जावो त्याला व्याज हें मिळतेंच. यामुळें व्याज देणारें भांडवल हा भांडवलाचा एक स्वयंभू आणि स्वतंत्र प्रकारच आहे अशी लोकांची ठाम समजूत होते.

## व्याजासंबंधीचा भ्रम

म्हणून व्याज हें पैशाच्या भांडवलदाराला खास भांडवलावर मिळणारा वाढावा असून जरी अनुत्पादक रीतीनें तें भांडवल वापरलें तरीही त्यावर मिळूं शकतें असें दृश्य समाजाला दिसत असतें. प्रत्यक्ष व्यवहारांत व्यक्तिशः भांडवलदाराच्या दृष्टीनें ही गोष्ट खरीही असते. व्यक्तिशः पैशाच्या भांडवलदाराला आपलें भांडवल व्याजीं लावावें अथवा स्वतः उत्पादक म्हणून वापरावें यापैकीं कशाचीही मुभा असते. पण सार्वजनिक दृष्टीनें विचार केल्यास आणि एकंदर सामाजिक भांडवल या दृष्टीनें वरील विचारसरणीकडे पाहिल्यास ही विचारसरणी अजिबात चूक आहे. कित्येक अर्थशास्त्रज्ञांनीं वरील विचारसरणी ही सर्व नफ्याचा आधार म्हणून मानली आहे. पण ती मुळींच बरोबर नाहीं. जगांत माल खरेदी करणारी अथवा धनोत्पादनाच्या कामीं उत्पादनसाधनांचा उपयोग करणारीं माणसें नसलीं तरीही सर्वच्या सर्व भांडवल व्याजीं लावतां येईल ही कल्पनाच अव्यवहार्य आहे. जर फारच फार भांडवलदारांना व्याजानें रक्कम द्यावीशी वाटली तर त्यामुळें पैसारूपी भांडवलाचें मूल्य कमी होऊन त्यामुळें व्याजाचा दरही उतरेल. पुष्कळांना आपल्या व्याजावर तशा

परिस्थितींत जगतां येणार नाहीं. म्हणून त्यांना स्वतःच पुन्हां औद्योगिक भांडवलदार बनावें लागेल. पण व्यक्तिशः भांडवलदाराच्या बाबतींत मात्र व्याज हें खास भांडवलावरच मिळत असतें हा सिद्धांत खरा आहे असें आम्ही निक्षून सांगतों. म्हणून एखादा भांडवलदार जरी स्वतःच्या भांडवलावर धंदा करीत असला तरी आपल्या भांडवला-वरील सरासरी नफ्यांतला सरासरी व्याजाचा विभाग हा खास भांडवलापासून उत्पन्न झाला आहे असें मानीत असतो. त्याच्या समजुतीनें व्याज देणारें भांडवल हें मालकीचें भांडवल होय. आणि या दृष्टीनें नफा देणाऱ्या धंद्याच्या भांडवलाहून तें वेगळें होय.

## नफा हें कष्टाचें वेतन!

धंदेवाला भांडवलदार धंदेवाला या नात्यानें आपल्या नफ्यावर जो हक्क सांगत असतो तो त्या भांडवलाचा मालक म्हणून सांगत नसून त्या भांडवलाचा व्यवहार करणारा म्हणून सांगत असतो. भांडवलाच्या मालकाला व्याजरूपीं बैठें वेतन मिळत असतें तसें या धंदेवाल्याला मिळत नाहीं. हा धंदेवाला उत्पादन आणि खरेदीविक्री या दोन्ही कार्यांचें नियंत्रण करीत असतो. मजूरांना राबवून घेण्या-साठीं त्याला पुष्कळ सायास पडतात. हीं कामें दुसऱ्यावर सोंपवलीं तरी हे सायास चुकत नाहींत. म्हणून त्याला धंदेवाला या नात्यानें जो नफा मिळत असतो तो भांडवलाचा मालक या नात्यानें मिळणाऱ्या व्याजरूपीं बैठ्या वेतनासारखा नसून मजूराप्रमाणें कष्ट करून मिळालेला आहे असें त्यास वाटत असतें.

म्हणून धंदेवाला या नात्यानें आपणांस मिळणारा नफा हा रोज-मजूरीहून भिन्न नाहीं, मजूरांच्या मोफत श्रमापासून मिळणारा नाहीं, तर देखरेखीच्या श्रमाची ती मजूरीच आहे असें तो मानीत असतो.

ज्याप्रमाणें व्याज हें खास भांडवलानेंच उत्पन्न केलेल्या वाढाव्याचा विभाग आहे असें वाटत असतें त्याप्रमाणें धंदेवाल्याचा नफा हा त्याच्या उत्पादनश्रमांतूनच निर्माण होतो असें त्याला वाटतें. अशा प्रकारें धंदेवाला हा भांडवलदार या नात्यानें काम करून वाढावा मिळवीत नाहीं तर तो स्वतः जे कष्ट करतो त्या कष्टानें वाढावा मिळत असतो असा देखावा उत्पन्न होतो.

धंदेवाल्याचा नफा हा देखरेखीची मजूरी आहे ही कल्पना दृढ होण्याचें कारण नफ्यांतलाच कांहीं भाग मजूरी म्हणून काढला जातो, अथवा मजूरींतला कांहीं भाग नफ्याचा भाग आहे असा देखावा उत्पन्न केला जातो हें होय. धंद्याच्या मॅनेजराच्या पगाराबाबत असा प्रकार घडत असतो.

## देखरेख व व्यवस्था हें उत्पादन कार्यच

देखरेख आणि व्यवस्था हें कार्य जेथें अनेक लोक एकाच कार्य-सिद्धीसाठीं एकत्र श्रम करतात तेथें उत्पन्न होत असतें. त्याचें स्वरूप दोन प्रकारचें असतें. ज्या ठिकाणीं अनेक माणसें एकत्र व एका कार्यासाठीं श्रम करीत असतात तेथें सर्वांच्या पृथक पृथक कार्याचें ऐक्य एका नियंत्रकाकडून घडवून आणलें जातें. ह्या नियंत्रकाच्या दृष्टीपुढें प्रत्येक कार्य हें पृथक् पृथक् दिसत नसून अनेक पृथक् कार्यापासून होणारें एक सामुदायिक कार्य त्याला दिसतें. वृंदवादनाच्या ( ऑर्केस्ट्रा ) नायकाला सर्व निरनिराळ्या वाद्यांच्या स्वरांतून एकच संगीत निर्माण करावें लागतें. तसेंच उत्पादन कार्याचेंही आहे. जेथें अनेक माणसें काम करीत असतात तेथें त्या अनेक माणसांच्या कामांत ऐक्य घडवून आणण्यासाठीं देखरेख व नियंत्रण करण्याचें जें काम करावें लागतें तेंहि उत्पादनकार्य आहे.

## अंतर्विरोधामुळें देखरेखीची गरज

पण याबरोबर हीही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, मजूर आणि धनोत्पादनसाधनांचे मालक यांच्यामधील विरोधावर आधारलेल्या उत्पादन पद्धतींतच हें देखरेखीचें काम उत्पन्न होत असतें. हा विरोध जितका तीव्र असेल तितकें देखरेखीचें काम अधिक असतें. अनियंत्रित राज्यसत्तेमध्यें सरकारी अधिकाऱ्यांकडून एकंदर समाजाच्या जीवनास आवश्यक अशा कार्यावरसुद्धां देखरेख करणें जरूर होतें व सरकारी हस्तक्षेपाची गरज उत्पन्न होतें. तसेंच सरकार व जनता यांचेमध्यें असलेल्या विरोधामुळेंही सरकारी अधिकाऱ्यांना देखरेखीचें विशेष काम करावें लागतें; तसेंच उत्पादनाच्या क्षेत्रांतही आहे.

## प्रभूंना प्रभुत्वाचे श्रम अवश्य

गुलामगिरी ही समाजव्यवस्था ज्यांच्या डोळ्यापुढें होती, ते व्यवहारांत जें पहात त्याचेंच ग्रंथामध्यें स्वरूप व्यक्त करून दाखवीत. हे गुलामगिरीच्या काळचे लेखकही हलींच्या भांडवलशाहींतील अर्थशास्त्रज्ञाप्रमाणेंच देखरेखीच्या स्वरूपाचें वर्णन करतात. पण भांडवलशाही व्यवस्था हीच कायती त्रिकालाबाधित असें यांना वाटत असतें. अरिस्टॉटल सांगतो कीं, ज्यांना प्रभुत्व गाजवावयाचें असतें, मग तें राजकीय असो अथवा आर्थिक असो, त्यांना प्रभु या नात्यानें राज्यकारभाराचे श्रम करावेच लागतात; अर्थात् आर्थिक क्षेत्रांमध्यें श्रमशक्ति कशी वापरावी हें त्यांना ठाऊक असावें लागतें. अरिस्टॉटल आणखी असेंही सांगतो कीं, देखरेखीच्या कामाचा नुसता देखावा करून चालत नाहीं; म्हणून कोणत्याही धंद्याचा मालक एकदां पुरेसा श्रीमान झाला कीं धंदा चालवण्याचा मान एखाद्या व्यवस्थापकाला अथवा नाईकाला देऊन टाकण्यांत त्याला आनंद वाटत असतो.

## गुलामगिरीचें समर्थन

मजूरांना राबवून घेण्यासाठीं व्यवस्था आणि देखरेख करण्याचीं कर्तव्यें मालकाला अवश्यमेव करावीं लागतात म्हणून अशा प्रकारें मजूरांना राबवून घेणें न्याय्य आहे असेंच मानलें जातें आणि त्याचप्रमाणें दुसऱ्याचे मोफत श्रम आपण घेणें ही गोष्ट भांडवलदाराला कराव्या लागणाऱ्या देखरेख व व्यवस्था यांसारख्या श्रमांची मजूरी आहे असें मानलें जातें. अमेरिकेमध्यें ओकॉनेर नांवाच्या वकिलानें १९ डिसेंबर १८५९ रोजीं गुलामगिरीच्या समर्थनार्थ केलेल्या एका भाषणांत हा युक्तिवाद उत्कृष्टपणें मांडला होता. " दक्षिणेकडील संस्थानांना न्याय द्या " हा त्याच्या व्याख्यानाचा विषय होता. *

ओकॉनेर आपल्या भाषणांत म्हणतो : " सभ्य गृहस्थहो, निसर्गानेंच निग्रोला हें सेवाकर्म दिलें आहे. कष्ट करण्याकरतां जें सामर्थ्य लागतें तें त्याला निसर्गानेंच दिलें. पण हें सामर्थ्य त्याला देणाऱ्या निसर्गानेंच श्रम करण्याला लागणारी इच्छाशक्ति त्याला दिली नाहीं. तसेंच राज्यकर्तृत्वाला लागणारी बौद्धिक शक्ति त्याला निसर्गानें दिली नाहीं. पण या दोन्हीही गोष्टी त्याला न देणाऱ्या निसर्गानें कामाची सक्ती करणारा मालक त्याला दिला. तसेंच ज्या हवेंत त्याची प्रकृति व कर्तृत्व शाबूत राहतें अशा हवेंत या नीग्रोनें स्वतः-

* पुढें १८६१ च्या एप्रिलमध्यें उत्तरेकडील संस्थानें व दक्षिणेकडील संस्थानें यामध्यें गुलामगिरीच्या मुद्यावर यादवीयुद्ध सुरू झालें. त्या युद्धांत दक्षिणेकडील संस्थानांना गुलामगिरी ठेवावयाची होती व उत्तरेकडील संस्थानांना गुलामगिरी नको होती. यादवीचे अखेरीस उत्तरेकडील संस्थानांचा विजय झाला व यादवी नष्ट झाली. या यादवीचे पूर्वी गुलामगिरीच्या समर्थनार्थ ओकानेरनें हें भाषण केलें होतें.

लाही उपयुक्त व्हावें व आपल्या मालकालाही उपयुक्त व्हावें असें घडवून आणण्याची शक्ति मालकाला दिली. म्हणून माझें म्हणणें असें आहे कीं निसर्गानेंच त्याला त्याच्यावर सत्ता गाजवणारा एक मालक देऊन ज्या परिस्थितींत ठेवलें आहे त्या परिस्थितींत त्याला राहूं देण्यांत कांहींही अन्याय नाहीं. या परिस्थितींत त्याला राहूं देऊन त्याच्यावर कामाची सक्ति करणें आणि ही सक्ति करण्याच्या बाबतींत मालक जी बुद्धि व श्रम खर्च करतो आणि त्यामुळें त्या नीग्रोला स्वतःला व समाजाला उपयुक्त बनवतो, त्याच्या मोबदला नीग्रोच्या श्रमाच्या फळांतला भाग मालकानें घेणें यांत नीग्रोच्या नैसर्गिक हक्कावर कांहीं गदा येते असें मला मुळींच वाटत नाहीं."

## मजूराच्या मजूरींतून बुद्धीचा मोबदला

गुलामाप्रमाणें मजूरालाही काम करायला लावण्यासाठीं आणि त्याचें नियंत्रण करण्यासाठीं मालक असावा लागतो. नियंत्रक आणि नियंत्रित यांचे संबंध हे त्रिकालबाधित आहेत व उत्पादनाच्या दृष्टीनें अपरिहार्य आहेत असें एकदां मानलें गेलें म्हणजे रोजमजूराला केवळ स्वतःच्या मजूरीसाठीं नव्हे तर निरीक्षकाच्याही मजुरीसाठीं राबण्याची सक्ति करावी, आणि त्यायोगें त्या मजुरावर सक्ति करण्यासाठीं मालकाला जे श्रम व जी बुद्धि खर्चावी लागली असेल व त्यामुळें त्यानें मजुराला स्वतःच्या व समाजाच्याही दृष्टीनें उपयुक्त बनविलें असेल त्या बुद्धीच्या व श्रमाच्या खर्चादाखल मालकाला मजुरांच्या श्रमाच्या फलांतला पुरेसा वाटा घेतां यावा हें अगदींच नैसर्गिक होय.

मांडवलशाही समाजव्यवस्थेंत भांडवलाचें मजूरावर प्रभुत्व असतें याच कारणासाठीं जेथें व्यवस्था आणि देखरेख करणें अवश्य होते तेथें ती अनेक मजूरांच्या एकत्र काम करण्यामुळें अवश्य असें उत्पा-

दक कार्य म्हणून करावी लागते असें म्हणतां येत नाहीं. प्राचीन ग्रीसमधील ‘ एपिट्रॉपस ’ची मजूरी आणि सरंजामी फ्रान्समधील ‘ रेजिस्सॉर ’ची मजूरी ही नफ्यापासून अगदीं वेगळी असे. ही अधिक चतुर अशा मजूराच्या मजुरीसारखी असे. धंद्याचें प्रमाण वाढून त्यांत व्यवस्थापकाची गरज उत्पन्न झाली कीं अशी मजुरी देऊन व्यवस्थापक नेमला जाई.

## मालक मॅनेजर झाले

व्यवस्थेचें काम हें भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या विशिष्ट संघटनेमुळेंच भांडवलाच्या मालकीपासून वेगळें पडलेलें असून आज अगदीं तें काम करणारीं माणसें सडकेवर मिळूं लागलीं आहेत. वृंदवादनाचा नायक हा वाद्यांचा मालक असलाच पाहिजे असें नाहीं. त्याचप्रमाणें वृंदवादनाचा नायक या नात्यानें निरनिराळ्या वाद्यवादकांच्या पगारांशीं त्याला कांहींही कर्तव्य नसतें. सहकारी कारखान्यामुळें उत्पादनाच्या कार्यात भांडवलदार हा फालतू आहे हें सिद्ध केलें आहे. इंग्लंडांतील प्रत्येक आर्थिक संकटाच्या काळानंतर कारखानदारीच्या मुलुखांत अनेक माजी–कारखानदार हे कमी पगारावर पूर्वींच्या आपल्याच कारखान्यांत नव्या मालकांचे मॅनेजर म्हणून कामें करतांना दिसतात. हे नवेमालक मुळचे त्यांचे सावकार असतात.

इंग्लंडांतील सहकारी कारखान्यांच्या वृत्तांतावरून असें दिसून येतें कीं इतर सामान्य मजूरांच्या पगाराप्रमाणेंच चरभांडवलांत समाविष्ट होणारा असा जो मॅनेजराचा पगार तो वजा केला असतां राहणारा नफा हाच एकंदर भांडवलदारी समाजांतल्या सरासरी नफ्याहून अधिक असतो. या सहकारी कारखान्यांना खाजगी कारखानदारापेक्षां कित्येकदां फारच अधिक व्याज द्यावें लागतें. तरीही इतका नफा

उरतो. या सहकारी कारखान्यांत नफा वाढण्याचें कारण धनोत्पादन-साधनांची केली जाणारी काटकसर हें होय. येथें आपल्या दृष्टीनें महत्त्वाची गोष्ट आहे ती ही कीं सरासरी नफा (म्हणजे व्याज व धंदेवाल्याचा नफा) हा अगदीं उघड उघड कारखान्याच्या व्यवस्थे-साठीं व्यवस्थापकाला दिलेल्या पगारापासून अगदीं स्वतंत्र असतो. या सहकारी कारखान्यांतला नफा ज्याप्रमाणें बाजारांतील सरासरी नफ्याहून अधिक होता त्याप्रमाणें त्यांतील व्याज वजा जातां उरलेला धंदेवाल्याच्या नांवाचा नफा हाही सर्वसामान्य नफ्याहून अधिकच होता.

## देखरेखीचा बुरखा फाटला

संयुक्त भांडवली बँकासारख्या कांहीं भांडवलदारी धंद्यांतून हीच परिस्थिति दिसून येते. एकूण नफ्यांतून व्यवस्थापकाचा पगार वजा केला जातो इतकेंच नव्हे तर ठेवींवरील व्याजही वजा केलें जातें. आणि तरीही धंद्यांत अफाट नफा शिल्लक राहतो.

धंदेवाल्याचा नफा आणि देखरेख व व्यवस्था यांची मजूरी यांचा घोटाळा झाला तो प्रथम व्याज आणि व्याज वजा जातां उरणारा नफा यांमध्यें जो बाह्यतः विरोध दिसतो त्यामुळें झाला. हा घोटाळा आणखी वाढण्याचें कारण असें कीं नफा हा वाढावा (म्हणजेच मजूरांचे मोफत घेतलेले श्रम) होय असें न दाखवितां भांडवलदारानें केलेल्या देखरेखीच्या श्रमाची ती मजूरी आहे असें दाखविलें गेलें हें होय. नफा हा जर तत्त्वतः देखरेखीचीच मजूरी असेल तर प्रत्यक्ष व्यवहारांत तो तसाच मोजला जावा अशी सोशॅलिस्टांनीं मागणी केली; आणि ही मागणी होतांच कारखानदारांच्या पोटांत दुखूं लागलें. कारण अशी देखरेखीची मजूरी चढाओढीमुळें व शिक्षण स्वस्त होत गेल्यामुळें इतर मजूरीप्रमाणें सतत कमी होत होती. कामगारांच्या

सहकारी संस्था वाढल्या आणि भांडवलदारांच्या संयुक्त भांडवली कंपन्या वाढल्या त्याबरोबर धंदेवाल्याचा नफा हा देखरेखीची व व्यवस्थेची मजूरी असतो या ढोंगाचा शेवटचा बुरखाही फाटून गेला.

## एक नवी लबाडी

संयुक्त भांडवली कंपन्यांच्या व्यवस्थापकाच्या मजूरीच्या बाबतींतही एक नवी लबाडी निर्माण झाली. खऱ्या व्यवस्थापकाच्यावर अनेक व्यवस्थापक व नियंत्रक नेमले जातात. त्यांना व्यवस्थेचे अथवा देखरेखीचें काम असतें असें म्हणणें म्हणजे भागीदारांना बुडवून आपली तुंबडी भरण्यासाठीं यांनीं केलेलें सोंग होय. "आठ आठ नऊ नऊ निरनिराळ्या कंपन्यांचे डायरेक्टर या नात्यानें काम करून कित्येक बँकवाल्यांची व व्यापाऱ्यांची जी मिळकत झालेली असते ती पुढीलप्रमाणें नमुन्यादाखल सांगतां येईल. टिमाथी अब्राहाम कर्टीस याचें दिवाळें वाजल्यानंतर त्याच्या जमाखर्चाचा खर्डा कोर्टांत दाखल करण्यांत आला. त्यांत दरसाल त्याला डायरेक्टरशिप या सदराखालीं ८०० ते ९०० पौंड उत्पन्न मिळत असे. कर्टीस हा बँक ऑफ इंग्लंडचा आणि ईस्ट इंडिया कंपनीचा डायरेक्टर असल्यामुळें प्रत्येक संयुक्त भांडवली कंपनीला कर्टिसला आपल्या डायरेक्टर मंडळांत घेण्यांत मोठा आनंद वाटत असे." (दि सिटी ऑर दि फिजिऑलॉजी ऑफ बिझिनेस इन लंडन; १८४५ पृ. ८२) अशा कंपन्यांचें डायरेक्टरांच्या आठवड्याच्या सभेला हजर राहण्याचें वेतन कमींत कमी १ गिनी (५ डॉ.) असतें. दिवाळखोरीच्या कोर्टांतील कामकाजाच्या अहवालावरून धंद्यांच्या देखरेखीसाठीं मिळणारी मजूरीही डायरेक्टरांनीं परिणामकारकपणें केलेल्या देखरेखीच्या व्यस्त प्रमाणांत असल्याचें दिसून येतें.

---

## पत आणि बँका : : : २८*

### बँकवाला हा स्वतंत्र वर्ग

भांडवलदाराला बऱ्याच लोकांना नेहमीं पैसे द्यावे लागतात. तसेंच अनेक लोकांकडून नेहमीं पैसे घ्यावेही लागतात. पैसे देण्याचे आणि घेण्याचे हे जे तांत्रिक व्यवहार चालतात हेही श्रमच होत. त्यापासूनही मूल्य निर्माण होत नाहीं. अर्थात ते खरेदीविक्रीच्या खर्चांतच धरले पाहिजे. याशिवाय भांडवलाचा कांहीं भाग खजिना म्हणून ठेवावा लागतो. जरूर लागणाऱ्या मालाची खरेदी करणें, बँकेस असलेली देणीं देणें वगैरेसाठीं हा साठा लागतो. तसेंच बेकार असलेलें भांडवलही पैशाच्या स्वरूपांत शिल्लक असतें. या सर्व कारणासाठीं पैशाची देवघेव व पैशाचा हिशेब यांखेरीज पैशाच्या संचयाचेंही विशिष्ट कार्य करावें लागत असतें. अर्थात त्याचेही विशिष्ट श्रम असतात.

पैशाच्या या ज्या निवळ तांत्रिक व्यवहारावस्था त्यासाठीं लागणारे श्रम व खर्च, हे सर्व भांडवलदार वर्गासाठीं कांहीं थोडे एजंट व

* कॅपिटल, खंड ३, प्रकरण १९. २५, २७, २९.

भांडवलदार लोक बँका चालविण्याचें काम करीत असल्यामुळें अगदीं कमी होत असतात. श्रमविभाग पद्धतीच्या अमलबजावणीमुळें बँका चालविण्याचें काम हें एका स्वतंत्र भांडवलदारवर्गाचें विशिष्ट कार्य होऊन बसतें. आणि व्यापारी भांडवलाप्रमाणेंच हें बँकांचें भांडवल कांहीं थोड्या लोकांचें हातीं केंद्रीभूत होऊन त्याचें प्रमाण वाढत जातें. या विशिष्ट व्यवहारांतही पुन्हां श्रमविभाग होतोच. या बँकांच्या परस्परस्वतंत्र अशा निरनिराळ्या शाखा होत असतात. त्या शाखांतून वेगवेगळीं श्रमगृहें निर्माण होतात. पैसे देणें, पैसे घेणें, जमाखर्च काढणें, हिशेब ठेवणें, ठेवींची व्यवस्था पाहणें इत्यादि सर्व कामें अगदीं वेगळींवेगळीं होत जातात.

## सोनें हें जागतिक चलन

निरनिराळ्या जमातीजमातींमधील ऐनजिनसी देवघेवींतून पैसा प्रथम कसा निर्माण होतो हें पूर्वीं आपण पाहिलेंच आहे. यावरून पैशाचा व्यापार म्हणजे पैसारूपीं विक्रीमालाचा व्यापार इतिहासामध्यें आंतरराष्ट्रीय व्यापारापासून निर्माण होतो असें दिसून येईल. निरनिराळ्या देशांत निरनिराळीं नाणीं उत्पन्न झालीं म्हणजे परदेशांत माल खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्यांना स्वदेशी नाण्याचें रूपांतर त्या परदेशाच्या नाण्यांत करावें लागतें. आणि उलट परदेशी माल विकणाऱ्या व्यापाऱ्यांना त्या परदेशच्या नाण्याचें रूपांतर स्वदेशी नाण्यांत करावें लागतें. नाहींतर निवळ सोनें व रुपें हा जो जागतिक पैसा त्याशीं निरनिराळ्या नाण्यांचा विनिमय करावा लागतो. म्हणून मालाची देवघेव हा आधुनिक पैशाच्या व्यापाराचा मूळ पाया होय असें आपणांस मानावें लागतें.* किंमतीची देवघेव करणाऱ्या बँकांतून सोनें

* "व्यापारी व्यवहारामध्यें त्या त्या ठिकाणचें नाणेंच वापरण्याची

व चांदी यांचा बँकेचा **पैसा** म्हणून नव्हे तर जागतिक पैसा म्हणून —स्थानिक **चलना**हून भिन्न असा जागतिक पैसा म्हणून उपयोग होऊं लागला.

## पतीचा विकास

या देवघेवीच्या म्हणजे पैशाच्या व्यापाराच्या धंद्यामुळेंच पत म्हणजे उधारी ही पद्धति विकास पावली. या पत-पद्धतीचा व तिनें वापरलेल्या साधनांचा तपशीलवार अभ्यास करण्याचें कार्य येथें आपणांस करावयाचें नाहीं. फक्त भांडवलशाही उत्पादनपद्धतींत विशेषत्वानें दिसणाऱ्या या संबंधींच्या कांहीं गोष्टींचा येथें उल्लेख करावयाचा आहे. व्यापारांतील आणि बँकेच्या व्यवहारांतील जी पत तीसंबंधींच आपण बोलूं. यांचा विकास आणि सरकारी कर्जाचा विकास कसा झाला त्याची चर्चा येथें करावयाची नाहीं. मागें १९व्या प्रकरणांत कर्ज देऊन टाकण्याचें माध्यम या नात्याचें पैशाचें जें कार्य त्याचा विक्री मालाच्या साध्या खरेदीविक्री व्यवहारांत कसा विकास होत जातो

---

गरज जी उत्पन्न झाली ती निरनिराळ्या राजांनीं व शहरांनीं आपआपल्या मूल्य मापक प्रमाणांचीं वेगवेगळीं नाणीं पाडलीं म्हणून झाली. किंमतींची देवघेव करून टाकणें ती नाण्याच्या साहाय्यानेंच करून टाकणें अपरिहार्य झालें. व्यापारी परदेशी बाजारांत प्रवास करीत असतां रोखीनें देवघेव करता यावी म्हणून सोनें रुपें जवळ बाळगीत. प्रवासास निघतांना ते आपणाजवळच्या स्थानिक पैशांचें रूपांतर सोन्याचांदींत करीत; यामुळें स्थानिक नाण्याबद्दल सोनें चांदी देणें आणि उलट सोनें चांदीबद्दल स्थानिक नाणें देणें हा एक सार्वत्रिक व मोठा फायदेशीर धंदा होऊन बसला." (हूल्यॅन)

आणि विक्रीमालाच्या उत्पादकांत व त्यांची खरेदीविक्री करणाऱ्यांत ऋणको-धनको संबंध कसा निर्माण होतो हें दाखविलें आहे. " एका विक्रीमालाला उत्पादनासाठीं अधिक वेळ लागतो तर दुसऱ्याला कमी लागतो. निरनिराळ्या मालांचें उत्पादन वर्षांतील निरनिराळ्या ऋतूंत होत असतें. एक माल जेथें त्याचा विक्रीचा बाजार असेल तेथेंच जन्माला येतो तर दुसऱ्या मालाला विक्रीच्या बाजारासाठीं दूर अंतरावर जावें लागतें. म्हणून पहिल्या विक्रीमालाचा मालक हा आपला माल विकण्यास तयार असेल त्यावेळीं दुसऱ्या विक्रीमालाचा मालक अजून खरेदीस तयार झाला नसेल. जेव्हां तेच तेच व्यवहार त्याच त्याच माणसांचे दरम्यान पुनः पुन्हां होतात तेव्हां विक्रीच्या परिस्थितीवर उत्पादनाच्या परिस्थितीचें नियंत्रण पडत असतें. एखाद्या विक्रीमालाचा उपयोग उदा. घराचा उपयोग हा अमुक एका काळासाठीं विकला जातो. या ठिकाणीं या मुदतीच्या शेवटीं गिऱ्हाइकाला त्या विक्रीमालाचें उपयोगमूल्य पूर्णपणें पदरांत पडत असतें. म्हणून तो प्रथम आपला माल खरेदी करतो आणि त्याची किंमत मागाहून देतो. विक्रेता हा येथें धनको बनतो व गिऱ्हाइक ऋणको बनत असतें."

## पतीची जागतिक भूमिका

व्यापार आणि भांडवलशाही उत्पादनपद्धति यांचा विकास होत असतां पतीची भूमिका विस्तृत अनेक भानगडीची व जागतिक होत जाते. भांडवलशाही उत्पादन हें मालाच्या खरेदीविक्रीसाठींच होत असतें. पैसा हा या ठिकाणीं केवळ किंमत देऊन टाकण्याचें साधन येवढें काम एकंदरीनें करीत असतो. पतीचा व्यवहार सुरू झाला म्हणजे माल रोखीनें विकला जात नसून अमूक एका तारखेस पैसे

देण्याच्या वचनावर विकला जातो. ( सोयीसाठीं येथें आपण पैसे देण्याच्या अशा सर्व वचनांना हुंड्या—बिल्स् ऑफ एक्स्चेंज–असें म्हणूं. ) त्यांची मुदत भरेपर्यंत या हुंड्या स्वतःच व्यापारी पैसा म्हणून व्यवहारांत उपयोग केल्या जातात.

" प्रत्येक देशांत पतीचे बहुतेक सर्व व्यवहार औद्योगिक उत्पादनाच्या क्षेत्रांतच केले जातात. ........ कच्च्या मालाचा उत्पादक कारखानदाराला कच्चा माल उधारीनें देत असतो. हा कारखानदार त्या कच्च्या मालाची किंमत अमुक एका तारखेस देईन असें वचन लिहून देत असतो. कारखानदारानें या कच्च्या मालाचा पक्का माल केल्यानंतर तोही दुसऱ्या एका कारखानदाराला त्या मालाचे आणखी कांहींतरी रूपांतर करण्यासाठीं असाच उधारीनें आपला कच्चामाल देत असतो. अशा प्रकारें ही उधारी एकाकडून दुसऱ्याला, दुसऱ्याकडून तिसऱ्याला, अशी मालाच्या अखेरच्या म्हणजे उपभोक्त्या गिऱ्हाइकापर्यंत जात असते. घाऊक व्यापारी किरकोळ व्यापाऱ्याला माल उधारीनें देतो. या घाऊक व्यापाऱ्याला कारखानदाराकडून अथवा अडत्याकडून माल उधारीनें मिळालेला असतो. प्रत्येकजण एका हातानें उसनें घेतो व दुसऱ्या हातानें उसनें देतो. केव्हां केव्हां पैशाचीही अशी उसनवारी होते. पण बहुधा ती मालाचीच होत असते. अशा प्रकारें औद्योगिक जगांत उधारीची ही देवघेव सतत चालू असते. अशा अनेक देवघेवींचे केव्हां संयोग होतात तर केव्हां खटके उडत असतात. हा जो एकमेकाशीं केला जाणारा उधारीचा व्यवहार त्यांतील विविधता व त्या व्यवहाराचा होणारा विकास यामुळेंच एकंदर पतपद्धतीचा म्हणजे उधारीपद्धतीचा विकास होत असतो. आणि यांतच त्या उधारी पद्धतीचें खरें सामर्थ्य असतें. " ( कोकेलिन : लॅक्रेडिट् एट्लेस् बँक्स् ........ )

## उधारी व्यवहाराचें स्वरूप

उधारीच्या व्यवहाराचें दुसरें जें अंग आहे तें पैशाच्या व्यापाराशीं संबद्ध असें आहे. भांडवलशाही उत्पादनपद्धतींत विक्री मालाच्या व्यापाराच्या वाढीबरोबरच पैशाच्या व्यापाराची वाढ होणेंही अवश्य असते. धंदेवाल्यांच्या जगांतील गंगाजळी ठेवी सांठवून ठेवणें, पैशाच्या देवघेवीचें तांत्रिक कार्य उरकणें, आंतरराष्ट्रीय देवघेवीची विल्हेवाट करणें आणि अर्थात् सोन्याचांदीचा व्यवहार करणें या गोष्टी पैशाच्या व्यापाऱ्यांच्या हातीं केंद्रित होत जातात.

" व्यापारी हे पैशाच्या ठेवी घेणाऱ्या खजिनदाराजवळ ( म्हणजे बँकवाल्याजवळ ) कांहीं पैसा ठेव म्हणून ठेवतात. त्याबद्लीं तो बँकवाला आपल्या हिशेबखातीं या व्यापाराचें उधारीचें खातें सुरू करतो. नंतर हे व्यापारी आपणांस मिळावयाच्या पैशाचे हक्क वसूल करण्याचें काम या बँकवाल्याकडे सोंपवितात. तो बँकवाला हे पैसे वसूल करून सदर व्यापाऱ्याच्या खातीं जमा करतो. त्याचप्रमाणें हे व्यापारी आपल्यातर्फें देणें देऊन टाकण्याचीं कामेंही या बँकवाल्याला सांगतात. तीं देणीं देऊन टाकून बँकवाला तेवढ्या रकमा त्यांच्या चालू हिशेबांतून कमी करतो. या कामगिरीसाठीं तो बँकवाल्याला कांहीं मजूरी मागत असतो. एकाच बँकवाल्याकडे खातीं असलेल्या दोन व्यापाऱ्यांचेमध्यें देवघेव व्हावयाची असल्यास दोघांच्या खात्यांत नुसता जमाखर्च करूनही ही देवघेव होऊं शकते. तसेंच निरनिराळे बँकवालेही आपापसांतील देवघेव रोजच्या रोज अशीच जमाखर्चानें पुरी करतात. " ( विसरिंग )

" व्हेनिसमधील रोकड नेण्याआणण्यासंबंधींच्या विशेष गैरसोयीच्या परिस्थितीमुळें त्या शहरच्या घाऊक व्यापाऱ्यांनीं ' ठेवी-

दारांचा संघ ' स्थापन केला. या संघाचे सभासद प्रत्येकीं संघाच्या तिजोरींत कांहीं ठेवी ठेवीत. त्यांना या ठेवींच्या संरक्षणाची हमी दिली जात असून संघातर्फे त्या ठेवीवर नियंत्रण ठेवलें जात असे व ठेवीचा वापर केला जाई. हे ठेवीदार संघाकडे आपलीं देणीं देऊन टाकण्याचे हुकूम पाठवीत. संघाचे सभासद हेच जेव्हां परस्परांचे ऋणको व धनको असत तेव्हां ऋणको सभासदानें केलेली कर्जफेड त्याच्या खात्यावरून वजा करून धनकोच्या खात्यावर जमा केली जात असे. व्हेनीसचे हे ठेवीदारांचे संघ हेच ठेवी आणि कर्जफेड यांच्या बँकांचे मूळ आरंभ होतात. " ( हूल्मन )

## बँक व्यवहार म्हणजे पैशाची दलाली

अशा बँका निघाल्या म्हणजे व्याज देणाऱ्या भांडवलाचा म्हणजेच पैशाच्या भांडवलाचा व्यवहार हा पैशाचा धंदा करणाऱ्या लोकांची एक स्वतंत्र कामगिरीच होऊन बसतो. पैसा कर्जाऊ देणें व कर्जाऊ घेणें हें त्याचें विशिष्ट काम होतें. पैसारूपी भांडवल देणारे खरे सावकार व खरे ऋणको यांच्या दरम्यान मध्यस्थाचें काम हे बँकवाले करीत असतात. सामान्यतः सांगावयाचें म्हणजे बँकेच्या व्यवहारांत कर्जाऊ भांडवलाचें केंद्रीकरण बँकवाल्याच्या हातांत फार मोठ्या प्रमाणावर होत असतें. यामुळें व्यक्तिशः कोणताही सावकार ऋणकोसमोर न येतां सर्व सावकारांचा प्रतिनिधि असा जो बँकवाला तो औद्योगिक व व्यापारी भांडवलदारासमोर ( म्हणजे ऋणकोसमोर ) उभा रहात असतो. बँकवाले हे पैसारूपी भांडवलाचे जागतिक वहिवाटदार होतात. त्याचप्रमाणें ते सर्व सावकारापासून कर्ज घेऊन हें कर्ज आपल्या मार्फतच सर्व व्यापारी जगाला देतात व त्यामुळें ते ऋणकोंनाही केंद्रीभूत करतात. कमी व्याजाच्या दरानें कर्ज

घ्यावें आणि जास्त दरानें द्यावें व या दोन दरांतील जे अंतर तो नफा म्हणून घ्यावा असा सामान्यतः बँकवाल्यांचा व्यवहार असतो.

## भांडवल कसें मिळतें

बँकवाल्यांना कर्जाऊ मिळूं शकणारें भांडवल ते अनेक प्रकारें आपल्या हातीं घेत असतात. ( १ ) प्रत्येक धंदेवाला अथवा व्यापारी याच्याजवळ कांहीं पैशाचा साठा असतो. अथवा त्याला पैसा मिळालेला असतो. हा पैसा बँकवाल्याजवळ खजिनदार या नात्यानें ठेवलेला असतो. व्यापारी जगाचा पैशाचा साठा बँकवाल्याजवळ एकत्र ठेवण्यांत आल्यामुळें तो सगळाच्या सगळा तसाच निकामी ठेवावा लागत नसून सामान्यतः व्यवहारास लागेल इतका कमींत कमी ठेवण्यांत येतो व बाकीचा कर्जाऊ देण्यांत येतो. ( २ ) तसेंच पैशाचे भांडवलदारांचा जो पैसा असतो तो ते बँकांत ठेवतात. आणि तो कर्जाऊ देण्याचें काम बँकावर सोंपवितात. ( ३ ) बँक ठेवीवर व्याज देऊं लागली म्हणजे समाजांतील सर्व वर्गाजवळ जी शिल्लक रहात असते व जी मधून मधून व्यापाराविना निकामी पडलेली असते अशा रकमा बँकांत ठेवी म्हणून ठेवल्या जातात. अशा रकमा आपापल्यापरीं अगदीं लहान असतात. यामुळें त्यांचा पैसारूपीं भांडवल म्हणून उपयोग होऊंच शकत नाहीं. पण या लहान रकमा बँकामध्यें ठेवी म्हणून जमल्यावर त्यांचें मोठें आर्थिक सामर्थ्य बनतें. ( ४ ) कांहीं नियतकालिक उत्पन्नें एकदम उपभोगलीं न जातां हळूं हळूं उपभोगलीं जाऊं शकतात. तींही बँकांत ठेवण्यांत येतात.

कर्जें देण्याचेही अनेक प्रकार आहेत. हुंड्यांची रक्कम त्यांच्या मुदतीपूर्वी देऊन टाकून त्या सोडवून घेणें; किरकोळ रकमा अनेक स्वरूपांत कर्जाऊ देणें वैयक्तिक पतीवर प्रत्यक्ष कर्जें देणें, ज्यावर

व्याज मिळूं शकतें अशा दस्तैवजांच्या तारणावर विशेषतः मालांच्या मालकी सर्टिफिकिटांच्या तारणावर कर्जें देणें, इत्यादि.

बँकवाले ज्या पैसारूपीं भांडवलाचे व्यवहार करतात तें भांडवल व्यापारी व उद्योगधंदेवाले यांचे व्यवहारांत गुंतलेलें जें भांडवल असतें तेंच होय. बँकवाले जो व्यवहार करतात तोही व्यापारी व धंदेवाले यांचाच व्यवहार असून बँकवाले हे फक्त मध्यस्थ म्हणून तो व्यवहार करीत असतात.

तसेंच बँकवाल्यांचा नफा हा वाढाव्यांतूनच कापलेला असतो. कारण बँकवाले हे जो व्यवहार करतात, तो उत्पन्न होऊन चुकलेल्या मूल्यांचा करीत असतात. त्याचें भांडवल कर्जाच्या स्वरूपाचें असतें तरी तें उत्पन्न होऊन चुकलेलेंच मूल्य असतें यांत संशय नाहीं. पैशाच्या व्यवहारांतील कांहीं तांत्रिक बाबी स्वतः धंदेवाले व व्यापारी यांनाही कराव्या लागतात.

## चर्चेचा सारांश

पतीच्या व्यवहाराच्या वर केलेल्या चर्चेचा सारांश खालीलप्रमाणें सांगतां येईल.

( १ ) नफ्याचा दर सर्वसामान्य करण्याचें माध्यम म्हणून उधारीचा म्हणजे पतीचा व्यवहार सुरूं करणें अवश्य होतें.

( २ ) पतीमुळें खरेदीविक्री व्यवहारांतला खर्च कमी होतो.

( १ ) उधारी पद्धति सुरूं करून पैशाची बचत पुढील तीन प्रकारांनीं करतां येतें.

( अ ) बऱ्याच व्यवहारांत उधारीच्या व्यवहारामुळें पैशाची गरजच लागेनाशी होते.

( ब ) पैशाचा चलनवेग वाढतो. बँकवाल्यांनीं अमलांत आणलेल्या अनेक तांत्रिक पद्धतीमुळें आणि विक्रीमालाच्या भराभर होणाऱ्या उलाढालीमुळें पैशाच्या चलनाचा हा वेग वाढत असतो.

( क ) सोन्याच्या ऐवजीं कागदी पैसा वापरला जात असल्यामुळेंही पैशाची बचत होते.

( २ ) खरेदीविक्री व्यवहाराच्या ज्या अनेक अवस्था असतात त्या उधारी पद्धतीमुळें कमी होऊन उत्पादनाच्या सर्व प्रक्रिया कमी होतात. त्याबरोबरच उधारीमुळें खरेदी व विक्री या व्यवहारांत वेगळेपणा होऊन अंतर पडत जातें. आणि त्यामुळेंच सट्टेबाजीलाही वाव मिळतो.

उधारीमुळें गंगाजळी कमी ठेवतां येते. खरेदीविक्री व्यवहारामध्यें पैसा जें माध्यम असतें त्याचें परिमाण उधारीमुळें कमी होऊं शकतें. आणि अर्थात् पैसारूपीं भांडवल कमी पुरूं शकतें.

( ३ ) बँकामुळें संयुक्त भांडवली कंपन्या काढतां येतात. त्यांचा उपयोग खालीलप्रमाणें होतो.

( १ ) उत्पादनाचें प्रमाण खूप वाढवून वैयक्तिक भांडवलाला अशक्य झाला असता इतका मोठा धंदा उभारतां येतो.

( २ ) संयुक्त भांडवली कंपन्यांचें भांडवल अनेकांच्या सहकार्यामुळें एकत्र जमत असतें. तेथें त्याचें वैयक्तिक भांडवल हें स्वरूप नष्ट होऊन सामाजिक भांडवलाचें स्वरूप त्यास प्राप्त होतें. या संयुक्त भांडवली कंपन्यांत भांडवलशाही उत्पादनपद्धतींत शक्य होईल तितक्या मर्यादेंत खासगी मिळकत या नात्यानें भांडवल नष्ट झालेला देखावा आपणास पहावयाला मिळतो.

( ३ ) जो भांडवलदार वस्तुतः स्वतः धंदेवाला असतो तो संयुक्त भांडवली कंपनींत केवळ एक डायरेक्टर होतो. दुसऱ्यांच्या भांडव-

लांचा तो वहिवाटदार होत असतो. आणि भांडवलांचे जे मालक ते फक्त सावकार होत असतात. नफ्याच्या त्यांना मिळणाऱ्या वाट्यांत व्याज व धंद्यावरील नफा म्हणजे एकूण नफा समाविष्ट होत असतो. तरी हा नफा यापुढें केवळ व्याज या स्वरूपांतच मिळत जातो. ( कारण डायरेक्टर या नात्यानें दिला जाणारा पगार हा डायरेक्टरांची कष्टाची मजूरी असा मानला जातो. ) भांडवलाच्या मालकाला मिळ-णारा नफा त्याला कष्टादाखल मिळत नसून केवळ मोठा मालक म्हणून मिळतो म्हणून याला व्याज असें म्हणणें प्राप्त होतें. भांडवलाची मालकी आणि धंद्यामध्यें उत्पादन व पुनरुत्पादन या कामीं भांडवलाचा केला जाणारा वापर या दोहोंमध्यें बँकव्यवहार सुरू झाल्यापासून पूर्ण व कायमचा वियोग झालेला आहे.

## उत्पादन पद्धतीची संक्रमणावस्था

बँक ही संस्था भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या परिपूर्ण विका-साचें फल असून खाजगी वैयक्तिक उत्पादकांच्या भांडवलांचे उत्पा-दकांच्या सामुदायिक मालकीच्या भांडवलांत रूपांतर करण्याची बँक ही एक पायरी आहे. तसेंच खाजगी मालकीच्या भांडवलाशीं संबद्ध असलेल्या अनेक व्यवहारांना सामाजिक व्यवहाराचें रूप देण्याचीही बँक ही एक पायरी आहे.

या बँकव्यवहारामुळें भांडवलदारांना मिळणारा नफा हा केवळ व्याजाच्या स्वरूपाचा झाल्यानें भांडवलावर जर नुसतें व्याज मिळत जाईल तर सामाजिक स्वरूपाचे धंदे करणें हें सध्यांही शक्य आहे.

( फ्रेड्रिक एंजल्सनें येथें पुढील टीप जोडली आहे. "मार्क्सनें वरील मजकूर लिहिल्यानंतर धंद्यांचे नवीन प्रकार उत्पन्न झाले. संयुक्त

भांडवली कंपन्या या आतां प्रचंड सामर्थ्य पावल्या आहेत. परंपरागत असे चढाओढीचें स्वातंत्र्य आतां अगदीं ठार झालें आहे. चढाओढीच्या तत्त्वाचें आतां अगदीं दिवाळें वाजलें आहे. कारण प्रत्येक देशांत धंद्याच्या एक एका शाखेंतले सगळे भांडवलदार उत्पादनाचें नियंत्रण करण्यासाठीं एकजूट होतात. केव्हां केव्हां कांहीं वेळ ही एकजूट आंतरराष्ट्रीय ट्रस्ट निर्माण करण्यापर्यंत जाते. इंग्लंड व जर्मनी या दोन देशांतील लोखंडाच्या कारखानदारांनीं असे ट्रस्ट केले होते. पण अशा प्रकारचें उत्पादनाचें सामाजीकरण उपयोगी ठरलें नाहीं. वैयक्तिक भांडवलदारांचे हितविरोध आड येऊन ही एकजूट अनेकदां मोडली. आणि म्हणून ज्या ठिकाणीं उत्पादनाच्या एकंदर पद्धतींत धंद्याच्या एका शाखेंतील सर्वच्या सर्व उत्पादन एकत्र आणणें शक्य झालें, तेथें ती सगळीच्या सगळी शाखा एकाच संयुक्त भांडवली कंपनींत एकाच व्यवस्थेखालीं आणण्यांत आली. म्हणून अशा शाखांतून चढाओढीऐवजीं पूर्ण मुखत्यारीच निर्माण झाली. व भावी काळांत अखिल राष्ट्रानें खासगी संपत्ति सार्वजनिक मालकीची करण्याची पूर्व भूमिका आतां सुदैवानें तयार झाली आहे.")

भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या कक्षेंतच भांडवलशाही उत्पादन नष्ट करून टाकण्यासारखेंच हें आहे. हीं विसंगति ठळकपणें डोळ्यांत भरणारी असून ही भांडवलशाही उत्पादन पद्धतींतून नव्या उत्पादनपद्धतीकडे जाण्याची केवळ संक्रमणावस्था आहे असें चटकन् लक्षांत येते.

## शिलक कोण टाकतो

( ४ ) बँकामुळें संयुक्त भांडवली कंपन्या तर होतातच, पण शिवाय बँकांच्या साहाय्यानें एखादा वैयक्तिक भांडवलदार जरी व्यवहार करीत असला तरी त्यालासुद्धां कांहीं एका मर्यादेंत भांडवलावर

व दुसऱ्याच्या श्रमावर सर्वाधिकार प्राप्त होतात. एखाद्या माणसाजवळ जें भांडवल असतें त्याच्या आधारावर त्याला उधारी मिळूं लागते. म्हणजेच त्याची पत उभारली जाते. घाऊक व्यापारांचे बाबतींत ही गोष्ट विशेष प्रकारें खरी असते. सट्टेबाजी करणाऱ्या घाऊक व्यापाऱ्यानें जो पैसा इरेस घातलेला असतो तो सामाजिक मालकीचा पैसा असतो. भांडवलाचा उगम काटकसरीनें केलेल्या संचयांत आहे असा जो जुना समज आहे तो आतां अगदींच असत्य ठरला आहे. कारण व्यापारी हा आतां स्वतः काटकसरीनें शिल्लक टाकत नसून इतरांनीं शिल्लक टाकावी व ती आपण वापरावी हें त्याला हवें असतें.

## भांडवलशाहीस खिंडार पडलें

कामगारांचे सहकारी-कारखाने हे भांडवलशाही उत्पादनपद्धतीला पहिलें पडलेलें मोठें खिंडार होय. विद्यमान भांडवलशाही पद्धतीमुळें सर्व सहकारी संस्थांत स्वाभाविकच कांहीं दोष शिरलेले आहेत. पण निदान मजूर हे स्वतःच भांडवलदार व स्वतःच परस्परसहकारी असे श्रमकर्ते असल्यानें श्रम आणि भांडवल यांमधील विरोध सहकारी कारखान्यांत नष्ट झालेला असतो. याच सहकारी कारखान्यांमुळें, उत्पादनपद्धतीचें सामर्थ्य अमुक एका मर्यादेपर्यंत वाढलें असतां एका उत्पादनप्रकारांतून दुसरा उत्पादनप्रकार कसा निर्माण होतो हें कळून येतें.

संयुक्त भांडवली कंपन्या याही सहकारी कारखान्यांप्रमाणेंच भांडवलशाही उत्पादनाकडून सामाजिक उत्पादनाकडे जाण्याच्या मार्गांतले टप्पेच होत. संयुक्त भांडवली कंपन्यांत अंतर्विरोध हा झाकून टाकलेला असतो. सहकारी कारखान्यांत तो अजिबात नष्ट झालेला असतो.

बँकेच्या भांडवलांत (१) सोनें अथवा नोटा या स्वरूपांत असलेली रोकड आणि (२) सिक्यूरिटीज यांचा समावेश होतो. या सिक्यूरिटीजचेही दोन प्रकार पडतात.

(१) व्यापारी हुंड्या व इतर व्यापारी दस्तऐवज, यांपैकीं हुंड्या या तरंगतें मूल्य ( फ्लोटिंग व्हॅल्यू ) असतात. या हुंड्यांच्या वटावाचें देणें एका मुदतीमागून दुसऱ्या मुदतीला, दुसरीमागून तिसरीला असें द्यावें लागत असते. हुंड्या वटविणें, म्हणजे त्यांची मुदत भरण्याआधीं त्यावरील रक्कम देऊन टाकणें हाच बँकांच्या व्यवहारांतला बहुतेक भाग असतो.

( २ ) ट्रेझरीनोट्स् सारख्या पब्लिक सिक्यूरिटीज, निरनिराळ्या कंपन्यांचे भाग थोडक्यांत म्हणजे ज्यावर व्याज मिळूं शकते असें हुंड्यांच्या खेरीज इतर प्रकारचे दस्तैवज, यांमध्यें गहाण खतांचाही समावेश होतो.

अशा प्रकारचें जें भांडवल बँकवाल्यांच्या जवळ असतें त्याचें बँकवाल्यांनीं धंद्यांत गुंतवलेलें भांडवल आणि ठेवीदारांच्या ठेवी असे दोन भाग पडतात. चलनी नोटा काढणाऱ्या बँकांच्या बाबतींत नोटा हें तिसऱ्या प्रकारचें भांडवल असतें.

## प्रत्येक उत्पन्न व्याजच ?

तूर्त आपण ठेवींचा आणि नोटांचा मुद्दा बाजूस ठेऊं.

ज्या भांडवलापासून व्याजाचें उत्पन्न मिळत असतें त्या भांडवलानें नियमितपणें मिळणाऱ्या कोणत्याही ठराविक उत्पन्नास व्याजाचेंच स्वरूप दिलें आहे. मग असें उत्पन्न भांडवलापासून मिळालें असो अथवा नसो. त्याचप्रमाणेंच कोणतीही रक्कम उत्पन्न या नात्यानें वाप-

रून संपवली नाहीं कीं ती लगेच भांडवल आहे असें वाटूं लागतें. तिच्यापासून भविष्यकाळीं जें व्याज मिळणें शक्य आहे अथवा मिळेल त्या व्याजाचें हें भांडवल होय असा भाव मनामध्यें दृढपणें होत असतो.

ही सर्व परिस्थिति समजण्यास अगदीं सोपी आहे. दरसाल सरासरी व्याजाचा दर ५% आहे असें आपण समजूं. १२५ डॉ. ही रक्कम व्याज देणाऱ्या भांडवलांत रूपांतरित केली तर वरील दरानें या रकमेवर ६.२५ डॉ. व्याज दरसाल मिळूं लागेल. अर्थात प्रत्येक ६.२५ डॉ. इतकें दरसाल होणारें उत्पन्न १२५ डॉ. भांडवलावरील व्याज असें मानलें जातें. पण हा भ्रम आहे. जीपासून ६.२५ डॉ. हें उत्पन्न झालें ती वस्तु एखादा कर्जाचा हक्क अथवा मालकी हक्क अथवा जमीनजुमल्यासारखें खरोखर धनोत्पादनसाधन असेंच कांहीं-तरी असलें पाहिजे, तरच ६.२५ डॉ. या उत्पन्नास व्याज म्हणतां येईल.

## सरकारी कर्ज

उदा. सरकारी कर्ज आणि मजूरी यांचा विचार करूं.

सरकार या संस्थेनें काढलेल्या कर्जाचें अमुक इतकें व्याज दरसाल आपल्या सावकारांना दिलें पाहिजे. सरकारच्या कर्जाबाबतींत महत्त्वाची एक गोष्ट अशी असते कीं आपल्या ऋणकोला म्हणजे सरकारला सरकारी कर्जाचा सावकार नोटीस देऊं शकत नाहीं. तो फक्त आपला हक्क म्हणजे कर्जखत विकूं शकतो. मूळ भांडवल हें सरकारनें खर्चून टाकलेलें असतें; तें अस्तित्वांत असतच नाहीं. सावकाराच्या हातांत जें कांहीं असतें तें म्हणजे (१) सरकारच्या सहीची, समजा २५ डॉ. ची, प्रॉमिसरी नोट (२) आणि ह्या नोटे-

मुळें सरकारी उत्पन्नावर म्हणजे सरकारला मिळणाऱ्या करावर ५% अथवा १.२५ डॉ. मिळविण्याचा हक्क. ( ३ ) ही प्रॉमिसरी नोट विकण्याचा त्याला असलेला हक्क. पण या तीनही बाबतींत ज्या भांडवलावर व्याज देतें असें मांडलें जातें तें भांडवल केवळ काल्पनिक असतें: सरकारला दिलेली ही रक्कम आतां जिवंत राहिलेली नाहीं इतकेंच नाहीं तर ती भांडवल म्हणून धंद्यांत गुंतविण्याचा सरकारचा कधीं हेतुच नव्हता.

## एक खुळचट समज

आतां आपण श्रमशक्तीचा विचार करूं. येथें मजूरांची मजूरी ही व्याज अशी मानली आहे आणि अर्थात श्रमशक्ति ही व्याज देणारें भांडवल अशी मानली आहे. उदा. दरसाल २५० डॉ. जर एखाद्याची मजूरी असेल व व्याजाचा दर ५% असेल तर माझी वार्षिक श्रमशक्ति ५००० डॉ. इतकी आहे असें समजावें. भांडवलशाही विचारपद्धतींतील खुळचटपणाचा हा अगदीं कळस होय. या कल्पनेंतील मूर्खपणा दोन कारणांनीं स्पष्ट होतो. पहिली गोष्ट अशी कीं मजूराला हें "व्याज" मिळण्यासाठीं कष्ट करावे लागतात. आणि दुसरी गोष्ट अशी कीं त्याची श्रमशक्ति त्याला ५००० डॉ. या भांडवलमूल्यांत ताबडतोब रूपांतरित करतां येत नाहीं.

अशा रीतीनें केल्या जाणाऱ्या या हिशेबाला 'कॅपिटलायझेशन' म्हणजे भांडवलाच्या दृष्टिकोनांतून केलेला हिशेब असें म्हणतात. नियमितपणें मिळणाऱ्या प्रत्येक उत्पन्नाला असें काल्पनिक भांडवल जोडून नफ्याच्या सरासरी दराच्या मापानें हा हिशेब केला जातो. भांडवलाचा प्रत्यक्ष धंद्यांत उत्पादनाच्या कामीं उपयोग करण्याच्या

ज्या प्रक्रिया त्यांचा मागमूससुद्धा या पद्धतीमुळें विचारकक्षेंत येऊं शकत नाहीं. आणि भांडवल हें जणूंकांहीं आपलें आपणच वापरलें जाऊन व्याज देतें असा समज कांहींशा गूढ मार्गानें सर्वांचा झालेला असतो.

## प्रॉमिसरी नोट

सिक्युरिटीजमध्यें समाविष्ट होणारी जी प्रॉमिसरी नोट तीही सरकारी कर्जाप्रमाणें काल्पनिक भांडवलाचें प्रतीक असूं शकते. त्याचें भांडवलमूल्य हा शुद्ध भ्रम असूं शकतो. रेल्वे, खाणी, जहाजकंपन्या यांचें भांडवल हें खरेखुरें भांडवल असतें. कारण तें त्या त्या धंद्यांत गुंतवलेलें असतें. पण या भांडवलालाही कंपनीचे भाग या नात्यानें भांडवलमूल्य आणि कंपनीच्या धंद्यांत गुंतवलेलें भांडवल असें दुहेरी अस्तित्व असूं शकत नाहीं. धंद्यांत गुंतून पडलेलें भांडवल एवढें एकच स्वरूप त्याला असूं शकतें. भागीदाराचा भाग हें जें त्याचें स्वरूप तो केवळ त्या भागीदाराचा वाढाव्यावरील हक्क होय.

## सिक्यूरिटी हा विक्रीमाल

कागदी सिक्यूरिटी या विकतां येतात. आणि म्हणून त्या विक्री-माल ठरतात. या विक्रीमालाच्या किंमती आणि त्यांचें चलन हें विशिष्ट प्रकारचें असतें. एखाद्या धंद्याचा नफा जसा कमीअधिक होईल त्याप्रमाणें त्या धंद्याच्या भागांची किंमत कमीअधिक होत असते. भागाची कागदावर नमूद केलेली किंमत जर २५ डॉ. असेल आणि नफा जर ५ पासून १०% पर्यंत वाढला तर या भागाची किंमत २५ वरून ५० डॉ. पर्यंत जाते. (इतर परिस्थिति बदलली नाहीं असें धरून चालून, व व्याजाचा दर ५% आहे असें धरून चालून.)

नफा कमी होऊं लागला तर याउलट परिणाम घडत असतो. पण भांडवलाचा धंद्यांत होणारा उपयोग हा कमीअधिक न होतां तसाच चालू राहिला किंवा खरेंखुरें भांडवल बाजारांत उपलब्ध नाहींसेंच झालें तर कागदी रोख्याची किंमत व्याजाच्या दराच्या व्यस्त प्रमाणांत कमी अधिक होत असते. व्याजाचा दर ५% वरून १०% पर्यंत वाढला तर ज्या सिक्यूरिटीवर १.२५ डॉ. व्याज देण्याची हमी मिळालेली असते ती सिक्यूरिटी आतां २५ डॉ. ऐवजीं १२.५० डॉ. किंमतीची होते. व्याजाचा दर ५% पासून २ $\frac{1}{2}$% खालीं आला तर तोच २५ डॉ.चा रोखा ५० डॉ. किंमतीचा होतो. पैशाच्या बाजारांत ज्या ज्या वेळीं मंदी येते त्या त्या वेळीं या रोख्यांच्या किंमती दुहेरी कारणांनीं उतरत असतात. व्याजाच्या दरांत वाढ हें पहिलें कारण आणि बाजारांत विक्रीस येणाऱ्या रोख्यांच्या संख्येंत वाढ हें दुसरें कारण होय.

हे सर्व कागदी रोखे म्हणजे भावी उत्पादनावरील संचित मालकी हक्क होत.

अशा प्रकारें बँकवाल्याच्या भांडवलापैकीं बराचसा भाग केवळ काल्पनिकच असतो. त्यामध्यें कर्जाचे हक्क म्हणजे हुंड्या, सरकारी कर्जरोखे म्हणजे भूतकालांतलें भांडवल आणि धंद्याच्या भागीदारांचे भाग म्हणजे भावी मिळकती यांचाच बँकवाल्यांच्या भांडवलांत समावेश होत असतो.

उधारीपद्धतीच्या विकासाबरोबरच सर्वच भांडवल एकदम दुप्पट अथवा तिप्पट झाल्यासारखें दिसतें. कारण कर्जावरील किंवा मालकीचे जे हक्क ते एकेकाच भांडवलाचे प्रतिनिधि असूनही एकदम अनेकांच्या हातांत अनेकविधरूपांत दिसत असतात. मिळण्यासारखें आहे असें

मानलें जाणारें जें भांडवल त्यांतलें पुष्कळसें भ्रमस्वरूप असतें. रिझर्व्ह फंड म्हणजे गंगाजळी यांत तरी कांहीं घट्ट वस्तू आपल्या हाताशीं लागेल असें आपणांस वाटत असतें तोही भ्रमच असतो.

( फ्रेड्रिक एंजल्सनें एक उदाहरण दिलें आहे. नोव्हेंबर १८९२ मध्यें लंडनमधील सर्वांत मोठ्या अशा पंधरा बँकाजवळ दोन कोटी ऐंशी लक्ष पौंड एकूण गंगाजळी ठेव होती. त्यापैकीं फक्त ३० लक्ष पौंड तेवढे तिजोरीमध्यें अस्तित्वांत होते. बाकीची सर्व रक्कम बँक ऑफ इंग्लंडमध्यें असलेल्या ठेवींच्या आकड्याच्या स्वरूपांत होती. पण बँक ऑफ इंग्लंडमध्यें असलेली ठेव सुद्धां त्याच महिन्यांत १ कोटी ६० लक्ष पौंडाहून नेहमीं कमीच होती. )

## बँकशाहीचे दूरवरचे परिणाम

बँकांची पद्धत ही पद्धतशीर संघटनेच्या दृष्टीनें विचार करतां भांडवलशाही उत्पादनपद्धतींतील अत्यंत कृत्रिम पण अत्यंत परिपूर्ण अशी संघटना होय. म्हणूनच बँक ऑफ इंग्लंडसारख्या संस्थेचे व्यापार व उद्योगधंद्यावर एवढें प्रचंड वर्चस्व असतें. वास्तविक व्यापार आणि धंदे यांचें सर्व कार्यक्षेत्र बँकेच्या कार्यकक्षेपलीकडे आहे. बँक ऑफ इंग्लंड ही व्यापार व उद्योगधंदे यांसंबंधानें नेहमीं तिऱ्हाइतपणाची भावना ठेवते. तरीही या बँकेचें त्यावर इतकें वर्चस्व असतें. बँकेच्या पद्धतीमुळें सर्व समाजाच्या पैशाचा एकूण जमाखर्च होऊं लागून सामाजिक प्रमाणांत धनोत्पादनांची वाटणी होण्याची पद्धति अस्तित्वांत येते. पण हा फरक एकंदर बाह्य रूपापुरता असतो. आपण मागें पाहिलेंच आहे कीं, प्रत्येक भांडवलवाल्याचा अमुक एका भांडवलावर जो नफा मिळत असतो तो नफा त्या भांडवलानें स्वतः मजुरांचे जे मोफत श्रम खिशांत टाकले त्यावरून ठरत नसून एकंदर

समाजांतील सर्व भांडवलानें मिळविलेल्या सर्व वाढाव्यापैकीं प्रत्येक भांडवलदारास अथवा विशिष्ट भांडवलास यथाप्रमाण जो वाटा मिळत असतो, त्यावरून सरासरी नफा मिळत असतो. भांडवलाचें हें सामाजिक स्वरूप पतीचे व्यवहार आणि बँक ही संस्था यांचा पूर्ण विकास झाल्यावाचून लक्षांत येत नाहीं. पण एकदां हा विकास झाला म्हणजे याचे परिणाम फारच दूरवर पोंचणारे असतात. समाजांत वेळोवेळीं बेकार असणारें जें भांडवल तें बँकेच्या व पतीच्या संघटनेमुळें व्यापारी व औद्योगिक भांडवलदाराच्या हातीं येतें. यामुळें हें भांडवल जो कर्जाऊ देतो व जो तें प्रत्यक्ष वापरतो त्या दोहांपैकीं कोणीच त्या भांडवलाचा मालक अथवा निर्माता नव्हे अशी परिस्थिति उत्पन्न होते. याप्रमाणें बँकेच्या पद्धतीनें भांडवलाचें खासगी स्वरूपच नष्ट होतें. अर्थात् तेवढ्यापुरतें भांडवलशाहींतलेंही भांडवल हें स्वरूप नष्ट होतें; पण तें तेवढ्यापुरतेंच नष्ट होतें हें लक्षांत ठेवलें पाहिजे. बँकांच्या मध्यस्थीमुळें भांडवलाच्या विभागणीचें कार्य भांडवलदार व सावकार यांच्या हातून काढून तें एक स्वतंत्र सामाजिक कार्य बनवलें जातें. पण यामुळेंच पतीचे व्यवहार आणि बँका यांनीं भांडवलशाही पद्धतीला आपली नैसर्गिक मर्यादा ओलांडून जाणें भाग पडतें. त्यामुळेंच अखेरीस प्रचंड स्वरूपाची आर्थिक संकटें (क्रायसिस्) आणि लबाड्या यांना जन्म मिळतो.

शेवटचा मुद्दा सांगावयाचा तो हा कीं भांडवलशाही उत्पादन-पद्धतींतून सामुदायिक श्रमानें सामुदायिक उत्पादन करण्याच्यापद्धती-कडे जातांना या पतीच्या संघटनेचा मोठ्या बलवान अशा तरफे-सारखा उपयोग होईल यांत मुळींच संशय नाहीं. पण त्यासाठीं भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या अनेक बाबतींत मूलग्राही फरक केले पाहिजेत. पण बँक आणि पतीचे व्यवहार यांनीं संपत्ति एखाद्या

जादूप्रमाणें सामुदायिक मालकीची केली जातें असा जो समज आहे तो मात्र भांडवलशाही उत्पादनपद्धतीचे सिद्धांत आणि त्या उत्पादन-पद्धतीचेंच एक अंग अशी जी पतीची संघटना तिचें स्वरूप मुळींच न कळल्यामुळें झालेला असतो.



( १ )

# मूळ कॅपिटल ग्रंथाच्या पहिल्या खंडाच्या पहिल्या आवृत्तीस मार्क्सनें लिहिलेली प्रस्तावना

ज्या ग्रंथाचा पहिला खंड मी आज वाचकासमोर ठेवीत आहें तो १८५९ सालीं प्रसिद्ध झालेल्या " ए काँट्रीब्यूशन् टू दी क्रिटिक् ऑफ पोलिटिकल इकॉनमी " या ग्रंथाचाच पुढें चालू असलेला भाग होय. तो ग्रंथ आणि प्रस्तुत ग्रंथ या दोहोंच्यामध्यें बराच काळ गेला याचें कारण अनेक वर्षे टिकलेल्या दुखण्यानें माझ्या कार्यांत पुनःपुन्हा खंड पडला हें आहे.

त्या ग्रंथांतील मजकुराचा मथितार्थ या खंडाच्या पहिल्या तीन प्रकरणांत दिला आहे. असें करण्यांत प्रस्तुत ग्रंथाला त्या पूर्वीच्या ग्रंथाचा संदर्भ मिळावा आणि हा ग्रंथ स्वयंपूर्ण व्हावा हे दोन हेतु तर होतेच, पण त्या ग्रंथांत केलेली विषयाची मांडणी या ग्रंथांत सुधारलीही आहे. पूर्वीच्या ग्रंथांत नुसतें सूचित केलेले मुद्दे जेथें जेथें शक्य झालें तेथें तेथें या ग्रंथांत अधिक तपशीलानें मांडले आहेत. उलट त्या ग्रंथांत तपशीलवार मांडलेल्या कांहीं मुद्यांचा येथें संक्षेपतः उल्लेख केला आहे. मूल्य आणि पैसा यासंबंधींच्या सिद्धांताच्या इतिहासाचीं प्रकरणें या ग्रंथांतून वगळलीं आहेत. परंतु या ग्रंथाच्या पहिल्या प्रकरणांतील तळटीपामध्यें मूल्य सिद्धांताच्या इतिहासावर आणखी ज्ञानसाधनें कोणतीं आहेत त्याची माहिती वाचकास मिळू शकेल.

कशाचाही आरंभ हा कठिणच असतो. भौतिकशास्त्रांचे बाबतींतही ही गोष्ट खरी आहे. या ग्रंथाचें पहिलें प्रकरण विशेषतः त्यांतील विक्रीमालाच्या पृथक्करणाचा भाग समजण्यास अतिशय कठीण जाईल.

मूल्याची वस्तू आणि मूल्याचें परिमाण या विषयांची चर्चा मी पृथक्करणपूर्वक शक्य तितकी सुबोध केली आहे.* मूल्यरूपाचें पूर्ण विकसित स्वरूप म्हणजे पैसा हेंच असतें ही अगदीं प्राथमिक आणि साधी गोष्ट आहे. मानवी मनानें गेलीं २ हजार वर्षें या प्रश्नाचा तळ पाहण्याचा प्रयत्न केला असून तो व्यर्थ गेला आहे. पण उलट किती तरी अधिक किचकट व मिश्र अशा स्वरूपांचें पृथक्करण माणसांनीं बऱ्याच यशस्वितेनें केलें आहे. असें कां व्हावें? याचें उत्तर असें आहे कीं जिवंत व एकजीव संघटना या दृष्टीनें जिवंत शरीराचा अभ्यास हा, त्या शरीरांतील पृथक् पृथक् पेशींच्या अभ्यासाहून अधिक सोपा असतो. शरीराच्या अभ्यासास सूक्ष्मदर्शक यंत्र व रासायनिक उपाय यांची मदत होत असते. पण आर्थिक क्षेत्रांतील रूपांच्या अभ्यासास असें कांहींच साधन मिळूं शकत नाहीं. आर्थिक व्यवहारांतील निरनिराळे विषय हे केवळ कल्पनेनें त्या व्यवहारांतून अलग काढून त्यांचा अभ्यास करावा लागतो. भांडवलशाही समाजव्यवस्थेंत

* ही चर्चा विशेष सुबोध करावी लागली याचें कारण श्रुल्ज् डेलिच् याजविरुद्ध फर्निलड लॅझेलेनें आपल्या ग्रथांत जें एक प्रकरण लिहिलें आहे तेथें तो या विषयावरील माझ्या मतांचा सारांश देत असून तो सारांश देतांना लॅझेलेनें महत्त्वाच्या चुका केल्या आहेत. वास्तविक लॅझेलेनें स्वतःचे म्हणून मांडलेले विचारही माझ्या लेखनांतून शब्दशः घेतले आहेत. पण तशी कबूली दिली नाहीं. लॅझेलेच्या अर्थशास्त्रीय पुस्तकामध्यें बहुतेक सर्वसामान्य तात्त्विक सिद्धांत म्हणजे भांडवलाचें ऐतिहासिक स्वरूप, उत्पादनाची परिस्थिति, यांमधील परस्परसंबंध वगैरे विचार लॅझेलेनें माझ्या पुस्तकांतूनच घेतले आहेत. इतकेंच नव्हे तर मी निर्माण केलेली परिभाषाही त्यानें उचलली आहे. मतप्रचाराच्या हेतूनें कदाचित त्यानें असें केलें असेल. त्यानें हे सर्व सिद्धांत कसे मांडले व प्रत्यक्ष व्यवहारास ते कसे लावून दाखवले यासंबंधीं मला कांहींच बोलावयाचें नाहीं.

श्रमापासून उत्पन्न झालेला विक्रीमाल ही जी वस्तु अथवा त्या वस्तूचें जें मूल्य-स्वरूप तें आर्थिक व्यवहाररूपी शरीरांतील एक पेशी आहे. वरवर पाहणाऱ्याला या वस्तूंचा पृथक्करणपूर्वक अभ्यास हा निष्कारण बारीक तपशीलांच्या केलेल्या अभ्यासासारखा वाटतो. हा बारीक तपशिलांचा अभ्यास आहे हें निःसंशय खरें. पण म्हणून तो निरर्थक नव्हे. सूक्ष्मदर्शक यंत्रांतून शरीराचे बारीक बारीक विभाग जसें अभ्यासणें अवश्य असतें तशींच आर्थिक व्यवहारांतील हीं रूपें अभ्यासिणेंही अवश्य असतें.

या मूल्य स्वरूपाच्या अभ्यासाचा विषय खेरीज करून बाकीच्या या खंडांतील भागासंबंधानें तो अवघड असल्याचा आरोप कोणीही करूं शकणार नाहीं. अर्थात या ग्रंथाचा वाचक हा कांहीं तरी नवें शिकूं इच्छिणारा व म्हणून स्वतः कांहीं विचार करूं इच्छिणारा असेल असें मी धरून चालतों.

भौतिक शास्त्रांचे प्रयोग करणारे जे शास्त्रज्ञ असतात ते निरनिराळ्या भौतिक घटनांचा अभ्यास करतात तेव्हां त्या घटना अगदीं नमुनेदार अशा जेथें घडत असतील आणि आगंतुक परिस्थितींचा उपद्रव मुळींसुद्धां जेथें होत नसेल अशा ठिकाणींच त्याचा अभ्यास करतात. जेव्हां शक्य होईल तेव्हां अशा घटनांचे प्रयोग सर्वसामान्य परिस्थितींत त्या घटना घडताहेत असें दिसून येईल अशा प्रकारें ते करीत असतात. या ग्रंथांत मला भांडवलशाहीच्या उत्पादनपद्धतीची व त्या पद्धतीअनुसार घडणाऱ्या उत्पादन आणि विनिमय यांच्या परिस्थितीची तपासणी करावयाची आहे. आजवर त्यांच्या पूर्ण विकसित अवस्थेचें माहेरघर इंग्लंड हें आहे. आणि म्हणूनच मी माझ्या सिद्धांतांचा विकास करतांना इंग्लंड हेंच मुख्य उदाहरण म्हणून घेतलें आहे. पण जर एखादा जर्मन वाचक इंग्लंडच्या औद्योगिक व शेतीच्या

क्षेत्रांतील मजूरांच्या दुःस्थितीसंबंधानें नाक मुरडेल अथवा जर्मनीमध्यें इतकी वाईट परिस्थिति नाहीं असें समजून मोठ्या खुषीनें आपली पाठ थोपटून घेईल तर त्याला स्पष्टपणें सांगितलें पाहिजे कीं, 'बाबारे ही सर्व परिस्थिति तुलाहि इतकीच लागू आहे.' भांडवलशाही पद्धतीच्या अंगभूत गुणांचाच विचार केला असतां भांडवलशाही उत्पादनाच्या नैसर्गिक नियमामुळें जे सामाजिक अंतर्विरोध उत्पन्न होतात ते उच्च भूमिकेस पोंचले आहेत कीं अद्याप बरेच कमी आहेत हा प्रश्न महत्त्वाचा नसतो. प्रश्न असतो तो भांडवलशाही उत्पादनपद्धति ज्या नियमांनीं चालते त्या नियमांचा असतो. अपरिहार्य असे विशिष्ट परिणाम घडवून आणणाऱ्या ज्या प्रवृत्ति त्या उत्पादनामध्यें असतात त्या प्रवृत्ति समजून घेणें हा प्रश्न महत्त्वाचा असतो. ज्या देशाचा औद्योगिक विकास अधिक झालेला आहे तो देश कमी विकास झालेल्या देशाला आपल्या उद्याच्या परिस्थितीचें प्रतिबिंबच दाखवीत असतो.

पण हा विषय तूर्त बाजूस ठेवूं. जर्मनींत जेथें भांडवलशाही उत्पादनपद्धति दृढमूल झाली आहे ( उदा. कारखान्यांत वगैरे ) तेथें इंग्लंडांतल्यापेक्षाही परिस्थिति अधिक वाईट आहे. कारण मजूरांच्या दुःस्थितीला प्रतिबंध करणारे इंग्लंडांत असलेले कारखान्यांचे कायदे जर्मनींत मुळींच नाहींत. तसेंच या कारखान्याखेरीज बाकीच्या सर्व क्षेत्रांत पश्चिम युरोपांतील इतर राष्ट्रांप्रमाणें आम्हांलाही भांडवलशाही उत्पादनपद्धतीच्या सगळ्या हालआपेष्टा सोसाव्या लागतातच. इतकेंच नव्हे तर ही उत्पादनपद्धति पूर्ण विकसित नसल्यामुळेंही आम्हांला आपत्ति भोगाव्या लागतात. आधुनिक उत्पादनपद्धतीमुळें उत्पन्न झालेलीं संकटें आम्हाला भोगावीं लागतातच. पण शिवाय परंपरागत अशा अनेक दुःखांचा जुलूम आम्हांवर होत असतो. जुन्या उत्पा-

दनपद्धति दुर्बलपणें कशाबशा जीव धरून राहिलेल्या असतात. वर्तमान सामाजिक व राजकीय परिस्थितींत त्या ऐतिहासिक दृष्ट्या अडगळीसारख्या व उपद्रवकारक होतात. आम्हांला केवळ जिवंतापासूनच दुःखें भोगावीं लागतात इतकेंच नव्हे तर मेलेल्या मुडद्यांचाही त्रास आम्हांला सोसावा लागतो. " मेलेल्यांचें ओझें जिवंतांच्या डोक्यावर आहे. " असें एक प्राचीन आप्तवाक्य प्रसिद्धच आहे.

इंग्लंडमध्यें कारखानदारी पद्धतीची जी आकडेवार माहिती मिळविण्यांत आली आहे तिच्याशीं तुलना करतां जर्मनी व पश्चिम युरोपांतली इतर राष्ट्रें यांनीं मिळवलेली आकडेवार माहिती अगदींच तुटपुंजी आहे. तरीपण तीवरूनही इकडल्या दुःस्थितीची थोडीशी कल्पना येतेच. इंग्लंडांत तेथील सरकारनें व पार्लमेंटनें आर्थिक परिस्थितींची पाहणी करण्यासाठीं वेळोवेळीं जीं चौकशी मंडळें नेमलीं तशीं आमच्या येथें नेमण्यांत येतील तर त्या मंडळांनीं दिलेल्या माहितीवरून आम्ही चकित होऊन जाऊं. येथल्या चौकशी-मंडळांना जर इंग्लंडांतल्या चौकशी-मंडळाइतकेंच सर्वाधिकार देऊन सत्य परिस्थिति बिनहरकत तपासूं दिली, इंग्लंडांतल्या इतके निःपक्षपाती कारखाना-तपासनीस, आरोग्यनिरीक्षक, स्त्रिया व मजूरयांच्या पिळणुकीचे तपासनीस, घरें व अन्न यांचे तपासनीस वगैरे सर्व इंग्लंडांतल्या इतके निस्पृह व चाकबगार मिळतील तर त्यांनीं दिलेल्या माहितीनें आमच्या अंगावर शहारे येतील. ग्रीक पुराणांतील योद्धा पर्सिअस हा एक जादूची टोपी घालीत असे. तो ज्या राक्षसांना मारू पाही त्यांना तो या टोपीमुळें अदृश्य असे. आम्ही आमच्या डोळ्यावर आणि कानावर अशीच जादूची टोपी ओढून जगांत राक्षसच नाहींत असा समज करून घेतों. पण अशी आत्मवंचना करूं नये. १८व्या शतकांत अमेरिकन स्वातंत्र्ययुद्धानें युरोपियन मध्यमवर्गाला जागृतीची नौबत ऐकवली. त्याचप्रमाणें

१९व्या शतकांत अमेरिकेंतील यादवीनें युरोपियन कामगारांना जागृतीची नौबद् ऐकवली. इंग्लंडांत जी सामाजिक विघटना होत आहे ती स्पष्ट दिसते आहे. कांहीं एका मर्यादेपर्यंत ही विघटना वाढली म्हणजे युरोपवरही तिचे परिणाम होतीलच. तेथें हे जे परिणाम होतील ते कामगारांची जागृति कमी अथवा जास्त असेल त्याप्रमाणें इंग्लंडपेक्षां अधिक क्रूर अथवा अधिक सौम्य होतील. म्हणून येथील राज्यकर्त्या वर्गांनीं उच्च नैतिक हेतु बाजूस ठेवले तरी आपल्या वर्गाच्या स्वार्थबुद्धीनें तरी कामगारांच्या प्रगतीस येणारे अडथळे कायद्याच्या साहाय्यानें दूर करतां येतील तितके केले पाहिजेत. या व इतर कारणांसाठीं मी इंग्लंडांतल्या कारखाना-कायद्यांचा इतिहास, त्यांचा तपशील व त्यांचे परिणाम यासाठीं या खंडांत कितीतरी जागा खर्च केली आहे. एक राष्ट्र दुसऱ्यापासून अक्कल शिकूं शकते व त्यानें ती शिकावी. एखाद्या समाजाच्या हालचालीचे नैसर्गिक सिद्धांत कोणते ते शोधण्याचा अचूक भाग त्या समाजास सापडला, (त्या पुस्तकाचा अंतिम हेतुही आधुनिक समाजपद्धतीचा आर्थिक गतिसिद्धांत उजेडांत आणणें हाच आहे,) तरी तो समाज मोठ्या धिटाईनें लांब लांब उड्या मारून अथवा सरकारी कायदे करूनही आपल्या नैसर्गिक विकासक्रमाच्या एकामागून एक अशा येणाऱ्या अवस्थांत असणारीं विघ्नें दूर करूं शकेल असें नाहीं. परंतु मनुष्य आपल्या प्रयत्नांनीं प्रसूतिवेदनांचा वेळ कमी करूं शकेल व त्यांची तीव्रताही कमी करूं शकेल.

कदाचित होणारा गैरसमज टाळण्यासाठीं एक मुद्दा येथें सांगतों. मी या ग्रंथांत भांडवलदार व जमीनदार यांचें काढलेलें चित्र मोठें गोड गुलाबी नाहीं हें खरें. पण ज्या व्यक्तींचा उल्लेख केला आहे त्या व्यक्तींचा तो उल्लेख त्या त्या आर्थिक प्रकारांचे ते प्रतिनिधि आहेत अथवा विशिष्ट वर्गहितांचे ते प्रतिनिधी आहेत एवढ्यापुरताच

केलेला आहे. समाजाच्या आर्थिक संघटनेच्या विकासाकडे मी जेव्हां पाहतों आहें तेव्हां माझा दृष्टिकोन नैसर्गिक इतिहासाच्या पद्धतीचा आहे. या दृष्टिकोनाप्रमाणें पाहतां कोणीही व्यक्ति अमुक एका संबंधाबद्दल जबाबदार राहूं शकत नाहीं. एकादी व्यक्ति स्वतःपुरती कितीही मोठी असो, व आपल्या मोठेपणानें ती आपल्या भोंवतालच्या परिस्थितीवर प्रभुत्व मिरवो, पण माझ्या ऐतिहासिक दृष्टिकोनाप्रमाणें ही व्यक्ति त्या परिस्थितीचें अपत्यच असतें.

अर्थशास्त्राच्या क्षेत्रांत अगदीं शास्त्रीय पद्धतीनें संशोधन करीत असतां भौतिक शास्त्रांच्या संशोधनांत येणारे शत्रू तर येथें आड येतातच पण त्याहूनही अधिक शत्रु येथें येतात. ज्या साहित्याचें संशोधन सुरूं असतें त्याचें स्वरूप एका विशिष्ट प्रकारचें असतें. त्यामुळें या साहित्यसंशोधनाचें कामीं विरोध करण्यासाठीं लढणारे जे शत्रु ते अतिशय अत्याचारी नीच व दुष्ट मनोविकारांनीं भरलेले असतात. खाजगी स्वार्थबुद्धीनें उत्पन्न झालेल्या सर्व क्रूर भावना त्यांच्या ठिकाणीं असतात. उदा. इंग्लंडमधील सरकारी चर्च, त्याच्या ३९ नियमांपैकीं ३८ नियमांचें उल्लंघन कोणीं केलें तरी, त्याला क्षमा करील. पण आपल्या $\frac{1}{39}$ उत्पन्नावर जर घाला पडला तर कांहीं तो सहन करणार नाहीं. अलीकडे निरीश्वरवादही क्षम्य मानण्यांत येतो. पण तितकी आधुनिक मालकीसंबंधाविरुद्ध केली जाणारी टीका सहन केली जात नाहीं. तरीपण या बाबतींत पुष्कळच प्रगति झाली आहे. यांत मुळींच शंका नाहीं. उदा. "कॉरस्पॉडन्स् वुइथ हर मॅजेस्टीज् मिशन ॲब्रॉड रिगार्डिंग इंडस्ट्रिअल क्वेश्चन्स ॲंड ट्रेड युनिअन्स" या नांवाचें जें एक माहिती-पुस्तक कांहीं आठवड्यापूर्वी प्रसिद्ध झालें आहे त्याचा मी येथें उल्लेख करतों. ब्रिटिश सरकारचे प्रतिनिधि त्या रिपोर्टांत म्हणतात कीं जर्मनी, फ्रान्स आणि युरोप-

खंडांतील सर्व सुधारलेलीं राष्ट्रें यांमध्यें भांडवल आणि मजूर यांच्या-मधील संबंधांत जे मूलग्राही फरक झालेले आहेत ते इंग्लंडांतल्या इतकेच स्पष्ट दिसत असून अपरिहार्यही वाटतात. तसेंच अटलांटिक महासागराच्या पलीकडच्या किनाऱ्यावर म्हणजे अमेरिकेंत गुलाम-गिरीचा नाश झाल्यानंतर भांडवलशाही आणि जमीनमालकी यांमधील हल्लींच्या संबंधांत मूलग्राही फरक झाल्यावांचून रहात नाहीं, असें अमेरिकेचे उपाध्यक्ष मि. वेड यांनीं जाहीर सभांतून सांगितलें आहे. ह्या खुणा नवीन कालखंड सुरू झाल्याचें दर्शवीत आहेत. धर्मगुरूंच्या काळ्या जांभळ्या झग्यांनीं या खुणा झाकल्या जाऊं शकत नाहींत. उद्यां एखादा चमत्कार घडेल असें या खुणा सांगत नाहींत. प्रस्तुत समाजरचना ही कांहीं अखंड एकजिनसी अशी वस्तु नव्हे; तर ही एक सजीव वस्तु आहे. तिच्यांत बदल होऊं शकतो, आणि हा बदल एकसारखा होत आहे याची जाणीव राज्यकर्त्यांना होऊं लागली आहे असें या खुणावरून दिसतें. या ग्रंथाच्या दुसऱ्या खंडांत भांडवलाचा खरेदीविक्रीव्यवहार आणि या व्यवहाराच्या विकासावस्थेंत भांडवलानें धारण केलेलीं निरनिराळीं रूपें यांची चर्चा येईल. तिसऱ्या व शेवटच्या खंडांत या सिद्धांताचा इतिहास सांगण्यांत येईल.

शास्त्रीय टीका करतांना कोणतेंही मत या पुस्तकासंबंधानें एखाद्या टीकाकारानें व्यक्त केलें तर त्याचें मी स्वागतच करीन. पण ज्याला लोकमत असें नांव दिलें जातें, त्याचे जे पूर्वग्रहदोष त्यापुढें मी कधींच मान लववली नाहीं 'आपल्या मार्गानें तूं चाल म्हणजे झालें; लोक कांहींही बोलोत' असें एक प्राचीन आप्तवाक्य आहे. तेंच मी हृदयाशीं बाळगलेलें आहे.

लंडन : २५ जुलै १८६७ —कार्ल मार्क्स

# ( २ )

# मूळ कॅपिटलच्या पहिल्या खंडाच्या दुसऱ्या आवृत्तीस मार्क्सनें लिहिलेली प्रस्तावना

अद्यापपर्यंत अर्थशास्त्र हें जर्मनींत विदेशी शास्त्रच आहे. "हिस्टॉरिकल डिस्क्रिप्शन् ऑफ कॉमर्स अँड इंडस्ट्री" हें पुस्तक, विशेषतः १८३० सालीं प्रसिद्ध झालेले या पुस्तकाचे पहिले दोन खंड, यांत गस्टाव्ह् फॉन् गुलिच या लेखकानें जर्मनींत भांडवलशाही उत्पादन-पद्धति व अर्थात आधुनिक भांडवलशाही समाजरचना यांच्या विकासाला कोणत्या ऐतिहासिक परिस्थितीमुळें प्रतिबंध झाला याची तपशीलवार चर्चा केली आहे. भांडलवशाही पद्धति हीच अर्थशास्त्राचें रोप वाढण्यास अनुकूल भूमिका असते. ती भूमिका नसल्यामुळें जर्मनींत अर्थशास्त्राची वाढ झाली नाहीं. म्हणून तयार मालाप्रमाणें या शास्त्राची इंग्लंड व फ्रान्स येथून आयात करावी लागली. जर्मन प्रोफेसरांनीं शाळकरी पोराप्रमाणें या अर्थशास्त्राचें पठण केलें. वास्तविक ज्या परदेशांतून हें अर्थशास्त्र जर्मनींत आयात झालें त्या परदेशांत तें अर्थशास्त्र म्हणजे एका जिवंत परिस्थितीचें सिद्धांत-स्वरूप होतें. पण जर्मनींतल्या प्रोफेसरांनीं त्यांच्याभोंवतीं असलेल्या छोट्या व्यापाऱ्यांच्या जगाला तें अर्थशास्त्र लावून त्याचें वेदवाक्य बनविलें. अर्थात त्यांनीं केलेला या अर्थशास्त्राचा अर्थ सगळा चुकला. शास्त्रीय दृष्टि ही कांहींशी आगतिकतेची असते. ती सर्वस्वी दडपून टाकणेंही बरें नसतें. अशी कांहींशी शास्त्रीयदृष्टिजन्य अगतिकता या प्रोफेसरांच्या मनांत वावरत होतीच. त्याबरोबरच आपल्याला अगदीं परकी अशा एका विषयाशीं

आपण वावरतों आहों या जाणीवेमुळें त्यांना थोडीशी अस्वस्थताही वाटत होती. पण त्यांच्या मनांतली ही अगतिकता आणि अस्वस्थता त्यांच्या वाङ्मयीन व ऐतिहासिक विद्वत्तेनें झाकून जाऊं शकली नाहीं. इतर आंखीव शास्त्रांतून मिळवलेलें जें अवांतर साहित्य ती सर्व वरवर अभ्यासाची भेळ होती. जर्मन नोकरशाहीच्या चौकटींत नोकरी मिळविण्यासाठीं जे गचाळ उमेदवार पुढं येतात त्या सगळ्यांना ही पोट ढवळणारी भेळ खावी लागते. तिच्या साहाय्यानेंही प्रोफेसरांना आपली अगतिकता आणि अस्वस्थता लपवितां आली नाहीं.

१८४८ पासून जर्मनींत भांडवलशाही उत्पादनपद्धतीचा विकास फार झपाट्यानें झाला आहे. त्याबरोबरच सट्टेबाजी आणि ठकबाजी यांनाही तेथें हल्लीं अगदीं बहर आला आहे. पण तेथल्या अर्थशास्त्रीय प्रोफेसरांना दैव अजून कांहीं अनुकूल नाहीं. ज्यावेळेला अर्थशास्त्रा-संबंधानें ते अगदीं सरळ अर्थशास्त्राच्या मूळ स्वरूपांत चर्चा करूं शकत होते त्यावेळीं त्या अर्थशास्त्राला अवश्य असणारी अशी आधुनिक आर्थिक परिस्थिति जर्मनींत विद्यमान नव्हती. उलट जर्मनीत ही परिस्थिति उत्पन्न होऊं लागली तोंच तिच्याभोंवतीं असें वातावरण उत्पन्न झालें कीं भांडवलशाहीच्या क्षितिजाच्या मर्यादेंत या अर्थ-शास्त्राअन्वयें खरीखुरी व निःपक्षपाती तपासणी करणें अशक्य होऊन बसलें. अर्थशास्त्र हें जोंपर्यंत भांडवलवाल्यांच्या क्षितिजाच्या कक्षेंत राहतें म्हणजेच भांडवलशाही समाजपद्धति ही इतिहासक्रमांतील एकदां जन्माला येऊन कालांतरानें मरून जाणारी एक अवस्था नव्हेतर सामा-जिक उत्पादनपद्धतीचें तें एक अखेरचें व चिरंजीव पर्यवसान आहे असें जोंपर्यंत मानलें जातें, वर्गकलह जोंपर्यंत गुप्त असतो व कोठें व्यक्त झालाच तर तुरळकपणें व्यक्त होतो अशाच परिस्थितींत अर्थ-शास्त्र हें शास्त्र या स्वरूपांत राहूं शकतें.

आपण इंग्लंडच उदाहरणादाखल घेऊं. तेथील अर्थशास्त्र हें वर्गकलह अजून वाढलेला नव्हता अशा कालखंडांत जन्म पावलें आहे. रिकार्डो हा या अर्थशास्त्राचा अखेरचा मोठा प्रतिनिधि होय. त्यानें आपल्या संशोधनाचा आरंभ हेतुपूर्वक वर्गविरोधापासून केला आहे. मजूरी आणि नफा, नफा आणि खंड, यांमध्यें विरोध आहे असें तो मानतो. पण हा विरोध नैसर्गिक असा सामाजिक सिद्धांत आहे असा भोळा भाव रिकार्डोनें धारण केला होता. पण रिकार्डोच्या काळापर्यंत भांडवलशाही अर्थशास्त्र आपल्या विकासाच्या परिसीमेला पोंचलें होतें. ही सीमा तोडून आतां त्याला पलीकडे जाणें शक्य नव्हतें. रिकार्डोच्या हयातींतच सिस्मॉडीनें रिकार्डोच्या विरुद्ध भूमिका घेऊन भांडवलशाहीवर हल्ला चढविला होता.

रिकार्डोनंतरचा १८२० पासून १८३० पर्यंतचा काळ हा अर्थशास्त्राच्या क्षेत्रांत मोठ्या शास्त्रीय घडामोडीचा होता.* या काळामध्यें रिकार्डोच्या सिद्धातांचें रिकार्डोच्या पूर्वींच्या आर्थिक सिद्धांताशीं जसें भांडण चाले तसेंच रिकार्डोच्या सिद्धातांचा अधःपातही याच काळांत होऊं लागला. निरनिराळ्या अर्थशास्त्रज्ञांमध्यें या काळीं मोठे प्रेक्षणीय सामने झाले. इंग्लंडांत चालू असलेला हा वादविवाद निरनिराळ्या नियतकालिकांतुन, पत्रकांतून अथवा इतर प्रासंगिक वाङ्मयांतून विस्कळितपणें आलेला असल्यामुळें युरोपखंडांत त्याची फारशी माहिती नाहीं. रिकार्डोचे जे सिद्धांत आहेत त्यांतील कांहीं अपवादात्मक अशा मुद्यांच्या आधारावर खुद्द भांडवलशाही अर्थशास्त्रावरही हल्ला चढवितां येतो. पण एकंदरींनें या काळांत जो वादविवाद चाले तो पूर्वग्रह दूषित न होतां मोठा प्रांजलपणें चालत असे. अशा प्रांजळ चर्चेस तो काळ

* रिकार्डो १८२३ त मेला.

अनुकूल होता. आधुनिक औद्योगिक उत्पादन बाल्यावस्थेंतून नुकतेंच वर येत होतें. १८२५ सालीं जें आर्थिक संकट आलें तें आधुनिक जीवनांतल्या नियतकालिक आर्थिक आवर्तांचें ( इकॉनॉमिक सायकल् ) पहिलें संकट ( क्रायसिस् ) होतें. उलट भांडवल आणि श्रम यांमधील वर्गकलह त्यावेळीं लोकांच्या दृष्टीआड पडलेला असे. त्याचें राजकीय कारण असें होतें कीं, राज्यकर्ते आणि सरंजामदार हे एका बाजूस आणि सामान्य जनता आणि भांडवलदार हे दुसऱ्या बाजूस, असा झगडा त्यावेळीं सुरू असे. आणि आर्थिक कारण होतें तें असें कीं औद्योगिक भांडवलदार आणि जमीनमालक असलेला सरंजामदार यांमध्यें कलह असे. इंग्लंडांत भांडवलदार आणि जमीनदार यांचे दरम्यानचा हा कलह धान्याच्या आयातीवरील कर रद्द करून घेण्याचे चळवळीचे वेळीं मोठ्या निकरानें व्यक्त झाला होता. फ्रान्समध्यें लहान जमीन-मालक आणि मोठे जमीनदार यांच्यामध्यें तेढ असल्यानें हा कलह तितकासा व्यक्त झाला नाहीं.

इंग्लंड व फ्रान्समध्यें भांडवलदारांनीं राज्यसत्ता काबीज केली होती. त्यानंतर वर्गकलह हा सिद्धांतदृष्ट्या व व्यवहारदृष्ट्याही अधिकाधिक स्पष्टपणें बोलण्यांत येऊं लागला. व त्याला चांगलें धमकीचें स्वरूप आलें. भांडवलदारांच्या शास्त्रीय अर्थशास्त्राच्या मृत्यूची घंटा या वर्गकलहानें वाजविली. आतां अमुक हा सिद्धांत खरा कीं, अमुक तो सिद्धांत खरा हा प्रश्न आतां राहिला नसून भांडवलाच्या दृष्टीनें अमुक हा सिद्धांत उपयुक्त आहे कीं अपायकारक आहे, अमका तो सिद्धांत मांडणें हे व्यवहाराच्या दृष्टीनें सुकर आहे कीं, दुष्कर आहे. राजकीय दृष्ट्या अमका हा सिद्धांत धोक्याचा आहे कीं नाहीं, असले प्रश्न आतां अर्थशास्त्रज्ञांच्यापुढें उभे होते. पूर्ण अनासक्त बुद्धीनें संशोधन करण्याची गरज आतां उरली नसून हे अर्थशास्त्रज्ञ आतां

भाडोत्री लढवय्ये बनले होते. खऱ्याखुऱ्या शास्त्रीय संशोधनाची जागा, जें विद्यमान आहे त्याचें हट्टानें समर्थन करूं पाहणाऱ्या माणसाच्या भ्रष्ट विवेकबुद्धीनें आणि दुष्ट हेतूनें घेतली आहे. आयात धान्यावरील कर रद्द करून घेण्यासाठीं स्थापन झालेल्या कॉब्डेन आणि ब्राइट् या कारखानदारांच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या अँटी-कॉर्न-लॉ लीग या संस्थेनें प्रसिद्ध केलेल्या मोठ्या त्वेषपूर्ण अशा पत्रकांनीं जगाची थोडीशी फसवणूक केली. तरीपण या पत्रकांना अगदीं शास्त्रीय नसलें तरी कांहींसें ऐतिहासिक महत्त्व आहे. कारण जमीनमालक असलेल्या सरंजामदाराविरुद्ध मोठा शास्त्रशुद्ध हल्ला या पत्रकांतून करण्यांत आला होता. पण सर रॉबर्ट पील याच्या कारकीर्दींत आयात धान्यावरील कर रद्द होऊन खुल्या व्यापारासंबंधीं कायदे झाले तेव्हांपासून या भांडवलवाल्यांच्या भ्रष्ट अर्थशास्त्राच्या शास्त्रीयतेची शेवटची नांगी नष्ट केली आहे.

१८४८–४९ मध्यें झालेल्या युरोपीय क्रांत्यांचा इंग्लंडवरही परिणाम झाला. जे विद्वान लोक अजूनही आपली शास्त्रीय भूमिका कायम आहे असें सांगत होते आणि पोकळ पांडित्य व राज्यकर्त्यावर्गाची खुशामत याहून अधिक उच्च आकांक्षा बाळगून होते त्यांनीं भांडवलशाही अर्थशास्त्र हें मजूरांच्या हक्काशीं जमतें घेतां येईल अशा प्रकारें मांडलें. कारण आतां मजूरांच्या हक्कांची उपेक्षा करणें अशक्य झालें होतें. म्हणून दोन परस्परविरुद्ध अशा भूमिकांचा उथळ समन्वय करण्याचा एक संप्रदाय सुरू झाला. जॉन स्टुअर्ट मिल्ल हा या संप्रदायाचा फार मोठा प्रतिनिधि होय. मिल्लची ही विचारसरणी म्हणजे भांडवलशाही अर्थशास्त्राचें दिवाळें निघाल्याचें लक्षण होय. एन्. श्चेर्निश्चेवेस्की या रशियन पंडितानें व टीकाकारानें ‘ मिल्लच्या

अर्थशास्त्रासंबंधीच्या कल्पनांची रूपरेखा ' या आपल्या ग्रंथांत मिल्लच्या या विचारसरणीवर फार चांगला प्रकाश पाडला आहे.

म्हणून जर्मनीमध्यें भांडवलशाही उत्पादनपद्धति जी वाढीस लागली त्यावेळीं इंग्लंड आणि फ्रान्स या देशांत वर्गकलह अतिशय तीव्रपणें माजून भांडवलशाहीच्या अंगचा अंतर्विरोधाचा गुण स्पष्टपणें दिसूं लागला होता. शिवाय दरम्यान जर्मन कामगारांनाही जर्मन भांडवलदारापेक्षां अधिक वर्गजागृति आली होती. म्हणून ज्यावेळीं भांडवलशाही अर्थशास्त्र शास्त्र म्हणून अमलांत आणणें कसेबसे एकदाचें शक्य होत आहे असें वाटूं लागलें त्याचवेळीं तें तावडतोब प्रत्यक्ष वस्तुस्थितींत अशक्य होऊन बसलें होतें.

अशा परिस्थितींत जर्मन प्रोफेसरांचे दोन गट झाले. एक गट शहाणा व्यवहारशील असा होता तो बॅस्टिअट या अगदीं उथळ व म्हणून भ्रष्ट अर्थशास्त्राचे हट्टानें समर्थन करूं पाहणाऱ्या पंडितांच्या निशाणाखालीं जमा झाला. दुसरा गट हा आपल्या शास्त्राच्या दर्जाचा श्रेष्ठपणा मोठ्या अभिमानानें संभाळूं पहात होता. व म्हणून तो परस्परविरुद्ध अशा हितसंबंधांचा समन्वय करूं पाहणाऱ्या जॉन स्टुअर्ट मिल्च्या मागें गेला. भांडवलशाही अर्थशास्त्राच्या उमेदीच्या काळांत व अधःपाताच्या काळांतही जर्मन प्रोफेसरांची अवस्था शाळकरी पोरांसारखीच राहिली. ते ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांची नक्कल करीत होते, त्यांच्या मागून जात होते. विदेशी घाऊक पंडितांचा विद्येचा माल हे किरकोळीनें विकीत, दारोदार विकीत हिंडत असत.

जर्मन समाजविकासाच्या या विशिष्ट ऐतिहासिक परिस्थितीमुळें भांडवलशाही अर्थशास्त्रासंबंधानें कोणतेंही स्वतंत्र संशोधन तेथें होऊं शकत नाहीं. पण त्या अर्थशास्त्रावर जर्मनींत टीकाही होऊं शकत नाहीं असें मात्र नव्हे. ही टीका विशिष्ट वर्गाच्या दृष्टिकोनानें जर

होईल तर ती, ज्या वर्गाचा इतिहासप्रसिद्ध धंदा आतां भांडवलशाही उत्पादनपद्धति नष्ट करून सर्वच वर्गभिन्नता कायमची नष्ट करण्याचा आहे, त्या कामगारवर्गाच्या दृष्टीनेंच होऊं शकेल.

जर्मन भांडवलवाल्यांच्या विद्वान व अविद्वान पुरस्कर्त्यांनीं माझ्या पूर्वींच्या लिखाणाप्रमाणें माझ्या 'कॅपिटल' ग्रंथासही अनुल्लेखानें ठार करण्याचा प्रथम प्रयत्न केला. पण सद्यस्थितींत या कारवाया निरुपयोगी आहेत असें दिसून येतांच माझ्या पुस्तकावर टीका करण्याच्या मिषानें भांडवलवाल्यांच्या मनास शांतवन देण्याचे उपाय त्यांनीं सुचविले. परंतु जोसेफ् डिट्जेन् यानें 'व्हॉल्कसाट' या नियतकालिकामध्यें लिहिलेल्या लेखांसारखे लेख कामगारपक्षीय वृत्तपत्रांतून जे आले त्या लेखांत आपल्याहून अधिक जबरदस्त असे प्रतिस्पर्धी आपणाशीं झुंजण्यास उभे राहिले आहेत अशी या भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्यांची खात्री झाली. त्यांनीं अद्याप या कामगारपक्षीय लेखकांच्या लेखांना मुळींच उत्तरें दिलीं नाहींत.*

---

* जर्मनींतील भ्रष्ट अर्थशास्त्राच्या लबाड पुरस्कर्त्यांनीं कॅपिटलमधील माझ्या लेखनशैलीवर आक्षेप घेतले आहेत. कॅपिटलमधील माझ्या लेखनांत वाङ्मयीन दोष आहेत याची जाणीव इतर कोणापेक्षाही मलाच अधिक आहे. परंतु या टीकाकारांच्या आणि सामान्य जनतेच्या माहितीसाठीं व करमणुकीसाठीं माझ्या लेखनशैलीसंबधानें एक इंग्लिश व एक रशियन अशा दोन टीकाकारांचीं मतें मी येथें देतों. सॅटर्डे रिव्हयू हें इंग्लंडांतील पत्र माझ्या विचारांना नेहमींच प्रतिकूल असतें. त्यांनीं प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या आवृत्तीसंबधानें "अगदीं रुक्ष अशा आर्थिक प्रश्नांची चर्चा काहीं विशेष सौंदर्यानें करणारी अशी ही लेखनशैली आहे" असे उद्गार काढले आहेत 'सेंटपीटर्सबर्ग जर्नल' या पत्राच्या २० एप्रिल १८७२ च्या अंकांत कॅपिटलवर टीका आली आहे. तींत माझ्या लेखनशैलीसंबधानें टीकाकार लिहितो, "प्रस्तुत ग्रंथांतील अपवादात्मक असे एकदोन भाग

कॅपिट्लचें एक उत्तम रशियन भाषांतर १८७२ च्या वसंतऋतूंत प्रसिद्ध झालें. तीन हजार प्रतींची ती आवृत्ति आतां जवळ जवळ संपली आहे. त्यापूर्वी १८७१ मध्येंच कीव्ह विद्यापीठांतील अर्थ-शास्त्राचे प्रोफेसर ए. सायबर यानें लिहलेल्या "डेव्हिड रिकार्डोचा मूल्यसिद्धांत आणि भांडवलसिद्धांत या ग्रंथांत माझ्या मूल्य, पैसा आणि भांडवल या संबंधींच्या सिद्धांतांचा उल्लेख केला असून स्मिथ व रिकार्डो यांच्या शिकवणुकींतून तत्त्वतः माझे सिद्धांत निघालेले आहेत असें मत तेथें व्यक्त केलें आहे. प्रो. सायबरच्या या उत्कृष्ट ग्रंथासंबंधानें पश्चिम युरोपांतील वाचकांना चकित करणारा मुद्दा म्हणजे लेखकाची शुद्ध तात्त्विक भूमिकेसंबंधानें असलेली सुसंगत व घट्ट अशी पकड ही होय.

कॅपिट्ल ग्रंथांत वापरण्यांत आलेली विचारपद्धति फारशी कोणास समजलेली नाहीं. त्या पद्धतीसंबंधानें परस्परविरुद्ध अशा ज्या अनेक कल्पना करण्यांत आलेल्या आहेत त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होत आहे.

उदा. पॅरिसच्या "रेव्ह्यू पॉझिटिव्हिस्ट" या पत्रानें मी अर्थ-शास्त्र हें अध्यात्मशास्त्रासारखें लिहितों अशी टीका एका बाजूनें केली आहे. आणि उलट वास्तव परिस्थितीचें नुसतें पृथक्करण करण्यापलीकडे भावी लेखकासाठीं नवीन औषधांचें ठोकताळे ( कॉम्ट्च्या पद्धतीचे )

---

वगळल्यास सामान्य वाचकाला विषयाची मांडणी साकल्यानें कळतें. ती अतिशय स्पष्ट आहे असें वाटतें. आणि विषय शास्त्रीय गुंतागुंतीचा असतांही अशा विषयांत क्वचित्च आढळणारा जिवंतपणाचा जोम आढळून येतो. बहुतेक जर्मन पंडित इतके रुक्ष व अस्पष्ट लिहितात कीं सामान्य मर्त्य वाचकांची टाळकी त्यांच्या लिखाणाच्या वाचनानें अगदीं तडकून जातात. पण कॅपिटल्च्या लेखकाचें लेखन मात्र या जिवंतपणाचे बाबतींत बहुतेक जर्मन पंडिताहून अगदीं वेगळें असें आहे."

करून ठेवले नाहींत अशी ही तक्रार केली आहे. पैकी आध्यात्मिकतेच्या टीकेला प्रो. सायबर यांनीं परभारेंच उत्तर दिलें आहे. " मार्क्सनें प्रत्यक्ष सिद्धांतांच्या चर्चेसाठीं जी विचारपद्धति वापरली आहे ती सर्व ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांनीं वापरलेली अनुमानपद्धति ( डिडक्टिव्ह ) वापरली आहे. ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांच्या या पद्धतींतील गुण व दोष सर्व उत्तम अर्थशास्त्रज्ञांच्या लिखाणांत सारखेच आढळून येतात." एम्. ब्लॉक यानें १८७२ सालीं लिहिलेल्या एका लेखांत माझी लेखन-पद्धति ही पृथक्करणात्मक आहे असें मत व्यक्त केलें असून " कॅपिट्ल ग्रंथामुळें मार्क्स हा लोकोत्तर अशा पृथक्करणात्मक लेखकांत गणला जाईल " असें मत व्यक्त केलें आहे. जर्मन टीकाकारांनीं माझ्या लेखनाबद्दल ' हें हेगेलच्या पद्धतीचें पोकळ पांडित्य आहे,' असें मत व्यक्त करून नाक मुरडलें आहे. ' दि युरोपियन मेसेंजर ' या सेंट पीटर्सबर्गमधील पत्राच्या मे १८७२च्या अंकांत ४२७ ते ४३६ या पानांत माझ्या कॅपिट्ल ग्रंथाच्या नुसत्या लेखन पद्धतीसंबंधानें एक लेख आला आहे. त्यांत माझी संशोधन पद्धति अगदीं निष्ठुरपणें वास्तववादी आहे पण दुर्दैवानें विषयाची मांडणी मात्र जर्मन विरोध-विकासात्मक आहे असें म्हटलें आहे. हा टीकाकार लिहितोः " सकृद्दर्शनीं वाचकांचें जें मत बनतें तें विषयाच्या मांडणीच्या बाह्य स्वरूपावरून बनतें. मार्क्स हा जर्मन भाववादीतत्त्वज्ञांचा मेरुमणी आहे ( अर्थात् वाईट अर्थानें ) असेंच वाटल्यावांचून रहात नाहीं. पण वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं आर्थिक क्षेत्रांतील संशोधनाच्या बाबतींत मार्क्स हा त्याच्या पूर्वीच्या सर्व लेखकांहून अधिक वास्तववादी आहे. कोणत्याही अर्थानें तो भाववादी आहे असें म्हणतां येणारच नाहीं." माझ्यावर याच लेखकानें जी टीका केली आहे तिला अत्युत्तम उत्तर द्यावयाचें तर त्याच्याच टीकेंतील कांहीं उतारे देणें हा उत्तम

मार्ग होय. माझ्या कांहीं रशियन भाषा न जाणणाऱ्या वाचकांना हे उतारे वाचनीय वाटतील.

माझ्या 'क्रिटिक ऑफ पोलिटिकल इकॉनमी' (बर्लिन १८५९) या ग्रंथाच्या प्रस्तावनेंतील पृष्ठ ११-१३ वरील एक उतारा या लेखकानें दिला आहे. या उताऱ्यांत मी माझ्या विचारपद्धतीची भौतिक भूमिका स्पष्ट केली आहे. हा उतारा देऊन लेखक लिहितो, " मार्क्सला आपल्या लेखनांत जी एक गोष्ट महत्त्वाची वाटते ती म्हणजे ज्या गोचर परिस्थितीचें संशोधन तो करीत आहे त्या परिस्थितीचा गुणधर्म शोधून काढणें ही होय. या परिस्थितीचें नियंत्रण करणारा असा तिचा गुणधर्म शोधून काढणें, अमुक एका ऐतिहासिक कालांत या गोचर परिस्थितीचें जें विशिष्ट स्वरूप आहे तें सांगणें, तिच्या अंगांतील धागेदोरे दाखवणें एवढीच गोष्ट मार्क्सला महत्त्वाची वाटतें असें नव्हे तर त्याहून अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे या गोचर परिस्थितीबाबत होणाऱ्या पालटाचा सिद्धांत, त्या परिस्थितीच्या विकासाचा सिद्धांत, ही परिस्थिति पूर्वीच्या एका परिस्थितीतून संक्रमण होऊन कशी निघाली आणि हिच्यांतून पुन्हां संक्रमण होऊन नवी परिस्थिति कशी निर्माण होणार आहे, जुनी संबंधमालिका नाहींशी होऊन नवीन संबंधमालिका कशी निर्माण होणार आहे, हें शोधून काढणें हें मार्क्सला महत्त्वाचें वाटतें. एकदां हा सिद्धांत त्यानें शोधल्या-नंतर समाजजीवनाच्या निरनिराळ्या अवस्थांत त्याचे परिणाम कसकसे दिसून येतात, याचें संशोधन मार्क्सनें केलें आहे. याचा परिणाम असा झाला आहे कीं कठोर शास्त्रीय दृष्टीनें परीक्षण करून सामाजिक परिस्थितीच्या अनुक्रमानें अमुक अमुक अवस्था आल्याच पाहिजेत असें दाखवणें व आपले सिद्धांत मांडण्यासाठीं आधारभूत अशा ज्या वास्तव घटना त्यांची सत्यता शक्य तितक्या निःपक्षपातीपणानें सिद्ध

करणें एवढ्या एकाच गोष्टीची काळजी मार्क्सनें घेतलेली आहे. विद्यमान परिस्थिति उत्पन्न झाली ती अपरिहार्यतेनें झाली व विद्यमान परिस्थिति नष्ट होऊन तिच्यांतून दुसरी परिस्थिति अशीच अपरिहार्यतेनें उत्पन्न होणार आहे, आणि हें सर्व घडत असतांना या परिस्थितीच्या गुंतापयांत सापडलेल्या माणसांची या अपरिहार्यतेवर श्रद्धा असो अथवा नसो, त्या अपरिहार्यतेची त्या माणसांना जाणीव असो अथवा नसो ती अपरिहार्यता ही अढळ आहे एवढें जर मार्क्सनें सिद्ध केलें तर मार्क्सचा हेतु सिद्ध झाला असें म्हणावें लागेल. मार्क्स हा सामाजिक गति ही इतिहासाची नैसर्गिक पद्धति असें मानतो. तिचे गुणधर्म हे माणसाची इच्छा, जाणीव, बुद्धिमत्ता यापासून स्वतंत्र असतात इतकेंच नव्हे तर उलट माणसाची इच्छाशक्ति, जाणीव व बुद्धिमत्ता यांचें नियंत्रणही या गुणधर्मांनीं होत असते असें मार्क्स मानतो......... मानवी संस्कृतीच्या इतिहासांत माणसाच्या जाणीवयुक्त बुद्धीला जर इतकें खालच्या दर्जाचें स्थान मिळणार असेल तर असें मत असणाऱ्या माणसानें संस्कृतीसंबंधानें केलेल्या कोणत्याही संशोधनांत कोणत्याही मानवी जाणीवेच्या स्वरूपास व त्याच्या परिणामास इतर सर्व मुद्यांच्यापेक्षां कमी महत्त्व दिलें जाईल ही गोष्ट अगदींच उघड आहे. याचा अर्थ असा कीं कोणत्याही भौतिक परिस्थितीच्या बुडाशीं असलेलें तत्त्वज्ञान हा संशोधनाचा आरंभबिंदू न करतां सदर भौतिक परिस्थिति हा आरंभबिंदू करणें हें या विचारपद्धतीचें वैशिष्ट्य होय. अशा संशोधनपद्धतींत एका भौतिक परिस्थितीची तुलना अथवा विरोध एखाद्या तत्त्वज्ञानाशीं दाखवावयाचा नसून एका भौतिक परिस्थितीशीं दुसरी भौतिक परिस्थिति भिडवावयाची असते. या संशोधनांत महत्त्वाची गोष्ट असते ती ही कीं दोन्ही परिस्थितींचें संशोधन अगदीं बिनचूक

करावयाचें असतें; या दोन परिस्थिति एकाच विकासक्रमांत परस्पर-संबद्ध अशा पण अनुक्रमानें आलेल्या असतात असें दाखवावयाचें असतें. पण सर्वांत अधिक महत्त्वाची गोष्ट ही कीं अनुक्रमानें येणाऱ्या परिस्थितिमालिकांचें निष्ठुर पृथक्करण करणें, या विकासक्रमांत एका अवस्थेंतून दुसरी अवस्था गुणपरिणामपद्धतीनें कशी निर्माण होते हें दाखविणें अवश्य असतें.

कोणी असें म्हणतील कीं ' मानवी आर्थिक जीवनाचे सर्वसामान्य सिद्धांत वर्तमानकाळाला लावले काय अथवा भूतकाळाला लावले काय ते सारखेच असणार. पण मार्क्सनें ही गोष्ट साफ नाकारली आहे. त्याच्या मतें असे त्रिकालाबाधित सिद्धांत मुळींच अस्तित्वांत नाहींत. उलट प्रत्येक ऐतिहासिक कालखंडाचे सिद्धांत त्याचे त्याचे वेगवेगळे असतात असें तो मानतो....समाजव्यवस्थेचें कोणतेंही एक स्वरूप आपला काळ संपल्या-नंतर जेव्हां जिवंत राहिलेलें दिसतें,व त्या अवस्थेंतून दुसऱ्या अवस्थेंत संक्रमण करीत जातें तेव्हां तिला नव्या सिद्धांताअनुसार मार्गक्रमण करावें लागतें. थोडक्यांत म्हणजे प्राणिशास्त्राच्या इतर शाखांच्या विकासक्रमाच्या इतिहासांत दिसून येणाऱ्या ज्या परिस्थिति, तशा सारखी परिस्थिति माणसाच्या आर्थिक जीवनांतही दिसून येते.

जुन्या अर्थशास्त्रज्ञांना अर्थशास्त्राचे हे नैसर्गिक सिद्धांत पदार्थविज्ञान-शास्त्र व रसायनशास्त्र यांच्यांतील सिद्धांतासारखे वाटले तो त्यांचा गैरसमज होता. मानवी जीवनाचें अधिक सूक्ष्म परीक्षण केल्यास असें दिसून येतें कीं समाजसंघटना या वनस्पति आणि प्राणी यांच्या जीवनाहून मूलतः भिन्नपणें विकसत असतात. इतकेंच नव्हेतर एकच मानवी जीवन निरनिराळ्या संघटनामध्यें असतां निरनिराळ्या गुणधर्मा-अनुसार विकसत जात असते. त्या त्या संघटनांचे निरनिराळे जे अवयव त्यांच्या कार्यकक्षेच्या परिस्थितींत होणाऱ्या बदलामुळें त्यांच्यांतही फरक

होत जातात आणि त्यामुळें एकंदर संघटनाही बदलत असते. उदा. लोकसंख्येचा सिद्धांत सर्व काळीं व सर्व स्थळीं एकच असतो ही गोष्ट मार्क्सनें अमान्य केली आहे. समाजविकासाच्या प्रत्येक अवस्थेंतले लोकसंख्येचे सिद्धांत हे वेगवेगळे असतात असें मार्क्सनें म्हटलें आहे. उत्पादनसामर्थ्यांच्या विकासक्रमाच्या निरनिराळ्या अवस्थाअनुसार सामाजिक परिस्थिति आणि त्या सामाजिक परिस्थितीचें नियंत्रण करणारे सिद्धांत हेही बदलत जात असतात. मार्क्सनें हा ग्रंथ लिहितांना आपल्यापुढें ठेवलेलें उद्दिष्ट म्हणजे वरील दृष्टिकोनाप्रमाणें भांडवलाच्या वर्चस्वाखालीं स्थापन झालेल्या समाजव्यवस्थेचें निरीक्षण व तिचा खुलासा करणें हें होय. पण त्याबरोबरच कोणत्याही आर्थिक जीवनाच्या सूक्ष्म परीक्षणाचें ध्येय काय असावें हेंहि तो अतिशय शास्त्रशुद्ध पद्धतीनें दाखवीत आहे. अमुक एका सामाजिक जीवनाचा उगम, त्याचें अस्तित्व त्याचा विकास, व त्याचा नाश यांचें नियमन कोणत्या सिद्धांतानें होतें, त्या सामाजिक जीवनाची जागा दुसऱ्या व अधिक उच्च अशा सामाजिक जीवनानें कोणत्या सिद्धांतानुसार घेतली जाते ते सिद्धांत शोधून काढणें यांतच अशा संशोधनाचें शास्त्रीय मूल्य आहे. आणि मार्क्सच्या ग्रंथाचें खरोखर जें मूल्य आहे तें त्याच्या या संशोधन गुणांत आहे."

हा लेखक माझ्या पद्धतीचें मोठें उठावदार चित्र काढीत आहे. आणि (मी या पद्धतीचा अवलंब ज्या प्रमाणांत केला असेल त्या दृष्टीनें पाहतां) लेखकानें हें चित्र कांहींशा उदार दृष्टीनें काढलें आहे. पण मीच उलट त्याला विचारतों कीं तू सुद्धां विरोधविकासात्मक पद्धतीचेंच हें चित्र काढीत नाहींस काय?

अर्थात संशोधनाच्या पद्धतीहून विषयाच्या मांडणीची पद्धति वेगळी असणें हें अपरिहार्यच आहे. संशोधनाच्या पद्धतींत उपलब्ध

असलेलें सर्व साहित्य हाताशीं घेणें, त्याच्या विकासाच्या सर्व अवस्थांचें पृथक्करण करणें व त्याचे परस्परसंबंध शोधून काढणें या गोष्टी अवश्य असतात. हें संशोधनाचें काम पूर्ण झाल्यानंतर मगच एकंदर गतीचें यथायोग्य वर्णन करणें शक्य होतें. हें कार्य यशस्वितेनें जर करतां आलें, जर स्वच्छ आरशांतील उत्कृष्ट प्रतिबिंबाप्रमाणेंच "वस्तुस्थितीचें स्वरूप दाखवतां आलें तर परीक्षणार्थ आपण समोर घेतलेली संघटना आपल्यापुढें आगाऊच तयार परिस्थितींत उभी आहे असें वाटूं लागतें.

माझी विरोधविकास पद्धति हेगेलच्या पद्धतीच्या अगदींच विरुद्ध आहे. हेगेलच्या दृष्टीनें मानवी मेंदूचा जीवनक्रम म्हणजे माणसाची विचारपद्धति हीच स्वतः खऱ्या जगाची निर्मात्री आहे. ही जी विचार पद्धति तिलाच हेगेल 'भाव' (आयडिया) हें नांव देतो. ही एक स्वतंत्र व स्वयंभू वस्तु आहे असें तो मानतो. बाहेरचें गोचर जग हें याच 'भावा'चें व्यक्त स्वरूप होय असें हेगेल मानतो. उलट माझ्या दृष्टीनें हेगेल ज्याला 'भाव' म्हणतो तें माणसाच्या मनांत भौतिकसृष्टीचें पडलेलें प्रतिबिंब असून त्याचेंच विचाराच्या निरनिराळ्या स्वरूपांत रूपांतर होत असतें.

हेगलच्या विरोधविकासाच्या गूढ अंगावर मी ३० वर्षांपूर्वीच टीका केली आहे. त्यावेळीं हेगेलचा हा गूढ विरोधविकासवाद तत्त्वज्ञामध्यें मोठा अभिमानाचा विषय होता. जर्मन संस्कृतीचे अभिमानी म्हणविणारे तिरसट, उध्दट पण अगदींच उथळ असे कांहीं पंडित मी कॅपिटल ग्रंथाच्या पहिल्या खंडाची तयारी करीत होतों त्याकाळीं हेगेलचा विरोधविकासवाद हा मेलेल्या मढ्यासारखा आहे असें मानण्यांत आनंद मानीत होते. म्हणून मग मी जाहीरपणें 'हेगेलच्या सामर्थ्यसंपन्न तत्त्वज्ञानाचा मी शिष्य आहे' असा पुकारा केला. कॅपि-

ट्लमध्यें मूल्यसिध्दांतावरील प्रकरणांत हेगेलची विशिष्ट अशी परिभाषा मीं वापरली आहे. हेगेलनें डायलेक्टिक ( म्हणजे विरोधविकासात्मक ) विचारपध्दति गूढ करून सांगितली खरी पण एकंदरीनें या पध्दतीची मांडणी त्यानेंच पहिल्यानें सर्वंकषपणें व हेतुपूर्वक अशी केली आहे. त्याची विरोधविकासपद्धति 'खालीं डोके वर पाय' अशी उभी आहे. तुम्हांला जर त्या गूढत्वाच्या कवचींतलें वास्तवात्मक खोबरें हवें असेल तर तुम्ही तिला डोकें वर पाय खालीं अशी उभी केली पाहिजे.

हेगेलच्या गूढतेमुळें जर्मनींत ही पद्धति मोठी प्रतिष्ठा पावली. कारण चालू परिस्थिति हीच उत्तम असें तीमुळें ठरत होतें. म्हणून अनियंत्रित राज्यसत्ता व भरभराटणारे भांडवलदार या दोघांनाही ती हवीशी वाटली. पण तिचें वास्तववादी स्वरूप जर लक्षांत घेतलें तर भांडवलदार व त्यांचे तत्त्ववेत्ते यांना ती अतिशय तिरस्कार्य वाटेल; कारण तिच्या व्यापक स्वरूपांत सद्यस्थितीचें समर्थन होतें तसाच तिचा विनाशही शक्य व समर्थनीय ठरतो. प्रत्येक ऐतिहासिक घटना ही प्रवाही आहे, व म्हणून कोणत्याही विद्यमान परिस्थितीचा विचार या पद्धतींत होतो त्याप्रमाणेंच प्रत्येक अवस्था ही अल्पकालीन आहे याचाही विचार होतो. या विरोधविकासविचारपद्धतीवर कोणत्याही शब्दप्रामाण्याचा पगडा बसत नाहीं. ती पूर्ण विवेचक आणि क्रांतिकारक आहे.

भांडवलशाही समाजांत जे अंगभूत असे अंतर्विरोध आहेत त्यांचा ठसा व्यवहारदृष्टीच्या अशा भांडवलदारांच्या मनावर नियतकालिक आर्थिक आवर्तामुळें होणाऱ्या फरकांनीं मोठा खोल असा उमटतो. या आर्थिक आवर्तांचा कळसाचा बिंदू म्हणजे जागतिक आर्थिक संकट हा असतो. तो कळसाचा बिंदू जवळ येत चालला आहे;

अजून तो प्राथमिक अवस्थेंत आहे इतकेंच. पण या संकटाचें क्षेत्र सारें जग हें आहे आणि त्या संकटाचें कार्य अतिशय तीक्ष्ण असणार आहे; यामुळें आधुनिक पवित्र रूसो-जर्मन साम्राज्यांतल्या उथळ प्रोफेसरांच्या डोक्यांत ही विरोधविकासपद्धति नौबदीच्या दणदणाटानें ठासून भरली जाईल.

लंडन जानेवारी २४, १८७३ कार्ल मार्क्स

---